


**श्रीकृष्ण:** सत्य आणि धर्म हीं जर माझ्या ठायीं स्थिर असतील तर त्या पुण्यानें अभिमन्यूच्या या बाळाला पुनः जीव येवो.

(पृ. ५३०)

भारत-गौरव-ग्रंथमाला—पुष्प १३०

# श्रीमन्महाभारतार्थ

(महाभारताचें सुबोध मराठी भाषांतर)



## द्वादश खण्ड

### अनुशासनपर्व, आश्वमेधिकपर्व, आश्रमवासिकपर्व, मौसलपर्व, महाप्रस्थानिकपर्व, स्वर्गारोहणपर्व.



नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

—भ. गी., अ. ४, ३८.

लेखक

केशव लक्ष्मण ओगले, बी. ए.

मर्यादायां स्थितो धर्मः शमश्चैवास्य लक्षणम् । पृ. ७६

न हि तेजस्विनां शापाः तेजःसु प्रभवन्ति वै । पृ. २०७

धर्मे ते धीयतां बुद्धिर्मनस्तु महदस्तु च । पृ. ६०१

धर्मादर्थश्च कामश्च स किमर्थं न सेव्यते । पृ. ६७०

शके १८५९ ] किंमत ६ रुपये [ सन १९३७

# निवेदन

—०—

महाभारताचा हा शेवटचा बारावा खण्ड आज वाचकांच्या हातीं देऊन, नऊ वर्षांपूर्वी अंगावर घेतलेल्या एका फार मोठ्या जबाबदारीच्या कार्याची समाप्ति आम्ही करीत आहों.

महाभारताच्या प्रकाशनाची योजना ज्या वेळीं आम्हीं ठरविली, त्यावेळीं त्याच्या प्रसारासंबंधीं जे आम्हीं कांहीं किमान अंदाज केले होते, ते तितकेसे खरे ठरले नाहींत. याला, समाजाची दिवसेंदिवस खालावत चाललेली आर्थिक स्थिति ही जशी कदाचित् कारण असूं शकेल, त्याहूनहि विचारप्रधान वाङ्मयापेक्षां विकारप्रधान वाङ्मयाकडे बहुजनसमाजाची असलेली ओढ ही अधिक कारण असावी असें वाटतें.

महाभारतासारख्या प्रकाशनाला ही स्थिति फारशी अनुकूल नाहीं. परंतु या अनुकूल–प्रतिकूलतेच्या विचारांत मनाला न गुंतवितां, अंगावर घेतलेलें काम कांहींहि झालें तरी पुरें करावयाचेंच, या निश्चयानें जितक्या झपाट्यानें काम आटोपतां येईल तितक्या झपाट्यानें काम आटोपत आणलें, व आज संपूर्ण महाभारत द्वादश खण्डांत महाराष्ट्रसमाजापुढें टेविलें आहे.

महाभारताला, 'प्राचीन भारतीयांचा इतिहास,' असें पंडितांकडून म्हटलें जातें. पण तो केवळ इतिहास नाहीं, तर तो प्राचीन भारतीयांच्या अनुभवसिद्ध व तपस्यापूर्ण ज्ञानाचा विश्वकोशच आहे. कारण, त्यांत धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या मानवी जीविताच्या चतुरंग ध्येयाचा सर्व बाजूंनीं विचार केलेला आहे.

अर्वाचीन ज्ञानकोशकार, व्यक्तीला त्याच्या भोंवतालच्या जगाची व त्यांतील अनेक शास्त्रांची ओळख करून देऊन, त्यांच्यांत बौद्धिक भूक उत्पन्न करतात व ती आपल्या ज्ञानकोशद्वारा भागविण्याचा प्रयत्न करतात. पण, शारीरिक व बौद्धिक भुकेबरोबरच वयपरत्वें मनुष्यांत जी आत्मिक भूक उत्पन्न होते, तिजकडे लक्ष पोंचवून ती भागविणारा व यथार्थ ज्ञान देणारा ज्ञानकोश 'महाभारता'खेरीज आज तरी उपलब्ध नाहीं. असा हा ज्ञानकोश सर्वांस सुलभतेनें उपलब्ध व्हावा यासाठीं, मराठी भाषा बोलणाऱ्या समाजाकरितां, कै. वे. शा. सं. बापटशास्त्री, श्री. देवस्थळी, श्री. जोशी

व श्री. ओगले यांसारख्या विद्वान् संस्कृतज्ञांच्या सहकारितेनें तयार करून प्रसिद्ध केला.

यापूर्वी चिपळूणकर आणि मंडळीनें अशा तऱ्हेचें महाभारताचें संपूर्ण भाषांतर करून प्रसिद्ध केलें होतें. परंतु बरेच वर्षांपासून चिपळूणकर आणि मंडळीकडील या ग्रंथाचा सांठा संपलेला असल्यामुळें, नवीन ग्राहकांस त्यांजकडून प्रती विकत मिळेनाशा झाल्या होत्या, व बाजारांत ज्यांच्याकडे कांहीं प्रती होत्या त्यांजकडे त्या ९० किंवा १०० रुपयांच्या खालीं मिळणें अशक्य झालें होतें. ही परिस्थिति लक्षांत घेऊन, सर्वसामान्य लोकांनाहि घ्यावयाला परवडेल अशी किंमत ठेवून हा ग्रंथ प्रसिद्ध करावा असा आम्हीं विचार केला व हें कार्य हातीं घेतलें.

आमची महत्त्वाकांक्षा अशी आहे कीं, हा ग्रंथ प्रत्येक सुशिक्षित महाराष्ट्रीयाच्या घरीं असलेला आम्हांस दिसावा. पण त्याहूनहि, विद्येची ज्या ठिकाणीं उपासना केली जाते, अशा प्रत्येक उच्च व माध्यमिक विद्यालयांत, विद्यापीठांत, ग्रंथमंदिरांत, अर्वाचीन ज्ञानकोशांच्या व संदर्भग्रंथांच्या शेजारीं तो प्रतिष्ठेनें झळकतांना दिसावा.

महाभारताच्या या बाराहि खण्डांत ६००० हून अधिक पृष्ठांचा मजकूर आला आहे. ग्रंथसंपादन व प्रकाशन या पायीं ३०,००० रुपयांहून अधिक रक्कम खर्च झाली आहे.

अशा तऱ्हेच्या ग्रंथप्रकाशनाचीं कार्यें बहुशः धनिकांकडून व राजेरजवाड्यांकडून देणग्या मिळवून किंवा सहकारी तत्त्वावर भांडवल उभारून पार पाडलीं जातात. परंतु, आम्हीं यांपैकीं कोणत्याहि मार्गाचा अवलंब न करतां, लोकांच्या आश्रयावर व अभिज्ञतेवर पूर्ण भरंवसा ठेवून, आधीं काम करून दाखवावें व मग दाम मागावा, असा मनाशीं विचार करून हें काम अंगावर घेतलें, व तें आज पूर्वयोजने-प्रमाणें पूर्ण केलें आहे.

वर आम्हीं म्हटलेंच आहे कीं, या कामीं तीस हजारांहून अधिक रक्कम खर्ची पडली आहे. पण त्याच्या निम्मे इतकीहि रक्कम ग्रंथविक्रीच्या रूपानें वसूल झालेली नाहीं. याला असेंहि एक कारण असूं शकेल, कीं अशा तऱ्हेचा बराच काळ खाणारा प्रचंड ग्रंथ प्रकाशकांच्या योजनेप्रमाणें पूर्ण होईल किंवा नाहीं, अशी खात्री वाटत नसल्यानें,—व तशीं कांहीं उदाहरणें घडलीं असल्यामुळें—पुष्कळांना आपला पैसा अपुऱ्या ग्रंथांत गुंतविणें धोक्याचें वाटतें. त्यामुळें ग्रंथ पुरा झाल्यावरच तो घेण्याचें आश्वासन देणारे बरेच निघतात. आमचा हा ग्रंथ प्रसिद्ध होत असतां, अशीं आश्वा-

सनें बऱ्याच जणांकडून मिळालीं, तर बऱ्याच जणांनीं, 'ग्रंथ पूर्ण तरी होऊं द्या! मग पाहूं!' असे उद्गार काढले. आमच्या या हितचिंतकांना आतां हा पूर्ण स्वरूपांतील ग्रंथ पाहून खास आनंद वाटेल व ते त्यास आश्रय देण्यास पुढें येतील अशी आम्हांस खात्री वाटते. शिवाय, महाराष्ट्रीयांच्या ज्या अभिज्ञतेवर आम्ही विश्वासून आहों, ती अभिज्ञता ग्रंथसमाप्तीनंतरच्या काळांत आम्हांला उत्तेजन देऊन, अशा-तऱ्हेचीं मोठीं व शाश्वत स्वरूपाचीं कार्यें हातीं घेण्यास आमच्यांत दुप्पट उत्साह उत्पन्न करील अशी आम्हांस आशा आहे.

मुंबई
ता. २७ जुलै, १९३७.

मंगेश नारायण कुळकर्णी

# विषयानुक्रमणिका



## अनुशासनपर्व १३.

### दानधर्मपर्व. १ पृष्ठें १—३८९.

## भीष्मस्वर्गारोहणपर्व २. पृष्ठें ३८९–३९३.



## अनुशासनपर्व पुरवणी. पृष्ठें ३९४–४१०.

# आश्वमेधिकपर्व १४

## अश्वमेधपर्व १. पृष्ठें ४११–४३४.



## अनुगीतापर्व २. पृष्ठें ४३६–५७४.

## ब्राह्मणगीता. पृष्ठें ४४७–४६९.

---

## आश्रमवासिकपर्व १५. पृष्ठें ५७४–६३६.

## पुत्रदर्शन पर्व २. पृष्ठें ६१७–६३१

## नारदागमन पर्व ३. पृष्ठें ६३१–६३५.



## मौसलपर्व १६. पृष्ठें ६३६–६५२

## महाप्रस्थानिक पर्व १७. पृष्ठें ६५२–६५९



## स्वर्गारोहणपर्व. पृष्ठें ६५९–६७१.

# श्रीमन्महाभारतार्थ

## (महाभारताचें सुबोध मराठी भाषांतर)



## द्वादश खण्ड



## १३ अनुशासनपर्व

### दानधर्मपर्व १



#### अध्याय १ ला

[ १ जाणूनबुजून केलेल्या पापामुळें मनाला शांति मिळत नाहीं, तरी ती कोणत्या ायानें मिळेल असा युधिष्ठिराचा प्रश्न. २ गौतमी–लुब्धक संवादरूपानें भीष्माचें र. ]

( १ ) **युधिष्ठिरः**—हे पितामह, पुष्कळ प्रकारें आपण मला शांतीचा उपदेश ा. पण तो सारा ऐकूनहि माझ्या मनाला शांति वाटत नाहीं. स्वतःच्या पाची जाणीव असतां शांति मिळावी तरी कशी? आपलें हें बाणांनीं विद्ध लेलें शरीर पाहून आणि आमच्या दुष्कृत्यांचा विचार करतां मला सुख कसें त व्हावें? रक्तानें माखलेलें आपलें हें अंग ज्यावरून झरे वहात आहेत अशा ातासारखें दिसतें तें पहातां, पावसाच्या सरीनें कमल कोमेजावें तसें मला दुःख त आहे. माझ्या पितामहाला रणांगणांत शत्रूंनीं माझ्यामुळेंच या दुःस्थितीला चविलें, याहून दुःखदायक तें काय असणार? इतरहि राजे माझ्याकरतांच कुटुंब नाश पावले, याहून दुःखदायक गोष्ट कोणती? युद्धासारखें निन्द्यकर्म

करून धृतराष्ट्र पुत्र कालवश झाले. तेव्हां आतां आम्हांला गति तरी कोणती मिळणार? दुर्योधन खरोखर भाग्यवान् होय, कारण आपली ही दुरवस्था पहाण्यास तो राहिला नाहीं. तुमच्या घाताला मींच कारण असून मित्रवधाचेंहि पाप मजकडून घडलें आहे. दुःखित होऊन भूमीवर पडलेल्या तुम्हांला पहात असतां मला शांति मिळणें शक्य नाहीं. कुलकलंक असा दुष्ट दुर्योधन आपल्या सैन्यासह व बन्धुगणांसह क्षत्रियोचित अशा या युद्धांत वध पावला; तुम्हांला भूमीवर पडलेले पहाण्याला तो आज येथें नाहीं; म्हणून मला मरणच श्रेयस्कर वाटतें, जगणें तसें वाटत नाहीं. मला सुद्धां जर शत्रूंनीं बंधूंसह युद्धांत ठार केलें असतें, तर बाणांनीं विद्ध होऊन दुःख पावत असलेल्या तुम्हांला पहाण्याचें माझ्या दैवीं आलें नसतें! खरोखर आम्हीं पापीच जन्मास आलों म्हणावयाचे! महाराज, आतां या लोकीं तर नाहींच, पण निदान परलोकीं तरी आम्हीं त्या पापापासून कसे मुक्त होऊं हें सांगा. माझें प्रिय करावें असें जर तुम्हांला वाटत असेल, तर एवढें करा.

(२) भीष्मः—युधिष्ठिरा, वस्तुतः तूं कालादिकांच्या अधीन असतां स्वतःलाच कर्मांचें कारण कसें बरें मानतोस? हा विचार मोठा गूढ व सूक्ष्म आहे. याविषयीं मृत्यु व गौतमी यांचा काळ, लुब्धक आणि सर्प यांशीं झालेला प्राचीन संवाद सांगत असतात. युधिष्ठिरा, गौतमी नांवाची एक वृद्ध व शांतवृत्तीची स्त्री होती; तिचा पुत्र सर्पानें दंश केल्यामुळें मरण पावला. त्याच्या मृत शरीराकडे ती पहात असतां, अर्जुन नांवाचा एक लुब्धक त्या सर्पाला पाशांनीं बांधून तिजकडे घेऊन आला आणि तिला म्हणाला, "हाच तो तुझ्या पुत्राला मारणारा दुष्ट सर्प. हे महाभागे, याला आतां मीं कोणत्या रीतीनें ठार करूं, तें सांग. याला अग्नींत जाळून मारूं, कीं शस्त्रानें याचे तुकडे करूं? बालकाचा वध करणारा हा दुष्ट जीवंत रहाण्यास मुळींच पात्र नाहीं."

**गौतमीः**—हे अर्जुना, तूं या सर्पाला सोडून दे. तुला वस्तुस्थितीची जाणीव नाहीं. हा सर्प वध होण्यास पात्र नाहीं. पुढें काय होणार याचा विचार न करतां निष्कारण पापाचें ओझें शिरावर कोण बरें घेईल? अरे, धर्माच्या साह्यानें लोक शोकसागर तरून जातात, पण पापाचा भार अंगावर घेतल्यास तेच पाण्यांत पडलेल्या शस्त्राप्रमाणें त्यांत बुडून जातात. अरे, याला मारल्यानें माझा पुत्र जीवंत होईल काय? आणि याला जीवंत ठेवल्यास तुझें तरी काय वांकडें होणार आहे? याला ठार केल्यास मात्र तुला नरकाची प्राप्ति होईल.

लुब्धकः—चांगलें वाईट जाणणाऱ्या हे देवि, मोठे लोक इतरांच्या दुःखानें दुःखित होतात हें मीं जाणतों. पण असले हे उपदेश ज्यावर कठिण प्रसंग आला नाहीं, तोच करतो. यास्तव मीं या सर्पाचा वध करणार. ज्यांना शांतिच केवळ पाहिजे, ते कालान्तरावर भिस्त ठेवितात, पण ज्यांना तत्काळ अर्थसिद्धि पाहिजे असते, ते त्याच रीतीनें वागून दुःखपरिहार करून घेतात. यास्तव मीं या दुष्ट सर्पाला मारून टाकितों, तूं दुखः सोडून दे.

गौतमीः—बाबारे, आमच्यासारख्यांना दुःखच होत नाहीं. सज्जन लोक नित्य धर्मपरच असतात. हा माझा पुत्र केव्हांतरी मरावयाचा होताच. तेव्हां या सर्पाचा वध करण्यास संमति देणें मला शक्य नाहीं. ब्राह्मणांना कधीं रागच जर येत नाहीं, तर रागामुळें ते कोणाला यातना तरी कशी देतील ? तर हे साधो, थोडा मऊपणा धारण कर आणि या सर्पाला क्षमा करून सोडून दे.

लुब्धकः—असें नाहीं. शत्रूला मारल्यानेंच परलोकीं हित होतें. हा लाभ जो करून घेतो, त्यालाच सर्वांत श्रेष्ठ समजतात. हा सर्प दुष्ट असल्यामुळें याच्या वधानेंच खरा लाभ होईल. पण याला न मारिल्यानें तो तुला होणार नाहीं.

गौतमीः—शत्रूला पकडून मारल्यानें काय बरें मिळणार ? आणि त्याला सोडून न दिल्यानें अशी इष्टप्राप्ति तरी काय होणार ? यास्तव या सर्पाला मी क्षमा कां न करावी ? आणि याची मुक्तता तरी काय म्हणून करूं नये ?

लुधब्कः—गौतमि, या एकाचा वध करून इतर अनेकांचें रक्षण करावयाचें आहे; अनेकांपासून कांहीं याचें रक्षण करावयाचें नाहीं. धर्मज्ञ लोक अपराध्याचा त्यागच करतात, तरी या सर्पाला तूं ठार कर.

गौतमीः—लुब्धका, या सर्पाला ठार केलें असतां माझा पुत्र पुनः जीवंत होईल असें नाहीं हें जर निश्चित, तर त्याला मारावयाला मला तर कांहीं कारण दिसत नाहीं, तरी त्याला सोडून दे.

लुब्धकः—गौतमि, देवराज इंद्र वृत्राला मारून मोठा झाला. प्रत्यक्ष शंकरानेंहि यज्ञाचा विध्वंस केला, तेव्हांच तो भाग्यशाली झाला. म्हणून तूंहि त्या देवांचें अनुकरण कर आणि निःशंकपणें या सर्पाला सत्वर मारून टाक.

भीष्मः—याप्रमाणें लुब्धकानें गौतमीला पुनः पुनः सांगितलें असतांहि तिला सर्पाला मारून टाकण्याची बुद्धि झाली नाहीं. तेव्हां संकटग्रस्त असा तो पाशानीं जखडलेला सर्प हळुहळू श्वास टाकीत धीर धरून मनुष्यवाणीनें बोलूं लागला.

**सर्पः**—हे अर्जुना, मीं पराधीन आहें व अगतिक अशा मला मृत्यूनें प्रेरणा केल्यामुळें मीं या बालकाला दंश केला, तेव्हां त्यांत माझा काय बरें दोष? मीं कांहीं रागानें किंवा मनांत एखादा हेतु धरून याला दंश केला नाहीं. यास्तव यांत पाप असलेंच तर मृत्यूला तें आहे, मला नाहीं.

**लुब्धकः**—हे सर्पा, पराधीनपणें तूं पाप केलें असलें, तरी प्रत्यक्ष तें तुझ्याच हातून घडलें असल्यामुळें तूंहि पापाचा धनी आहेस. मातीचें भांडें करण्यांत जशीं चाक, दांडा इत्यादि साधनें म्हणून लागतात, तसाच तूंहि या कामांत आहेस. तुझाहि संबंध पापाशीं आहे, म्हणून त्या अपराधामुळें तूं माझ्या हातून मरण्यास योग्य आहेस. पापाचें कारण तूं आहेस हें तूंहि म्हणतोस.

**सर्पः**—दांडा, चाक, इत्यादि साधनें जशीं परतंत्र असतात, तसाच मीं आहें. म्हणून तुझ्या म्हणण्याप्रमाणें पाहिलें तरी मी दोषी ठरत नाहीं. आतां तुझें म्हणणें जरी असें असलें, तरी मग मारण्याचीं आयुधादि साधनेंहि एकमेकांचीं प्रेरक असल्यामुळें, हा कार्यकारणभाव कोठपर्यंत न्यावयाचा? म्हणून मीं दोषी नाहीं व त्यामुळें तूं मला पापी समजून मारणेंहि योग्य नाहीं. कारण यांत जर कोठें पाप असलें, तर तें सर्वांनाच आहे.

**लुब्धकः**—हे सर्पा, या पापाला जर तूं कारण झाला नसतास तर तुझ्याकडे कर्तृत्वाचा दोषहि येता ना; पण ज्या अर्थी या बालकाला तूं मारिलें आहेस, त्या अर्थीं तूं वधास पात्र आहेस असेंच मला वाटतें. दुष्ट कृत्य केलें असतांहि जर पापाचा दोषी कोणी होणार नसेल, तर मग निंद्य कर्म करण्याला हें सबळ कारणच होईल. यास्तव तूं फार कशाला बडबडतोस, तूं वधास पात्र आहेस.

**सर्पः**—कार्यच करावयाचें नसल्यास, त्यासाठीं लागणारी साधनसामग्री असली किंवा नसली, तरी त्याची क्रिया कशी घडेल? यास्तव कोठें झालें तरी मूळ हेतूलाच प्राधान्य असल्यामुळें, तोच विशेषतः विचारांत घेतला पाहिजे. लुब्धका, या बालकवधाच्या बाबतींत तूं जर मला कारण समजत असशील, तर मला प्रेरणा करणारा जो दुसरा कोणी तोच पापी ठरला पाहिजे.

**लुब्धकः**—हे दुष्ट सर्पा, दुष्टपणें या बालाचा नाश करणारा तूं माझ्या हातून मरण्यासच पात्र आहेस. व्यर्थ कशाला बडबड करतोस?

**सर्पः**—लुब्धका, यज्ञप्रसंगीं अग्नींत हविर्भाग टाकणाऱ्या ऋत्विजांना जसें त्या यज्ञांचें फळ मिळत नाहीं, तसें या बालकवधाचें फल मलाहि मिळणें योग्य नाहीं.

भीष्मः—याप्रमाणें मृत्यूच्या प्रेरणेवरून सर्प बोलत असतां, प्रत्यक्ष मृत्यूच तेथें आला आणि सर्पाला म्हणूं लागला.

मृत्युः—हे सर्पा, काळानें प्रेरणा केल्यावरूनच मीं तरी तुला दंश करावयास लाविलें म्हणून या बालकघाताचा हेतु तूं नाहींस, तसा मीहि नाहीं. वायु जसा मेघांना इकडून तिकडे ओढून नेतो, तसाच काल मला नेतो. मीं त्याच्या अधीन आहें. जे कांहीं सात्त्विक, राजस किंवा तामस गुण प्राणिमात्रांत असतात, ते सर्व कालामुळेंच होत. या भूमीवर किंवा आकाशांत जे कांहीं स्थावरजंगम पदार्थ आहेत, ते सारे, हे सर्पा, कालस्वरूपीच आहेत. सारें जगच कालस्वरूपी आहे. या लोकीं ज्या प्रवृत्ति किंवा निवृत्ति दिसतात, किंवा त्यांचे जे परिणाम घडतात, त्या सर्वांना कालस्वरूपीच म्हटलें आहे. सूर्य, चंद्र, विष्णु, जल, वायु, इन्द्र, अग्नि, आकाश, पृथ्वी, मित्रदेवता, पर्जन्य, वसु, अदिति, नद्या, समुद्र, ऐश्वर्य, विपत्ति, या सर्वांना कालच उत्पन्न करतो व कालच त्यांचा संहार करतो. हें सर्व तुला ठाऊक असतां, हे सर्पा, तूं मला दोषी म्हणतोस हें कसें ? आणि मग जर मी या स्थितींत दोषी असेन, तर तूंहि तितकाच दोषी आहेस.

सर्पः—हे मृत्यो, तूं दोषी आहेस कीं निर्दोषी आहेस, असें मीं कांहींच म्हणत नाहीं. माझें म्हणणें एवढेंच कीं, तुझ्या प्रेरणेवरून मी या बालकाचा घात केला. या बाबतींत काल दोषी ठरो वा न ठरो. दोषी कोण हें मी ठरवीतच नाहीं. तो आपला अधिकार नाहीं. माझ्या बोलण्याचा हेतु एवढाच कीं, या बालकघाताचा दोष मजवरून काढून टाकावा, तसाच तो मृत्यूवरूनहि काढावा.

भीष्मः—मग तो सर्प अर्जुनाला म्हणाला, 'अरे तूं मृत्यूचें भाषण ऐकिलें-सना ? तरी आतां मला निरपराध्याला पाशांनीं जखडून ताप देणें तुला योग्य नाहीं.'

लुब्धकः—मी मृत्यूचें भाषण ऐकिलें तसें, हे सर्पा, तुझेंहि ऐकिलें. पण तेवढ्यावरून तूं निर्दोष आहेस असें कांहीं ठरत नाहीं. मृत्यु तसाच तूंहि या बालकाच्या घाताला कारण आहेस. दोघेहि कारण असतां, नाहीं म्हणून भागणार नाहीं. दुष्ट, क्रूर आणि सज्जनांना दुःख देणाऱ्या मृत्यूला धिक्कार असो ! पापाचें कारण होणाऱ्या तुज दुष्टाला मी आतां ठार करतों.

मृत्युः—कालाच्या आज्ञेंत वागणारे आम्ही तो सांगेल तेवढेंच करतों; आम्हीं

पराधीन आहों. तुला जर योग्य विचार करतां येत असेल, तर तूं आम्हांला दोषी समजणार नाहींस.

लुब्धकः—मृत्यु व तूं असे तुम्ही दोघे जर कालाच्या आधीन आहां, तर उपकारकर्त्याविषयीं आनंद आणि अपकारकर्त्याविषयीं द्वेष उत्पन्न तरी कां होतात, हें समजून घेण्याची माझी इच्छा आहे.

मृत्युः—लुब्धका, जगांत ज्या कांहीं गोष्टी घडत असतात, त्या साऱ्या कालाच्या प्रेरणेनेंच होतात, हें मीं तुला पूर्वीं सांगितलें आहेच. तेव्हां आम्हीं दोषी नाहीं.

भीष्मः—याप्रमाणें धर्माच्या अर्थाविषयींचा संशय उत्पन्न होऊन वाद चालला असतां, प्रत्यक्ष काल तेथें आला आणि सर्प, मृत्यु, लुब्धक व अर्जुन यांना उद्देशून बोलूं लागला.

कालः—लुब्धका, स्वतः मी, हा मृत्यु, तसाच हा सर्प यांतील कोणीहि या बालकघाताचे प्रेरक नसल्यामुळें त्याचा दोष आम्हांला नाहीं. या मुलानें जें जें कर्म केलें तें तेंच आम्हांला प्रेरक झालें. अर्जुना, याच्या नाशाला दुसरें कोणीहि कारणीभूत नाहीं. हा आपल्या कर्मानेंच मरण पावला. कर्मच त्याच्या नाशाचें कारण. आम्ही सगळे कर्माधीनच आहों. सारे लोक कर्मांचेंच फल भोगणारे आहेत. कर्में जशीं एकमेकांना प्रेरक होतात, तसे आम्ही होतों. कुंभार मातीच्या गोळयांतून त्याला पाहिजेत त्या वस्तु जशा बनवितो, तसा मनुष्य आपण केलेल्या कर्मांचेंच फळ उपभोगितो. प्रकाश आणि छाया यांचा संबंध जसा नित्य आहे, तसाच कर्म व त्याचा कर्ता यांचाहि नित्य संबंध असतो. याचा विचार करतां मी, मृत्यु, सर्प किंवा तूं आणि ही वृद्ध ब्राह्मणी गौतमी यांतील कोणीहि या बालाच्या नाशाला कारण नसून तो स्वतःच त्याचें कारण होय, असें दिसून येईल.

भीष्म म्हणाला, युधिष्ठिरा, याप्रमाणें काळाचें भाषण चाललें असतां, ती वृद्ध गौतमी सारे लोक कर्मानेंच बद्ध झालेले आहेत, असें समजून आल्यामुळें अर्जुनाला म्हणूं लागली.

गौतमीः—माझ्या मुलाच्या मरणाला काल, मृत्यु किंवा सर्प यांतील कोणीहि कारण नसून, आपल्या कर्मानेंच तो नाश पावला आहे. जें कर्म मी केलें त्यामुळेंच माझा पुत्र मरण पावला. तरी काल व मृत्यु यांनीं आतां आपआपल्या ठिकाणीं जावें; आणि अर्जुना तूं या सर्पाला सोडून दे.

भीष्मः—मग काल, मृत्यु व सर्प हे सर्व आपआपल्या मार्गानें निघून गेले आणि अर्जुन व गौतमी हीं दोघेंहि शोकमुक्त झालीं. युधिष्ठिरा, ही कथा तूं ऐकिलीस, तरी आतां शांति धारण कर व शोकमग्न होऊं नको. सगळे जण आप-आपल्या कर्मानें मिळणाऱ्या फलांचीच प्राप्ति करून घेतात. सर्व राजमंडळाच्या नाशाचें हें कर्म तूं केलेलें नाहीं, तसेंच दुर्योधनानेंहि नाहीं. कालाचाच हा सारा खेळ आहे असें समज.

वैशंपायन म्हणाला, राजा, हें भीष्माचें भाषण ऐकून युधिष्ठिराचा खेद दूर झाला, आणि तो पुनः भीष्माला प्रश्न करूं लागला. १३.१.१.

---

## अध्याय २ रा

[ १ गृहस्थाला कोणत्या धर्मानें मृत्यु जिंकितां येतो असा युधिष्ठिराचा प्रश्न. २ भीष्माचें त्याला उत्तर; इक्ष्वाकुवंशी दुर्योधन राजाच्या सुदर्शना कन्येचा वृतान्त, अग्नीशीं तिचा विवाह; त्यांच्या सुदर्शन नामक पुत्राच्या गृहस्थाश्रमाचें वृत्त; अतिथि-सत्काराचें महत्त्व. ]

( १ ) युधिष्ठिरः—हे पितामह, आपण सुज्ञ असून सर्व शास्त्रें जाणतां. तुमच्याकडून आणखीहि धर्म ऐकण्याची माझी इच्छा आहे. तरी कोणत्या धर्माचा आश्रय केला असतां गृहस्थाला मृत्यूवर विजय मिळवितां येतो तें सर्व मला तत्त्वतः सांगावें.

(२) भीष्मः—या विषयासंबंधानें पूर्वीचा थोडा इतिहास आहे. तो असाः—प्रजापति मनूला इक्ष्वाकु नांवाचा पुत्र असून त्याला पुढें सूर्यासारखे तेजस्वी असे शंभर पुत्र झाले. त्यांतील दहावा पुत्र दशाश्व नांवाचा होता. तो धर्मशील आणि पराक्रमी असून माहिष्मतीचें राज्य करी. त्याचा मदिराश्व नांवाचा मुलगा फार धार्मिक, सत्यवक्ता, तपस्वी व दानशूर असून धनुर्वेद तसेच इतर वेद यांत निष्णात होता. मदिराश्वाला द्युतिमान् हा पुत्र झाला. तो फार भाग्यवान् तेजस्वी व बलवान् होता. द्युतिमानाचा मुलगा सुवीर हा सर्व लोकांत प्रख्यात असून फार धार्मिक वृत्तीचा होता. त्याचा कोश मोठा असून तो जणूं दुसरा इन्द्रच वाटे. सुवीराचा पुत्र दुर्जय. तो सर्व शस्त्रधाऱ्यांत प्रसिद्ध होता. दुर्जयाला आश्विनीकुमारांप्रमाणें सौंदर्यशाली असा दुर्योधन नांवाचा मुलगा होता. तो रणांगणांतून कधींहि माघारा फिरणारा नव्हता. त्याच्या राज्यांत इन्द्र

नित्य हवी तशीच वृष्टि करी, त्यामुळें तें धन, धान्य, पशु इत्यादि संपत्तीनें परिपूर्ण असे. त्याच्या राज्यांत कृपण, दरिद्री, रोगी, कृश, असा कोणीहि माणूस दिसत नसे. तो स्वतः नम्र, गोड बोलणारा, क्षमाशील, इंद्रियांचें नियमन करणारा, धर्मशील, कनवाळू, पराक्रमी पण बढाई न मारणारा असा होता. तो बुद्धिमान्, इंद्रियदमन करणारा, ब्राह्मणांविषयीं आदर बाळगणारा, सत्यप्रतिज्ञ असून त्यानें यज्ञ केले होते. तो कोणाचा अपमान करीत नसे, तसाच तो दानशूर असून वेदवेदांगांत निष्णात होता. पवित्र अशा देवनदी नर्मदेचें त्याच्यावर प्रेम बसलें व ती त्याची पत्नी झाली. त्यांना पुढें अत्यंत सुंदर अशी कन्या झाली व तिचें नांव सुदर्शना असेंच तिच्या रूपाला जुळतें असें ठेवण्यांत आलें. युधिष्ठिरा, तिच्याइतकी सुंदर स्त्री पूर्वी झालीच नव्हती. त्या राजकन्या सुदर्शनेवर अग्निदेवाचें प्रेम बसल्यामुळें तो ब्राह्मणरूपानें येऊन दुर्योधन राजाजवळ तिला मागणी घालूं लागला. पण हा दरिद्री व ब्राह्मण म्हणून असवर्ण होय असें समजून दुर्योधनानें त्या ब्राह्मणाचें म्हणणें मान्य केलें नाहीं. तेव्हां राजाचा यज्ञ चालू झाला असतां, अग्नि एकाएकीं गुप्त झाला; तें पाहून राजा दुःखी झाला आणि ब्राह्मणांना म्हणाला, 'हे विप्र हो, कृतघ्न पुरुषांवर केलेले उपकार व्यर्थ जावेत तसा आपला अग्नि नष्ट झाला आहे. तेव्हां मजकडून किंवा तुमच्याकडून कांहीं दुष्कृत्य घडलें कीं काय? माझ्या दृष्टीनें तर तसें कांहीं अल्पहि दुष्कृत्य दिसत नाहीं. पण बारकाईनें त्याचा विचार केला पाहिजे.' राजाचें हें भाषण ऐकून ते ब्राह्मण कांहींएक उत्तर न देतां नम्रपणें अग्नीलाच शरण गेले. तेव्हां अग्नीनें शरदृतूंतील सूर्याप्रमाणें तेजस्वी होऊन त्यांना दर्शन दिलें आणि तो त्यांना म्हणाला, "दुर्योधनाच्या कन्येला वरण्याची मला इच्छा आहे." हें ऐकून ब्राह्मण दुसऱ्या दिवशीं सकाळीं राजाकडे गेले व त्यांनीं अग्नीचें म्हणणें त्याला कळविलें. त्यांचें बोलणें ऐकून राजाला आनंद झाला आणि अग्नीची मागणी त्यानें मान्य केली. पण उलट अग्नि आपल्याजवळ नित्य रहावा असेंहि त्यानें मागून घेतलें व अग्नीनेंहि तें मान्य केलें. तेव्हांपासून माहिष्मती नगरींत अग्नि नित्य दिसून येतो. मग दुर्योधनानें कन्येला सुंदरवस्त्रालंकारांनीं भूषित करून महात्म्या अग्नीच्या स्वाधीन केलें व अग्नीनेंहि यज्ञांतील घृताच्या धारेप्रमाणें तिचा वेदनिर्दिष्ट विधीनें स्वीकार केला. तिचें रूप, शील, कुल, सौंदर्य इत्यादिकांनीं अग्नि अगदीं संतुष्ट झाला व तिला पुत्र व्हावा अशी त्याला इच्छा झाली. तदनुसार तिला

पुत्र झाला; तो पूर्ण चंद्रासारखा रमणीय स्वरूपाचा असल्यामुळें त्याचें नांव सुदर्शन हेंच ठेवण्यांत आलें. त्या पुत्राला लहानपणींच ब्रह्मज्ञान झालें.

इकडे नृग राजाचा पितामह ओघवान् नांवाचा राजा होता, त्याला ओघवती नांवाची कन्या व ओघरथ नांवाचा पुत्र होता. ओघवान् राजानें आपली ती ओघवती कन्या या सुदर्शनाला भार्या म्हणून दिली. तेव्हां सुदर्शन गृहस्थाश्रमी होऊन कुरुक्षेत्रीं तिच्यासह आनंदानें राहूं लागला. युधिष्ठिरा, त्या बुद्धिमान् व तेजस्वी सुदर्शनानें अशी प्रतिज्ञा केली कीं ‘ गृहस्थाश्रमांतच मीं मृत्यूला जिंकीन.’ मग तो अग्निपुत्र सुदर्शन ओघवतीला म्हणाला, ‘अतिथि दारीं आला असतां, त्याला विन्मुख केव्हांहि पाठवूं नको. अतिथि ज्या ज्या गोष्टीनें संतुष्ट होईल, मग ती गोष्ट आत्मदानहि कां असेना, ती तूं निःशंकपणें कर. हें व्रत माझ्या हृदयांत नित्य घोळतें आहे. अतिथिसंतोषापेक्षां गृहस्थाला अधिक कांहींच नाहीं. हे सुंदरि, माझा शब्द जर मानावयाचा असेल, तर हें माझें म्हणणें एकनिष्ठेनें मनांत धर. मीं घरीं असलों, किंवा बाहेर गेलों असलों तरी माझें वचन तुला मानावयाचें असल्यास तूं अतिथीचा अनादर कधींहि करूं नको.’ पतीचें भाषण ऐकून ओघवती मस्तकावर हात जोडून म्हणाली, ‘ महाराज, आपल्या वचनाबाहेर मला कांहींच कर्तव्य नाहीं.’ या गोष्टीनंतर सुदर्शनाला त्याच्या घरींच जिंकावें या हेतूनें तो जिकडे जाईल तिकडे कांहीं उणेपणा काढण्यासाठीं मृत्यु त्याच्या पाठोपाठ फिरूं लागला. मग एक दिवस तो अग्निपुत्र सुदर्शन समिधा आणण्यासाठीं बाहेर गेला असतां, एक भव्य ब्राह्मण अतिथि म्हणून आला आणि ओघवतीला म्हणाला, “हे सुंदरि, गृहस्थाश्रमधर्म जर तुला मान्य असेल, तर तूं माझा सत्कार करावा अशी माझी इच्छा आहे.” अतिथीचें म्हणणें ऐकून राजकन्या ओघवतीनें वेदोक्त विधीनें त्याचें स्वागत केलें व त्याला पाय धुण्यास पाणी आणि बसावयास आसन दिलें. मग ती त्याला म्हणाली, ‘आपल्याला कोणत्या गोष्टीची इच्छा आहे? मी आपल्याला काय द्यावें?’ अतिथीनें उत्तर दिलें, “हे कल्याणि, तूंच मला पाहिजे आहेस. तरी गृहस्थाश्रमधर्म तुला मान्य असल्यास, स्वतःचें दान करून तूं मला संतुष्ट कर” तेव्हां त्याला इतर अनेक इष्ट वस्तु देण्याचें मान्य करून ओघवती त्याचें मन फिरवूं लागली, पण तो ब्राह्मण दुसरें कांहींच घेण्याचें मान्य करीना. तेव्हां ओघवतीला पतिवचनाचें मूळापासून स्मरण झालें आणि हंसत हंसत ‘ठीक आहे’ असें तिनें अतिथीला सांगितलें. मग तो ब्राह्मण स्मित करीत घरांत गेला

व गृहस्थधर्माचें पालन करूं इच्छिणाऱ्या पतीच्या शब्दांची आठवण करीत ओघवतीसुद्धां त्याच्या बरोबर गेली.

इतक्यांत समिधा घेऊन अग्निपुत्र सुदर्शन परत आला; त्याच्या पाठोपाठ दांत ओंठ खात मृत्युहि भाऊबंधकी साधीत होताच. आश्रमाशीं आल्यावर सुदर्शनानें 'कोठें ग गेलीस ?' अशी ओघवतीला दोनचार वेळां हांक मारिली. पण ओघवतीनें पतीच्या त्या हांकेला ओ दिली नाहीं; कारण त्या ब्राह्मणानें दोन्ही हातांनीं तिला धरून ठेविलें होतें. आपण उष्टी झालों असें वाटून लज्जित झाल्यामुळें ती साध्वी स्तब्ध राहिली, तिच्या तोंडून शब्द निघेना. तेव्हां तिला सुदर्शनानें पुनः हांक मारिली व तो म्हणाला, 'ती साध्वी गेली तरी कोठें ? ती पतीव्रता व सत्यवचनी असून अगदीं सरळ स्वभावाची आहे. नित्या-प्रमाणें ती प्रेमानें आज पुढें कशी येत नाहीं ?' सुदर्शनानें असें म्हणतांच झोंपडीच्या आंत असलेला तो ब्राह्मण त्याला उत्तर देऊं लागला. तो म्हणाला, 'हे अग्निपुत्रा सुदर्शना, मीं ब्राह्मण अतिथि म्हणून तुजकडे आलों असतां तुझी भार्या माझी मनधरणी करीत आहे. हे ब्राह्मणा, तिच्या विविध सत्कारामुळें मीं तिला वरिलें आहे व त्याला अनुसरून ती सुंदरी माझी सेवा करीत आहे. तेव्हां या बाबतींत तुला योग्य दिसेल तें तूं कर.' आंतून तो ब्राह्मण असें बोलत आहे तों हातांत लोखंडाचा दांडा घेऊन मृत्यु सुदर्शनाच्या मागें येऊन उभा राहिला. त्याचा विचार असा चालला होता कीं जर सुदर्शनानें गृहस्थाश्रमधर्म पाळण्याची आपली प्रतिज्ञा मोडली, तर त्याचा त्या दांड्यानें वध करावा. पण सुदर्शनानें मत्सर आणि राग यांचा मनापासून त्याग केलेला असल्यामुळें हंसत हंसतच तो आंतील ब्राह्मणाला उद्देशून म्हणाला, 'हे ब्राह्मणा, तुमची क्रीडा चालूं द्या. मला त्यांत फार संतोष आहे. घरीं आलेल्या पाहुण्याचा सत्कार करणें हा गृहस्थाचा श्रेष्ठ धर्म आहे. याहून श्रेष्ठ धर्म नाहीं असें विद्वान् लोक म्हणतात. माझें व्रतच आहे कीं, प्राण, भार्या किंबहुना माझें म्हणून जें कांहीं द्रव्य आहे, तें अतिथीला द्यावयाचें. हें मीं अगदीं निश्चितपणें सत्य म्हणून सांगत आहें. प्राण्यांच्या शरीरांत वास करून पृथ्वी, वायु, आकाश, जल, तेज, बुद्धि, आत्मा, मन, काल आणि दहाहि दिशा अशीं सर्व नित्य त्याचें चांगलें वाईट कर्म पहात असतात. मीं आतां जें बोललों, तें ज्याअर्थी अगदीं सत्य आहे, त्या अर्थी देवांनीं मला तारावें किंवा मारावें, वाटेल तें करावें.'

सुदर्शन असें म्हणत आहे, तों हे युधिष्ठिरा, सर्व दिशांकडून अनेकवार

असा शब्द झाला कीं 'सुदर्शन म्हणतो आहे तें सत्य आहे, त्यांत कांहींच असत्य नाहीं.' इतक्यांत तो अतिथि ब्राह्मण झोंपडींतून बाहेर आला आणि आपल्या शरीरानें पृथिवी व आकाश वायूप्रमाणें भरून टाकून उच्च स्वरानें बोलूं लागला. त्याच्या बोलण्याच्या नादानें तिन्ही लोक भरून गेले. तो सुदर्शनाचें नांव घेऊन त्याला म्हणाला, 'हे निष्पाप सुदर्शना, मी यमधर्म आहें. तुझें कल्याण असो. तुझी परीक्षा पहाण्यासाठींच मीं आलों होतों. तुझें सत्यवर्तन पाहून मीं तुझ्यावर अगदीं संतुष्ट झालों आहें. तुझ्यामागून हा जो मृत्यु नित्य चालत आहे तो तुझा उणेपणा काढण्यासाठीं चालत होता; पण त्याला तूं आपल्या धैर्यानें जिंकिलें आहेस. तुझ्या या साध्वी पतिव्रता स्त्रीकडे पहाण्याचीहि खरोखर कोणाला शक्ति नाहीं; कारण तुझे गुण व तिचें प्रातिव्रत्य हीं तिचें रक्षण करीत आहेत. ती जें जें बोलेल तें तें घडून येईल, असें तिच्या तपाचें सामर्थ्य आहे. सर्व जगाला पावन करण्यासाठीं ही आपल्या अर्ध शरीरानें श्रेष्ठनदी होईल व दुसऱ्या अर्धानें तुझी सेवा करील. योग हा तिच्या अगदीं हातचा मळच जणूं आहे. आपल्या तपानें तूं जे लोक मिळविले आहेस, त्या लोकीं तूं हिच्यासहवर्तमान याच शरीरानें जाशील व त्या शाश्वत व नित्य अशा लोकांतून तुला केव्हांच माघारें यावें लागणार नाहीं. तूं मृत्यूला जिंकिलें असून तुझें ऐश्वर्य फार मोठें आहे. तूं पांचहि भूतांचें उल्लंघन करून आपल्या पराक्रमानें मनाला वाटेल तिकडे जाण्यास समर्थ होशील. या गृहस्थधर्माच्या पालनानें तूं कामक्रोध जिंकिले असून तुझी सेवा करून या राजकन्येनें म्हणजे तुझ्या पत्नीनेंहि स्नेह, आसक्ति, आळस, मोह, द्वेष या सर्वांवर विजय मिळविला आहे.'

भीष्म म्हणाला, युधिष्ठिरा, इतक्यांत एकसहस्र पांढरे घोडे जुंपलेल्या रथांत बसून भगवान् इन्द्र तेथें आला. सुदर्शनानें मृत्यु, आत्मा, लोक, पंचभूतें, बुद्धि, काल, मन, आकाश, काम, क्रोध या सर्वांना जिंकिलें; यावरून गृहस्थाश्रमी पुरुषाला अतिथिसत्काराहून दुसरें दैवत नाहीं ही गोष्ट नीट लक्षांत घे. अतिथिपूजन आणि ब्रह्मचिंतन यांची योग्यता शंभर यज्ञांनाहि येणार नाहीं असें ज्ञाते म्हणतात. घरीं आलेल्या शीलवान् अतिथीचा जो सन्मान करणार नाहीं, त्याला तो अतिथि आपलें पाप देऊन त्याचें पुण्य हिरावून नेतो.

युधिष्ठिरा, गृहस्थाला मृत्यु कसा जिंकतां आला, याविषयींचें हें सुंदर आख्यान मीं तुला सांगितलें. तें कल्याणकारक, आयुष्यवर्धक, यशःप्रद, आणि पापनाशक असून उत्कर्षाची इच्छा करणाऱ्यानें त्याचें मनन करावें. जो हें सुद-

र्शनाख्यान प्रतिदिवशीं कोणाला तरी ऐकवील, त्याला पुण्य अशा लोकांची प्राप्ति होईल. १३.१.२.

---

## अध्याय ३ रा

[ दुष्प्राप्य असें ब्राह्मण्य विश्वामित्राला कसें मिळालें हा व तत्संबंधीं इतर प्रश्न युधिष्ठिर विचारतो. ]

( १ ) **युधिष्ठिर**—क्षत्रियादि तिन्ही वर्णांना ब्राह्मण्याची प्राप्ति करून घेणें जर दुर्घट आहे, तर, हे पितामह, महात्मा विश्वामित्र क्षत्रिय असतां त्याला तें कसें मिळालें, हें नीटपणें ऐकण्याची मला इच्छा आहे. थोर मनाच्या वसिष्ठाचे शंभर पुत्र तपःसामर्थ्यानें त्या पराक्रमी विश्वामित्रानें मारिले. क्रोधाविष्ट होऊन त्यानें तीव्र तेजाचे व काळासारखे वाटणारे अनेक राक्षस उत्पन्न केले. शेंकडों ब्रह्मर्षि ज्यांत झाले असा महान् कुशिक वंश त्यानें या मनुष्यलोकीं स्थापन केला. ऋचीकाचा महातपस्वी पुत्र जो शुनःशेप त्याला हरिश्चंद्र राजाच्या यज्ञांत पशुस्थानीं कल्पिलें असतां तेथून त्याची सुटका केली व त्याला स्वतःचा ज्येष्ठ पुत्र म्हणून मानिलें. पुढें त्याचे इतर पन्नास पुत्र त्या वडील भावाला नमस्कार करीनात, म्हणून त्यानें त्यांना चांडाल व्हाल असा शाप दिला. इक्ष्वाकुकुलांतील त्रिशंकु राजाला बान्धवांनीं सोडून दिलें असतां त्याला खालीं मस्तक असलेल्या स्थितींत विश्वामित्रानें स्वर्गीं नेऊन दक्षिण दिशेकडे त्याची स्थापना केली. त्याच्यामुळें कौशिकी नदी विपुल जलानें युक्त होऊन देव, ऋषि व ब्राह्मण यांच्या सेवेला पात्र होऊन पवित्र झाली. त्याच्या तपांत विघ्न उत्पन्न करणारी रम्भा नांवाची अप्सरा त्याच्या शापामुळें शिला होऊन गेली. त्याच्या भीतीनें एकदां वसिष्ठ ऋषीनें स्वतःला बांधून घेऊन पाण्यांत बुडी मारिली व पाशापासून मुक्त होऊन तो पुनः वर आला. तेव्हांपासून तेथें विपाशा नांवाची पुण्य नदी वसिष्ठाच्या त्या कृत्यानें प्रख्यात झाली. देवसेनापति इन्द्राची त्या वसिष्ठानें उत्तम शब्दांनीं स्तुति करून त्याला संतुष्ट केलें व आपली शापापासून मुक्तता करून घेतली व तो आतां उत्तानपादपुत्र ध्रुव, तसेंच सप्तर्षि यांच्यामध्यें उत्तर दिशेला आकाशांत तळपत असलेला दिसतो. विश्वामित्र क्षत्रिय असून त्यानें हीं व दुसरीं अशींच पराक्रमाचीं कृत्यें केलीं, हें पाहून मला मोठें कौतुक वाटतें. तर हें झालें तरी कसें? दुसरा देह न घेतांच तो ब्राह्मण झाला कसा, हें सारें

मला नीट समजावून सांगा. मातंगकुलांत जन्मून ब्राह्मण होणें जसें खरोखर अत्यंत कठीण, तसेंच चाण्डाल झाल्यावर ब्राह्मण होणें हेंहि होय. तरी अशा प्रकारचा तो विश्वामित्र ब्राह्मण कसा झाला ? १३.१.३.

---

## अध्याय ४ था

[ १ विश्वामित्राचें वृत्त. २ विश्वामित्राच्या गोत्रप्रवर्तक पुत्रांचीं नावें. ]

( १ ) भीष्म—युधिष्ठिरा, विश्वामित्र पूर्वीं क्षत्रिय असतां ब्राह्मणच नव्हे तर ब्रह्मर्षि कसा झाला तें ऐक. भरताच्या वंशांत अजमीढ नांवाचा धर्मश्रेष्ठ राजा होऊन गेला. त्यानें अनेक यज्ञ केले. त्याला जह्नुनामक पुत्र झाला. तोहि मोठा राजा होता. गंगानदी त्या महात्म्याची कन्या झाली. त्याचा पुत्र सिन्धुद्वीप हा मोठा कीर्तिमान् व गुणांनीं पित्यासारखाच निघाला. सिन्धुद्वीपाला बलाढ्य असा बलाकाश्व नांवाचा मुलगा होता. बलाकाश्वाचा पुत्र वल्लभ हा जणूं प्रत्यक्ष दुसरा धर्मच होता. त्याचा पुत्र कुशिक नांवाचा असून तो इन्द्रासारखा पराक्रमी निघाला. कुशिकाचा पुत्र जो गाधि राजा त्याला पुत्र न झाल्यामुळें पुत्रेच्छेनें त्यानें वनवास पत्करिला. तो वनांत रहात असतां त्यानें यज्ञ केला व तेणेंकरून त्याला एक कन्या झाली; तिचें नांव सत्यवती असून तिचें स्वरूप अप्रतिम होतें. च्यवनभार्गवऋषीचा पुत्र ऋचीक नांवाचा महातपस्वी ऋषि होता, त्याचें मन सत्यवतीवर बसलें. पण तो दरिद्री असल्यामुळें गाधि राजा त्याला आपली कन्या देण्याचें मान्य करीना. एकदां त्याला गाधीनें झिटकारिलें असतां पुनः जेव्हां तो राजाकडे आला, तेव्हां तो राजश्रेष्ठ त्याला म्हणाला, 'ऋचीका, जर माझ्या मुलींचा देज तूं देशील, तरच तुझी मागणी मी मान्य करीन.' ऋचीक म्हणाला, 'राजा, तूं कन्येचा काय देज मागतोस तें सांग, त्याची भीड कशाला ? त्याचा फारसा विचार करण्याचीहि गरज नाहीं.' गाधीनें उत्तर केलें, 'भार्गवा, चंद्रकिरणासारखे तेजस्वी असे वायुवेगाचे एक सहस्र श्यामकर्ण घोडे तूं मला दे.'

भीष्म म्हणाला, युधिष्ठिरा, गाधीचें उत्तर ऐकतांच च्यवनपुत्र ऋचीक अदितिपुत्र व जलांचा नायक जो वरुण त्याच्याकडे जाऊन त्याला म्हणाला, 'हे देवश्रेष्ठा, वायुवेगाचे व चंद्राप्रमाणें तेजस्वी असे एक सहस्र श्यामकर्ण घोडे

एका संख्येनें मला पाहिजेत, ते मी तुजजवळ मागत आहें.' वरुणानें उत्तर केलें 'ऋचीका, तुला जेथें पाहिजे असतील, तेथें तसे घोडे उभे रहातील.' त्याप्रमाणें ऋचीकानें मनांत आणतांच गंगेच्या पाण्यांतून चंद्रासारखे तेजस्वी असे बलवान् सहस्र वारू बाहेर निघाले. गंगेच्या तीरावरील तें ठिकाण कान्यकुब्जापासून जवळच असून अद्यापि अश्वतीर्थ नांवानें लोकांत प्रसिद्ध आहे. असो. युधिष्ठिरा, मग ऋचीकानें ते सहस्र घोडे नेऊन गाधीला दिले असतां, तो राजा चकित झाला आणि ऋषि कदाचित् शाप देईल या भीतीनें, त्यानें आपली कन्या अलंकृत करून त्या भृगुकुलोत्पन्न ऋचीकाला अर्पण केली. ऋचीकानें तिचा विधिपुरःसर स्वीकार केला, तेव्हां तिलाहि असा पति मिळाल्यामुळें मोठा आनंद झाला. तिच्या वर्तनानें ऋचीकहि संतुष्ट होऊन त्यानें तिला एक वर दिला. त्या वराचें वृत्त सत्यवतीनें आपल्या मातेला जाऊन सांगितलें असतां, ती माता खालीं मान करून जवळ उभी असलेल्या आपल्या कन्येला म्हणाली, 'बाळे, पुत्रदानाची कृपा मजवरहि तुझ्या पतीनें करावी अशी माझी इच्छा आहे व तो महातपस्वी तसें करण्यास समर्थहि आहे.' मातेचें बोलणें सत्यवतीनें लगेच घरीं जाऊन आपल्या पतीला सांगितलें. तेव्हां ऋचीक तिला म्हणाला, 'ठीक आहे, तुझ्या मातेलाहि माझ्या कृपेनें लवकरच अत्यंत गुणवान् असा पुत्र होईल. तुझी विनंति व्यर्थ जाणार नाहीं. तुलाहि आपला वंश चालविणारा गुणयुक्त पुत्र खरोखर होईल. आतां तूं आणि तुझी माता, असें करा कीं, ऋतुस्नात झाल्यावर तिनें पिंपळाला आणि तूं उदुंबराला आलिंगन द्यावें, म्हणजे तुमची इच्छा पूर्ण होईल. हे सुंदरी, हे दोन चरु अभिमंत्रित आहेत, ते घे आणि एक तूं व दुसरा तुझी माता, असे भक्षण करा, म्हणजे तुम्हांला पुत्रप्राप्ति होईल. पतीचें वचन ऐकून आनंदित झालेली सत्यवती लगेच मातेकडे गेली व तिनें तो सारा वृत्तान्त तिला सांगितला. तेव्हां माता तिला म्हणाली, 'मुली, मीं तुझी माता असल्यामुळें मीं सांगतें तेवढें कर. तुझ्या पतीनें जो हा मंतरलेला चरु तुला दिला आहे, तो तूं मला दे आणि माझा चरु तूं घे. तशीच, हे मुली, वृक्षांची सुद्धां आपण आलटापालट करूं या. मीं तुझी माता आहें, तरी माझें म्हणणें मानावयाचें असल्यास तूं तसें कर. कोणालाहि आपलें मूल उत्तम निर्दोष व्हावें अशीच इच्छा असणार व तशीच तुझ्या पतीनें व्यवस्था केली असली पाहिजे. यास्तव तुझा चरु आणि वृक्ष यांवर माझें मन गेलें आहे. तेव्हां तुला उत्तम भाऊ कसा होईल याचा तूं विचार कर.'

सत्यवतीनें मातेच्या सांगण्याप्रमाणें केलें व योग्य काळीं ती व तिची माता दोघीही गर्भवती झाल्या. तेव्हां आपली पत्नी गरोदर असलेली पाहून ऋचीक मुनीला विचार करतां त्या गर्भासंबंधानें कांहीं घोटाळा आहे असें दिसून आलें आणि तो तिला म्हणाला, 'हे सुंदरि, मला अगदीं स्पष्ट दिसतें कीं तूं आपल्या चरूचा तसाच वृक्षाचा मातेच्या चरूशीं व वृक्षाशीं विनिमय केला आहेस. मी तुझ्या चरूंत ब्रह्मतेजाची व तुझ्या मातेच्या चरूंत क्षात्रतेजाची स्थापना केली होती. त्याप्रमाणें तुला सर्व जगांत विख्यात असा ब्राह्मणगुणसंपन्न पुत्र झाला असता आणि तुझ्या मातेला उत्तम क्षात्रगुणयुक्त पुत्र झाला असता. पण ज्या अर्थी तुम्हीं आपल्या वस्तूंची आलटापालट केलीत, त्याअर्थीं आतां तुझ्या मातेला श्रेष्ठ असा ब्राह्मण पुत्र होऊन तुला उग्रकर्मे करणारा क्षात्रगुणयुक्त पुत्र होईल. आईच्या प्रेमाला बळी पडून तूं हें भलतेंच कांहीं तरी केलेंस!' पतीचें भाषण ऐकून सत्यवतीला फार वाईट वाटलें व ती अगदीं खिन्न होऊन झाडावरून तुटलेल्या सुंदर वेलीप्रमाणें भूमीवर पडली. जेव्हां ती भानावर आली, तेव्हां पतीच्या पायां पडून ती म्हणाली 'महाराज, मी आपली करुणा भाकतें, तरी माझ्यावर कृपा करा, आणि माझा पुत्र क्षत्रिय होणार नाहीं असें करा. माझा नातू उग्रकर्मा झाला तरी चालेल, पण पुत्र तसा न व्हावा, एवढा वर मला द्या.' महातपस्वी ऋचीकानें 'तसेंच होईल' असें म्हटलें व तदनुसार सत्यवतीला शुभलक्षणी पुत्र झाला तोच जमदग्नि होय. इकडे गाधिपत्नीला जो पुत्र झाला, त्याचें नांव विश्वामित्र. ऋचीक ऋषीच्या कृपेनें तो जन्मल्यामुळें तो ब्रह्मवादी ब्रह्मर्षि झाला.

(२) तो क्षत्रिय असतांहि ब्राह्मणवंशाचा उत्पत्तिकर्ता झाला, व त्याचे तपस्वी थोर पुत्र गोत्रकर्ते ब्रह्मवेत्ते झाले. मधुच्छंदा, देवरात, अक्षीण, शकुन्त, बभ्रु, कालपथ, याज्ञवल्क्य, स्थूण, उलूक, यमदूत, सैन्धवायन, वल्गुजंघ, गालव, वज्र, सालंकायन, लीलाढ्य, नारद, कूर्चामुख, बाहुलि, मुसल, वक्षोग्रीव, आंघ्रिक, शिलायूप, शित, चक्रक, मारुतन्तव्य, वातघ्न, आश्वलायन, श्यामायन, गार्ग्य, जाबालि, सुश्रुत, कारीषि, सश्रुत्य, कपिल, ताडकायन, उपगहन, आसुरायण, मार्दम, हिरण्याक्ष, जङ्घारि, बाभ्रवायणि, भूति, विभूति, सुरकृत्, सूत, अरालि, नाचिक, चांपेय, उज्जयन, नवतंतु, वक्रणख, सेयन, यति, अम्भोरुह, चारुमत्स्य, शिरीषी, गार्दभि, उर्जयोति, उदापेक्षी, नारद, अशीं त्या विश्वामित्राच्या ब्रह्मवादी पुत्रांचीं नांवें होत. याप्रमाणें, हे

युधिष्ठिरा, तुला तेजस्वी विश्वामित्राच्या जन्माचें वृत्त सांगितलें. यांत तुला जी कांहीं शंका असेल ती मला विचार, म्हणजे मीं तिचें निरसन करीन. १३.१.४.

---

## अध्याय ५ वा

[ १ कनवाळू भक्ताचे गुण कोणते असा युधिष्ठिराचा प्रश्न. २ त्याचें उत्तर म्हणून इन्द्र आणि पोपट यांमध्यें झालेला संवाद भीष्म त्याला सांगतो. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे धर्म जाणणाऱ्या पितामहा, अत्यंत कनवाळू अशा भक्तामध्यें कोणते गुण असतात, ते ऐकण्याची माझी इच्छा आहे, तरी ते मला कृपा करून सांगा.

( २ ) **भीष्म**—युधिष्ठिरा, याविषयीं सुद्धां इन्द्र आणि पोपट यांमधील एक प्राचीन संवाद सांगत असतात. एकदां काशिराजाच्या गांवांतील एक व्याध बाहेर येऊन विषारी बाण घेऊन हरिण शोधूं लागला. मांसाला हपापलेल्या त्या व्याधानें त्या अरण्यांत हरिणांचा कळप पहातांच धनुष्यावर बाण चढविला आणि एका हरिणावर तो रोखून सोडिला. पण तो व्यर्थ न जाणारा बाण चुकून हरिणाला न लागतां एका मोठ्या वृक्षाला लागला. तो तीक्ष्ण विषारी बाण आंत टोंचतांच तो वृक्ष आपलीं फळें व पानें गाळून सुकून गेला. त्या वृक्षाची अशी दशा झाली असतां त्यावरील पक्षी निघून गेले, पण एक पोपट मात्र वृक्षाविषयींच्या एकनिष्ठ भक्तीमुळें त्यावरच राहिला. तो कोठें जाईना, कांहीं खाईना. बोलण्याचीहि शक्ति त्याला राहिली नाहीं, इतका तो म्लान झाला. मनुष्यांतहि न आढळणाऱ्या वृत्तीच्या त्या उदारबुद्धि पोपटाला सुखदुःखाची योग्यता सारखीच वाटते असें पाहून इन्द्राला आश्चर्य वाटलें. तो मनांत विचार करूं लागला कीं, 'मनुष्येतर कोटींत जन्मास येऊन या पोपटाला एवढा कनवाळूपणा कसा प्राप्त झाला.' पण प्राण्यांतहि सर्व भावना सर्वत्र आढळतात, असें म्हणून त्यानें समाधान करून घेतलें; मग मनुष्यरूप धरून तो पृथ्वीवर उतरला आणि पोपटाला म्हणाला, 'हे पक्षिश्रेष्ठा, तुला जन्म देऊन दक्षकन्या शुकी खरोखर धन्य झाली. तूं या वृक्षाचा त्याग कां बरें करीत नाहींस?'

इन्द्राचा प्रश्न ऐकून शुकानें त्याला मस्तक वांकवून नमस्कार केला आणि उत्तर दिलें. तो म्हणाला, 'हे देवराजा, तुझें मीं स्वागत करतों. तपःसामर्थ्यानें मीं तुला ओळखिलें.' शुकाच्या या शब्दांनीं इन्द्र विस्मित होऊन 'काय हो हें

ज्ञान!' असें म्हणाला व त्याला धन्यवाद देऊन त्याची त्यानें मनःपूर्वक स्तुति केली. त्या सच्छील शुकाचा धार्मिकपणा आणि वृक्षावरील ती एकनिष्ठ भक्ति पाहून इन्द्र त्याला म्हणाला, 'अरे शुका, या वृक्षावर आतां फळें नाहींत कीं पानें नाहींत, तेव्हां याचा पक्ष्यांना मुळींच आधारहि नाहीं. मग एवढें हें मोठें रान पडलेलें असतां तूं या शुष्क वृक्षाला धरून कां राहिला आहेस? या रानांत पानांनीं झांकलेले कोठे असलेले अनेक मोठे सुंदर वृक्ष आहेत व त्यांवर फिरावयास पुष्कळ वाव आहे. तरी क्षीण, शुष्क व मृत झालेला हा जुनाट वृक्ष विचारपूर्वक तूं सोडून दे.' भीष्म म्हणाला, युधिष्ठिरा, इन्द्राचें हें भाषण ऐकून पोपटानें एक दीर्घ श्वास सोडला आणि दीनपणें तो बोलूं लागला. तो म्हणाला, 'इन्द्रा, देवतांचें अतिक्रमण कधीं करूं नये. आतां या तुझ्या प्रश्नाचें उत्तर असें कीं, या वृक्षावर माझा जन्म झाला आणि चांगल्या गुणांची जोड होऊन यावरच माझें वर्धन झालें व शत्रूंना माझ्यावर चाल करतां आली नाहीं. अशा या वृक्षाचा अनन्यभक्त मीं कनवाळू असा असतां माझ्याविषयीं करुणा दाखवून तूं माझ्या जन्माचें वाटोळें कां बरें करूं पाहतोस? कनवाळूपणा हा साधूचें मोठेंच लक्षण असून त्यांना त्याविषयीं मोठें प्रेमहि वाटतें. धर्माविषयीं कांहीं संशय उत्पन्न झाला तर सर्व देव तुझाच अभिप्राय विचारितात. तुझी देवांच्या राज्यावर स्थापना झाली ती याचमुळें. यास्तव तूं मला या झाडाचा त्याग करावयास लावूं नकोस. हा सुस्थितींत असतां त्यावर मीं आपलें जीवन चालविलें, आतां हा शुष्क झाला असतां मीं याचा त्याग कसा बरें करूं?'

शुकाच्या या उत्तरानें व त्यानें दाखविलेल्या कनवाळूपणानें इन्द्राला हर्ष झाला आणि तो शुकाला म्हणाला, 'हे शुका, कांहीं वर माग?' हें ऐकून नित्य कनवाळू असलेल्या त्या शुकानें 'हा वृक्ष पुनः शोभायुक्त होवो' असा वर मागितला. तेव्हां त्याची दृढभक्ति पाहून इन्द्रानें त्या वृक्षावर अमृताचा वर्षाव केला व तत्क्षणींच त्यावर पानें व फळें येऊन तो शोभायुक्त दिसूं लागला. या कनवाळूपणाच्या कृत्यामुळें शुकालाहि आयुष्याच्या शेवटीं इन्द्रलोकाची प्राप्ति झाली. याप्रमाणें, हे युधिष्ठिरा, एकनिष्ठ भक्त मिळाला असतां शुकापासून वृक्षाला जशी सिद्धि मिळाली, तशी सर्वांना मिळते. १३.१.५

## अध्याय ६ वा.

[ १ दैव आणि पुरुषप्रयत्न यांत श्रेष्ठ कोणतें याविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न. २ पुरुषप्रयत्न श्रेष्ठ हें दाखविण्यासाठीं वसिष्ठ आणि ब्रह्मदेव यांतील संवाद भीष्म त्याला सांगतो. त्याविषयीं ययातीचें उदाहरण ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामह, आपण सुज्ञ असून सर्व शास्त्रांत निष्णात आहां. तरी दैव आणि पुरुषप्रयत्न यांत श्रेष्ठ काय तें मला कृपा करून सांगावें.

( २ ) **भीष्म**—युधिष्ठिरा, याविषयीं वसिष्ठ आणि ब्रह्मदेव यांच्यामध्यें पूर्वी संवाद झाला होता, तो तुला सांगतों. दैव आणि मनुष्ययत्न यांत श्रेष्ठ कोण असाच प्रश्न पूर्वी वसिष्ठ मुनीनें ब्रह्मदेवाला केला. तेव्हां ब्रह्मदेवानें गोड शब्दांनीं अर्थपूर्ण असें त्याला उत्तर दिलें.

**ब्रह्मदेव**—बीजाशिवाय कांहींच होत नाहीं. बीज नसेल तर फळ कोठून मिळेल ? बीज बीजापासून होतें, तसें फळहि बीजापासूनच मिळतें. शेतकरी शेत नांगरून त्यांत ज्या प्रकारचें बीज पेरितो, त्याच प्रकारचें चांगलें किंवा वाईट फळ त्याला प्राप्त होतें. बीज पेरलें नाहीं तर क्षेत्र जसें निष्फळ, तसें पुरुषप्रयत्नाशिवाय दैवाचीहि सिद्धि नाहीं. ह्मणून पुरुषप्रयत्नाला क्षेत्र व दैवाला बीज असें म्हणतात. क्षेत्र आणि बीज यांची जोडी जमेल तेव्हांच धान्याची समृद्धि होते. चांगलें किंवा वाईट जें कर्म करावें त्याचेंच फळ कर्त्याला स्वतःला मिळतें हें प्रत्यक्ष या जगांत दिसून येतें. शुभकर्माचें फळ सुख आणि पापाचें फळ दुःख. जें करावें तेंच केव्हां झालें तरी फळास येतें. न केल्याचा भोग केव्हांहि मिळत नाहीं. जो कोणी करील, त्यालाच वैभव आणि कीर्ति मिळतात. न कर्त्याला कांहींच न मिळतां तो भ्रष्ट होतो व क्षतावर मीठ शिंपल्यासारखें होतें. रूप, वैभव, विविध रत्नें यांची प्राप्ति तपोरूप कर्मानेंच होते. कांहीं न करतां दैवावर अवलंबून रहाणाऱ्याला कांहीं मिळत नाहीं. स्वर्गभोगादिकांचाहि लाभ पुरुषप्रयत्नानेंच होतो. आकाशस्थ ज्योति, देव, नाग, यक्ष, चंद्र, सूर्य, मरुत् हे सर्व प्रयत्नामुळेंच मनुष्यपणापासून देवपणापर्यंत पोंचले. जे कर्म करीत नाहींत त्यांना द्रव्य, मित्र, ऐश्वर्य, उत्तम कुल, हीं उपभोगावयास मिळणें कठिणच. ब्राह्मणाला पवित्राचरणानें, क्षत्रियाला पराक्रमानें, वैश्याला खटपटीनें आणि शूद्राला सेवेनें इष्ट वस्तूंची प्राप्ति होते. पुरुषार्थाचा लाभ कधीं कांहीं न देणाऱ्याला व न करणाऱ्याला किंवा भिक्षा व तप न करणाऱ्याला

होत नाहीं. ज्यानें तिन्ही लोक तसेच देव आणि दैत्यहि निर्माण केले तो प्रत्यक्ष भगवान् विष्णुसुद्धां समुद्रांत तप करितो. स्वतःच्या कर्माचें फळ जर स्वतःला मिळणार नाहीं तर जगांतील साराच व्यवहार निष्फळ होईल आणि लोक केवळ दैवावर अवलंबून उदासीन रहातील. मनुष्याला उचित असें कर्म न करतां जो केवळ दैवावर भार टाकितो त्याला, नपुंसक पतीशीं गांठ पडलेल्या स्त्रीप्रमाणें वृथा श्रम मात्र होतात. या लोकीं शुभ किंवा अशुभ दैवामुळें जी हानि होईल तीहून फार मोठी हानि पुरुषप्रयत्नाच्या अभावीं परलोकीं होईल. पुरुषानें प्रयत्न केला असतां दैवानुसार तो फळास येतो. पण प्रयत्न न केल्यास दैव झालें तरी कोणाला कांहीं देऊं शकत नाहीं. देवांचीं स्थानेंहि जर अनित्य आहेत, तर कर्माशिवाय दैवाला तरी स्थान कसें असणार ? दैवतें झालीं तरी तीं या लोकीं कोणत्याहि कर्माला साहाय्य करीत नाहींत, उलट कर्म करणारा आपल्याहून वरचढ होईल या भीतीनें तीं त्या कर्मांत अडचणच उत्पन्न करतात. ऋषि आणि देवता यांमध्यें नित्य झगडा चाललेला असतो. दैवाची प्रवृत्ति चाललेली असल्यामुळें तें नाहीं असें म्हणतां येत नाहीं हें खरें; पण दैवाची जर प्रवृत्ति आहे, तर ती तरी कर्माशिवाय कशी होणार ? कर्मांतच मुळीं दैवाची उत्पत्ति आहे. येथें कर्म केल्यानेंच देवलोकीं गुणसमृद्धि प्राप्त होते. आपणच आपले साहाय्यकर्ते व आपणच आपले विघ्नकर्ते असतों. चांगल्या वाईट कोणत्याहि आपल्या कर्माचे साक्षी पण आपणच असतों. पूर्वीं जें कांहीं चांगलें किंवा वाईट केलें असेल त्याची सिद्धि कर्मानेंच होत असल्यामुळें विरुद्ध कर्मानें विरुद्ध फळ मिळवितां येतें. एकदां कर्म केलें म्हणजे त्याचें फळ निश्चित झालें असें न होतां पुढील कर्मानें तें फिरवितां येतें. देवलोकाची प्राप्ति पुण्यकर्मांनीं होते; असें असल्यामुळें दैवाची गांठ पुण्यशील मनुष्यांशीं पडल्यास तें बिचारें काय करूं शकेल ? याविषयीं ययातीचें उदाहरण पहा. ययाति राजा भ्रष्ट होऊन भूमीवर पडला असतां त्याच्या नातवांच्या पुण्यकर्मांनीं त्याला पुनः स्वर्गास नेलें. तसाच पुरूरवा. ऐल नांवानें प्रसिद्ध असलेला तो राजा ब्राह्मणांनीं आशीर्वाद दिल्यामुळेंच स्वर्गीं गेला. याच्या उलट उदाहरण सुदास राजाचें. कोसल देशाचा तो राजा अश्वमेध केल्यामुळें पुण्यकर्मा झाला असतांहि महर्षि वसिष्ठाच्या शापामुळें मनुष्यभक्षी राक्षस होऊन पडला. अश्वत्थामा आणि परशुराम हे धनुर्धर ब्राह्मणपुत्र पुण्यकर्मांनेंहि स्वर्गाला जाऊं शकले नाहींत. तसाच, दुसरा इंद्रच जणूं असा वसु शंभर यज्ञ करूनहि केवळ एक असत्य भाषण केल्यामुळें रसातळीं गेला. विरोचन पुत्र बलि दैवतांनीं

धर्मपाशांनीं बांधून टाकिला असतांहि विष्णूच्या प्रयत्नामुळें पातालवासी झाला! इन्द्राचे पाय धरल्यामुळें जनमेजय राजा स्वर्गास गेला; ब्राह्मणस्त्रीचा वध केल्याचें पापरूप दैव त्याला अडवूं शकलें नाहीं. अज्ञानामुळें ब्राह्मणवध घडला, किंवा बालकवधाचें पाप लागलें असतांहि वैशंपायन ऋषीचें दैवाला कांहीं वांकडें करतां आलें नाहीं. उलट नृग राजानें मोठे यज्ञ केले असतांहि एका खोट्या गोप्रदानामुळें त्याला सरडा व्हावें लागलें. धुन्धुमार राजानें यज्ञ करून देवांना संतुष्ट केलें असतांहि भर यज्ञांत त्याला जराग्रस्त होऊन पर्वतावर पडावें लागलें. पांडवांचें राज्य बलिष्ठ अशा धृतराष्ट्र पुत्रांनीं लुबाडलें असतां तें पांडवांनीं जें परत मिळविलें तें कांहीं दैवाच्या साहाय्यानें नव्हे, तर मनगटाच्या बळावरच. तपोनिष्ठ व्रतशाली मुनि जो कोणाला शाप देतात तो काय दैवाच्या बळावर? कर्माच्या नव्हे कीं काय? एखादी वस्तु सहजगत्या मिळाली असली तरी पापामुळें ती नष्ट होते; तेथें दैव ती राखूं शकत नाहीं. वाऱ्यानें फुलविलेला मूळचा सूक्ष्म अग्नि जसें विराट स्वरूप धारण करतो, जसें कर्माचें साहाय्य असलेलें दैवच नीट रीतीनें वाढीस लागतें, दिव्यांतील तेल संपलें म्हणजे जसा तो दिवा विझून जातो, तसा दैवाच्या पाठीमागचा कर्माचा आधार तुटला कीं तेंहि ऱ्हास पावतें. विपुल धन, विविध भोग, सुंदर स्त्रिया, यांची प्राप्ति झाली तरी कर्महीन मनुष्याला त्यांचा उपभोग घेणें या लोकीं जुळत नाहीं. पण नित्य नियमितपणें कर्म करणारा थोर पुरुष दैवानें अगदीं गुप्तपणें दडवून ठेवलेल्या वस्तूंची सुद्धां प्राप्ति करून घेतो. जवळ असलेल्या वैभवाचा सद्व्यय करून दरिद्री झालेला पुरुष असला, तरी देव त्याला सोडीत नाहींत. या लोकीं नाहीं तर देवलोकीं तो महत्त्व पावतो. उलट नानाप्रकारच्या समृद्धीनें भरलेलें एखाद्या कर्महीन माणसाचें घर असलें तरी देवांना त स्मशानासारखेंच दिसतें. या लोकांत कर्म न करतां कोणालाहि फळ मिळत नाहीं. दैव कांहीं कोणाला अनिष्ठ मार्गापासून वळवीत नाहीं. त्याचें तें सामर्थ्यच नव्हे. पूर्वीं केलेलें जें कर्म असतें, त्यालाच पुढें दैव म्हणतात. प्रयत्नानें सांठवून ठेवलेलें कर्मच मनुष्याला मार्गदर्शक होतें. ब्रह्मदेव म्हणाला, 'हे वसिष्ठा, पुरुषप्रयत्नाचें फळ काय तें मीं तुला याप्रमाणें नीट विचार करून सर्व सांगितलें. तेव्हां माणसानें दैवाचा आधार घेऊन कर्माचा आरंभ करावा आणि दोघांच्या साह्यानें स्वर्गाचा मार्ग आक्रमावा.' १३. १. ६.

---

## अध्याय ७ वा.

[ १ सर्व लहान मोठ्या कर्माचीं फलें कोणतीं असा युधिष्ठिराचा प्रश्न. २ भीष्मानें दिलेलें त्याचें उत्तर. ३ तृष्णात्यागाचें सुख ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे भरतश्रेष्ठ पितामहा, सर्व प्रकारच्या मोठ्या शुभकर्मांचीं फलें कोणतीं तीं मीं आपल्यास विचारीत आहें, तरी तीं आपण मला सांगा.

( २ ) **भीष्म**—होय, युधिष्ठिरा, जें तूं मला विचारिलें तें मीं तुला सांगतों. ऋषींच्या दृष्टीनेंहि तें मोठें गूढ आहे. मृत्यूनंतर कोणाला कोणतें फल प्राप्त होतें तें ऐक. ज्या ज्या शरीरानें जे जें कर्म जो कोणी करतो, त्या त्या शरीरानें तें तें फल त्याला भोगावें लागतें. ज्या ज्या अवस्थेमध्यें जें कांहीं बरें वाईट कर्म मनुष्य करतो, त्या त्या अवस्थेमध्यें प्रतिजन्मीं त्याचें फळ तो भोगितो. पांच इंद्रियांनीं केलेलें कोणतेंहि कर्म कधीं नष्ट होत नाहीं. त्या कर्मांचे ते पांची साक्षीदार असून सहावा साक्षी आत्मा होय. यासाठीं आपल्या घरीं कोणी अतिथि आल्यास त्याच्याकडे आनंदी मुद्रेनें पहाणें, त्याला सहानुभूति दाखविणें, त्याशीं गोड व सरळ बोलणें, त्याच्यासह हिंडणें व त्याजवळ बसणें हा एक यज्ञच असून त्याचीं हीं पांच कर्मेंच दक्षिणा होत. वाटेंत दमून बसलेल्याला, मग तो कोणी अनोळखी कां असेना, जो कोणी चांगलें अन्न देतो त्याला त्या पुण्याचें मोठें फल मिळतें. अग्निपरिग्रह करून जो नित्य स्थंडिलावरच निद्रा घेतो, त्याला उत्तम घरें व शयनें प्राप्त होतात आणि जो वल्कलें परिधान करून रहातो त्याला उत्तम अलंकार व वस्त्रें मिळतात. जो राजा अग्नीजवळच नित्य योगयुक्त होऊन रहातो, तो मोठा पराक्रमी होतो. रसयुक्त पदार्थ जो वर्ज करतो, त्याला सौभाग्य प्राप्त होतें. जो मांसापासून निवृत्त होतो त्याला पशु व पुत्र यांची प्राप्ति होते. जो खालीं मस्तक करून लोंबत रहातो, तसेंच जो पाण्यांत वास करतो किंवा अगदीं एकट्यानें नित्य शयन करतो, त्याला तो इच्छील तें फल मिळतें. अतिथीला पाय धुण्यास पाणी, आसन, दिवा, अन्न आणि आश्रय देऊन त्याचा सन्मान करणें हा आणखी एक पांच दक्षिणांचा यज्ञ होय. जो रणांगणावर वीरासारखा देहत्याग करतो, त्याला अक्षय्य लोकांची प्राप्ति होऊन त्याच्या सर्व कामना पूर्ण होतात. दान केल्यानें धनलाभ होतो, मौन सेवन केल्यानें त्याच्या आज्ञांचें सर्वजण पालन करतात, तपानें उपभोग्य अशा वस्तु मिळतात आणि ब्रह्मचर्यपालनानें दीर्घायुष्य प्राप्त होतें. अहिंसापालनाचें फल सुंदर रूप व ऐश्वर्य हें असून फळें व मुळें खाऊन रहाणाराला राज्य व केवळ

पाला खाऊन रहाणाराला स्वर्ग अशीं फलें मिळतात. जो अन्नत्यागपूर्वक शरीर-विसर्जन करतो, त्याला सर्वत्र सुख प्राप्त होतें; जो केवळ शाकांवर रहातो तो गाईंचा धनी व गवत खाऊन रहाणारा स्वर्गगामी होतो. स्त्रीपासून दूर राहून जो प्रत्यहीं तिन्ही वेळ स्नानपूर्वक वायुपान करतो, त्याला यज्ञ केल्याचें पुण्य मिळतें. सत्यानें स्वर्गप्राप्ति होते, व अग्निदीक्षेनें उत्तम कुलांत जन्म मिळतो. नित्य अग्निदीक्षा घेऊन जो पाण्यावर रहातो, तसेंच अग्नीचें रक्षण करून गायत्रीचा जप करतो, त्याला राज्यप्राप्ति होते. जो कांहींहि न खातां रहातो, त्याला स्वर्ग मिळतो. बारा वर्षें उपवास करून जो यज्ञदीक्षा चालवील किंवा तीर्थस्नान करीत राहील, त्याला वीरांना मिळणाऱ्या स्वर्गापेक्षांहि उच्च असा लोक मिळतो. सर्व वेदांचें अध्ययन करणाराची तत्काल दुःखापासून सुटका होते व जो मनःशुद्धिकरून धर्माचरण करतो त्याला स्वर्गभोग भोगावयास मिळतो.

( ३ ) मन स्वाधीन न ठेवणाऱ्यांना जी कधींच टाकतां येत नाहीं आणि मनुष्य जीर्ण झाला असतांहि जी स्वतः जीर्ण होत नाहीं, ती प्राणहारक रोगच अशी दुर्धर तृष्णा टाकून देईल त्यालाच सुख प्राप्त होतें. हजारों गाईंतून वासरूं जसें नेमकें आपल्या आईला शोधून काढतें, तसें आपण केलेलें कर्म आपला मार्ग काढीत येतें व फळ भोगावयास लावितें. कोणी न सांगतांहि ज्याप्रमाणें लता-वृक्षांना वेळच्यावेळीं फुलें व फळें येतात, तसेंच पूर्वी केलेलें कर्मसुद्धां वेळ झाली कीं फळास येतें. मनुष्य वृद्ध होऊं लागला कीं त्याचे केश, दांत, डोळे, कान हे जीर्ण होतात; पण त्याची तृष्णा मात्र तशी जीर्ण होत नाहीं. पित्याला संतुष्ट केलें असतां प्रजापति संतुष्ट होतो, मातेला संतोष दिल्यास पृथ्वीला संतोष होतो, उपाध्यायाला संतुष्ट केल्यानें ब्रह्मपूजा केल्याप्रमाणें होतें. जो कोणी या तिघांचा आदर करतो, तो सर्व धर्मांचा आदर करतो असें समजावें व जो त्यांचा अनादर करतो त्याचीं सर्वच कर्में निष्फळ होतात. वैशंपायन म्हणतो, भीष्माचें हें भाषण ऐकून सर्व कौरवांना आश्चर्य वाटलें व त्यांना मनांतून मोठा आनंद होऊन समाधान झालें. मंत्राचा दुरुपयोग केल्यानें जें पाप लागतें, किंवा निष्कारण सोमरस काढल्यानें जें लागतें, अथवा अग्नीचें निरर्थक आवाहन केल्यानें जें पाप घडतें, तें सर्व असत्य भाषण केल्यानें लागतें. राजा, शुभ व अशुभ कर्म फलांविषयीं ऋषीनें सांगितलेलें सर्व मीं तुला सांगितलें. या पुढें काय ऐकावें अशी तुझी इच्छा आहे? १३. १. ७

---

## अध्याय ८ वा.

[ १ पूज्य कोण व नमस्कारास पात्र कोण असा युधिष्ठिराचा प्रश्न. २ ब्राह्मण पूज्य व नमस्कारार्ह होत असें भीष्माचें उत्तर ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामह, पूजा करण्यास आणि नमस्कार करण्यास खरोखर कोण पात्र आहेत ? आपण कोणाला नमस्कार करतां ? मला याविषयीं सविस्तर विवेचन करून सांगा. तसेंच तुम्हाला जें कांहीं स्पृहणीय वाटतें तेंहि सांगा. संकटकालीं किंवा उत्कर्षकालीं तुमचें मन कोणाकडे लागतें, किंवा या लोकीं आणि परलोकीं हितकारक काय आहे तें सर्व मला सांगा.

( २ ) **भीष्म**—युधिष्ठिरा, ब्रह्मविद्या हेंच ज्यांना मोठें धन वाटतें व आत्मप्रतीति हाच ज्यांचा स्वर्ग असून जे त्याची प्राप्ति तप आणि स्वाध्याय यांच्या योगानें करून घेतात, त्या ब्राह्मणांनाच मीं पूज्य मानितों. वंशपरंपरेनें आपल्याकडे आलेला भार जे लहान किंवा थोर असतां नीटपणें वहातात आणि कधीं कष्टी होत नाहींत तेच मला आदरणीय होत. विद्येमुळें नम्र झालेले, इंद्रियनिग्रह करणारे, गोड बोलणारे, वेदज्ञान व सदाचार यांनीं युक्त, असे सच्छील व ब्रह्मवेत्ते ब्राह्मण सभेंत बोलूं लागले म्हणजे त्यांचें मंगल, गोड व मेघाच्या शब्दाप्रमाणें गंभीर भाषण हंसध्वनीप्रमाणें कानाला लागतें. राजालाहि तें ऐका-वेंसें वाटतें व तें इहपरलोकीं सुखावह होतें. अशा ब्राह्मणाचें भाषण ऐकणारे व त्या ज्ञानानें युक्त होणारे जे असतात तेहि मला आदरणीय होत. मनाचें नियं-त्रण करून जे कोणी उत्तम प्रकारें सिद्ध केलेलें पवित्र मधुर अन्न ब्राह्मणांना देऊन त्यांना नित्य तृप्त करतात त्यांना मीं पूज्य मानितों. युधिष्ठिरा, रणांगणावर युद्ध करणें सोपें आहे. पण निर्मत्सर बुद्धीनें दान देणें कठिण आहे. या जगांत शेंकडों शूरवीर आहेत. पण दानशूरांची योग्यता विशेष आहे. मी क्षुद्र ब्राह्मण होऊन पुनः जन्मास आलों तरी स्वतःला धन्य समजेन; मग धर्मशील व तप आणि ज्ञान यांनीं युक्त असा उत्तम कुलांत जन्मलों तर मला किती धन्यता वाटेल ? युधिष्ठिरा, जगांत मला तुझ्याहून दुसरें कांहीं प्रिय नाहीं, पण ब्राह्मण मात्र तसे आहेत, आणि म्हणूनच मीं शांतनु पित्याच्यालोकीं खचित जाईन. ब्राह्मणापेक्षां मला पिता प्रिय नव्हता, पितामह किंवा दुसरे कोणी बांधवहि तसे नव्हते. ब्राह्मणांपासून कांहीं मिळावें अशी माझी अपेक्षाच नाहीं, तरी मीं त्यांची सेवा करीत आलों. कर्मानें, मनानें किंवा वाचेनें जें कांहीं ब्राह्मणासाठीं

मीं केलें, त्यामुळेंच मला या परिस्थितींतहि कष्ट होत नाहींत. ब्राह्मणांचा कैवारी असें मला कोणी म्हटलें तर तेणें करून मला संतोष होतो. हीच पदवी सर्वांत पवित्र आहे. निष्पाप व पवित्र असे लोक ब्राह्मणांची सेवा करणाऱ्यांना मिळतात हें मीं पहातों व मलाहि लवकरच त्यांची शाश्वत प्राप्ति होईल. ज्याप्रमाणें स्त्रीला पतीशिवाय दुसरा धर्म नाहीं, तोच तिचा देव व तोच तिचें सर्वस्व, त्याप्रमाणें क्षत्रियाला ब्राह्मण होय. क्षत्रिय शंभर वर्षांचा वृद्ध व ब्राह्मण दहा वर्षांचा अल्पवयी असला, तरी तो ब्राह्मण त्या क्षत्रियाला पित्याप्रमाणें वडील आहे. स्त्री ज्याप्रमाणें पतीच्या अभावीं दिराला पति करिते, त्याप्रमाणें ब्राह्मणाच्या अभावींच पृथ्वीसुद्धां क्षत्रियाला पति करते. म्हणून क्षत्रियांनीं मुलाप्रमाणें ब्राह्मणाचें रक्षण करावें, गुरुप्रमाणें त्यांची सेवा करावी आणि अग्नीप्रमाणें त्यांची पूजा करावी. सरळ वागणारे, सत्यवचनी, आणि सर्वप्राणिमात्राच्या हिताविषयीं दक्ष, पण रागावले असतां मात्र सर्पासारखे असे जे ब्राह्मण त्यांची नित्य आपण सेवा करावी. ब्राह्मणांच्या तेजाला व तपाला भ्यावें आणि आपल्या तेजाचें व तपाचें प्रदर्शन त्यांच्यापुढें करूं नये. ब्राह्मण काय किंवा क्षत्रिय काय एक आपल्या तपानें तर दुसरा आपल्या तेजानें क्रोधाविष्ट होतोच. पण तपश्चरणामुळें ब्राह्मणच रागावले असतां इतरांना मारतात. ब्राह्मणाविरुद्ध दाखविलेलें तेज किंवा तप खंडित होतेंच, पण तो ब्राह्मण जर राग न येणारा सत्त्वशील असेल तर तें सर्वथैव नष्ट होतें. गुराखी जसा हातांत काठी घेऊन गाईचें रक्षण करतो, त्याप्रमाणें क्षत्रियांनीं ब्राह्मणाचें काळजीपूर्वक रक्षण करावें. धर्मावर ज्यांचें लक्ष आहे अशा ब्राह्मणांचें रक्षण, पिता पुत्राचें करतो, तसें तूं करीत जा व त्यांच्या घरीं जाऊन, त्यांच्याकडे जीवनाचें साधन आहे कीं नाहीं याची चवकशी करून नसल्यास तें पुरवीत जा. १३. १. ८.

---

## अध्याय ९ वा

[ १ ब्राह्मणांना कांहीं देतों म्हणून पुढें तें न देणाऱ्यांचें काय होतें असा युधिष्ठिराचा प्रश्न. २ अशा पुरुषाच्या सर्व आशा भंग पावतात, असें भीष्माचें उत्तर. ३ याविषयीं कोल्हा व वानर यामधील संवाद ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामह, जे लोक ब्राह्मणांना कांहींतरी देण्याचें वचन देऊन पुढें मोहामुळें तें त्यांना देत नाहींत ते पुढील जन्मीं कोण होतात

बरें ? आपण धर्मज्ञांमध्यें श्रेष्ठ आहांत, तरी वचन देऊन तें मोडणाऱ्यांचें काय होतें तें मला नीटपणें सांगा.

( २ ) भीष्म—युधिष्ठिरा, जो कोणी थोडें बहुत द्यावयाचें वचन देऊन त्याप्रमाणें देणार मात्र नाहीं, त्याच्या सर्व इच्छा, नपुंसकाच्या संततीच्या इच्छे-प्रमाणें निष्फळ होतात. जन्मास आल्यापासून मरेपर्यंत मनुष्य जें कांहीं सत्कृत्य करतो, मग तें यज्ञ असो कीं दान असो कीं तप असो, तें सर्व वचनभ्रष्टतेमुळें नष्ट होतें, असें धर्मशास्त्रवेत्ते पुरुष सांगतात. असलें वचनभंगाचें पाप करणाऱ्यांना त्यापासून मुक्त व्हावयाचें तर एक सहस्र श्यामकर्ण अश्वांचें मनुष्यानें दान केलें पाहिजे असें ते म्हणतात.

( ३ ) याविषयीं एक प्राचीन कथाहि सांगण्यांत येते. ती म्हणजे कोल्हा आणि वानर यांचा संवाद होय. हे दोन्ही पूर्व जन्मीं मनुष्य असून एकमेकांचे मित्र होते व कांहीं पापामुळें त्यांना कोल्ह्याची व वानराची योनि प्राप्त झाली होती. पण त्यांना पूर्वजन्मीचें स्मरण होतें. एकदां कोल्हा स्मशानामध्यें मृत शरीरें खात असतां वानर त्याला म्हणाला, ' हे शृगाला, तूं कोणतें भयंकर पाप कर्म केलें होतें कीं जेणेंकरून तुला या जन्मीं स्मशानामध्यें कुजलेलीं व घाणेरडीं मृत शरीरें खावीं लागत आहेत ? ' वानराचा प्रश्न ऐकून कोल्ह्यानें उत्तर केल ' मीं ब्राह्मणाला दान देतों असें सांगून तें दिलें नाहीं', त्यामुळें, हे वानरा, ही पापयोनि मला प्राप्त झाली आहे व असलें भक्ष्य भुकेनें व्याकुळ होऊन मला खावें लागत आहे.

भीष्म म्हणतो, कोल्ह्यानें मग वानराला तसाच प्रश्न केला कीं, तूंहि कोणतें पापकर्म केल्यामुळें वानराच्या जन्मास आला आहेस ? तेव्हां वानर म्हणाला, ' मीं नित्य ब्राह्मणांचीं फळें वानराप्रमाणें खाऊन टाकीत असें, त्यामुळें मीं वानर झालों आहें. तरी ज्ञात्या पुरुषानें ब्राह्मणाची कोणतीहि वस्तु हरण करूं नये. त्यांना एकदां देतों म्हटल्यावर वादविवाद न करितां वचन दिल्याप्रमाणें काय तें देऊन टाकावें. ' युधिष्ठिरा, धर्मज्ञ व्यास महर्षि पुराणकथा सांगत असतां ही गोष्ट मीं त्यांच्या तोंडून ऐकली. नंतर ती पुनः कृष्णानें ब्राह्मणाला सांगितली तेव्हांहि मीं त्याच्याकडून ऐकिली. ब्राह्मणाचें धन हरण न करतां त्यांचा अपराध असला तरी त्यांना नित्य क्षमाच करावी. ब्राह्मण अल्पवयी, दरिद्री किंवा कृपण असे कसेहि असले तरी त्यांची अवहेलना करूं नये. ब्राह्मण मला नित्य हेंच सांगत असतात कीं, वचन दिल्यावर तें अवश्य पुरें करावें, त्या

वस्तूवर आपली आशा व्यर्थ ठेवूं नये. अमुक देतों असें ब्राह्मणाला सांगितलें म्हणजे त्याला त्याची आशा उत्पन्न होते व ती चांगलें जळवण घातलेल्या विस्तवाप्रमाणें क्रमशः प्रदीप्त होत जाते. अशा आशेच्या भंगामुळें राग येऊन तो ब्राह्मण ज्याच्याकडे पाहील, त्याला, अग्नि सुकलेलें गवत जाळतो त्याप्रमाणें तो जाळून टाकील. पण तोच दानानें संतुष्ट होऊन जर दात्याला आशीर्वाद देईल, तर तो आशीर्वाद, रोग्याला जसें औषध तसा त्या दात्याला होईल. ब्राह्मणाच्या शांतिवचनाच्या योगानें दात्याचे पुत्र, नातू, पशु, बांधव, सेवक, इष्टमित्र, प्रजा इत्यादि सर्वांचें कल्याण होतें. सूर्याच्या तेजाप्रमाणें ब्राह्मणाचें तेजहि या लोकीं असें प्रखर आहे. म्हणून, हे युधिष्ठिरा, एकदां देतों म्हटल्यावर ब्राह्मणाला तें देऊन टाकावें, म्हणजे पुढील जन्मीं उत्तम योनि प्राप्त होते. ब्राह्मणाला दान दिल्यानें उत्तम प्रकारचें स्वर्गसुख निश्चितपणें मिळतें. दान ही अशीच अद्भुत करणी आहे. या लोकीं दान केलें असतां त्यामुळें परलोकीं देव आणि पितर यांचें पोषण होतें. यासाठीं ज्ञात्यानें ब्राह्मणांना अवश्य दानें द्यावीं. युधिष्ठिरा, ब्राह्मण म्हणजे एक बडें तीर्थ होय असें म्हटलें असून कोणत्याहि काळीं आपल्या घराहून ब्राह्मणाला सत्कार न करितां लावून देऊं नये. १३.१.९

---

## अध्याय १० वा.

[ १ हीन जातीला उपदेश केल्यानें काय दोष लागतो असा युधिष्ठिराचा प्रश्न. २ त्याचें उत्तर म्हणून भीष्म त्याला राजा व पुरोहित यांची कथा सांगतो. ३ हीन वर्णाच्या मनुष्याला ब्राह्मणानें उपदेश करूं नये. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामह, एखाद्या ब्राह्मणानें हीन जातीच्या मनुष्याला मित्रस्नेहाला अनुसरून जर उपदेश केला, तर त्या ब्राह्मणाला दोष लागेल कीं नाहीं हें वास्तविकपणें समजून घेण्याची माझी इच्छा आहे. धर्माचें स्वरूप अत्यंत सूक्ष्म असून त्याचा विचार करतांना माणसें अगदीं मूढ होऊन जातात.

( २ ) **भीष्म**—युधिष्ठिरा, याचा विचार मीं क्रमशः सांगतों ऐक. पूर्वी ऋषि या विषयीं बोलत असतां मीं तो ऐकिला आहे. जातीनें हीन असलेल्या कोणत्याहि मनुष्याला उपदेश करूं नये. तसा उपदेश करणाऱ्या ब्राह्मणाला मोठा दोष लागतो असें सांगितलें आहे. दुःस्थितींत सांपडलेल्याहि हीनजाति माणसाला केलेल्या उपदेशाचा परिणाम काय होतो याविषयीं एक उदाहरण आहे.

हिमालयाच्या बाजूला एक सुंदर स्थलीं तें घडून आलें. तेथें एक आश्रमस्थान होतें. त्यांत अनेक प्रकारच्या वृक्षराजि, वेलींच्या झाळी, रमणीय फुलझाडें इत्यादि असून विविध पशुपक्षीहि त्यांच्या आधारानें रहात असत. सिद्ध व चारण तसेच तपस्वी लोक त्याचा आश्रय करीत. तसेच अग्नि व सूर्य यांच्यासारखे तेजस्वी ब्राह्मणहि त्यांत वास करीत. विविध नियम व व्रतें पाळणारे तपस्वी, मितहार करणारे व दीक्षा घेतलेले यजमान, वेदाध्ययन करणारे विद्यार्थी, तसेच असंख्य बालखिल्य व यति यांनीं तो आश्रम अगदीं गजबजून गेलेला असे. एकदां त्या आश्रमांत कोणी मोठा उत्साही व दयाशील शूद्र आला व त्याचा तेथील तपस्व्यांनीं चांगला सत्कार केला. त्या देवासारख्या तेजस्वी ऋषिगणांना नाना प्रकारच्या दीक्षा घेतलेले पाहून त्या शूद्राला मोठा हर्ष झाला व आपण येथें तप करावें अशी त्याला इच्छा होऊन तो कुलपतीच्या पायां पडून म्हणाला, 'हे द्विजश्रेष्ठा, आपल्या कृपेनें धर्म जाणावा अशी माझी इच्छा आहे, तरी आपण मला दीक्षा द्यावी अशी विनंति आहे. महाराज, जातीनें मी शूद्र असल्यामुळें हीन वर्णाचा आहें. तरी आपली सेवा करावी अशी माझी मनीषा असून मीं आपल्याला शरण आलों आहें, मजवर कृपा करावी.

शूद्राचें भाषण ऐकून कुलपति म्हणाला, 'अरे, शूद्राला द्विजचिन्ह धारण करून येथें रहाणें शक्य नाहीं. तथापि तुला येथें रहाण्याची इच्छाच असेल तर सेवादक्ष होऊन रहा. त्या सेवेनेंच तुला निःसंशय उत्तम लोकांची प्राप्ति होईल.' हें उत्तर ऐकून तो शूद्र बुचकळ्यांत पडला. तो मनांत म्हणाला, 'आतां मी काय करावें? माझ्या मनांत धर्म जाणण्याची श्रद्धा तर उत्पन्न झाली आहे. या आश्रमाचा प्रकार तर कळून चुकलाच; तेव्हां प्रिय गोष्ट साध्य करून घेण्याचा कांहीं मार्ग काढिला पाहिजे.' असा विचार करीत तो शूद्र आश्रमापासून थोड्या अंतरावर गेला व तेथें लहानशी पर्णकुटिका बांधून तींत राहिला. तेथें त्यानें पूजेसाठीं वेदी बांधिली, झोंपण्यासाठीं भूमि सिद्ध केली, देवांसाठीं घरें केलीं आणि त्यांत तो व्रतस्थ होऊन राहिला. नियम पाळून यथाकालीं स्नानें करावीं, देवघरांत देवतापूजन करावें व अग्नींत आहुती द्यावी असा त्याचा क्रम चालू झाला. मनाचें नियंत्रण करून व इंद्रियदमन करून तो केवळ फलाहार करी आणि जवळ असलेल्या फळपत्रादिकांनीं आलेल्या अतिथींचा नित्य सत्कार करी. अशा रीतीनें त्याचा बराच काळ तेथें गेला. मग एक दिवस त्याच्याकडे कोणी एक मुनि आला. त्याला त्यानें विधिपुरःसर स्वागत करून संतुष्ट केलें व

त्याच्याशीं गोड शब्दांनीं बोलून त्याची खुशाली विचारिली. तो ऋषि व्रतें केलेला, धर्मशील व फार तेजस्वी होता. तो त्या शूद्राला भेटण्यासाठीं पुढेंहि पुष्कळ वेळां त्या आश्रमांत जाऊं लागला. मग एक दिवस तो शूद्र त्या तपस्व्याला म्हणाला, 'मीं पितृश्राद्ध करणार आहें, तर मजवर कृपा करून तेवढें मजकडून करवावें.' तपस्व्यानें "ठीक आहे" असें म्हणतांच शूद्रानें स्नान करून त्यालाहि पाय धुण्यास पाणी आणिलें, आणि रानांतील दर्भ, पत्रें, व पवित्र आसन हीं त्याला दिलीं; तेव्हां दर्भांचीं टोकें दक्षिणेस केलेलीं पाहून त्या ऋषीनें तीं त्याला पूर्वेस करावयास सांगितलीं व त्याला स्वतःला उत्तरेस तोंड करून बसावयास सांगितलें. ऋषीनें सांगितल्याप्रमाणें शूद्रानें सर्व केलें. पितृपूजा, देवपूजा सर्व यथास्थित केल्यावर ऋषीनें आपल्याला धर्माचा मार्ग दाखविला असें म्हणून त्यानें त्या ऋषीची पाठवणी केली व तो ऋषि निघून गेला. याप्रमाणें बराच काळपर्यंत तपश्चर्या करून तो शूद्र मरण पावला व त्या पुण्यकर्माच्या योगानें महातेजस्वी होऊन मोठ्या राजकुळांत जन्मास आला. तो ऋषीहि कालवश झाला आणि एका पुरोहिताच्या कुळांत त्याला जन्म मिळाला. याप्रमाणें ते दोघेहि पुनः जन्म घेऊन वाढूं लागले आणि क्रमानें विद्या संपादन करून त्यांत निष्णात झाले. अथर्ववेद, तसेंच ऋग्वेदादि पहिले तीन वेद, कल्पसूत्रें, ज्योतिष, सांख्यशास्त्र इत्यादिकांत पुरोहित झालेला तो ऋषि चांगला प्रवीण झाला. इकडे राजपुत्र झालेला तो शूद्रहि पिता कालवश झाल्यावर शुचिर्भूत झाला, तेव्हां त्याला मंत्रिमंडळानें अभिषेक करून राज्यावर बसविलें. सिंहासनारूढ झाल्यावर त्यानें त्या ऋषीला आपल्या पुरोहिताचीं वस्त्रें दिलीं आणि त्याच्या उपदेशानुसार सुखानें तो राज्य करीत राहिला. धर्मानुसार राज्य करून तो प्रजापालन करूं लागला. पुढें जेव्हां धर्मकार्यें करण्याचा प्रसंग येई, तेव्हां तो राजा पुण्याहवाचनाच्या प्रसंगीं त्या पुरोहिताकडे पाहून आश्चर्य करीत हंसत असे. याप्रमाणें त्याच्याकडे पाहून राजा पुष्कळ वेळां हंसला असतां, त्याची ती वृत्ति पाहून पुरोहिताला राग आला आणि एक दिसत तो राजापाशीं दुसरें कोणी नाहीं असें पाहून त्याजवळ आला. त्याच्याशीं अनेक गोड गोष्टी बोलून त्याचें मन त्यानें आकर्षित केलें आणि मग तो त्याला म्हणाला, 'महाराज, आपल्यापाशीं मला एक गोष्ट मागावयाची आहे, तरी ती कृपा करून द्यावी.' राजा म्हणाला, 'हे विप्रश्रेष्ठा, एकच गोष्ट कां, मी तुला शंभर सुद्धां द्यावयास सिद्ध आहें. तुझ्याविषयींच्या स्नेहामुळें व पूज्यबुद्धीमुळें तुला न देण्यासारखें असें कांहींच मज-

जवळ नाहीं.' त्यावर पुरोहित पुनः म्हणाला, 'महाराज, आपण संतुष्ट झालां असल्यास, मला एकच गोष्ट द्यावी, व ती हीच कीं, मी जें विचारीन त्याचें उत्तर प्रतिज्ञेवर सत्य द्यावें, असत्य देऊं नये.'

भीष्म म्हणतो, युधिष्ठिरा, पुरोहिताचें मागणें ऐकून राजा बोलला, 'ठीक आहे, पण मला जर तें ठाऊक असेल तरच मी सांगेन, नाहींतर कसें सांगणार?' तेव्हां पुरोहित म्हणाला, 'राजा, धर्मकृत्यें करीत असतां पुण्याहवाचनाच्या वेळीं व शांतिहोमाच्या प्रसंगीं वारंवार मजकडे पाहून तूं हंसतोस त्याचें कारण काय? तूं हंसूं लागलास कीं माझें मन सलज्ज होतें. म्हणून माझी तुला शपथ आहे कीं जें खरें असेल तेंच तूं मला सांग. तुझ्या हंसण्याला कांहींतरी तसेंच चांगलें कारण असलें पाहिजे. तें कळण्याची मला फार उत्सुकता आहे, तरी मला तें कथन कर.' पुरोहिताच्या या बोलण्यावर राजा म्हणाला, 'हे ब्राह्मणा, तूं आतां विचारीत आहेस, त्याअर्थीं तें कारण सांगण्यासारखें नसलें, तरी मीं तें सांगतों. लक्ष देऊन ऐक. पूर्वजन्मींचा तो इतिहास आहे. मला त्याचें चांगलें स्मरण आहे. तरी नीट ऐकून घे. मीं पूर्वजन्मीं शूद्र होतों व संयमी होऊन तप करीत होतों. तूं उग्र तप केलेला ऋषि असून माझ्यावर कृपा करावी म्हणून मला पितृश्राद्धप्रसंगीं चांगला उपदेश केला. त्या कर्मदोषामुळें तूं पुरोहित झालास व मी मात्र पुण्याईमुळें राजा झालों. मला केलेल्या त्या उपदेशामुळें तुझी तपश्चर्या व्यर्थ गेली. हे विप्रश्रेष्ठा, या कारणास्तव मला हंसूं येतें. तुझी अवहेलना करण्यासाठीं मीं हंसत नाहीं. तूं माझा गुरु आहेस. मीं शूद्र असून जातिस्मर झालों आणि तूं ऋषि असून पुरोहित झालास, या उलटापालटीचें मला वाईट वाटतें व त्या खेदामुळें हंसूं येतें. तुझें उग्र तप मला उपदेश केल्यामुळें नष्ट झालें, यासाठीं हा पुरोहितपणा सोडून तूं जन्म सार्थ करण्यास झट. यापुढें तरी दुसऱ्या नीच जन्माला जाऊं नये असा प्रयत्न कर. त्यासाठीं जें धन लागेल तें घे आणि धर्माचरण करून पवित्र हो.'

भीष्म म्हणतो, युधिष्ठिरा, मग राजाचा निरोप घेऊन तो पुरोहित तेथून गेला आणि ब्राह्मणांना त्यानें द्रव्य, भूमि, गांव अशीं अनेक दानें दिलीं. तसें श्रेष्ठ ब्राह्मणांनीं जीं सांगितलीं तीं व्रतें करून तो तीर्थांच्या ठिकाणीं गेला व तेथें पवित्र अन्तःकरणानें ब्राह्मणांना गोप्रदानें देऊन तो कृतकृत्य झाला. नंतर त्यानें आपल्या आश्रमास जाऊन तेथें पुष्कळ तपश्चर्या केली आणि मोठी सिद्धि प्राप्त करून घेऊन तो त्या सर्व आश्रमवासीयांच्या सन्मानास पात्र झाला.

( ३ ) भीष्म म्हणतो, हे युधिष्ठिरा, ऋषि असतांहि त्याच्यावर अशी मोठी आपत्ति आली. म्हणून ब्राह्मणानें हीन वर्णाच्या मनुष्याला कांहीं उपदेश करूं नये. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे तीन द्विजाति वर्ण होत. त्यांना उपदेश केल्यानें ब्राह्मणाला दोष लागत नाहीं. म्हणून सज्जनांनीं कोणापुढें कांहींहि सांगूं नये. धर्माची गति गूढ असून सामान्य माणसांना ती कळणें कठीण. यास्तव, हे युधिष्ठिरा, बोलण्यांत दोष घडेल या भीतीनें मुनिजन मौनदीक्षा धारण करतात. धर्मशील, गुणी, सत्यवचनी व सरळ वर्तनाचे लोकहि तोंडांतून भलतेच शब्द गेल्यानें पापाचे धनी होतात. यासाठीं कोणालाहि कसलाहि उपदेश करूं नये. तसा उपदेश केल्यास ब्राह्मणाला पाप लागतें. जें बोलावयाचें तें धर्मजिज्ञासु सुज्ञानें अगदीं विचार करून बोलावें. व्यापारी धोरणानें केलेला उपदेश तो करणाराचा नाश करितो. कोणी कांहीं विचारल्यास मनाशीं त्याचा नीट निश्चय करून सांगावें, आणि असा उपदेश केला तर करावा कीं जेणें करून धर्मप्राप्ति होईल. याप्रमाणें उपदेशाच्या बाबतींत सांगण्यासारखें सारें मी तुला सांगितलें. हीन जातीला उपदेश केल्यानें एकंदरींत महा क्लेश होतात, म्हणून तो करूं नये. १३.१.१०.

---

## अध्याय ११ वा.

[ १ कोणत्या प्रकारच्या स्त्रीपुरुषांपाशीं लक्ष्मी वास करते, असा युधिष्ठिराचा प्रश्न. २. भीष्म त्याला कृष्णरुक्मिणीचा या विषयींचा संवाद सांगतो. ]

( १ ) **युधिष्ठिर**—आजोबा, कोणत्या प्रकारच्या पुरुषाच्या अथवा स्त्रीच्या ठायीं कमलवासिनी लक्ष्मी नित्य वास करते तें मला सांगा.

( २ ) **भीष्म**—युधिष्ठिरा, यासंबंधानें पूर्वीं रुक्मिणीनें कृष्णाला विचारल्यावरून कृष्णानें जें सांगितलें तेंच मीं तुला सांगतों. एकदां कमलासारखा वर्ण असणारी तेजस्वी लक्ष्मी कृष्णाच्या मांडीवर बसलेली पाहून प्रद्युम्नाची माता जी रुक्मिणी तिला आश्चर्य वाटलें आणि ती तिला म्हणाली, 'हे त्रैलोक्यनाथाच्या कान्ते, तूं कोणत्या पुरुषांची घोडे हत्ती इत्यादिकांच्या रूपानें सेवा करतेस, व कोणाच्या ठिकाणीं औदार्यादि गुणरूपानें तूं वास करतेस, तें मला कथन कर. महर्षीसारखी तुझी योग्यता आहे.' कृष्णाच्या समोरच रुक्मिणीनें केलेला हा प्रश्न ऐकून चन्द्रवदना लक्ष्मी प्रसन्न होऊन गोड शब्दांनीं तिला उत्तर देऊं

लागली. ती म्हणाली, 'हे सौभाग्यशालि रुक्मिणि, जो मनुष्य सत्कर्मांत दक्षतेनें गढलेला असतो, रागावत नाहीं, ईश्वरावर निष्ठा ठेवतो, केलेले उपकार स्मरतो, इंद्रियदमन करतो व सत्वशील असतो, त्याच्या ठिकाणीं मीं नित्य वास करत्यें. पण जो कर्मशील नाहीं, ईश्वरावर श्रद्धा ठेवीत नाहीं, वर्णसंकर करूं पहातो, कृतघ्न असतो, निष्ठुर भाषण करतो, सरळपणें वागत नाहीं, चोरी करतो व गुरूंविषयीं मत्सर दाखवितो, त्यापाशीं मीं रहात नाहीं. तसेंच ज्यांचें तेज, बळ, धैर्य हीं अल्प आहेत, जे एवढ्याशा कारणावरून रागावतात व त्यामुळें क्लेश पावतात व ज्यांच्या मनांत एक असून बाहेर दुसरेंच दाखवितात त्यांच्याजवळ मीं उभी देखील रहात नाहीं. जे मनाशीं कसलीच महत्वाकांक्षा बाळगीत नाहींत, ज्यांनीं स्वतःचा नाश करून घेतला आहे व जे नित्य अल्पसंतुष्ट असतात, अशा पुरुषाशींहि मीं रहात नाहीं. पण धर्मवेत्ते, धर्माचरण करणारे, वृद्धांच्या सेवेंत दक्ष, इंद्रियें स्वाधीन ठेवणारे, क्षमाशील, असे जे असतात त्यांच्याठायीं व ज्या स्त्रिया क्षमाशील, इंद्रियनिग्रही, सत्यभाषणी, सरळवर्तनाच्या, देवब्राह्मणाची पूजा करणाऱ्या असतात त्यांच्या ठिकाणीं माझा वास असतो. पण घरांतील भांडीं अस्ताव्यस्त टाकणाऱ्या, नको असेल तें करणाऱ्या, पतीला दुरुत्तरें बोलणाऱ्या, नित्य लोकांच्या घरीं जाऊन बसणाऱ्या व लाज सोडून दिलेल्या स्त्रीचा मात्र मीं अगदीं त्याग करत्यें. तसेंच पापी, अपवित्र, नित्य ओंठ चाटणाऱ्या, घाबरट व भांडकुदळ स्त्रीशींहि मीं संबंध ठेवीत नाहीं. फार झोंपाळू स्त्रीचा देखील मीं त्याग करत्यें. नित्य सत्य बोलणाऱ्या, पवित्राचरणी, सौभाग्यप्रद वस्तूंनीं युक्त, सदाचरण हेंच भूषण मानणाऱ्या, पातिव्रत्यनिष्ट, अशा सद्गुणी व गोड बोलणाऱ्या स्त्रियांच्या ठिकाणीं माझा नित्य वास असतो. सुंदर वाहनें, कन्या, अलंकार, यज्ञ, जलवर्षाव करणारे मेघ, फुललेल्या कमलिनी, शरदृतूंतील नक्षत्रांच्या रांगा, हत्ती, गाई यांचे कळप, सुंदर आसनें, फुललेल्या कमळांनीं युक्त अशीं सरोवरें, हंसाच्या स्वरांनीं निनादून गेलेल्या क्रौंच पक्ष्याच्या घोषानें रमणीय झालेल्या तीरांवरील वृक्षांच्या रांगांनीं सुशोभित दिसणाऱ्या व तपस्वी, सिद्ध व ब्राह्मण यांची वसतिस्थानें तीरांवर असलेल्या विपुल पाण्याच्या नद्या, हीं माझीं रहाण्याचीं ठिकाणें होत. मत्त हत्ती किंवा बैल, राजा, सिंहासन, आणि साधु पुरुष यांमध्येंहि मीं रहात्यें. तसेंच ज्या घरांत लोक अग्नीला आहुति देतात आणि गाई, ब्राह्मण व देवता यांची पूजा करतात व योग्य वेळीं अतिथीचा पुष्पानीं सत्कार होतो, अशा

घरांत माझा निवास नित्य असतो. तसेंच सदा वेदाध्ययन करणारे ब्राह्मण, धर्मशील क्षत्रिय, कृषिकर्मांत दंग असणारे वैश्य व द्विजसेवारत शूद्र हेहि माझीं निवासस्थानें होत. पण विशेषतः मनोभावानें व एकनिष्ठेनें अशी मीं नारायणापाशींच रहातें; कारण त्याच्या ठिकाणींच धर्माचें उत्तम स्वरूप स्थिर झालेलें असल्यामुळें माझी आवड त्यावरच विशेष आहे. मीं शरीर धारण करून दुसऱ्या कोठें रहात नाहीं. मीं उत्कर्षरूपानें ज्याच्यापाशीं असतें, तो पुरुष धर्म, कीर्ति, अर्थ व काम यांच्यामुळें वृद्धि पावतो. १३.१.११.

---

## अध्याय १२ वा.

[ १ स्त्रिया व पुरुष यांच्यासंबंधांत अधिक सुख कोणाला असा युधिष्ठिराचा प्रश्न २. याविषयीं भंगास्वन राजा व इंद्र यांची कथा भीष्म सांगतो. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे भीष्म पितामह, स्त्रीपुरुषांच्या परस्परसंबंधांत अधिक स्पर्शसुख कोणाला होतें, याविषयीं मला संशय उत्पन्न झाला आहे; तरी त्याविषयीं वस्तुस्थिति काय आहे ती मला सांगा.

( २ ) **भीष्म**—युधिष्ठिरा, याविषयीं देखील एक प्राचीन इतिहास सांगण्यांत येतो. भंगास्वन आणि इंद्र यांच्यामध्यें एकदां वैर आलें होतें, त्यासंबंधाची ती कथा आहे. पूर्वीं भंगास्वन नामक अत्यंत धार्मिक राजा होऊन गेला. त्याला पुत्र नसल्यामुळें त्यानें पुत्रप्राप्तीसाठीं यज्ञ केला. हा यज्ञ अग्निष्टुत किंवा अग्निष्टोम नांवाचा होता. अशा यज्ञापासून पुत्रप्राप्ति होते म्हणून त्यासाठीं लोक हा करीत असतात. पण त्यांत इन्द्राला हविर्भाग नसल्यामुळें त्याला तो आवडत नाहीं. भंगास्वन राजानें तो यज्ञ केला हें पाहून महाभाग्यशाली इन्द्राला राग येऊन राजाचा उणेपणा शोधून काढण्यासाठीं तो टपून बसला; पण बराच काळ तसा तो कांहीं त्याला सांपडला नाहीं. मग एकदां तो राजा मृगयेसाठीं वनांत गेला असतां, ही संधि त्याचा सूड घेण्यास बरी आहे असें वाटून इन्द्रानें त्याला मोह पाडला. त्या मोहक्रियेमुळें राजा घोड्यावर बसून एकटाच भ्रमण करूं लागला असतां वाट चुकून क्षुधा व तृषा यांनीं पीडित झाला. श्रम व तहान यामुळें व्याकुळ होऊन तो भटकत असतां त्याला उत्तम पाण्यानें भरलेलें एक सुंदर तळें दिसलें. लगेच त्यानें आंत उतरून घोड्याला पाणी पाजिलें आणि वर येऊन त्याला एका झाडाशीं बांधून ठेविलें. मग तो स्वतः पाण्यांत गेला आणि स्नान करून बाहेर येतो तों आपण स्त्री झालों आहों, असें त्याला आढळून

आलें व तें पाहून तो लज्जित झाला. त्याच्या मनाला मोठी चिंता वाटूं लागली आणि त्याचीं इंद्रियें व्याकुळ होऊन तो निश्चेष्ट झाला. आतां घोड्यावर बसून आपण घरीं कसे जाणार असें त्याला झालें. अग्निष्टुत यज्ञ केल्यामुळें आपल्याला जे बलवान् असे शंभर औरस पुत्र झाले, त्यांना तोंड दाखवूं कसें व सांगूं तरी काय आणि स्त्रिया, बांधव आणि प्रजा यांमध्यें पुनः जावें तरी कसें असें तो म्हणूं लागला. ‘ मृदुपणा, बारीक अंगलट, दुर्बलता, हे स्त्रियांचे गुण म्हणून धर्मतत्त्व जाणणाऱ्या ऋषींनीं सांगितले आहेत. तसेच कठोरपणा, शौर्य हे पुरुषांचे गुण म्हणून म्हणतात. त्यांतील पौरुष हा गुण माझ्यांतून नष्ट होऊन मला स्त्रीपणा कोणत्या कारणास्तव आला बरें ? स्त्री झाल्यामुळें आतां मीं घोड्यावर तरी बसूं कसा ? ’ असें मनांत म्हणत तो कसा बसा घोड्यावर चढला आणि हळुहळू नगरांत आला. त्याला पहातांच त्याच्या स्त्रिया, सेवक आणि नागरिक हे आश्चर्यचकित झाले आणि ‘ हा काय प्रकार ’ असें उद्गारले. तेव्हां राजा त्यांना म्हणाला, ‘ सैन्यासमवेत मी मृगयेला गेलों असतां दैवयोगानें भटकत एका घोर वनांत शिरलों. तेथें तहानेनें व्याकुळ झाल्यामुळें अगदीं गलित होऊन मार्ग क्रमीत असतां पक्ष्यांनीं गजबजून गेलेलें असें एक फार सुंदर तळें मला दिसलें; त्यांत स्नान करतांच दैवगतीमुळें मी स्त्रीरूप झालों ! ’

नंतर त्यानें आपल्या स्त्रिया, मंत्री, पुत्र इत्यादिकांना नांवानें हांका मारून सांगितलें ‘ मुलांनों, तुम्हीं सुखानें राज्य करा. मी वनांत जातों. ’ आपल्या शंभर मुलांना असें सांगून तो वनांत गेला आणि एका आश्रमाशीं आला असतां एका तापसाची व त्याची गांठ पडली. तेव्हां त्याच्याशीं तिनें विवाह केला आणि त्याच्यापासून त्या आश्रमांत तिला शंभर पुत्रहि झाले. नंतर एक दिवस ती त्या शंभर पुत्रांना घेऊन आपल्या पहिल्या मुलांकडे आली आणि त्यांना म्हणाली, ‘बाळांनो, मी पुरुष असतांना तुमचा जन्म झाला व आतां स्त्रीपणांत हे शंभर मुलगे मला झाले आहेत. तरी आतां तुम्हीं सर्वांनीं गुण्यागोविंदानें एकत्र राहून राज्याचा उपभोग घ्या. ’ त्या सांगण्याप्रमाणें ते सर्व बंधु राज्याचा उपभोग प्रेमळपणें घेऊं लागले असतां तें पाहून इन्द्र रागानें अगदीं वेडा झाला आणि मनांत म्हणाला, “ मीं या राजाला स्त्री केलें हा त्याला अपकार झाला नसून उपकारच झाला म्हणावयाचा. ” असें म्हणून तो राजाच्या नगरांत आला आणि त्या दोन्ही प्रकारच्या पुत्रांमध्यें तंटा उत्पन्न करूं लागला. तो त्यांना म्हणाला, ‘ अहो, अगदीं एका बापाचे पुत्र असले, तरी त्यांच्यामध्येंहि

गोडपणा नसतो; ते राज्याप्रीत्यर्थ भांडतात. देव व असुर हे कश्यपाचे पुत्र असेच भांडले. पण तुम्हीं तर भंगास्वनाचे पुत्र असून हे दुसरे कोणा तापसाचे पुत्र आहेत. हे तापसपुत्र तुमचें क्रमप्राप्त राज्य भोगीत आहेत बरें!'

याप्रमाणें इन्द्रानें त्यांच्यांत बुद्धिभेद केल्यामुळें ते भंगास्वानाच्या पुत्रांचे दोन गट एकमेकांविरुद्ध युद्ध करून नाश पावले. तें पाहून स्त्रीरूपी भंगास्वनाला अति दुःख झालें आणि ती रडूं लागली. तेव्हां ब्राह्मणाचें रूप घेऊन इन्द्र तिजकडे आला आणि 'तूं कोणत्या दुःखामुळें रडत आहेस?' असें तिला विचारूं लागला. त्या ब्राह्मणाला पाहून तापसी दीनपणें म्हणाली 'ब्राह्मणा, माझे दोनशें पुत्र काळानें हिरावून नेले. मी पूर्वीं राजा होत्यें, तेव्हां मला शंभर सुंदर पुत्र झाले होते. एकदां मी मृगयेला गेलों असतां गहन वनांत भटकूं लागलों व एका तळ्यांत स्नान केल्यावर मला हें स्त्रीरूप प्राप्त झालें. तेव्हां त्या मुलांची राज्यावर स्थापना करून मीं वनांत गेलों आणि तेथें तापसाची स्त्री म्हणून मला आणखी शंभर पुत्र झाले. त्या मुलांना मी नगरांत नेलें व तेथें ते राज्याचा उपभोग घेत असतां त्यांच्यांत कालानें वैर उत्पन्न होऊन ते युद्ध करून नष्ट झाले. दैवानें याप्रमाणें गांजल्यामुळें मीं शोक करीत आहें.'

तिचा तो शोक पाहून इन्द्र कठोर शब्दांनीं तिला म्हणाला, 'पूर्वीं तूंहि मला असेंच दुःसह दुःख दिलें होतें. इन्द्रद्विष्ट यज्ञ करतांना मला तूं बोलाविलें नाहींस, त्या रागानें मी इन्द्र तुझ्याशीं वैर करूं लागलों.' तो इन्द्र आहे असें पहातांच भंगास्वन त्याच्या पायां पडला आणि म्हणाला, 'हे देवश्रेष्ठा, क्षमा कर. पुत्रेच्छेनें मीं तो यज्ञ केला. मजवर कृपा कर.' त्याच्या नमस्कारानें इन्द्र संतुष्ट झाला व त्याला वर देऊं लागला. तो म्हणाला, 'राजा, तुझे कोणते पुत्र जीवंत व्हावे असें तुला वाटतें? स्त्रीरूप असतांना झालेले कीं पुरुष असतांना झालेले?' हा प्रश्न ऐकून तापसी हात जोडून म्हणाली, 'इन्द्रा, स्त्री म्हणून झालेले माझे पुत्र जीवन्त व्हावे!' या उत्तरानें इन्द्र विस्मित झाला आणि तिला पुनः म्हणाला, 'पुरुष असतां त्वां उत्पन्न केलेले पुत्र तुला द्वेषार्ह कां बरें वाटतात? आणि स्त्रीरूपांत झालेल्यांवर तुझें प्रेम अधिक कां? याचें कारण ऐकण्याची माझी इच्छा आहे, तरी तें तूं मला सांग.' तापस स्त्रीनें उत्तर केलें, 'स्त्री-पुरुषसंबंधांत स्त्रीला अधिक प्रेम असतें, पुरुषाला तितकें नसतें. यास्तव हे देवराजा, स्त्रीरूपांत मला जे झाले तेच पुत्र जीवंत होवोत.'

तिचें भाषण ऐकून संतुष्ट झालेला इन्द्र म्हणाला, 'तुझें म्हणणें सत्य आहे. तुझे सगळेच पुत्र जीवन्त होवोत. आणखी तुला जो पाहिजे असेल तो वर तूं मागून घे. तुला पुनः पुरुष व्हावयास पाहिजे कीं स्त्री रहाणेंच बरें वाटतें? तुझी इच्छा असेल तसें सांग; तें मी देतों.' स्त्रीनें उत्तर केलें, 'इन्द्रा, स्त्रीपणाच मला पाहिजे, पुरुषत्व नको.' इन्द्र तिला पुनः म्हणाला, 'अगे, पुरुषत्वाचा त्याग करून स्त्रीत्वच तुला पाहिजे हें कसें? इन्द्राच्या या प्रश्नाला स्त्रीभूत अशा त्या राजानें उत्तर दिलें, 'इन्द्रा, स्त्रीपुरुषांच्या संयोगांत स्त्रीलाच अधिक प्रेम वाटतें, या कारणास्तव मला स्त्रीत्वच पाहिजे. देवश्रेष्ठा, स्त्री असतांना मला अधिक सुख वाटलें, म्हणून स्त्रीरूपावरच मी संतुष्ट आहें. देवेंद्रा, तूं आतां जा.' तिच्या भाषणानंतर 'ठीक आहे' असें म्हणून व तिचा निरोप घेऊन इन्द्र स्वर्गी निघून गेला. भीष्म म्हणतो, 'युधिष्ठिरा, याप्रमाणें स्त्री व पुरुष यांच्या संयोगांत स्त्रीला सुख अधिक वाटतें असें ठरलें आहे.' १३.१.१२

---

## अध्याय १३ वा.

[ १ लोकहितासाठीं मनुष्यानें कसें वागावें असा युधिष्ठिराचा प्रश्न. २ भीष्माचें त्याला उत्तर. ]

(१) **युधिष्ठिर**—हे पितामह, ज्याला या लोकांतील व्यवहार आणि परलोकींचें हित यांची इच्छा आहे, त्या मनुष्यानें काय करावें, लोकांशीं कसा व्यवहार करावा व आपलें वर्तन कसें ठेवावें, तें मला सांगा.

(२) **भीष्मः**—युधिष्ठिरा, अशा मनुष्यानें शरीरानें तीन कर्में, वाणीनें चार कर्में, व मनानें तीन अशा दहा प्रकारचीं कर्में वर्ज्य करावीं. कोणाची हिंसा करूं नये, चोरी करूं नये व परस्त्रीशीं गमन करूं नये. हीं तीन कायिक पापें सर्वथा सोडून द्यावीं. अचरट भाषण, कठोर शब्द, दुष्टपणा, आणि खोटें बोलणें या चार वाचिक कर्मांचा त्याग करावा, त्या मनांतहि आणूं नयेत. दुसऱ्याच्या धनावर दृष्टि ठेवणें, त्याचें अनिष्ट चिंतणें आणि दुष्ट विचार बाळगणें हीं तीन मानसिक पापकर्में टाकून सर्व प्राण्यांवर प्रेम करावें. कोणत्याहि कर्माचें फळ मिळाल्याशिवाय रहात नाहीं; यास्तव अहिंसा, आस्तिक्य व सत्य भाषण हीं कर्में नित्य करून पापकर्में वर्ज्य करावीं. मनुष्य जें जें कांहीं शुभ किंवा अशुभ कर्म आचरतो, त्याचें त्याचें फळ त्याला अवश्य मिळतें. १३.१.१३.

---

## अध्याय १४ वा.

[ १. शिवाचीं नांवें सांगण्याविषयीं भीष्माला युधिष्ठिराची विनंति. २ भीष्माला तीं सांगण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें तो त्यासाठीं श्रीकृष्णाकडे बोट दाखवितो. ३ त्याप्रमाणें कृष्ण शिवाचें माहात्म्य सांगतो. ४ उपमन्यु श्रीकृष्णाला शिवनामजपाची दीक्षा देतो. ५ कृष्णाला शिव वर मागावयास सांगतो. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे भीष्मपितामह, जगत्पति शिवाचीं नांवें तूं ऐकिलीं असशील. तीं नांवें तूं मला सांग. तो शंभु विशाल स्वरूपाचा, विश्वव्यापक, महैश्वर्यसंपन्न, देवासुरांचा गुरु असून अव्यक्त असें जगताचें कारण त्याच्यापासून उत्पन्न झालेलें आहे.

( २ ) **भीष्मः**—युधिष्ठिरा, त्या बुद्धिशाली महादेवाचे गुण वर्णन करण्याचें माझें सामर्थ्य नाहीं. तो कोठेंहि दिसत नसला, तरी सर्वांला व्यापून मात्र राहिला आहे. ब्रह्मा विष्णु इंद्र इत्यादिकांचा तोच उत्पत्तिकर्ता व स्वामी असून ब्रह्मदेवापासून पिशाचापर्यंतच्या सर्व देवदेवता त्याचीच उपासना करतात; जगत्कारण अशी जी विविध प्रकृति व तिचा द्रष्टा जो पुरुष यांच्याहि पलीकडचा तो महादेव असून तत्त्वद्रष्टे योगी व ऋषि त्याचेंच चिंतन करतात. अव्यक्त असें परब्रह्म आणि सदसद्रूप माया हीं त्याचींच स्वरूपें होत. देवांचाहि देव अशा त्या प्रजापति महादेवानें आपल्या तेजानें प्रकृति आणि पुरुष यांत क्षोभ उत्पन्न करून ब्रह्मदेवाला प्रथम निर्मिलें. अशा त्या बुद्धिशाली महादेवाचे गुण वर्णन करण्यास जन्मजरादि दोषांनीं व्यापिलेला माझ्यासारखा मृत्यूच्या अगदीं जवळ गेलेला मनुष्य कसा समर्थ होईल बरें ? तें करण्यास शंखचक्रगदाधारी असा एक नारायण म्हणजे श्रीकृष्णच समर्थ आहे. तो ज्ञाता व श्रेष्ठ गुणांनीं युक्त, सर्वव्यापी व कोणालाहि अजिंक्य असा असून महातेजस्वी अशा त्याचें दर्शन योगदृष्टीलाच होऊं शकतें. या महात्म्या श्रीकृष्णानें भक्तीच्या योगानें त्या महादेवाला पूर्वीं बद्रिकाश्रमांत प्रसन्न करून घेऊन विषयभोगाहून अत्यंत उच्च असें जें आत्मतत्त्व तें प्राप्त करून घेतलें. त्यासाठीं त्यानें एक सहस्र वर्षें तप केलें व त्या चराचराचा गुरु अशा वरद शिवाला प्रसन्न केलें. प्रत्येक युगांत श्रीकृष्णानें मोठ्या भक्तीनें शिवाला संतुष्ट केलेलें आहे व शिवहि त्या महात्म्याच्या भक्तीनें प्रसन्न झालेला आहे. महात्म्या जगदुत्पत्तिकर्त्या शंकराचें श्रेष्ठ ऐश्वर्य म्हणून जें आहे, तें या श्रीकृष्णानें पुत्रेच्छेमुळें प्रत्यक्ष पाहिलें आहे. त्याहून श्रेष्ठ असा विश्वांत दुसरा कोणी शिवाचीं सर्व नावें सांगण्यास समर्थ

असलेला मला तरी दिसत नाहीं. हा महाबाहु कृष्णच त्या भगवान् महेश्वराचे गुण व विभूति साकल्यानें वर्णन करूं शकेल.'

वैशंपायन म्हणतो, राजा जनमेजया, शंकराच्या माहात्म्याविषयीं असें बोलून भीष्म पितामह कृष्णाला म्हणाला, 'हे सुरासुरांच्या गुरो कृष्णस्वरूपी विष्णो, शिव हा विष्णुरूपच होय; तरी युधिष्ठिरानें मला विचारल्याप्रमाणें, महादेवाचीं सहस्रनामें जीं पूर्वीं ब्रह्मपुत्र तंडीनें ब्रह्मलोकीं सांगितलीं, तीं तूं आतां सांग, आणि द्वैपायनादि हे तपोधन ऋषि तीं ऐकोत. ध्रुव, नंदी, होता, गोप्ता, विश्वसृज्, अग्नि, मुंडी आणि कपर्दी यांचेंहि माहात्म्य आम्हांला तूं कथन कर.'

( ३ ) श्रीकृष्ण म्हणाला, 'भगवान् शंकराच्या पराक्रमाचें याथातथ्यानें वर्णन करणें अशक्य आहे. हिरण्यगर्भादि इन्द्रप्रमुख देव तसेच सूक्ष्म दृष्टीचे आदित्य यांनांहि त्याचें रहस्य कळलेलें नाहीं. मग सज्जनांचा आधार अशा त्या देवाचें स्वरूप माणसाला कसें कळावें ? तथापि मला जितपत सांगवतील तितपत त्या असुरारि भगवानाचे कांहीं गुण मीं तुम्हाला सांगतों.'

वैशंपायन म्हणतो, असें म्हणून भगवान् श्रीकृष्ण उदकस्पर्श करून पवित्र झाला आणि महात्म्या शिवाचे गुण सांगूं लागला.

श्रीकृष्णः—हे श्रेष्ठ ब्राह्मणहो, हे युधिष्ठिरा, आणि हे भीष्मा तूंहि, आतां शंकराचीं नांवें मीं सांगतों तीं ऐका. पूर्वीं माझा पुत्र जो सांब त्याच्यासाठीं मीं दुर्धर तप केलें व समाधिस्थितींत त्या भगवंताचें स्वरूप मीं प्रत्यक्ष पाहिलें. रुक्मिणीचा पुत्र प्रद्युम्न यानें शंबराचा वध केल्यानंतर बारा वर्षें होऊन गेलीं असतां रुक्मिणीचे प्रद्युम्न चारुदेष्ण्य इत्यादि पुत्र पाहून जांबवतीलाहि पुत्रेच्छा झाली आणि मजजवळ येऊन ती म्हणाली, 'हे अच्युता, शूर, बलवंतामध्यें श्रेष्ठ, सुंदर स्वरूपाचा, निष्पाप असा अगदीं तुझ्यासारखा पुत्र तूं मला लवकरच दे. हे यदुकुलावतंसा, तुला स्वतःला त्रैलोक्यांतहि कांहीं मिळवावयाचें राहिलेलें नाहीं; पण तुला वाटेल तर तूं दुसरें त्रैलोक्यहि निर्माण करशील. तूं पूर्वीं बारा वर्षें व्रताचरण करून शरीर कष्टविलें आणि पशुपति शंकराची आराधना करून रुक्मिणीच्या ठिकाणीं पुत्र उत्पन्न केले. ते पुत्र चारुदेष्ण, सुचारु, चारुवेग, यशोधर, चारुश्रवा, चारुयशा, प्रद्युम्न, आणि शंभु हे होत. हे जसे उत्तम पराक्रमी पुत्र तूं रुक्मिणीच्या ठिकाणीं उत्पन्न केले, तसा, हे मधुसूदना, मलाहि एक पुत्र तूं दे.' जांबवतीनें मला असें सांगितलें असतां, त्या सुंदरीला मीं

म्हटलें, 'ठीक आहे, तुझ्या म्हणण्याप्रमाणें मीं करतों, तरी तपाला जावयास मला अनुज्ञा दे.'

तेव्हां जांबवती मला म्हणाली, 'यादवेंद्रा, जा बरें, कल्याण साधण्यासाठीं जा व विजयी होऊन या. ब्रह्मा, शिव, काश्यप, नद्या, देव, औषधि, वेद, ऋषि, यज्ञ, समुद्र, दक्षिणा, नक्षत्रें, पितर, ग्रह, देवपत्न्या, देवकन्या, देवमाता, मन्वन्तरें, गाई, चंद्र, सूर्य, इंद्र, सावित्री, ब्रह्मविद्या, ऋतु, संवत्सर, युगें, क्षण, लव मुहूर्त निमेष हे कालभाग, हे सर्व तूं जाशील तेथें सर्वत्र तुझें रक्षण करोत. तुझा मार्ग सुखकर होवो. हे निष्पाप श्रीकृष्णा, जा आणि सावधपणें वाग.' याप्रमाणें शुभाशीर्वादांनीं तिनें माझी पाठवणी केल्यावर तिचा निरोप घेऊन मीं वसुदेव पिता व माता देवकी यांजकडे जाऊन जांबवतीचें म्हणणें त्यांना कळविलें. त्यांना तें ऐकून क्षणभर फार दुःख झालें. नंतर त्यांचा, तसाच बलशाली रामाचा मी निरोप घेतला. मातापित्यांनीं मोठ्या प्रेमानें त्यावेळीं 'तुझें तप सिद्धीस जावो व त्यांत कोणतेंहि विघ्न न येवो' असा आशीर्वाद मला दिला.

मातापित्यांची आज्ञा घेतल्यावर मी गरुडाचें स्मरण केलें, तेव्हां त्यानें मला हिमालयावर नेऊन सोडलें व तेथून त्याला मी परत पाठविलें. तेथें त्या श्रेष्ठ पर्वतावर मला काय काय अद्भुत गोष्टी दिसल्या म्हणून सांगूं! तपश्चर्या करण्याचें तें महात्म्या व्याघ्रपादपुत्र उपमन्यूचें रमणीय आश्रमस्थान अजून माझ्या दृष्टीपुढें आहेसें वाटतें. ब्राह्मी लक्ष्मीनें वेष्टिलेलें तें स्थान देव व गंधर्व यांनाहि पूजार्ह आहे. त्या आश्रमाला कदंब, नारळ, केतक, जांब, वड, बेल, आंबे, कवठ, शाल, ताड, बोरें, नागचाफा, अशोक, चाफे, फळस, इत्यादिकांचे पुष्पफळयुक्त वृक्ष तशाच अनेक प्रकारच्या पुष्पवल्ली, केळीचीं बनें, इत्यादिकांनीं शोभा आलेली होती. त्या वृक्षांचा अनेक पक्षी उपभोग घेत. त्यांत ठिकठिकाणीं लेपन करण्यासाठीं भस्मांच्या राशी ठेविलेल्या होत्या. हरिण, वानर, वाघ, सिंह, चित्ते, मोर, मांजरें, सर्प, तसेच रेडे अस्वलें इत्यादि विविध पशुपक्षी, यांनीं तो आश्रम गजबजलेला असे. नुकताच मदस्राव होऊं लागलेले तरुण हत्ती, नाना प्रकारें आनंदानें बागडणारे पक्षी, पुष्पांनीं भरलेले चित्रविचित्र वृक्ष त्यांत जिकडे तिकडे दिसत. त्यांत अनेकविध फुलांच्या रजःकणांनीं भरलेले व हत्तींच्या मदजलाच्या वासानें सुगंधित झालेले वारे स्वर्गीय स्त्रियांच्या गायनाचा मधुर ध्वनि घेऊनच जणूं वहात असत. पक्ष्यांचें गाणें, हत्तींची गर्जना, किन्नरांचें गायन तसेंच सामगायकांचा मधुर

घोष, यांनीं तो दुमदुमून गेला होता. त्यांत अत्यंत मनोहर अशीं सरोवरें व फुलांनीं मढवलेलीं विशाल अग्निगृहें होतीं. पवित्र जलानें युक्त अशी गंगा त्याजवळून वहात असून अग्नीप्रमाणें तेजस्वी असे धर्मिष्ठ महात्मे त्यांत वास करीत. त्यांतील कित्येक तपस्वी वायुभक्षण करून तर कित्येक सदा जप करून असत. कित्येक नित्य ध्यानस्थ राहून योगसाधनानें चित्त शुद्ध करीत. कोणी धूम्रपान करणारे, तर कोणी ऊष्णपान करणारे, तर कोणी दुधावर रहाणारे होते. कित्येक जण सारा व्यवहार गाईप्रमाणें करीत, कोणी चंद्रकिरणच पिऊन रहात, कोणी फेंसच खात, तर कित्येक हरिणाप्रमाणें वागत, कोणी पिंपळाचीं फळें भक्षण करीत, तर कोणी नुसतें पाणी पिऊन रहात. कित्येक फाटकीं कातडीं पांघरीत तर दुसरे वल्कलेंच परिधान करीत. याप्रमाणें अत्यंत कष्टप्रद नियमांचें आचरण करणारे तेथील नानाविध तपस्वी पाहून, कृष्ण म्हणतो, मीं त्या आश्रमांत प्रवेश केला. शिवप्रभृति थोर थोर देवांनीं ज्याचा आश्रय केलेला आहे, असें तें आश्रमस्थान आकाशांत जसें चंद्रमंडळ तसें त्या भूप्रदेशांत नित्य शोभत असे. तेथील प्रभावशाली महात्म्या तपस्व्यांच्या संसर्गामुळें त्या आश्रमांत सर्प नकुळांशीं खेळत आणि हरिण वाघांशीं मित्रत्वानें रहात. वेदवेदांगांत पारंगत असलेल्या श्रेष्ठ ब्राह्मणांनीं व अनेक नियमांच्या आचरणामुळें प्रख्यात झालेल्या थोर ऋषींनीं भरून गेलेल्या त्या आश्रमांत मीं पाऊल टाकतांच जटा व फाटकीं वस्त्रें धारण केलला तो उपमन्यु माझ्या दृष्टीस पडला. आपल्या तीव्र तेजानें तो अग्नीप्रमाणें तळपत होता. त्याची वृत्ति शांत व वय तरुण असून त्या विप्रश्रेष्ठाच्या मागें शिष्यांचा घोळका होता. मी त्याला मस्तक वांकवून नमस्कार करतांच तो मला म्हणाला, ' बा पुंडरीकाक्षा, तुझें स्वागत असो. आज माझें तप फळास आलें. आम्ही ज्याची पूजा करावयाची व ज्याचें दर्शन घ्यावयाचें तोच तूं आम्हांला भेटावयास येऊन आमची पूजा करतोस !' त्याचें बोलणें ऐकून मीं पुनः हात जोडिले आणि तेथील मृग, पक्षी, अग्नि, धर्माचरण, शिष्यवर्ग या सर्वांविषयीं त्याला कुशल प्रश्न विचारिले. त्यांचें उत्तर देऊन भगवान् उपमन्यु अगदीं गोड शब्दांनीं मला म्हणाला, 'कृष्णा, तुला तुझ्यासारखाच पुत्र होईल यांत संशय नाहीं. कडक तप करून तूं शंकराला संतुष्ट कर. हे अधोक्षजा, तो देव येथेंच सपत्नीक रहातो. जनार्दना, या ठिकाणीं अनेक ऋषि व देव यानीं तप, ब्रह्मचर्य, सत्य व इंद्रियनिग्रह यांच्या साह्यानें त्या श्रेष्ठ दैवताला संतुष्ट करून इष्ट गोष्टी प्राप्त करून घेतल्या आहेत. तो

भगवान् तेज आणि तप यांचा सागरच आहे. चांगल्या वाईट सर्व वस्तु उत्पन्न करून व नंतर त्यांचा लय करीत तो ध्यानगम्य भगवान् म्हणजे ज्याच्या प्राप्तीची तुला इच्छा आहे तो महादेव देवी पार्वतीसह येथें आहे. हिरण्यकशिपु नांवाचा जो मेरूलाहि हालवून सोडणारा दानव होऊन गेला, त्यानें लक्षावधि वर्षें टिकणारें देवांचें सर्व ऐश्वर्य शंकरापासूनच मिळविलें. त्याच्याच मंदार नांवाच्या सुप्रसिद्ध पुत्रानें महादेवाच्या वरामुळें इन्द्राला लाखों वर्षें लढविलें. विष्णूचें सुदर्शन चक्र आणि इंद्राचें वज्र हीं त्या मंदाराच्या अंगावर फुटून गेलीं. हे केशवा, सुदर्शनचक्र मूळ भगवान् शंकरानें निर्माण करून जलांत लपलेल्या व बलानें उन्मत्त झालेल्या त्या दैत्याला ठार केल्यावर तुझ्या स्वाधीन केलें. त्या भगवान् पिनाकीशिवाय दुसऱ्याला त्याकडे पहाणेंहि शक्य नाहीं इतकें तें तेजस्वी असल्यामुळें त्याला शंकरानें म्हटल्याप्रमाणें सुदर्शन हेंच नांव मिळालें. असलें तें शस्त्र त्या मन्दाराच्या अंगावर या शंकराच्या वरामुळेंच जीर्ण होऊन गेलें. त्याच्या शरीरावर चक्र वज्र इत्यादि शेकडों शस्त्रेंहि कांहींच परिणाम करीत नाहींत. त्या बलिष्ठानें गांजलेले देव शिवानें वर दिलेल्या असुरांना मारूं लागले. विद्युत्प्रभावर संतुष्ट होऊन शिवानें त्याला त्रैलोक्याचें राज्य दिलें व त्याप्रमाणें तो एक लक्ष वर्षेंपर्यंत त्रैलोक्याधिपति झाला. त्याला शिवानें आपल्या सेवकांत स्थान दिलें आणि लक्षावधि पुत्र व कुशद्वीपाचें राज्यहि दिलें. ब्रह्मदेवानें शतमुख नांवाचा असुर उत्पन्न केला होता; त्यानें शंभर वर्षेंपर्यंत अग्नींत आपल्या मासांच्या आहुत्या दिल्यामुळें शंकर त्यावर प्रसन्न झाला व 'तुला काय देऊं' असें त्याला म्हणाला. 'मला अद्भुत योगशक्ति आणि शाश्वत बळ हीं मिळावीं' असें असुरानें म्हणतांच भगवान् शिवानें 'तुझ्या म्हणण्याप्रमाणें होवो,' असें त्याला सांगितलें. स्वायंभुव मनूनें पुत्रप्राप्तीसाठीं यज्ञ केला, तेव्हां शंकरानें त्याला त्याचें फळ म्हणून सहस्र पुत्र दिले. कृष्णा, तुला योगेश्वर याज्ञवल्क्य हा प्रसिद्ध धर्मशील ऋषि ठाऊक आहेच, त्यानेंहि महादेवाची आराधना करून मोठी कीर्ति मिळविली. पराशरमुनीचा पुत्र वेदव्यास तोहि शंकराच्या आराधनेनेंच मोठा कीर्तिमान् योगी झाला. इन्द्रानें वालखिल्य मुनींची अवज्ञा केली असतां त्यांनीं त्याच्यावरील रागानें रुद्राला संतुष्ट केलें, तेव्हां रुद्र त्यांना म्हणाला, 'तुम्हीं तपाच्या योगानें सोम हरण करणारा गरुड उत्पन्न कराल.' महादेवाच्या क्रोधामुळें एकदां सर्व जल नष्ट झालें असतां देवांनीं सप्तकपाल यज्ञ करून रुद्राला संतुष्ट केलें व त्यामुळें दुसरें जल उत्पन्न झालें. अत्रिऋषीची ब्रह्मवादिनी पत्नी

रागानें त्याचा त्याग करून व 'मीं पतीच्या नियंत्रणांत कधींच रहाणार नाहीं' असें म्हणून महादेवाला शरण गेली. तिनें निराहार राहून अत्रिमुनीच्या भयानें तीनशें वर्षें लोखंडाच्या मुळक्यांवर शयन केलें व महादेवाला प्रसन्न केलें, तेव्हां महादेव प्रसन्न मुखानें हंसत तिला म्हणाला, 'तुला पतीशिवायच रुद्राच्या वरामुळें पुत्र होईल व तो तुझ्याच नांवानें प्रसिद्ध होईल. मधुसूदना, विकर्णानें त्या भक्तांना सुख देणाऱ्या महादेवाची कृपा संपादून सिद्धि मिळविली. शाकल्यानें नऊशें वर्षें महादेवाची मनोभावानें आराधना केली, तेव्हां संतुष्ट झालेला तो भगवान् त्याला म्हणाला, 'वत्सा, तूं ग्रंथकार होशील, व तुला त्रैलोक्यांत अक्षय्य कीर्ति मिळेल; तसेंच तुझ्या कुलांत महर्षि उत्पन्न होतील व तुझा पुत्र ब्राह्मणांमध्यें श्रेष्ठ असा सूत्रकर्ता होईल.' कृतयुगांत सावर्णि नांवाचा प्रसिद्ध ऋषि होता, त्यानें सहा सहस्र वर्षें येथें तप केलें. तेव्हां रुद्र प्रसन्न होऊन त्याला म्हणाला, 'हे निष्पापा, मीं प्रत्यक्ष तुझ्या तपानें संतुष्ट झालों आहें, यास्तव तूं अजरामर कीर्तीचा ग्रंथकार होशील.' पूर्वीं इन्द्रानें वाराणशी क्षेत्रांत त्या दिगंबर देवाची आराधना केली व तेणेंकरून त्याला देवांचें राज्य मिळालें. नारदाच्या भक्तीनें प्रसन्न झालेल्या त्या देवदेवानें त्याला वर दिला कीं, तेजानें, तपानें व कीर्तीनें तुझ्यासारखा दुसरा कोणी होणार नाहीं, तूं नित्य वाद्य वाजवून माझें गुणगान करीत फिरशील. कृष्णा, मलाहि त्या महादेवाचें साक्षात् दर्शन कसें झालें तें आतां ऐक; त्या पशुपतीला मीं जितेंद्रिय होऊन कशासाठीं आराधिलें व त्या महेश्वरापासून काय प्राप्त करून घेतलें तें मीं तुला सविस्तर सांगतों.

'कृतयुगांत एकदां व्याघ्रपाद नांवाचा प्रख्यात ऋषि होऊन गेला. तो वेद व वेदांगें यांत अगदीं निष्णात होता. त्याचा मीं पुत्र. माझा धाकटा भाऊ धौम्य नांवाचा होता. हे माधवा, एके दिवशीं मीं व धौम्य खेळतां खेळतां पवित्र अंतःकरणाच्या अशा कांहीं मुनींच्या आश्रमाशीं आलों. तेथें एका गाईचें दूध काढतांना मीं पाहिलें. तें दूध अमृतापेक्षांहि गोड होतें. मग घरीं आल्यावर बालस्वभावाला अनुसरून मीं मातेला म्हटलें, 'आई, मला आज दूधभाताचें जेवण घाल. माझें भाषण ऐकून मातेला फार दुःख झालें, कारण आमच्या घरीं दुधाचा अगदींच अभाव होता. मग तिनें पाण्यांत पीठ कालवून 'हें घ्या दूध' असें म्हणून आम्हां दोघांना तें प्यावयास दिलें. पण, माधवा, मीं पूर्वीं गाईचें दूध प्यालों होतों. पित्यानें एका यज्ञप्रसंगानें मला एका मोठ्या घरीं नेलें होतें,

तेथें दिव्य कामधेनूचें अमृतासारखें दूध मला मिळालें होतें. त्या वेळीं दूध येतें कोठून व त्याची रुचि कशी असते, हें मला कळलें होतें. अर्थात् त्या पिठाच्या पाण्यानें मला कांहीं बरें वाटलें नाहीं. तेव्हां बालपणाला अनुसरून मीं मातेला म्हटलें, 'आई, तूं मला दिलें तें कांहीं दूध नव्हे.' माझें भाषण ऐकून मातेला फारच दुःख झालें. तिनें मला पोटाशीं धरून व माझें मस्तक प्रेमानें हुंगून मला म्हटलें, 'बाळा, ऋषींच्या मुलांना दूधभात कोठून मिळणार? ते वनांत राहून कंदमुळांवर निर्वाह करणारे, नदीकाठीं, गिरिकंदरांत, अरण्यांतील आश्रमांत वारा खाऊन पाणी पिणारे मुनि गांवांत रहाणाऱ्या लोकांचें खाणें सोडून रानफळेंच सेवन करतात. बाळा, या रानांत गाईचें नांवहि ऐकूं यावयाचें नाहीं, मग दूध कोठून मिळणार? नदी, गुहा, पर्वत येथील पवित्र स्थानीं जप तप करीत असणाऱ्या आपल्याला शिव हाच सारा आश्रय. तेव्हां त्याला प्रसन्न करून घेतल्याशिवाय आपल्याला दूध, चांगलीं वस्त्रें इत्यादि वस्तु कशा प्राप्त होतील? मनोभावानें त्या शंकराला शरण जावें व त्याचा प्रसाद मिळवावा तेव्हांच तुझ्या इच्छेचें फळ तुला मिळूं शकेल.' हे शत्रुनाशका श्रीकृष्णा, मातेचें तें बोलणें ऐकून मीं तिला हात जोडून नमस्कार केला आणि पुनः प्रश्न केला, 'आई, महादेव म्हणतेस तो कोण आहे व तो प्रसन्न कसा होतो? तो कोठें रहातो व त्याचें दर्शन कसें घ्यावयाचें? त्याचा संतोष कसा होतो व त्याचें रूप तरी कसें आहे? तो प्रसन्न झाला किंवा आपल्याला तो दर्शन देईल, हें ओळखावयाचें तरी कसें?' हे कृष्णा, आपल्या प्रेमळ मातेला मीं असें विचारिलें, तेव्हां तिनें माझें मस्तक हुंगिलें आणि तिच्या नेत्रांत अश्रूंचा पूर आला. मग ती डोळे पुसून अगदीं दीनपणें माझ्या प्रश्नाचें उत्तर देऊं लागली.

ती म्हणाली, 'महादेवाचें स्वरूप जाणणें फार कठीण आहे. तें कोणी सांगितलें तरी मनांत धरणें कठीण व त्याच्या प्राप्तींत तर फारच विघ्नें आहेत. ज्यांनीं मनोनिग्रह केलेला नाहीं त्यांना तो ग्रहण करण्यास व पहातां येण्यास अति बिकट आहे. ज्ञानी लोक त्यांचीं रूपें अनेक प्रकारचीं सांगतात व त्यांचीं स्थानें अनेक असून त्याला प्रसन्न करण्याचे मार्गहि अनेक आहेत. त्याचें पवित्र चरित्र कोणाला कळणार आणि त्यानें जीं रूपें आजवर घेतलीं त्याचें ज्ञान तरी कोणाला आहे? तो कशी लीला करतो, कसा प्रसन्न होतो, प्राणिमात्राच्या अंतःकरणांत राहून तो भक्तांवर कृपा करण्यासाठीं त्यांना दर्शन कसें देतो, इत्यादि बाबतींत त्याचें पवित्र चरित्र कथन करणाऱ्या मुनीनीं ब्राह्मणांवर अनुग्रह करण्यासाठीं त्यांना

जें सांगितलें, तें मीं तुला आतां संक्षेपानें सांगतें, ऐक. त्या महादेवाच्या शरीरांत ब्रह्माविष्णु इन्द्र, रुद्र, आदित्य, विश्वेदेव इत्यादि देवांचा समावेश होतो. तसाच मनुष्यें, देवस्त्रिया, भूतपिशाच, किरात, शबर, अनेक जलचर प्राणी यांचाहि होतो. तो नाना रूपें धारण करतो; कधीं तो, कांसव, मासा, शंख, अशीं रूपें घेतो, तर कधीं यक्ष, राक्षस, सर्प, दैत्य, दानव, बिळांत रहाणारे सर्प यांचींहि रूपें घेतो. केव्हां तो वाघ, सिंह, हरिण, वृक्ष, पक्षी, घुबड, कुत्रा, कोल्हा यांची रूपें धारण करतो, केव्हां हंस, कावळा, मोर यांचीं तर केव्हां बगळा, गिधाड, चक्रवाक यांचींहि रूपें तो घेतो. कधीं तो पर्वत धारण करतो, तर कधीं गोरूपहि होतो व केव्हां हस्ति, उंट, घोडा, गाढव यांचें रूप घेतो. मेंढा, वाघ, व इतर पशु यांच्या रूपानें तो असतो, तसाच दिव्य पक्षांच्या रूपानेंहि असतो. कधीं त्याच्या हातांत दंड तर कधीं छत्र व कधीं कमंडलु असतो. त्याला केव्हां सहा तोंडें असतात, तर केव्हां अधिकहि असतात. त्याला तीन डोळे व अनेक मस्तकें; तशाच अनेक कमरा व पाय आणि अनेक पोटें व तोंडें आहेत. त्याला हातहि पुष्कळ व कुशीहि अनेक असतात व तो अनेक सेवकांनीं वेष्टिलेला असतो. तो केव्हां ऋषीच्या किंवा गंधर्वाच्या रूपांत आढळतो, तर केव्हां सिद्धाच्या किंवा अचारणाच्या स्वरूपांत दिसतो. त्याच्या शरीराला शुभ्र भस्म चर्चिलेलें असून मस्तकावर अर्धचंद्र झळकत असतो. अनेक ध्वनि त्याच्या गुणांचा घोष करीत असतात. सर्व प्राण्यांचा अंत करणारा तो आहे, तसाच सर्वांचा रक्षक आणि अन्तर्यामीहि आहे. तो सर्वव्यापी व सर्वांच्या हृदयांत वास करणारा आहे. बाळा, मनुष्य जी जी इच्छा धरून त्याची आराधना करतो, ती सर्व त्याला कळते, म्हणून तुझी इच्छा पूर्ण व्हावी असें तुला वाटत असेल, तर तूं त्याला शरण जा. तो आनन्दित होतो, रागावतो, हुंकारहि करतो. त्याच्या हातांत चक्र, शूळ, गदा, मुसळ, खड्ग, पट्टा हीं शस्त्रें असतात. तो केव्हां शेषाकार असतो, कधीं नागाचा पट्टा कमरेभोवतीं गुंडाळतो, कधीं कुंडलाप्रमाणें नागांना कानावर घेतो, कधीं त्यांना यज्ञोपवीतासारखें खांद्यावरून सोडतो, तर कधीं हत्तीचें कातडें उत्तरीय वस्त्र म्हणून पांघरतो. तो हंसतो, गातो व उत्तम नाचतो, तसाच तो निरनिराळीं वाद्यें वाजवितो. आपल्या गणांच्यामध्यें बसून तो बडबडतो, जांभया देतो, रडतो व इतरांनाहि रडवितो. केव्हां तो उन्मत्ता-सारखें रूप घेतो, तर कधीं गोड स्वरानेंहि बोलतो. केव्हां तो भयंकर हंसून आपल्या डोळ्यांनीं लोकांना घाबरवितो आणि मनाला वाटेल त्याप्रमाणें जागतो,

झोंपतो किंवा जांभया देत बसतो. तो स्वतः जप करतो व भक्त त्याचा जप करतात. तसाच तो स्वतः तप करतो व भक्त त्याच्या प्राप्तीसाठीं तप करतात. तो देतो, घेतो, योगसाधन करतो व ध्यानहि धरतो. यज्ञांत तो वेदीवर, स्तंभावर, गोस्थानांत अथवा अग्नींत वारंवार दिसतो व केव्हां बाळ, तर केव्हां तरुण व केव्हां वृद्ध असा आढळतो. तो ऋषिकन्या व ऋषिपत्न्या यांशीं खेळतो. त्याचे केस उभे असतात व तो केव्हां नग्नावस्थेंत डोळे गरगरवीत असतो. त्याचा वर्ण गौर, सांवळा, काळा, शुभ्र, धुरकट, तांबूस असा असून डोळे विशाळ व गरगरणारे असतात व तो दिगंबर म्हणजे नग्न असतो. त्याला रूपच नाहीं, तो रूपाच्या पलीकडचा आहे, त्याला आदि नाहीं व अंत नाहीं; अशा त्याचा ठावठिकाण कोणाला लागणार ? तो भक्तीनेंच वश होणारा आहे. म्हणून बाळा, तूं एकनिष्ठ भक्त होऊन त्याची सेवा कर म्हणजे तुला इष्टप्राप्ति होईल.'

हे शत्रुनाशका कृष्णा, मातेचें बोलणें ऐकिल्यावर मी लगेच महादेवाची भक्ति एकनिष्ठपणें करूं लागलों, आणि तप करून शंकराला संतुष्ट केलें. एक सहस्र वर्षें डाव्या पायाच्या आंगठ्यावर मीं उभा होतों; त्यांतील पहिलीं शंभर वर्षें केवळ फळें खाऊन होतों, दुसरीं शंभर वर्षें पिकलेलीं पानें खाऊन व तिसरीं शंभर नुसत्या पाण्यावर मीं काढिलीं व त्यानंतरचीं सातशें वर्षें वायुभक्षण करून होतों. याप्रमाणें देवांचीं सहस्र वर्षें मी महादेवाची आराधना केली असतां तो भगवान् त्रैलोक्यनाथ संतुष्ट झाला आणि मी किती निष्ठावंत भक्त आहें हें पहाण्याचा त्यानें विचार केला. त्याप्रमाणें देवांनीं वेष्टिलेल्या इंद्राचें रूप घेऊन हातांत वज्र घेतलेला, असा तो पांढऱ्या रंगाच्या तांबड्या नेत्रांच्या व शांत कानांच्या अशा मदोन्मत्त ऐरावतावर बसून मजजवळ आला. दिव्यतेजानें तो तळपत होता. त्यानें हार केयूर इत्यादि अलंकार घातले होते. त्याच्या मस्तकावर श्वेत छत्र धरिलेलें असून भोंवतीं दिव्य गंधर्वांचें गाणें व अप्सरांचा नाच चालला होता.

माझ्याजवळ आल्यावर तो इंद्रवेषधारी महादेव मला म्हणाला, 'हे श्रेष्ठ ब्राह्मणा, मीं तुजवर प्रसन्न झालों आहें. तरी तुझ्या मनांत असेल तो वर तूं मजजवळ माग.' त्याचें भाषण ऐकून मला कांहीं मोठासा आनंद झाला नाहीं. तथापि आनंदित झाल्यासारखें दाखवून मीं त्याला म्हटलें, 'मला तुझ्यापासून किंवा महादेवाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि दैवतापासून वर घ्यावयाचा नाहीं, हें

तूं निश्चित समज; महादेवाशिवाय मला दुसऱ्यासंबंधानें बोलणेंहि आवडत नाहीं, हें अगदीं सत्य आहे. त्यानें म्हटलें तर मीं कृमीहि होईन किंवा अनेक शाखांचा वृक्षहि होईन. पण त्या पशुपतीशिवाय दुसऱ्याच्या वरानें मिळणारें त्रिभुवनाचें राज्यवैभवहि मला नको. शंकराच्या पादसेवेंत रत असतां मला चाण्डालाचा जन्म मिळाला तरी चालेल, पण इन्द्राच्या राजवाड्यांत देखील महादेवाशिवाय दुसऱ्याचा भक्त मीं होणार नाहीं. वायु किंवा पाणी यांवर राहून तप करणाऱ्या पुरुषाचा दुःखनाश, देवदानवांचा गुरु असा जो महेश्वर त्याची भक्ति केल्याविना होणार नाहीं. ज्याला शिवचरणाचें स्मरण होत नाहीं, त्याच्या अधर्मयुक्त अशा इतर कथा करावयाच्या काय? कलियुग प्राप्त झालें असतां मनुष्यानें शिवचरणांतच मन रमवावें. कारण शिवभक्तीचें रसायन प्याल्यानें संसाराचें भय नाहींसें होतें. ज्याच्यावर महादेव प्रसन्न झाला नाहीं त्याला दिवसभर तर राहो, पण अर्धादिवस, फार काय पण घटकाभर किंवा क्षणभर देखील शिवभक्ति घडावयाची नाहीं. तेव्हां, हे इन्द्रा, शंकराची आज्ञा झाली तर मीं किडा किंवा फुलपांखरूं देखील होईन, पण तुझ्याकडून त्रैलोक्याचें राज्य मिळालें तरी तें मला नको. त्याच्या वचनानें मीं कुत्रा झालों तरी चालेल, पण दुसऱ्यानें दिलेलें स्वर्गराज्यहि मला नको. स्वर्गांतील देवांचें राज्य, ब्रह्मलोक किंवा मोक्षहि मला नको. मला महेश्वराची सेवाच केवळ पाहिजे. जोंपर्यंत त्या चंद्रमौलि भगवान् पशुपतीचा प्रसाद झाला नाहीं, तोंपर्यंत वृद्धपणा, मृत्यु, जन्म, इत्यादि शेंकडों कारणांनीं होणारीं शारीरिक दुःखें सहन करणें भाग आहे. चंद्रसूर्याप्रमाणें देदीप्यमान् असा जो अद्वितीय अजरामर आदिदेव रुद्र, त्याला प्रसन्न केल्याविना कोणाला शांति मिळणार आहे? माझ्या कांहीं पापांमुळें मला जर पुनः जन्म घेणेंच असेल, तर त्या त्या जन्मीं माझी अक्षय भक्ति महादेवावरच जडो!' माझें उत्तर ऐकून इंद्र पुनः मला म्हणाला, 'महेश्वराशिवाय दुसऱ्या कोणाच्याहि कृपेची तुला अपेक्षा नाहीं, तर असा त्याच्यांत गुण तरी काय आहे? तो विश्वाचा स्वामी व सर्वांचें आदिकारण आहे याला प्रमाण काय?' त्यावर उपमन्यूनें उत्तर दिलें तें असें—

'ब्रह्मवादी ज्याला सत् आणि असत् किंवा व्यक्त आणि अव्यक्त अथवा नित्य एक व अनेक असें म्हणतात, त्या महेशाजवळच मीं वर मागणार. ज्याला आदि, मध्य व अंत हीं नाहींत, ज्ञान हेंच ज्याचें ऐश्वर्य, ज्याचें चिंतन करणेंहि कठीण, त्या परमात्म्याजवळ मीं वर मागणार आहें. हें जगद्रूपी सगळें ऐश्वर्य

बीजरूप होऊन ज्याच्यापासून निर्माण झालें, त्याच्यापासून मीं वर मागणार. तमाच्या पलीकडे असणारा जो प्रकाशरूप परमात्मा ज्याचें ज्ञान झालें असतां शोकाला जागा रहात नाहीं, त्याच्यापाशींच मी वर मागेन. हे इन्द्रा, प्राणिमात्राच्या मनांतील भाव जाणणारा व सगळ्या चराचरसृष्टीचें नियंत्रण करणारा जो सर्वव्यापी इष्ट काम पुरविणारा देव त्याची मीं पूजा करतों. कार्यकारणभावाच्या पलीकडे केवल स्थितींत राहून ज्ञान व योग याचें फल देणारा, ज्याची उपासना तत्त्वज्ञानी करतात, ज्याला देवांचा स्वामी व इन्द्राचाहि अन्तर्यामी म्हणतात, ज्यानें प्रथम सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाला आकाशरूपी अंडें भरून उत्पन्न केलें, त्या महेश्वरापाशीं मीं वर मागतों.

अग्नि, जल, वायु, पृथ्वी, आकाश, बुद्धि, मन, महत्तत्त्व यांना उत्पन्न करणारा त्या परमेश्वरावांचून कोण असणार सांग. मन, बुद्धि, अहंकार, तन्मात्रा ( सूक्ष्मस्वरूपांतील पंचभूतें ), इंद्रियें यांचा उत्पत्तिकर्ता शिवावांचून कोण आहे ? सर्व विश्व तोच उत्पन्न करतो. त्या देवेशाला आराधिलें म्हणजे मोठें ऐश्वर्य प्राप्त होतें. ब्रह्माविष्णुरुद्रांचा जो निर्माता त्यांचें ऐश्वर्यहि ज्यापासूनच आलेलें असतें, त्या परमेश्वराहून दुसरा ईश्वर म्हणून कोण असणार ? दितीच्या दैत्यदानवादि पुत्रांना ऐश्वर्य युक्त व शत्रुमर्दनसमर्थ करणें हें त्या महेशाशिवाय कोणाला शक्य आहे ? दिक्, काल, सूर्यादि तेजोगोल, वायु, चंद्र, तारका, हीं सारीं महादेवापासून झालीं असल्यामुळें त्याहून श्रेष्ठ कोण असणार ? यज्ञाची व त्रिपुराची उत्पत्ति व विनाश हीं त्यानेंच केलीं. इन्द्रा, फार काय सांगूं ? तुलाहि त्यानेंच उत्पन्न करून सिद्ध, गंधर्व व देव तसेच ऋषि यांच्या बहुमानाला पात्र केलें. सर्व चेतन व अचेतन वस्तुमात्राला व्यापून तोच राहिला आहे असें ज्ञानी पुरुष म्हणतात. भूः, भुवस्, स्वर् व महः हे लोक, लोकालोक पर्वत, मेरू इत्यादि सर्व ठिकाणीं तोच भरलेला आहे. त्याच्याशिवाय दुसरा कोणी श्रेष्ठ असता तर देवांना दानवांनीं गांजिलें असतां, देव त्यालाच शरण नसते का गेले ? देव, यक्ष, सर्प, राक्षस यांचे परस्पर झगडे होऊन नाश होतो, तेव्हां ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें अधोगति किंवा ऐश्वर्य देणारा हा महेशच होय. अंधक, शुक्र, दुंदुभि, महिष, बल, तसेच महान् यक्ष व राक्षस आणि निवातकवचांसारखे दैत्य यांना वर देऊन शेवटीं त्यांचा नाश करणारा महेश्वरावांचून कोण आहे ? देव व असुर यांमध्यें श्रेष्ठ असा जो अग्नि त्याच्या मुखांत दुसऱ्या कोणाचें वीर्य गेलें असतां त्याचा सुवर्णपर्वत झाला असता ?

या जगांत त्या दिगंबर शंकराहून दुसरा कोण ऊर्ध्वरेता म्हणून प्रसिद्ध आहे? तसेंच दुसऱ्या कोणाची पत्नी त्याच्या शरीराचा अर्धा भाग होऊन राहिली आहे अथवा मदनाला तरी दुसऱ्या कोणी जिंकिलें आहे? इन्द्रा, सांग बरें, दुसऱ्या कोणाच्या स्थानाची देव प्रशंसा करतात काय? स्मशानांत कोण क्रीडा करतो अथवा नृत्यविषयांत मोठी स्तुति कोणाची होते? याच्या सारखें ऐश्वर्य दुसऱ्या कोणाचें आहे? ऐश्वर्यानें गर्विष्ठ झाले तरी देवगण याची बरोबरी करितील काय? त्रैलोक्याला वंदनीय असें अचल स्थान दुसऱ्या कोणाचें आहे? त्याच्या-वांचून वर्षाव करणारा, तप करणारा व तेजानें तळपणारा मोठा कोण आहे? औषधी ऐश्वर्य व संपत्ति दुसरा कोण धारण करतो? साऱ्या त्रैलोक्यांत यथेष्ट क्रीडा करणारा दुसरा कोण आहे बरें? ज्ञानयोग व कर्मयोग यांच्या साह्यानें योगी ऋषि, गंधर्व व सिद्ध याचीच सेवा करतात. तोच सर्व विश्वाचें परमकारण आहे. विविध यज्ञकर्मांनीं सुरासुर ज्याची सेवा करतात व जो सर्व कर्मांच्या फलांपासून मुक्त आहे, तो महेश विश्वाचें आदिकारण होय, असें मीं म्हणतों. त्याचें स्वरूप अतुल असून स्थूल व सूक्ष्म असें दोन्ही प्रकारचें आहे. इंद्रियांना त्याचें ज्ञान होऊं शकत नाहीं. तो जसा सगुण तसाच निर्गुणहि आहे. सर्व गुणांचा तो नियंता असून सृष्टीची उत्पत्ति, रक्षण व नाश तोच करितो. भूत, भविष्य व वर्तमान म्हणजे तोच आहे व सर्वांना तो उत्पन्न करितो. अक्षर, अव्यक्त ज्ञान व अज्ञान, चांगलीं वाईट कर्में, धर्म व अधर्म हीं सर्व हाच होय. म्हणून त्याला मी सर्वांचें कारण म्हणतों. देवेंद्रा, त्याचें लिंग प्रत्यक्ष पहा. सृष्टीचा संहार करणाऱ्या त्या महादेव रुद्रानें तें भगांकित केलें आहे. त्याविषयीं पूर्वी मला मातेनें सांगितलें होतेंच. तात्पर्य महेशाहून श्रेष्ठ कांहीं नाहीं. तुझी इच्छा असेल तर तूंहि त्याला शरण जा.

हे इन्द्रा, सारें चराचर विश्व निर्गुण महेशापासून झालेलें प्रत्यक्ष तुला ठाऊक आहे. ब्रह्मदेव, इंद्र, अग्नि, विष्णु आदिकरून देव आणि दानव दुसरा कोणताहि विकल्प मनांत न आणतां ज्याचें स्तवन करतात, त्या चराचर जगाचा स्वामी अशा महादेव शंकराला मीं मनोनिग्रह करून इष्ट प्राप्तीसाठीं म्हणजे मोक्षास्तव शरण गेलों आहें. आतां तूं जें म्हणालास कीं त्याच्या श्रेष्ठपणाचें प्रमाण काय, त्याचें उत्तर असें कीं, सर्व देवहि ज्याच्या लिंगाची पूजा करतात त्याच्याहून श्रेष्ठ दुसरा कोण असणार? दुसऱ्या कोणाच्या लिंगाची सर्व देवांनीं अशी पूजा केलेली तूं ऐकिली आहेस काय? ही सारी प्रजा पहा. कांहीं भगांकित व कांहीं

लिंगांकित आहे. पण कमलांकित, चक्रांकित किंवा वज्रांकित कोणी आहे काय ? सारी प्रजा माहेश्वरीच नाहीं काय ? देवी पार्वतीच्या रूपाला अनुसरून सर्व स्त्रिया भगांकित असून शिवाच्या स्वरूपाला अनुसरून सारे पुरुष लिंगांकित आहेत, हें प्रत्यक्ष दिसत आहे. या जगताचें शिवावांचून दुसरें कोणी कारण असेल आणि देवीचें चिह्न त्याला नाहीं असें जो म्हणतो, तो दुर्मति मनुष्यांच्या बाहेरचा असला पाहिजे. पुरुष सारे महेशस्वरूपी व स्त्रिया साऱ्या उमास्वरूपी असून सारें चराचर जगत् या दोहोंनीं व्यापिलेलें आहे. यास्तव त्याच्यापासूनच वर किंवा मरण मला पाहिजे. आतां हे इन्द्रा, तूं जा किंवा रहा, वाटेल तसें कर. इतर देवता माझ्या सर्व इच्छा पुरविणाऱ्या असल्या तरी त्यांच्यापासून मी कसलीच अपेक्षा करीत नाहीं. वर असो कीं शाप असो, तो मला महेश्वराकडूनच मिळो.' याप्रमाणें इन्द्राला सांगितल्यावर महेश्वर माझ्यावर प्रसन्न कां बरें होत नाहीं, असा विचार करीत मी अगदीं दुःखाकुल झालों.

इतक्यांत काय झालें पहा. तो जो हंस किंवा कुंदपुष्प अथवा चन्द्र यांच्या वर्णाचा रुपेरी ऐरावत होता, त्यानें वृषभाचें रूप घेतलेलें मला दिसून आलें. त्याचें पुच्छ काळें, शरीर धिप्पाड व डोळे मधासारखे पिंगट होते. त्याचीं शिंगें वज्रासारखीं बळकट व तीक्ष्ण टोकांचीं व तप्त सुवर्णाप्रमाणें चकचकीत होतीं आणि त्यांनीं तो भूमी उकरीत होता. त्याचें शरीर सोनेरी माळांनीं शृंगारलेलें असून त्याचें तोंड, नाक, खुर, कान, कम्बर हीं सुंदर दिसत होतीं. त्याचे खांदे भक्कम होते व वशिंड त्यांच्यावर पुरेपूर उभारलेलें होतें. तें हिमालयाच्या शिखरासारखें किंबा पांढऱ्या ढगाच्या टोंकाप्रमाणें दिसत असून त्याच्यावर भगवान् महादेव उमेसह आरूढ झाला होता. त्यावेळची त्याची शोभा पौर्णिमेच्या चंद्रासारखी दिसली. त्याच्या कांतीचें तेज कडकडणाऱ्या विजेनें युक्त अशा मेघासारखें असून सहस्रसूर्य एकवटल्याप्रमाणें त्यानें सारें जग व्यापून टाकिलें होतें. युगान्तींच्या संवर्तकनामक प्रलयाग्नीप्रमाणें सारें जाळून टाकण्यास तो उद्युक्त झाला कीं काय असें वाटलें. सगळें विश्व दाही दिशांनीं त्याच्या तेजानें भरून गेल्यामुळें दुसरें भोंवतीं कांहीं दिसेना. अशा स्थितींत हा काय प्रकार आहे असा विचार करीत मीं कांहीं वेळ उद्विग्न होऊन राहिलों. मग थोड्या वेळानें सर्व शांत होऊन माझ्यापुढें भगवान् महेश्वरच उभा असलेला माझ्या दृष्टीस पडला. त्याचा कंठ निळा असून त्याला अठरा बाहु होते. त्याचें शरीर सर्व अलंकारांनीं भूषविलेलें

असून त्यानें शुक्लवस्त्र परिधान केलें होतें व पांढऱ्या फुलांच्या माळा घालून त्यानें अंगाला पांढरी उटी लाविली होती. त्याचा ध्वज श्वेत वर्णाचा असून यज्ञोपवीतहि तसेंच होतें. त्याच्याभोंवतीं त्याच्याचसारखे बलवान् असे त्याचे अनुचर गात, नाचत व वाद्यें वाजवीत होते. त्याच्या मस्तकावर भालचंद्र शोभत होता व त्याच्या तिन्ही नेत्रांच्या प्रभा तीन उगवलेल्या सूर्याप्रमाणें तळपत होत्या. त्याच्या श्वेतवर्णे शरीरावर सोनेरी फुलांच्या रत्नयुक्त माळा रुळत होत्या, व अत्यंत तेजस्वी अशीं अस्त्रें मूर्तिमंत त्याच्याजवळ मला दिसून आलीं. त्याचें पिनाक नांवाचें प्रसिद्ध धनुष्य इन्द्रधनुष्याप्रमाणें चित्रवर्णाचें होतें. त्याच्या अंगावरील सर्प सात फडांचा, स्थूल शरीराचा, तीक्ष्ण दांताचा व भयंकर विषारी असून त्याच्या मानेभोवतीं धनुष्याची दोरी गुंडाळली होती व मनुष्याच्या शरीरासारखें त्याचें शरीर दिसत होतें. त्याचा बाण सूर्य किंवा प्रलयकालीन अग्नि यांच्यासारखा तेजस्वी होता. त्याचें मोठें भयंकर दिव्य पाशुपत नांवाचें अस्त्र अवर्णनीय असून त्यांतून अग्नीच्या ज्वाळाच जणूं निघत होत्या. ब्रह्मास्त्र, नारायणास्त्र, इंद्रास्त्र, अग्न्यस्त्र किंवा वरुणास्त्र यांच्याहून तें विशिष्ट शक्तीचें असून सर्व शस्त्रांचा नाश करण्यास तें समर्थ होतें. त्याच्याच साह्यानें महादेवानें लीलेनें केवळ एक बाण सोडून त्रिपुराचें जाळून भस्म केलें. हे गोविंदा, महेश्वराच्या हातून तें सुटल्यावर एका क्षणाच्या आंत सर्व चराचर त्रिभुवन जाळून टाकील यांत कांहीं संशय नाहीं. ब्रह्मा, विष्णु किंवा इतर देव यांतील एकहि त्या पाशुपताला अवध्य असा नाहीं. तें अत्यंत गुह्य व अतुल असें आश्चर्यकारक उत्तम अस्त्र मीं त्या ठिकाणीं पाहिलें. तसेंच त्याचें शूल नांवाचें सर्व लोकांत प्रख्यात असलेलें शस्त्र सगळी पृथ्वी फोडून टाकण्यास किंवा महासागर कोरडा करण्यास समर्थ होतें. शूलपाणि शिवानें तें फेकलें असतां सारें जग नष्ट होऊन जाईल. त्याच्या योगानें पूर्वी मांधात्याचा पुत्र जो यौवनाश्व त्याचा वध झाला. तो बलवान् चक्रवर्ती महातेजस्वी, वीर्यशाली, व इन्द्रासारखा पराक्रमी होता. पण लवणासुराच्या हातीं तो शूल पडल्यावर त्याच्याकडून यौवनाश्वाचा वध झाला. तो तीक्ष्ण शूल पहातांच अंगावर कांटा उभा राहील. तो तिहेरी पात्यांचा तीक्ष्ण टोकांचा भयंकर शूल रागानें कपाळाला तीन आंठ्या घालून जणूं काय दटावीत माझ्या समोर असलेला मीं पाहिला. तो धूमरहित अग्नीसारखा, किंवा उगवणाऱ्या प्रलयकालीन सूर्यासारखा, व हातांत सर्प असल्यामुळें पाश घेतलेल्या यमासारखा होता. त्या शूलाच्या शेजारीं तीक्ष्ण धारेचा परशु

ोता, तो शिवानें परशुरामाला दिला व त्याच्यायोगानें क्षत्रियांचा संहार
ााला. त्याच्याच साह्यानें परशुरामानें युद्धांत कार्तवीर्याचा वध केला आणि
्कवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली. हे निष्पाप कृष्णा, त्याच्याजवळ दिव्य
स्त्रास्त्रें असंख्य होतीं, त्यांतील महत्त्वाचीं थोडींशीं मी तुला सांगितलीं. त्या
हादेवाच्या उजव्या बाजूला ब्रह्मदेव आपल्या मनोवेगानें चालणाऱ्या व हंस
ोडलेल्या दिव्य विमानांत बसला होता व डाव्या बाजूला शंखचक्रगदाधारी
ारायण गरुडावर आरूढ झाला होता. देवी पार्वतीच्या बाजूला स्कंद मयूरावर
सलेला दिसत असून त्याच्या हातांत शक्ति व घंटा होत्या आणि तो जणूं
सरा अग्निच वाटत होता. महादेवाच्या समोर आपला शूळ भूमीवर उभा
रून दुसरा शंकरच जणूं दिसणारा असा नंदी माझ्या दृष्टीस पडला. त्याला
टण्यासाठीं स्वायंभुवादि मनु, भृगुप्रभृति ऋषि, इंद्रप्रमुख देव, सर्व भूत-
ण आणि मातृदेवता तेथें आल्या. त्यांनीं सर्वांनीं महादेवाच्या भोवतीं उभें
हून त्याला नमस्कार केला व विविध स्तोत्रांनीं त्याची स्तुति केली. रथंतर-
ामाचें पठन करीत ब्रह्मदेवानें त्याची स्तुति केली व नारायणानें ज्येष्ठ सामानें
ली. शतरुद्रीयाचा जप करीत इन्द्रानें त्याचें स्तवन केलें. याप्रमाणें ब्रह्मा विष्णु
इंद्र हे तिन्ही देव तीन अग्नींप्रमाणें तेथें शोभत होते. त्यांच्या मध्यभागीं
गवान् शंकर विराजमान झाला होता. हे केशवा, त्यावेळीं शारदीय मेघांतून
ाहेर पडलेल्या परिघी (खळें) मधील सूर्याप्रमाणें तो दिसला व आकाशांत जणूं
हस्रावधि चंद्रसूर्य उगवलेले आहेत असें मला भासलें; तेव्हां मीं त्या जग-
ति महादेवाचा स्तव केला तो असाः—

( ४ ) उपमन्यु—' देवाधिदेवा महादेवा, इंद्ररूपधारी तुला नमस्कार असो;
ज्रहस्त व पिंगलवर्ण, कृष्णवस्त्र परिधान केलेला व काळ्या कुरळ्या केसांचा
ो पिनाक, शंख व शूल धारण करणारा जो तूं त्याला माझा नमस्कार असो. तूं
ुक्लवर्ण, रक्तवर्ण, तसाच पीतवर्णहि असून देव व मुनि यांचा स्वामी आहेस. तूं
र्धनारीनरशरीरात्मक व सर्व जगाचें अधिष्ठान आहेस; तूंच सांख्य, तूंच योग
तूंच अथर्वणहि आहेस. तुला माझा नमस्कार असो. तूं आमचा श्रेष्ठ आधार व
दयहि तूंच आहेस. देवांत ब्रह्मदेव तूं, रुद्रांतील शंकर तूं, व सर्व प्राणि-
ात्रांचा आत्मा तूं आहेस. सांख्य ज्याला पुरुष म्हणतात तो तूंच आहेस. चार
ाश्रमधाऱ्यांतील गृहस्थाश्रमी तूं असून, यक्षांमध्यें कुबेर, ऋतूमधील विष्णु,
र्वतांत मेरु व नक्षत्रांत चंद्र तूंच आहेस. ऋषींतील वसिष्ठ तूं, ग्रहामध्यें सूर्य

तूं, वनपशूंमध्यें सिंह तूं, ग्रामपशूंतील वृषभ तूं, पक्ष्यांत गरुड तूं व सर्पांमधील शेष तूं आहेस. वेदांतील सामवेद, यजुर्वेदांतील शतरुद्रिय, लोकांतील ब्रह्मलोक व पुरुषार्थांतील मोक्ष हीं तुझींच स्वरूपें होत. सागरांत क्षीरसागर तूं, पर्वतांत हिमालय तूं, चार वर्णांमध्यें ब्राह्मण तूं व ब्राह्मणांतहि यज्ञदीक्षा घेतलेला ब्राह्मण म्हणजे तूंच आहेस. सर्व लोकांचा आदि व संहर्ता तूंच असून या जगांत जें कांहीं विशिष्ट तेजानें युक्त आहे, तें तुज भगवंताचेंच स्वरूप होय असें माझें ठाम मत आहे. हे भक्तवत्सला योगेश्वरा देवा, मी तुझा दीन भक्त आहें; मजवर कृपा कर. मीं जे जे तुझे अपराध अजाणतां आजवर केले असतील, त्यांची तूं मला भक्त समजून क्षमा कर. तूं निराळें रूप घेतल्यामुळें मला मोह पडला आणि त्यामुळें मीं तुला अर्घ्य कीं पाय धुण्यास पाणी असें कांहीं दिलें नाहीं.'

या प्रमाणें मोठ्या भक्तीनें मीं महेशाची स्तुति करून त्याला अर्घ्य व पाद्य अर्पण केलें आणि हात जोडून त्याच्यापुढें उभा राहिलों. त्यावेळीं शीतल जलकणांनीं युक्त असा सुगंधी पुष्पांचा वर्षाव माझ्या मस्तकावर पडला. देव दिव्य दुंदुभि वाजवूं लागले व सुगंधयुक्त वायु वाहूं लागले. महादेव पार्वतीसह संतुष्ट झाला आणि मला आनंद देण्यासाठीं तेथें जमलेल्या देवांना म्हणाला, 'हे देवहो, या उपमन्यूची माझ्याविषयीं किती एकनिष्ठ भक्ति आहे ती पहा.' त्याचें भाषण ऐकून सर्व देव त्याला हात जोडून नमस्कार करीत म्हणाले, 'हे जगत्पते महादेवा, या ब्राह्मणश्रेष्ठाच्या सर्व इच्छा तुझ्या हातून पूर्ण होवोत. ब्रह्मदेवादि देवांनीं असें सांगितलें असतां भगवान् शंकर हंसत हंसत माझ्याशीं बोलूं लागला.

तो म्हणाला, 'वत्सा उपमन्यो, मीं तुजवर संतुष्ट झालों आहें. मजकडे पहा. तूं माझा दृढ भक्त आहेस. मी इंद्ररूप घेऊन केवळ तुझी परीक्षा पाहिली. या तुझ्या भक्तीनें मला अत्यंत संतोष झाला असून तुझें जें कांहीं इष्ट असेल तें सर्व मी तुला देतों.' महादेवाचें हें भाषण ऐकून माझ्या नेत्रांत आनंदाचे अश्रु येऊन हर्षानें माझे केस अंगांवर उभे राहिले. अगदीं भूमीपर्यंत खालीं वांकून गुडघे टेंकून मीं महादेवाला वारंवार नमस्कार केला आणि आनंदानें सद्गदित होऊन त्याला म्हटलें, 'हे महेश्वरा, आज माझ्या जन्माचें साफल्य झालें, कारण देव व असुर या सर्वांचा गुरु असा तूं प्रत्यक्ष मजपुढें येऊन उभा राहिलास. देवांनाहि ज्याचें दर्शन दुर्लभ तो तूं मला दिसलास, यापरतें माझें

ोर भाग्य काय असणार? माझ्याहून धन्य कोण आहे? ज्ञानस्वरूपी सनातन ाक्षर असें जें परब्रह्मरूपी तत्त्व त्याचें ध्यान ज्ञानी पुरुष करतात. तोच सर्वांचा ादि असा भगवान् होय. त्यानें आपल्या उजव्या कुशीपासून जगदुत्पत्तिकर्ता ह्मदेव निर्माण केला आणि डाव्या कुशीपासून त्या जगाच्या रक्षणासाठीं विष्णु त्पन्न केला. पुढें युगाचा अन्त होण्याचा प्रसंग आला, तेव्हां त्यानें रुद्राला उत्पन्न ले. तो रुद्र स्थावरजंगम जगाचा नाश करून कालस्वरूपी तेजस्वी अग्नी- माणें सर्व प्राण्यांना जणूं गिळीत असतो. तोच हा महादेव चराचर जग उत्पन्न रून कल्पाच्या शेवटीं त्याचा नाश करतो व त्याची स्मृति मात्र ठेवितो. सर्व ाण्यांचा अंतर्यामी असा तो सर्व व्यापून पण सर्व देवतांनाहि अदृश्य असा सतो. हे प्रभो, आतां तूं माझ्यावर संतुष्ट होऊन मला जर वर द्यावयास इच्छित सशील, तर, हे देवा, तुझ्याठायीं माझी भक्ति नित्य असावी असें कर. तुझ्या पेनें मला भूतभविष्यवर्तमान असें सर्व ज्ञान असावें व मला आपल्या बांधवां- ह अनंत काळपर्यंत दूधभात खावयास मिळावा. तसाच माझ्या आश्रमासंन्निध झा नित्यवास असावा. हें माझें बोलणें ऐकून चराचराचा गुरु असा तो भगवान् हेश्वर मला म्हणाला, 'हे उपमन्यो, तूं दुःखमुक्त आणि अजर व अमर हो. तूं ोर्तिमान् व तेजानें युक्त होऊन तुला दिव्यज्ञानाची प्राप्ति होईल. माझ्या सादानें तूं ऋषींचाहि आधार होशील व आपल्या शीलानें आणि गुणांनीं र्वांना प्रिय होशील. तुझें यौवन चिरकाल टिकेल व तुझें तेज अग्नीप्रमाणें हील. सगळा सागर तुजसाठीं दुधाचा होईल. तूं जेथें जेथें जाशील तेथें तेथें झ्या इच्छेप्रमाणें दुधाचा सागर तुझ्याजवळच राहील. तूं आतां नित्य अमृता- ह दूधभातच खाऊन रहा. याप्रमाणें एक कल्पपर्यंत बांधवांसह राहिल्यावर तूं ावटीं मजजवळच येशील. तुझे बांधव व कुळ आणि गोत्र हीं अक्षय होतील ाणि माझ्याठायीं तुझी भक्तीहि शाश्वत जडेल. हे ब्राह्मणा, तुझ्या आश्रमाशींच ीं नित्य वास करीन, तुला आतां काळजी करण्याचें कारण नाहीं. तूं माझें व्हां पुनः स्मरण करशील तेव्हां मीं तुला दर्शन देईन.' याप्रमाणें कोटिसूर्यांच्या भेनें तळपणारा तो भगवान् महेश मला वर देऊन तेथेंच अन्तर्धान पावला.

हे कृष्णा, याप्रमाणें समाधिस्थितींत त्या देवदेव शंकराचें मला दर्शन घडलें ाणि त्यानें मला जें जें सांगितलें तें सारें मला प्राप्तहि झालें. त्याप्रमाणें तूं प्रत्यक्ष हा. हे सिद्ध, हे ऋषि, हे विद्याधर गंधर्व, या अप्सरा, तसेच हे वृक्ष, लता, ाळ्या; यांवर फुलें व फळें कशीं आहेत पहा व त्यांचा सुगंध कसा आहे बघ.

हें सर्व त्या महात्म्या महादेवाच्या प्रसादाचें फळ होय.' उपमन्यूचें शंकराच्या प्रत्यक्षदर्शनासंबंधीं भाषण ऐकून श्रीकृष्णाला आश्चर्य वाटलें व तो म्हणाला, 'हे विप्रश्रेष्ठा, तूं धन्य आहेस. तुझ्याहून पुण्यवान् कोण आहे ? तुझ्या आश्रमांत तुला त्या देवाधिदेवाचें सान्निध्य घडत आहे. हे मुनिश्रेष्ठा, तुझ्याप्रमाणेंच तो शंकर मला दर्शन देऊन मजवर कृपा करील काय?' उपमन्यूनें उत्तर केलें, 'हे पुंडरीकाक्षा, मला घडलें त्याप्रमाणें तुलाहि महादेवाचें दर्शन लवकरच निःसंशय घडेल. मला दिव्य चक्षूंनीं स्पष्ट दिसतें आहे कीं, आजपासून सहाव्या महिन्यांत त्या महेशाचें दर्शन तुला होईल व त्यापासून आठ तसेच देवी पार्वतीपासून आठ असे तुला सोळा वरहि मिळतील. यदुश्रेष्ठा, तुला मी हें अगदीं निश्चित सांगत आहें, कारण त्या भगवंताच्या प्रसादामुळें मला भूत, भविष्य आणि वर्तमान हें स्पष्टपणें कळून येतें. सहस्रावधि लोकांवर त्यानें कृपा केली आहे, तर, हे माधवा, तुझ्यावर तो कां बरें कृपा करणार नाहीं? ब्राह्मणाविषयीं आदरशील, दयाळु आणि श्रद्धावान् अशा तुझ्या समागमाचा लाभ देवांना स्तुत्यच वाटेल. तरीपण तुला मीं कांहीं जप सांगतों, तेणें करून तुला शंकराचें दर्शन निश्चितपणें घडेल.'

(५) श्रीकृष्ण युधिष्ठिराला सांगतो, उपमन्यूनें मला असें सांगितलें असतां मीं त्याला म्हटलें, 'हे महामुने, दैत्यांचें मर्दन करणाऱ्या त्या महादेवाचें दर्शन मला तुझ्या कृपेनें होईल.' महेश्वराविषयींच्या कथा याप्रमाणें उपमन्यु मला सांगत असतां आठ दिवस कसे एका घटकेसारखे गेले. मग आठव्या दिवशीं मला त्या ब्राह्मणानें यथाविधि दीक्षा दिली. माझें मुंडन करून व घृताचें अंजन करून मला त्यानें दंड, मेखला, वस्त्रें, दर्भ इत्यादि दिलीं. मग मीं व्रतस्थ होऊन एक महिना फळांवर राहिलों व दुसरा महिना पाण्यावर राहिलों. पुढील तीन महिने एका पायावर उभा राहून व एक हात उभा करून मीं निरलसपणें वातभक्षण करून राहिलों. सहावा महिना चालू झाला तेव्हां, हे युधिष्ठिरा, आकाशांत सहस्रसूर्यांचें तेज मला दिसूं लागलें. त्या तेजाच्यामध्यें इन्द्रधनुष्या-प्रमाणें चित्रित, विजेच्या चमकीनीं युक्त, निळया पाषाणाप्रमाणें शोभायमान आणि बगळयांच्या रांगांनीं भूषविलेला असा भाग होता, व त्यांत भगवान् महादेव देवी पार्वतीसह देदीप्यमान असा विराजमान झालेला होता. मेघावर आरूढ झालेला सूर्य जसा चंद्रासह दिसावा तसा तो भगवान् महेश्वर मला दिसला. त्यावेळीं माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले, व आश्चर्यानें मी

डोळे ताणून पाहूं लागलों असतां, देवांचा आधार असा दुःखनाशक शंकर मला दिसला. मस्तकावर किरीट, एका हातांत गदा, दुसऱ्यांत शूळ, अंगावर व्याघ्रांबर, जटा वाढविलेल्या, इतर हातांतून पिनाक, वज्र, दंड इत्यादि शस्त्रें, दंडावर सुंदर बाहुभूषणें, गळ्यांत सर्पाचें जानवें, वक्षस्थलावरून गुढग्यांपर्यंत रुळणारी चित्रवर्णाची दिव्यमाळ, असें त्याचें स्वरूप होतें. वर्षाकाळाच्या अंतीं संध्याकाळीं खळ्याच्या मध्यभागीं जसा चंद्र किंवा शरदृतूंत तशाच प्रकारचा पण पहाण्यास कठीण असा सूर्य दिसावा, तसा तो भोवतीं प्रमथगणांनीं वेष्टिल्यामुळें दिसत होता. उपमन्यूनें पाहिलें तसेंच त्याचें स्वरूप होतें. सर्व देव, सर्व ऋषि, सात मनु, वेद, यज्ञ, अग्नि, यज्ञद्रव्यें, नद्या, समुद्र, पर्वत, दिशा इत्यादि त्याला नमस्कार करीत असून गंधर्व व अप्सरा गायनवादन करीत त्याचें स्तवन करीत होतीं. सर्व चराचर भूतें, मन व कर्में यांनीं त्याला नमन करीत होतीं. असा तो शर्व माझ्यापुढें उभा राहिलेला पाहून सारें विश्व मजकडे पाहूं लागलें, पण मला मात्र त्या महादेवाकडे पहाण्याची शक्ति नव्हती. तेव्हां तो महेशच मला म्हणाला, 'कृष्णा, माझ्याकडे पहा आणि मजपाशीं बोल. तूं माझी शतशः किंबहुना सहस्रशः आराधना केलीस; तुझ्याप्रमाणें मला तिन्ही लोकांत दुसरें कोणी प्रिय नाहीं.' मग मीं त्याला शिरसाप्रणाम केला असतां उमादेवी संतुष्ट झाली आणि ब्रह्मादिदेवहि ज्याची स्तुति करतात त्या शंकराची मीं स्तुति केली.'

कृष्ण म्हणाला, 'हे सर्वांच्या आदिकारणा भगवंता, तुला मीं नमस्कार करितों. ऋषि तुला वेदांचा अधिष्ठाता म्हणतात. सत्वादि गुण, तप, सत्य हीं सारीं तूंच होस. ब्रह्मादिदेव तुझींच रूपें असून स्थावरजंगम भूतें तुझ्याचपासून उत्पन्न होतात. तूंच हें सारें त्रैलोक्य उत्पन्न केलेंस. इंद्रियें, मन, सप्तवायु, सप्तअग्नि, देवसंस्था व देवता यांच्या सर्वांच्या पलीकडचा तूं आहेस असें ऋषि म्हणतात. वेद, यज्ञ, सोमरस, हविर्द्रव्य, व्रतें, नियम, श्री, कीर्ति, तेज, सिद्धि, कामक्रोधादि विकार, आधिव्याधि हीं सर्व तुझींच रूपें असून, तुझ्याकडे पोंचविणारीं आहेत. तूंच सर्वांच्या जीविताचा आधार आहेस. आत्मा, बुद्धि, ब्रह्मदेवादि देव, संवेदना, धृति, स्मृति, हे सर्व तुझ्या नांवाचे पर्याय शब्द असून, त्या सर्वांवरून परमात्मा अशा तुझ्याच स्वरूपाचा बोध होतो. वेदाच्या साह्यानें तुझें ज्ञान करून घेऊन ऋषि आपल्या मोहाचें निरसन करतात. तूं सर्वांचें हृदय आहेस. तुझेच हातपाय व तुझेच डोळे, मस्तकें व मुखें सर्वत्र पसरलीं असून, तूंच सर्व व्यापून राहिला आहेस. निमिषादि कालभाग सूर्याच्या

योगानें तूंच केलें आहेस. सर्वांच्या हृदयांत राहिलेला तेजोरूपी पुरुष तूंच असून, अणिमा, लघिमा, इत्यादि योगसिद्धि तूंच आहेस. बुद्ध्यादि सर्व गोष्टी व सतत ध्यान करणारे जितेंद्रिय योगी तुझ्याठायींच आश्रय घेतात. हृदयांत रहाणाऱ्या अशा तुज पुराण पुरुष भगवंताला जो जाणतो तो बुद्धिमान् पुरुष बुद्धीच्या पलीकडे जाऊन रहातो. पांच तन्मात्रा, महत् व अहंकार हीं सात तत्त्वें व सर्वज्ञत्व, तृप्ति, स्वातंत्र्य विभुत्वादि सहा अंगें जाणून चित्तवृत्तिनिरोधद्वारा सुज्ञ पुरुष तुझ्यांतच प्रवेश करतो.' युधिष्ठिरा, दुःखनाशक अशा महादेवाचें मीं याप्रमाणें स्तवन केलें असतां सगळया चराचर जगानें सिंहनाद केला; सर्व ब्राह्मण, देव, असुर, नाग, पिशाच, पितर, पक्षी, राक्षस, भूतगण व ऋषि त्याला नमस्कार करूं लागले; माझ्या मस्तकावर पुष्पराशींचा वर्षाव झाला आणि आनंददायक वायु वाहूं लागला. मग उमादेवी व इंद्र यांजकडे पहात भगवान् शंकर मला म्हणाला, 'कृष्णा, तुझी भक्ति माझ्या ठायीं किती आहे हें यांनीं पाहिलें आहेच. माझें तुझ्यावर फारच प्रेम आहे. तरी तूं आतां तुझें हित काय असेल तें करून घे. तुला जे कांहीं आठ वर पाहिजे असतील ते मागून घे. ते कितीहि कठीण असले तरी, हे यादवश्रेष्ठा, तूं जर इच्छित असशील तर मीं ते देणार.' १३. १. १४.

---

## अध्याय १५ वा.

[ १ कृष्ण शंकरापाशीं आठ वर मागतो व शंकर देतो. २ उमा कृष्णाला वर मागावयास सांगते, तो मागतो व ती देते. ३ शिवाचें महात्म्य ]

( १ ) कृष्ण म्हणतो, 'अर्जुना, मग भूमीवर मस्तक ठेवून व त्या शंकर-स्वरूपी तेजापुढें नम्र होऊन मोठ्या आनंदानें भगवान् महेशाला मीं म्हटलें, "धर्माविषयीं दृढबुद्धि, युद्धांत शत्रूचा नाश करण्याचें सामर्थ्य, सर्वश्रेष्ठ कीर्ति, अतुल बल, योगाविषयीं आवड, तुझी नित्य संगत, आणि सहस्रपुत्रांची प्राप्ति हे आठ वर मीं मागतों.' माझ्या बोलण्यावर 'ठीक आहे, तसें असो' असें शंकरानें उत्तर दिलें. मग त्या महेशाची पत्नी तपोनिधि जगन्माता उमा मला म्हणाली, 'हे निष्पापा, तुला भगवंतानें सांब नांवाचा पुत्र दिला आहे. आतां मजपाशींहि तुला इष्ट असतील ते आठ वर तूं माग, ते मीं तुला देतें.' तेव्हां मीं तिला मस्तक लववून नमस्कार केला आणि म्हटलें, 'ब्राह्मणांविषयीं प्रेम,

पित्याची कृपा, शंभर पुत्र, उत्तम प्रकारचे भोग, कुलाविषयीं प्रीति, मातेची प्रसन्नता, शांति आणि दक्षता हे वर मीं तुजपाशीं मागतों.' हें ऐकून उमा म्हणाली, 'तूं म्हणतोस तसें होईल. माझें वचन कधींहि असत्य होणार नाहीं. सोळा हजार स्त्रिया, त्यांच्याविषयीं अक्षय प्रेम, बांधवांची तुझ्यावर मोठी प्रीति आणि सुंदर शरीर हीं मीं तुला देतें. तुझ्या घरीं प्रत्यहीं सातशें अतिथींना भोजन मिळेल.'

कृष्ण म्हणतो, युधिष्ठिरा, याप्रमाणें महादेव आणि देवी पार्वती मला वर देऊन तेथेंच आपल्या गणांसह अन्तर्धान पावलीं. हा सारा वृत्तांत पूर्वीं त्या तेजस्वी ब्राह्मणश्रेष्ठ उपमन्यूला जेव्हां मीं सांगितला, तेव्हां तो महादेवाला नमस्कार करून मला म्हणाला, 'शंकरासारखा देव नाहीं व त्याच्यासारखा आधारहि नाहीं. तसाच शंकराप्रमाणें दाता व रणशूर योद्धाहि कोणी नाहीं.' १३. १. १५

---

## अध्याय १६ वा

[ १ उपमन्युकृत तंडीच्या तपाचें वर्णन. ]

( १ ) उपमन्यु म्हणाला, 'श्रीकृष्णा, पूर्वीं तंडी नांवाचा प्रसिद्ध ऋषि होऊन गेला. त्यानें दहा सहस्रवर्षेंपर्यंत एकनिष्ठ भक्तीनें महादेवाची आराधना केली व तिचें फळ म्हणून महादेवाचें त्याला दर्शन होऊन त्याचें त्यानें स्तवन केलें. प्रथम त्यानें तपोबलानें त्या अव्यय परमात्म्याचें ध्यान करून विस्मयपूर्वक त्याला म्हटलें, 'हे आद्यन्तविरहिता महेशा, मीं तुला शरण आलों आहें. सांख्य तुझ्या नांवाचें पठण करतात व योगी तुझें ध्यान करतात. प्रधान व पुरुषहि तूंच असून, विश्वाच्या उत्पत्तीचें व विनाशाचें कारण तूंच आहेस. तुझ्याहून श्रेष्ठ कोणी नाहीं.' अशी स्तुति करून तंडीनें त्याचें दर्शन व्हावें म्हणून पुष्कळ वर्षें उग्र तपश्चर्या केली व महादेवाला संतुष्ट केलें. त्यावेळीं शंकरानें त्याला दर्शन दिलें असतां तंडीनें त्याचा स्तव केला तो असा: तो म्हणाला, 'हे भगवन्, सगळ्या पवित्र वस्तूंत तूं पवित्र असून गति देण्यांत तूं श्रेष्ठ आहेस. विश्वावसु, हिरण्याक्ष व इन्द्र हे तुला नमन करतात. प्रभो, तूं कल्याणप्रद आहेस, तुला नमस्कार करतों. जन्ममृत्यूंची भीति बाळगणाऱ्या यतींना मोक्ष देणारा व सुखाचा आधार जो तूं त्याला नमस्कार असो. ब्रह्मदेव, इन्द्र इत्यादि देव, ऋषि

यांनांहि तुझें ज्ञान होत नाहीं, मग आम्हांला तें कसें होणार? तुझ्यापासून सर्वांची उत्पत्ति असून काल, पुरुष, ब्रह्म हीं तुझींच नांवें होत. या तिघांना पुराणवेत्त्या देवांनीं व ऋषींनीं तुझीं रूपें म्हटलें आहे. अधिपौरुष, अध्यात्म, अधिभूत, अधिदैवत, अधिलोक, अधिविज्ञान व अधियज्ञ हीं तूंच आहेस. दैवतांनाहि ज्याचें ज्ञान होणें कठिण अशा देहान्तर्वासी तुझें ज्ञान करून घेऊन ज्ञानी पुरुष मुक्त होतात व अव्यय अशा ब्रह्मस्वरूपास जाऊन पोंचतात. तुझी इच्छा ज्यांना होत नाहीं, ते वारंवार जन्ममृत्यु पावतात, पण स्वर्ग व मोक्ष यांचें द्वार तूं त्यांनांहि मोकळें करून देतोस. स्वर्गमोक्ष, कामक्रोध, सत्त्वादि गुण, अधोगति-ऊर्ध्वगति, ब्रह्मादि देव, पृथिव्यादि भूतें, बुद्धि, कर्म, सत्यासत्य, हीं सर्व तूंच आहेस. तुझ्याशिवाय दुसऱ्याचें अस्तित्वच नाहीं. इंद्रियें, त्यांचे विषय, प्रकृतीच्या पलीकडे जें कांहीं आहे तें, तसेंच चिंत्य किंवा अचिन्त्य असें सारें तूंच आहेस. परब्रह्म किंवा श्रेष्ठ स्थान म्हणतात तें किंवा ज्ञानी पुरुष व योगी जेथें जातात तें स्थान तूंच आहेस. ज्ञानानें बुद्धि पवित्र करून सज्जन ज्यापाशीं जाऊं इच्छितात, त्या तुझी प्राप्ति आम्हांला झाल्यामुळें आम्हीं आज कृतार्थ झालों. ज्ञानी ज्याला शाश्वत देव म्हणतात, त्याला आम्ही आजवर जाणिलें नाहीं हा आमचा केवढा मूर्खपणा! असो. पण आतां अनेकजन्मान्तीं तुझी भक्ति आम्हाला प्रत्यक्ष मिळाली. ज्याचें ज्ञान झालें असतां अमृतत्वाची प्राप्ति होते, देवादिकांनाहि ज्याचें सनातन स्वरूप गुह्य आहे, तो भक्तांवर कृपा करणारा हा देव सर्वांचा अंतर्यामी, सर्वव्यापी व सर्वज्ञ आहे. प्राणिमात्राचा तोच आधार असून पुनर्जन्म ज्यांना नकोसा झाला आहे, त्यांचें इष्टस्थान असा तो आहे. सर्व जंतूंचें जनन मरण हाच करतो. आपल्या आठ विभूतींनीं तो पृथिव्यादि सर्व लोक उत्पन्न करून त्यांचें धारण व पोषण करतो. तो सनातन असून सर्वांचे उत्पत्तिस्थितिलय त्यापासूनच होतात. सत्याची इच्छा करणाऱ्यांचा सत्यलोक, मुक्तांचें मोक्षस्थान व आत्मज्ञान्यांचें कैवल्य हाच होय. देव असुर मनुष्यें यांना समजूं नये म्हणून त्या प्रभूला ब्रह्मादि सिद्ध पुरुष आपल्या हृदयरूप गुहेंत गुप्त ठेवितात. हृदयांत गुप्तपणें वास करणाऱ्या त्या प्रभूनें मोहून टाकलेले देवदानव त्याला यथार्थपणें जाणत नाहींत. पण जे भक्तिभावानें त्याला शरण जातात, त्यांना तो आपणच दर्शन देतो. त्याच्या ज्ञानामुळें जन्ममृत्यु दूर होतात व त्याला जाणिलें असतां आणखी कांहीं जाणावयाचें रहात नाहीं. त्याच्या लाभापुढें इतर लाभ सुज्ञाला फोल वाटतात,

गुणतत्त्व जाणणारे सांख्यज्ञानी त्याला सूक्ष्मपणें जाणून बंधमुक्त होतात, प्राणायामाचा अभ्यास करणारे त्याच्याशीं योग घडावा म्हणून जप करीत धडपडतात व ओंकाररूपी रथावर आरूढ होऊन या महेश्वरस्वरूपींच ते लीन होतात. देवयानमार्गाचें हा सूर्यरूपी द्वार असून, पितृयाणाचें चंद्ररूपद्वार हाच होय. काष्ठा, दिशा, संवत्सर, युग, दक्षिणायन, उत्तरायण हाच होय. पूर्वी प्रजापति ब्रह्मयानें प्रजोत्पत्तीसाठीं या नीललोहिताचीच अनेक स्तोत्रांनीं आराधना केली. यज्ञांत ऋग्वेदी ऋग्मंत्रांनीं याचीच प्रार्थना करतात, अध्वर्यु यजुर्मंत्रांनीं यालाच आहुति देतात, शुद्धबुद्धीचे सामवेदी साममंत्रांनीं याचेंच गुणगायन करतात व अथर्ववेदी याची ऋत, सत्य, परब्रह्म या नांवांनीं स्तुति करितात. यज्ञाचें मूळ हाच असून यज्ञपतीहि हाच आहे. रात्र ही त्याचे कर्ण, दिवस त्याचे नेत्र, महिने त्याचे भुज, पक्ष त्याचें मस्तक, ऋतु हें त्याचें वीर्य, तप हें धैर्य, संवत्सर हे त्याचें गुह्येंद्रिय, मांड्या व पाय होत. यमादि देव, चंद्रसूर्यादि ग्रह, ध्रुवादि नक्षत्रें, साती भुवनें, प्रकृति, महत्तत्त्व व त्यांचे सर्व विकार, ब्रह्मापासून स्तंबापर्यंत सारीं भूतें, आठ प्रकारची प्रकृति व सारा प्रपंच म्हणजे या महेशाचा एक भाग आहे. उच्चतम शाश्वत आनंद, विरक्ताचें उद्दिष्ट स्थान, तसेंच श्रेष्ठ असें साधुत्व आणि दुःखापासून सर्वथैव मुक्त असें जें सनातन ब्रह्म तेंहि हाच महेश होय. शास्त्रज्ञ व वेदज्ञ यांच्या ध्यानाचा विषय हाच असून, सर्वांची सीमा, अंतिम सिद्धि व शेवटचें उद्दिष्ट याच्याच ठायीं आहे. तो परमशांतिस्वरूपी व सुखस्वरूपी असल्यामुळें त्याची प्राप्ति झाल्यानें योगी स्वतःला कृतकृत्य मानितात. हे महादेवा, मनाचा संतोष, कर्णाचा संतोष, योगी लोकांचा आत्मसाक्षात्कार, व ज्ञान्याचें साध्य तूंच असून फलेच्छेनें विपुलदक्षिणापूर्वक यज्ञ करणाऱ्यांची इच्छाहि तुझ्या प्राप्तीवांचून दुसरी कांहीं नसते. यमनियम, जपजाप्य, देहदंड इत्यादि साधनांनीं तप करण्याचें ध्येय तूंच असून, कर्मसंन्यास करणारे ब्रह्मलोकीं तुझी प्राप्ति व्हावी म्हणूनच तो करतात. मोक्षप्राप्तीसाठीं वैराग्य धारण करण्याचें लयस्थान तूंच असून ज्ञानविज्ञानानें युक्त झालेल्या पुरुषाची अनिर्वचनीय, निष्कलंक अशी स्थिति तूंच आहेस. वेदशास्त्रपुराणें इत्यादिकांत ज्या पांच गति सांगितल्या आहेत, त्या तरी तुझ्या प्रसादानेंच मिळतात, अन्यथा नाहींत.' याप्रमाणें तपोधन तंडीनें महेशाला स्तोत्रपठनानें संतुष्ट केलें व पूर्वी ब्रह्मदेवानें जें गाइलें होतें तें श्रेष्ठ स्तोत्रहि गाइलें. त्याच्या स्तवानें संतुष्ट झालेला भगवान् महादेव उमेसह त्याला म्हणाला, 'हे तंडे, तूं जन्ममरणापासून मुक्त होऊन दुःखविरहित,

यशस्वी, तेजस्वी, व दिव्य ज्ञानानें युक्त होशील. ऋषींना माननीय असा सूत्र-कर्ता पुत्रहि तुला माझ्याकृपेनें होईल. आणखी तुझी इच्छा काय आहे ती सांग, म्हणजे ती मीं पूर्ण करीन.' महादेवाचें भाषण ऐकून तंडी हात जोडून म्हणाला, 'हे महेशा, तुझ्या ठायीं माझी भक्ति दृढ असावी.'

उपमन्यु श्रीकृष्णाला म्हणतो, 'याप्रमाणें देव व ऋषि यांनाहि वन्द्य असा तो भगवान् तंडीला वर देऊन देव स्तवन करीत असतां अंतर्धान पावला. श्रीकृष्णा, तो आपल्या अनुचरांसह अंतर्धान पावल्यावर तंडिऋषि आश्रमास आला आणि त्यानें हें सारें वृत्त मला सांगितलें. त्यानें जीं महादेवाचीं प्रसिद्ध नांवें मला सांगितलीं, तीं आतां ऐक. त्यांनीं तुला सिद्धि प्राप्त होईल. पूर्वीं दहा सहस्र शिवनामें ब्रह्मदेवानें देवांना सांगितलीं, त्यांतील एक सहस्र शास्त्रांत गुह्य म्हणून म्हटलीं आहेत. देवकृपेनें त्यानें तीं मला सांगितलीं, तीं मी आतां तुला सांगतों. १३.१६.

## अध्याय १७ वा.

[ १ उपमन्यु शिवसहस्रनामाचें माहात्म्य सांगतो. २ शिवसहस्रनाम. ३ सहस्र-नामाची स्तुति व पठनफल. ]

( १ ) श्रीकृष्ण म्हणतो, 'युधिष्ठिरा, मग उपमन्यूनें मन स्थिर करून शिवाचीं सहस्रनामें हात जोडून मला सांगितलीं. तो म्हणाला, 'वेद व वेदांगें यांच्या आधारानें ब्रह्मदेव व ऋषि यांनीं, तशींच आपल्या सर्व इच्छा पुरविण्याच्या इच्छेनें अनेक साधकांनीं, सिद्धांनीं, व तत्वदर्शी मुनींनीं सांगितलेलीं व सर्व जगांत प्रसिद्ध झालेलीं तीं शिवाचीं सहस्र नामें, हे श्रीकृष्णा, मीं तुला सांगतों, तीं तूं लक्ष देऊन ऐक. तूं परमेशाचा भक्त होऊन त्याची कास धर, म्हणजे तीं मीं तुला ऐकवितों. शिवनामांचा विस्तार फार मोठा असल्यामुळें शेकडों वर्षें तीं सतत कोणी सांगत बसलें तरी संपणार नाहींत. माधवा, देवांनाहि ज्याचा थांगपत्ता लागत नाहीं, त्या महेशाचे गुण समग्रपणें कोण वर्णूं शकेल ? तथापि त्याच्या प्रसादानें मीं आपल्या शक्तीप्रमाणें तीं संक्षेपानें सांगतों. भगवंताच्या अनुज्ञेशिवाय त्याची स्तुति करणेंहि शक्य नाहीं. त्यानें तशी मला अनुज्ञा दिली व मीं त्याचें तेव्हां स्तवन केलें. दहीं घुसळून लोणी काढावें, किंवा पर्वत धुंडून सोनें काढावें अथवा अनेक पुष्पांतून साररूप मध काढावा, तसें हें शिवसहस्र-

नाम म्हणजे चारी वेदाचें मंथन करून काढलेलें सार होय. त्याच्यायोगानें स
पापांचा नाश होतो. म्हणून प्रयत्नपूर्वक त्याचें नित्य पठन करावें. तें मंगलकार
पुष्टिकारक, राक्षसपीडानाशक व पवित्र करणारें आहे. तें श्रद्धाळू भक्ताला
सांगावें, नास्तिकाला सांगूं नये. महेशाचा जो मत्सर करतो, तो आपले पूर्व
व पुत्र यांसह नरकास जातो. ध्यानाला व जपाला, हें अत्यंत योग्य असून अं
कालीं त्याचें ज्ञान झालें असतां उत्तम गति प्राप्त होते. पूर्वी ब्रह्मदेवानेंच
स्तोत्राला सर्वांत आद्यस्थान दिलें असून, तेव्हांपासून स्तवराज म्हणून तें प्रसि
आहे. हा स्तवराज मूळ ब्रह्मलोकांहून स्वर्गलोकीं आला. तेथें तंडीला
मिळाल्यामुळें त्याच्या नांवावर तो प्रसिद्ध झाला व तंडीनें तो पुढें स्वर्गाहू
भूलोकीं आणिला. सर्व मंगलांत मंगल व पापनाशक असें हें शिवसहस्रनामस्तो
असून तेजांतील तेज व तपांतील तप आहे. शांतांनाहि तें अधिक शांत करत
तेजस्वी असतील त्यांचें तेज वाढवितें, व बुद्धिमानांच्या बुद्धीचें वर्धन करत
देवांचाहि देव किंवा ऋषींतील श्रेष्ठ ऋषि अशी त्याची योग्यता असून यज्ञां
श्रेष्ठ यज्ञ, पवित्रवस्तूंत श्रेष्ठ वस्तु, व प्रभावशाली पुरुषांची प्रभा म्हणजे हें स्तो
होय. ज्यापासून सर्व लोकांची पुनः पुनः उत्पत्ति होते त्या सर्वांतर्यामी अनं
तेजाच्या शंकराचें अष्टोत्तर सहस्रनामस्तोत्र आतां माझ्याकडून ऐक. हे श्रीकृष्ण
तें ऐकिल्यानें तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील.'

( २ ) असें म्हणून तंडीनें स्थिर, स्थाणु, प्रभु, भीम, प्रवर, वरद, वर इत्यादि
पासून श्रीमान्, श्रीवर्धन, जगत् येथपर्यंतचीं एकसहस्र आठ शिवनामें सांगि
तलीं.'

( ३ ) उपमन्यु म्हणतो, याप्रमाणें भगवंताचीं मुख्य मुख्य नांवें घेऊन त्याच
स्तुति तंडीनें केली व तो म्हणाला "स्तुति करण्यास, पूजा करण्यास सर्वथै
पात्र अशा जगत्पति परमेशाला ब्रह्मादि देव व ऋषीहि वास्तविकपणें जाण
नाहींत. तथापि मी त्याच्याच अनुज्ञेनें त्या यज्ञपति प्रभूचें भक्तीनें स्तवन केले
या नावांनीं शिवाची पवित्रांतःकरणानें स्तुति करणाऱ्या भक्ताला स्वतः होऊन
आत्मज्ञानाची प्राप्ति होते व तो परब्रह्मास जाऊन पोंचतो. म्हणूनच देव
ऋषि या सहस्रनामानें त्याचें स्तवन करतात. तसें स्तवन केलें असतां मो
देणारा तो भगवान् संतुष्ट होतो. मनुष्यांत जे कोणी श्रद्धाळु व आस्ति
असतात, ते जन्मोजन्मीं कायावाचामनेंकरून भक्तिपूर्वक जागेपणीं, झोपेंत
जातां, येतां, त्याचें स्तवन ऐकतात व लोकांकडून ऐकवितात व त्यांत

संतोष मानून आनंदाचा अनुभव घेतात. शेकडों कोटी जन्म संसारांत घेतां घेतां प्राणी पापमुक्त झाला म्हणजे शिवाच्या ठिकाणीं त्याची भक्ति जडते. तशी भक्ति उत्पन्न होणें भाग्याचें होय. शंकराच्या ठिकाणीं एकनिष्ठ भक्ति जडणें हें मोठें दुर्लभ असून केवळ त्याच्याच कृपेनें तें शक्य होतें. जे सर्वभावेंकरून त्या महेश्वराला शरण जातात, त्यांना तो भक्तवत्सल महेश्वर संसारापासून मुक्त करतो. इतर देवांना असा मोक्ष मनुष्यांना देण्याचें सामर्थ्य नाहीं. ते मनुष्यांच्या तपाचा व बलाचा नाश मात्र करतील." उपमन्यु म्हणतो, 'हे कृष्णा, याप्रमाणें इन्द्रासारख्या तेजस्वी अशा त्या तंडीनें शुद्ध बुद्धीनें शंकराचा स्तव केला. हा शिवस्तव स्वतः ब्रह्मदेवानेंहि शंकरासमोर गाइला. हें स्तवन पापनाशक असून त्यापासून स्वर्गाचीच काय पण मोक्षाचीहि प्राप्ति होते. त्यांचें पठण करणाराला ज्ञानी किंवा योगी यांचें स्थान मिळतें. एक वर्ष शिवाजवळ त्याचा जप केल्यास इष्ट कामना सफल होतात. ब्रह्मदेवाच्या अंतःकरणांत असलेला हा रहस्यमय शिवस्तव त्यानें इन्द्राला सांगितला व इन्द्रानें नंतर मृत्यूला सांगितला. मृत्यूपासून तो रुद्राला मिळाला व रुद्रापासून पुढें तो तंडीकडे आला. ब्रह्मलोकीं मोठ्या प्रयासानें मिळविलेला हा स्तव तंडीनें शुक्राला दिला, शुक्रानें गौतमाला दिला, आणि हे श्रीकृष्णा, गौतमानें तो वैवस्वत मनूला सांगितला. मनूनें तो नारायणास सांगितल्यावर भगवान् नारायणानें यमाला सांगितला. यमानें तो नाचिकेताला दिला व नाचिकेतानें मार्कंडेय ऋषीला दिला. हे श्रीकृष्णा, मार्कंडेयापासून मला तो मिळाला आणि आतां मीं तो तुला सांगितला. वेद-संमत असा हा स्तव आरोग्यदायक, आयुष्यवर्धक व सर्वप्रद असून तो पठण करणाराला दानव, यक्ष, राक्षस, गुह्यक, सर्प इत्यादिकांची पीडा होत नाहीं."
कृष्ण म्हणतो, युधिष्ठिरा, इंद्रियदमन करून ब्रह्मचर्ययुक्त पवित्र अंतःकरणानें जो त्याचा जप करील, त्याचा योग सिद्धीला जाऊन त्याला अश्वमेघाचें फल मिळेल.' १३.१.१७.

## अध्याय १८ वा.

[ १ व्यासादिकांनीं केलेलें शिवमाहात्म्यवर्णन. २ शिवसहस्रनामपठनाचें फल वैशंपायन सांगतो. ]

( १ ) वैशंपायन म्हणतो, मग व्यासानें युधिष्ठिराला त्या शिवनामसहस्राचा जप करावयास सांगितलें आणि तो म्हणाला, 'महेश्वर तुजवर संतुष्ट होईल. युधिष्ठिरा, पूर्वीं पुत्रप्राप्तीसाठीं मीं मेरूपर्वतावर तप करीत असतां या सहस्र-नामाचें पठन केलें व तेणेंकरून माझ्या इच्छा पूर्ण झाल्या. तुझ्याहि सर्व कामना तो अशाच पूर्ण करील.' त्यानंतर सांख्यशास्त्रप्रवर्तक कपिलमुनि म्हणाला, 'मींहि अनेक जन्मीं शिवाची आराधना केली व तेणेंकरून संतुष्ट होऊन शिवानें मला जन्ममृत्यूच्या चक्रांतून मुक्त करणारें ज्ञान दिलें.' मग इन्द्राचा मित्र व आलंब-गोत्री चारुशीर्ष म्हणाला, 'युधिष्ठिरा, मींहि पूर्वीं गोकर्ण क्षेत्रीं शंभर वर्षें तप करून शंकरापासून शंभर पुत्र प्राप्त करून घेतले. ते सर्व इंद्रियदमन केलेले धर्मज्ञ आणि तेजस्वी असून अयोनिज होते. ते जरा व दुःख यांपासून मुक्त असून दहासहस्रवर्षांचें त्यांचें आयुष्य होतें.' त्याच्यामागून भगवान् वाल्मीकि मुनि युधिष्ठिराला म्हणाला, 'अरे, एकदां वादविवाद चालला असतां, अग्निहोत्री ऋषींनीं म्हटलें कीं युधिष्ठिर हा ब्राह्मणवधाचा पातकी आहे. त्यांच्या त्या दुष्ट भाषणाच्या पापाचा संसर्ग मला बाधला असतां मी त्या पापनाशक महेशाला शरण गेलों व सर्व पापांपासून मुक्त झालों. तेव्हां दुःखनाशक असा तो त्रिपुरारि मला म्हणाला कीं "तुझें यश सर्वश्रेष्ठ होईल." त्या मुनिगणांत धर्मश्रेष्ठ सूर्यासारखा तेजस्वी असा परशुराम बसला होता, तो मग म्हणाला, 'हे युधि-ष्ठिरा, वडील बंधूच्या वधानें दुःखित झालों असतां मीं पवित्र अंतःकरणानें महादेवाला शरण गेलों व सहस्रनामस्तोत्रानें त्याची स्तुति केली; तेव्हां तो संतुष्ट झाला आणि परशु व दुसरीं दिव्य अस्त्रें मला देऊन "तुझें पाप नष्ट होऊन तूं अजिंक्य होशील, तुला जरामरणांची बाधा होणार नाहीं, असा वर त्यानें मला दिला व त्याप्रमाणें त्याच्या कृपेनें मला सर्व प्राप्तहि झालें.' भार्गवानंतर विश्वामित्र म्हणाला, 'मीं पूर्वीं क्षत्रिय होतों. मला ब्राह्मण व्हावें अशी इच्छा होऊन मीं महेशाची आराधाना केली व तेणेंकरून मला ब्राह्मणत्व मिळालें.' असित व देवल म्हणाले, 'हे पांडुसुता, इंद्राच्या शापानें माझ्या धर्मांचा ऱ्हास झाला, तेव्हां प्रभु महादेवानें मला धर्म, कीर्ति व आयुष्य हीं प्राप्त करून दिलीं. इंद्राचा प्रिय मित्र गृत्समद नांवाचा मुनि बृहस्पतीसारखा तेजःपुंज होता. त्यानें

अजामिळाला आपली स्वतःची गोष्ट सांगितली, ती अशी. 'इंद्राच्या सहस्र-वर्षांच्या यज्ञांत सामपठण करण्याच्या कामीं माझी योजना झाली असतां, मीं सामगायन करूं लागलों. इतक्यांत चाक्षुषमनूचा वरिष्ठ नामक पुत्र मला म्हणाला, 'अरे, हें रयन्तर साम तूं योग्य रीतीनें म्हणत नाहींस, तरी ही दुष्टबुद्धि सोडून तें तूं नीट पुनः म्हण. यज्ञफल न मिळेल अशी वाईट गोष्ट तूं करूं नको." असें म्हणून रागानें त्यानें मला शाप दिला कीं "अज्ञानी, दुःखी व भित्रा असा पशु होऊन तूं दीर्घकालपर्यंत जेथें वारा व पाणी चांगलें नाहीं अशा ओसाड रानांत पडशील." त्या शापाबरोबर मीं पशु होऊन पडलों. पण मीं योगी महेशाला शरण गेलों, तेव्हां तो म्हणाला "तूं दुःखमुक्त होऊन अजरामर होशील. माझें साम्य तुला प्राप्त होईल व इंद्र आणि तूं असे दोघेहि आपला यज्ञ नीट तडीस न्याल." अशा रीतीनें तो भगवान् शंकर सर्वांवर अनुग्रह करीत असतो. सर्वांची उत्पत्ति व रक्षण करणारा तोच आहे, त्याची यथार्थ कल्पना कर्म, मन व वाणी यांना शक्य नाहीं. युधिष्ठिरा, माझ्यासारखा पंडित विद्येंत कोणी नाहीं, हें शिवकृपेचेंच फळ होय.' यानंतर कृष्ण पुनः म्हणाला, 'मीहि महादेवाला तपानें संतुष्ट केलें असतां "माझ्या कृपेनें तूं मला अत्यंत प्रिय होशील" असा त्यानें मला वर दिला व माझें तेज अग्नीप्रमाणें होऊन युद्धांत माझा पराभव कधीं होणार नाहीं असें सांगितलें ! याप्रमाणें महादेवानें इतरहि सहस्रावधि लोकांना वर दिले. पूर्वीं मणिमंथ पर्वतावर मी दीर्घकाल त्याची पूजा केली, तेव्हां संतुष्ट होऊन तो म्हणाला, "तुझ्या मनाला येईल तो वर माग." मीं मस्तक वांकवून त्याला नमस्कार केला आणि म्हटलें, "माझ्या भक्तीनें जर भगवान् माझ्यावर संतुष्ट झाले असतील तर, त्यांची एकनिष्ठ भक्ति सतत माझ्याकडून घडावी." माझ्या बोलण्यावर "ठीक आहे" असें म्हणून भगवान् तेथेंच अन्तर्धान पावला.'

त्यानंतर जैगीषव्य मुनि म्हणाला, 'युधिष्ठिरा, भगवान् महेशानें मला वाराणशी नगरींत माझ्या उग्र तपःप्रयत्नावर तुष्ट होऊन अष्टगुणयुक्त ऐश्वर्य दिलें.' गर्ग म्हणाला, 'सरस्वती नदीच्या कांठीं माझ्या स्तवानें संतुष्ट होऊन शंकरानें मला चौसष्ट कलांचें अद्भुत ज्ञान दिलें; तसेंच ब्रह्मवादी असे शंभर पुत्रहि त्यानें मला दिले आणि सर्वांना शतायुषी केलें.' पराशर म्हणाला, 'राजा युधिष्ठिरा, वेदज्ञ, दयाळु, महातपस्वी, महायोगी, महाकीर्तिवान् असा मनासारखा पुत्र मला व्हावा अशा बुद्धीनें मीं पूर्वीं महादेवाचें मनानें ध्यान केलें.' तेव्हां माझें

मनोगत जाणून तो देवश्रेष्ठ मला म्हणाला, 'तुझ्या मनांत माझ्याविषयीं जी आस्था आहे, तिच्यायोगानें सावर्ण मनूच्या काळांत तुला कृष्णद्वैपायन नांवाचा पुत्र होईल. तो वेदांची पुनर्रचना करील व कुरुवंशाचा उद्धारहि करील. भारत नामक इतिहासग्रंथाचा कर्ता व जगाचा हितकर्ता असा तो होऊन इन्द्राचा मित्र होईल. हे पराशरा, तुझा तो पुत्र अजर आणि अमर होईल.' युधिष्ठिरा, असें बोलून 'तो अव्यय महायोगी शंकर तेथेंच गुप्त झाला.' मग मांडव्य ऋषि म्हणाला, 'राजा, मीं चोर नसतां चोरीचा आळ मजवर येऊन मला सुळावर चढविण्यांत आलें असतां त्या स्थितींत मीं त्या महादेवाची स्तुति केली. तेव्हां तो मला म्हणाला, "हे ब्राह्मणा, तूं शूळापासून मुक्त होऊन दहा लक्ष वर्षें जगशील, तुला सुळाचा उपद्रव होणार नाहीं व सर्व आधिव्याधींपासून तूं मुक्त होशील. तुझें शरीर ज्याअर्थीं सत्य धर्माच्या चवथ्या पादापासून झालें आहे, त्याअर्थीं तूं अतुल असा होऊन आपल्या जन्माचें साफल्य कर. तुझ्या तीर्थयात्रा निर्विघ्नपणें पार पडतील. तुला मीं अक्षय्य स्वर्गवास देतों." याप्रमाणें सांगून तो महातेजस्वी वृषभवाहन महेश्वर आपल्या गणांसह तेथल्या तेथें गुप्त झाला.

मग गालव मुनीनें आपली कथा सांगितली. तो म्हणाला, 'विश्वामित्रापाशीं अध्ययन पुरें करून त्याच्या अनुज्ञेनें मीं पित्यास भेटण्यासाठीं घरीं आलों. त्या-वेळीं पिता स्वर्गस्थ झालेला असल्यामुळें, मला आलेला पहातांच मातेला दुःख झालें व ती रडत मला म्हणाली, "बाळा, कौशिक मुनीपासून विद्या प्राप्त करून घेऊन तूं वेदविशारद होऊन आलास, पण त्या तुला पहाण्यास पिता आज येथें नाहीं!" मातेचे शब्द ऐकून पितृदर्शनाविषयीं निराश झालेला मीं मनोनिग्रह-पूर्वक महादेवाला शरण गेलों. तेव्हां महादेव मला म्हणाला, "बाळा, तूं घरीं जा, तुझी माता, पिता व तूं मृत्युमुक्त व्हाल. तुला पिता घरीं भेटेल." त्याप्र-माणें मीं घरीं आलों असतां माझा पिता इष्टि करून बाहेर येत असलेला मला दिसला. त्याच्या हातांत समिधा व दर्भ होते, ते खालीं ठेऊन त्यानें नमस्कार करणाऱ्या मला आलिंगन दिलें आणि माझ्या मस्तकाचें अवघ्राण करून म्हटलें, "बाळा, तूं विद्या पुरी करून येथें आलास, हें थोर भाग्य होय."

वैशंपायन म्हणतो, 'महात्म्या शंकराचीं अशीं अद्भुत कृत्यें ऋषींनीं वर्णिलीं असतां तीं ऐकून युधिष्ठिराला विस्मय वाटला. तेव्हां श्रेष्ठबुद्धीचा असा तो श्रीकृष्ण धमशील युधिष्ठिराला पुनः म्हणाला, 'युधिष्ठिरा, उपमन्यूनें मला आणखी सांगितलें कीं, जे पापी लोक दुष्ट कर्मांनीं कलुषित झालेले असतात,

ते रजोगुणानें व तमोगुणानें घेरिलेले असल्यामुळें, ईश्वराला शरण जात नाहींत. जे ब्राह्मण पवित्र अंतःकरणाचे असतात तेच त्याला शरण जातात. संसारांत गुरफटलेला असतांहि जो परमेश्वराची भक्ति करतो, तो पवित्र अंतःकरणाच्या अरण्यवासी मुनींच्या योग्यतेचाच होय. रुद्र प्रसन्न झाला असतां, ब्रह्मलोक, वैकुंठलोक, इन्द्रलोक, किंबहुना त्रैलोक्याचेंहि आधिपत्य भक्ताला देऊन टाकितो. म्हणून शिवाला मनःपूर्वक शरण गेलें असतां मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होऊन देवांसह स्वर्गलोकाचा उपभोग घेतो. संसाराचा भेद करून व सर्व जगाचा होम करून जो महादेवाची पूजा करितो तो पापानें लिप्त होत नाहीं, मग तो सर्व सुलक्षणांनीं हीन असो वा सर्व पापांनीं युक्त असो, मनानें शिवाचें ध्यान करणारा मनुष्य असो कीं कीटपक्षिपतंगासारखा हीन प्राणी असो, त्याचें पाप नष्ट होतें. महादेवाचा आश्रय करणारांना कसलीच भीति नाहीं. यास्तव जे मनुष्य या भूलोकीं त्याचे भक्त होतात, ते संसाराच्या तडाक्यांत सांपडत नाहींत असें माझें ठाम मत आहे.'

याप्रमाणें उपमन्यूची कथा सांगून कृष्ण युधिष्ठिराला म्हणाला, 'युधिष्ठिरा, सूर्य चंद्र, अग्नि वायु, आकाश भूमि, वसु, ब्रह्मदेव, शुक्रबृहस्पति, रुद्र, वरुण, इंद्र इत्यादि देव, तसे यज्ञ व तद्विषयक सर्व प्रकारची हव्यादि सामग्री, ब्राह्मण, कामधेनु, काल, बल, शुभाशुभ गोष्टी, मन, बुद्धि, निरनिराळ्या प्रकारचे तपस्वी, सिद्धि प्राप्त झालेले योगी, यक्ष, पिशाच, दानव, गंधर्व, चारण, पन्नग, स्थूल सूक्ष्म, सुखदुःख, सांख्ययोग, किंवा त्याच्याहि पलीकडचें ज्ञान, हें सर्व त्या महेशापासूनच निर्माण झालेलें आहे. सर्व लोकांचें रक्षण करणारे देवहि यापासून उत्पन्न झाले. तपाच्या योगानें ज्याचा सर्वजण शोध करूं पहातात, त्या अवर्णनीय तत्त्वाहून सर्वच स्थूल होय. त्या तत्त्वाला मीं नमस्कार करतों. स्तवनानें तुष्ट होऊन तो अनन्त प्रभु आम्हांला इष्ट ते वर देवो. इंद्रियनिग्रह करून जो पुरूष पवित्रपणें हें शिवसहस्रनाम स्तोत्र एक महिना पठन करील, त्याचा योग सिद्ध होऊन त्याला अश्वमेधाचें पुण्य मिळेल. याचें पठन ब्राह्मण करील तर सर्व वेद त्याला प्राप्त होतील. जो राजा हें पठन करील, त्याला सर्व पृथ्वीचें राज्य मिळेल. वैश्याला त्याच्या पठनानें धनलाभ व कलानैपुण्य मिळेल व शूद्राला उत्तम गति आणि सुख यांची प्राप्ति होईल. जो मनुष्य हा दोषनाशक, पवित्र व यशःप्रद स्तवराज म्हणून रुद्राच्या ठिकाणीं मन लावील

त्याला त्याच्या अंगावर जितके केश आहेत तितकीं सहस्र वर्षें स्वर्गवासाची प्राप्ति होईल. १३. १ १८.

---

## अध्याय १९ वा.

( १ स्त्री सहधर्मिणी होय असें जें म्हणतात त्यावर युधिष्ठिराचा आक्षेप. २ भीष्माचें त्यावर दिशा व अष्टावक्र यांच्या संवादरूपानें उत्तर )

( १ ) युधिष्ठिर म्हणतो, हे पितामह, स्त्रियांच्या विवाहप्रसंगीं ती पुरुषाची सहधर्मचारिणी होय असें जे सांगण्यांत येतें तें कोणत्या कारणास्तव बरें? हें पूर्व ऋषींचें म्हणणें कोणत्या विवाहप्रकाराला धरून आहे? आर्य, प्राजापत्य कीं आसुर? याविषयीं मला मोठा संशय वाटतो. मला वाटतें कीं स्त्रीचें सहधर्मत्व अनुभवाविरुद्ध आहे. कारण या लोकीं जो पुरुष सहधर्मा झाला तो मरण पावल्यावर कसा सहधर्मी राहील? हे पितामह, जे मरण पावले त्यांचा सहधर्मी स्वर्गांतीलच कोणी असणार. एक प्रथम मृत्यु पावतो व दुसरी जीवंत असते. दुसरें असें कीं, मनुष्यें आपआपल्या कर्मानुसार निरनिराळीं स्थानें प्राप्त करून नाना ठिकाणीं म्हणजे स्वर्ग नरक इत्यादि भिन्न लोकीं जातात. आणखी असें कीं सूत्रकारांनीं असत्यभाषण, साहस, इत्यादि स्त्रियांचे दुर्गुण सांगितले आहेत. असल्या दुर्गुणांनीं युक्त असलेल्या स्त्रिया पुरुषांच्या सहधर्मिणी कशा होतील? स्त्रियांचे असत्यादि दुर्गुण वेदांतहि सांगितले आहेत. आणखी असें कीं धर्म ही पूर्वसंज्ञा केवळ औपचारिक आहे म्हणजे तींत अधर्माचाहि समावेश होतो. तेव्हां या सर्व गोष्टींचा विचार करतां मला स्त्रियांच्या सहधर्मत्वाची कल्पना अतर्क्यच वाटते. वास्तव या विषयीं मीं निःसंदेह होईन असें श्रुत्याधारें नीट विवेचन करून मला सांगावें. तसेंच ही कल्पना वास्तविक कशी आहे, ती मूळ कोणी काढिली, हें हि मला विस्तारानें कथन करावें.

( २ ) भीष्म म्हणतो, युधिष्ठिरा, या विषयीं अष्टावक्र ऋषि व दिशा यांमध्यें पूर्वीं झालेला संवाद सांगण्यांत येत असतो. अष्टावक्राचें अध्ययन समाप्त झाल्यावर त्याला विवाहाची इच्छा झाली असतां त्यानें वदान्य नांवाच्या ऋषीच्या कन्येला मागणी घातली. तिचें नांव सुप्रभा असून ती रूपानें सर्व जगांत अप्रतिम आणि गुणांनीं, शीलानें व आचरणानें फारच चांगली होती. तिला पहातांच अष्टावक्राचें मन तिजवर बसलें. वसन्त ऋतूंत फुलांनीं डवरून गेलेल्या चित्रवि-

चित्र वृक्षराजींना पहातांच जसें मन त्यांजकडे जातें, तसाच प्रकार अष्टावक्रानें सुप्रभेला पहातांच झाला. तेव्हां तो ऋषि त्याला म्हणाला, 'माझी कन्या तुला द्यावयाची आहे, पण माझी एक अट आहे. प्रथम तूं पवित्र अशा उत्तर दिशेकडे जा. तेथें तुला कोणी दिसेल.' अष्टावक्र म्हणाला, 'काय तेथें मला दिसेल तें सांगा. आपण सांगाल त्याप्रमाणें मीं करीन.' तेव्हां वदान्य म्हणाला, 'कुबेराचें स्थान व हिमालय पर्वत ओलांडून तूं गेलास म्हणजे सिद्धचारणांची वसति असलेलें रुद्राचें ठिकाण तुला लागेल. तेथें त्याचे अनुचर वेडींवांकडीं तोंडें करून नाचत असतात, तसेच भूतपिशाच गण अंगाला उट्या लावून फिरत असतात. टाळ्या वाजवून ताल धरणारे व आनंदानें नाचणारे असे ते गण तेथें शंकराची सेवा करतात. तें पर्वतावरील दिव्य स्थान मोठें रमणीय आहे असें आम्हीं ऐकिलें आहे. त्या ठिकाणीं महादेवाची तशीच त्याच्या अनुयायांची नित्य वसती असते. तेथेंच पार्वतीनें शंकराच्या प्राप्तीसाठीं दुर्धर तप केलें. म्हणूनच तें स्थान शंकराला तसेंच उमादेवीला अत्यंत प्रिय झालेलें आहे, असें म्हणतात. तेथें पूर्वेकडील एका पर्वतावर महादेवाच्या स्थानाच्या उत्तरेस सर्व ऋतु व दिव्य आणि पार्थिव दिवसरात्र हीं सगळीं शरीर धारण करून महादेवाची सेवा करतात. तें स्थान ओलांडून तूं पुढें जा, म्हणजे तुला मेघासारख्या रंगाचा नीलवर्णाचा रमणीय व मनोहर अरण्यप्रदेश दिसेल. त्यांत वृद्ध तपस्विनी थोर मनाची व दीक्षा घेतलेली स्त्री तुला आढळेल. तिची गांठ घेऊन तूं तिची पूजा कर आणि तसें करून परत आलास म्हणजे मीं आपली कन्या तुला देईन. ही अट मान्य असेल, तर तिकडे जा व सांगितल्याप्रमाणें कर.' वदान्यानें असें म्हणतांच 'ठीक आहे, तसें करतों, जातों तिकडे. आपल्या म्हणण्यासारखें होवो,' असें अष्टावक्रानें उत्तर दिलें.

भीष्म म्हणतो, मग अष्टावक्र तेथून निघाला व उत्तरदिशा धरून पर्वतराज हिमालयाकडे जाऊं लागला. हिमालयाशीं गेल्यावर, त्याला बहुदा नांवाची धर्मोपयोगी पवित्र नदी लागली. तेथें तिच्या पापशोकनाशक तीर्थांत स्नान करून आणि देवतातर्पण करून आपल्या रेशमी वस्त्रावर तो सुखानें पडून राहिला. मग रात्र संपून दुसरा दिवस उगवला असतां तो ब्राह्मण पुनः उठला आणि स्नान करून अग्नि प्रदीप्त केल्यावर वेदमंत्रांनीं त्याची स्तुति करून शंकरपार्वतींचें त्यानें दर्शन घेतलें व तळ्याच्या कांठीं तो विश्रांति घेत बसला. विश्रांति झाल्यावर पुनः उठून तो कैलासाकडे निघाला. त्याला जणूं प्रत्यक्ष लक्ष्मीनेंच

देदीप्यमान केलेलें सुवर्णाचें द्वार दिसलें. तेथें गंगा नदी व कुबेराच्या तळ्यांतील कमलिनी त्याला दिसल्या. त्या कमळांचें रक्षण करणारे मणिभद्रप्रमुख राक्षस अष्टावक्राला पहातांच त्याच्या सन्मानार्थ उभे राहिले. त्या पराक्रमी राक्षसांना त्यानें उलट मान दिला आणि 'मीं येथें आलों आहें, असें कुबेराला लवकर कळवा' असें त्यांना त्यानें सांगितलें. त्याप्रमाणें करून 'हे कुबेर महाराज आपल्याकडे स्वतःच येत आहेत. त्यांना आपल्या येण्याचें कारण माहीत आहे,' असें ते राक्षस म्हणत आहेत, तों कुबेर तेथें येऊन पोंचला, आणि त्या सच्छील अष्टावक्राला रीतीप्रमाणें कुशल प्रश्न विचारून त्याला म्हणाला 'हे ब्राह्मणा, तुझा प्रवास सुखानें झाला ना? माझ्याकडून काय करून घेण्याची तुझी इच्छा आहे? मला सर्व सांग, म्हणजे त्याप्रमाणें मीं करीन. माझा सत्कार घेऊन व आपलें कार्य करून तूं येथून पुढें निर्विघ्नपणें जाशील.' असें म्हणून कुबेरानें त्याला आपल्या घरीं नेऊन व त्याची आसन पाद्य व अर्घ्य देऊन पूजा केली. नंतर ते दोघे आसनावर बसले असतां मणिभद्रप्रभृति कुबेरसेवकहि आपआपल्या जागीं बसले. ते बसल्यावर कुबेर म्हणाला, 'हे ब्राह्मणश्रेष्ठा, तुझी आवड निवड जाणून या अप्सरा व गंधर्व आतां नृत्य करतील. तुझें आतिथ्य व सेवा यांजकडे सोंपविलीं आहेत.' हें ऐकून अष्टावक्रानें ठीक आहे, चालूं द्या' असें गोड शब्दांनीं उत्तर दिलें व तदनुसार उर्वरा, मिश्रकेशी, रंभा, ऊर्वशी, अलम्बुषा, घृताची, चित्रा, चित्रांगदा, रुचि, मनोहरा, सुकेशी, सुमुखी, हासिनी, प्रभा, विद्युता, प्रशमी, दान्ता, विद्योता, रति इत्यादि अनेक सुंदर अप्सरा नाचूं लागल्या. गंधर्व विविध वाद्यें वाजवीत होते. याप्रमाणें हा दिव्य संगीत समारंभ चालू असतां महातपस्वी अष्टावक्र तेथें देवांचें एक वर्ष रममाण होऊन राहिला. तेव्हां कुबेर त्याला म्हणाला, 'महाराज, आपण पहातां पहातां एक दिव्य संवत्सर उलटून गेला. हा गांधर्व नांवाचा गीतसमारंभ मोठा मनोहर असून आपल्याला आवडत असेल तर आणखी चालूं द्या. आपण म्हणाल तसें करूं. हें घर आपलेंच आहे. आम्ही आपले सेवक आहोंत. इच्छेप्रमाणें आज्ञा व्हावी.' कुबेराच्या या बोलण्यानें अष्टावक्राला फार संतोष झाला आणि तो म्हणाला, 'कुबेरा, तुझ्या आदर सत्कारानें मीं अगदीं आनंदित झालों. मी वदान्य महर्षीच्या आज्ञेवरून इकडे जात आहें. तुझी कृपा मजवर आहेच. तुझा सर्वतोपरि उत्कर्ष होवो.'

असें बोलून अष्टावक्र उत्तरेकडे तोंड करून निघाला आणि कैलास, मंन्दर, हैम

हे पर्वत टाकून पलिकडे गेला. तेथें कैरात नांवाचें सुंदर ठिकाण आहे, त्याला नमस्कारपूर्वक प्रदक्षिणा करून तो खालीं उतरला आणि त्याचें अंतःकरण प्रसन्न झालें. त्या पर्वताला तीन प्रदक्षिणा केल्यावर तो सपाटीवरून आनंदानें उत्तरेकडे चालूं लागला. तेथें पलिकडे त्याला रमणीय वनस्थान दिसलें. त्यांत सर्व ऋतूंत उत्पन्न होणारीं मुळें व फळें भरपूर असून अनेक रम्य ठिकाणें त्याला शोभवीत होतीं. तेथें जवळच एक दिव्य आश्रम होता, व त्याजवळ विविध आकाराचे सोन्याचे पर्वत रत्नांनीं शोभत होते. रत्नखचित भूमीवर अनेक पुष्करिणीहि तेथें असून त्या व दुसऱ्या अनेक सुंदर वस्तु तेथें पाहून पवित्र मनाच्या अष्टावक्राला फार आनंद वाटला. त्याला तेथें कुबेराच्या आवारापेक्षांहि सुंदर असें सोन्याचें रत्नखचित दिव्य आवार आढळून आलें; त्यांत मोठमोठ्या सोन्यारत्नांच्या टेकड्या व रमणीय सातमजली वाडे होते. पलीकडे मन्दाराच्या फुलांनीं भरलेली गंगानदी, स्वयंप्रकाशीत रत्नें आणि सुंदर फरशीची भूमी, तशींच अनेक प्रकारचीं चित्रविचित्र रत्नानीं मढविलेलीं मोत्यांच्या खिडक्यांचीं घरें दिसत होतीं. त्यांच्याकडे पहातांच डोळे प्रसन्न होऊन मन मोहून जाई. असा तो ऋषींनीं गजबजून गेलेला सुंदर आश्रम पाहून त्याला आतां आपण कोणत्या ठिकाणीं रहावें असा विचार पडला. मग एका दाराशीं जाऊन तो म्हणाला, 'आंत कोणी आहे काय? मीं अतिथि आलों आहें.' हे त्याचे शब्द ऐकतांच कित्येक मुली त्या घरांतून बाहेर आल्या. त्या सर्व रमणीय स्वरूपाच्या असून प्रत्येकीनें त्याचें मन मोहून टाकिलें. प्रथम त्याला आपलें मन प्रयत्न करूनहि आवरतां येईना. पण थोड्या वेळानें त्याला धैर्य उत्पन्न झालें. त्या मुलींनीं त्याला घरांत यावयास सांगितलें आणि तो त्या सुंदर मुलींचें आणि तसेंच घराचेंहि कौतुक करीत आंत प्रविष्ट झाला. तेथें एक वृद्ध स्त्री स्वच्छ वस्त्र परिधान केलेली सर्व अलंकारांनीं सुशोभित होऊन पलंगावर बसलेली त्याच्या दृष्टीस पडली. 'तुझें कल्याण असो' असा आशीर्वाद अष्टावक्रानें दिला असतां ती स्त्री प्रत्युत्तर म्हणून उठून उभी राहिली आणि 'या आसनावर बसावें' असें अष्टावक्राला म्हणाली.

तेव्हां अष्टावक्र तिला म्हणाला, 'इतर सर्व कन्यांनीं आपआपल्या ठिकाणीं जावें आणि एकीनें मात्र माझ्या सेवेला येथें रहावें. जी सुज्ञ व शांत वृत्तीची असेल तिनें रहावें व इतरांनीं जावें.' तें ऐकून इतर कन्या ऋषीला प्रदक्षिणा करून तेथून निघून गेल्या व ती वृद्ध स्त्री मात्र एकटी राहिली. तेव्हां उंची शय्येवर शयन करतांना तो तिला म्हणाला, 'बाई, आतां रात्र फार झाली,

तरी तुम्हींहि झोंप घ्या.’ त्याचें भाषण ऐकून ती स्त्री दुसऱ्या एका दिव्य तेजस्वी शय्येवर जाऊन पहुडली. पण थोड्या वेळानें ती कांपत कांपत आणि थंडीमुळें कांपरें सुटलें असें दाखवीत महर्षि अष्टावक्राच्या शय्येजवळ येऊन तीवर चढली. ती जवळ आली असतां अष्टावक्र तिचें स्वागत करून तिच्याशीं बोलूं लागला. युधिष्ठिरा, तिनें मोठ्या प्रेमानें त्याला आपल्या बाहूंनीं आलिंगन दिलें, पण तो लांकडाच्या ओंडक्यासारखा अगदीं निर्विकार आहे असें पाहून तिला दुःख झालें व ती त्याला म्हणाली, ‘ब्राह्मणा, स्त्रियांना पुरुषांवांचून दुसरी कसली इच्छा नसते. तुला पाहून मीं काममोहित झालें आहें. तुझी इच्छा करणाऱ्या माझी इच्छा तूं पूर्ण कर. हे विप्रश्रेष्ठा, आनंदित हो आणि माझ्याशीं गमन कर. मला आलिंगन दे. मीं तुझ्या संबंधानें अत्यंत कामातुर झालें आहें. हे धर्मशीला, तुझ्या तपाचें हें उत्कृष्ट फल तुला मिळत आहे. तुझ्या केवळ दर्शनानें मला तुझी इच्छा झाली व मी तुझ्याकडे आलें. तरी तूं मला आपलीशी कर. हें माझें धन किंवा इतर जें कांहीं आहे, तें तुझेंच आहे, त्या सर्वांचा व माझाहि तूं स्वामी हो. मीं तुझे सर्व मनोरथ पुरवीन; मात्र तूं मजपाशीं रममाण हो. या रमणीय उपवनांत आपल्या सर्व इच्छा पूर्ण होणाऱ्या आहेत. तूं मजपाशीं रममाण होशील, तर मीं तुझी अंकित होऊन राहीन. दिव्य व मानुष्य असे सर्व भोग येथें आपण भोगूं. पुरुषसंबंधानें स्त्रियांना जें सुख होतें तसें दुसऱ्या कशानेंहि होत नाहीं. हेंच आम्हाला उत्तम फल होय. मदनानें पीडिलेल्या स्त्रिया स्वतःच्या तंत्रानेंच चालतात. तापलेल्या धुळींतून चालतांनाहि त्यांचे त्यावेळीं पाय भाजत नाहींत.’

तिचें भाषण ऐकून अष्टावक्र म्हणाला, ‘मीं केव्हांहि परस्त्रीशीं गमन करणार नाहीं. धर्मशास्त्रज्ञांनीं परदारागमन दुष्ट म्हणून म्हटलें आहे. हे सुशील स्त्रिये, मीं खरोखर तुला सांगतों कीं विवाहाच्या विचारांत मीं आहें. पण मला विषयाची आवड नाहीं. धर्मासाठींच मला संतति पाहिजे आहे. पुत्रप्राप्ति झाल्यासच मीं उत्तम लोकाला जाईन. बाईग, धर्म काय आहे हें जाणून घे आणि आपला आग्रह सोडून दे.’ ती स्त्री म्हणाली, ‘वायु, अग्नि, वरुण, किंवा इतर देव हेहि कामी पुरुषांइतके स्त्रियांना प्रिय वाटत नाहींत; कारण स्त्रियांना रतीची आवड असते. पण खरोखर सहस्रावधि स्त्रियांतून एखादीला तिची प्राप्ति होते. लक्षावधि स्त्रियांत एकादीच खरी पतिव्रता असते. स्त्रियांना पिता, माता, कुळ, भाऊ, पति, पुत्र, दीर यांचीहि ओळख रहात नाहीं. नदी जशी कांठ उखडून

नेते, तशा त्या आपल्या लीलेंत दंग होऊन कुलाचा नाश करतात. म्हणूनच विचार करून प्रजापतीनें स्त्रियांचे दोष सांगून ठेविले आहेत.' असें ती बोलली असतां अष्टावक्र तिला म्हणाला, 'तुझ्या आवडीप्रमाणें तूं इष्ट असेल तें कर, पण मीं काय करावें तें सांग.' तेव्हां ती स्त्री म्हणाली, 'हे श्रेष्ठ पुरुषा, देशकालानुसार तुला सर्व कांहीं दिसून येईल. तूं येथें रहा, म्हणजे कृतकृत्य होशील.' युधिष्ठिरा, तिच्या बोलण्यावर तो ऋषि 'ठीक आहे, तुझा उत्साह आहे, तोंवर मीं येथें निश्चितपणें राहीन' असें म्हणाला. पण त्या स्त्रीला जरेनें व्यथित झालेली पाहून ऋषीला मोठी चिन्ता वाटून संताप उत्पन्न झाला. तिचा जो जो अवयव त्याच्या दृष्टीस पडे त्या त्याविषयीं त्याला सुख न वाटतां वैराग्यच वाटे. 'ही या गृहाची देवता असतां हें विकृत रूप तिला शापामुळें आलें आहे कीं काय, या सर्वप्रकाराचें कारण काय हें मला कसें कळणार?' अशारीतीनें तो एकटा बसला असतां त्याच्या मनांत विचार येऊं लागले व मनाच्या व्याकुळ स्थितींत त्याचा तो दिवस गेला. तेव्हां ती स्त्री त्याला म्हणाली, भगवान्, हे सूर्याचें रूप तरी पहा. संध्याकालीन मेघांनीं त्याला तांबडी छटा आणिली आहे. तुला यावेळीं काय पाहिजे?' तो म्हणाला, 'मला स्नानासाठीं पाणी आणून दे. स्नान करून वाक् व इंद्रियें यांचें नियमन करीत मीं संध्येची उपासना करतों.' १३. १. १९.

---

## अध्याय २० वा.

[ स्त्री व अष्टावक्र यांचा संवाद. ]

भीष्म म्हणतो, युधिष्ठिरा, 'ठीक आहे, तसें करतें' असें म्हणून त्या स्त्रीनें त्याला दिव्य तेल व स्नानासाठीं पंचा आणून दिला. मग तिनें त्याच्या अनुज्ञेनें त्याच्या अंगाला तेल लावून तें रगडलें आणि थोड्यावेळानें तो स्नानगृहांत गेला. तेथें नवें आसन मांडलेलें होतें त्यावर तो बसला आणि तिनें त्याला आपल्या मऊ हातांनीं स्नान घातलें. तिच्या हातच्या त्या सुखसोहळयानें अष्टावक्राला ती सारी रात्र कशी गेली हें समजलेंहि नाहीं. मग सकाळ झालेली पाहून तो उठला तों आकाशांत सूर्य उगवलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्याला वाटलें, ' झाला हा प्रकार खरा कीं मला कांहीं भ्रम झाला?' मग सूर्याची उपासना केल्यावर 'आतां मी काय करूं' असें त्यानें तिला विचारिलें. तेव्हां तिनें अमृतासारखें मधुर अन्न त्याच्या पुढें आणून ठेविलें. पण त्याच्या गोडपणामुळेंच त्याला तें

फारसें खाववलें नाहीं. याप्रमाणें तोहि दिवस गेला व पुनः संध्याकाळ आला. तेव्हां 'आतां निजावें' असें तिनें सांगितल्या वरून तिनें घालून दिलेल्या शय्येवर त्यानें शयन केलें. ती स्त्रीहि दुसऱ्या शय्येवर पडली. मग मध्यरात्र झाल्यावर ती त्याच्या शयनाशीं आली असतां अष्टावक्र तिला म्हणाला, 'हे भाग्यशाली स्त्रिये, कांहीं झालें तरी माझें मन परस्त्रीवर जडत नाहीं. तरी तूं येथून ऊठ आणि आपण होऊनच या विचारापासून निवृत्त हो.'

भीष्म म्हणतो, या प्रमाणें निवृत्त होण्याविषयींचा अष्टावक्राचा उपदेश ऐकून ती स्त्री म्हणाली, 'ऋषे, मीं स्वतंत्र आहें. यास्तव माझ्या संसर्गानें तुझी धर्महानि होणार नाहीं.' अष्टावक्र म्हणाला, 'स्त्रियांना स्वातंत्र्य कोठचें? स्त्रिया म्हटल्या कीं त्या परतंत्रच "न स्त्री स्वातंत्र्य मर्हति" असें प्रजापतीचें स्वतःचेंच मत आहे.' स्त्री म्हणाली, 'ब्राह्मणा, मीं कामपीडित आहें. आणि तुझ्याविषयीं माझी भक्ति केवढी आहे ती तरी पहा. तूं माझ्या म्हणण्याला रुकार दिला नाहींस, तर तुला पाप लागेल.' अष्टावक्रानें उत्तर दिलें, 'वाटेल तसें स्वैर वर्तणाऱ्या पुरुषाला अनेक दोष ग्रासतात. माझें बळ माझ्या धैर्यांत आहे. तरी आतां तूं आपल्या शयनावर जा.' स्त्री म्हणाली, 'ब्राह्मणा, मीं तुझ्या पायां पडतें, मजवर कृपा कर. हे निष्पापा, भूमीवर लोळणाऱ्या मला तूं आश्रय दे. परदारागमनाच्या दोषाला तूं भीत असशील, तर, मीं आपलें दान करतें, तूं माझ्याशीं विवाहच कर, म्हणजे तुला कसलाच दोष लागणार नाहीं. मीं खरें सांगतें, कीं मीं अगदीं स्वतंत्र आहें. मीं खोटें सांगेन तर मला पाप लागो. केवळ तुजवरच माझें मन गेलें असून मीं आतांपर्यंत स्वतंत्र आहें, तरी तूं माझा अंगीकार कर.' अष्टावक्र म्हणाला, 'तूं स्वतंत्र कशी तें मला सांग. साऱ्या त्रैलोक्यांत अशी स्त्रीच नाहीं कीं जी स्वतंत्रतेला पात्र आहे. कारण, कौमारावस्थेंत पिता पालन करतो, तारुण्यांत पति रक्षण करतो, वृद्धपणीं पुत्र रक्षणकर्ते असतात, अशा रीतीनें स्त्रियांना स्वतंत्रता ही नाहींच.' स्त्री म्हणाली, 'मीं कौमारावस्थेंत ब्रह्मचारिणी आहें. मीं अद्यापि कन्या आहें. आतां तूं मला पत्नी करून घे; माझ्या इच्छेचा हिरमोड करूं नकोस.' अष्टावक्रानें उत्तर दिलें 'जशी माझ्या विषयीं तुला तशीच तुझ्याविषयीं मलाहि इच्छा असेल हें तुला सांगावयास नकोच. पण मीं ज्या ऋषीजवळ कन्या मागितली, तो माझी अशा रीतीनें परीक्षा तर पहात नाहींना? मीं तुझें म्हणणें मान्य केलें तर माझ्या मार्गांत विघ्नच नाहींका खरोखर आलें? मला मोठें

आश्चर्य वाटतें कीं पूर्वीच्या वृद्ध जठरस्त्रीच्या स्थानीं ही दिव्यालंकारभूषित कन्या मजपाशीं कशी आली ? या साऱ्या प्रकाराचें रहस्य काय असावें ! माझें कल्याण कशांत आहे ? हिचा स्वीकार करण्यांत कीं त्याग करण्यांत ? पण मीं इंद्रियदमनपूर्वक धैर्य धरून धर्मातिक्रमणाला कांहीं झालें तरी प्रवृत्त होणार नाहीं. मला धर्माचा अतिक्रम आवडत नाहीं. मीं धर्मानेंच स्त्रीचा स्वीकार करीन.' १३, १२०

## अध्याय २१ वा

( १ अष्टावक्राची कथा पुढें चालू. २ स्त्रीरूपी उत्तर दिशेचा अष्टावक्राला उपदेश. ३ अष्टावक्राचा विवाह. )

( १ ) युधिष्ठिर म्हणतो, ' पितामहा, त्या तेजस्वी ब्राह्मणाच्या शापाला ती स्त्री भ्याली कशी नाहीं ? आणि त्या पेंचांतून तो मुक्त तरी कसा झाला, हें सर्व मला आपण सांगावें. भीष्म म्हणाला, ' आपला निश्चय व्यक्त केल्यावर अष्टावक्र त्या स्त्रीला म्हणाला, 'तूं आपलें रूप विकृत कां केलें ? ब्राह्मण पति मिळविण्याच्या हेतूनें तूं खोटें मात्र बोलूं नकोस ?'

( २ ) स्त्री म्हणाली, ' हे ब्राह्मणश्रेष्ठा, पृथ्वी व आकाश या मध्यें जेथें जावें तेथें स्त्रीपुरुषांना एकमेकांची इच्छा आहेच. आतां हा जो प्रकार झाला तो सर्व मीं तुला सांगतें. नीट ऐक. तुझें मन स्थिर करण्याच्या हेतूनें मीं तुझी परीक्षा घेतली. तुझ्या मनाच्या स्थिरपणामुळें तूं सारे लोक जिंकले आहेस. मी उत्तर दिशा आहे, हें लक्षांत घे. स्त्रिया चंचल कशा असतात हें मीं तुला दाखविलें. वृद्ध जरठ स्त्रियांना सुद्धां कामवासना पीडा देते. ब्रह्मदेव व इन्द्रादि देव तुझ्या-वर आज संतुष्ट झाले आहेत. तुला इष्ट असलल्या कन्येच्या पित्यानें तुला येथें ज्या कार्यासाठीं पाठविलें त्या कार्यासाठीं म्हणजे तुला उपदेश करण्यासाठीं मीं हा सर्व खेळ केला. आतां तूं खुशाल घरीं जा. तुला वाटेचे श्रम बाधणार नाहींत. ती कन्या तुला प्राप्त होईल. तूं ज्या इच्छेनें मला प्रश्न केला तिला अनुसरून मीं तुला उत्तर दिलें आहे. ती इच्छा तिन्ही लोकांत अनुल्लंघनीय आहे. तूं आतां जा. तुझ्या हातून पुण्यकर्म झालें आहे. तुला आणखी कांहीं ऐकावयाचें आहे काय ? अष्टावक्रा, असेल तर त्याचें मीं यथोचित उत्तर देईन. तुझ्यासाठीं

वदान्य ऋषीनें मला विनंती केली व त्याचा मान राखण्यासाठीं मीं हा उपदेश तुला केला!

( ३ ) भीष्म म्हणतो, तिचें भाषण ऐकून अष्टावक्रानें तिला हात जोडले व तिची अनुज्ञा घेऊन तो पुनः स्वगृहीं आला. घरीं येऊन विश्रांति घेतल्यावर आणि सर्व मंडळीची खुशाली काढल्यावर तो वदान्य ऋषीकडे गेला आणि त्यानें विचारल्यावरून त्याला हा सारा घडलेला वृत्तान्त त्यानें सांगितला. तो अत्यंत आनंदित होऊन म्हणाला, 'आपल्या आज्ञेप्रमाणें मीं गन्धमादन पर्वताकडे निघालों व त्याच्या उत्तर बाजूला गेल्यावर तेथें मला एक मोठें दैवत आढळलें. त्या देवतेनें मला अनुज्ञा दिली व आपलीहि कीर्ति गाइली. हे मुने, तिचा उपदेश घेऊन मीं घरीं आलों.' तें ऐकून वदान्य ऋषि म्हणाला, 'अष्टावक्रा, आतां तूं माझ्या कन्येचा स्वीकार कर, तूं तसें करण्यास सत्पात्र आहेस. शुभ नक्षत्र पाहून तूं विवाह कर.' मग त्या परमधर्मशील अष्टावक्रानें 'ठीक आहे' असें म्हणून मोठ्या आनंदानें वदान्य ऋषीच्या कन्येचा स्वीकार केला. अत्यंत सुंदर अशा त्या कन्येचा स्वीकार करून तो चिन्तामुक्त होत्साता आनंदानें आपल्या आश्रमांत राहूं लागला. १३,१.२१.

---

## अध्याय २२ वा.

[ १ ब्राह्मणांच्या पात्रापात्रतेविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न, २ भीष्माचें उत्तर. ३ एतद्विषयक दोघांचा संवाद. ४ पृथ्वी कश्यप इत्यादिकांचा संवाद. ५ ब्रह्मचाऱ्यानें श्राद्धांत देवस्थानीं बसावें काय? ६ चांगले ब्राह्मण कोण?

( १ ) युधिष्ठिर म्हणतो, हे भीष्म पितामह, सनातन ब्राह्मणांनीं सत्पात्र कोणाला म्हटलें आहे, ब्रह्मचर्याची खूण असलेल्या ब्राह्मणाला कीं ती नसलेल्या संन्यासी ब्राह्मणाला, तें मला सांगा.

( २ ) भीष्म म्हणतो; युधिष्ठिर राजा, ब्रह्मचारी असो कीं संन्यासी असो, दोघेहि दानास सत्पात्रच होत. दोघेहि तपस्वीच असतात. पण त्यांनीं आपली वृत्ति निष्ठेनें चालवीत असलें पाहिजे.

( ३ ) युधिष्ठिर म्हणतो, 'हे पितामह, जर कोणी अपवित्र पुरुष ब्राह्मणाला मोठ्या श्रद्धेनें देवाला देण्यासारखें, पितरांना देण्यासारखें किंवा इतर कसलें दान देईल, तर त्यांत काय दोष घडेल?' भीष्मानें उत्तर दिलें कीं, 'श्रद्धायुक्त पुरुष जर

इंद्रियनिग्रही असला, तर तो त्या श्रद्धेच्या बळावरच पवित्र होतो; यांत काय संशय ?' युधिष्ठिरानें त्यावर आणखी विचारिलें कीं 'देवकृत्यांमध्यें ब्राह्मणाची परीक्षा करण्याचें कारण नाहीं, पण पितृकार्यांत ब्राह्मण पारखूनच घेतला पाहिजे असें जें सुज्ञ पुरुष म्हणतात, त्यासंबंधानें आपलें मत काय आहे ?' भीष्मानें उत्तर केलें कीं, 'देवकृत्य हें कांहीं ब्राह्मण सिद्ध करीत नाहीं, देवाच्या कृपेनेंच तें सिद्धीस जातें. देवाच्या कृपेनेंच यजमानांकडून देवांची पूजा घडते, यांत कांहीं संशय नाहीं. तेव्हां त्या बाबतींत ब्राह्मणांची पात्रता पहावयास नको. पण पूर्वीं बुद्धिशाली मार्कंडेय मुनीनें ब्रह्मवादी ब्राह्मणांकडून पितृकार्य सिद्ध होतें असें सांगितलें आहे, यास्तव पितृकार्यांत पवित्र ब्राह्मण पारखूनच घेतले पाहिजेत.'

युधिष्ठिर म्हणाला, 'परकी, विद्वान्, नात्याचा, तपस्वी व यज्ञशील, इतक्या प्रकारच्या ब्राह्मणांमध्यें पितृकार्याला खरा पात्र कोण समजावा ?' भीष्मानें उत्तर दिलें, 'या पांच प्रकारांपैकीं पहिल्या तीन प्रकारचे ब्राह्मण जर कुलीन, कर्मशील, दयाळू, भिडस्त, सरळ वर्तनाचे व सत्यवादी असतील तर तेच पितृकार्यांत सत्पात्र होत. याविषयीं पृथ्वी, काश्यप मुनि, अग्नि देव, व मार्कंडेय ऋषि या चारांमध्यें पूर्वीं संवाद झाला होता, तो मीं तुला सांगतों.

( ४ ) पृथ्वी म्हणाली, 'ज्या प्रमाणें मातीचा गोळा महासागरांत टाकला असतां विरून जातो, त्याप्रमाणें याजन, प्रतिग्रह व अध्यापन या तीन वृत्तींवरच रहाणाऱ्या पुरुषाचें सर्व दुराचरण त्या वृत्तींतच लय पावतें.' पृथ्वीच्या भाषणावर काश्यप म्हणाला, 'ब्राह्मणानें जर आपलें शील सोडिलें, तर सारे वेद व त्यांचीं सहाहि अंगें, तसेंच सांख्यादि शास्त्रें, पुराणें, कुलीनपणा, या सर्वांनाहि त्याचें रक्षण करतां येत नाहीं.' अग्नि म्हणाला, 'आपण मोठे पंडित आहों असें समजून जो अध्ययन करतो, आणि जो आपल्या विद्येच्या बळावर इतरांचें यश हिरावून घेऊं पहातो, तो प्रगति न करतां उलट भ्रष्टच होतो व त्यानें मिळविलेले लोकहि शाश्वत नसतात.' मार्कंडेयानें सांगितलें, 'सहस्र अश्वमेघ एकीकडे आणि सत्य दुसरीकडे घालून जर दोघांची तुला केली, तर मला नाहीं वाटत कीं या सत्याच्या अर्धा इतकेंहि त्या सहस्र अश्वमेघांचें वजन भरेल.'

भीष्म म्हणतो, 'या प्रमाणें एकमेकांशीं संवाद करून तीं अनंततेजोयुक्त अशीं पृथ्वी, काश्यप, अग्नि व मार्कंडेय हीं चारी आपआपल्या स्थानीं निघून गेलीं.

( ५ ) मग युधिष्ठिरानें पुनः विचारिलें, 'ब्राह्मणाला उद्देशून दिलेलें हवि जर ब्रह्मचारी ग्रहण करील म्हणजे श्राद्धप्रसंगीं ब्रह्मचारी जर देवस्थानीं बसेल तर तें योग्य होईल काय?' भीष्म म्हणाला, 'वेदाध्ययनाची आज्ञा ज्यांना झाली आहे, ते वेदपारंगत झालेले ब्राह्मण जर हविरन्नाचें ग्रहण करतील, तर त्यांच्या ब्रह्मचारि व्रताचा लोप होईल, दात्याला त्यांत कांहीं दोष नाहीं.' युधिष्ठिर म्हणाला, धर्माच्या गति अनेक असून त्याचीं द्वारेंहि अनेक आहेत असें ज्ञाते म्हणतात. तर त्यासंबंधानें खरा प्रकार काय आहे तो मला सांगा.' भीष्मानें उत्तर केलें, 'अहिंसा, सत्यभाषण, अक्रोध, दया, आत्मसंयमन, व सरळपणा, हीं धर्माचीं निश्चित लक्षणें होत. जे कोणी या धर्माची प्रशंसा करीत पृथ्वीवर फिरतात, पण त्यांचें आचरण मात्र स्वतः न करतां संकराची आवड धरितात, त्यांना सोनें, रत्नें, गाय, घोडा, यांचें दान करणाराला नरक प्राप्त होऊन दहा वर्षें विष्ठा भक्षण करावी लागते, व ती सुद्धां मृत प्राण्यांचें मांस भक्षण करणारे जे मेद पुल्कस इत्यादि गांवाबाहेर रहाणारे लोक किंवा इतरांच्या चांगल्या वाईट कर्मांची मत्सरानें किंवा पक्षपातानें कुचाळी करणारे लोक त्यांची. युधिष्ठिरा, ब्रह्मचारी ब्राह्मणाला वैश्वदेवाच्या वेळीं जे हाक मारून अन्नदान करीत नाहींत, त्यांना अशुभ लोक प्राप्त होतात.' युधिष्ठिरानें आणखी विचारिलें, 'भीष्म आजोबा, ब्रह्मचर्याचें श्रेष्ठ स्वरूप काय, धर्माचें खरें लक्षण कोणतें व उत्तम शुद्धि म्हणजे कोणती, तें मला सांगा.' तेव्हां भीष्म म्हणाला, 'ब्रह्मचर्यांत मधु व मांस वर्ज करणें हें त्याचें श्रेष्ठ स्वरूप असून जी गोष्ट मर्यादेंत आहे तिलाच धर्म म्हणावें; त्याचें बाह्य लक्षण शान्ति होय.' युधिष्ठिर म्हणाला, 'धर्माचें आचरण कोणत्या वेळीं करावें व अर्थ संपादन केव्हां करावें, तसेंच विषयसुख मिळविण्याचा प्रयत्न केव्हां करावा, तें मला सांगा.' भीष्मानें उत्तर केलें, 'युधिष्ठिरा, दिवसाच्या पहिल्या अर्धभागांत द्रव्यसंपादनाचा उद्योग करावा, त्यानंतर धर्म करावा आणि शेवटीं विषयसुखाचा यथोचित उपभोग घ्यावा, पण त्यांत आसक्त होऊं नये. ब्राह्मणांना मान द्यावा, गुरूंची पूजा करावी व सर्व प्राण्यांशीं अविरोधानें वागून मृदु व मधुर शब्द बोलावे. अधिकारावर असतां असत्य भाषण, राजापाशीं लबाडीचें वर्तन आणि गुरूची फसवणूक हीं पापें ब्रह्महत्येसमान होत. राजाचा वध करूं नये, तसाच गाईचा करूं नये. हीं दोन्हीं करणाराला गर्भहत्येचें पातक लागतें. गृह्याग्नीचा त्याग करूं नये व वेदाभ्यास कधीं सोडूं नये; तसेंच ब्राह्मणाला ओरडावयास लावूं नये. या साऱ्या गोष्टी ब्रह्महत्येसमान आहेत.'

( ६ ) यावर युधिष्ठिरानें विचारिलें, ' आजोबा, चांगले ब्राह्मण म्हणजे कसे असावे, कोणाला दान दिलें असतां मोठें फळ मिळतें, तसेंच कोणाला भोजन घालावें, तें मला सांगा.' भीष्मानें उत्तर केलें, ' ज्या ब्राह्मणांना राग येत नाहीं, जे धर्मशील असतात, नित्य सत्य बोलतात आणि इंद्रियदमनांत ज्यांना आनंद वाटतो, ते चांगले होत; त्यांना दान दिल्यानें मोठें फळ प्राप्त होतें. ज्यांना गर्व नाहीं, जे सहनशील व निश्चयी आहेत, ज्यांनीं इंद्रियनिग्रह केलेला आहे, तसेंच सर्व प्राण्यांच्या हिताविषयीं जे मित्रासारखे दक्ष असतात, त्यांना दिलेलें दान मोठें फलदायी असतें. निर्लोभी, पवित्र, विद्यायुक्त, भिडस्त, सत्यवादी, आणि आपल्या कर्तव्यांत गढून गेलेल्या ब्राह्मणांना जें द्यावें त्याचें फळ मोठें मिळतें. जो श्रेष्ठ ब्राह्मण सहाहि अंगांसहित वेदांचें अध्ययन करतो आणि सहाहि* कर्मांमध्यें गढलेला असतो त्यालाच ऋषींनीं सत्पात्र म्हटलें आहे; अशा जातीच्या ब्राह्मणाला दिलेलें दान महाफलप्रद होतें. गुणी पुरुषाला दान देणाराला दानाच्या सहस्रपट फळ मिळतें. बुद्धिमत्ता, विद्वत्ता, उत्तम आचरण, सुस्वभाव, यांनीं युक्त असा ब्राह्मण एकटा असला तरी सर्व कुळाचा उद्धार करूं शकतो. अशा ब्राह्मणाला गाय, घोडा, द्रव्य, अन्न किंवा दुसऱ्या वस्तु द्याव्या, म्हणजे परलोकीं दुखाचा प्रसंग येत नाहीं. केवळ निर्दोष असाहि एकटा ब्राह्मण जर कुळाचा उद्धार करूं शकतो, तर उपर्युक्त गुणांनीं युक्त असलेला काय न करील ? म्हणून सत्पात्र ब्राह्मणाची योजना करणें उत्तम. साधूंना मान्य असा गुणयुक्त ब्राह्मण असेल, तर त्याला लांबूनहि आणावें आणि त्याचा सत्कार करून सर्वतोपरि त्याची पूजा करावी. ' १३. १. २२.

---

## अध्याय २३ वा.

[ १ श्राद्धकर्माच्या स्वरूपाविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न व त्याला भीष्माचें उत्तर. २ देवकार्य व पितृकार्य यांत कोणाला दिलेलें दान श्रेष्ठ याविषयीं युधिष्ठिर व भीष्म यांचीं प्रश्नोत्तरें. ]

( १ ) **युधिष्ठिरः—' श्राद्धप्रसंगीं देवकार्य व पितृकार्य यासंबंधानें देव आणि ऋषि यांनीं काय सांगितलें आहे, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे.'**

---

* अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान आणि प्रतिग्रह हीं सहा कर्में.

**भीष्मः**—‘ राजा, देवकार्य दुपारापूर्वी व पितृकार्य त्यानंतर करावें. तें करण्यापूर्वी मंगलस्नानानें शुद्ध आणि पवित्र आचरणानें युक्त होऊन दक्षतेनें रहावें. दोन प्रहरीं मनुष्यांना काय द्यावयाचें तें आदरानें द्यावें. भलत्याच वेळीं दिलेलें दान राक्षसांचा भाग असतें. तसेंच ज्यावरून कोणी ओलांडून गेलें आहे, कोणी ज्याला चाटिलें आहे, किंवा भांडण करून जें दिलें आहे, अथवा ज्यावर रजस्वला स्त्रीची दृष्टि गेली आहे तसलें अन्न राक्षसाच्याच वांट्याचें समजावें. वाच्यता करून दिलेलें, व्रतहीन माणसानें अंशतः खाल्लेलें, कुत्र्याचा स्पर्श झालेलें, केश किंवा कीटक ज्यांत आहेत असें, थुंकी पडलेलें, कुत्र्यांनीं पाहिलेलें, पायाला लागलेलें, ओंकाराचा उच्चार न करतां किंवा जवळ शस्त्र ठेवून खाल्लेलें, दुसऱ्यानें उष्टें केलेलें, देवादिकांना ज्याचा अंश मिळालेला नाहीं असें, तसेंच मंत्रहीन, संस्कारहीन, असें जें अन्न श्राद्धप्रसंगीं तिन्ही वर्णांनीं वाढावें तें सारें राक्षसांच्या वांट्याचें होय असें म्हटलें आहे. तसेंच तुपाची आहुति न देतां जें वाढावें किंवा दुराचारी माणसानें जें अंशतः खाल्लेलें असेल तेंहि अन्न राक्षसांचेंच होय. देव व पितर तसल्या अन्नाचा स्वीकार करीत नाहींत. राजा, राक्षसांचा भाग असा आहे, तो तुला सांगितला. आतां यापुढें दानाला अपात्र ब्राह्मण कोण तें सांगतों, ऐक. जे कोणी ब्राह्मण पतित असतील, किंवा अडाणी अथवा उन्मत्त असतील, त्यांना देवकार्य व पितृकार्य यांत स्थान देणें योग्य नाहीं. राजा, त्या प्रमाणेंच श्वेतकुष्ठी, नपुंसक, क्षयी, अपस्मारी, अंधळे यांनांहि त्या कार्याला बोलावूं नये. वैद्य, पुजारी, ढोंगी, सोमविक्रय करणारे, गायक, वर्तक, बजवय्ये, कथेकरी, मल्ल, शुद्राकडून यज्ञ करविणारे, शूद्राचे अध्यापक, शूद्रांशीं अध्ययन करणारे अशा ब्राह्मणांनाहि श्राद्धाचें आमंत्रण देऊं नये. वेतन घेऊन विद्यादान देणारे, अशांचें शिष्यत्व पत्करलेले, हे वेदविक्रय करणारे असल्यामुळें त्यांनाहि बोलावूं नये. आधीं जेऊं घातलेला तसाच मोठा विद्वान पण अन्यवर्णीय स्त्रीशीं विवाह केलेला ब्राह्मण श्राद्धकर्माला अपात्र होय. अग्निहोत्री नसलेले, प्रेतवाहक, चोर, महापातकांनीं पतित झालेले, पूर्वीची ज्याविषयींची मुळींच माहिती नाहीं असे, ग्रामाधिकारी, पुत्रिकापुत्र म्हणजे मुलगा होईल तो आपला या अटीवर दिलेल्या कन्येचे पुत्र, व्याजबट्टा करणारे, प्राणी विकून निर्वाह करणारे, स्त्रियांनीं मिळविलेल्या द्रव्यावर जगणारे, वेश्यागमन करणारे, संध्यावन्दनादि कृत्यें न करणारे, अशा ब्राह्मणांना श्राद्धकर्म व देवकार्य यांत स्थान देणें अयोग्य होय. राजा, आतां दाता व प्रतिग्रहीता यांचे गुण सांगतों, ते ऐक.

कृषिकर्म करणारे असूनहि जे गुणयुक्त व व्रतानुष्ठान करणारे असतील, तसेंच गायत्रीजपपूर्वक जे नित्य कर्मे करतात अशा ब्राह्मणांना श्राद्धाला बोलावणें युक्त आहे. युद्धांत क्षात्रतेज दाखविणाऱ्या कुलीन ब्राह्मणाला क्षण द्यावा, पण वैश्यवृत्तीनें रहाणाऱ्याला मात्र कधीं देऊं नये. अग्निहोत्री, गांवांत राहणारा, चोरी न करितां अतिथिसत्कार करणारा, त्रिकाळ गायत्रीजप करून भिक्षावृत्तीनें आपलीं कर्मे चालविणारा असा ब्राह्मण श्राद्धाला सत्पात्र होय. प्रतिदिवशीं सकाळीं मिळालेलें द्रव्य दुपारीं वेंचून टाकणारा व दुपारीं मिळालेलें संध्याकाळीं वेचून टाकणारा, कोणाला पीडा न देणारा आणि लहानसहान दोष मात्र ज्याला आहेत असा ब्राह्मण श्राद्धाचा क्षण देण्यास योग्य होय. निष्कपटी, वितंडवाद न करणारा, आणि संसर्गाला योग्य अशाच घरीं भिक्षा मागून वृत्ति चालविणारा ब्राह्मण श्राद्धाला उचित समजावा. व्रतानुष्ठान न करणारा, लबाड, चोर, प्राणी विकून द्रव्य मिळविणारा, असा ब्राह्मण जर पुढें यज्ञांत सोमपान करणारा झाला, तर तोहि श्राद्धाला पात्र होतो. वाटेल त्या भयंकर मार्गांनीं द्रव्य संपादून जर कोणी ब्राह्मण त्याचा विनियोग सर्व प्रकारच्या अतिथींच्या सत्काराकडे करील, तर तो श्राद्धाच्या कामाला योग्य होय.

वेद विकून किंवा स्त्रीच्या बळावर मिळविलेलें, तसेंच दीनवाणेपणा करून संपादिलेलें द्रव्य पितृकर्मी ब्राह्मणाला देऊं नये. राजा, श्राद्धसमाप्तीच्या वेळीं जो ब्राह्मण अवश्य असे 'युक्तम्, अस्तु, स्वधा,' इत्यादि शब्द उच्चारणार नाहीं त्याला गाईची खोटी शपथ घेतल्याचें पाप लागतें. युधिष्ठिरा, ब्राह्मण घरीं येणें, दूध दहीं यांची प्राप्ति, अमवास्येचा दिवस व रानपशूचें मांस मिळणें, या गोष्टी जमल्यास तोच काल श्राद्धाला योग्य होय. श्राद्ध समाप्त झाल्यावर ब्राह्मणाच्या घरीं 'स्वधा' शब्द उच्चारावा, क्षत्रियाच्या घरीं 'पितर संतुष्ट होवोत' असें म्हणावें, वैश्याच्या घरीं, 'अक्षय्य असो' असे शब्द म्हणावे व शूद्रश्राद्धप्रसंगीं 'स्वस्ति' असा शब्द म्हणावा. ब्राह्मणाकडील पुण्याहवाचनाच्या वेळीं ओंकारयुक्त प्रतिवचन ('ॐ पुण्याहमस्तु' असें) द्यावें व क्षत्रियाकडे ओंकाररहित द्यावें. वैश्याकडील देवकार्यांत 'देवता संतुष्ट होवोत' असें म्हणावें. आतां ब्राह्मणादि वर्णांचीं कार्यें विधिपूर्वक कशीं करावीं तें सांगतों, ऐक. जातकर्म आदिकरून संस्कार ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तिन्ही वर्णांना मंत्रोक्तच करावे. उपनयन सस्कारांत ब्राह्मणाला मुंजगवताची मेखला द्यावी, क्षत्रियाला धनुष्याच्या

दोरीची द्यावी आणि वैश्याला बल्वज नामक गवताची द्यावी. युधिष्ठिरा, असा या विषयींचा धर्म आहे.

युधिष्ठिरा, आतां दाता व प्रतिग्रहीता यांचे धर्माधर्म तूं ऐकून घे. खोटें बोलणें हें ब्राह्मणाचें पाप होय. तें क्षत्रियाच्या बाबतींत चार पट मोठें व वैश्याच्या बाबतींत आठ पट होतें. ब्राह्मणानें ब्राह्मणाला आमंत्रण दिलें असतां आमंत्रितानें दुसरीकडे खाऊं नये. तसें केल्यानें पशुहिंसेचा दोष त्याला लागतो. क्षत्रिय व वैश्य यांच्याकडे बोलाविलें असतां दुसरीकडे जेवणारालाहि तोच दोष अर्ध्यानें लागतो. ब्राह्मणादि त्रैवर्णिकांच्या देवपितृकार्यांत जो ब्राह्मण स्नान न करतां भोजन करील, त्याला खोटेपणानें गाईची शपथ घेतल्याचें पाप लागतें. जो ब्राह्मण सुतकी किंवा सोहेराचा असतां त्रैवर्णिकांकडे जाणून बुजून द्रव्यलोभानें भोजन करील त्यालाहि तसेंच पातक लागतें. एक उद्देश असतां दुसराच सांगून जो कोणी द्रव्य मिळवूं पाहील, त्याला गाईच्या खोट्या शपथेचें पाप घडतें. वेदाभ्यास व व्रताचरण न करणाऱ्या व अनाचारी अशा ब्राह्मणाला जो त्रैवर्णिक देवपितृकार्यांत भोजन घालील तोहि असत्याचा धनी होतो.'

देवकर्म व पितृकर्म यांत जें दान द्यावयाचें तें काय दिलें असतां त्याचें मोठें फळ मिळतें तें जाणण्याची इच्छा युधिष्ठिरानें दर्शविल्यावरून भीष्म म्हणाला, ' युधिष्ठिरा, शेतकरी जशी चांगल्या पावसाची वाट पहातात, तशी ज्यांचें जेवण होण्याची वाट स्त्रिया पानांतील व तपेलींतील अन्नासाठीं पहात असतात, अशांना भोजन घालणें बरें ( कारण त्यांच्या घरीं एकदां शिजविण्यापुरतेंच धान्य असतें. ) जे सदाचरणांत निमग्न असून शरीरानें कृश असतात व ज्याचें निर्वाहाचें साधन अल्प असल्यामुळें जे आपल्याकडे मागण्यासाठीं येतात, त्यांना दान दिल्याचें मोठें श्रेय आहे. सदाचरण हेंच ज्याचें अन्न, तेंच घर व तेंच बळ असतें, असे लोक कांहीं उद्देशानें मागावयास आले असतां त्यांना दिलेलें दान मोठें फलदायक होतें. चोर किंवा शत्रु यांच्या भयानें पीडलेले जे याचक खावयास मागतात, त्यांना अन्नदान करणें फार श्रेयस्कर आहे. ज्या निष्कपटी ब्राह्मणाचे पुत्र दारिद्र्यामुळें मूठभर अन्नासाठीं भिक्षा मागत फिरतात, त्यांना अन्न देणें महाफलप्रद होय. देशावर संकट येऊन जे आपलें द्रव्य व स्त्रिया यांना मुकले व त्यामुळें ज्यांना द्रव्ययाचना करावी लागत आहे, तसेंच व्रतें व नियम यांचें आचरण शास्त्रोचित करून त्याच्या समाप्तीसाठीं जे द्रव्य मागतात, त्यांना ते देणें महापुण्यप्रद आहे. पाखंडी लोकांच्या दुर्वर्तना-

पासून जे फार दूर असतात असे कृशशरीराचे व दरिद्री ब्राह्मण निर्दोष असतांहि जर बलिष्ठांकडून लुबाडले गेले असतील, तर त्यांनीं अन्न मागितलें असतां तें देणें श्रेयस्कर होय. एकनिष्ठपणें तप करणाऱ्या तपस्व्यांच्या उपयोगासाठींच जे कांहींतरी मागावयास येतात, त्यांना तें दिल्यानेंहि मोठें फळ मिळतें.

युधिष्ठिरा, कोणत्या दानाचें महापुण्य आहे, तें तूं आतांपर्यंत ऐकिलेंस. आतां स्वर्गाची किंवा नरकाची प्राप्ति कशामुळें होते तें सांगतों, ऐक. गुरूसाठीं किंवा अभय मिळावें म्हणून जे असत्य भाषण करतात ते वगळतां इतर असत्यभाषी लोक नरकास जातात. परस्त्रिया पळविणारे व परस्त्रियांना त्रास देणारे, तसेंच तसल्या कामीं साह्य करणारे हेहि नरकास जाणारे होत. जे दुसऱ्याचें द्रव्य हरण करतात, त्याचा नाश करतात, किंवा तसें करण्यास इतरांना प्रोत्साहन देतात, त्यांना नरकाचीच वाट सांपडते. पाणपोया, सभागृहें, पूल, घरें, इत्यादिकांचा नाश करणारे लोक नरकाचेच वांटेकरी होत. अनाथ, अल्पवयी, वृद्ध, घाबरलेली किंवा दीन अशा स्त्रीला फसविणारे लोक खरोखर नरकांतच जाणार. जे कोणाचा वृत्तिच्छेद करतात, कोणाचीं घरें दारें फोडतात किंवा मित्र फोडतात, तसेंच कोणाचा आशाभंग करतात त्यांचीहि तीच वाट होते. चहाड-खोर, पूल मोडणारे, दुसऱ्याच्या पोटावर पाय आणणारे, मित्रांविषयीं कृतघ्न, असल्या लोकांना नरकप्राप्तीच होते. वेदनिंदक, सज्जनांना दोष लावणारे, धर्म-नियम मोडणारे, हलकट वर्तन करणारे, लोकांविरुद्ध आचरण करणारे, खोटे व्यवहार करणारे, व्याज फार घेणारे, तसेंच द्यूत खेळणारे, बऱ्यावाईटाची पारख नसणारे, प्राणिहिंसेंत तत्पर असलेले, आशेनें काम करणाऱ्या सेवकाला प्रथम कांहीं देण्याचें ठरवून मागून न देणारे, धन्यापासून सेवकांना काढून घेणारे, स्त्रियांना वगळून आपणच वस्तूंचा उपभोग घेणारे, तसेंच अग्नि, सेवक व अतिथि यांना न देतां स्वतः मात्र खाणारे, वेद विकणारे व त्यांना देणारे, वेद लिहून पोट भरणारे, चारी आश्रमांतील कोणत्याहि आश्रमांच्या नियमानें न राहणारे, वेदांना न मानणारे, दुष्ट कर्में करून पोटाला मिळविणारे, केश, विष व दूध यांचा विक्रय करणारे, ब्राह्मण, गाई व कन्या यांच्या इच्छेच्या आड येणारे, शस्त्रें करणारे व विकणारे, बाण व धनुष्यें करून विकणारे, जाण्यायेण्याच्या वाटा दगड कांटे खळगे यांनीं रोधून टाकणारे, उपाध्याय सेवक वा अनुयायी यांचा कारणा-शिवाय त्याग करणारे, वयांत येण्यापूर्वींच बैल आदि करून प्राण्यांना कामाला लावून दमविणारे, त्यांच्या नाकांत वेसण घालणारे, पशूंना नित्य बांधून ठेवणारे

हे सर्व नरकास जाणारे होत. प्रजेपासून कर घेऊनहि तिचें रक्षण न करणारे, सामर्थ्य असूनहि कोणाला कांहीं न देणारे, क्षमाशील व इंद्रियदमनी अशा ज्ञात्यांना दीर्घकाळ जवळ ठेऊन काम झाल्यावर त्यांना लावून देणारे असे राजे नरकाचीच खरोखर वाट धरतात. लहान मुलें, वृद्ध माणसें, व सेवक यांना न देतां आपणच खाणारे, हे सर्व नरकास जाण्यासच योग्य होत.

युधिष्ठिरा, आतां स्वर्गाचे वांटेकरी कोण तें सांगतों, ऐकून घे. प्रथम हें लक्षांत ठेव कीं कोणत्याहि देवकार्यांत ब्राह्मणांचा उपमर्द केला असतां पशुपुत्र यांचा सर्वस्वीं नाश होत असतो. दानानें, तपानें व सत्य भाषणानें जे धर्माचें अनुकरण करतात ते लोक स्वर्गास जातात. गुरुशुश्रूषेनें व तपश्चर्येच्या बळावर विद्या प्राप्त करून घेऊन जे प्रतिग्रहाविषयीं तटस्थ असतात त्यांना स्वर्गप्राप्ति होते. लोकांना भय, पाप, रोग, दारिद्र्य, संकट, यांपासून मुक्त करण्यास जे कारण होतात तेहि स्वर्गाचे वांटेकरी होतात. क्षमाशील, धैर्ययुक्त, धर्मकार्यप्रवृत्त, सदाचारसंपन्न, मद्यमांसापासून निवृत्त, परस्त्रियांकडे न पहाणारे, आश्रमांचे व कुलांचे संस्थापक, तसेच देश व नगरें वसविणारे, वस्त्रें व अलकार यांचें दान करणारे, अन्नपाणी देणारे, दीन-दुबळ्यांना अन्नपाणी देणारे, लोकांचीं लग्नें करून देणारे, कोणाचीहि हिंसा न करतां सर्वांना साह्य करणारे, सर्वांना आधारभूत, असे लोक स्वर्गासच जाणारे होत. इंद्रियें स्वाधीन ठेवून मातापित्यांची सेवा करणारे व भावांवर प्रेम करणारे, श्रीमंत, बलवंत व तरुण असतांहि धैर्यानें इंद्रियें जिंकणारे, अपराध्यांवर दया करणारे, हलक्या लोकांशीं मधुर भाषण करणारे व प्रसन्न करून घेण्यास सोपे, असे पुरुष स्वर्गास जाण्यास पात्र समजावे. सहस्रावधि लोकांना अन्न वांटणारे, सहस्रावधींना दान देणारे, सहस्रावधींचें रक्षण करणारे, सोनें गाई घोडे रथ यांचें दान करणारे, विवाहप्रसंगीं अलंकार वस्त्रें व दासदासी यांचा लोकांना पुरवठा करणारे, मठ, धर्मशाळा, उद्यानें, विहिर, रमणीय उपवनें, सभागृहें, पाणपोया, घाट इत्यादि बांधणारे व घरें, शेतें, वसतीचीं ठिकाणें कोणी मागितल्यास त्यांना तीं देणारे पुरुष स्वर्गाचे अधिकारी होतात. रस, बीज, धान्यें, हीं स्वतः उत्पन्न करून लोकांना जे देतात, कोणत्याहि कुळांत उत्पन्न झालेले असले तरी अनेक पुत्र प्राप्त करून जे शतायुषी होतात व क्रोधावर जय मिळवून दयाशील होतात ते पुरुष स्वर्गास जाणारे होत. याप्रमाणें पूर्वींपासून ऋषींनीं स्वर्गप्राप्तीस्तव देवकार्य, पितृकार्य व दानधर्म हीं जशीं केलीं व आतांहि करीत असतात तीं मीं तुला सांगितलीं आहेत. १३.१.२३.

## अध्याय २४ वा.

[ १ हिंसेवांचूनहि ब्रह्महत्या कशी घडते याविषयीं युधिष्ठिर व भीष्म यांमधील प्रश्नोत्तरें. ]

( १ ) **युधिष्ठिरः**—भीष्म महाराज, हिंसा न करतां सुद्धां ब्रह्महत्या कशी घडून येते, हें मला नीट समजावून सांगावें.

**भीष्मः**—राजा युधिष्ठिरा, पूर्वी मी एकदां व्यासाला बोलावून हाच प्रश्न विचारिला होता. त्यावर त्यांनीं मला जें सांगितलें तेंच मीं तुला आतां सांगतों, लक्ष देऊन ऐकून घे. माझा तो प्रश्न ऐकून धर्मांत निष्णात अशा त्या व्यास मुनीनें माझा संशय नाहींसा होईल असें समर्पक उत्तर दिलें. तो म्हणाला, 'दरिद्री ब्राह्मणाला भिक्षेसाठीं आपण स्वतः बोलावून मग जो त्याला नाहीं म्हणतो, त्याला ब्राह्मणघातक समजावें. कोणाच्या भानगडींत न पडतां वेदपठनांत रममाण होणाऱ्या ब्राह्मणाच्या निर्वाहाचें साधन जो दुष्टपणें हरण करतो, किंवा तहानेलेला गाईंचा कळप पाण्यासाठीं वणवण फिरत असतां त्यांच्या मार्गांत जो विघ्न आणतो, तो ब्रह्महत्येचें पाप करतो असें समज. स्वयंप्रवृत्त अशी श्रुति आणि ऋषिप्रणीत शास्त्र यांना न जाणतांच जो दूषण देतो, आपली रूपसंपन्न कन्या विवाहयोग्य झाली असतांहि जो तिला अनुरूप वराला देत नाहीं, मूर्खपणामुळें अधर्मांत रत होऊन जो निष्कारण ब्राह्मणांना मर्मभेदक शब्द बोलून पीडा देतो किंवा अंधळा, पांगळा, अडाणी, अशा दीनांचें द्रव्य जो हरण करतो, तो ब्राह्मणवधच करतो. तसेंच आश्रम, अरण्य, गांव, नगर या ठिकाणीं जो अग्नि टाकतो तोहि ब्रह्महत्या करणारा होय. १३. १. २४.

---

## अध्याय २५ वा.

[ १ पवित्र तीर्थांचें वृत्त युधिष्ठिरानें विचारिल्यावरून भीष्म त्याला हें सागतो. ]

( १ ) **युधिष्ठिरः**—भीष्म आजोबा, तीर्थांचें दर्शन करून त्यांत स्नान करणें व त्यांचा इतिहास ऐकणें हें कल्याणकारक आहे. तें ऐकण्याची माझी इच्छा असल्यामुळें, पृथ्वींत जीं पवित्र तीर्थें आहेत, त्यांचें वृत्त तूं मला कृपा करून सांग; तें ऐकण्यास मीं उत्सुक आहें.

**भीष्मः**—तीर्थांचा सारा इतिहास पूर्वी अंगिरा ऋषीनें सांगितला होता. तोच मी तुला सांगतों. त्यापासून तुला उत्तम प्रकारचा धर्म घडेल. गौतम मुनि

आपलीं व्रतें पूर्ण केल्यावर एकदां तपोवनांत असलेल्या महर्षि अंगिरसाकडे गेला आणि त्याला विचारूं लागला, कीं तीर्थाविषयीं मला कांहीं संशय आहे, तरी त्याचें निरसन आपल्याकडून ऐकण्याची माझी इच्छा आहे, कृपा करून तें मला सांगा. त्या तीर्थांत स्नान केल्यानें मरणोत्तर काय फळ मिळतें तें मला सांगावें. अंगिरा मुनीनें उत्तर केलें, निराहार राहून सात दिवस जो लाटांनीं उचंबळणाऱ्या चंद्रभागा किंवा जिला वितस्ताहि म्हणतात त्या नदींत स्नान करील तो निष्पाप मुनि होईल. काश्मीर देशांत ज्या नद्या सिंधु नदीला मिळतात, त्या नद्यांत व सिंधूंत स्नान करणारा शीलवान् पुरुष स्वर्गास जातो. पुष्कर, प्रभास, नैमिष, सागर, देविका, इंद्रमार्ग आणि स्वर्णबिन्दु या तीर्थांत स्नान केल्यास मनुष्य ज्ञानी होऊन विमानांतून स्वर्गाला जातो व अप्सरा त्याचें स्तवन करतात. हिरण्यबिंदु तीर्थांत स्नान करून कुशेशय व देवंत या क्षेत्रांना मनोभावानें नमस्कार केल्यास सारें पाप नष्ट होतें. गंधमाधन पर्वतावरील इंद्रतोया नदींत तसेंच करतोया व कुरंग या तीर्थीं तीन दिवस उपास करून स्नान केल्यानें मनुष्य पवित्र होऊन त्याला अश्वमेधाचें फळ मिळतें. गंगाद्वार, कुशावर्त, बिल्वक, नीलपर्वत तसेंच कनखल येथें स्नान केल्यास मनुष्य निष्पाप होऊन स्वर्गीं जातो. अपांहृद नांवाच्या तीर्थांतील स्नानानें अश्वमेधाचें पुण्य लागतें. उत्तरदिशेला जेथून भागीरथी पर्वतावरून खालीं येते तेथें एक महिनाभर कांहीं न खातां जो कोणी ब्रह्मचारी क्रोध आवरून सत्य भाषण करीत व कोणालाहि पीडा न देतां राहून महेश्वराच्या तिन्ही ठिकाणीं तीर्थांत स्नान करील त्याला देवता दिसतील. सप्तगंगा, त्रिगंगा व इन्द्रमार्ग या ठिकाणीं देवपितृतर्पण करणाराला पुढील जन्म प्राप्त झाल्यास अमृत सेवावयास मिळेल. जो अग्निहोत्री शुद्ध होऊन महाश्रमांत महिनाभर निराहार राहून स्नान करतो त्याला महिन्यांतच सिद्धि मिळते. निर्लोभीपणें भृगुतुंगांत स्नान केल्यानें व त्रिरात्र उपोषण केल्यानें मनुष्य ब्रह्महत्येपासूनहि मुक्त होतो. कन्याकूपांत स्नान करून बलाकेंत आचमनादि केल्यास मनुष्याला देवलोकीं कीर्ति मिळते. देविका व सुंदरिका येथील डोहांत स्नान केल्यानें मृत्यूनंतर सौंदर्य व तेज मिळतात. एक पंधरवडा उपास करून महागंगेंत कृत्तिका व अंगारक या तीर्थांजवळ स्नान केल्यास स्वर्ग मिळतो. वैमानिक व किंकिणिका या तीर्थीं स्नान केल्यानें मनुष्य अप्सरांच्या लोकीं वाटेल तिकडे जाण्यास समर्थ होतो व त्याला त्यांच्याकडून मान मिळतो. कलिकाश्रमीं विपाशा नदींत स्नान केल्यास संसारा-

पासून मुक्ति मिळते. कृत्तिकाश्रमांत स्नान करून व महादेवाची पूजा करून जो पितृतर्पण करतो तो पापमुक्त होऊन स्वर्गास जातो. तीन रात्रीं उपोषित व पवित्र राहून महापुरांत स्नान केल्यास जंगम पदार्थांचें व पक्ष्यांचें भय नाहींसें होतें. सात दिवसांच्या उपोषणानें देवदारुवनांत स्नान केल्यानें देवलोक मिळतो. शरस्तंब, कुशस्तंब व द्रोणशर्म या ठिकाणींच्या धबधब्यांतील स्नानानें अप्सरांच्या सेवेला मनुष्य पात्र होतो. चित्रकूट, जनस्थान, व गंगाजल यांत उपास करून स्नान केल्यास राजलक्ष्मी सेवेला तत्पर रहाते. श्यामाश्रमांत एक पंधरवडा निराहार राहून स्नान केल्यास गंधर्वांची अंतर्धान पावण्याची शक्ति प्राप्त होते. कौशिकी नदीवर वायु भक्षण करीत निर्लोभीपणें एकवीस दिवस रहावें म्हणजे मनुष्य स्वर्गास जातो. मतंग वापींत स्नान केल्यानें एकाच रात्रींत सिद्धि मिळते. इंद्रियदमन करून नैमिष व स्वर्गतीर्थ येथें एक महिना स्नान केल्यास पुरुषमेधाचें फल मिळतें. गंगाऱ्हद व उत्पलावन येथें महिनाभर स्नान केल्यास अश्वमेधाचें पुण्य जोडतें. गंगायमुनांच्या संगमावर व कालंजर पर्वतावर महिनाभर स्नान करावें म्हणजे दहा अश्वमेधांचें फळ मिळतें. षष्टिहृदांतील स्नानाचें माहात्म्य अन्नदानापेक्षांहि अधिक आहे. माघी पौर्णिमेला प्रयागतीर्थीं तीन कोटी दहा सहस्र तीर्थें जमतात, तेथें व्रतपूर्वक मनोनिग्रह करून माघ महिना स्नान करावें म्हणजे निष्पाप होऊन स्वर्गाला जातां येतें. मरुद्गण, पित्राश्रम, व वैवस्वत तीर्थ येथें पवित्र होऊन स्नान केल्यास मनुष्य स्वतःच प्रत्यक्ष तीर्थ बनतो. ब्रह्मसरोवरीं जाऊन भागीरथींत एक महिना निराहारपूर्वक स्नान केल्यास चंद्रलोक प्राप्त होतो. उत्पातक व अष्टावक्र या तीर्थीं बारा-दिवस उपोषण करून स्नान केल्यास नरमेधाचें फल मिळतें. अश्मपृष्ठ, गया, निरविन्दपर्वत व तिसरी क्रौंचपदी येथील स्नानानें मनुष्य ब्रह्महत्येपासून मुक्त होतो. कलविङ्क तीर्थीं स्नान केल्यानें पुष्कळ पाणी व अग्निपुरांतील स्नानानें अग्निकन्यापुरींचा वास हीं प्राप्त होतात. करवीरक्षेत्रीं स्नान करून विशाल्य तीर्थावर आचमनादि केल्यानें व देवहृदावरील स्नानानें मनुष्य ब्रह्मरूप होऊन शोभूं लागतो. आवर्तनंदा व महानंदा यांत स्नान करणारा व कोणाला पीडा न देणारा मनुष्य नन्दनवनांत अप्सरांकडून सेविला जातो. कृत्तिकानक्षत्रीं ऊर्वशी तीर्थावर लोहितानदीतीरीं विधिपूर्वक स्नान केल्यानें पुंडरिकयागाचें पुण्य-जोडतें. रामहृदावर स्नान करून विपाशा नदींत आचमनादि केल्यास बारा दिव-सांच्या उपोषणानें मनुष्य पापमुक्त होतो. महाऱ्हदावर शुद्धान्तःकरणानें उपो-

षणपूर्वक एक महिना स्नान केल्यानें जमदग्नीला जी गति मिळाली ती गति माणसाला मिळते. सत्यभाषणी व परपीडा न करणारा माणूस विन्ध्य पर्वतावर विनयपूर्वक तप करील तर एका महिन्यांत त्याला सिद्धि मिळेल. नर्मदा व शूर्पारका या नद्यांत एक पंधरवडा उपोषणपूर्वक स्नान केल्यास राजाच्या पोटीं जन्म येतो. तीन महिने जम्बूमार्गावर निग्रहानें मनःपूर्वक राहिल्यास एकाच अहोरात्रांत सिद्धि मिळते. कोकामुखांत अवगाहन करून अञ्जलिकाश्रमास गेल्यास व तेथें शाक भक्षण करून फाटक्या वस्त्रांनिशीं राहिल्यास दहा कन्या उपभोगावयास मिळतात व त्या माणसाला कधीं मृत्यूच्या घरीं जावें लागत नाहीं. कन्याहृदीं जो रहातो त्याला देवलोक मिळतो. प्रभास तीर्थीं अमावास्येच्या एक रात्रीं निष्ठेनें राहिल्यास सिद्धि मिळून मनुष्य अमर होतो. आर्ष्टिषेण ऋषीच्या आश्रमांत उज्जानक तीर्थीं तसेंच पिंगेच्या आश्रमांत स्नान केल्यानें सर्व पापांपासून मनुष्य मुक्त होतो. कुल्या तीर्थांत स्नान करून जप व अघमर्षण केल्यानें तीन रात्रींच्या उपोषणानें मनुष्याला अश्वमेधाचें पुण्य मिळतें. पिंडारक तीर्थावर एक रात्र राहून पहांटेस स्नान केल्यास मनुष्य शुद्ध होऊन अग्निष्टोमाच्या पुण्याचा भागीदार होतो. धर्मारण्यामुळें सुशोभित झालेल्या ब्रह्मसरोवरांत स्नान केल्यानें शुद्ध होऊन माणसाला पुंडरीक यागाचें फळ मिळतें. मैनाक पर्वतावर एक महिना स्नानसंध्या केल्यास कामवासनेवर जय मिळून सर्व यज्ञांचें फळहि जोडतें. कालोदक, नन्दिकुंड, तसेंच उत्तर मानसतीर्थ येथें शंभर योजनांवरून येऊन स्नान करणारा गर्भघातकी असला तरी तो मुक्त होतो. तेथील नन्दीश्वराच्या मूर्तीच्या दर्शनानें पापमुक्त होत्साता मनुष्य ब्रह्मलोकास जातो. शंकराचा सासरा पवित्र हिमालयपर्वत प्रसिद्धच आहे. तो सर्व रत्नांची म्हणजे उत्तमोत्तम वस्तूंची खाणच असून त्यावर सिद्ध व चारण यांचा नित्यवास असतो. जो वेदाचें संपूर्ण अध्ययन केलेला मनुष्य जीवित अशाश्वत आहे असें जाणून देवतापूजनपूर्वक मुनींना नमस्कार करून तेथें अनाशक तीर्थावर शरीर विसर्जन करील तो सिद्ध होऊन स्वर्गास व तेथून पुढें शाश्वत अशा ब्रह्मलोकास जाईल. कामक्रोधादि विकारांवर विजय मिळवून जो तीर्थवास अंगीकारील त्याला त्या तीर्थगमनानें मिळालें नाहीं असें कांहीं रहाणारच नाहीं. जीं तीर्थें वाटेच्या कठीणपणामुळें जाण्यास अशक्य आहेत तेथें सर्व तीर्थांची कल्पना करून मनानेंच जावें. हें तीर्थमाहात्म्य पवित्र, पुण्यकारक व स्वर्गप्राप्ति करून देणारें असें श्रेष्ठ आहे. तें वेदांचें रहस्य असून पावन करणारें आहे. तें ब्राह्मणांना

सांगावें, आत्महितसाधकाला सांगावें, मित्रांच्या व आपल्याला अनुसरणाऱ्या शिष्याच्या कानांत हळूच सांगावें. महातपस्वी अंगिरामुनीनें पूर्वी हें गौतमाला काश्यपाच्या अनुज्ञेनें सांगितलें. महर्षींनाहि जप करण्यास तें योग्य असून पवित्र वस्तूंत श्रेष्ठ आहे. निर्मल अंतःकरणानें याचें नित्य उभा राहून पठण करणारा स्वर्गास जातो. अंगिरामुनीचें आवडतें असें हें गुह्य तीर्थमाहात्म्य जो कोणी मनःपूर्वक श्रवण करील त्याला उत्तम कुळांत जन्म मिळून पूर्वजन्मांचें स्मरणहि राहील. १३. १. २५

---

## अध्याय २६ वा.

( १. भीष्माचें दर्शन घेण्यासाठीं अत्रिवसिष्ठादि अनेक ऋषिगण येतात. २. कोणते देश, आश्रम, पर्वत व नद्या अत्यंत पवित्र आहेत याविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न व भीष्माचें उत्तर ३. शिलवृत्ति व सिद्ध यांचा संवाद. )

१. वैशंपायनः—बुद्धीनें बृहस्पतीसारखा, क्षमेंत ब्रह्मदेवासारखा, पराक्रमांत इन्द्रासारखा व तेजानें सूर्यासारखा असा जो गंगापुत्र भीष्म त्याला अर्जुनानें आपल्या बंधूंच्या साह्यानें मारिलें असतां, बाणशय्येवर अंतकालाची वाट पहात पडलेल्या त्या भारतकुलश्रेष्ठाला भेटण्यासाठीं एकदां बरेच महर्षि तेथें आले. त्यांत अत्रि, वसिष्ठ, भृगु, पुलह, पुलस्त्य, क्रतु, अंगिरा, गौतम, अगस्त्य, सुमति, विश्वामित्र, बृहस्पति, शुक्र, च्यवन, काश्यप, ध्रुव, दुर्वास, जमदग्नि, मार्कंडेय, गालव, कण्व, मेधातिथि, नारद, पर्वत, धौम्य, शतानंद, परशुराम, इत्यादिक होते. त्यांना आलेले पहातांच युधिष्ठिरानें आपल्या बंधूंसह त्यांची क्रमशः पूजा करून त्यांना आसनें दिलीं, व बसल्यावर त्यांनीं भीष्माविषयींच्या अनेक मधुर गोष्टी सांगितल्या. शुद्धान्तःकरणाच्या ऋषींच्या त्या कर्णमनोहर गोष्टी ऐकून आपण जणूं स्वर्गांतच आहों असें भीष्माला वाटलें व त्याला फार संतोष झाला. मग ते महर्षि भीष्माचा तसाच पांडवांचा निरोप घेऊन सर्वांच्या समक्ष अंतर्धान पावले. ते अंतर्धान पावले असतां त्यांची त्यांच्या मागेंहि सर्व पांडवांनीं स्तुति केली व त्यांना वारंवार नमस्कार केला. नंतर प्रसन्न मनानें ते सर्व पुनः भीष्माजवळ आले आणि मंत्रज्ञ जशी उदय पावणाऱ्या सूर्याची उपासना करतो तशी ते भीष्माची सेवा करूं लागले. त्या प्रभावशाली ऋषींच्या तेजानें प्रकाशित झालेल्या दाही दिशा पाहून

पांडवांना मोठा विस्मय वाटला व त्या महर्षींच्या थोर भाग्याचा विचार करीत ते भीष्मापाशीं पुनः गोष्टी करूं लागले. त्या कथा संपल्यावर युधिष्ठिरानें भीष्माच्या पायांवर मस्तक ठेवून त्याला पुनः प्रश्न करण्यास आरंभ केला.

२. युधिष्ठिरः—आजोबा, कोणते देश, कोणते प्रांत, तसेच कोणते आश्रम, पर्वत आणि कोणत्या नद्या पवित्रतेनें श्रेष्ठ समजाव्या बरें ? भीष्मानें उत्तर केलें, 'याविषयीं उञ्छवृत्तिशील आणि सिद्ध यांचा प्राचीन संवाद आहे. एकदां एक सिद्ध पृथ्वीवर फिरतां फिरतां एका शिलवृत्ति श्रेष्ठ गृहस्थाच्या घरीं आला. गृहस्थानें त्याची यथायुक्त पूजा केली व सिद्ध त्या ठिकाणीं सुखानें रात्रभर राहिला. दुसरे दि शीं सकाळीं शिलवृत्ति आपलीं प्रातःकालीन कृत्यें उरकून त्या अतिथिरूप सिद्धापाशीं आला व दोघांनीं एकत्र बसून यथास्थित गोष्टी केल्या. वेद व वेदांगें यांसंबंधाच्या त्या गोष्टी अर्थातच होत्या. राजा, गोष्टी सांगून झाल्यावर शिलवृत्तीनें सिद्धाला प्रयत्नानें हांक मारिली व आतां तूं जो देशादिकांच्या श्रेष्ठत्वाविषयींचा प्रश्न मला विचारिला तोच त्यानें त्या सिद्धाला विचारिला. तेव्हां सिद्धानें त्याला उत्तर दिलें तें असें.

३. सिद्धः—ज्या देशांत, प्रांतांत, आश्रमांत किंवा पर्वतांजवळ सर्व-नद्यांत श्रेष्ठ अशी गंगा वहाते तेच देश श्रेष्ठ होत. गंगोदकाच्या सेवनानें माणसाला जी गति मिळते, ती तप, ब्रह्मचर्य, यज्ञ, ज्ञान, यांतील कशानेंहि मिळत नाहीं. ज्यांचीं शरीरें गंगाजलाचा एकदां संसर्ग घडल्यावर पतन पावतात, त्यांना स्वर्ग सोडून जाण्याचा प्रसंगच कधीं येत नाहीं. ज्यांचीं सर्व कृत्यें गंगाजलानेंच होतात, ते पुरुष पृथ्वी सोडून गेल्यावर स्वर्गातच रहातात. पूर्ववयांत पापकृत्यें करून नंतर जे गंगेची सेवा करतात तेहि उत्तम गतीला जातात. गंगेच्या पवित्र जलानें जे मनोनिग्रही लोक स्नान करतात, त्यांना प्राप्त होणाऱ्या पुण्याची बरोबरी शंभर यज्ञांच्या पुण्यानेंहि होत नाहीं. माणसाच्या जितक्या अस्थि गंगाजलांत पडतात, तितकीं सहस्रवर्षें तो स्वर्ग-लोकीं महत्त्वाचें स्थान पावतो. उदयाच्या वेळीं रवि जसा काळोख नष्ट करून प्रकाशतो, तसा गंगाजलानें नाहालेला मनुष्य पापाला झाडून पुण्यानें शोभूं लागतो. ज्या प्रदेशांत पवित्र गंगाजल वहात नाहीं, ते देश चंद्रहीन रात्रीं-प्रमाणें किंवा पुष्पहीन वृक्षांप्रमाणें होत. वर्ण व आश्रम यांना ज्याप्रमाणें धर्मज्ञानावांचून कांहीं मोल नाहीं, किंवा सोमरसाशिवाय जसे यज्ञ, तसाच प्रकार गंगेच्या अभावीं जगाचा होईल. सूर्याशिवाय आकाश जसें शून्य, किंवा

पर्वतावांचून पृथ्वी जशी उघडी, अथवा वायुवांचून आकाश जसें रिकामें, तसाच प्रकार गंगाजलविहीन देशांचा व दिशांचा आहे. तिन्ही लोकांत जितके म्हणून प्राणी आहेत, तितके सारे शुभ अशा गंगाजलानेंच तृप्त होऊं शकतात. जे कोणी सूर्याच्या योगानें तापलेलें गंगेचें जल प्राशन करतात, त्यांना यावक व्रताहूनहि मोठें फल मिळतें !* शरीरशुद्धिकारक असें चांद्रायणव्रत सहस्र-वेळां करणारा आणि गंगाजल प्राशन करणारा या दोघांची योग्यता समान आहे. एका पायावर उभा राहून सहस्रयुगें तप करणारा आणि एक महिना गंगेंत उभा रहाणारा यांची बरोबरी होईल किंवा कदाचित् नाहींहि होणार. दहासहस्र युगें खालीं डोकें करून तप करणाऱ्यापेक्षां गंगेंत वाटेल तसा उभा रहाणाराच अधिक होय. अग्नींत टाकलेल्या कापसाचा जसा धुव्वा उडतो, तसाच गंगास्नान करणाऱ्याच्या पापाचा उडतो. दुःखानें ज्याचें मन पीडिलेलें आहे अशा आधारासाठीं धडपडणाऱ्या सर्वांचा आधार गंगेशिवाय कोणताहि नाहीं. गरुडाला पहातांच सर्प जसे विषहीन होतात, तसेच सारेजण गंगादर्श-नानें पापहीन होतात. ज्यांना कोणी आधार नाहीं आणि जे अधर्माचा आश्रय करतात, त्यांचा आधार, कल्याणकारक आणि संरक्षण म्हणजे गंगाच होय. अनेक महापातकांनीं ग्रासलेल्या अधःपतन पावणाऱ्या पुरुषांनीं गंगेचा आश्रय केला, तर तीच मरणोत्तर त्यांचें तारण करते. जे नित्य गंगास्नान करतात ते मुनि व इन्द्रादि देव यांच्या पुण्याचे वाटेकरी होतात. गंगेचा आश्रय करणारे लोक दांडगे, आचारहीन, अपवित्र व नीच असले तरी ते पवित्र होतात. देवांना जसें अमृत अथवा पितरांना जशी स्वधा किंवा नागांना जशी सुधा तसें माणसांना गंगोदक समजावें. क्षुधेनें पीडिलेलीं बालकें जशीं आईची मनधरणी करितात, तसे कल्याणेच्छु पुरुष गंगेची उपासना करतात. ब्रह्मदेवाचें स्थान जसें सर्वांत श्रेष्ठ, तशी गंगा ही स्नानासाठीं सर्व नद्यांत श्रेष्ठ होय. देवांच्या उपजीविकेला जशी गाय व पृथ्वी, तशी गंगा ही प्राणिमात्राच्या उपजीविकेला होय. सोमयागादि यज्ञसत्रांतील अमृतावर जशी देवांची उपजीविका चालते, तशी गंगाजलावर माणसांची चालते. गंगेच्या वाळवंटा-वरील उडालेल्या वाळूच्या कणांनीं माखलेले लोक स्वर्गांतच आपण शोभत

---

* गाईच्या शेणांतून सांपडणारे यवांचे दाणे खाऊन रहाणें याला यावकव्रत म्हणतात.

आहों असें मानतात. गंगेच्या तीरावरील माती जो मस्तकावर धारण करतो, तो पापरूप काळोखाच्या नाशासाठीं जणूं सूर्याचें तेजच धारण करतो. गंगेच्या लाटांनीं मारवलेला वायुप्रवाह जेव्हां माणसाच्या अंगाला स्पर्श करतो, तेव्हां तो तत्काल त्याचें पापहि आकर्षून घेतो. द्यूतमद्यादि व्यसनानीं वेढून गेलेल्या व नाश पावत असलेल्या मनुष्याचीं तीं व्यसनें गंगादर्शनानें होणाऱ्या आनंदानें नष्ट होतात. आपल्या कांठावरील हंस, कोकिल इत्यादि पक्ष्यांच्या मंजुळ रवांनीं गंगानदी गंधर्वांच्या गायनाशीं व वाळवंटानीं पर्वताशीं चढाओढ करीत असते. हंसादि विविध पक्ष्यांनीं व गाईंच्या कळपांनीं भरलेल्या तीरांनीं युक्त अशी गजबजून गेलेली गंगा नदी पाहून स्वर्गाचाहि विसर पडतो. माणसांना गंगेच्या वाळवंटावर जसा आनंद वाटतो तसा स्वर्गातील देवांना सर्व भोग भोगीत असतांहि वाटत नाहीं. वाणी, मन व कर्म यांनीं केलेल्या पापांनीं ग्रस्त झालेला मनुष्य गंगादर्शनानें पवित्र होतो, याविषयीं मला संशय नाहीं. गंगादर्शन, गंगास्नान व गंगापान करणारा पुरुष आपल्या पूर्वींच्या सात पिढ्या, पुढील सात पिढ्या आणि त्याच्याहि पलीकडच्या पिढ्या यांचें तारण करतो. गंगानामाचें श्रवण, तिच्या दर्शनाची इच्छा, तिचें जलपान, तिचा जलस्पर्श, दर्शन व तिच्यांतील स्नान यांच्यायोगानें मनुष्याच्या दोन्ही मातृपितृवंशांचा उद्धार होतो. गंगेनें आपल्या दर्शनस्पर्शनपानादिकांच्या योगानें सहस्रावधि पापी लोकांना तारिलें आहे. आपलें आयुष्य व अध्ययन सफळ व्हावें अशी इच्छा असेल तर मनुष्यानें गंगेवर जाऊन तेथें पितृतर्पण व देवतर्पण करावें. गंगेच्या योगानें जें फळ माणसाला मिळतें, तेंच फार तर पुत्र, वित्त, व कर्में यांच्या योगानें मिळेल. शक्ति असतांहि जे गंगादर्शनार्थ जात नाहींत ते जन्मांध, मृत किंवा पंगुच समजावे. भूत वर्तमान भविष्य जाणणारे महर्षि व इन्द्रादि देवसुद्धां जिची सेवा करतात, तिची सेवा कोणता मानव करणार नाहीं बरें? विद्वान असे वानप्रस्थ, गृहस्थ, संन्यासी, तसेच ब्रह्मचारी सुद्धां ज्या गंगेचा आश्रय करतात, तिचा आश्रय कोणता मनुष्य करणार नाहीं? मृत्युसमयीं जो मनानें गंगेचें ध्यान करील, त्याला उच्च गति मिळेल. देहपात होईतोंपर्यंत जो गंगेची उपासना करतो त्याला भयंकर वस्तु, पापें, राजदंड इत्यादिकांचें भयच नसतें. आकाशांतून पडणाऱ्या अति पवित्र गंगेला शिरावर धारण करून महेश्वर तिचीच स्वर्गांत सेवा करितो. तिच्या तीन पवित्र मार्गांनीं स्वर्ग, मृत्यु व पाताळ हे तीन लोक अलंकृत झाले आहेत. तिचें जल जो प्राशन

करील तो पुरुष धन्य होतो. आकाशस्थ तेजोगोलांत जसा सूर्य, किंवा पितरांत जसा चंद्र, अथवा माणसांत जसा राजा, तशी नद्यांत गंगा होय. गंगावियोगानें जसें दुःख होतें, तसें माता, पिता, पुत्र, स्त्रिया, धन, यांच्याहि वियोगानें होत नाहीं. उत्तमोत्तम दिव्य भोगांनीं, पुत्रांनीं, द्रव्यानें जी मनाची प्रसन्नता लाभत नाहीं, ती गंगादर्शनानें लाभते. पूर्ण चंद्राच्या दर्शनानें माणसाचे नेत्र जसे प्रफुल्लित होतात तसेच त्रिपथगा गंगेच्या दर्शनानेंहि होतात. गंगेच्या ठिकाणीं भक्ति ठेवून, सारें मन तिजकडे लावून जो एकनिष्ठपणें तिची आराधना करतो, त्याच्यावर ती संतुष्ट होते. भूमि, आकाश व स्वर्ग, येथील लहानथोर भूतमात्रांनीं नित्य गंगेंत अवगाहन करावें, हेंच त्यांचें श्रेष्ठ कर्तव्य होय. सगळ्या विश्वांत पवित्रपणाविषयीं गंगेची ख्याति झालेली आहे; कारण तिनें भस्मीभूत अशा सगरपुत्रांनाहि स्वर्गाला नेलें. वायूलहरींनीं उठविलेल्या गंगाप्रवाहावरील मनोहर अशा चंचल लाटांनीं तेजस्वी झालेले पुरुष सूर्यासारखे चमकूं लागतात. यज्ञांतील दूध व तूप या हविर्द्रव्यांनीं भरलेल्या समृद्धिशाली, व वेगानें वहात असल्यामुळें आंत उतरण्यास कठीण अशा विशाल गंगाप्रवाहांत जाऊन जे देहविसर्जन करितात, ते देवांच्या बरोबरीचे होतात. यशस्विनी व विश्वव्यापिनी अशा प्रचंड गंगानदीची सेवा इन्द्रादि देव, ऋषि आणि मानव हे सर्व करीत असतात व ती अन्ध जड व दरिद्री लोकांचे सर्व मनोरथ पूर्ण करते. अन्नादिकांची दात्री, अत्यंत पवित्र, सुखदायक, तीन मार्गांनीं जाणारी व तिन्ही लोकांचें संगोपन करणारी अशी जी गंगा तिचा ज्यांनीं आश्रय केला ते स्वर्गास गेले. जो कोणी मानव तिच्या कांठीं वास करील, अथवा तिचें दर्शन घेईल त्याला देव सुख देतील. तिचा स्पर्श व दर्शन यांच्या योगानें संतुष्ट झालेले देव त्याला इष्ट अशी गति दाखवितात. देवांची माता, विशाल-स्वरूपी, फार लांबून वहात येणारी, पवित्र, समृद्धियुक्त, भाग्यशाली, स्वच्छ जलानें युक्त, स्वयंप्रकाश, व सर्व प्राण्यांचा आधार, अशा गंगेचा ज्यांनीं आश्रय केला ते स्वर्गासच गेले. जिची कीर्ति आकाश, स्वर्ग, पृथ्वी आणि सर्व दिशा व उपदिशा यांत सतत भरून राहिली आहे, त्या श्रेष्ठ गंगानदीचें जल सेवि-ल्यानें सर्व माणसें कृतकृत्य होतात. 'ही पहा गंगा' असें म्हणून लोकांना जे तिचें दर्शन करवितात त्यांना मुक्त करणारी, कार्तिकस्वामी व सुवर्ण यांना जन्म देणारी, प्रातःकाळीं स्वर्गातून उतरणारी, मोक्ष देणारी, जलानें तुडुंब वहाणारी, निर्मळ, सर्व जगाला जल पुरविणारी, हिमालयाची कन्या, शंकराची पत्नी,

स्वर्ग व पृथ्वी यांना अलंकारासारखी असलेली, अशी ही भव्य गंगा तिन्ही लोकांना पुण्यप्रद आहे. गोड पाण्यानें वहाणारी, घृताच्या धारा सोडणारी, मोठ्या लाटांनीं शोभणारी स्वर्गमाता गंगा स्वर्गांतून निसटल्यावर शिवाच्या मस्तकीं आली व तेथून पर्वतावरून उतरून पृथ्वीवर आली. प्राणिमात्रांचें निर्मळ उगमस्थान, विश्वाचें पालन करणारी, इष्ट पुरविणारी, यश देणारी, व प्राण्यांची शाश्वत शय्याच अशी ही गंगा, आपल्या जलांत स्नान करणारांना स्वर्गभुवनाचा मार्ग दाखविते. क्षमेच्या दृष्टीनें पृथ्वीसमान, संरक्षण पोषण याविषयीं तशीच, तेजानें अग्नि किंवा सूर्य यांसारखी, अशी गंगा ब्राह्मणांना मान्य व कार्तिकेयाला अत्यंत प्रिय आहे. ऋषी जिची स्तुति करतात अशी पवित्रजलयुक्त, विष्णुपदापासून निघालेली जी प्राचीन गंगा तिला मनोभावें शरण जाणारे ब्रह्मलोकीं जातात. आत्मनिग्रही पुरुषांनीं ब्रह्मपदाची इच्छा असेल, तर नित्य सर्वगुणसंपन्न, व माता पुत्रांकडे पहाते तशी सर्वांना पहाणारी, अशा गंगेची मनःपूर्वक उपासना करावी. अमृतासारखें जल स्रवणारी पुष्ट धेनुच जशी, सर्वसाक्षी, विश्वपोषक, शिष्टांना आधारभूत, अशा गंगेचा आश्रय सिद्धि इच्छिणाऱ्यांनीं अवश्य करावा. सर्व देवांसह शंकराला प्रसन्न करून उग्र तपाच्या बळावर भगीरथानें जिला पृथ्वीवर आणिलें, त्या गंगेचा आश्रय करणाराला इहलोकीं व परलोकींहि भय रहात नाहीं. हे गंगे, मीं तुझ्या गुणांचा अगदीं अल्पसा भाग आपल्या बुद्धीप्रमाणें विचार करून वर्णिला आहे. तुझ्या सर्व गुणांचें वर्णन करणें किंवा ते जाणून घेणें हें सर्वस्वी माझ्या शक्तीबाहेरचें आहे. मेरूवरील दगडाचे कण मोजतां येतील, किंवा सागराच्या पाण्याच्या थेंबांचीहि गणति करतां येईल; पण गंगाजलाचे गुण संपूर्णपणें वर्णन करणें अशक्य होय. यास्तव जे हे गुण अल्प प्रमाणांत मीं श्रद्धापूर्वक वर्णिले आहेत, ते श्रद्धेनें ऐकणारा पुरुष मन, वाचा व कर्म अशा सर्व दृष्टींनीं भक्तियुक्त होईल. सिद्ध म्हणतो, 'हे शिलवृत्ते, गंगेच्या उपासनेनें तूं तिन्ही लोक आपल्या कीर्तीनें भरून व दुष्प्राप्य अशी मोठी सिद्धि मिळवून इष्ट लोकास जाशील व तेथें यथेष्ट विहार करशील.' ती महानुभाव गंगा आपल्या धर्मशील गुणांनीं तुझ्या व माझ्या बुद्धीला प्रेरणा करो. आपल्या भक्तांवर प्रेम करणारी ती गंगा त्यांना या जगीं सुखाची जोड करून देते.

भीष्म :—राजा, याप्रमाणें तो बुद्धिमान् व तेजस्वी सिद्ध गंगेचे विविध पण

सत्य गुण यथार्थपणें शिलवृत्तीला सांगून आकाशमार्गानें तेथून निघून गेला. शिलवृत्ति हि सिद्धाच्या उपदेशानें जागा होऊन व तदनुसार गंगेची विधिपुरःसर उपासना करून दुर्लभ अशा सिद्धीचा धनी झाला. युधिष्ठिरा, तूंहि मोठ्या भक्तीनें गंगेला शरण जा, म्हणजे तुला देखील उत्तम सिद्धि प्राप्त होईल.

वैशंपायनः—राजा जनमेजया, गंगेच्या स्तवनानें युक्त असा हा प्राचीन भीष्मोक्त इतिहास ऐकून युधिष्ठिर व त्याचे सर्व बंधु यांना मोठा आनंद झाला. हा इतिहास गंगास्तवनासह जो कोणी ऐकेल अथवा वाचील, तो सर्व पापांपासून मुक्त होईल. १३.१.२६

---

## अध्याय २७ वा.

[ १ युधिष्ठिरकृत भीष्मप्रशंसा व ब्राह्मण्यप्राप्तीविषयीं प्रश्न. २ गर्दभी व मतंग यांच्या संवादरूपानें भीष्माचें उत्तर. ]

**१. युधिष्ठिरः**—आजोबा, तुम्ही बुद्धिमत्ता, विद्वत्ता, सदाचरण, सुस्वभाव, सर्व सद्गुण आणि वयोवृद्धत्व यांनीं संपन्न आहां. या गुणांनीं आपण संपन्न असल्यामुळें मीं तुम्हाला धर्मविषयक प्रश्न विचारीत आहें. या जगांत तुम्हांवाचून दुसरा कोणी असले प्रश्न समजावून सांगणारा अधिकारी पुरुष नाहीं. क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र यांना जेणेंकरून ब्राह्मण्य प्राप्त करून घेतां येईल असा कांहीं उपाय असेल तर सांगा. ब्राह्मण्यप्राप्तीची इच्छा असल्यास तें मोठें तप, सत्कर्म, विद्वत्ता यांच्या योगानें मिळूं शकेल काय, तें मला सांगा.

**२. भीष्मः**—युधिष्ठिरा, क्षत्रियादि तिन्ही वर्णांना ब्राह्मण्य प्राप्त होणें अत्यंत कठिण असून सर्व मानवांत तें श्रेष्ठ स्थान होय. अनेक प्राणिजातींत वारंवार जन्म घेत असतां एखाद्या कालचक्रांत ब्राह्मणाचा जन्म मिळतो. याविषयीं मतंग आणि गर्दभी यांमधील जुना संवाद प्रसिद्धच आहे. युधिष्ठिरा, एका ब्राह्मणाला त्याच्याच वर्णाचा पुत्र होता. त्याचें नांव मतंग असें असून तो सर्व गुणांनीं श्रेष्ठ होता. एकदां एका यज्ञाला त्याला बोलाविलें असतां गर्दभ व त्याची आई अशी जोडी जोडलेल्या वेगवान् रथांत बसून तो घराहून निघाला. रथाला आईच्या बरोबरच जोडलेल्या त्या गर्दभाला मतंग वारंवार चाबकाच्या दांड्यानें टोंची. त्यामुळें त्याच्या नाकावर व्रण झाला. तो तीव्र व्रण पाहून पुत्रवात्सल्यानें दुःखी झालेली गर्दभी पोराला म्हणाली, 'बाळा, रडूं नको बरें. रथावर प्रत्यक्ष

चांडालच बसला आहे. कारण ब्राह्मणामध्यें कठोरपणा मुळींच नसतो, व ब्राह्मण म्हटला म्हणजे तो सर्वांचा मित्र असतो. सर्वांचा गुरु व उपदेष्टा असा ब्राह्मण कोणाला झालें तरी मारील कसा ? हा तर दुष्ट प्रकृतीचा असून तुज बालावर देखील दया करीत नाहीं. हा आपल्या खऱ्या जातीच्या वळणावर गेलेला आहे; कारण स्वभाव मुळाकडेच जातो.' गर्दभीचे हे तीव्र टीकात्मक शब्द ऐकून मतंग रथांतून खालीं उतरला आणि रासभीला म्हणाला, ' हे गर्दभि, तूं हिताचें बोलत आहेस. माझ्या मातेला कोणी दूषित केलें आणि तूं मला चांडाल म्हणून कां म्हणतेस तें मला लवकर सांग. मला चांडाल म्हटल्यानें माझें ब्राह्मण्य नष्ट होत आहे. तर तूं मला तसें कसें म्हणतेस ? तूं फार चतुर आहेस. तर वास्तविक प्रकार काय आहे तो मला सविस्तर सर्व सांग. '

गर्दभीः—' अरे, उन्मत्त झालेल्या ब्राह्मणीच्या ठायीं शूद्र जातीच्या नापितापासून तूं जन्मलेला असल्यामुळें तुझें ब्राह्मण्य नष्ट झालेलें आहे. '

गर्दभीचे शब्द ऐकून मतंग तसाच परत घरीं गेला. त्याला परत आलेला पाहून त्याचा पिता म्हणाला, ' अरे, मीं तुला यज्ञकार्यांत गुरू म्हणून मोठ्या स्थानावर योजिलें, मग तूं परत कां आलास ? तुझी प्रकृति तर ठीक आहेना ? ' मतंगानें उत्तर केलें, ' चांडालयोनींतील, किंवा तशाच हलक्या योनींतील मनुष्य ठीक कसा असेल ? बाबा, ज्या माझी ही आई आहे त्या माझें ठीक कसें असणार ? बाबा, या मनुष्येतर अशा गर्दभीनें मला सांगितलें कीं मीं ब्राह्मणीच्या पोटीं शूद्रापासून जन्मलों आहें. तरी मीं कडक तप करतों. ' असें पित्याला सांगून मतंग निश्चय करून बाहेर निघाला, आणि एका मोठ्या अरण्यांत जाऊन तेथें त्यानें मोठी तपश्चर्या केली. त्या तपाच्या सामर्थ्यामुळें देवांना ताप होऊं लागला. तेव्हां इंद्र त्याच्या जवळ जाऊन त्याला म्हणाला, ' मतंगा, तूं प्राप्त झालेले भोग सोडून हें तप कां करीत आहेस ? तुला ज्याची इच्छा असेल तो वर माग, तो मी देतों. तुझ्या मनांत काय मिळावें असें आहे तें मला सत्वर सांग. ' मतंग म्हणाला, ' देवा, ब्राह्मण्य प्राप्त व्हावें म्हणून मी हें तप आरंभिलें आहे, तें मिळेल तर मीं येथून जाईन. हाच वर मीं मागतों. ' भीष्म म्हणतो, युधिष्ठिरा, मतंगाचें बोलणें ऐकून इंद्र म्हणाला, ' मतंगा, तूं ब्राह्मण्य मागतोस, पण तें मिळणें फार कठिण आहे. मनाचा निग्रह न केलेल्यांना मिळण्यास अशक्य असें ब्राह्मण्य प्राप्त व्हावें म्हणून तूं धडपडत आहेस, पण त्यानें तुझा नाश होईल. तर सत्वर तूं ही धडपड बंद कर. सर्व प्राण्यांत

श्रेष्ठ असें जें ब्राह्मण्य त्यावर तपाची मात्रा चालत नाहीं. तें श्रेष्ठ पद मिळविण्याच्या धडपडींत तूं लवकरच नाश पावशील. देवता, असुर, मानव या सर्वांत जें अत्यंत पवित्र म्हणून म्हटलें आहे, तें ब्राह्मण्य चांडाळ योनींत जन्मलेल्या तुला कांहीं केल्यानेंहि मिळणार नाहीं. १३.१.२७.

---

## अध्याय २८ वा

[ १ मतंगाची कथा पुढें चालू. ]

१. भीष्मः—इंद्रानें याप्रमाणें सांगितलें असतां, अंतःशुद्धि न होतां हट्टानें तप करणारा तो मतंग शंभर वर्षें एका पायावर अस्खलितपणें उभा राहिला. तेव्हां इन्द्र पुनः त्याजवळ येऊन म्हणाला, ‘ मतंगा, ब्राह्मण्य दुर्लभ आहे, यत्न करूनहि तुला तें मिळणार नाहीं. तें उत्तमस्थान मिळविण्याच्या धडपडींत तूं नाश मात्र पावशील. तरी हें वेडें धाडस तूं करूं नको. हा धर्ममार्ग तुझ्यासाठीं नाहीं. या जन्मीं तुला ब्राह्मण्य मिळणें शक्य नाहीं. अशक्य गोष्ट करण्याच्या भरीं पडून व्यर्थ नाश मात्र पावशील. मीं तुला वारंवार निवारीत असतां तें उच्च स्थान तूं मिळवूं पहात आहेस; पण ती गोष्ट कदापि घडणार नाहीं. अरे, मनुष्येतर योनींतील प्राणी जर मनुष्यजन्मास आला तर तो प्रथम पुल्कस किंवा चांडाल म्हणूनच जन्मास येतो; आणि चांडाल किंवा पुल्कस जसा तो असेल तसाच तो दीर्घकाळपर्यंत रहातो. नंतर सहस्र वर्षांनीं तो फार तर शूद्र होतो. त्या शूद्र योनींत तो बराच काळ राहिल्यावर तीस सहस्र वर्षांनीं तो झाला तर वैश्य होतो. वैश्य झाल्यावर तसाच पुष्कळ काळ झाला म्हणजे साठ सहस्र वर्षांनीं शक्य तर तो क्षत्रियाच्या जन्मास जातो. त्यापुढें साठ सहस्र वर्षें लोटल्यावर तो क्षुद्र ब्राह्मण होऊं शकतो व त्या स्थितींत बराच काळ फिरल्यावर तो दोनशें वर्षांनीं काण्डपृष्ठ म्हणजे शस्त्रजीवी होतो. बराच काळ त्यांत कंठिल्यावर तीनशें वर्षांनीं गायत्री जपाचा अधिकारी होऊन तो जन्मास येतो. जपीस्थितींत बराच काळ फिरल्यावर चारशें वर्षांनीं तो विद्वान ब्राह्मण होण्यास पात्र अशा जन्मास येतो. विद्वान श्रोत्रिय म्हणून बराच काळ तो रहातो. त्या स्थितींत शोक व हर्ष, इच्छा व द्वेष, अभिमान व वादेच्छा हीं द्वंद्वें त्याच्या अधम हृदयांत प्रवेश करतात. त्या अंतःशत्रूंचा जर तो पराभव करील, तर त्याला सद्गति मिळते. जर तो त्यांच्याकडून पराजित झाला, तर

ताडाच्या झाडाच्या शेंड्यावरून पडल्यासारखी त्याची अवस्था होते. मतंगा, या सत्य गोष्टींचा विचार करून मीं तुला पुनः पुनः बजावून सांगत आहें तरी तूं दुसरा कांहीं वर माग; ब्राह्मण्यप्राप्ति फारच कठीण आहे.' १३. १. २८.

---

## अध्याय २९ वा.

[ १ मतंगाची कथा पुढें चालू. ]

(१) **भीष्म**:—इंद्रानें असें सांगितलें असतां मनःशुद्धि न झाली असतांहि तप करीत रहाणारा तो मतंग एक सहस्र वर्षें एक पायावर ध्यान धरून उभा राहिला. सहस्र वर्षांच्या शेवटीं इन्द्र त्याला पुनः भेटण्यासाठीं आला व पूर्वींचेच शब्द त्याला त्यानें पुनः सांगितले. तेव्हां मतंग म्हणाला, 'मीं हीं सहस्र वर्षें सावधानपणें ब्रह्मचारी होऊन एका पायावर उभें राहून काढिलीं. आतां मला ब्राह्मण्य कां मिळूं नये ?' इंद्रानें उत्तर दिलें, 'मतंगा, चांडाळ योनींत जन्मलेल्याला ब्राह्मण्य कांहीं झालें तरी मिळणार नाहीं. तरी तूं दुसरा कांहीं वर माग. व्यर्थ श्रम कशाला करतोस ?' इंद्र असें म्हणाला असतां मतंगाला फार वाईट वाटलें आणि गयेला जाऊन तो एका आंगठ्यावर शंभर वर्षें तप करीत उभा राहिला. अत्यंत कष्टाचें तें योगसाधन करीत असतां तो अगदीं कृश झाला, त्याच्या शरीरावर त्वचा आणि हाडें मात्र उरलीं व तो धर्मात्मा एकदां खालीं पडला असेंहि म्हणतात. तो पडत असतां इंद्रानें धांवत येऊन त्याला सांवरून धरिलें. कांहीं झालें तरी इंद्र हा वर देणारा देव असून सर्वांच्या हिताची काळजी त्याला आहे. तो मतंगाला धरून म्हणाला, 'मतंगा, ब्राह्मण्य तुझ्या कृतीला एकंदरींत विरुद्धच दिसतें. तें मिळविण्याच्या मार्गांत अनेक अडथळे आहेत व तें संभाळणेंहि कठिण आहे. ब्राह्मणाची पूजा करणारा सुखी होतो, न करणारा दुःखी होतो. ब्राह्मणांच्या तृप्तीनेंच पितर व देव तृप्त होतात; म्हणून, मतंगा, ब्राह्मण्य सर्व मानवांत श्रेष्ठ होय. अरे, असा ब्राह्मणहि जें कांहीं करतो, जें इच्छितो, त्यामुळें पुनः पुनः अनेक योनींत जन्मास येत असतां कालाच्या एखाद्या फेऱ्यांत त्याला ब्राह्मण्य प्राप्त होतें. यास्तव अन्तःशुद्धीच्या अभावीं कधींहि न मिळणारें तें ब्राह्मण्य सोडून दुसरा कांहीं वर तूं माग. ब्राह्मण्याचा वर दुर्लभ आहे.' हें ऐकून मतंगानें उत्तर केलें, 'देवा, आधींच दुःखानें गांजलेल्या मला आणखी कां दुखवितोस ? मेलेल्याला मला आणखी कशाला मारतोस ? मीं तुझीच कींव करतों कीं,

ब्राह्मण्य मिळूनहि तूं ब्राह्मण होऊं इच्छित नाहींस. तीन वर्णांना ब्राह्मण्य दुर्लभ असतांहि तें ज्यांना मिळतें ते तदनुसार वागत नाहींत. दुर्लभ धनासारखें ब्राह्मण्य मिळालें असतांहि त्याची योग्यता जे जाणत नाहींत ते अधमांतहि अधम होत, कारण ते त्याप्रमाणें वागत नाहींत. मीं सर्वस्व सोडून एकटा अहिंसा व इंद्रियदमन यांनीं युक्त असा स्वतःशींच रममाण झालों असतांहि ब्राह्मण्याला पात्र कसा नाहीं ? मातृदोषामुळें धर्म जाणत असतांहि माझी ही दशा झाली, याअर्थीं इन्द्रा, दैवच बलवान् म्हणावयाचें ! एकंदरींत दैवापुढें मनुष्यप्रयत्नाचें कांहीं चालत नाहीं हेंच खरें; कारण ब्राह्मण्यासाठीं मी इतका झटत असतांहि मला तें मिळत नाहीं. मग आतां काय ? माझ्या हातून जर कांहीं पुण्यकर्म घडलें असेल व मजवर कृपा करावी असें तुला वाटत असेल, तर मला कांहीं तरी वर दे. '

वैशंपायन म्हणतो, ' माग तर कांहीं वर ' असें मग इन्द्रानें मतंगाला सांगितलें व तदनुसार मतंग म्हणाला, ' इन्द्रा, आकाशांतून मनास वाटेल तसा वाटेल त्या रूपानें संचार करण्याचें सामर्थ्य मला येऊन ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या संमतीनें मला पूज्यताहि यावी, व माझी कीर्ति अक्षय्य व्हावी, असा वर मला दे. मी तुझ्या पायांवर मस्तक ठेऊन तुला विनवीत आहें.' हें ऐकून इन्द्र म्हणाला, ' मतंगा, छंदोदेव या नांवानें तूं स्त्रियांना पूजनीय होशील व तुझी कीर्ति तिन्ही लोकांत अतुल होईल, हा वर मीं तुला देतों.' असें म्हणून इन्द्र गुप्त झाला. त्यानंतर प्राणत्याग केल्यावर मतंगालाहि उत्तम स्थान प्राप्त झालें. असें हें ब्राह्मण्य म्हणजे अत्यंत श्रेष्ठ स्थान असून यालोकीं तें इन्द्रानें म्हटल्या-प्रमाणें अत्यंत दुष्प्राप्य आहे. १३. १. २९.

---

## अध्याय ३० वा.

[ १ विश्वामित्र व वीतहव्य यांना तें दुर्लभ ब्राम्हण्य कसें मिळालें असा युधिष्ठिराचा प्रश्न व त्याला भीष्माचें उत्तर. २ वीतहव्य राजाची कथा. ]

**( १ ) युधिष्ठिरः**—भीष्म आजोबा, ब्राह्मण्य दुष्प्राप्य आहे याविषयीं तुम्हीं जें आख्यान सांगितलें, तें मीं ऐकिलें. पण पूर्वी विश्वामित्रानें ब्राह्मण्य मिळविल्याचें आपण सांगितलें आहेच. मग तें दुष्प्राप्य असें कसें म्हणतां ? वीतहव्य राजाहि ब्राह्मण झाला असें मीं ऐकिलें आहे. पण तेंच सविस्तर मला

ऐकावयाचें आहे. तो राजश्रेष्ठ कोणाच्या वरानें ब्राह्मण झाला कीं स्वतःच्या तपानें, तें मला कृपा करून सांगा.

**भीष्मः**—राजा, वीतहव्य क्षत्रिय असतां ब्राह्मण कसा झाला तें ऐक. मनु धर्मानें प्रजेचें पालन करीत असतां त्याला धर्मशील असा शर्याति नांवाचा पुत्र झाला. त्याच्या वंशांत पुढें वत्सराजाचे मुलगे असलेले हैहय आणि तालजंघ असे दोन राजे झाले. हैहयाला दहा पत्न्या असून त्यांच्यापासून त्याला रणांतून मागें न फिरणारे असे शंभर शूर पुत्र झाले. ते सारे रूप आणि पराक्रम यांत समान असून सगळेहि बलवान् व युद्धविशारद होते आणि त्यांनीं धनुर्वेदा-प्रमाणेंच इतर सर्व वेदांचाहि उत्तम अभ्यास केला होता. इकडे काशिदेशामध्यें दिवोदासाचा पितामह हर्यश्व नांवाचा प्रसिद्ध राजा होता. त्याच्यावर वीतह-व्याच्या पुत्रांनीं चाल करून गंगायमुनांच्या मधील रणभूमीवर त्याचा पाडाव केला. तो शूर हैहय हर्यश्व राजाला ठार करून पुनः वत्सराजांच्या नगरीस परत आले. हर्यश्वानंतर त्याच्या सिंहासनावर त्याचा एक संबंधी जो धर्मशील व देवासारखा सुदेव त्याला बसविण्यांत आलें. त्या धर्मात्म्यानें प्रजेचें चांगलें पालन केलें. पण पुनः वीतहव्याच्या अनुयायांनीं त्याच्यावरहि चाल करून त्याचा रणांत पराभव केला व ते परत गेले. सुदेवाच्या मागें त्याचा पुत्र दिवो-दास काशिदेशाचा राजा झाला. त्यानें वीतहव्याचा पराक्रम जाणून इन्द्राच्या सूचनेप्रमाणें वाराणसी नामक दुसरी नगरी स्थापून तेथें राजधानी केली. ती गंगेच्या उत्तरेस व गोमतीच्या दक्षिणेस पर्वताच्या पायथ्याशीं असून तींत त्यानें चांगले चांगले ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र आणून भरले. इन्द्राच्या अमरावतीसारखी ती झाली. पण या नगरींतहि हैहयांनीं येऊन दिवोदासावर चाल केली. त्यावेळीं शूर दिवोदासानें बाहेर येऊन त्यांच्याशीं देवासुर युद्धा-सारखें घनघोर युद्ध केलें. पण शंभर दिवस तसें युद्ध केल्यावर त्याचे बहुतेक घोडे मारले गेल्यामुळें तो दीन झाला. त्याचें सैन्य मृत झालें तसा त्याचा द्रव्यकोशहि रिता पडला. तेव्हां दिवोदास नगर सोडून पळून जाऊं लागला. तो भरद्वाजाच्या रम्य आश्रमांत जाऊन त्या ऋषीला हात जोडून शरण गेला. बृहस्पतीचा ज्येष्ठ पुत्र असा तो शीलवान् व पुरोहिताचें काम करणारा भरद्वाज दिवोदासाला म्हणाला, ‘ राजा, तुला इकडे येण्याचें काय कारण घडलें ? मला सर्व सांग; तुझें जें हित असेल तें करण्यास मीं मागें पुढें मुळींच पहाणार नाहीं.

भरद्वाजाचें अभिवचनात्मक भाषण ऐकून दिवोदास म्हणाला, ‘ भगवन्,

वीतहव्याच्या सैनिकांनीं युद्धांत माझ्या वंशाचा आजवर नाश केला. मी एकटा राहिलों, तो दीन होऊन तुला शरण आलों आहें. भगवन्, मला आपला शिष्य समजून माझें रक्षण कर. माझ्या वंशांत त्या दुष्टांच्या हातून मीं एकटाच शेष राहिलों.' दिवोदासाचें हें म्हणणें ऐकून प्रतापी भरद्वाज त्याला म्हणाला, 'सुदेवपुत्रा, भिऊं नको, मुळींच भिऊं नको. भय टाकून दे. तुला पुत्र व्हावा म्हणून मीं इष्टि करतों. त्या पुत्राच्या हातून वीतहव्यासारखे सहस्र वीर तूं ठार करूं शकशील.' असें म्हणून भरद्वाजानें पुत्रकामेष्टि केली असतां दिवोदासाला पुत्र झाला. त्याचें नांव प्रतर्दन ठेवण्यांत आलें. तो झाला तेव्हांच तो एकदम तेरा वर्षांच्या वयाइतका वाढत गेला. त्याला सारा वेद येऊं लागला व धनुर्वेदाचाहि त्याचा अभ्यास झाला. बुद्धिशाली भरद्वाज योगबलानें त्याच्या अंगांत शिरला व असा तो प्रतर्दन तेथें मोठा तेजस्वी होऊन राहिला. कवच धारण करून हातांत धनुष्यबाण घेतलेल्या त्याला पाहून देव व ऋषि त्याची स्तुति करीत व बंदिजन त्याला नमस्कार करीत. उगवत्या सूर्यासारखा तो चमकत असे. रथारूढ होऊन त्यानें कमरेला तरवार लटकावली म्हणजे प्रदीप्त अग्नीप्रमाणें तो दिसे. तरवार, ढाल व धनुष्य घेऊन तो सर्वत्र फिरत असे. त्याला पाहून दिवोदासाला मोठा हर्ष होई आणि वीतहव्याचे पराक्रमी पुत्र जणूं नष्ट झालेच असें त्याला वाटे. मग दिवोदासानें त्याची युवराज म्हणून स्थापना केली व आतां आपण कृतकृत्य झालों असें त्याला झालें. त्यानें प्रतर्दनाला वीतहव्याच्या पुत्रांचा वध करण्यास पाठविलें. रथांत बसून पराक्रमी प्रतर्दन गंगेपार गेला आणि वीतहव्याच्या नगरीस पोंचला. तो आलेला ऐकतांच वीतहव्याचे पुत्र आपल्या प्रचंड रथांत बसून नगराबाहेर आले. ते युद्धकलेंत प्रवीण असून त्यांच्या अंगांवर कवचें होतीं. शस्त्रास्त्रें घेऊन प्रतर्दनावर बाणांचा वर्षाव करीत ते चालून गेले व हिमालयावर मेघांनीं पाण्याचा वर्षाव करावा तसा त्यांनीं प्रतर्दनावर शस्त्रांचा मारा केला. पण आपल्या अस्त्रांनीं त्यांच्या अस्त्रांचें निवारण करून प्रतर्दनानें वीतहव्याच्या पुत्रांचा आपल्या वज्रसमान बाणांनीं वध केला. त्यांचीं मस्तकें छिन्न होऊन ते रक्तानें शरीर माखलेले असे तोडलेल्या किंशुक वृक्षांसारखे भूमीवर पडले.

पुत्र मरून पडले असतां वीतहव्य राजधानी सोडून पळाला, तो भृगुमुनीच्या आश्रमांत गेला व त्याचा आश्रय मागूं लागला. भृगूनें त्याला अभय दिलें. इतक्यांत त्याच्या मागोमाग प्रतर्दनहि तेथें येऊन ठेपला आणि ओरडून

म्हणाला, 'कोण हो शिष्य महात्म्या भृगूच्या आश्रमांत आहेत? मुनींची मला भेट पाहिजे, तरी मीं आलों आहें असें त्यांना सांगा.' त्याला भृगूनें ओळखलें आणि बाहेर येऊन त्याचा सत्कारहि केला. नंतर त्यानें आश्रमांत येण्याचें कारण विचारतां प्रतर्दन म्हणाला, 'मुने, वीतहव्य राजा आतांच या आश्रमांत आला आहे, तरी त्याला घालवून दे. त्याच्या पुत्रांनीं माझ्या साऱ्या वंशाचा घात केला व रत्नांनीं भरलेला काशीदेश उध्वस्त करून टाकिला. आपल्या शौर्याचा गर्व वहाणाऱ्या त्याचे शंभर पुत्र मी मारिले असून आतां त्याचा स्वतःचा वध केल्यावर पित्याच्या ऋण तून मीं मुक्त होणार आहें.' कृपाळू व धार्मिक अशा श्रेष्ठ भृगूनें त्याला सांगितलें, 'राजा, येथें क्षत्रिय असा कोणीच नाहीं. सारे हे ब्राह्मण आहेत.' भृगूचें हें भाषण सत्य आहे असें मानून प्रतर्दनानें तें ऐकून घेतलें आणि त्याला नमस्कार करून आनंदानें हळुहळू तो भृगूला म्हणाला, 'भगवन्, मीं कृतकृत्य झालों यांत संशय नाहीं. कारण हा वीतहव्य राजा क्षत्रिय असतां त्याला मीं आपल्या पराक्रमानें जात बदलावयास लाविलें. मुने, आतां मला जाण्यास अनुज्ञा देऊन मला शुभाशीर्वाद द्या. राजाला मीं जातीचाच त्याग करावयास लाविलें.' असें म्हणून व भृगूची अनुज्ञा घेऊन प्रतर्दन राजा विष टाकून दिलेल्या सर्पाप्रमाणें आपल्या वाटेनें परत गेला, आणि भृगूच्या केवळ शब्दप्रयोगानें वीतहव्य राजा ब्रह्मर्षि होऊन ब्रह्मवादीहि झाला! पुढें त्याला गृत्समद नांवाचा इन्द्रासमान पुत्र झाला. त्याला एकदां दैत्यांनीं 'तूंच इन्द्र आहेस' असें म्हणून पकडून ठेविलें होतें. ऋग्वेदांतील पुष्कळ सूक्तें त्याचीं प्रसिद्ध आहेत. तो ब्राह्मण श्रेष्ठ ब्रह्मचारी होता. त्याला सुचेतस् नामक पुत्र होता. सुचेत्याचा पुत्र वर्चस् व वर्चसाचा विहव्य. विहव्याचा पुत्र वितत्य, वितत्याचा सत्य व सत्याचा संत. श्रवस् ऋषि हा संताचा पुत्र असून श्रवसाचा तम व तमसाचा प्रकाश नांवाचा पुत्र होता. प्रकाशाला वागींद्र नामक जयशाली पुत्र झाला. वागीन्द्राचा पुत्र प्रमिति हा वेद व वेदांगें यांत पारंगत होता. प्रमितीला घृताचीपासून रुरुनामक पुत्र झाला व रुरूला प्रमद्वरेपासून शुनक हा पुत्र झाला. शुनकाचा मुलगा शौनक. युधिष्ठिर राजा, याप्रमाणें वीतहव्य क्षत्रिय असतांहि भृगूच्या प्रसादानें ब्राह्मण झाला. राजा गृत्समदाचा वंशहि मी तुला जातां जातां सविस्तर सांगितला. आणखी तुला काय विचारावयाचें आहे बरें? १३. १. ३०.

---

## अध्याय ३१ वा.

[ १ पूज्य कोण असा युधिष्ठिराचा प्रश्न व त्याला नारद–कृष्ण यांच्या संवाद-रूपानें भीष्माचें उत्तर. ]

( १ ) **युधिष्ठिरः**—भरतकुलश्रेष्ठा पितामहा, त्रैलोक्यांत कोणते पुरुष पूज्य होत तें मला विस्तारानें सांगा. तुम्हीं सांगत असतां माझी तृप्तिच होत नाहीं.

**भीष्मः**—राजा, नारद व कृष्ण यांमधील जुना संवाद याविषयीं सांगत असतात, तो तुला सांगतों. एकदां नारद ऋषि श्रेष्ठ ब्राह्मणांची पूजा करीत असलेला पाहून कृष्णानें त्याला विचारिलें, 'नारदा, तूं कोणाला नमस्कार करतोस? ज्यांना तूं नमस्कार करतोस, त्यांना तूं बहुमान देतोस. तरी याविषयीं शक्य तर तुजकडून कांहीं ऐकण्याची माझी इच्छा आहे; तरी कृपाकरून सांगावें.' नारद म्हणाला, 'शत्रुनाशक कृष्णा, ज्यांची मी पूजा करतों ते कोण तें ऐक. ही गोष्ट ऐकण्यास तुझ्यावांचून दुसरा कोण खरोखर पात्र आहे बरें? जे तपोधन व वेदपारंगत असून वरुण, वायु, आदित्य, पर्जन्य, अग्नि, स्थाणु, स्कन्द, लक्ष्मी, विष्णु, ब्रह्मदेव, वाचस्पति, चंद्र, आप्, पृथ्वी, सरस्वती यांना नित्य वंदन करतात, त्या अत्यंत सत्पात्र अशा ब्राह्मणांना मी नमस्कार करितों. जे उपोषणपूर्वक व बढाई न मारतां देवकार्यें करतात आणि नित्य संतुष्ट आणि क्षमाशील असतात त्यांना, हे प्रभो, मी नमस्कार करतों. जे योग्य प्रकारें यज्ञ करतात, क्षमाशील व इंद्रियनिग्रही असतात, आणि सत्य व धर्म यांचें पालन करून भूमि व गाई ब्राह्मणांना देतात त्यांना मीं नमस्कार करतों. फळें मुळें खाऊन जे वनांत तप करतात व कसलाहि संचय न करतां आपलीं कार्यें चालवितात, तसेंच सेवकांचें पोषण करून अतिथींचा नित्य परामर्श घेतात व देवाला अर्पण केल्यावर उरलेलें अन्न आपण खातात, त्यांना, हे कृष्णा, मी नमस्कार करतों. वेदांची प्राप्ति झाली असतांहि जे मौनव्रतानें ब्रह्मचर्य पाळितात व यजन व याजन यांत मग्न असतात, जे अंतःकरण नित्य प्रसन्न ठेवून सर्व प्राण्यांशीं प्रेमानें वागतात व दोन प्रहरपर्यंत वेदाभ्यास करतात, गुरूची कृपा संपादण्यांत दक्ष राहून जे कोणाचा मत्सर करीत नाहींत, उत्तम व्रताचरण करून सत्यप्रतिज्ञ रहातात, भिक्षेवर निर्वाह करून सुखाविषयीं व द्रव्याविषयीं आसक्ति दाखवीत नाहींत, ज्यांनीं ममत्व सोडिलें असून जे कोणाशीं शत्रुत्व करीत नाहींत, अहिंसाव्रत पाळून शांत वृत्तीनें जे रहातात, जे शिष्टाचार कधीं सोडीत नाहींत, विद्याध्ययन

करतात आणि धर्म, अर्थ व काम यांचा निर्लोभपणें यथाप्रमाण उपभोग घेतात, त्या पुण्यशील पुरुषांना मीं नमस्कार करतों. जे पाणी, वायु किंवा सुधा, वैश्वदेवाचें उरलेलें अन्न यांवरच राहून विविध व्रतें करतात, अशा ब्रह्मचारी अग्निहोत्री वेदाभ्यासी पुरुषांना मीं नमस्कार करतों. कृष्णा, तूं सुद्धां ब्राह्मणांची पूजा करीत जा. कारण पूजनास पात्र अशा ब्राह्मणांची पूजा केली असतां ते आपल्याला सुख देतात. त्यांच्यामुळें या लोकीं तसेंच परलोकींहि सुख प्राप्त होतें. सर्व अतिथींचा बहुमान करून जे नित्य सत्यपणानें वागतात ते सर्व संकटांना तरून जातात. सर्व देवांना नमस्कार करतात व एका वेदाचा मात्र आश्रय करतात ( वेदांत सर्व यज्ञाचा अन्तर्भाव होतो म्हणून ), तसेंच ब्राह्मणांशीं नम्रपणें वागून व्रतें व दानें यांत आनंद मानितात, ते संकटें उलटून जातात. विधियुक्त अग्निपालन करून जे सोमाच्या आहुति देतात, मातापिता व गुरु यांशीं, हे कृष्णा, तुझ्याप्रमाणें नम्रतेनें रहातात, ते संकटांना तरून जातात. असें म्हणून नारदानें आपलें भाषण संपविलें. भीष्म म्हणतो, ' युधिष्ठिरा, तूंहि ज्याअर्थी पितर, देव, ब्राह्मण व अतिथि यांची योग्य रीतीनें पूजा करतोस, त्याअर्थी तुला इष्ट तीच गति मिळेल. १३. १. ३१.

---

## अध्याय ३२ वा.

[ १ शरणागताचें रक्षण केल्यानें काय फळ मिळतें असा युधिष्ठिराचा प्रश्न व त्याला भीष्माचें वृषदर्भराजाच्या कथेच्या रूपानें उत्तर. ]

( १ ) **युधिष्ठिर:**—आजोबा, आपण सर्व शास्त्रें पूर्णपणें जाणत असल्यामुळें मी आपल्याकडून धर्म ऐकण्याची इच्छा करीत आहें. तरी मला सांगा कीं चारी प्रकारच्या प्राणीकोटींतील ( जरायुज, अंडज, स्वेदज, आणि उद्भिज्ज ) कोणी शरण आला असतां त्याचें जे रक्षण करतात, त्यांना त्याचें काय फल मिळतें.

**भीष्म:**—हे महाकीर्तिमान् युधिष्ठिरा, शरणागतरक्षणाच्या फलाविषयीं पूर्वी घडलेला इतिहास आहे, तो ऐक. एकदां एका ससाण्यानें एका सुंदर कवड्यावर चालून जाऊन त्याची पाठ धरिली असतां, तो कवडा वृषदर्भ राजाला शरण गेला. भीतीनें आपल्या मांडीवर येऊन बसलेल्या त्या कवड्याला पाहून राजा त्याला म्हणाला, ' बा पक्ष्या, भिऊं नको; धीर धर. आतां तुला भय नाहीं. तूं कोणाला म्हणून एवढा घाबरून गेलास? आणि असें तूं केलेंस तरी काय कीं

त्यामुळें तुला अमिष्ठासारखें होऊन धापा टाकीत येथें यावें लागलें? अरे सुंदर कपोता, तुला अभय दिलें. स्वस्थ रहा. सव संरक्षकांचा प्रमुख जो मी त्यानें तुझा पुरस्कार केला असतां तुला येथून धरून नेण्याला कोणालाच धैर्य होणार नाहीं. तुझ्या रक्षणासाठीं काशी राज्य किंवा प्राणहि सोडावयास मी सिद्ध होईन, तूं अगदीं स्वस्थ अस. आतां तुला भय नाहीं.' राजाचें बोलणें ऐकून ससाणा म्हणाला, 'राजा, हा कवडा माझें भक्ष्य आहे. तूं याचें रक्षण करणें योग्य नाहीं. तो पळून जात असतां मी मोठ्या प्रयत्नानें त्याला धरीत होतों. याचें मांस, रक्त, मज्जा व मेद मला हितकारक आहेत. म्हणून तूं याला आपल्या आड करूं नको. मला तहान फार लागली असून, भूक तर जाळून टाकीत आहे. माझी ती भूक आवरणें मला शक्य दिसत नाहीं; तरी या कवड्याला तूं सोडून दे. मीं याच्या मागें लागून त्याला नखांनीं क्षतेंहि केलीं आहेत. आतां उगीच कोठें हा श्वासोच्छ्वास करीत आहे, तरी याचें रक्षण करण्यांत अर्थ नाहीं. आणखी असें कीं तुझ्या राज्यांतील माणसांचें रक्षण करण्यास तूं समर्थ असलास तरी तहानेलेल्या पक्ष्यावर कांहीं तुझी सत्ता चालणार नाहीं. आपल्या शत्रूंवर तूं पराक्रम गाजविलास तर ठीकच आहे. पण आकाशांतील पक्ष्यांवर तूं तसा पराक्रम गाजवूं नकोस. शत्रूंवर पराक्रम करून सामर्थ्य दाखविणें योग्य आहे. तूं धर्मार्थी असशील तर त्याच धर्मदृष्टीनें माझाहि विचार कर.' ससाण्याचें भाषण ऐकून वृषदर्भ राजाला मोठा अचंबा वाटला, व त्याचा विचार करून त्याला त्यानें उत्तर दिलें. तो म्हणाला, 'श्येना, बैल, डुक्कर, हरिण, रेडा यांतील वाटेल तें आपल्या भुकेच्या शमनार्थ माग; पण शरण आलेल्या या पक्ष्याला मी सोडणार नाहीं. हा पहा माझी मांडी अगदीं धरून बसला आहे!' ससाणा उलट म्हणाला, 'महाराज, डुक्कर, बैल किंवा दुसरे कोणी पक्षी मला खायला नको आहेत. ते खाऊन मला काय मिळेल? जें माझें विहित भक्ष्य आहे, तेंच मला पाहिजे. देवांनींच तें नित्याचें ठरविलें आहे. ससाणे कपोतांना खातात असाच सनातन नियम आहे. हे उशीनर कुलांतील राजा, आतां या कवड्यावर जर तुझा एवढा स्नेह जडला असेल, तर तूं आपल्या अंगाचें मांस याच्या भारंभार तोलून मला दे.'

राजा म्हणाला, 'ससाण्या, आतां तूं बोललास ही मजवर मोठी कृपाच झाली. ठीक आहे. तसें करतों.' असें म्हणून वृषदर्भ राजानें आपल्या अंगाचें मांस तोडून तें तोलून देण्यास आरंभ केला. त्याचा तो प्रकार पाहून त्याच्या अंतःपुरां-

तील स्त्रिया दुःखित झाल्या व आक्रोश करीत बाहेर आल्या. त्यांच्या व मंत्री, सेवक व इतर लोक यांच्या रडण्यानें मेघासारखा मोठा गंभीर शब्द होऊन सारें आकाश त्यानें भरून गेलें. तो राजा आपल्या कुशी, बाहू, मांड्या इत्यादि भागांतून मांस कापून काढीत तराजूच्या पारड्यांत भरूं लागला. पण कितीहि मांस टाकलें तरी तें कवड्याच्या भारंभार होईना. शेवटीं त्याच्या अंगावर नुसतीं हाडें राहिलीं. मांस सर्वस्वीं जाऊन रक्तानें शरीर भरून गेलें. तेव्हां मांस काढण्याचें बंद करून राजा स्वतःच पारड्यावर चढला! तेव्हां इंद्रासह सारें त्रिभुवन त्याला पहाण्यासाठीं तेथें लोटलें. देव भेरी व दुदुंभि वाजवूं लागले. त्यांनीं राजाच्या अंगावर अमृतवर्षाव केला व सुखदायक अशीं दिव्य फुलेंहि त्यावर उधळलीं. देव, गंधर्व, अप्सरा हीं ब्रह्मदेवापुढें नाचावीं तशीं वृषदर्भापुढें त्याची स्तुति गात नाचूं लागलीं. सोन्याच्या रत्नखचित विमानांत बसून राजा आपल्या त्या सत्कृत्यामुळें स्वर्गीं गेला. युधिष्ठिरा, तूंहि शरणागतासंबंधानें असेंच वर्तन ठेव. आपल्यावर अनुरक्त असलेले भक्त, आश्रित इत्यादिकांचें रक्षण करणारा दयाळु पुरुष परलोकीं सुखी होतो. सदाचरणी राजा अगदीं निष्कपटपणें सत्कृत्य करील तर त्याला काय बरें मिळणार नाहीं? काशिराजा वृषदर्भ आपल्या शुद्ध अन्तःकरणामुळें आणि धैर्यामुळें स्वकर्मानें त्रिभुवनांत प्रख्यात झाला. युधिष्ठिरा, जो दुसराहि कोणी असेंच शरणागताचें रक्षण करील, त्यालाहि वृषदर्भासारखीच उत्तम गति मिळेल. हें वृषदर्भाचें वृत्त जो कोणी वर्णन करील किंवा मनोभावानें ऐकेल, तो पवित्र अन्तःकरणाचा होईल.' १३. १. ३२.

---

## अध्याय ३३ वा.

[ १ सर्व कृत्यांत उत्तम कोणतें याविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न व त्याला भीष्माचें उत्तर. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामह, राजाच्या सर्व कृत्यांमध्यें श्रेष्ठ कृत्य कोणतें व राजानें काय केलें असतां इहपर अशा दोन्ही लोकांचा लाभ त्याला होईल, तें मला सांगा.

**भीष्म**—राज्यावर अभिषिक्त झालेल्या व सुखाची इच्छा करणाऱ्या राजाचें सर्वश्रेष्ठ कर्तव्य म्हणजे ब्राह्मणांची आराधना होय. वृद्ध श्रोत्रिय ब्राह्मणांची राजानें नित्य पूजा करावी. गांवांतील व इतर देशांतील लोकांना त्याचप्रमाणें

विद्वान् ब्राह्मणांना संतुष्ट राखून त्यानें दानांनीं व नम्रतेनें त्यांना पूजित जावें. आपल्या स्वतःच्या पुत्रांप्रमाणें त्यांचा सर्वांचा प्रतिपाळ करावा आणि विशेष मान्य असतील त्यांचा तसाच मान राखावा. ते ब्राह्मण शांत असले म्हणजे साऱ्या राष्ट्राला शोभा येते. पितरांप्रमाणेंच ते मानास व नमस्कारास पात्र आहेत. पर्जन्याच्या योगानें प्राणिमात्रांची जशी जीवनयात्रा चालते, तशीच ब्राह्मणांच्या संतोषानें लोकांची चालते. ते जर क्रुद्ध झाले तर अभिचारादि उपायांनीं व शापानें सुद्धां ते सर्व जाळून टाकतील. ते क्रुद्ध झाले असतां काय करतील याला अंत नाहीं. अरण्यांतील अग्नीप्रमाणें त्यांना साऱ्या दिशा मोकळ्या होतात. साहसी लोक देखील त्यांना भितात, कारण त्यांचें सामर्थ्य विलक्षण आहे. त्यांतील कांहीं जण गवतानें ज्यांचें तोंड झांकून गेलें आहे अशा विहिरींसारखे असतात, तर दुसरे निरभ्र आकाशासारखे स्वच्छ मनाचे असतात; कोणी एकाएकीं भलतेंच कांहींतरी करणारे असतात, तर इतर कांहीं कापसाप्रमाणें मऊ असतात. त्यांत कित्येक अति कपटी असतात तर कांहीं जण तपस्वी असतात. कोणी शेतकी, गोरक्षण इत्यादि करतात, तर कोणी भिक्षा मागतात. कांहीं चोर असतात, कांहीं खोटें बोलणारे असतात, तर कांहीं नट व नर्तकहि असतात. दुसरे कित्येक वाटेल तें कृत्य करण्यास समर्थ असतात. युधिष्ठिरा, असे विविधस्वभावांचे ब्राह्मण नाना कर्में करण्यांत गढून गेलेले व अनेक मार्गांनीं उपजीविका करणारे असतात. पण त्यांत जे धर्मज्ञ, सज्जन असतात त्यांचें सर्वांनीं पूजन करणें उचित आहे. पितर, देव, मनुष्यें, नाग, राक्षस, असुर, पिशाच, गंधर्व यांपैकीं कोणीहि त्यांना आजवर जिंकूं शकलेले नाहींत. ते देवतेचें देवतात्व काढून घेतील, तर देवतत्व नसेल तेथें तें उत्पन्नहि करतील. त्यांना वाटेल तर कोणाला ते राजा करतील, व त्यांना जो अनिष्ट वाटेल त्याचा ते नाश करितील. जे कोणी नष्ट बुद्धीचे लोक ब्राह्मणाची निन्दा करितील, त्यांचा नाश होईल, हें अगदीं मीं सत्य सांगतों. निंदा किंवा प्रशंसा, कीर्ति किंवा अकीर्ति हीं ते सहज लीलेनें कोणाचीहि करूं शकतील. ज्यांची ते प्रशंसा करितील ते उत्कर्ष पावतील; त्यांनीं ज्यांची निंदा केली त्यांचा तत्काल ऱ्हास झाला म्हणून समजावें. ब्राह्मणांशीं गांठीभेटी न झाल्यामुळेंच शक, यवन, कांबोज, इत्यादि मूळचे क्षत्रिय जातीचे लोक शूद्र होऊन गेले. द्राविड, कलिंग, पुलिंद, उशीनर, कोलिसर्प, माहिषक यांचेंहि तसेंच झालें. ब्राह्मणाच्या हातून पराभव झालेला पुरवला, पण त्यांच्यावर जय मिळविणें नको. इतर कोणाचाहि वध झालेला खपेल, पण

ब्राह्मणांचा वध त्याहून निराळा होय. ब्रह्मवधाचा दोष ऋषींनीं फारच मोठा सांगितला आहे. ब्राह्मणांची निंदा कोणी ऐकूंहि नये. ती कोणी करीत असेल तर खालीं मान घालून गप्प बसावें किंवा शक्य तर तेथून निघून दूर जावें. ब्राह्मणाशीं विरोध करून जो उत्कर्ष पावला असा साऱ्या जगांत आजवर कोणी झाला नाहीं व पुढें होणार नाहीं. वायूला मुठींत धरून ठेवणें जसें अशक्य, चंद्राला हातानें स्पर्श करणें जसें अशक्य किंवा पृथ्वी वर उचलणें जसें अशक्य, तसेंच जगांत ब्राह्मणांना जिंकणेंहि अशक्य होय. १३. १. ३३

---

## अध्याय ३४ वा.

[ १. भीष्मकृत ब्राह्मण प्रशंसा पुढें चालू. २. पृथिवी व वासुदेव यांचा या विषयीं संवाद. ]

( १ ) भीष्मः—युधिष्ठिरा, ब्राह्मणांचा नित्य मोठा सन्मान करावा; ते सोमपानाचे अधिकारी असून सुखदुःखांचे तेच स्वामी होत. म्हणून राजांनीं त्यांचें नित्य पितृवत् पालन करावें व त्यांना भोग, अलंकार, किंवा आणखी जें कांहीं त्यांना हवें असेल तें देऊन त्यांचा नमस्कारपूर्वक सन्मान करावा. पावसामुळें जशी प्राणिमात्राला तशी असें केल्यानें राष्ट्राला शांति लाभते. आपल्या राष्ट्रांत ब्रह्मतेजानें युक्त असा पवित्र ब्राह्मण जन्मास यावा, आणि त्यानें शूर व शत्रुनाशक राजाकडून यज्ञ करवावा. राजा, जातिसंपन्न, धर्मज्ञ व व्रतशील ब्राह्मणाला आपल्या घरांतच बाळगावें, कारण त्याच्याहून श्रेष्ठ दुसरा कोणी नाहीं. ब्राह्मणाच्या द्वारा दिलेलें हविर्द्रव्यच देवता स्वीकारतात. तेच सर्व प्राण्यांचे पितर असून त्यांपरतें श्रेष्ठ कांहीं नाहीं. सूर्य, चंद्र, वायु, आप्, पृथ्वी, आकाश, दिशा हीं सर्व ब्राह्मणशरीरांत प्रवेश करून अन्नाचा उपभोग घेतात. ज्याच्या घरीं ब्राम्हणाला भोजन मिळत नाहीं, त्याच्या घरीं पितर किंवा देवहि अन्नग्रहण करीत नाहींत. ब्राम्हण संतुष्ट झाले कीं पितर संतुष्ट झालेच. देवांचेंहि तसेंच, यांत कांहीं संशय नाहीं. ब्राह्मणांना जे देतात ते मरणोत्तर नाश न पावतां उत्तम गतीस जातात. ज्यापासून प्रजा उत्पन्न होतात, मनुष्य जेथून उत्पन्न होतो व मृत्यूनंतर जेथें तो जातो तें सर्व यज्ञरूपकर्म ब्राह्मणामुळेंच सिद्ध होतें. ब्राह्मणाला स्वर्गमार्ग ठाऊक आहे, तसा नरकमार्गहि आहे; झालें व होणारें हें तो सर्व जाणतो. स्वधर्माचाहि ज्ञाता तोच. त्याचें

अनुकरण जे करतात त्यांचा नाश किंवा पराभव होत नाहीं. ब्राह्मणाच्या तोंडून निघालेले शब्द जे ग्रहण करतात ते महात्मे पुरुष कधीं पराभव पावत नाहींत. तेजानें व बलानें तळपणाऱ्या क्षत्रियांचीं तेजें व बलें ब्राह्मणाच्या ठायीं शांत होतात. उदाहरण, भृगूंनीं तालजंघाचा, अंगिरसांनीं नीपाचा, भरद्वाजानें वीतहव्याचा व ऐलांचा पराजय केला. ब्राह्मणांनीं मृगचर्मांचे ध्वज फडकावीतच चित्रविचित्र ध्वज असलेल्या राजांना जिंकिलें. म्हणून राजानें ब्राह्मणाला राज्यदान करून परलोकसाधक कर्म करावें आणि उभयलोकीं कीर्ति मिळवावी. जगांत जें कांहीं ऐकण्यांत किंवा वाचण्यांत येतें तें सारें लाकडांतील अग्नीप्रमाणें ब्राह्मणांमध्यें गुप्तरूपानें असतेंच. युधिष्ठिरा, याविषयीं वासुदेव व पृथ्वी यांमध्यें पूर्वीं संवाद झालेला सांगण्यांत येतो; तो असाः—

( २ ) एकदां वासुदेवानें पृथ्वीला विचारिलें, 'हे सर्व वस्तुमात्राचे पवित्र माते, मला कांहीं संशय उत्पन्न झाला आहे; म्हणून तुला विचारतों, कीं गृहस्थ पुरुष कोणत्या कर्मानें पाप नाहींसें करूं शकतो, तें मला सांग.' पृथ्वी म्हणाली, 'ब्राह्मणांची सेवा करणें हेंच उत्तम पवित्र कर्म होय. त्यांची सेवा करणारांचें सर्व पाप नष्ट होतें. त्यापासूनच उत्कर्ष होतो, त्यामुळेंच कीर्ति मिळते व त्यामुळेंच बुद्धी वाढत जाते. नारदानें पूर्वीं हें मला सांगितलें होतें. ब्राह्मणांनीं प्रशंसिलेला मनुष्य उत्कर्षास पोंचतो व ब्राह्मणांना क्रोधविणारा लवकरच पराजय पावतो. महासागरांत फेंकलेलें मातीचें ढेंकूळ जसें नष्ट होतें, तसें ब्राह्मणद्रोहरूप दुष्कर्म पराभवाला कारण होतें. ब्राह्मणाच्या शापानें चंद्राला कलंक लागला, समुद्र खारट झाला व इन्द्राच्या अंगाला छिद्रें पडलीं, पण ब्राह्मणाच्याच कृपेनें इन्द्र पुढें सहस्रनेत्र झाला. माधवा, खरें कीं खोटें तें पहा. ज्याला कीर्ति, उत्कर्ष, उत्तम गति हीं पाहिजे असतील, त्या मनोनिग्रही पवित्र पुरुषानें ब्राह्मणाच्या आज्ञेंत रहावें.'

भीष्म म्हणतो, राजा, पृथ्वीचें अशाप्रकारचें भाषण ऐकून कृष्णानें 'उत्तम, उत्तम,' असें म्हणत तिचा गौरव केला. युधिष्ठिरा, ही कथा ऐकिल्यावर तूं आतां मनोनिग्रह करून श्रेष्ठ ब्राह्मणांची पूजा करीत जा; म्हणजे तुझें कल्याण होईल.

१३. १. ३४

---

## अध्याय ३५ वा.

[ भीष्मकृत ब्राह्मणप्रशंसा पुढें चालू. ]

( १ ) **भीष्म**:—भाग्यवान् असा ब्राह्मण जन्मतःच सर्वांच्या नमस्कारास ात्र असतो तसाच शिजविलेल्या अन्नाचा पहिला वांटेकरी असा अतिथिहि तो सतो. ब्राम्हणांच्या द्वारा सर्व अर्थ प्राप्त होतात, ते सर्वांचे मित्र असतात ाणि देवाचें तर ते मुखच होत. त्यांचा बहुमान केल्यास ते मंगल आशीर्वाद तात; पण त्यांचा अपमान झाल्यास ते क्रुद्ध होऊन कठोर शब्दांनीं आपणा र्वांना शत्रूंप्रमाणें शाप देतात. याविषयीं पुराणवेत्ते परंपरागत गाथा म्हणत सतात. त्या अशा कीं, 'ब्रह्मदेवानें ब्राम्हणांना उत्पन्न करून असा नियम ल्लून दिला कीं, त्यांनीं सांगितल्याबाहेर दुसरें कांहीं करूं नये. ब्राह्मणाचें रक्षण ल्यानें तो आपलें रक्षण करतो व त्याच्यायोगानें आपलें मोठें कल्याण होतें. तुम्ही ापलें स्वतःचें कर्म करा म्हणजे ब्राम्ही संपत्ति तुम्हांला मिळेल, आणि तुम्ही सर्व ोकांना प्रमाणभूत आणि त्यांचे नियामक व्हाल. सुज्ञ ब्राह्मणानें शूद्रकर्म कधीं रूं नये; तसें केल्यानें धर्माची हानि होते. त्यानें वेदाध्ययनच करावें, तें करण्यानें ाला संपत्ति, बुद्धि, तेज, वैभव हीं विपुल प्राप्त होतात. आहवनीय अग्नीला ाहुति दिल्यानें ते महाभाग्यावर प्रस्थापित होतात आणि ब्राह्मीसंपत्तीनें क्त असे होत्साते मुलांच्याहि पूर्वीं भोजन करण्यास पात्र होतात. सर्वांवरील मामुळें त्यांना मोठी श्रद्धा उत्पन्न होते व आत्मनिग्रह आणि वेदाध्ययन यांत म्न होऊन त्यांच्या सर्व कामना पूर्ण होतात. मनुष्यलोकीं किंवा देवलोकीं जें कांहीं आहे तें सारें तप, ज्ञान व नियम यांच्या योगानें साध्य होतें.' असे ब्रह्मदेवानें ब्राह्मणांच्या कर्तव्याचे घालून दिलेले नियम मीं तुला सांगितले. नः सांगतों कीं, ब्राह्मणांचें बळ म्हणजे तपस्वी राजांचेंच बळ होय. ते कित्येक ोधिष्ठ, प्रसन्न होण्यास कठिण, आवेशांत कांहीं झटकन् करून टाकणारे अस- त. कांहीं जण सिंहासारखे बलवान्, कांहीं डुकर, हरीण यांसारखे तर कांहीं लचर प्राण्यांसारखे असतात. कित्येक सर्पाप्रमाणें डाव धरणारे, कोणी मगरा- ारखे, कोणी बोलून नाश करणारे तर कांहींजण नुसत्या दृष्टिक्षेपानें ठार करणारे सतात. कांहीं सर्पासारखे तल्लख, तर दुसरे अगदीं मंदहि असतात. युधिष्ठिरा, ाप्रमाणें ब्राह्मणाचे स्वभाव विविध असतात. ब्राह्मणांच्या कोपामुळें मेकल, ाविड, लाट, पौंड्र, कान्वशिर, शौंडिक, दरद, दार्व, चौर, शबर, बर्बर, किरात,

यवन, इत्यादि अनेक क्षत्रिय जाति शूद्रत्वास गेल्या. ब्राह्मणांच्या अपमानामुळें असुरांना पाण्यांत लपून रहाण्याची पाळी आली, तर त्यांच्या कृपेमुळें देव स्वर्गांत रहाण्यास पात्र झाले. आकाशाला हात लावणें अशक्य, हिमालय पर्वत हालविणें अशक्य, बांध घालून गंगेला अडवणें अशक्य, तसा ब्राह्मणहि या जगांत जिंकण्यास अशक्य होय. ब्राह्मणांशीं विरोध करून राजांना पृथ्वीचें राज्य करणें कठीण, ब्राह्मण थोर असून देवांचेहि देव होत, त्यांना मान व दान देऊन त्यांची पूजा कर, म्हणजे, हे युधिष्ठिरा, तुला सागरान्त पृथ्वीचें राज्य नीट करतां येईल. ब्राह्मणाचें तेज प्रतिग्रहानें शमतें. अर्थात् प्रतिग्रह न घेणारे जे ब्राह्मण आहेत, त्यांच्यापाशीं तुला जपूनच वागलें पाहिजे. १३. १. ३५.

---

## अध्याय ३६ वा.

[ १ भीष्मकृत ब्राह्मणप्रशंसा पुढें चालू. तत्संबंधीं इन्द्र-शंबराचा संवाद. ]

**भीष्म**:—युधिष्ठिरा, ब्राह्मणाच्या योग्यतेविषयीं इन्द्र व शंबर यांमध्यें पूर्वी संवाद झाला, तो सांगण्यांत येतो. तो मी सांगतों, तो समजून घे. एकदां इन्द्र आपलें रूप पालटण्यासाठीं जटा धारण करून व एका गचाळ रथांत बसून शंबरनामक असुराकडे आला व त्याला म्हणाला, 'शंबरा, तूं कोणतें आचरण केल्यामुळें तुला आपल्या सजातीयांवर राज्य करतां येत आहे बरें? तुला ते श्रेष्ठ कां मानतात, तें खरोखर मला जसें असेल तसें सांग.' शंबरानें उत्तर केलें, 'मी ब्राह्मणांवर कधीं रागावत नाहीं. माझें मत त्यांना अनुसरणारेंच असतें. ते शास्त्र सांगतात, तें मी मनापासून ऐकून घेतों, व त्यांची अवज्ञा कधींहि करीत नाहीं. मी त्यांचा अपराध केव्हांहि करीत नाहीं. त्यांतील पूजनीय असतात त्यांचा मी सत्कार करतों व बुद्धिमान् असतात त्यांचे पाय धरतों. त्यामुळें ते माझ्याशीं अगदीं मोकळ्या मनानें बोलतात व माझी विचारपूस करतात. ते प्रमत्त झाले तरी मी तसा होत नाहीं व ते झोंपी गेले तरी मी जागा असतों. मी योग्य अशा शास्त्रमार्गानें जातों, ब्राह्मणांविषयीं आदरबुद्धि ठेवतों, त्यांचा मत्सर करीत नाहीं. त्यामुळें मधमाशा मध देतात त्याप्रमाणें तेहि मला मधुर शब्दांनीं विद्या देतात. संतुष्ट होऊन ते जें मला सांगतात, त्याचा मी बुद्धिपुरःसर स्वीकार करतों व त्यावर मनन करतों. त्यांच्या मुखांतून येणाऱ्या उपदेशरसाचा आस्वाद घेत असल्यामुळें

चंद्र जसा नक्षत्रांवर तसा मी आपल्या जातीयांवर राज्य करीत आहें. ब्राम्हणांच्या मुखांतून उतरलेलें व जगांत पसरलेलें शास्त्र म्हणजे या पृथ्वीवरील अमृत किंवा सर्व गोष्टी पहाण्याचा डोळाच होय. हें कारण जाणून माझ्या पित्यानें जेव्हां देवासुरांमधील युद्धाकडे पाहिलें, तेव्हां त्याला आनंद व विस्मयहि वाटला. ब्राम्हणांचें माहात्म्य पाहून त्यांना ती सिद्धि कशी मिळाली असा त्यानें चंद्राला प्रश्न केला. तेव्हां चंद्रानें उत्तर केलें, 'ब्राह्मणांचें बल वाणींत असून तें तपानें सिद्ध होतें. राजांचें बल मात्र त्यांच्या बाहूंत असतें. गुरूच्या घरीं रहाण्याचें खडतर व्रत स्वीकारून ओंकारपूर्वक वेदांचा अभ्यास करावा व क्रोधरहित व्हावें, तेव्हां ब्राह्मणाला समदृष्टि होतां येतें. पित्याच्या घरींच सर्व वेद शिकून तो ज्ञानसंपन्न झाला तरी घमेंडींत असल्यामुळें त्याला घरकोंबडाच म्हणतात. सर्प जसा बिळांत शिरणाऱ्यांना गिळून टाकतो, तशी ही पृथ्वी दोघांना गिळून टाकीत असते; एक न लढणारा राजा व दुसरा प्रवास न करणारा ब्राह्मण. अल्पबुद्धि असतांहि माणसाला गर्व झाला, तर त्याच्या उत्कर्षाचा ऱ्हास झालाच म्हणून समजावें. कन्या गर्भानें दूषित होते, तसा ब्राह्मण घरींच राहिल्यानें दूषित होतो.' याप्रमाणें ब्राह्मणांना सोसावे लागणारे कष्ट चंद्रानें सांगितले असतां ते ऐकून तो व्रतशील ब्राह्मणांची पूजा करूं लागला व मीहि तसेंच करतों.

भीष्म म्हणतो, याप्रमाणें शंबरासुराच्या मुखानें सांगितलेलें हें वृत्त ऐकून इन्द्र ब्राह्मणांची पूजा करूं लागला व तेणेंकरून त्याला महेन्द्रपद प्राप्त झालें. १३. १. ३६.

---

## अध्याय ३७ वा.

[ १. ब्राह्मणांतहि विशेष सत्पात्र कोण याविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न व त्याला भीष्माचें उत्तर ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, पूर्वी कधीं न आलेला, नित्य जवळ रहाणारा किंवा दुरून आलेला, यांपैकीं कोणता ब्राह्मण दानास विशेष पात्र समजावा बरें ?

**भीष्म**—युधिष्ठिरा, दान मागावयास येणाऱ्यांत कित्येकांना कांहीं कर्म करावयाचें असतें, व कोणी मौनव्रत धरून असतात. यास्तव कसाहि याचक

असला तरी तो जें मागेल तें त्याला देतों असें म्हणावें. पण आपल्या सेवकांना त्यामुळें पीडा होऊं नये. सेवकवर्गाला पीडा होईल अशा रीतीनें दान देणें म्हणजे स्वतःचें अहित करणेंच होय. यास्तव अगदीं नवीन, नित्य जवळ रहाणारा किंवा फार लांबून आलेला याचक यांची वैयक्तिक पात्रता पारखून घ्यावी. युधिष्ठिर म्हणाला, 'प्राणिमात्राला पीडा न होईल, धर्माची हानि होणार नाहीं, आणि दिल्यानें संतापाला कारण होणार नाहीं असा याचकच खरोखर सत्पात्र समजावा, हें खरें, पण तो ओळखावा कसा?' भीष्मानें उत्तर केलें, "ऋत्विज्, पुरोहित, आचार्य, शिष्य, संबंधी, बांधव, पूजार्ह व मानार्ह असे सारे विद्वान् हे खरे सत्पात्र होत. यांहून इतरांचा सत्कार करण्याचें कारण नाहीं. यास्तव याचक पुरुषांचा नीट विचार करून त्यांची पात्रापात्रता ठरवावी. क्रोधाचा अभाव, सत्य भाषण, अहिंसा, इंद्रियनियमन, सरळपणा, प्रेमळपणा, निरभिमानता, नम्रता, सहनशीलता, शांति, इत्यादि गुण ज्यांच्यामध्यें स्वभावतः खिळलेले आढळून येतात व जो कोणतीहि अयोग्य गोष्ट करीत नाहीं, तोच सत्पात्र व मानाला योग्य होय; मग तो नवीन आलेला असो, कीं जुना माहितीचा असो. पण वेदांना प्रमाण न मानणें, शास्त्राचे उल्लंघन करणें, व सर्व गोष्टींत अव्यस्थितपणें वागणें हें नाशाचें कारण असल्यामुळें, तसें करणारा अपात्र समजावा. स्वतःला विद्वान् समजणारा, वेदांची निंदा करणारा, निष्फळ अशा तर्कशास्त्रावर भिस्त ठेवणारा, वाद घालणारा, मोठ्यानें ओरडून बोलणारा, अति बोलणारा, सर्व बाबतींत शंका घेत सुटणारा, मूर्ख, कटुशब्द उच्चारणारा, अशा माणसाला कुत्रा समजावें. कुत्रा जसा भुंकून चावावयास येतो, तसा तसला पुरुष वाद करावयास व शास्त्रें खोटीं ठरवावयास येतो. लोकव्यवहार, धर्म आणि स्वहित यांचा तारतम्यानें विचार करणारा पुरुष दीर्घकाळ उत्कर्षांत रहातो. देव, ऋषि, पितर, ब्राह्मण व अतिथि यांचीं ऋणें क्रमानें फेडून शुद्धमनानें नम्रतापूर्वक कर्म करणारा गृहस्थाश्रमी पुरुष धर्मापासून कधीं भ्रष्ट होत नाहीं. १३. १. ३७.

## अध्याय ३८ वा.

[ १. स्त्रियांचे दोष व स्वभाव यांविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न व भीष्माचें उत्तर; नारद व व्यभिचारिणी स्त्री यांमधील संवाद. ]

( १ ) **युधिष्ठिर**—भरतकुलश्रेष्ठ पितामहा, स्त्रियांचा स्वभाव कसा असतो, तो ऐकण्याची माझी इच्छा आहे. स्त्रिया सर्व दोषांचें मूळ होत व त्या क्षुद्र मनाच्या असतात असें म्हणतात तें कां ?

**भीष्म**—युधिष्ठिरा, याविषयीं नारदाचा पंचचूडा नांवाच्या अप्सरेशीं झालेला संवाद प्रसिद्ध आहे. एकदां सर्व लोकांत भ्रमण करीत असतां नारदाची पंचचूडा नामक ब्रह्मलोकस्थ अप्सरेशीं गांठ पडली. त्या सर्वांगीं सुंदर अशा अप्सरेला पाहून नारद तिला म्हणाला, 'हे सुंदरि पंचचूडे, माझ्या मनांत कांहीं संशय आला आहे; तरी त्याचें निवारण कर.' याप्रमाणें नारदाचा प्रश्न ऐकून ती म्हणाली, 'नारदा, तो विषय माझा असेल व मला जर सांगतां येण्यासारखें असेल तर मी तुझ्या प्रश्नाचें उत्तर सांगेन. तेव्हां नारद म्हणाला, 'भलत्याच विषयांतील प्रश्न मी तुला कधीं विचारणार नाहीं. मला स्त्रीस्वभावाविषयीं तुझा विचार ऐकण्याची इच्छा आहे.' देवर्षि नारदाचें भाषण ऐकून पंचचूडेनें उत्तर केलें, 'नारदा, मी स्वतः स्त्री असल्यामुळें स्त्रियांची निंदा मी करणार नाहीं. त्या कशा व काय आहेत, हें प्रसिद्ध आहे. तेव्हां मला असल्या विषयांत न टाकशील तर बरें.' नारद म्हणाला, 'हे सुंदरि, तूं खरें असेल तेंच सांग. दोष असतो तो खोटें सांगण्यांत असतो; खरें सांगण्यांत नसतो.' नारदाचे हे शब्द ऐकून पंचचूडा स्त्रियांचे खरे शाश्वत दोष सांगावयास सिद्ध झाली व म्हणाली, 'कुलीन, रूपवती व पतियुक्त अशाहि स्त्रिया मर्यादेंत रहात नाहींत, हा त्यांचा पहिला दोष होय. स्त्रियांहून पापी दुसरें कोणी नाहीं. स्त्रिया याच सर्व पापाचें मूळ होत, हें, नारदा, तुलाहि ठाऊक आहेच. उत्कर्षशाली, अनुरूप, आपल्या मनाप्रमाणें वागणाऱ्या अशा पतींचें जर कांहीं छिद्र त्यांना आढळलें तर त्याचा बोभाटा त्या लगेच करून टाकितात. आम्हां स्त्रियांचा हाच मोठा अधर्म असतो कीं आम्ही लाज सोडून पापी पुरुषांच्या मागें लागतों. जो त्यांची मनधरणी करतो, त्यांच्याशीं संबंध ठेवूं इच्छितो, व थोडीबहुत सेवा करतो, त्याचीच स्त्रिया इच्छा करतात. त्या पतीच्या मर्यादेंत रहातात याचें कारण एवढेंच कीं पुरुष त्यांशीं लगट करीत नाहींत, किंवा त्यांना नोकरां-

चाकरांचें भय वाटतें. वस्तुतः त्यांना मर्यादा मुळींच नाहीं, त्यांना कोणीहि पुरुष संबंध ठेवण्यास अयोग्य वाटत नाहीं व त्याच्या वयाचाहि त्या विचार करीत नाहींत. कुरूप असो कीं सुरूप असो केवळ पुरुष आहे म्हणूनच त्याचा त्या उपभोग घेतात. त्या पतींजवळ रहातात त्या भय, माया, द्रव्य, जाति व कुळ यांचा विचार, यामुळें रहातात असें नाहीं. तारुण्यानें मुसमुसलेल्या व सुंदर वस्त्रें व अलंकार यांनीं नटलेल्या स्वैरवृत्ति स्त्रियांचा कुलस्त्रियांना मत्सर वाटतो. ज्यांचा मान राखण्यांत येतो व प्रेमानें ज्यांचें रक्षण केलें जातें, त्याहि स्त्रिया कुबडे, अंधळे, आळशी व ठेंगू अशा पुरुषांशीं आसक्त होतात. त्यांना जगांतील कोणत्याहि प्रकारचा निन्द्य पुरुष अयोग्य असा वाटत नाहीं. नारदा, जर त्यांना पुरुष मिळालाच नाहीं, तर त्या परस्परांशींहि संभोग करतात, पण पतीजवळ उभ्या रहात नाहींत. त्यांचें रक्षण होतें तें पुरुष न मिळाल्यामुळें, सेवकादिकांच्या भयामुळें किंवा वध व बंधन यांच्या भीतीमुळेंच होतें. त्यांचा स्वभाव चंचल व मन धरण्यास कठिण असतें. कितीहि जळण घातलें तरी अग्नीची तृप्ति होत नाहीं, समुद्रांत कितीहि नद्या येऊन पडल्या तरी त्याला पुरेशा होत नाहींत, कितीहि प्राणी मेले तरी मृत्यूला कंटाळा येत नाहीं, तोच प्रकार स्त्रियांचा पुरुषप्राप्तीसंबंधानें आहे. आपल्या इच्छा पुरविणारा, मनाप्रमाणें करणारा, अशा निर्मळ पतीची क्षिति स्त्रिया बाळगीत नाहींत. मृत्यु, वारा, घोडीचें तोंड, वस्त्र्याची धार, विष, सर्प, अग्नि, या सान्यांचे दोष स्त्रियांत एकवटलेले आहेत. जेव्हां ब्रह्मदेवानें पंच-महाभूतें व हें त्रिभुवन निर्माण केलें, ज्यावेळीं पुरुष व स्त्रिया त्यानें उत्पन्न केल्या, त्या वेळींच त्यानें स्त्रियांतील हे दोषहि उत्पन्न केले. १३.१.३.८.

---

## अध्याय ३९ वा.

[ १. स्त्रियांच्या या दोषांमुळें त्यांचें रक्षण करणें कसें शक्य आहे असा युधिष्ठिराचा प्रश्न. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, पुरुष स्त्रियांवर वारंवार मोहानें अनुरक्त होतात, व स्त्रियाहि पुरुषांवर होतात, हें आपण प्रत्यक्ष पहातोंच. पण मला शंका अशी येते कीं, असल्या स्त्रियांशीं पुरुष संग कसा करतात? तसेंच स्त्रिया तरी कोणावर अनुरक्त होतात व मागून विरक्त तरी कां होतात? स्त्रिया अशा

जर आहेत, तर त्यांचें रक्षण करणें पुरुषाला शक्य तरी कसें आहे, हें मला नीट समजावून सांगावें. त्या स्वतः रममाण होऊन पुरुषांना फसवितात. त्यांच्या ताव-डींत सांपडलेला पुरुष निसटून जाणें कठीण. गाई नव्या नव्या गवताच्या मागून जातात, तशा स्त्रिया नित्य नव्या नव्या पुरुषांना शोधून काढितात. शंबरासुर, नमुचि, बलि, कुंभीनस, इत्यादि दैत्यांच्या साऱ्या कपटविद्या स्त्रियांना पाठ असतात. त्या हंसणाऱ्याशीं हंसतील तर रडणाऱ्याशीं रडतील; व काळ वेळ जाणून नावडत्याशींहि गोड गोड बोलतील. शुक्राचार्याला जें नीतिशास्त्र ठाऊक आहे, किंवा बृहस्पतीलाहि आहे, तें कांहीं स्त्रियांच्या बुद्धीपेक्षां अधिक नाहीं, मग त्यांचें रक्षण पुरुषांनीं करावें तरी कसें? खऱ्याचें खोटें व खोट्याचें खरें करण्यांत पटाईत अशा स्त्रियांना पुरुष किती म्हणून राखतील? स्त्रियांच्या शहाणपणाच्या गोष्टींचा निष्कर्ष काढूनच बृहस्पति, शुक्र इत्यादि मोठमोठ्या नीतिशास्त्रकारांनीं आपलीं शास्त्रें रचिलीं असावीं. त्यांचा पुरुषांनीं मान ठेवला तरी त्यांच्याविषयीं त्यांचें मन वांकडें. बरें त्या टाकून दिल्या तरी तेंच. भीष्म आजोबा, स्त्रिया धार्मिक असतात असेंहि आम्हीं ऐकिलें आहे. तें कसें? कांहीं केलें तरी विकृत मन करणाऱ्या स्त्रियांचें रक्षण कोणाला सकें करतां येणार, अशी मला मोठी शंका आहे. तरी तसें कोणी केलें आहे काय, किंवा करणें शक्य आहे काय, हें मला विस्तारानें सांगावें. १३. १. ३९.

---

## अध्याय ४० वा.

[ १. मागील अध्यायांतील युधिष्ठिराच्या स्त्रीविषयक प्रश्नाला भीष्माचें उत्तर. २ विपुलाची कथा ]

( १ ) **भीष्म** :— राजा युधिष्ठिरा, स्त्रियांसंबंधानें तूं म्हणालास तें खरें आहे, त्यांत कांहींच खोटें नाहीं. याविषयीं पुरातन इतिहासहि आहे व त्यांत विपुल नामक शिष्यानें आपल्या गुरुपत्नीचें रक्षण कसें केलें हें सांगितलें आहे. ब्रह्म-देवानें स्त्रिया कां व कशा उत्पन्न केल्या हेंहि मी तुला सांगतों. स्त्रियांहून पापी दुसरें कांहीं नाहीं. स्त्रिया म्हणजे जळता अग्नि, किंवा मयासुराची मायाच होत. पूर्वी माणसें धार्मिक होतीं असें सांगतात. तीं स्वतःच देव होत, त्यामुळें देवांना भय वाटूं लागलें. तेव्हां ते ब्रह्मदेवाकडे गेले आणि आपल्या मनांतील विचार त्याला सांगून खालीं मान घालून स्वस्थ बसले. त्यांचें मनोगत जाणून मग

ब्रह्मदेवानें पुरुषांना मोह पाडण्यासाठीं दुष्ट स्त्रिया उत्पन्न केल्या. युधिष्ठिरा, पूर्वी स्त्रिया फार साध्वी असत. पण या उत्पत्तीनंतर त्या दुष्ट झाल्या व त्यांना पितामहानें तदनुरूप इच्छाहि दिल्या. त्या कामलुब्ध स्त्रिया नित्य पुरुषांना त्रास देतात. त्या कामाला साह्य करण्यासाठीं ब्रह्मदेवान क्रोध उत्पन्न केला, त्यामुळें सर्व प्रजा आतां काम आणि क्रोध यांनीं जखडलेल्या आहेत. त्यामुळें स्त्रियांना स्वतंत्र कांहीं कर्में नाहींत, अशी व्यवस्था धर्मांत करण्यांत आली. श्रुति तर म्हणते कीं स्त्रियांना मनोनिग्रह व शास्त्रमर्यादा नाहींतच, व त्या मूर्तिमंत असत्य होत. ब्रह्मदेवानेंच त्यांना शय्या, आसन, अलंकार, अन्नपान, दुष्टपणा, कठोर भाषण व कामवासना या गोष्टी उपजत दिल्या आहेत. आत त्या ब्रह्मदेवालाहि त्यांचें रक्षण करणें कठीण, मग सामान्य पुरुष काय करणार? त्यांना निग्रह माहीतच नसल्यामुळें कठोर शब्द, मारझोड, बंधन याहि उपायांनीं त्यांचें रक्षण करणें अशक्य आहे.

( २ ) आतां विपुलानें गुरुस्त्रीचें रक्षण कसें केलें तें सांगतों ऐक. देवशर्मा नांवाचा एक प्रसिद्ध महान् ऋषि होऊन गेला. त्याची जगांत अप्रतिम अशी सुंदर पत्नी होती. तिचें नांव रुचि. तिचें रूप पाहून देव, गंधर्व, दानव हे मोहून जात. इंद्राचा तर मोह अनावर होई. आतां देवशर्म्याला स्त्रियांच्या स्वभावाची चांगलीच माहिती होती. म्हणून यथाशक्ति जुळेल त्या उपायानें आपल्या पत्नीचें तो रक्षण करीत असे. त्याला इन्द्राच्या परस्त्रियांविषयींच्या कामचेष्टाहि ठाऊक होत्याच. म्हणून त्याच्याविषयीं तर देवशर्मा विशेष काळजी घेत असे. एकदां यज्ञ करण्याचें त्याच्या मनांत आलें व त्या प्रसंगीं स्त्रीचें रक्षण कसें करावें असा विचार तो करूं लागला. त्यानें विपुल नांवाच्या आपल्या भृगुकुलोत्पन्न शिष्याला हाक मारिली आणि सांगितलें, ‘ बा विपुला, मी यज्ञाच्या कामासाठीं जात आहें, आणि या रुचीवर तर इंद्राचा डोळा सदा आहे. तेव्हां शक्य त्या मार्गानें हिचें रक्षण करण्याचें काम मी तुजवर सोंपवीत आहें. त्या इन्द्राच्या बाबतींत तुला फारच सावध राहिलें पाहिजे. कारण, तो वाटेल तीं सोंगें करणारा आहे. ’ देवशर्म्यानें याप्रमाणें सांगितल्यावरून इंद्रियांवर जय मिळविलेला तपस्वी विपुल ‘ ठीक आहे ’ असें म्हणाला. नंतर देवशर्मा आपल्या यज्ञस्थानीं जावयास निघाला असतां विपुलानें त्याला विचारलें, ‘ मुने, इन्द्र येऊं लागला असतां त्याचीं रूपें कशीं असतात, तेज कसें असतें, हें मला सांगून ठेविल्यास बरें. ’ विपुलाच्या म्हणण्याप्रमाणें गुरूनें त्याला इन्द्राच्या कपटाचीं

सारीं रूपें सांगितलीं. तो म्हणाला, ‘ इंद्र हा फारच कपटी आहे. तो किती तरी सोंगें करतो आणि तीं वारंवार बदलतो. केव्हां तो किरीट घालतो, केव्हां वज्र हातांत घेतो, तर केव्हां धनुष्य घेतो. केव्हां तो कानांत कुंडलें घालतो, तर केव्हां चांडालाचें रूप घेतो. कधीं तो डोक्यावर शेंडी ठेवतो, तर कधीं जटा वाढवितो, व कधीं फाटकीं वस्त्रेंहि पांघरतो. एखाद्या वेळीं तो स्थूल असतो, तर पुनः कृश होतो. गौर, सांवळा, काळा असे तो आपले रंग पालटतो. तो कधीं कुरूप तर कधीं सुंदर दिसतो. कधीं तो म्हातारा असतो तर कधीं तरुण असतो. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांपैकींहि एखादें रूप तो प्रसंगीं घेतो. केव्हां तो कावळा होतो, तर केव्हां पोपट होतो, व केव्हां हंस तर केव्हां कोकिळहि बनतो. सिंह, वाघ, हत्ती यांच्या रूपानें तो केव्हां येतो, तर केव्हां देव, दैत्य अथवा राजा होऊन येतो. माशी, चिलट यांचेंहि रूप तो कधीं कधीं घेतो. त्याचीं रूपें फारच असतात, तेव्हां त्याला ओळखणें फार कठीण जातें. यासाठीं, विपुला, तूं माझ्या सुंदर पत्नीचा सांभाळ मोठ्या काळजीनें कर, असा कीं तेणेंकरून तिला स्पर्श करण्यास इन्द्र धजणार नाहीं; कारण तो दुष्ट यज्ञमंडपांतील हविर्द्रव्यावर एखादा कुत्रा टपून बसतो, त्याप्रमाणें रुचीवर टपून बसला आहे. ’

विपुलाला अशी नीट सूचना देऊन देवशर्मा यज्ञकर्मासाठीं निघून गेल्यावर गुरूच्या आज्ञेचा विचार करतां विपुलाला मोठी काळजी वाटूं लागली. तो मोठ्या तत्परतेनें रुचीला जपूं लागला. तो मनांत म्हणाला, ‘ गुरुपत्नीच्या रक्षणाचा परिणामकारक उपाय तरी काय करावा ? हा इन्द्र कपटी असून आवरण्यासहि कठीण आहे. तेव्हां आश्रमाचें फाटक किंवा झोंपडीचें दार लावण्यानें कांहीं तें काम होणारें नाहीं. तो नानारूपी असल्यामुळें कदाचित् वायुरूप घेऊनहि गुरुपत्नीला धरून टाकील. तेव्हां या गुरुपत्नीच्या शरीरांतच आपण योगबलानें प्रवेश करून रहावें. नुसत्या शारीरबळावर तिचें रक्षण करणें अशक्य आहे. जर का आपल्या पत्नीला इन्द्रानें उष्टी केलेली गुरुनें पाहिलें तर माझ्यावर कोपून तो मला शापहि देईल. इतर स्त्रियांप्रमाणें हिचें रक्षण करणें सोपें नाहीं. पण कांहीं करून तरी तें करणें भाग आहे. तेव्हां योगबलानें तिच्या शरीरांत प्रवेश करूनच मला तें कठीण कर्म साध्य होण्यासारखें आहे. कमलाच्या पानावर जसा पाण्याचा थेंब तसा मी तिच्या शरीरांत अलग राहीन व मग बाहेर येईन म्हणजे माझ्या हातून पाप घडणार नाहीं. पांथस्थ जसा रिकाम्या

धर्मशाळेंत रहातो, तसाच मी हिच्या शरीरांत शुद्ध मनानें राहीन.' याप्रमाणें धर्माधर्माचा विचार करून, वेदांचें मर्म व गुरूचें आणि आपलें तपोबळ ओळखून विपुलानें गुरुपत्नीच्या रक्षणार्थ पराकाष्ठेचा प्रयत्न केला. त्यानें तिच्या नेत्रांवर नेत्र रोखून तिच्या शरीरांत प्रवेश केला व वायु आकाशांत रहातो, तसा तो तेथें राहिला. छाया जशी वस्तूच्या प्रत्येक भागाला आपला भाग योजिते तसें विपुलानें रुचीचें सर्व शरीर योगबलानें व्यापून टाकिलें व अशा रीतीनें तो तिचें रक्षण करीत राहिला. मात्र रुचीला तें समजलें नाहीं. देवशर्मा गुरु यज्ञाहून घरीं परत येईपर्यंत त्याचा हा क्रम सारखा चालला. १३. १. ४०.

---

## अध्याय ४१ वा.

[ १ विपुलाची कथा–पुढें चालू. ]

( १ ) भीष्म :—युधिष्ठिरा, विपुलाचा असा क्रम चालला असतां एकदां इन्द्र दिव्यरूप धारण करून 'आतां आपल्याला संधि मिळेल,' असें मनांत म्हणत देवशर्म्याच्या आश्रमाशीं आला. त्यानें अगदीं अप्रतिम रमणीय रूप धारण केलें आणि तो आश्रमांत शिरला. तेथें त्याला विपुलाचें शरीर चित्रांत काढल्यासारखें निश्चेष्ट पडलेलें दिसून आलें. जवळ ती कमलाक्षी लावण्यवती रुचीहि त्याला दिसली. इन्द्राला आलेला पहातांच रुचि उठून उभी रहाण्याची इच्छा करूं लागली, व त्याच्या रूपानें चकित होऊन 'कोण तूं' असें त्याला विचारावेंसेंहि तिला वाटलें. पण विपुलानें योगबलानें तिला अगदीं स्तब्ध करून सोडिल्यामुळें, तिला मुळींच हालचाल करतां येईना.

तेव्हां इन्द्र अगदीं गोड शब्दांनीं तिला म्हणाला, 'हे सुंदरि, मी देवेन्द्र तुझ्यासाठीं आलों आहें, मला ओळखिलेंस काय ? तुझा विचार मनांत येऊन मदनानें पीडित झालेला मी येथें आलों आहे. आतां उशीर करूं नको.' इंद्राचे हे शब्द विपुलानें ऐकिले व गुरुपत्नीच्या शरीरांत तो प्रविष्ट झालेला होता तरी त्यानें इंद्रालाहि पाहिलें. त्यानें स्तब्ध करून टाकिल्यामुळें, रुचीला मात्र कांहीं बोलतां किंवा हालतां येईना. पण त्याला गुरुपत्नीचें हृद्गत मात्र समजलें. तेव्हां त्या तेजस्वी पुरुषानें योगबलानें तिला अगदीं दाबून ठेविलें व तिचीं सारीं इंद्रियें जखडून टाकिलीं. त्यामुळें तिला त्या निर्विकार स्थितींत पाहून इन्द्र पुनः तिला थोडासा लज्जायुक्त होऊन म्हणाला, 'सुंदरी, इकडे ये, इकडे

ये.' पण तिला प्रत्युत्तर देतां येईना. मग विपुलानें तिची वाणी जरा शिथिल केली, तेव्हां मात्र तिच्या चंद्रासारख्या मुखांतून 'येऊन काय करावयाचें?' असे शब्द बाहेर आले. पण ती पराधीन झाल्यामुळें तिला लाज वाटली आणि इन्द्रालाहि अगदीं कसेंसेंच होऊन गेलें. तेव्हां ही तिची विकृति पाहून इन्द्र जरा खोल विचार करून पाहूं लागला, तेव्हां त्याला रुचीच्या शरीरांत योगबलानें मुनीनें प्रवेश केला आहे असें आढळून आलें. आरशांत पहाणाराचें प्रतिबिंब दिसावें, तसा विपुलाचा देह तिच्या देहांत प्रतिबिंबित झाला होता. हा मुनि मोठा तपस्वी आहे, कदाचित् आपल्याला शाप देईल अशी भीति इन्द्राला वाटली व तो घाबरून कांपूं लागला. तेव्हां विपुलानें रुचीचें शरीर सोडून स्वतःच्या देहांत प्रवेश केला आणि घाबरून गेलेल्या इंद्राला तो म्हणाला, 'दुष्टा इन्द्रा, देव आणि मनुष्यें हीं आतां तुझा मान राखणार नाहींत. अरे, गौतमानें तुझें शरीर छिद्रांकित केलेलें तूं इतक्यांतच विसरलास काय? तूं पोरकट, व चंचल प्रकृति असून मनोनिग्रह तुला ठाऊकच नसल्यामुळें मी गुरुपत्नीचें रक्षण करीत बसलों आहें. तेव्हां तूं येथून जा कसा! मूर्खा, मी तुला शाप देत नाहीं. मी दयाळु असल्यामुळें तुला जाळूनहि टाकीत नाहीं. माझा गुरु अत्यंत रागीट आहे; तुज दुष्टाकडे तो क्रोधानें संतप्त होऊन पाहील तर तुला जाळूनच टाकील. इन्द्रा, अशी गोष्ट करूं नये. तो ब्राह्मण किती सन्मान्य! तूं आपले पुत्र व अमात्य यांसह त्याच्या ब्रह्मतेजाला बळी पडूं नकोस. आपण देव अमर आहों अशा घमेंडींत तूं वागत असशील, पण तपाला असाध्य कांहीं असेल ही गोष्ट तूं मनांतहि आणूं नकोस.'

माहात्म्या विपुलाचें हें भाषण ऐकून कांहींएक उत्तर न देतां इन्द्र जागच्या जागीं गुप्त झाला. तो जाऊन दोन घटका जातात तों देवशर्मा यज्ञ आटोपून आपल्या घरीं परत आला. गुरु परत आला असतां विपुलानें आपण गुरुपत्नीचें रक्षण केल्याचें वृत्त त्याला सांगितलें आणि शांतपणें त्याला नमस्कार करून तो गुरूच्या सेवेला पूर्वींप्रमाणें लागला. मग विश्रांति घेतल्यावर गुरु आपल्या पत्नीसह बसला असतां विपुलानें त्याला इन्द्राचें कृत्य निवेदन केलें आणि तें ऐकून त्या प्रतापशाली विपुलावर देवशर्मा अगदीं संतुष्ट झाला. त्याचें शील, आचरण, तप, नियम, तशीच गुरुभक्ति व धर्मनिष्ठा पाहून त्याला त्यानें धन्यवाद दिला. आपल्याला असा धर्मिष्ठ शिष्य मिळाला हें समजून त्यानें वर देऊन त्याचें कौतुक केलें. उलट विपुलानेंहि गुरूपासून धर्मनिष्ठा ग्रहण केली आणि त्याच्या

अनुज्ञेनें त्यानें अनुपम तप केलें. महातपस्वी देवशर्माहि इन्द्राच्या त्रासांतून मुक्त झाल्यामुळें त्या एकान्त वनामध्यें मोकळेपणें फिरूं लागला. १३.१.४१.

---

## अध्याय ४२ वा.

### [ १. विपुलाची कथा—पुढें चालू ]

( १ ) भीष्म :—गुरूचें काम करून विपुलानें तीव्र तप केलें आणि त्या तपानें आपण वीर्यवान् झालों असें त्याला वाटलें. त्यामुळें तो अगदीं निर्भय होऊन आनंदानें पृथ्वीवर हिंडूं लागला. गुरूचें कार्य व तप यांच्या योगानें आपण दोन्ही लोक जिंकले असेंहि त्याला वाटलें. युधिष्ठिरा, याप्रमाणें कांहीं काळ गेल्यावर रुचीचा बहिणीच्या घरीं मोठ्या थाटाच्या विवाहोत्सवाचा प्रसंग आला. त्यावेळीं कोणी एक अत्यंत रमणीय स्वरूपाची दिव्य स्त्री आकाशमार्गानें तेथें आली. तिच्या अंगावरील कांहीं उत्तम सुवासिक फुलें देवशर्म्याच्या आश्रमाजवळ पडलीं व रुचीनें तीं उचलून घेतलीं. इतक्यांत तिच्या बहिणीकडून विवाहाचें बोलावणें करणारा दूत तेथें येऊन ठेपला. त्या बहिणीचें नांव प्रभावती; रुचीपेक्षां ती वडील असून अंगदेशाधिपति चित्ररथाची ती पत्नी होती. रुचीला बोलावणें मिळाल्यावर तीं दिव्य फुलें केसांत घालून अंगदेशीं ती बहिणीकडे गेली. त्यावेळीं तिच्या केसांतील तीं फुलें पाहून अंगराज्ञीनें आपल्यासाठींहि तसलीं फुलें बहिणीपाशीं मागितलीं. तेव्हां रुचीनें तें पतीला सांगितलें असतां देवशर्म्यानें 'ठीक आहे' असें म्हटलें आणि विपुलाला बोलावून आणून 'जा लवकर आणि तसलीं फुलें घेऊन ये' अशी त्याला आज्ञा केली. तेव्हां विशेष विचार न करतां विपुल निघाला व गुरूच्या आश्रमापाशीं आला. तेथें आणखी तसलीं फुलें पडलीं असून तीं मुळींच कोमेजलीं नव्हतीं. मग तीं दिव्य पुष्पें उचलून घेऊन गुरूचें कार्य केलें, या आनंदानें विपुल तेथून निघाला व चंपकवृक्षांनीं सुशोभित झालेल्या चंपा नगरीशीं आला. तेथें त्या निर्जन भूमींत एक जोडपें एकमेकांच्या हातांत हात घालून चक्राकार फिरत असलेलें त्याला दिसलें. त्यांतील एक त्वरेनें फिरत दुसऱ्याच्या पावलांना अडथळा करी. तेव्हां दोघांत भांडण जुंपलें. एक म्हणाला, 'तूं फार त्वरेनें फिरतोस.' दुसरा म्हणाला 'नाहीं'. 'मी नाहीं', 'मी नाहीं' असें तीं एकमेकांना म्हणत. अशा रीतीनें भांडतां भांडतां शपथ घेऊन तीं म्हणालीं,

' आपल्यापैकीं जो कोणी खोटें बोलणारा असेल, त्याला विपुल मुनीला परलोकीं जी गति मिळणार आहे, ती मिळो.' त्यांचे हे शब्द ऐकून विपुलाला दुःख झालें आणि तो मनांत म्हणाला, ' मीं एवढे परिश्रम करून तीव्र तप केलें तें व्यर्थच काय? या जोडप्याच्या दृष्टीनें मीं काय पाप केलें कीं तेणेंकरून मला वाईट गति मिळावी? कोणालाहि अनिष्ट वाटेल अशी गति मला मिळेल असें हीं म्हणतात!' असा विचार करीत तो आपलें दुष्कृत्य तरी काय असावें तें मनांत शोधूं लागला. इतक्यांत त्याला आणखी सहा दुसरे पुरुष सोन्यारुप्याच्या फांशांनीं खेळत असलेले दिसले. तेहि त्या पहिल्या जोडप्याप्रमाणें विपुलाचें नांव उच्चारून शपथ घेऊं लागले. ते म्हणाले, ' जो लोभ धरून उलटें खेळण्याचा प्रयत्न करील त्याला विपुलास परलोकीं मिळणारी गति मिळो.' तें ऐकल्यावर पुनः विपुल आपल्याकडून पूर्वी काय अधर्म झाला असावा याचा जन्मापासून आठवण करीत विचार करूं लागला. दोघांच्या शपथा ऐकून त्याला आगींत तेल ओतल्याप्रमाणें झालें आणि त्याचें मन अगदीं जळून जाऊं लागलें. असा विचार करीत असतां त्याचे बरेच दिवस गेले. शेवटीं त्याला आढळून आलें कीं रुचीच्या रक्षणासाठीं आपण योगबलानें तिच्या शरीरांत प्रवेश केला, पण ती गोष्ट आपण गुरूला कळविली नाहीं, हेंच पाप आपल्या हातून घडलें. असें त्याला निश्चयानें वाटलें असतां तो चंपा नगरीस आला आणि गुरूला तीं फुलें देऊन त्याची त्यानें विधिपुरःसर पूजा केली. १३.१.४२.

## अध्याय ४३ वा.

[ १. विपुलाची कथा—पुढें चालू. ]

( १ ) **भीष्म**:—राजा युधिष्ठिरा, आपला शिष्य परत आलेला पाहून तो महातेजस्वी देवशर्मा त्याला काय म्हणाला तें ऐक. देवशर्मा म्हणाला, ' विपुला, त्या थोरल्या अरण्यांत तुला कायरे दिसलें? त्यांना, तुला स्वतःला आणि रुचीला, तूं काय केलें याचें ज्ञान आहे. विपुलानें विचारिलें, ' हे ब्रह्मर्षे, तेथें मला एक जोडपें दिसलें तें कोण? आणि ते पुरुष तरी कोण? त्यांना माझी सर्व माहिती तरी कशी लागली?' देवशर्म्यानें उत्तर दिलें, 'विपुला, तें जोडपें म्हणजे दिवसरात्रीची जोडी होय. तीं सारखीं चक्राप्रमाणें फिरत असतात आणि म्हणूनच त्यांना तुझें दुष्कृत्य समजून आलें. आणि जे पुरुष आनंदानें फाशांनीं

खेळत होते, ते ऋतु होत. त्यांनाहि तुझें दुष्कृत्य ठाऊक आहे. मला कोणी पहात नाहीं, या विश्वासानें कोणीहि कोणतेंहि दुष्कृत्य करूं नये. अगदीं एकातांत गुप्तपणें पाप केलें तरी तें रात्र, दिवस व ऋतु हे तरी पहातातच. म्हणूनच तुझ्या पापामुळें तुला वाईट लोक मिळणार असें ते म्हणाले. तूं दुष्कृत्य करून मला तें सांगितलें नाहींस हेंच पाप. काय केलें तें गुरूला सांगितलें नाहीं या अभिमानानें तूं हंसत होतास, तेव्हां तुझ्या दुष्कृत्याची तुला आठवण देण्यासाठीं ते तूं ऐकलेले शब्द तुला उद्देशून बोलले. अहोरात्र व ऋतु हे मनुष्याचें चांगलें किंवा वाईट कर्म नित्य पहात असतात. तूं जें कर्म व्यभिचाराच्या आरोपामुळें भिऊन मला सांगितलें नाहींस, तें त्यांना कळलें व म्हणून ते तुला तसें बोलले. माझ्या स्त्रीच्या दुर्वृत्तीमुळें तिचें इतर मार्गानें रक्षण करणें कठीण होतें, म्हणून तूं केलें तें मुळींच अयोग्य नव्हतें, व त्यामुळें मी तुझ्यावर संतुष्टहि झालों. तूं जर खरोखर दुर्वर्तन केलें असतेंस, तर मीं मुळींच विचार न करतां तुला शाप दिला असता. पण तूं तिचें रक्षण केलें आणि मला तसें सांगितलें, यामुळें मी संतुष्ट झालों. आतां तूं स्वस्थ अस, तुला निःसंशय स्वर्ग मिळेल.'

विपुलाला असें सांगून तो महर्षि देवशर्मा पत्नी व शिष्य यांसह स्वर्गास जाऊन आनंदित झाला. राजा, याप्रमाणें मार्कंडेय महामुनीनें गंगेच्या तीरीं मला हें विपुलाचें आख्यान सांगितलें. म्हणून, हे युधिष्ठिरा, मीं तुलाहि सांगतों कीं स्त्रियांना जपणें सदा अवश्य आहे. त्यांच्यांत चांगल्या असतात तशा कांहीं वाईटहि असतात. ज्या स्त्रिया साध्वी असतात, त्यांना सर्व लोक मातेप्रमाणें सन्मान देतात व त्यांच्या बलावर हें जग धारण केलें जातें. दुसऱ्या वाईट असतात, त्यांचें शील दुष्ट असतें, त्या कुळाचा नाश करतात; त्यांचीं शारीरलक्षणेंहि त्यांचा दुष्टपणा दाखवितात. त्यांचें रक्षण मोठ्या कष्टानें करावें लागतें, त्या मोठ्या कठोर स्वभावाच्या व कठोर काम करणाऱ्या असून त्यांचें प्रिय असें कोणीच असत नाहीं. त्या क्रूर प्रकृतीच्या व वाईट वर्तनाच्या असून कोणा एकावरहि त्यांचें मन टिकून रहात नाहीं. राजा, असल्या स्त्रियांशीं पुरुषांनीं कधीं स्नेह ठेवूं नये. त्यांचा केवळ धर्म म्हणून कष्टानें उपभोग घ्यावा. पण त्यांशीं संबंध न ठेवणें उत्तम. असो. एका विपुलानें गुरुस्त्रीचें रक्षण केलें, दुसऱ्या कोणाला तसें करण्याचें सामर्थ्य नाहीं. १३.१.४३.

## अध्याय ४४ वा.

[ १. विवाहाचे प्रकार. २. कन्येच्या शुल्काविषयीं. ]

( १ ) **युधिष्ठिर:**—हे पितामह, सर्व धर्म, कुटुंबव्यवस्था, गृहस्थाश्रम, पितृदेव व अतिथि यांचा सत्कार यांचें मूळ जो विवाह त्यासंबंधानें माझें शंका-निरसन करावें. सर्व धर्मांत हा विवाहधर्मच फार विचार करण्यासारखा आहे, तरी कन्या कोणत्या प्रकारच्या पुरुषाला द्यावी तें मला सांगा.

**भीष्म:**—पुरुषाचा स्वभाव, आचरण, विद्या, कुळ, उद्योग यांचा विचार करून गुणवान् दिसेल अशालाच कन्या अर्पण करावी. हा ब्राह्मविधि असून ब्राह्मणांना हा मान्य आहे. वराला घरीं बोलावून व अनुकूलतेप्रमाणें त्याला देणगी देऊन कन्यादान करणें हा क्षात्रविधि. तो क्षत्रियांना संमत आहे. तिसरा विवाहप्रकार असा कीं, आपली आवड बाजूला ठेवून कन्येची जशी आवड असेल त्याप्रमाणें तिला जो आवडेल त्याला ती देणें हा होय. या प्रकाराला वेदवेत्ते गांधर्वविधि म्हणतात. चवथा प्रकार म्हणजे कन्येच्या बांधवांना द्रव्याचा लोभ दाखवून दुष्कळ धन देऊन कन्या घेणें हा. हा असुरांच्या धर्मांतील विवाहविधि असें ज्ञाते म्हणतात. पांचवा राक्षसविधि. कन्येच्या बांधवांना हाणमार करून रडारड चालली असतां तिला बलात्कारानें पळवून नेणें म्हणजे राक्षसविधि होय. या पांच विवाहविधींपैकीं पहिले तीन धर्माला अनुसरून असून शेवटचे दोन अधर्म्य होत. म्हणून पैशाच किंवा राक्षस विधि हे कधींहि अवलंबूं नयेत. ब्राह्म, क्षात्र व गंधर्व हे तीन धर्म्य असल्यामुळें त्यांतील कोणताहि स्वतंत्रपणें किंवा मिश्रणानें अवलंबावयास अडचण नाहीं.

ब्राह्मणाला ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य अशा तीन भार्या करतां येतात, क्षत्रियाला क्षत्रिय, वैश्य अशा दोन व वैश्याला एक सवर्ण भार्याच युक्त आहे. अशा स्त्रियांना होणारीं मुलें पितृवर्णीय होत. सर्व पत्न्यांत ब्राह्मणी ज्येष्ठ समजावी व क्षत्रियाची क्षत्रिय स्त्रीच ज्येष्ठ होय. केवळ प्रेमासाठीं शूद्र स्त्री करावी असें कांहीं म्हणतात, पण इतरांना तें मान्य नाहीं. त्रैवर्णिकांनीं शूद्रेच्या ठायीं संतति उत्पन्न करणें युक्त नाहीं असें ज्ञात्यांचें मत आहे. तसें केल्यानें द्विज प्रायश्चित्तास पात्र होतो असें म्हणतात. तीस वर्षांच्या वरानें दहा वर्षांच्या नग्निकासंज्ञक मुलीशीं विवाह करावा, किंवा एकवीस वर्षांच्या पुरुषानें सात वर्षांच्या मुलीशीं करावा. ज्या मुलीचा बाप किंवा भाऊ नसेल, तिचें पाणिग्रहण करूं नये.

कारण तशी कन्या पुत्रिकाधर्माचा अवलंब करण्याचा संभव असतो. ( पुत्रिका-धर्म म्हणजे पतीपासून होणारे पुत्र पित्याला देणें. ) कन्येनें ऋतुमती झाल्यावर तीन वर्षे वाट पहावी व चवथें वर्ष लागल्यावर स्वतःचा पति स्वतः निवडावा. असें केल्यानें ती संततिहीन होत नाहीं व तिच्या इच्छाहि पूर्ण होतात. पण याहून निराळ्या रीतीनें वागणारी स्त्री मात्र निन्द्य ठरते. ज्या कन्येशीं विवाह करावयाचा, ती आईकडून सपिंड नसावी व बापाकडून सगोत्र ( व सप्रवर ) नसावी, असें मनूनें म्हटलें आहे.

( २ ) युधिष्ठिरः—आजोबा, जर कन्येचें शुल्क एकानें वस्तुतः दिलें, देतों म्हणून दुसऱ्यानें सांगितलें, तिसरा धमकी देतो आहे व चवथा धनाचा लोभ दाखवीत आहे व प्रत्यक्ष पाणिग्रहण पांचव्यानेंच केलें, तर अशा प्रसंगीं ती कन्या खरी भार्या कोणाची समजावी ? ह्याविषयीं सत्य काय हें जाणण्याची आम्हांला इच्छा आहे. तरी आम्हांला तूं मार्गदर्शक हो.

भीष्मः—युधिष्ठिरा, जें कृत्य विचार करून लोकांसमक्ष ठरविलें जातें, त्या पासून असत्यपणें मागें फिरणें हें पाप होय. भार्या, मूल, ऋत्विज्, आचार्य, शिष्य आणि उपाध्याय, हीं नातीं स्वीकारण्याचें एकदां मान्य केल्यावर पुढें नाहीं म्हणणें हें दंडास पात्र आहे असें कित्येकांचें मत आहे. पण कित्येक जण तसें मानीत नाहींत. असले संबंध कोणाच्या इच्छेविरुद्ध घडवून आणेंण मनूला मान्य नाहीं. ही गोष्ट अय-शस्कर व अधर्म्य होय. तिच्यामुळें धर्माचा कोप होतो. युधिष्ठिरा, तूं सुचविलेल्या पांच विकल्पांपैकीं पहिला व शेवटचा हेच विचारणीय असून एकांतहि मोठासा दोष नाहीं. कारण धर्मानें जिचें अर्पण केलें व द्रव्य देऊन जी घेतली त्या सारख्याच होत. आतां या दोहोंपैकीं पहिल्याचा विचार करतां, द्रव्य घेऊन बांधवांनीं कन्या देण्याचें ठरविल्यावर मंत्र म्हणून होम करावे, तेव्हांच विवाह पुरा होतो. कन्या-दान केल्याशिवाय मंत्र सिद्धच होत नाहींत. तेव्हां या उक्त प्रकारांचा बांधा आला असतां ज्याला मंत्राची संमति प्रथम मिळाली तोच संकेत अधिक बल-वान् होय ( म्हणजे द्रव्यदान झालें असतांहि जर कन्या दुसऱ्याला वरील तर तोच विवाह खरा, केवळ द्रव्यदान निरुपयोगी समजावें ). धर्माप्रमाणें पहातां दैवानें दिलेली भार्या पतीला मिळते. तेव्हां कन्येच्या संमतीनें झालेला विवाहच खरा, इतरांचीं तत्संबंधीं झालेलीं बोलणीं पतीला दोष लावूं शकत नाहींत.

युधिष्ठिरः—आजोबा, कन्येचें शुल्क एकदां घेतल्यावर, जर दुसरा अधिक चांगला धर्मार्थकामसंपन्न वर तिच्यासाठीं आढळला, तर पहिल्याला ती न

देणें खोटेपणाचें होईल कीं नाहीं? कोणतीहि गोष्ट पत्करली तरी तींत दोष आहेच, मग त्यांत श्रेयस्कर कोणती? सगळ्या गोष्टींत ही गोष्ट मला अत्यंत विचारणीय वाटते. तरी याहि विचारांत तुम्हीं मार्गदर्शक व्हा. तुम्ही इतकें सांगतां, पण माझी तृप्तिच होत नाहीं.

भीष्म:—युधिष्ठिरा, कन्या देण्याचें मान्य करून द्रव्य घेतलें म्हणजे त्या कन्येवर भार्यापणाचा अधिकार देणाराला मिळाला असें होत नाहीं. कारण सज्जन शुल्क घेऊन कन्या कधींच देत नसतात. वरांमध्यें जे गुण पाहिजेत, त्यांतील कांहीं नसतात तेव्हांच बांधव शुल्क मागतात. 'मुलीला अमुक अलंकार घाल आणि विवाह कर,' असें सांगणें व वरानें तसें करणें यांत द्रव्य देण्याचा प्रश्न नाहीं व तो विक्रयहि नाहीं. मुलीसाठीं कांहीं मागून घेऊन ती वराला देणें ही परंपरागत वहिवाटच आहे. 'कन्या देतों' असें म्हणणें, किंवा न म्हणणें, यांत विशेष नाहीं. प्रत्यक्ष विवाह घडेपर्यंत उभयपक्षीं अशीं बोलणीं चालतच असतात. उपवर कन्यांना असा वरच मरुतांनीं पूर्वीं दिलेला आहे. आपल्याला इष्ट नाहीं अशा वराला मुलगी देऊं नये असें ऋषींनीं सांगितलें आहे. कारण मुलीच उत्तम संततीला कारण होत. कन्येचें द्रव्य घेऊन तिचें दान करण्याच्या व्यवहारांत फार दोष आहेत असें जाणूनच शुल्कग्रहण हें विवाहाची निश्चिति करणारें नव्हे असें ठरविण्यांत आलें. कसें तें ऐक. मीं स्वतः विचित्रवीर्यासाठीं मागध, काशी व कोसल हे देश जिंकून दोन कन्या आणिल्या. त्यांतील एकीचा विवाह पूर्वीं झालेला होता व दुसरीचें शुल्क घेण्यांत आलेलें होतें. तेव्हां 'पहिलीला सोडून दे' असें माझ्या पित्याच्या बाल्हीक नामक बंधूनें सांगितलें व दुसरीला आणावयास सांगितलें. पण त्याच्या बोलण्याविषयीं मला संशय आल्यावरून मी त्यासंबंधानें इतर ज्ञात्यांना वारंवार विचारिलें. या प्रश्नाचें रहस्य समजून घेण्याची इच्छा मला फार झाली. म्हणून मीं 'याविषयीं आचार काय आहे तो सांगा,' असें बाल्हीकाला पुनः पुनः विचारिलें; तेव्हां तो म्हणाला, 'जरी प्रत्यक्ष पाणिग्रहणापेक्षांहि शुल्काची निश्चयात्मकता तुम्हांला अधिक वाटत असली, तरी 'शुल्क घेतलें असतांहि दुसऱ्या वराशीं विवाह करावा' अशी स्मृति आहे. ज्याला शुल्कच पाणिग्रहणापेक्षां बलवत्तर वाटतें त्याचें म्हणणें धर्मवेत्ते प्रमाण समजत नाहींत. 'कन्येचें दान करावें' (विक्रय करूं नये) असें जें शास्त्रकार प्रसिद्धपणें सांगतात, त्यावर ज्यांचा विश्वास नाहीं व जे क्रय किंवा शुल्क यांनाच महत्त्व देतात, ते धर्मज्ञच नव्हत. त्यांना मुली

देऊं नयेत व त्यांच्या करूं नयेत. तात्पर्य क्रय किंवा विक्रय या गोष्टींनीं केव्हांहि पत्नीपणा सिद्ध होत नाहीं. जे दासींचा क्रयविक्रय द्रव्यलोभानें करतात त्या पापी लोकांची 'पत्नीहि विकत घेतां येते' अशी बुद्धि होते.

याविषयीं लोकांनीं सत्यवानाला प्रश्न केला होता, तो असा कीं, 'जिचें शुल्क घेतलें आहे अशा कन्येच्या बाबतींत जर तो शुल्क देणारा प्रत्यक्ष पाणिग्रहणापूर्वी मृत झाला, तर तिचें पाणिग्रहण दुसऱ्या कोणास करतां येईल काय, याविषयींचा आमचा संशय दूर कर. ज्ञानी लोकांना तुझें म्हणणें मान्य होतें.' हा प्रश्न ऐकून सत्यवान् म्हणाला, 'जो वर खरोखर इष्ट असेल, त्यालाच कन्या द्यावी, त्यांत विचार कसला करावयाचा? शुल्क देणारा जीवंत असतांहि इष्ट वरालाच जर मुलगी देतात, तर तो मृत झाला असतां देतात यांत संशय कसला?'

पति मृत झाला असतां त्याच्या स्त्रीनें दिरापाशीं रहावें किंवा तप करावें. पतीच्छेला अनुसरूनच काय तें तिनें करावें. या बाबतींत कोणी म्हणतात, 'दिरानें मृतभ्रातृजायेच्या ठिकाणीं पुत्रोत्पत्ति करावीच,' पण दुसरे कांहीं स्त्रीच्या मनावर ती गोष्ट संपवितात. पाणिग्रहणापूर्वीच्या काळाला पूर्वी सांगितलेले विकल्प लागू आहेत, मग त्या काळांत मंगलकृत्यें व मंत्रोच्चारण कितीहि झालेलें असो. तेथपर्यंत इष्ट वराशीं विवाह करतां येतो. त्यांत केवळ देणाराला असत्य भाषणाचाच दोष येतो. कारण पाणिग्रहणविधीची समाप्ति सप्तपदीनें होते. पाणिग्राहक वराच्या हातावर कन्यादानाचें उदक पडल्यानें कन्येला त्याचें भार्यात्व येतें; असें याविषयीं निश्चयानें सांगितलें आहे. मनानें अनुकूळ, उत्तम कुळांत जन्मलेली, भावानें अग्नि साक्षीस ठेवून दिलेली आणि सात पावलें जिच्यासह यथाविधि आक्रमिलीं आहेत अशीच कन्या ब्राह्मणाची भार्या होते. १३. १. ४४.

---

## अध्याय ४५ वा.

[ १. शुल्क घेतलेल्या कन्येविषयीं आणखी विचार. २ पुत्राला पितृधन कोणत्या प्रमाणांत मिळावें. ]

**१ युधिष्ठिर:**—हे पितामह, शुल्क घेतलेल्या कन्येचा नियोजित पति जर नाहींसा झाला व त्याच्या स्थानीं कांहीं कारणानें दुसरा कोणी उभा राहिला नाहीं, तर पुढें काय व्यवस्था करावी, हें मला सांगा.

**भीष्म**—युधिष्ठिरा, ज्याला पुत्र नाहीं अशा पुरुषानें कन्येचें शुल्क घेतल्यावर तें जर त्यानें परत केलें नाहीं, तर ती कन्या अर्थात् शुल्क देणाऱ्याची होते. त्या शुल्कासाठीं तिला पुत्र होईल अशी योग्य योजना करावी. पण त्याच्याशिवाय अन्य पुरुषाला तिच्याशीं विधियुक्त विवाह करतां येणार नाहीं. आतां असें कोणी म्हणतात कीं, तिनें पित्याच्या आज्ञेनें दुसरा कोणी पसंत करून त्याच्याशीं विवाह करावा; पण दुसरे धर्मशास्त्रज्ञ तें मान्य करीत नाहींत. सज्जनांनीं तशी गोष्ट कधीं केली नाहीं आणि सज्जनांचा आचार हें धर्माचें मोठेंच लक्षण आहे. या प्रकरणीं महात्म्या जनकाचा नातू जो सुक्रतु त्यानें म्हटलें आहे कीं, 'वाईट लोकांनीं आचरिलेल्या मार्गाचें अनुकरण कसें करावें बरें? हा धर्म अगदीं स्पष्ट असतां त्यासंबंधानें प्रश्न उत्पन्न करणें किंवा शंका घेणें म्हणजे सज्जनांची निन्दा करणेंच होय. धर्माचें खोटेपणानें खंडन करणें हा असुरांचा धर्म आहे. असा प्रकार पूर्वीं विवाहाच्या बाबतींत कोणीहि केलेला ऐकण्यांत नाहीं. स्त्रीपुरुषांचा पतिपत्नी या नात्याचा संबंध अत्यंत सूक्ष्म स्वरूपाचा आहे. पण कामवासनापूर्ति ही गोष्ट मात्र सर्वसाधारण आहे.'

**युधिष्ठिरः**—आजोबा, कन्या व पुत्र हीं पित्याला सारखींच असल्यामुळें इतर पुरुषबांधवांना निपुत्रिक पित्याचें धन कोणत्या प्रमाणांत मिळावें?

**भीष्मः**—युधिष्ठिरा, पुत्राची योग्यता आपल्या स्वतःसारखी व कन्या पुत्रासारखीच होय. अर्थात् कन्या असतांना पित्याचें धन दुसरा कोण घेऊं शकेल? आईचें जें स्त्रीधन असेल, तें तर कन्येच्याच वांट्याचें होय. तें निपुत्रिक पुरुषाच्या मुलीच्या मुलालाच तें मिळणार. कारण तो नातू मातामहाला पिंड देतो. या स्थितींत पुत्र व दौहित्र यांत धर्मतः भेद नाहीं. इतर बाबतींत म्हणजे मुलगा व मुलगी अशीं दोन्ही ज्याला आहेत, त्याच्या धनाच्या वांटणींत मुली बरोबर मुलालाहि वांटा मिळतो. प्रथम एखाद्याला एकच मुलगी असल्या-मुळें तिलाच पुत्र समजून धनाची वांटणी झाल्यानंतर जर त्याला (दत्तकादि) पुत्र होईल तर ती मुलगीच मोठी वांटेकरीण होते. (म्हणजे पित्याच्या धनाचे पांच भाग करून तिला तीन व पुत्राला दोन देण्यांत येतात.) ज्या मुलीचें शुल्क घेऊन तिला विकून टाकिलें आहे, तिच्या मुलांना मात्र हा नियम लागू करण्याचें कारण नाहीं; कारण विकलेल्या मुलीच्या मुलांवर केवळ त्यांच्या बापाचा अधिकार आहे, आजोबांचा नाहीं. असे कन्याविक्रय करणारे लोक

मत्सरी, अधार्मिक, दुसऱ्याचें वित्त हरण करणारे, लबाड, आसुरी वृत्तीचे होत. या विषयीं यमानें गाइलेली एक गाथा पुराणवेत्ते धर्मशास्त्रज्ञ म्हणत असतात. ती अशी. ' जो मनुष्य आपला पुत्र किंवा कन्या विकून पोटासाठीं द्रव्य मिळवूं पहातो, तो मूर्ख कालनामक सात अत्यंत घोर नरकांत घाम, मूत्र, विष्ठा हीं भक्षण करतो. ' आर्ष विवाहामध्यें वर कन्येच्या पित्याला दोन गाई देत असतो, त्यांना कोणी शुल्क म्हणतात, कोणी म्हणत नाहींत. पण या बाबतींत धन किती आहे हा प्रश्न नाहीं. थोडें किंवा फार कितीहि असलें तरी त्यामुळें कन्याविक्रय होतोच. ही गोष्ट कित्येकांच्या आचरणांत असली तरी ती सनातन धर्मांत मोडत नाहीं. विवाहाच्या बाबतींत दुसऱ्याहि अशा कित्येक गोष्टी चालू असलेल्या आढळून येतात. उदाहरण, आपल्याला वश असलेल्या मुलीला पळवून नेऊन तिच्याशीं संबंध करणें. असें करणाराहि पापीच असून तो अंधतमामध्यें लोळत पडतो. आपलीं मुलें तर अशा रीतीनें विकूं नयेतच, पण दुसऱ्याहि कोणत्या माणसाला कोणी विकूं नये. अशा अधर्मानें मिळविलेल्या धनानें धर्म कधींच साधणार नाहीं. १३.१.४५.

---

## अध्याय ४६ वा.

[ १ भीष्मकृत स्त्रीप्रशंसा ]

( १ ) भीष्मः—दक्षाचें वचन पुराणवेत्ते सांगत असतात तें असें कीं, ' कन्येच्या अलंकारादिकांसाठींच तिचे बांधव जेव्हां थोडें बहुत धन घेतात, स्वतःसाठीं म्हणून घेत नाहींत, तेव्हां त्या व्यवहाराला विक्रय म्हणतां येत नाहीं. कन्येचा तो अहेर चांगलाच मानिलेला आहे. तो सर्व मुलीचा मुलीलाच दिला पाहिजे. ज्यांना आपलें बहुत कल्याण व्हावें असें वाटत असेल, त्या सर्वांनीं म्हणजे वडील माणसें, भाऊ, सासरा, दीर यांनीं स्त्रियांना बहुमानपूर्वक अलंकारादि द्यावे. स्त्रीला जर पति आवडला नाहीं, व त्यामुळें त्याला ती आनंदित करूं शकली नाहीं, तर तेणेंकरून त्याच्या योगानें त्या पुरुषाची संतति वाढत नाहीं. म्हणून, हे राजा, स्त्रियांना नित्य बहुमान देऊन त्यांचे लाड करावे. ज्या ठिकाणीं देवतांनाहि आनंद होतो, आणि त्यांची जेथें अवहेलना होते, तेथें होणाऱ्या साऱ्या क्रिया निष्फळ ठरतात. ज्या कुळांत स्त्रियांना दुःख होतें तें लवकरच नष्ट होतें. स्त्रियांच्या शापानें घरें जणूं तोडिलीं जातात; त्यांची संपत्ति

नष्ट होऊन त्यांची शोभा नाहींशी होते व त्यांचा ऱ्हास होतो. स्वर्गास जातांना मनूनें स्त्रिया पुरुषांना दिल्या, कां तर त्या अबला व भोळ्या असल्या तरी प्रेमळ व जिवाला जीव देणाऱ्या असतात, रागीट व अडाणी असल्या तरी सचोटीच्या व मित्रासारख्या असतात. स्त्रियांना मान देणें योग्य असल्यामुळें, हे मानव हो, त्यांना तो द्या. धर्म, विषयोपभोग, सेवा, नमस्कार इत्यादि तुमच्या साऱ्या गोष्टी स्त्रियांच्या स्वाधीन असतात. अपत्योत्पादन, व झालेल्या मुलांचें संगोपन या गोष्टी जगाच्या व्यवहारासाठीं स्त्रियांच्याच माथीं मारलेल्या आहेत. तेव्हां त्यांचा तुम्हीं बहुमान केल्यास तुम्हांला सर्व कर्मांचें फळ मिळेल. विदेहराजाच्या कन्येनें या विषयीं एक श्लोक सांगितला आहे, तो असाः स्त्रियांना यज्ञकर्म, श्राद्ध, उपवास इत्यादि कांहीं नको. केवळ पतिशुश्रूषेच्या बळावर त्या स्वर्ग जिंकतात. कौमार्यांत त्यांचें रक्षण पिता करतो, तारुण्यांत पति करतो आणि वृद्धपणीं पुत्र करितात. अशा रीतीनें स्त्रियांना स्वातंत्र्याची आवश्यकता नाहीं. स्त्री म्हणजे खरोखर श्रीच होय. म्हणून कल्याणाची इच्छा करणाऱ्यानें तिचा सत्कार करावा. तिचें पालन करून तिला जपलें तर हे युधिष्ठिरा, स्त्रीच श्री होते.' १३. १. ४६

---

## अध्याय ४७ वा

[ १. अनेक वर्णीय स्त्रियांपासून झालेल्या पुत्रांमध्यें धनाची वांटणी कशी करावी. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामह, तुमच्यासारखा संशयाचें निरसन करणारा दुसरा कोणी नाहीं. म्हणून संशय आला असतां आम्ही तुम्हांलाच विचारतों. ब्राह्मणाला चार स्त्रिया म्हणजे ब्राह्मणी, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशा सांगितल्या आहेत. त्या सर्वांच्या पोटीं जन्मलेल्या पुत्रांना पितृधन कोणत्या क्रमानें व कोणत्या प्रमाणांत वांटून मिळणें योग्य आहे हें मला सांगा.

**भीष्म**—युधिष्ठिरा, ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे तीन द्विजाति वर्ण होत. धर्म म्हणून ब्राह्मणाला या तीन वर्णांच्याच स्त्रिया करतां येतात. शूद्रा स्त्री त्याला लोभानें किंवा कामानें करतां येईल. परंतु शास्त्राधारें मात्र तसें करतां येणार नाहीं. कारण शूद्रेशीं विवाह केल्यानें रीतसर प्रायश्चित्त घ्यावें लागतें असें शास्त्र आहे. तिच्यापासून जर ब्राह्मणाला पुत्र झाला तर दुप्पट प्रायश्चित्त सांगितलें आहे. आतां पितृधन कोणाला कसें मिळावें हें सांगतों. पित्याच्या संपत्तीपैकीं

ज्या मुख्य मुख्य गोष्टी म्हणजे गाई, बैल, घोडे, गाड्या इत्यादि असतील त्या सर्व ब्राह्मण स्त्रीच्या पुत्रांना एक गटानें मिळाव्या. उरलेल्या संपत्तीचे नंतर दहा भाग करून त्यांतील चार ब्राह्मणीच्या मुलांनीं घ्यावे. ब्राह्मणाला क्षत्रिय स्त्रीपासून झालेला पुत्र ब्राह्मण खरा, पण मातेच्या संबंधानें तो ब्राह्मणीच्या पुत्राहून कनिष्ठच. म्हणून त्यानें तीन भाग घ्यावे. तृतीय म्हणजे वैश्यवर्णीय स्त्रीच्या मुलांना दोन भाग मिळावे. शूद्रास्त्रीच्या मुलांना वस्तुतः कांहीं मिळूं नये. परंतु थोडें तरी देणें माणुसकीच्या दृष्टीनें योग्य असल्यामुळें त्यांना उरलेला एक भाग द्यावा. पितृधनाच्या दहा भागांची अशी व्यवस्था असावी. सवर्णस्त्रीच्या साऱ्या मुलांना सारखेच वांटे द्यावे. शूद्रस्त्रीच्या पुत्रांना ब्राह्मणत्व येत नाहीं. तें वरच्या तीन वर्णांच्या स्त्रियांच्या ब्राह्मणांपासून झालेल्या मुलांनाच येतें. वर्ण एकंदर चारच. पांचवा वर्ण नाहीं. ब्राह्मणाच्या शूद्रस्त्रीच्या पुत्राला जो धनाचा दहावा हिस्सा मिळावयाचा तो बापानें दिला तरच, अधिकारानें नाहीं. पण पित्यानें तो द्यावाच; कारण दया हाच श्रेष्ठ धर्म आहे. कोणत्याहि बाबतींत ती दाखविणें चांगलें. शूद्रस्त्रीच्या पुत्राला त्याचा बाप सपुत्र असो कीं निपुत्रिक असो, दहाव्या हिश्शाहून अधिक देऊं नये. तीन वर्षांहून अधिक काळाला पुरेल इतकें द्रव्य ब्राह्मणाजवळ झाल्यास, त्यानें बाकीच्याचा यज्ञासाठीं उपयोग करावा. व्यर्थ धनसंचय करण्यांत अर्थ नाहीं. स्त्रीला तीन सहस्र रुपयेपर्यंत द्रव्य द्यावें. त्या पतिदत्त धनाचा उपभोग तिनें योग्य वाटेल तसा घ्यावा. पतीच्या धनावर स्त्रीचा अधिकार स्वतःच्या उपभोगापुरताच आहे. त्याची वाटेल तशी विल्हेवाट तिनें लावूं नये. युधिष्ठिरा, स्त्रीला तिच्या पित्यानें जें धन दिलें असेल, तें ती ब्राह्मण असेल तर तिच्या मुलीला मिळावें; कारण मुलगी झाली तरी मुलाप्रमाणेंच होय. असा हा धर्म सांगितला आहे. तो लक्षांत घ्यावा आणि वृथा धनसंचयाच्या मार्गे लागूं नये.

युधिष्ठिरः—हे पितामहा, ब्राह्मणाला शूद्रेपासून झालेल्या पुत्राला धन देण्याचें कारण नाहीं असें जर शास्त्र आहे, तर दहावा हिस्सा तरी त्याला काय म्हणून देतात? ब्राह्मणाला ब्राह्मणीपासून झालेला पुत्र ब्राह्मण होय यांत संशय नाहीं. तसाच क्षत्रियेपासून किंवा वैश्येपासून झालेलाहि ब्राह्मणच. असें असतां त्याच्यांत विषम वांटणी कां करतात? तुम्हीं पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, तिन्ही वर्णांच्या स्त्रियांना ब्राह्मणापासून होणारे पुत्र ब्राह्मणच होतात.

भीष्मः—युधिष्ठिरा, दारा हा पत्नीवाचक आदरार्थी शब्द सर्व पत्न्यांना

सारखाच असला तरी त्यांच्या वर्णांच्या नांवांवरून त्यांत मोठा भेद होतोच. प्रथम खालच्या वर्णांच्या तीन स्त्रिया केल्यावर मागून जर ब्राह्मण वर्णाची पत्नी केली, तर ती ब्राह्मणस्त्रीच सर्वांत श्रेष्ठ व ज्येष्ठ समजावी. पतीचें स्नान, अंगाला लावणें, दांत घासणें, हव्य, कव्य, व घरांतील इतर धर्मकृत्यें हीं ती असतां दुसऱ्या स्त्रियांनीं करूं नयेत. ब्राह्मण स्त्रीनेंच तीं करावीं. विशिष्ट अन्न, पान, फुलें, वस्त्रें, अलंकार हीं पतीनें तिलाच द्यावीं, तीच वडील होय. मनूनें हाच धर्म सनातन म्हणून सांगितलेला आढळतो. कामलुब्ध होऊन याहून अन्यरीतीनें वागणारा ब्राह्मण चांडालच होतो. युधिष्ठिरा, ब्राह्मणस्त्रीचा पहिला मुलगा हाच सर्वांत अधिकाचा वांटेकरी होय, त्यालाच पुनः पुनः पितृधन द्यावें. क्षत्रियस्त्री ज्याप्रमाणें ब्राह्मणस्त्रीसमान होऊं शकत नाहीं, तशी वैश्यस्त्री क्षत्रियेशीं समान असूं शकत नाहीं. असें पहा कीं संपत्ति, राज्य, कोश, सागरान्त पृथ्वी हीं क्षत्रियालाच उचित म्हणून सांगितलीं आहेत. क्षत्रिय हा आपल्या धर्मानेंच ही मोठी संपत्ति मिळवितो, दण्डधारी क्षत्रिय राजावांचून लोकांचें रक्षण करणारा कोणी नाहीं. महाभाग्यशाली ब्राह्मण म्हणजे देवांचेहि देव होत. म्हणून, हे राजा, त्यांची विधिपूर्वक सर्वांनीं पूजा करावी. ऋषिप्रणीत शाश्वत व न बदलणाऱ्या धर्माचें ज्ञान करून घेऊन, त्याचा लोप होतोसा पहातांच, क्षत्रियच स्वधर्मानें त्याचें रक्षण करतो. स्त्रिया व धन यांना चोरांनीं लुटावयाचें मनांत आणिल्यास त्याचें रक्षण क्षत्रियच करतो. यावरून वैश्यस्त्रीच्या पुत्राहून क्षत्रियपुत्रच श्रेष्ठ होय. म्हणून त्याला वैश्यस्त्रीच्या पुत्रापेक्षां पितृधनाचा अधिक वांटा मिळणें योग्यच आहे.

**युधिष्ठिर**—आजोबा, ब्राह्मणाच्या पुत्रांचा दायविभाग तुम्हीं सांगितला, आतां इतर वर्णांच्या संबंधानें हा नियम कसा आहे तें सांगावें.

**भीष्म**—युधिष्ठिरा, क्षत्रियाला क्षत्रिय व वैश्य अशा दोनच स्त्रिया युक्त आहेत. तिसरी शूद्रस्त्री त्याला करतां येते, पण ती शास्त्रतः नाहीं. ब्राह्मणासंबंधानें जो सांगितला तसाच क्रम क्षत्रियालाहि लागू आहे. म्हणजे, क्षत्रियाच्या धनांतील युद्धाला लागणारें सर्व साहित्य क्षत्रियपुत्राचेंच होय. इतर धनाचे आठ भाग करून त्यांतील चार पुनः क्षत्रियापुत्रानें घ्यावे, तीन वैश्य स्त्रीच्या पुत्रांनीं घ्यावे व उरलेला एक भाग शूद्रस्त्रीच्या पुत्रांचा होय. पण तो पित्यानें दिल्यासच, एरवीं नाहीं. आतां वैश्याला विहित अशी एकच सवर्णाची स्त्री होय. दुसरी शूद्र स्त्री भोगासाठीं त्यानें करावी, पण शास्त्रांत तसें सांगितलेलें

नाहीं. वैश्याला वैश्य व शूद्र अशा दोन्ही स्त्रिया असून दोघींनाहि पुत्र असल्यास, त्याच्या धनाचे पांच भाग करावे व त्यांतील चार वैश्यस्त्रीच्या पुत्राला द्यावे. उरलेला भाग शूद्रस्त्रीच्या पुत्राला द्यावा. तो पित्यानें दिला तरच त्याला मिळेल. वरच्या तीन वर्णांपासून झालेला शूद्रेचा पुत्र धनाचा वांटेकरी होण्यास वस्तुतः पात्र नाहीं. शूद्राला एक शूद्र भार्याच विहित आहे, दुसरी कोणी शक्य नाहीं. एखाद्याला शंभर पुत्र सवर्ण स्त्रीपासून झाले तर त्या सर्वांना सारखाच वांटा मिळाला पाहिजे. एकेका वर्णाच्या स्त्रीच्या पुत्रांना हाच नियम लागू आहे. श्रेष्ठ पुत्रांना त्यांतल्या त्यांत सर्व विशिष्ट वस्तूंचा एक एक भाग अधिक द्यावा. हा दायविभागाचा विचार पूर्वी ब्रह्मदेवानें सांगितला. युधिष्ठिरा, एकाच वर्णाच्या स्त्रियांना झालेल्या पुत्रांतहि एक भेद आहे. विवाहकालक्रमानें आधींची स्त्री नंतरच्या स्त्रीपेक्षां ज्येष्ठ समजावी. त्यांचे सर्व पुत्र सारखे खरे, पण ज्येष्ठ पुत्राला प्रमुख वस्तूंचा प्रमुख भाग द्यावा, मध्यमाला मध्यम द्यावा व कनिष्ठाला कनिष्ठ द्यावा. याप्रमाणें सर्व वर्णांत सवर्ण स्त्री श्रेष्ठ असून मरीचिपुत्र काश्यप महर्षीनेंहि तसेंच सांगितलें आहे. १३. १. ४७

---

## अध्याय ४८ वा.

[ १ संकर वर्णाचे धर्म व कर्में. २ संकरज मनुष्य कसा ओळखावा. ]

**युधिष्ठिर**:—द्रव्यलोभानें किंवा कामलालसेनें किंवा वर्णांची ओळख न पटल्यामुळें वर्णांचें मिश्रण होतें. असें वर्णमिश्रण झालें असतां, त्या मिश्र किंवा संकर जातींत जन्मलेल्या माणसांचे धर्म व कर्में कशीं असावीं तें, हे पितामहा, मला सांगा.

**भीष्म**:—पूर्वी प्रजापतीनें चातुर्वर्ण्याचीं कर्में किंवा स्वतः चातुर्वर्ण्यच मूळ यज्ञासाठीं निर्माण केलें. ब्राह्मणाच्या चार वर्णांच्या चार स्त्रियांपैकीं दोहोंच्या ठायीं म्हणजे ब्राह्मण व क्षत्रिय या वर्णांच्या स्त्रियांच्या ठायीं होणारी संतति ब्राह्मणच होते. पुढें क्रमानें ती संतति मातेच्या दोषांमुळें मातृवर्णीय होते. ब्राह्मणाला शूद्रस्त्रीपासून झालेल्या पुत्राला पारशव म्हणतात. तो कुळाची सेवा करणारा होतो, व हें आपलें कर्तव्य त्यानें सोडूं नये. त्यानें वाटेल तें काम करून आपल्या कुळाचें साधन वाढवावें. तो वयानें मोठा असो कीं लहान असो त्यानें ब्राह्मणपुत्रांची सेवा करून आपल्याला जें मिळेल तें त्यांना

द्यावें. क्षत्रियाच्या तीन वर्णांच्या स्त्रियांपैकीं पहिल्या दोघींपासून झालेली संतति क्षत्रियच होय. पण त्याला शूद्रस्त्रीपासून होणाऱ्या संततीला उग्रनांवाचे शूद्र असें शास्त्रांत म्हटलें आहे. वैश्याच्या दोन प्रकारच्या स्त्रियांपैकीं दोघींना होणारी संतति वैश्यच होते. शूद्राला एकच भार्या असून तिच्यापासून त्याला शूद्रच होतात. यांशिवाय आणखी जे संबंध उरले त्यांत हीनवर्णीय पुरुषाचा उच्च-वर्णीय स्त्रीशीं संबंध येत असून त्यांपासून चातुर्वर्ण्याच्या दृष्टीनें निन्द्य अशी संतति उत्पन्न होते. ब्राह्मणस्त्रीला क्षत्रियापासून होणारी संतति चातुर्वर्ण्यबाह्य असून तिला सूत म्हणतात. त्यांचें काम राजांच्या स्तुतिपाठकांचें. वैश्यापासून ब्राह्मण-स्त्रीला होणारी संतति वैदेहक किंवा मौद्गल्य या निन्द्य नांवानें ओळखिली जात. ब्राह्मणस्त्रीला शूद्रापासून होणाऱ्या संततीला चांडाल समजतात. ते अत्यंत उग्र असून चातुर्वर्ण्याबाहेरचे होत. त्यांचें काम वधाची शिक्षा झालेल्या अपराध्यांना ठार करण्याचें असतें. ब्राह्मण स्त्रीला इतर वर्णांपासून होणारी संकरप्रजा अशी कुलदूषक असते. क्षत्रिय स्त्रीला वैश्यापासून बंदी किंवा मागधजातीची प्रजा होते. त्यांचें काम स्तुति गाण्याचें. तिला शूद्रापासून निषाद जातीचे पुत्र होतात, त्यांचें काम मासे मारण्याचें. वैश्य स्त्रीला शूद्रापासून आयोगव जातीची संतति होते, तिला क्षत्ता किंवा सुतार असेंहि उपजीविकेवरून म्हणतात. यांच्यापासून ब्राह्मणांनीं प्रतिग्रह घेऊं नये. या संकरजाति पुढें आपआपल्या जातीच्या स्त्री-पुरुषांशीं विवाह करून आपल्यासारखीच प्रजा उत्पन्न करतात. त्यांतहि उच्च जातीच्या पुरुषांना नीच जातीच्या स्त्रियांपासून होणारी संतति मातेच्या जातीचीच होते. चार वर्णांतील पुरुषांना स्वतःच्या वर्णांतील व आपल्या लगेच खालच्या वर्णां-तील स्त्रीपासून आपल्या वर्णाची संतति उत्पन्न करतां येते आणि तोच प्रकार चातुर्वर्ण्याबाहेरील जातींचा आहे; म्हणजे आपल्या जातीच्या स्त्रियांपासून ते आपल्या जातीची संतति उत्पन्न करतात व आपल्याहून हीन जातीच्या स्त्रीपासून हीन जातीची संतति निर्माण करतात. ज्याप्रमाणें शूद्र ब्राह्मणस्त्रीच्या ठिकाणीं चातुर्वर्ण्यबाह्य संतति उत्पन्न करतो, त्याप्रमाणें चातुर्वर्ण्याबाहेरच्या पुरुषाला उच्च जातीच्या स्त्रीपासून फारच हीन जातीची संतति होते. याप्रमाणें प्रतिलोम विवाहापासून उत्तरोत्तर चातुर्वर्ण्याच्या अधिकाधिक बाहेरची व अधि-काधिक हीन जातीची संतति होऊन पंधरा प्रकारच्या जाति उत्पन्न होतात गमनास अयोग्य अशा स्त्रीशीं गमन केल्यानें वर्णसंकर होत जातो. बाह्य जातीं-पैकीं सैरन्ध्रीस्त्रीच्या ठिकाणीं मागध पुरुषापासून दास नसतांहि दासाचें काम

करणारी अशीं स्त्रियांचीं केशरंजनादि कार्यें व पुरुषांचीं अंग रगडण्याचीं इत्यादि कार्यें करणारी जात उत्पन्न होते. मागधांपैकीं एका जातीचा सैरंध्रींशीं संबंध होऊन जाळीं विणून त्यावर उपजीविका करणारी आयोगव जात होते. वैदेह व सैरंध्री यांपासून मद्याचा धंदा करणारी मैरेयक जात होते. निषादापासून सैरंध्रीला होडीचा धंदा करणारी मद्गुर जात होते, तर चांडालापासून श्वपाक नांवाची स्मशानरक्षक जात होते. मागधी स्त्रीपासून चार हीन जातीचे पुरुष मांस, स्वादुकर, क्षौद्र व सौगंध अशा चार क्रूर जाति निर्माण करतात. वैदेहापासून क्रूर पापी अशी एक लबाड जात होते. निषादांपासून त्यांच्या वरच्या जातीच्या स्त्रियांना मद्रनाभ नांवाची गाढवाच्या गाडींतून जाणारी जात उत्पन्न होते. तसेंच चांडालापासून गाढव, घोडे व हत्ती यांचें मांस खाणारी पुक्कस जात बनते. त्या जातीचे लोक प्रेतांवरील वस्त्रें पांघरावयास घेतात व फुटक्या मडक्याच्या तुकड्यांतून आपलें अन्न खातात. अयोगव जातीच्या स्त्रीला तीन जातींच्या पुरुषांपासून तीन हीन जातींची संतति निर्माण होते. वैदेहापासून क्षुद्र व गांवाबाहेर राहणारी आंध्र अशा जाती होतात. चर्मकार पुरुषापासून निषाद स्त्रीला कारावर नांवाची संतति होते. चांडालापासून पांडुसौपाक जात होते, ती कळकाचें रोवळया, सुपें इत्यादि साहित्य बनविते. निषादापासून वैदेहस्त्रीच्या पोटीं आहिंडक नांवाच्या जातीचीं मुलें होतात व चांडालापासून त्याच्याच सारख्या वृत्तीची सौपाक जात बनते. निषादीला चांडालापासून जी संतति होते, ती गांवाबाहेर स्मशानांत रहाणारी व वर्णबाह्यांनींहि बहिष्कृत अशी असते. मातापित्यांच्या प्रतिकूल संबंधामुळें या ज्या संकर जाति उत्पन्न होतात, त्या कांहीं उघड व कांहीं गुप्त असतात. पण कर्मावरून त्या ओळखाव्या. चार वर्णांतील माणसांनाच धर्म सांगितला आहे, इतरांना नाहीं. धर्मबाह्य जाति किती हें सांगतां यावयाचें नाहीं. यज्ञ ज्यांना सांगितलेले नाहींत किंवा शिष्ट लोकांनीं ज्यांना बहिष्कृत केलें आहे, अशा वर्णबाह्य जातींपासून वृत्ति व रहाणी यांना अनुसरून वर्णबाह्य जातीच उत्पन्न होतात. त्यांनीं रस्त्यांचे चौक, स्मशान, पर्वत व अरण्यें यांत रहावें, लोखंडाचे दागिने घालावे आणि आपआपलें काम करून पोट भरावें. आपल्या जातीला उचित अशीं वस्त्रें व अलंकार घालून व सामग्री वापरून त्यांनीं गोब्राह्मणांना साह्य करावें, आणि दया, कोमलता, सत्यभाषण, क्षमा यांचा अवलंब करीत आपल्या शरीराकडे न पहातां दुसऱ्यांचें रक्षण करावें, म्हणजे त्यांतच त्यांना सिद्धि मिळेल, यांत कांहीं संशय नाहीं.

तात्पर्य, शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें योग्य स्त्रीशीं विवाहबद्ध होऊन सुज्ञ पुरुषानें विचारपूर्वक संतति उत्पन्न करावी; हीन स्त्रीच्या ठायीं ती केल्यास नदी तरून जाण्याची इच्छा करणारा मनुष्य दगडामुळें जसा बुडतो तसा तिचा जनक तीमुळें बुडूनच जाईल. अडाणी पुरुषाला तर स्त्रिया वाममार्गाला नेतातच, पण विद्वानाला देखील तो कामक्रोधांना बळी पडणारा असल्यास नेतात. स्त्रियांचा हा स्वभावच आहे व पुरुषांचा तो दोष आहे. म्हणून ज्ञाते पुरुष स्त्रियांवर कधींच आसक्त होत नाहींत.

( २ ) **युधिष्ठिर**—आजोबा, हीन योनीपासून जन्मलेला मनुष्य वस्तुतः वर्णबाह्य असतांहि वर्णजात आर्याचें रूप धरणाऱ्या अनार्याप्रमाणें जर कोणाच्या लक्षांत आला नाहीं, तर त्याला ओळखावें कसें ?

**भीष्म**—कलुषित योनींत जन्मलेल्या मनुष्याला त्याच्या विशिष्ट वर्तणुकीवरून सज्जनांच्या आचरणाच्या तुलनेनें ओळखतां येतें. अनार्यत्व, वाईट आचार, क्रूरपणा, आळस, या दोषांमुळें मनुष्याची हीन योनि समजून येते. मनुष्य पित्याच्या शीलाप्रमाणेंच मातेच्या शीलाचेंहि अनुकरण करतो. त्यामुळें संकर जातीचा मनुष्य आपलें खरें स्वरूप लपवूं शकत नाहीं. वाघ जसा रूपानें मातापित्यांच्या सारखाच पट्टेवाला होतो, तसा मनुष्यहि आपल्या मूळ प्रकृतीवरच जातो. कुलाचा प्रवाह विच्छिन्न झाला असतां, जेव्हां योनिसंकर होतो, तेव्हां त्या संकरानें झालेली प्रजा थोड्याबहुत प्रमाणानें त्या संकराचें शील घेतेच. कृत्रिमपणें चांगलीं कर्मे करीत ती राहिली तरी शेवटीं आपल्या चांगल्या किंवा वाईट वर्णाच्या शीलावर ती गेल्याशिवाय रहात नाहीं. अनेक प्रकारच्या आचरणांच्या व अनेक कर्मांत गढून गेलेल्या लोकांना उत्तम कुळांतील जन्म व सच्छील यांच्यासारखें शोभा देणारें दुसरें कांहीं नाहीं. नीच योनींत जन्म झाला असल्यास केवळ बुद्धीबळावर शरीराला खेचतां येत नाहीं. श्रेष्ठ, मध्यम किंवा कनिष्ठ अशा तीन प्रकारच्या बुद्धींपैकीं त्या त्या योनीला अनुरूप अशीच बुद्धि पुढें येते व इतर बुद्धि क्षणभर चमकली तरी ती पुढें लुप्त होते. तेव्हां श्रेष्ठ कुलांत जन्मलेल्या पण शीलहीन मनुष्याला पूज्य न मानतां, धर्मज्ञ व सदाचरणी शूद्रालाच बहुमान द्यावा. आपल्या बऱ्या वाईट कर्मांनीं व शील, आचरण आणि कुळ यांनीं मनुष्य आपण कसे आहों हें सांगत असतो. कुळ खालावलें असलें तरी मनुष्य आपल्या कर्मबळानें त्याला पुनः प्रसिद्धीस आणितो. या ज्या शुद्ध व संकीर्ण

योनि सांगितल्या, त्या सर्वांचा विचार करून ज्ञात्यानें ज्या योनींत आपल्या-सारखी प्रजा उत्पन्न होणार नाहीं ती अवश्य वगळावी. १३. १. ४८.

---

## अध्याय ४९ वा.

[ १. वीस प्रकारचे पुत्र. २. त्यांचें स्वरूपादि वर्णन. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—हे कुरुकुलश्रेष्ठा पितामहा, चारी वर्णांच्या पुरुषांना कोणत्या स्त्रियांपासून कशा प्रकारचे पुत्र होतात व ते पुत्र कोणाचे समजावे, याविषयीं नाना मतें ऐकूं येतात व त्यामुळें आम्ही बुचकळ्यांत पडतों. तरी आपण आमच्या संशयाचें निरसन करावें.

**भीष्म**:—पुरुषाला स्वतःपासून झालेला पुत्र हा आत्मज होय. आपल्या स्त्रीच्या ठिकाणीं आपल्या संमतीनें दुसऱ्यापासून झालेल्या मुलाला निरुक्तज म्हणतात व आपल्या संमतीवांचून झालेल्या तशा पुत्राला प्रसृतज म्हणतात पतित पुरुषाला त्याच्याच स्त्रीपासून झालेला पुत्र पतितज असून कोणी आप-ल्याला दिला किंवा आपण कोणापासून विकत घेतला तर तोहि पुत्र आपलाच होय. याशिवाय अध्यूढ (ओढ्या) म्हणजे विवाहसमयीं गर्भिणी असलेल्या स्त्रीचा पुत्र हा देखील पुत्रच. हे सात, तसेच सहा प्रकारचे अपध्वंसज पुत्र, विवाहापूर्वीं कन्येला झालेला पुत्र, आणि सहा प्रकारचे अपसद पुत्र मिळून वीस प्रकारचे पुत्र सांगितले आहेत.

( २ ) **युधिष्ठिर**:—सहा अपध्वंसज व सहा अपसद असे जे पुत्र आपण सांगितले त्यांचीं स्वरूपें काय, तीं आतां सांगावीं.

**भीष्म**:—ब्राह्मणाला इतर तीन वर्णांच्या स्त्रियांपासून झालेले तीन प्रकारचे पुत्र, तसेच क्षत्रियाला इतर दोन वर्णांच्या स्त्रियांपासून झालेले दोन प्रकारचे पुत्र, व वैश्याला शूद्र स्त्रीपासून झालेला पुत्र असे सहा अनुलोमज पुत्र म्हणजे अपध्वंसज होत. याच्या उलट शूद्राला वरच्या तीन वर्णांच्या स्त्रियांपासून होणारे तीन प्रकार, वैश्याला क्षत्रिय व ब्राह्मण स्त्रियांपासून होणारे दोन आणि क्षत्रियाला ब्राह्मणीपासून होणारा एक असे सहा प्रतिलोमज प्रकार अपसद होत. त्यांतील शूद्रापासून होणारे तीन म्हणजे चांडाळ, व्रात्य व वैद्य, होत. वैश्याला होणारे दोन प्रकार म्हणजे मागध व वामक आणि क्षत्रियाला ब्राह्मणीपासून

होणारा सूत होय. यांपैकीं कोणत्याहि प्रकारच्या पुत्रांना पुत्र नव्हे असें म्हणतां यावयाचें नाहीं.

**युधिष्ठिरः**—हे पितामहा, केवळ आपल्या स्त्रीला झालेला म्हणून तो आपला पुत्र असें कांहींजण म्हणतात, तर कोणी तो स्वतःपासून झाला असेल तरच आपला समजतात. तेव्हां आपले पुत्र सारख्याच योग्यतेचे कीं काय, किंवा ते खरोखर कोणाचे, याविषयींचा निर्णय मला सांगा.

**भीष्मः**—स्वतःपासून झालेला मुलगा हा खरा आपला. आपल्या स्त्रीला दुसऱ्यापासून झालेला पण त्यानें टाकून दिलेला मुलगाहि आपलाच होय. त्यामुळें अध्यूढ पुत्रहि त्याच्या जनकानें करार मोडल्यास आपलाच होतो.

**युधिष्ठिरः**—आजोबा, आपल्याला स्वतःपासून झालेला मुलगाच खरा मुलगा असें आम्हांला ठाऊक आहे. क्षेत्रजाला पुत्रत्व कसें येतें ? तसेंच अध्यूढा-संबंधानें त्याच्या जनकानें करार मोडावयाचा म्हणजे काय ?

**भीष्मः**—एखाद्या स्त्रीच्या ठिकाणीं पुत्र उत्पन्न करून जर त्याचा कोणी कांहीं कारणानें त्याग केला, तर त्याच्यापासून तो झाला एवढेंच कांहीं पुत्र-त्वाला पुरेसें कारण होत नाहीं; म्हणून तो पुत्र त्या स्त्रीच्या पतीचाच होतो. पुत्राची इच्छा करणारा पुरुष त्यासाठीं ज्याअर्थी स्त्रीची निवड करतो, त्या-अर्थी क्षेत्रज पुत्रहि पुत्रच, तेथें आपल्यापासून झालेला तेवढाच आपला असें म्हणून भागत नाहीं. पण एरवीं क्षेत्रज पुत्र दुसऱ्याचा होय हें बाह्यलक्षणां-वरूनहि दिसून येतें; तोंडवळा प्रत्यक्ष दिसत असल्यामुळें तो झांकून कसा ठेवतां येईल ? केव्हां केव्हां सांपडलेल्या मुलाला बाळगिल्यावर तो आपला कृतक पुत्र होतो, कारण त्याच्या आईबापांचा थांगच नसतो.

**युधिष्ठिरः**—आजोबा, केवळ बाळगलेला मुलगा, त्याच्या आईबापांचा थांग न लागल्यामुळें, आपला कसा होतो ?

**भीष्मः**—आईबापांनीं ज्याचा त्याग करून रस्त्यांत फेकलें, त्याचीं आईबापें कोण हें न समजल्यामुळें, त्याला जो बाळगील त्याचा तो कृत्रिम पुत्र होतो. अशा अनाथ बालकाचें पितृत्व म्हणजे पालकत्व प्रस्तुत ज्याच्याकडे असेल त्याच्याच वर्णाचा तो होतो.

**युधिष्ठिरः**—आजोबा, अशा कृत्रिम पुत्राचा संस्कार कोणत्या प्रकारानें करावा, त्याला कन्या तरी कशी द्यावी हें मला सांगा.

भीष्मः—युधिष्ठिरा, त्याचा संस्कार आपण आपल्याप्रमाणेंच केला पाहिजे. मातापित्यांनीं टाकून दिलेल्या त्याला बाळगणाराचाच वर्ण मिळतो. त्याच्या आई-बापांची माहिती लागली तर त्याच्याप्रमाणें त्याचे संस्कार करावे. त्याला द्याव-याची कन्याहि आपल्या वर्णाचीच असावी. त्याच्या मातृवर्णाचा पत्ता न लागेल तर संस्कारकर्त्याचा वर्ण व गोत्र हींच त्याचींहि वर्ण व गोत्रें होत. कन्यावस्थेंत झालेला पुत्र व अध्यूढ पुत्र हे दोघे हीन प्रकारचे असले, तरी त्यांचेहि संस्कार स्वतःच्या मुलांप्रमाणेंच करावे, असा शास्त्राचा निश्चय आहे. ब्राह्मणादिकांनीं क्षेत्रज, अपसद, आणि अध्यूढ या पुत्रांवर आपल्याप्रमाणेंच संस्कार करावे. धर्मशास्त्रामध्यें वर्णांचा निश्चय हा असा दिसून येतो. याप्रमाणें तूं विचारलेलें सर्व तुला सांगितलें. आतां आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे? १३. १. ४९.

---

## अध्याय ५० वा.

[ १ परपीडा पाहून आपण कसें वागावें, इतरांशीं वागतांना स्नेह किती ठेवावा व गाईचें महात्म्य काय, याविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न; च्यवन–महर्षीची कथा. ]

१. युधिष्ठिरः—आजोबा, दुसऱ्यांना पीडा होत असलेली पाहून आपण कसें वागावें, तसें त्यांच्याशीं रहाण्याचा प्रसंग आला असतां आपण कितपत स्नेह दाखवावा, तसेंच गाईंचें महात्म्य कसें आहे, हें मला समजावून सांगा.

भीष्मः—युधिष्ठिरा, याविषयीं मीं तुला पूर्वीचा नहुष राजा व च्यवन महर्षि यांमध्यें संवाद झाला होता तोच सांगतों. पूर्वी भृगुवंशीय महर्षि च्यवनानें महाव्रत करण्याचें ठरवून पाण्यांत रहावयास आरंभ केला. अभिमान, क्रोध, आनंद, दुःख हीं सर्व सोडून बारा वर्षें पाण्यांत रहाण्याचें व्रत त्यानें चालू केलें. त्यानें सर्व प्राण्यांवर अत्यंत विश्वास ठेविला व पाण्यांतील माशांशीं तर तो थंड किरणांच्या चंद्राप्रमाणें वागूं लागला. पवित्र होऊन व देवतांना नमस्कार करून तो गंगायमुनांच्या पाण्यांत खांबासारखा उभा राही. वायूच्या वेगासमान बलवान् असा मोठा शब्द करीत वहाणाऱ्या गंगायमुनांच्या पाण्याचा वेग तो मस्तकानें सहन करी. त्या गंगायमुना व इतर नद्या आणि सरोवरेंहि त्याला शक्यतों पीडा न देतां त्याला प्रदक्षिणा करून जात. तो मुनी काष्ठासारखा होऊन पाण्यांतच झोंप घेई. असा तो पाण्यांत बसला म्हणजे जलचर प्राण्यांना

त्याचें दर्शन मोठें प्रिय वाटे व ते आनंदानें त्याच्या ओंठाचा वास घेत. अशा रीतीनें तेथें तो रहात असतां बराच काळ लोटला. तेव्हां एकदां कांहीं मासे मारणारे कोळी हातांत जाळीं घेऊन मासे धरण्याच्या निश्चयानें तेथें आले. ते बलवान्, शूर व जाळें टाकण्याच्या कामीं निष्णात होते. त्यांनीं तेथें येऊन नाना प्रकारच्या युक्त्या करीत त्या गंगायमुनाच्या पाण्यांत जाळीं टाकून दिलीं. त्यांतील एक जाळें फार लांब रुंद असून नव्या सुताचें विणलेलें होतें. तेंहि त्यांनीं पाण्यांत सोडिलें. नंतर त्यांनीं तें विस्तीर्ण जाळें पाण्यांत नीट फिरवून सर्वांनीं मिळून वर उचललें व त्यांतील मासे व इतर जलचर प्राणी त्या परस्परांशीं एकमतानें वागणाऱ्या कोळ्यांनीं न भितां मोठ्या आनंदानें बांधून घेतले. त्या घोळक्यांत माशांनीं वेष्टिलेला च्यवनहि त्या जाळ्यांत सांपडून ओढला गेला. त्याचें अंग नदींतील शेवाळीनें मढलेलें असून त्यामुळें त्याच्या मिशा व दाढी हिरव्या दिसत होत्या. त्याच्या शरीराला चिकटलेल्या शंखाच्या नखांमुळें तो चित्रविचित्र दिसत होता. त्या वेदपारंगत मुनीला जाळ्याबरोबर ओढलेला पहातांच ते सारे कोणी हात जोडून त्याच्या पायां पडले. ते मासे मात्र जाळ्यांतून ओढल्यामुळें झालेल्या त्रासानें व भूमीच्या स्पर्शानें मृतप्राय झाले. मत्स्यांचा तो वध पाहून मुनीला कळवळा आला व दुःखानें तो वारंवार दीर्घ निःश्वास सोडूं लागला. तेव्हां कोळ्यांनीं त्याला विचारिलें, ‘ महाराज, अज्ञानामुळें आमच्याकडून हें पाप घडलें; तरी आमच्यावर आतां कृपा करा. तुम्हांला आवडेल असें आम्हीं आतां काय करूं तें सांगा.’ त्यांचें बोलणें ऐकून माशांच्यामध्यें बसलेला च्यवन महर्षि म्हणाला, ‘ माझी यावेळीं काय मोठी इच्छा आहे ती मीं सांगतों, नीट ऐका. प्राणत्याग करणें किंवा मुक्त होणें हें माशांच्या बरोबरच माझेंहि होणार. दीर्घकाल मी यांच्यासह पाण्यांत राहिलेला असल्यामुळें यांना यावेळीं सोडून जाणें मला शक्य नाहीं.’ त्याचें भाषण ऐकून कोळी घाबरून गेले व दीनवदन होत्साते ते नहुष राजाकडे गेले व त्यांनीं त्याला सर्व वृत्त सांगितलें. १३. १. ५०.

---

## अध्याय ५१ वा.

[ १ च्यवनाची कथा पुढें चालू. नहुष आणि च्यवन यांमधील संवाद. ]

भीष्मः—नहुषानें कोळ्यांचें म्हणणें ऐकून घेतलें व च्यवन कोणत्या स्थितींत आहे हें जाणून तो आपले अमात्य आणि पुरोहित यांना घेऊन त्वरेनें च्यवनाकडे आला. तेथें हातपाय धुवून जवळ आल्यावर त्यानें नम्रपणें च्यवनापुढें हात जोडले आणि 'मी नहुष आलों आहें,' असें त्याला सांगितलें. युधिष्ठिरा, मग राजाच्या पुरोहितानें त्या महात्म्या देवसमान असलेल्या सत्यव्रत च्यवनाची पूजा केल्यावर नहुष त्याला म्हणाला, 'हे ब्राह्मणश्रेष्ठा, तुझें मीं काय प्रिय करूं तें सांग. तें अगदीं कठीण असलें तरी मीं करीन.' च्यवनानें उत्तर केलें, 'राजा, हे मासेमारी कोळी अगदीं दमून गेले आहेत, तरी यांना माशांच्या विक्रीच्या मूल्यासह माझेंहि मूल्य दे.' तेव्हां च्यवनानें सांगितल्यावरून एक सहस्र रुपये मूल्य देण्याची नहुषानें पुरोहिताला आज्ञा केली. मग च्यवन म्हणाला, 'राजा, सहस्ररुपयांचेंच माझें मूल्य आहे असें का तुला वाटतें? तरी तूं आपल्या मनाशीं विचार कर आणि योग्य तें मूल्य दे.' नहुष म्हणाला, 'पुरोहिता, त्यांना एक लक्ष रुपये मूल्य म्हणून द्यावें.' असें म्हणून तो च्यवनाकडे वळून म्हणाला, 'भगवन्, हें तरी आपलें मूल्य होईल काय? कीं आपलें कांहीं दुसरें म्हणणें आहे?' च्यवनानें उत्तर केलें, 'राजश्रेष्ठा, माझें मूल्य लाख रुपयांनीं होणार नाहीं. तरी आपल्याशीं विचारविनिमय करून योग्य तें मूल्य दे.' मग नहुषानें एक कोटि रुपये देण्याची पुरोहिताला आज्ञा करून च्यवनाला म्हटलें, 'महाराज, हें तरी आपलें मूल्य होईल काय? कीं याहून अधिक द्यावें?' च्यवन म्हणाला, 'राजा, एक कोटि रुपयांनींच माझें मूल्य करणें युक्त नाहीं. ब्राह्मणाशीं विचार करून काय तें ठरव आणि योग्य तें मूल्य दे.' नहुष म्हणाला, 'माझें अर्धें राज्य किंवा सगळेंहि या कोळ्यांना द्यावें, हेंच मीं मूल्य समजतों. ब्राह्मणा, तुझें कांहीं दुसरें म्हणणें आहे काय?' च्यवन म्हणाला, 'राजा, तुझें अर्धें किंवा सर्वहि राज्य माझें मूल्य होऊं शकणार नाहीं. ऋषींबरोबर विचार करून काय योग्य दिसेल तें दे.'

भीष्मः—हें च्यवन मुनीचें शेवटचें भाषण ऐकून नहुष राजाला दुःख झालें व अमात्य व पुरोहित यांना घेऊन तो विचार करूं लागला. इतक्यांत गविजात नांवाचा वनांत फलमूलें खाऊन राहणारा दुसरा मुनि नहुषाजवळ आला. तो राजाला

हाक मारून त्याला म्हणाला, 'राजा, या च्यवनऋषीला मी संतुष्ट करतों पहा. तो लवकर तृप्त होईल असें मी करतों. मी कधींहि असत्य भाषण करीत नसतों. आतां मी जें सांगतों तसें कांहींएक शंका मनांत न आणतां कर.' नहुष म्हणाला, 'महाराज या च्यवनभार्गवाचें मूल्य काय तें तुम्हीं सांगा व माझें आणि माझ्या कुलाचें व राज्याचें रक्षण करा. हा महर्षि क्रुद्ध झाला असतां त्रैलोक्यहि जाळून टाकील. मग तपोहीन व केवळ बाहुबलावर विसंबणाऱ्या माझी कथा काय ? मी अगाध पाण्यांत जणूं अमात्य व पुरोहित यांसह बुडत आहें, तरी तूं होडीसारखा होऊन या महर्षीचें मूल्य निश्चित कर.' नहुषाचें हें भाषण ऐकून प्रतापी गविजात मुनि राजा, अमात्य व पुरोहित यांना आनंद देत म्हणाला, 'राजा, सर्व वर्णांमध्यें श्रेष्ठ असे हे जे ब्राह्मण त्यांचें मूल्य करणें शक्य नाहीं. तोच प्रकार गाईचाहि आहे. म्हणून या महर्षीचें मूल्य एक गाय ठरवा.' गविजाताचें उत्तर ऐकून नहुष राजाला, तसाच अमात्याला व पुरोहिताला मोठा हर्ष झाला. तो लगेच च्यवनापाशीं गेला आणि गोड शब्दांनीं त्याला संतोष देत म्हणाला, 'हे महर्षे भार्गवा, ऊठ, ऊठ, आम्हीं गाय हें तुझें मूल्य ठरविलें आहे. हे धर्मिष्ठा, गाय हेंच तुझें मूल्य आहे असें मला वाटतें.' हें भाषण ऐकून च्यवन म्हणाला, 'राजेन्द्रा, उठतों बरें मीं. आतां मात्र माझें योग्य तें मूल्य तूं केलेंस. राजा, गाईच्या बरोबरीचें दुसरें कोणतेंहि धन मला जगांत दिसत नाहीं. हे वीरा, गाईचें कीर्तन, श्रवण, दान व दर्शन हीं सर्व कल्याणकारक, पवित्र व सर्व पापांचा नाश करणारीं आहेत. संपत्तीचें मूळ गाईच होत. गाईंत पापाला स्थळ नाहीं. गाई हें अन्नच होत. देवांचें श्रेष्ठ हविर्द्रव्य म्हणजे गाईच होत. स्वाहाकार व वषट्कार हे गाईंवरच सदा अवलंबून आहेत. यज्ञाची सांगता करणाऱ्या व त्याचें मुख गाईच आहेत. त्या नित्य अमृतासारखें दूध स्रवतात. त्या अमृताचें घर असून सर्व लोक त्यांना नमस्कार करतात. त्यांच्या शरीराचें तेज केवळ अग्निसमान असून त्यांपासून प्राण्यांना मोठें सुख मिळतें. ज्या ठिकाणीं गाईंचा कळप निर्भयपणें विश्रांति घेत असतो, तोच देश शोभिवंत असतो व त्याचें पाप नष्ट होतें. गाई म्हणजे स्वर्गास जाण्याची शिडीच असून स्वर्गांत देखील त्यांची पूजा होते. गाई सर्व इच्छा पुरविणाऱ्या देवीच असून त्यांच्याहून श्रेष्ठ दुसरें कांहीं नाहीं. हें गाईंचें माहात्म्य मीं तुला सांगितलें. गाईचें हें केवळ अंशात्मक गुणवर्णन आहे. तें वर्णन साग्र करणें अशक्य होय.'

निषादः—मुने, तुमचें दर्शन आम्हांला झालें व तुमच्याशीं बोलणेंहि झालें.

सात पावलें चालल्यानें सज्जनाशीं मैत्री होते. तरी तुम्ही आमच्यावर कृपा करा. अग्नि सर्व हविर्द्रव्यें भक्षण करतो, तुम्हीहि अग्निसारखेच आहां. आम्ही तुम्हांला नम्र होऊन शरण आलों आहों. तरी आमच्यावर अनुग्रह करण्यासाठीं या गाईंचा स्वीकार करा.

च्यवनः—जळता अग्नि ज्याप्रमाणें वाळलेलें गवत समूळ जाळून टाकतो, त्याप्रमाणें कृपण पुरुष, मुनि व सर्प यांची दृष्टिहि मनुष्याला जाळून टाकते. ही तुमची गाय मीं घेतों. हे कैवर्त हो, आतां तुम्हीं पापमुक्त झालां. तुम्ही आतां जलांत उत्पन्न झालेल्या या माशांसह स्वर्गास जा.

भीष्मः—मग त्या पवित्र अन्तःकरणाच्या ऋषीच्या प्रभावामुळें ते कोळी माशांसह स्वर्गास गेले. त्या कोळयांना व माशांना स्वर्गास चढत जातांना पाहून नहुषाला मोठा विस्मय वाटला. गविजात व च्यवन या दोघांनींहि त्यांना वर देऊन संतुष्ट केलें. मग तो महापराक्रमी नहुष राजा ‘ ठीक आहे ’ असें त्यांना आनंदानें म्हणाला आणि धर्मावर निष्ठा ठेवूं लागला. त्यानें त्या ऋषीची पूजा केली. नंतर च्यवन आपलें व्रत संपवून आपल्या आश्रमास गेला व नहुषहि त्यानें दिलेला वर घेऊन आपल्या नगरास गेला. याप्रमाणें, हे युधिष्ठिरा, तूं विचारिलेल्या प्रश्नाचीं उत्तरें मीं दिलीं. आतां तुला आणखी काय सांगूं? तुझ्या मनांत काय विचारावयाचें आहे. १३.१.५१.

---

## अध्याय ५२ वा.

[ १. परशुराम ऋषिकुलांत जन्मला असून क्षात्रकर्मी कां झाला? २. कुशिक राजाची कथा. ]

( १ ) युधिष्ठिरः—आजोबा, आपण ज्ञानी आहां; तरी मला जो मोठा संशय उत्पन्न झाला आहे, तो ऐकून त्याचें निरसन करा. धर्मिष्ठांमध्यें श्रेष्ठ अशा परशु-रामाविषयीं मला फार आश्चर्य वाटतें. तो ब्राह्मणांच्या वंशांत जन्मास येऊन क्षत्रियासारखा कां वागूं लागला? त्याच्या जन्माची सारी कथा मला सांगा. त्याचप्रमाणें कुशिकाच्या क्षात्रवंशांत ब्राह्मण कसे उत्पन्न झाले? राम आणि विश्वामित्र यांचा प्रताप फारच मोठा होता. त्यांच्या कुळाचा दोष मुलांना न बाधतां नातवांनाच कसा बाधला, तें सगळें मला समजावून सांगा.

भीष्मः—युधिष्ठिरा, याविषयीं च्यवन ऋषि व कुशिक राजा यांचा संवाद प्रसिद्ध आहे. आपल्या कुळाचा हा दोष आगाऊच च्यवनभार्गवाला समजल्यामुळें व त्यांत कुशिक कुळाचाहि संबंध येणारा असल्यामुळें, त्यानें कुशिकाचें सारें कुळ जाळून टाकण्याचा निश्चय केला व त्यासाठीं तो कुशिकाकडे येऊन त्याला म्हणाला, 'राजा, तुझ्यापाशीं कांहीं काळ रहाण्याची इच्छा मला झाली आहे.' कुशिक म्हणाला, 'भगवन्, अतिथिसत्कार हा पतिपत्नींचा धर्मच म्हणून ज्ञात्यांनीं सांगितला आहे व कन्यादानाच्या प्रसंगीं त्याचा उच्चारहि होतो. तथापि माझ्या हातून अद्यापि तसें घडलेलें नाहीं व त्यामुळें त्या धर्मद्वाराचें उल्लंघनच मीं आजवर केलें. तरी यापुढें मीं तें कार्य करणार, आपण अनुज्ञा द्यावी.' असें म्हणून कुशिकानें च्यवनाला आसन दिलें आणि पत्नीसह तो ऋषीपाशीं आला. त्यानें झारींत पाणी आणून तें त्याला पाय धुण्यास दिलें व इतरहि सर्व गोष्टी यथास्थित केल्या. नंतर त्याला मधुपर्क अर्पण करून सत्कारपूर्वक तो च्यवनाला म्हणाला, 'महाराज, आम्ही आपले सेवक आहों. आपण सांगाल तसें आम्हीं करूं. राज्य, धन, गाई, इत्यादि आपण मागाल तें आम्ही तुम्हांला देतों. यज्ञासाठीं कांहीं पाहिजे असेल तर तेंहि देतों. हें घर, हें राज्य, हें सिंहासन, हीं सारीं आपलीच आहेत. आपण राजे आहांत, तरी पृथ्वीचें रक्षण करावें. मी आपला केवळ दास आहें.' कुशिकान असें सांगितल्यावर च्यवन आनंदानें त्याला म्हणाला, 'राजा, मला तुझें राज्य नको, धन नको, व दासीहि नकोत. मला गाई नकोत, मला देश नकोत, मला यज्ञहि करावयाचा नाहीं. मी सांगतों तें ऐकून घे. तुम्हांला मान्य असेल तर मीं कांहीं नियम करणार आहें. त्याच्या समाप्तीपर्यंत तुम्ही उभयतांनीं माझी निःशंकपणें सेवा करावी.' ऋषीचें बोलणें ऐकून त्या राजदांपत्याला मोठा आनंद झाला आणि 'ठीक आहे, तसें करूं,' असें त्यांनीं त्याला उत्तर दिलें. मग कुशिकानें आनंदित होऊन च्यवनाला एका उत्कृष्ट घरांत नेलें आणि त्यांतील सर्व प्रेक्षणीय वस्तु त्याला दाखविल्या. तो म्हणाला, 'महाराज, ही आपली शय्या, आपण आपल्या इच्छेप्रमाणें येथें शयन करावें. आम्ही आपल्याला संतुष्ट करण्याचा यत्न करूं.' असें त्यांचें भाषण चाललें आहे तों दिवस मावळला, तेव्हां ऋषीनें अन्न आणि पान हीं मागितलीं. कुशिकानें नम्रपणें त्याला विचारलें, 'तुम्हांला कोणतें अन्न विशेष आवडतें. आम्हीं तुमच्यासाठीं काय आणूं?' च्यवन मोठ्या संतोषानें म्हणाला, 'जो कांहीं योग्य वाटेल तो आहार मला द्या.' 'ठीक आहे' असें मोठ्या आदरानें म्हणून राजानें

योग्य तें अन्न त्याला दिलें. तें खाऊन ऋषि त्या राजदांपत्याला म्हणाला, ‘ मला झोंप फार येत आहे, मी आतां निजतों. ’ त्याप्रमाणें तो शय्यागृहांत जाऊन झोंपला व राजा पत्नीसह त्याच्या सेवेसाठीं जवळ बसून राहिला. ऋषि त्यांना म्हणाला, ‘ मी निजलेला असतां मला उठवूं नका, आणि सारखीं जागत राहून माझे पाय चेपीत बसा. ’ कुशिकानें निःशंकपणें ‘ ठीक आहे ’ असें सांगितलें आणि त्याप्रमाणें रात्र संपून गेली तरी त्यांनीं च्यवनाला जागें केलें नाहीं, तीं त्याच्या आज्ञेप्रमाणें त्याची सेवा करीत बसलीं. ऋषि याप्रमाणें एकाच कुशीवर एकवीस दिवस निजून राहिला व राजाराणीसुद्धां तितका वेळ न खातांपितां त्याची सेवा करण्यांत दंग होत्सातीं आनंद मानून राहिलीं. नंतर च्यवन जागा झाला असतां आपणच उठला आणि कांहींएक भाषण न करतां घरांतून बाहेर पडला. राजाराणी भुकेलेलीं व दमलेलीं होतीं, तरी तीं त्याच्या मागून चालूं लागलीं. च्यवनानें मात्र त्यांच्याकडे पाहिलेंसुद्धां नाहीं. तीं त्याच्या मागून चालत त्याच्याकडे पहात असतांच तो एकदम गुप्त झाला व त्याबरोबर राजा झीट येऊन भूमीवर पडला. एका घटकेनें तो भानावर आला आणि राणीसह ऋषीचा शोध करण्याचा यत्न करूं लागला. १३.१.५२.

---

## अध्याय ५३ वा.

[ १. च्यवनाची कथा–पुढें चालू ]

( १ ) **युधिष्ठिरः**—ऋषि गुप्त झाला असतां कुशिक राजा व त्याची महाभाग्यवती राणी यांनीं काय केलें तें, हे आजोबा, मला सांगा.

**भीष्मः**—ऋषि दिसत नाहीं असें पाहून कुशिक राजा राणीसह दमून गेल्यामुळें माघारा वळला. त्याची शक्ति अगदीं नाहींशी झाली व त्याला लाजहि वाटूं लागली. आपल्या नगराला तो परत आला पण कोणाशीं कांहीं बोलला नाहीं. ऋषीच्या वर्तनाचा तो मनाशीं विचार करीत राहिला. शून्य अन्तःकरणानें तो आपल्या घरांत येऊन पहातो, तों तो भृगुपुत्र च्यवन आपल्या शयनावर पहुडला आहे. त्याला पाहून आश्चर्यभरित झालेल्या राजाराणींचा सारा थकवा त्याच्या दर्शनानें नाहींसा झाला आणि आपआपल्या ठिकाणीं बसून तीं ऋषीचे पाय चेपूं लागलीं. ऋषि यावेळीं दुसऱ्या कुशीवर निजला होता; तो पुनः एकवीस दिवसांनीं जागा झाला. तेव्हां राजाराणींनीं

भीतीनें तोंडावर कोणताच विकार दाखविला नाहीं. जागा झाल्यावर तो त्यांना म्हणाला, 'मला स्नान करावयाचें आहे, तरी अंगाला तेल लावा! कुशिक व त्याची पत्नी भुकेनें व श्रमानें अगदीं व्याकुळ झालीं होतीं, तथापि 'ठीक आहे' असें म्हणून तीं उत्तम प्रकारचें शतपाक तेल घेऊन त्याजवळ आलीं! आणि तो स्वस्थ बसला असतां त्याच्या अंगाला तें त्यांनीं रगडून लाविलें. तीं कांहीं बोललीं नाहींत व तोहि पुरे म्हणाला नाहीं. तीं निर्विकारपणें आपलें काम करीत आहेत असें पाहून, ऋषि एकदम उठला व स्नानगृहांत गेला. तेथें राजाला योग्य असें स्नानाचें साहित्य सिद्ध करून ठेविलेलें होतें. पण तें सर्व नाहीं असें समजून राजा पहात असतांच च्यवन तेथून पुनः गुप्त झाला. पण राजाराणींनीं खेदाचें चिन्हहि दाखविलें नाहीं. इतक्यांत स्नान केलेला तो मुनि सिंहासनावर जाऊन बसला व तेथून त्यानें राजाराणीकडे पाहिलें. राजाला आनंद झाला व त्यानें 'अन्न सिद्ध आहे' असें नम्रपणें त्याला सांगितलें. 'ठीक आहे, घेऊन या' असें त्यानें म्हणतांच राजाराणी तें घेऊन आलीं. त्यांत मांसाचे अनेक प्रकार, नाना प्रकारच्या भाज्या, वेगवेगळ्या प्रकारचे वेसवार, चटकदार पेयें, रसाळ पापड्या, पुष्कळ जातीचे मोदक, खांडवी, अनेक प्रकारचे रस, मुनींना खाण्यासारखे रानांतून आणलेले पदार्थ, अनेक जातींचीं फळें, राजाला योग्य अशीं पुष्कळ अन्नें, बोरें, इंगुदी फळें, बिल्यांचीं फळें, असे सर्व प्रकार मुनीच्या भीतीमुळें आणिलेले होते. शय्येवर बसलेल्या च्यवनापुढें तें सर्व पांढऱ्या वस्त्रांनीं झांकून आणून ठेविल्यावर त्यानें ते सर्व पदार्थ जाळून टाकिले. तथापि राजाराणींनीं त्याचा मुळींच राग धरिला नाहीं. तीं ऋषीकडे पहात आहेत तोंच तो तेथून नाहींसा झाला. राजा राणीसह तेथेंच रात्रभर कांहीं न बोलतां शांतपणें उभा राहिला. याप्रमाणें नित्य उत्तम प्रकारचें विविध अन्न, शय्या, स्नान, साहित्य, वस्त्रें इत्यादि सर्व त्या राजवाड्यांत च्यवनासाठीं सिद्ध असत. त्याला कोठेंहि न्यून म्हणून सांपडेना. तेव्हां तो पुनः एकदां राजाला म्हणाला, 'मी जिकडे सांगेन तिकडे माझा रथ तुम्ही ओढून न्या.' 'तसें करतों' असें म्हणून राजा त्याला म्हणाला, 'रथ कोणत्या प्रकाराचा असावा, फिरण्याचा कीं युद्धाचा?' हा प्रश्न ऐकून च्यवनाला आनंद झाला आणि त्यानें सांग्रामिक म्हणजे लष्करी रथ सिद्ध करून त्यांत आयुधें, पताका, शक्ति, सुवर्णाच्या काठ्या इत्यादि ठेवावयास व त्याला मंजुळस्वरांचे घुंगुर तोरणें इत्यादि लावावयास सांगितलें. तो रथ सोन्यानें मढविलेला असून त्यांत

उत्तम प्रकारचे शंभर बाण होते. रथ सिद्ध झाल्यावर जोखडाच्या डाव्या अंगाला राणीला लावून राजा स्वतः उजवीकडे लागला. च्यवनानें आपल्या हातीं तीन तीक्ष्ण टोकांचा अंकुश घेतला. या प्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर 'महाराज, रथ कोठें न्यावयाचा तें सांगा. आपण सांगाल तिकडे नेऊं.' असें राजा मुनीला म्हणाला. च्यवनानें उत्तर केलें, 'येथून तो एकेक पाऊल हळुहळू ओढीत न्या. मला त्रास होणार नाहीं अशा रीतीनें माझ्या कलाप्रमाणें चाला व सर्वांना तें पाहूं द्या. वाटेंत कोणी असतील तर त्यांना हांकून देऊं नका, मला त्यांना द्रव्य द्यावयाचें आहे. जे ब्राह्मण वाटेंत कांहीं मागतील त्यांना तें दिलें पाहिजे. सर्वांना धन, रत्नें इत्यादि मी देणार आहें. राजा, मी जें सांगतों तें नीट लक्षांत ठेवून कर.' त्याचें भाषण ऐकून राजानें सेवकांना आज्ञा दिली कीं, 'च्यवन जें जें मागेल तें तें त्याला निःशंकपणें देत जा.' याप्रमाणें सांगून राजा रथ ओढूं लागला असतां त्या रथामागून अनेक रत्नें, दासी, बकऱ्यांचे कळप, सोनें, पर्वताकार हत्ती अशीं चालूं लागलीं, राजाचे अमात्यहि त्याबरोबर चालूं लागले. सगळ्या नगरांत हाहाकार उडाला व सर्वजण दुःख करूं लागले. राजाराणींना च्यवन त्या तीक्ष्ण अंकुशांनीं पाठी-वर व कमरेवर टोंची, तरी तीं अगदीं निर्विकार राहून रथ ओढीत होतीं. पन्नास दिवसांच्या उपासानें तीं कृश होऊन कांपत होतीं तरी रथ ओढण्याचें काम कसेंबसें तीं करीत राहिलीं. पुष्कळ ठिकाणीं टोंचल्यामुळें त्यांच्या अंगां-तून भळभळ रक्त वहात होतें, त्यामुळें तीं फुललेल्या पळसाप्रमाणें दिसूं लागलीं. त्यांना त्या स्थितींत पाहून सर्व नागरिकांनीं शोक केला, पण ऋषीच्या शापाच्या भयानें कोणी कांहीं त्याला बोललें मात्र नाहीं. ठिकठिकाणीं लोक जोडीजोडीनें आपसांत बोलत कीं, 'पहा, तपाचें बल कसें आहे तें. आम्हांला राग आला तरी या ऋषीकडे पहाण्याचेंहि आम्हांला सामर्थ्य नाहीं! या शुद्धान्तःकरणाच्या मुनीचें तपःसामर्थ्य आहे तरी केवढें! तसेंच आमचे महाराज व महाराणी यांचेंहि धैर्य पहा; बिचारीं दमलीं आहेत, तरी कसाबसा रथ ओढीतच आहेत.' च्यवनालाहि त्यांच्या तोंडावर कांहीं विकारचिन्ह दिसलें नाहीं.

त्यांना अगदीं निर्विकार स्थितींत पाहून च्यवनानें कुबेराप्रमाणें धन वाटण्यास आरंभ केला व राजाहि आनंदानें त्याच्या सांगण्याप्रमाणें करीत गेला. तेव्हां तो ऋषिश्रेष्ठ अगदीं संतुष्ट झाला. तो रथांतून उतरला आणि त्यानें राजाराणींना प्रथम जोखडापासून सोडविलें व त्यांना तो प्रसन्न होऊन गंभीरपणें म्हणाला,

'तुम्हांला मीं मोठा वर देतों, काय देऊं तो बोला.' नंतर त्यानें आपल्या अमृतासारखा स्पर्श असलेल्या हातानें त्याचें विद्ध झालेलें अंग प्रेमानें चोळलें. तेव्हां राजा म्हणाला, 'मुने, आमचे श्रम नाहींसे झाले व आम्हांला तुमच्या प्रभावानें विश्रांतिहि मिळाली.' मग ऋषि आनंदित होऊन त्यांना म्हणाला, 'मी पूर्वीं जें बोललों तें व्यर्थ होणार नाहीं. या पवित्र गंगातीरावरील हा प्रदेश रमणीय आहे. तरी, हे राजा, मी येथें कांहीं काळ व्रतासाठीं रहाणार आहें. बाळा, तूं गांवांत जा आणि विश्रांति घेतल्यावर पुनः येथें ये. येथें तूं उद्यां पत्नीसह येऊन मला भेट. रागावूं नकोस. तुझें कल्याण अगदीं जवळ आलें आहे. आपल्या मनांत तुम्हीं जें कांहीं इच्छिलें आहे, तें सर्व तुम्हांला मिळणार आहे.'

च्यवनाचें हें भाषण ऐकून कुशिक प्रहृष्ट अंतःकरणानें त्याला म्हणाला, 'महाराज, मला राग मुळींच आला नाहीं. तुमच्या सेवेनें आम्ही दोघें पवित्र झालों. आम्हीं तरुण व सशक्त होतों, आम्हांला त्रास झाला नाहीं. अंकुशानें तुम्हीं जे व्रण आमच्या शरीरांवर केले, तेहि आतां नाहींसे झाले असून पत्नीसह मीं आतां अगदीं खुशाल आहें. ही आमची राणी तर पूर्वींसारखी सौंदर्यानें युक्त अशी अप्सरेप्रमाणें दिसत आहे. हे मुनिश्रेष्ठा, तुझ्या कृपेनेंच हें सर्व घडून आलें आहे, आणि तुझ्यासारख्याच्या बाबतींत त्यांत कांहीं आश्चर्यहि नाहीं'. कुशिकाचें भाषण ऐकिल्यावर च्यवन म्हणाला, 'राजा, उद्यां तूं पत्नीसह येथें ये.' मग राजा त्याची अनुज्ञा घेऊन त्याला नमस्कार करून इंद्राप्रमाणें आपल्या नगरीस परत आला. अमात्य व पुरोहित त्याला सामोरे गेले. त्यांच्या बरोबर ससैन्य असे इतरहि प्रधान असून नर्तकींचा तांडाहि होता. त्या सर्वांनीं वेष्टिलेला असा कुशिक राजा मोठ्या तेजानें तळपत भाटांच्या स्तुतिघोषांत आपल्या नगरांत आनंदानें प्रविष्ट झाला. नगरांत आल्यावर सगळीं कृत्यें आटोपून त्यानें भोजन केलें आणि नंतर पत्नीसह रात्रभर तो तेथेंच राहिला. मग आपल्या नवयौवनाकडे पाहून देवांप्रमाणें निश्चिंत झालेल्या त्यांनीं आपल्या शय्यागारांत च्यवनाच्या कृपेनें प्राप्त झालेल्या तेजानें युक्त होऊन आनंद केला.

इकडे त्या भृगकुलाची कीर्ति वाढविणाऱ्या तपस्वी च्यवन ऋषीनें त्या अरण्यांत अत्यंत सुंदर, सर्व वैभवानें युक्त व विविध रत्नांनीं सुशोभित झालेलें असें उपवन इच्छामात्रें करून निर्माण केलें. इन्द्राच्या नगरींतहि तसलें उपवन नव्हतें. १३. १. ५३.

---

## अध्याय ५४ वा

[ १. च्यवनाची कथा–पुढें चालू ]

( १ ) भीष्म :—मग रात्र संपून उजाडलें, तेव्हां जागा झाल्यावर प्रातर्विधि आटोपून कुशिक राजा भार्येसह त्या वनांत गेला. तेथें त्याला एक मोठा सोन्याचा राजवाडा दिसला. त्याला रत्नजडित सहस्रावधि खांब होते व गंधर्व नगराप्रमाणें तो रमणीय दिसत होता. त्यांत त्याला अनेक दिव्य पदार्थ आढळून आले. रुप्याच्या शिखरांचे पर्वत, कमळांनीं भरलेलीं सरोवरें, चित्रशाळा, तोरणें, हिरव्यागार गवताचीं क्रिडांगणें, सोनेरी फरशीची भूमी, मोहोरांनीं ओथंबलेले आम्रवृक्ष, केतकीचे सुंदर ताटवे, कुन्दाच्या वेली चढविलेले अशोकवृक्ष, फुलांनीं भरलेले अतियुक्त वृक्ष, चाफे, तिलक, मोठमोठे फणस, वंजुल, फुललेल्या कण्हेरी त्याला तेथें दिसून आल्या. काळ्या रंगाचीं बारणाचीं फुलें तशींच अष्टपदिका वेली नीट लावलेल्या अशा तेथें राजाला आढळल्या. त्यांतील पर्वतांसारख्या मोठ्या सातमजली राजवाड्यांत कमळांच्या विहिरी, सर्व ऋतूंतील फुलांच्या बागा, थंड व उष्ण पाण्यांच्या टांक्या, विचित्र रंगाचीं आसनें, व उत्तम शय्या, रत्नजडित सुवर्णाचे पलंग, त्यांवर मूल्यवान् अस्तरणें, तसेंच खाण्याचे अनंत पदार्थ ठेविलेले असून बोलके पोपट, मंजुळ गाणाऱ्या सारिका, कोकीळ, मोर, कोयष्टिक, कोंबडे, चकोर, वानर, हंस, सारस, चक्रवाक, इत्यादि पशुपक्षीही तेथें होते. जिकडे तिकडे आनंदानें फिरणारे अप्सरांचे व गंधर्वांचे थवेहि त्यांत होते. हा सर्व देखावा एकदां एकाएकीं नाहींसा झाला व पुनः दिसूं लागला. कोठें मधुर गीतध्वनि तर कोठें वेदाध्ययनाचा शब्द, आणि कोठें कोठें हंसाचा ध्वनिहि राजाला तेथें ऐकूं येई. तो सारा देखावा पाहून राजा मनांत म्हणाला, ‘ हें मी स्वप्न पहात आहें, कीं माझ्या मनाला कांहीं भ्रम झाला आहे ? कीं हें सारें खरेंच आहे ! खरें असेल, तर मीं शरीरासह स्वर्गास आलों म्हणावयाचा ! स्वर्गास आलों कीं पुण्यवान् अशा उत्तर कुरूस आलों कीं इन्द्राच्या अमरावतीस आलों ? काय मी हें आश्चर्य पहात आहें !’ असें तो मनांत म्हणत आहे तोंच च्यवन ऋषि त्याच्या दृष्टीस पडला. तो त्या सात मजली रत्नखचित खांबाच्या सुवर्णाच्या वाड्यांत मूल्यवान् दिव्य शय्येवर पहुडला होता. राजा पत्नीसह आनंदानें त्याच्या जवळ गेला, पण इतक्यांत तो ऋषि त्या शयनासह गुप्त झाला. मग राजा त्या वनांत दुसरीकडे फिरत असतां

पुनः तो त्याला व्रतस्थ स्थितींत कुशासनावर जप करीत असलेला दिसला. या प्रमाणें च्यवनानें आपल्या योगबलानें कुशिक राजाला मोहून टाकिलें. कारण पुढच्या क्षणींच तें सारें उपवन, ते गंधर्व व त्या अप्सरा, ते वृक्ष, सर्वत्र सामसूम असलेलें तें दर्भ व वारुळें यांनीं भरलेलें गंगातीर मात्र पुनः तेथें दिसूं लागलें. तो अद्भुत चमत्कार पाहून राजा व राणी यांना फार विस्मय वाटला. राजा हर्षित होऊन राणीला म्हणाला, ' हे भाग्यशाली भार्ये, पहा, कधीं पहावयास न मिळणाऱ्या विचित्र वस्तु या ठिकाणीं आपल्याला पहावयास मिळाल्या, ही सारी त्या भृगुकुलावतंस ऋषीची कृपा होय. तपोबलाहून श्रेष्ठ कांहीं नाहीं. जें मनांत आणावें तें तपोबलानें मिळवणें शक्य आहे. यास्तव त्रैलोक्याच्या राज्यापेक्षांहि तपाचीच योग्यता अधिक होय. उत्तम तपश्चरणानें मोक्षहि मिळेल. काय या च्यवनाचें तप:सामर्थ्य ! हा इच्छामात्रें करून तपाच्या बळावर दुसरे लोकहि निर्माण करील. पुण्य, वाणी व बुद्धि यांच्या बळावर कर्मे करणारे ब्राह्मणच होत. च्यवनाशिवाय दुसऱ्या कोणाला हें साधलें असतें ? मनुष्याला राज्य मिळणें कठीण नाहीं, पण ब्राह्मण्य फार कठीण आहे. ब्राह्मण्याच्या बळावरच च्यवन मुनि आम्हांला घोड्याप्रमाणें रथास जुंपूं शकला. असें तो म्हणत आहे, इतक्यांत च्यवनाची दृष्टि त्याच्याकडे गेली. त्याला पाहून ऋषीनें त्याला चटकन् आपल्याजवळ बोलाविलें. राजाहि राणीसह त्याच्याजवळ गेला व त्यानें त्या वंदनीय मुनीला शिरसा प्रणाम केला. तेव्हां त्याला आशीर्वाद देऊन च्यवन त्याचें सान्त्वन करीत म्हणाला, ' येथें बस.' मग स्वस्थचित्त झाल्यावर त्यानें राजाला सांगितलें कीं, ' राजा, पांच इंद्रियें व सहावें मन यांवर तूं चांगलाच जय मिळविल्यामुळें तूं संकटमुक्त झालास. माझी तूं उत्तम आराधना केलीस. तुझ्यांत मला कांहीं एक उणीव आढळली नाहीं. राजा, मला आतां अनुज्ञा दे; मी आपल्या वाटेनें जातों. मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहें. कांहीं वर मागून घे.'

कुशिक म्हणाला, ' मुने, अग्नींत सांपडल्याप्रमाणें तुझ्याजवळ मी वागलों; तेव्हां भाजून निघालों नाहीं, हें काय थोडें झालें ? भृगुश्रेष्ठा, हाच मला मोठा वर मिळाला कीं तूं मजवर संतुष्ट होऊन माझें व माझ्या कुळाचें रक्षण केलेंस. हीच मजवर तुझी मोठी कृपा झाली, माझ्या जीविताचें सार्थक्य झालें. मीं धर्मानें राज्य करून जें कांहीं तप केलें त्याचेंच हें फळ होय. आतां, हे मुनिश्रेष्ठा

माझ्यावर तूं संतुष्ट झाला आहेस, तर मला जी एक शंका आली आहे, ती माझी समजूत घालून दूर कर.' १३. १. ५४.

## अध्याय ५५ वा.

[ १. च्यवनाची कथा-पुढें चालू. तो कुशिकाच्या शंकेचें समाधान करतो ]

( १ ) **च्यवनः**—राजा, काय हवा असेल तो वर माग. तुझ्या मनांत जो संशय आला असेल तो मला सांग. मी त्या सर्वांचें निरसन करतों.

**कुशिकः**—च्यवन महर्षे, जर तूं मजवर संतुष्ट झाला असशील, तर तूं माझ्या घरीं येऊन रहाण्याचें जें ठरविलें त्याचें कारण मला सांग. तसेंच एका कुशीवर एकवीस दिवस सारखें निजणें, कांहीं भाषण न करितां बाहेर जाणें, अकस्मात गुप्त होऊन पुनः दिसूं लागणें, पुनः एकवीस दिवस दुसऱ्या कुशीवर निजून रहाणें, माझ्या घरीं तैलाभ्यंग करून लगेच बाहेर जाणें, विविध अन्न पुढें आलें असतां तें अग्नींत जाळून टाकणें, नंतर लगेच रथांत बसून बाहेर जाणें, धन वांटून टाकणें, रमणीय उपवन उत्पन्न करणें, त्यांत मोठमोठे सोनेरी वाडे, रत्नजडित पलंग ठेवणें, व तो देखावा पुनः नाहींसा करणें या गोष्टींचें कारण काय तें ऐकण्याची मला इच्छा आहे. मीं पुष्कळ विचार केला, पण मला कांहीं उमज पडला नाहीं, मीं अगदीं भांबावून गेलों. तरी यांतील खरा प्रकार काय आहे, तो मला ऐकावयास पाहिजे.

**च्यवनः**—राजा, ऐक. मीं या गोष्टी कोणकोणत्या हेतूनें केल्या तें सांगतों. तूं असें विचारलें असतां, तें मीं न सांगणें शक्य नाहीं. पूर्वी देवसभेंत पितामह ब्रह्मदेवाच्या तोंडून जें मीं ऐकिलें तें तुला सांगतों, ऐक. ब्राह्मण व क्षत्रिय यांच्यांत विरोध येऊन कुलांचा संकर होणार आहे. राजा, तुझा नातू तेज व वीर्य यांनीं युक्त होणार असल्यामुळें तुझ्या कुळाचाच नाश करावा म्हणून मी येथें आलों. कुशिकांचा उच्छेद करावा म्हणून तुझें कुळच जाळण्याची माझी इच्छा होती. मीं तुझ्या घरीं येऊन 'मला कांहीं नियम करावयाचा आहे, तरी तोंपर्यंत माझी शुश्रूषा कर,' म्हणून जें तुला सांगितलें तें त्यामुळेंच. पण तुझ्यांत मला कोठें उणीवच दिसली नाहीं. तशी ती दिसली असती तर तूं आतांपर्यंत जीवंतच राहिला नसतास. असा हेतु मनांत धरून मीं एकवीस दिवस निजून राहिलों; व तूं मला केव्हांतरी उठवशील म्हणून संधि पहात होतों. पण तूं किंवा

तुझी पत्नी यांनीं मला उठविलें नाहीं. यास्तव मी तुमच्यावर मनःपूर्वक संतुष्ट झालों आहें. मी उठून तडक चालता झालों, तो अशा हेतूनें कीं, 'कोठें जातों' असें तूं मला विचारशील व तेणेंकरून मी तुला शापून टाकीन. पुनः एकवीस दिवस निजून राहिलों तो याच कारणास्तव. तुम्ही भुकेनें व्याकुळ होऊन दमल्या-मुळें केव्हांतरी रागवाल व मग मी शाप देईन हाच माझा हेतु होता. पण तूं यत्किंचित्हि रागावला नाहींस. तेणेंकरून तुम्हां उभयतांवर मी अगदीं संतुष्ट झालों आहें. भोजनाचे विविध पदार्थ तुम्हीं आणिले असतां ते मी जाळून टाकिले, तेंहि अशाच विचारानें कीं तुम्ही त्यामुळें तरी रागवाल. रथांतून मला घेऊन चला म्हणतांच निःशंकपणें तुम्हीं तसें केलें. त्यामुळेंहि मी तुम्हांवर प्रसन्न झालों आहें. मीं तुमचें धन वाटेल तसें वांटून टाकिलें, तरीहि तुम्हांला राग आला नाहीं. तेव्हां संतुष्ट होऊन तें उपवन मीं उत्पन्न केलें. हेतु हा कीं तुला त्यामुळें या शरीरानेंच स्वर्गाचें दर्शन घडावें. माझ्या तपाचा व धर्माचा प्रभाव थोडासा दाखविण्यासाठीं मीं तसें केलें. तूं हें सारें सहन करण्यांत जें धैर्य दाखविलें, त्यांत तुझी इच्छाहि मला दिसून आली. पृथ्वीचें राज्य, तसेंच स्वर्गाचें राज्यहि तुला नको असून तुला ब्राह्मण्याची उत्कंठा आहे. तूं त्यावेळीं म्हणालास तें खरें आहे. ब्राह्मण्यप्राप्ति अति दुर्घट आहे. ब्राह्मण होऊन ऋषि होणें कठीण व ऋषि होऊनहि तपस्वी होणें त्याहून कठीण. पण ही तुझी इच्छाहि पूर्ण होईल. तुझ्या कुळांत तुझ्यापासून तिसरा कौशिक हा ब्राह्मण होईल व तुझा वंश भृगुवंशाप्रमाणेंच तेजस्वी होईल. तुझा नातू अग्नीप्रमाणें तेजस्वी होऊन देवांना तसेंच माणसांना भय उत्पन्न करील, इतकेंच नव्हे तर तिन्ही लोकांना त्याचें भय वाटेल. आतां आणखी तुला वाटेल तो वर माग. मीं आतां तीर्थयात्रेला जातों. माझी वेळ होत आली.

कुशिक :—महामुने, तूं जें सांगितलेंस तोच माझा वर. तसेंच होवो. माझा नातू ब्राह्मण होवो. माझ्या कुळाला ब्राह्मण्य मिळो हाच मला वर दे. पण हें ब्राह्मण्य माझ्या कुळाला कसें मिळेल याचेंहि ज्ञान मला पाहिजे आहे. माझ्या मनाप्रमाणें माझा वंशज कोण होणार हें मला सांग. १३.१.५५.

## अध्याय ५६ वा.

[ १ च्यवनाची कथा पुढें चालू; तो कुशिकवंशाला ब्राह्मण्य कसें मिळेल तें सांगतो. ]

( १ ) **च्यवन**—राजा, ज्या कारणास्तव मी तुझ्या कुलाचा उच्छेद करण्यास प्रवृत्त होऊन येथें आलों, तें कारण मी तुला अवश्य सांगतों. भृगुकुलांतील पुरोहितांनीं क्षत्रियांचे यज्ञ करावे अशी पूर्वंवहिवाट आहे. पण त्या दोघांत दैवयोगानें विरोध उत्पन्न होऊन सारे क्षत्रिय मिळून भृगुकुल नष्ट करतील. गर्भांतील मुलांनाहि दैववश होऊन ते कापून काढतील. तेव्हां आमच्या कुळांत गोत्रवर्धन करणारा ऊर्व नांवाचा अग्नि व सूर्य यांसारखा तेजस्वी पुरुष उत्पन्न होईल. त्रैलोक्याला जाळून टाकण्यासाठीं तो कोपाग्नि उत्पन्न करील व तेणेंकरून पर्वत व अरण्यें यांसह सारी पृथ्वी भस्मसात् करून टाकील. कांहीं काळ गेल्यावर तो त्या अग्नीला आपण होऊनच विझवील आणि समुद्रांत वडवेच्या मुखांत त्याला फेंकून देईल. ऊर्वाला ऋचीक नांवाचा पुत्र होऊन मूर्तिमंत धनुर्वेद त्याचा आश्रय करील. सर्व क्षत्रियांचा नाश करण्यासाठीं ऋचिक तो धनुर्वेद दैवी प्रेरणेनें आपल्या पुत्राला म्हणजे जमदग्नीला देऊन टाकील. जमदग्नि तपामुळें शुद्धान्तःकरणाचा होऊन तो वेद धारण करील. पण, हे धर्मशील राजा, तो तुझ्या कुळांतील कन्या पत्नी म्हणून स्वीकारील व तुझ्या वंशाचा उत्कर्ष करील. तुझी नात व गाधीची कन्या ही बुद्धिसामर्थ्यानें बृहस्पतीसारखा व क्षत्रिय असून ब्राह्मणकर्म करणारा पुत्र प्रसवेल.* तो विश्वामित्र नांवानें प्रसिद्ध व धार्मिक होईल. अशा रीतीनें तुझ्यापासून तिसऱ्या पुरुषाला ब्राह्मण्य मिळेल आणि तूं शुद्धचित्ताच्या भृगकुलाचा संबंधी होशील.

**भीष्म**:—महात्म्या च्यवनाचें भाषण ऐकून कुशिक राजा हर्षभरित झाला आणि ' तसें होवो ' असें म्हणाला. तेव्हां च्यवनानें त्याला वर मागण्याविषयीं पुनः आग्रह केला असतां त्यानें सांगितलें, ' ब्रह्मर्षे, माझें कुळ ब्राह्मण्ययुक्त होवो व त्यांतील पुरुषांचें मन धर्मांत स्थिर राहो, हें मीं मागतों.' तेव्हां च्यवनानें ' तसें होईल ' म्हणून म्हटलें व राजाचा निरोप घेऊन तो तीर्थयात्रेला निघून गेला. याप्रमाणें भृगकुल व कुशिककुल यांचा संबंध घडून येण्यास काय

* ४थ्या अध्यायांतील विश्वामित्रोत्पत्तीची कथा पहा.

कारण झालें तें, तसेंच परशुराम व विश्वामित्र मुनि यांच्या जन्माचें वृत्तहि मीं तुला सांगितलें. १३. १. ५६.

## अध्याय ५७ वा.

[ १ युधिष्ठिराचा खेद. २ तो दूर करण्यासाठीं भीष्म त्याला मरणोत्तर प्राप्त होण्याऱ्या फलांचीं साधनें सांगतो. ]

( १ ) **युधिष्ठिर**—आजोबा, आपण सांगितलेलें सव मीं ऐकलें व त्याचा पुनः पुनः विचारहि केला. तथापि मोठमोठे श्रीमान् राजे या पृथ्वीवरून नाहींसे झालेले पाहून त्यांचीं शेकडों राज्यें मिळालीं असतांहि माझ्या हातून त्या कामीं कोट्यवधि माणसांचा वध झालेला असल्यामुळें माझ्या मनाला फार अनुताप होत आहे. ज्या सुंदर स्त्रिया पतिहीन, पुत्रहीन व भ्रातृहीन होऊन पडल्या आहेत, त्यांची आतां काय दशा होईल ? त्या कौरवांना, आपल्या ज्ञातिबांधवांना व मित्रांना नष्ट केल्यामुळें आम्हीं खालीं डोकें होऊन नरकांत पडूं, यांत संशय नाहीं. तरी आतां आम्हीं करावें तरी काय, याचा खरा उपदेश आम्हांला मिळावा अशी माझी इच्छा आहे.

( २ ) वैशंपायन सांगतो, हे जनमेजय राजा, युधिष्ठिराचें तें भाषण ऐकून थोर मनाच्या भीष्मानें मनाशीं खोल विचार केला व युधिष्ठिराला सारें रहस्य सांगितलें. काय केल्यानें कोणती गति मरणोत्तर मिळते तें मी तुला सांगतों, ऐक. तपानें स्वर्ग, कीर्ति, जीवितसाफल्य, भोग हीं सर्व मिळतात. ज्ञान, विज्ञान आरोग्य, सौंदर्य, वैभव, श्रेष्ठपणा हीं देखील तपानेंच प्राप्त होतात. तपानें धन मिळून मौनव्रत पाळल्यानें जग आपलें आज्ञाधारक होतें. दानानें भोग्य वस्तु आणि ब्रह्मचर्यानें दीर्घायुष्य हीं मिळतात. अहिंसेच्या योगानें सौंदर्य, यज्ञदीक्षेनें उत्तम कुळांत जन्म, फळें व मुळें यांवर रहाणाराला राज्य व पानें खाऊन रहाणाराला स्वर्ग मिळतो. दुधावर राहिल्यानें मनुष्य स्वर्गास जातो, दानानें संपत्तिमान् होतो, गुरुशुश्रूषेनें त्याला विद्या मिळते व नित्यश्राद्धानें संतति प्राप्त होते. भाज्यांवर रहाणारा गाईचा स्वामी होतो व गवत खाऊन रहाणाराला स्वर्गप्राप्ति होते. प्रतिदिवशीं तीन वेळां स्नान केल्यानें स्त्रिया मिळतात व वायु भक्षण करून राहिल्यास ( म्हणजे प्राणायाम केल्यास ) ऋतूची म्हणजे ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. नित्य स्नान करून दोन्ही संध्याप्रसंगीं जप करणारा दक्षलोकास जातो.

निर्जल ठिकाणीं कांहीं न खातां साधन करणाराला स्वर्ग मिळतो. स्थंडिलावर पडून रहाणाराला घरें व शय्या मिळतात. फाटकीं वस्त्रें व वृक्षाच्या साली पांघरून रहाणाराला उत्तम वस्त्रें व अलंकार मिळतात. योगयुक्त तप करणाराला उत्तम शय्या, आसनें व रथ मिळतात. अग्नींत प्रवेश करणारा ब्रह्मलोकांत मान्यता पावतो. चविष्ट पदार्थांच्या त्यागानें महाभाग्य, मांसवर्जनानें दीर्घायुषी संतति, पाण्यांत राहिल्यानें राज्य, सत्यभाषणानें देवतांच्या सहवासांतील आनंद, दानानें कीर्ति व अहिंसेनें आरोग्य मिळतें. ब्राह्मणांच्या सेवेनें राज्य व ब्राह्मणत्व, व जलदानानें शाश्वत कीर्ति मिळून अन्नदानानें सर्व भोगेच्छा तृप्त होतात. प्राणिमात्राचें सांत्वन करणारा सर्वशोकापासून मुक्त होतो व देवपूजेनें राज्य व दिव्य सौन्दर्य मिळतें. दीपदानानें उत्तम दृष्टि, प्रेक्षणीय वस्तुदानानें स्मरणशक्ति व बुद्धि, सुवासिक फुलें दिल्यानें पिपुल कीर्ति, जटा व दाढी वाढविल्यानें उत्तम प्रकारची संतति, अशीं प्राप्त होतात. बारावर्षें दीक्षा घेऊन उपवासपूर्वक स्नान करीत राहिल्यानें वीरपुरुषाला मिळणाऱ्याहून श्रेष्ठ स्थान मिळतें. ब्रह्मविधीनें कन्यादान केल्यास दासदासी, अलंकार, शेतवाडी, व घरें मिळतात. यज्ञ व उपवास यांच्या योगानें मनुष्य स्वर्गास जातो. फलें व पुष्पें दान करणाराला उत्तम ज्ञान मिळतें. सहस्र गाई शिंगें सोन्यानें मढवून जो मनुष्य दान देईल त्याला स्वर्गांत पवित्र असा देवलोक मिळतो. सोन्याचीं टोपणें शिंगांना लावून जो काशाच्या भांड्यांसह कपिला गाय दान देतो, त्याच्याकडे ती गाय त्या पुण्यामुळें कामधेनु होऊन परत येते, व गाईच्या अंगावरील केसांइतकीं वर्षें तो स्वर्गांत राहून पुत्र, नातु व इतर कुळ या सर्वांचें तो सात पिढ्यांपासून तारण करतो. द्रव्यासह तशीच गाय देणारा सुलभपणें वसुलोकास जातो. आपल्या पूर्वकर्मांनीं नरकांत पडणाऱ्या माणसाला, समुद्रांत बुडणाऱ्याला नौका जशी तारते, तसें गाईचें दान तारक होतें. सर्वगुणसंपन्न असें घर जो वेदाध्ययन करणाऱ्या ब्राह्मणाला देतो त्याला उत्तरकुरुदेशाची प्राप्ति होते. छत्रदानानें उत्तम घर, जोडे व वहाणा दिल्यानें रथादि वाहनें, व वस्त्रदानानें सौन्दर्य मिळून सुगंधिद्रव्यदानानें मनुष्य सुगन्धयुक्त होतो. ब्राह्मणाला फुलांनीं व फळांनीं भरलेलें झाड दिल्यास मनुष्याला वैभवपूर्ण घर सहज मिळतें. भक्ष्य व पेयरस देणाराला सारे उत्तम रस मिळतात. स्नानसाहित्यदानानें आरोग्य व सुंदर रूप मिळतें. धान्य व शय्या यांनीं युक्त असें घर ब्राह्मणाला दिल्यानें रत्नांनीं भरलेलें घर मिळतें. सुगंधी व रंगीबेरंगी आस्तरणें व उशा यांसह ब्राह्मणाला शय्यादान करणाराला विशेष यत्न

न करतां सुंदर व कुलीन स्त्री प्राप्त होते. वीरशय्येवर पडणाऱ्या पुरुषाला पितामहब्रह्मदेवाची योग्यता मिळते. त्याहून अधिक असें कांहीं रहातच नाहीं असें महर्षींचें म्हणणें आहे.

वैशंपायन म्हणतो, जनमेजया, भीष्माचें हें भाषण ऐकून युधिष्ठिराला आनंद झाला व आपणहि वीरांच्या मार्गानें जावें अशी त्याला इच्छा होऊन आश्रमांत राहूं नये असें वाटूं लागलें व तसें त्यानें आपल्या बंधूंना सांगितलें. तो म्हणाला, 'भीष्म आजोबांचें हें म्हणणें तुम्हांला आवडावें असें आहे.' युधिष्ठिराचें म्हणणें ऐकून सर्व पांडव द्रौपदी यांनीं 'ठीक आहे' असें म्हणून त्याची स्तुति केली. १३. १. ५७.

---

## अध्याय ५८ वा.

[ १ आरामाचीं स्थळें, तळीं इत्यादि बांधण्याचें फळ. ]

(१) **युधिष्ठिर**—आजोबा, आतां आरामाचीं स्थळें, तळीं इत्यादि बांधण्यापासून काय फळ मिळतें तें ऐकण्याची माझी इच्छा आहे.

**भीष्म**:—युधिष्ठिरा, दिसण्यांत सुबक, सुपीक, विविध रंगांचीं, धातूंनीं युक्त, व सर्व प्रकारचे प्राणी जींत रहातात, तिला उत्तम प्रकारची भूमि म्हणतात. तींत स्थानपरत्वें तळीं बांधणें, किंवा इतर जलसंचय करणें याविषयीं आतां क्रमानें विवेचन करतों. तळ्यांचे विशेष उपयोग काय तेंहि सांगतों. तळीं बांधणारा साऱ्या त्रैलोक्यांत श्रेष्ठ होय. कारण तळें हें मित्राच्या घरासारखें उपकारी, प्रेमळ आणि देवांचें सहायक आहे. म्हणून तळीं बांधल्यानें कीर्ति मिळते. धर्म, अर्थ, काम यांचें फल देणारें असें सर्वांचें आश्रयस्थान म्हणजे तळ्यानें युक्त असें शेतच होय. तळें म्हणजे चारी भूतांचें प्रतीक आहे. तळीं म्हणजे वैभवाचीं निदर्शक होत; कारण देव, माणसें, गंधर्व, पितर, नाग, राक्षस, तसेच स्थावर असे वृक्षहि जलाशयाचाच आश्रय करतात. म्हणून तळ्याचे काय उपयोग आहेत व त्यांच्यापासून कोणतें फळ मिळतें असें ऋषि म्हणतात तें मी आतां तुला सांगतों. पावसाळ्यांत ज्याच्या तळ्यांत पाणी असतें त्याला अग्निहोत्रपालनाचें फळ मिळतें. शरत्कालीं ज्याच्या तळ्यांत पाणी असेल त्याला मरणोत्तर सहस्र गोदानाचें उत्तम फळ मिळतें. हेमंतऋतूंत

तळ्यांत पाणी बाळगणाराला पुष्कळ सुवर्णदान केलेल्या यज्ञाचें व शिशिरऋतूंत तसें करणारास अग्निष्टोम यज्ञ केल्याचें पुण्य लागतें. वसंतऋतूंत तळ्यांत पाणी राखील त्याला अतिरात्र यज्ञाचें व उन्हाळ्यांत तें बाळगणारास अश्वमेधाचें फळ प्राप्त होतें. ज्यानें खणलेल्या तळ्यांतील पाणी गाई व सज्जन यांना प्यावयास मिळतें तो सर्व कुळाचा तारक होतो. तहानेलेलीं गाई, पशू, पक्षी, माणसें यांना ज्या तळ्याचें पाणी प्यावयास सांपडतें, त्याच्या धन्याला अश्वमेध केल्याचें पुण्य प्राप्त होतें. प्राणिमात्राला तळ्यांत स्नान करावयास व कांठीं विश्रांति घ्यावयास मिळते, या पुण्यामुळें तळें खणणाराला मोक्ष मिळतो. राजा, पाणी ही अतिशय दुर्लभ वस्तु आहे, व विशेषतः परलोकीं. यास्तव या लोकीं जल-दान केल्यानें परलोकीं मोठें सुख मिळतें. या लोकीं तीळ घ्या, पाणी घ्या, दीपदान करा, जागा, आणि बांधवासह आनंद करा; कारण परलोकीं या गोष्टी दुर्लभ आहेत. सर्व दानांत श्रेष्ठ म्हणजे जलदानच होय. म्हणून तेंच केव्हांहि द्यावें. असें हें तळ्याचें महात्म्य सांगितलेलें आहे. आतां रस्त्यांवर वृक्ष लावण्याचें फल सांगतों. स्थावरवस्तूंचे सहा प्रकार सांगितलेले आहेत; वृक्ष, गुल्म, लता, वेली, त्वक्सार आणि गवत* हे जे वृक्षलतांचे प्रकार त्यांची लागवण केली असतां या लोकीं कीर्ति व परलोकीं शुभ फळ मिळतें, आणि पितरांकडून मान मिळून देवलोकीं गेल्यावरहि त्या मनुष्याचें नांव नष्ट होत नाहीं. आपल्या वंशांतील मागील पुढील अनेक पिढ्यांचा उद्धार वृक्षरोपणामुळें होत असल्यामुळें वृक्ष अवश्य लावावे. येथें जीं झाडें लावावीं, तीं परलोकीं आपले पुत्र होतात. वृक्षरोपण करणारा मरणोत्तर स्वर्गाला जातो व त्याला अक्षय्य लोक प्राप्त होतात. फुलांनीं देवांची, फळांनीं पितरांची व छायेनें वाटसरूंची पूजा वृक्ष करीत असतात. किन्नर, नाग, राक्षस, देव, गंधर्व, मानव, त्याचप्रमाणें ऋषि देखील वृक्षांचा आश्रय करतात. फळांनीं व फुलांनीं भरलेले वृक्ष माणसांना संतुष्ट करितात. वृक्ष दान करणाराला वृक्ष पुत्राप्रमाणें परलोकीं तारक होतात. म्हणून तळ्याच्याकांठीं कल्याणेच्छेनें वृक्ष लावावे व त्यांचें मुलांप्रमाणें पालन करावें; कारण वृक्षांना धर्मानें पुत्रांच्या जागीं मानिलें

*वृक्ष—वडासारखीं मोठीं झाडें; गुल्म—दर्भ, वाळा यासारखीं बेटें; लता—वृक्षावर चढणाऱ्या; वेली—जमीनीवर पसरणाऱ्या; त्वक्सार—कळकासारखीं झाडें; गवत प्रसि-द्धच आहे.

आहे. तळीं खणणारा, वृक्ष लावणारा, व यज्ञ करणारा या सर्वांना स्वर्गांत श्रेष्ठ स्थान मिळतें; तसेंच सत्यभाषण करणारालाहि मिळतें. म्हणून तळीं खणावीं, आराम देणारे वृक्षहि लावावे, विविध यज्ञ करावे व नित्य सत्य बोलावें. १३. १. ५८.

---

## अध्याय ५९ वा.

[ १ दानांत श्रेष्ठ कोणतें; ब्राह्मणांचें श्रेष्ठपण ]

( १ ) युधिष्ठिर :—हे भीष्मपितामहा, यज्ञयागादिकांबाहेरचीं जीं दानें सांगितलीं आहेत, त्यांत तुमच्या मतें विशेष महत्त्वाचें कोणतें आहे बरें ? महाराज, याविषयीं मला मोठी जिज्ञासा आहे. तरी कोणतें दान दात्याच्या मागोमाग जातें तें मला सांगा.

भीष्म :—प्राणिमात्राला अभय देणें, संकटप्रसंगीं दया करणें, ज्यावांचून ज्याचें अडलें आहे तो तें मागत असल्यास त्याला देणें, दिलें असतां उलट कांहीं न इच्छिणें, हेंच दान श्रेष्ठ होय. तेंच दात्याच्या मागोमाग येतें. सुवर्णदान, गोदान, भूमिदान, हीं पवित्र असून पापी माणसालाहि तारतात. चांगल्या माणसाला हीं दानें सतत द्यावीं. दानेंच मनुष्याला पापापासून सोडवितात यांत संशय नाहीं. जें आपल्याला अतिशय इष्ट किंवा प्रिय असेल, तें गुणवान् ब्राह्मणाला द्यावें, म्हणजे तें परलोकीं अक्षय होतें. प्रिय वस्तु देणारा व प्रिय करणारा याला परलोकीं त्यांची प्राप्ति होते व तो सर्वांना इहपरलोकीं प्रिय होतो. युधिष्ठिरा, दरिद्री याचकाला जो यथाशक्ति देत नाहीं, तो मनुष्य दुष्ट समजावा. शत्रूलाहि तो दीन होऊन शरण आला असतां देणें व संकट-काळीं त्यावर कृपा करणें हेंच उत्तम पुरुषाचें लक्षण होय. कृश, विद्वान, वृत्ति-हीन, व दुःखी ब्राह्मणाला दान देऊन त्याची क्षुधा निवारण करणें यासारखें पुरुषाला मोठेपण देणारें दुसरें कांहीं नाहीं. स्त्रीपुत्रांसह आपलीं कर्तव्यें निय-मितपणें अयाचित वृत्तीनें करीत राहून जे द्रव्याभावीं कृश होतात त्यांना वाटेल तें करून आपल्या घरीं बोलवावें; कोणाची आशा न करतां जे सहजगत्या मिळेल त्यावर उपजीविका करीत संतुष्ट असतात, त्या सर्पासारख्या तेजस्वी ब्राह्मणांना जपत जा. त्या श्रेष्ठ ब्राह्मणांची नीट चवकशी करून त्यांना घर, वस्त्रें, इत्यादि देत जा. श्रद्धेनें दिलें तरच ते दान घेतात; कारण ते आपलें धर्मकार्य कर्तव्य

म्हणूनच करतात, लोभानें करीत नाहींत. विद्येंत निष्णात, व्रताचरणयुक्त, कोणाचा आश्रय न करतां रहाणारे, गाजावाजा न करतां वेदाभ्यास करणारे, अशा शुद्ध-मनाच्या इंद्रियनिग्रही व आपल्या स्त्रीवर संतुष्ट असणाऱ्यांना जें दान, हे राजा, तूं देशील, तेंच तुला परलोकीं उपयोगीं पडेल. सकाळ संध्याकाळ ब्राह्मणानें अग्नीला दिलेली आहुति जें फळ देते, तेंच ब्राह्मणाला केलेलें दान देत असतें. दान हाच तुझा मोठा यज्ञ होय. त्याची योग्यता इतर सर्व यज्ञांहून मोठी आहे. अशा दानप्रसंगीं सोडलेलें पाणी मनुष्याला पितर, देव व ऋषि यांच्या ऋणांतून सोडवितें. न रागावणारे व गवताच्या काडीचाहि लोभ न धरणारे असे सत्यभाषणी ब्राह्मण पूज्य होत. ते दिल्यावर कृतज्ञता दाखवीत नाहींत व न दिल्यास मागतहि नाहींत. अशांचेंच पुत्राप्रमाणें पालन करून त्यांना नमस्कार करावा व अभय द्यावें. ऋत्विज, पुरोहित, आचार्य, हीं कामें करणारे ब्राह्मण वेदाभ्यासी असल्यामुळें क्षत्रियांनीं सोडलेलें तेज त्यांच्यापुढें लीनच होतें. युधिष्ठिरा, मी बलवान् आहें, राजा आहें, अशा घमेंडींत तूं ब्राह्मणांना वगळून वस्त्रादिकांचा तसाच भक्ष्यादिकांचा उपभोग घेऊं नको. तुझ्यापाशीं जें बलवर्धक किंवा शोभावर्धक धन असेल, तें तूं ब्राह्मणांच्या पूजेकडे लावून धर्माचें आचरण कर. ब्राह्मण कसेहि वागले, तरी तूं त्यांना नमस्कार कर, मुलांप्रमाणें ते तुझ्याशीं लडिवाळपणानें यथेष्ट वागले, तरी तूं रागावूं नको. नित्य प्रसन्नचित्त व अल्पसंतुष्ट राहून मित्राप्रमाणें वागणाऱ्या ब्राह्मणांची खाण्यापिण्याची सोय, राजा, तुमच्याशिवाय कोण लावणार? जसा पतीचा आश्रय हाच स्त्रीचा धर्म ठरलेला आहे, त्याच्याशिवाय तिला गति नाहीं, त्याप्रमाणें ब्राह्मणांशिवाय आपणां क्षत्रियांना गति नाहीं. आपण त्यांचा मान न राखल्यामुळें व आपलीं कृत्यें दुष्ट आहेत असें पाहून ब्राह्मण जर आपल्याला सोडून गेले, तर आपलीं वेदोक्त कर्में कोण करील? यज्ञ कोण चालवील? आपल्याला स्वर्गादि लोक कसे मिळतील? आपण राहूं तरी कसे? ब्राह्मणांच्या आधाराशिवाय आपल्या जगण्यांत तरी काय अर्थ?

युधिष्ठिरा, आतां या विषयींचा सनातन धर्म काय आहे तो मी तुला सांगतों. क्षत्रिय पूर्वी ब्राह्मणांची सेवा करीत, वैश्य क्षत्रियांची करीत, व शूद्र वैश्यांची करीत अशी श्रुति आहे. शूद्रानें ब्राह्मणाची सेवा लांबूनच करावी; कारण ब्राह्मण हा जळत्या अग्नीसारखा आहे. पण वैश्य व क्षत्रिय यांनीं मात्र ती अंगस्पर्श करून करावी. मृदु अंतःकरणाच्या सत्यशील, सत्य धर्माचें पाल

करणाऱ्या, पण रागावले असतां मात्र सर्पाप्रमाणें होणाऱ्या ब्राह्मणांची तूं सेवा कर. सर्व प्रकारच्या प्रतापी, बलवान् व तेजस्वी क्षत्रियांच्या तेजाचा व तपाचा ब्राह्मणांपुढें लयच होतो. युधिष्ठिरा, पृथ्वींत मला तुझ्याइतकें दुसरें कोणी प्रिय नाहीं. प्रत्यक्ष माझे आजोबा, फार काय मी स्वतःहि मला तुझ्याइतका प्रिय नाहीं. पण ब्राह्मण मला तुझ्यापेक्षांहि प्रिय आहेत. धर्मा, तुला हें मी अगदीं खरें खरें सांगतों. या सत्य भाषणाच्या योगानें, माझा पिता शांतनु जेथें गेला आहे, ते लोक मला मिळणार आहेत व तेथें मी नित्य रहाणार आहें. असे ते ब्रह्मादि लोक माझ्यापुढें दिसत असल्यामुळें ब्राह्मणांविषयीं आजवर मीं जें कांहीं केलें, त्याचें मला दुःख वाटत नाहीं. १३.१.५९.

---

## अध्याय ६० वा.

[ १ अयाचितवृत्तीचा कीं याचना करणारा ब्राह्मण दानास पात्र याविषयीं युधिष्ठिर व भीष्म यांचीं प्रश्नोत्तरें ]

(१) युधिष्ठिर :—हे पितामहा, दोन ब्राह्मण सदाचारसंपन्न, विद्येनें सारखेच, जन्मानेंहि कुलीन असून एक अयाचितवृत्तीनें रहातो व दुसरा याचना करितो, तर त्यांतील कोणाला दान देणें विशेष चांगलें होईल बरें ?

भीष्म :—युधिष्ठिरा, याचना करणाऱ्यापेक्षां अयाचितवृत्ति ब्राह्मणालाच दान देणें अधिक श्रेयस्कर होय. अयाचितवृत्ति ब्राह्मण हा धैर्यशील असल्यामुळें अधीरवृत्ति याचकापेक्षां सत्पात्र आहे. रक्षण करण्यांत जसें क्षत्रियाचें धैर्य दिसतें, तसें याचना न करण्यांत ब्राह्मणाचें दिसून येतें. विद्वान्, धैर्यवान्, व संतोषवृत्तीचा ब्राह्मण देवांना संतुष्ट करतो. दरिद्री माणसाची याचना उपहासास्पद होऊन, चोराप्रमाणें याचना करणारीं माणसेंसुद्धां लोकांना उद्वेग आणितात. याचना करणारा मनुष्य मरणप्राय दुःखाला पात्र होतो; पण देणाराचें तसें कांहीं होत नाहीं. उलट दाता याचकाला तसाच स्वतःलाहि जीवन देतो. याचकाला देणें यांत जो दयाळूपणा आहे तो श्रेष्ठधर्म आहेच, तरी याचना न करणारे, पण त्यामुळें कष्टांत पडलेले असे जे ब्राह्मण असतील, त्यांना वाटेल तें करून घरीं बोलावून दान द्यावें. तसे ब्राह्मण जर तुझ्या राज्यांत कष्टांत रहातील तर ते भस्मानें आच्छादलेल्या अग्नीप्रमाणें होत, हें तूं समजून ठेव. आपल्या तपानें तळपणारे ते पूज्य असतां जर त्यांची पूजा झाली नाहीं तर ते पृथ्वी-

लाहि जाळून टाकितील. ज्ञान, विज्ञान, तप व योग यांनीं युक्त असे ते सन्मानाला पात्र आहेत. युधिष्ठिरा, त्यांची पूजा अवश्य कर. त्यांनीं कसली याचना केली नाहीं, तरी त्यांना अनेक दानें दे; म्हणजे सकाळ संध्याकाळ अग्नीला आहुति दिल्याचें फळ तुला मिळेल. धर्मज्ञ व कर्तव्य म्हणूनच आपलीं कर्मे करण्यांत दंग असलेल्या दरिद्री ब्राह्मणांना भोजन घातल्यानें तिन्ही अग्नि संतुष्ट होतात. युधिष्ठिरा, मध्याह्नकाळीं तुझ्या घरीं गाई, सोनें, यांचें दान चालू राहो. म्हणजे तेणेंकरून इन्द्र तुझ्यावर प्रसन्न होईल. देव, पितर व ब्राह्मण यांना तूं जें देशील, तेंच तुझें तृतीय सवन व वैश्वदेव होय. तसेंच सर्व भूतांवर प्रेम करून त्यांना त्यांचा वांटा देणें व इंद्रियदमन, दान, धैर्य व सत्यभाषण हींच तुझें अवभृथस्नान होतील. असा तुझा श्रद्धायुक्त व दक्षिणायुक्त यज्ञ सर्व यज्ञांत श्रेष्ठ असून तो तुजकडून नित्य होवो. १३. १. ६०.

---

## अध्याय ६१ वा.

[ १. दान, यज्ञ, इत्यादिकांत अधिक फल कोणाचें ? ]

( १ ) **युधिष्ठिर :**—हे भरतकुलश्रेष्ठा, दान आणि यज्ञक्रिया यांत मरणोत्तर अधिक फल देणारें काय आणि कसलें फळ कोणत्या फळाकडून मोठें हें जसें असेल तसें समजून घेण्याची माझी इच्छा आहे. तरी मला दानधर्माची माहिती करून द्या. तसेंच यज्ञवेदीच्या आंत श्रद्धापूर्वक व प्रेमळपणानें केलेलें दान श्रेष्ठ कीं इतरत्र केलेलें श्रेष्ठ तेंहि सांगावें.

**भीष्म :**—युधिष्ठिरा, क्षत्रियाचें कर्म म्हणजे भयंकर हें ठरलेलें. त्याला पावन करणारें कर्म म्हणजे यज्ञ व दान होय. पण सज्जन पापी राजांकडून दान घेत नाहींत, म्हणून राजानें पुष्कळ दक्षिणा देऊन यज्ञ करावे. ब्राह्मण जर त्यांच्याकडून दान घेतील, तर मात्र त्यांनीं तें प्रतिदिवशीं मोठ्या श्रद्धेनें द्यावें; कारण तें अत्यंत पवित्र करणारें आहे. यज्ञ करून सच्छील वेदाभ्यासी व तपस्वी अशा ब्राह्मणांना द्रव्य देऊन संतुष्ट करावें. असे ब्राह्मण जर तुझ्यापासून दान घेणार नाहींत, तर तुला पुण्यहि मिळणार नाहीं. म्हणून, युधिष्ठिरा, दक्षिणा देऊन यज्ञ कर आणि चांगल्या ब्राह्मणांना गोड भोजन घाल. दान केल्यानें यज्ञाचें व दानाचें असलें दुहेरी फळ मिळतें, म्हणून यज्ञ करणाऱ्या ब्राह्मणांचा तूं सन्मान कर म्हणजे त्यांच्या पुण्याचा अंश तुलाहि मिळेल. पुष्कळ धर्मकार्यें

करणाऱ्या संततियुक्त ब्राह्मणांना तूं द्रव्य दे म्हणजे तूंहि पुत्रवान् होशील. सज्जन सत्कर्मांचें वर्धन करतात, म्हणून सर्वस्व देऊनहि त्यांचें पोषण करावें. तूं वैभवसंपन्न आहेस, तर ब्राह्मणांना गाई, बैल, अन्न, छत्रें, वस्त्रें, जोडे, तूप, अन्न, घोड्यांच्या गाड्या, घरें, शय्या हीं देत जा. समृद्धिसंपन्नांनीं या वस्तु दरिद्री ब्राह्मणांना अवश्य द्याव्या; अनिन्द्य आचरणाच्या ब्राह्मणांना उघड किंवा गुप्तरूपानें दान देऊन त्यांचा प्रतिपाळ करावा. असें करणें राजसूय किंवा अश्वमेध यांहूनहि क्षत्रियांना श्रेयस्कर आहे. असें तूं करशील तर सर्व पापांतून मुक्त होऊन तूं स्वर्गाला जाशील. कोशांत द्रव्यसंचय करून जर तूं राष्ट्राचें चांगलें पालन करशील, तर पुढील जन्मीं तुला ब्राह्मणाचें वैभव मिळून धनहि प्राप्त होईल. तरी युधिष्ठिरा, तूं आपल्या व लोकांच्या वृत्तीचें रक्षण करून आपले सेवक आणि प्रजा यांचा नीट सांभाळ कर; ब्राह्मणांचा योगक्षेम सतत पहात जा; त्यांच्यासाठींच तुझें जीवित आहे; यास्तव त्यांची हेळसांड करूं नकोस. द्रव्यसंग्रह हा ब्राह्मणाला अनर्थकारक आहे. लक्ष्मीचा दीर्घ सहवास मनुष्याला गर्विष्ठ व मूढ बनवितो. ब्राह्मणच जर गर्विष्ठ व मूढ झाले, तर धर्माचा नाश निश्चयेंकरून होणार. आणि धर्मनाश झाला म्हणजे प्राण्यांचा नाश निःसंशय झालाच. जमवलेलें द्रव्य जो राजा कोशरक्षकांच्या स्वाधीन करून यज्ञासाठीं लागणारें द्रव्य लोकांकडून काढतो व तशा धाकदपटशानें काढलेल्या द्रव्यावर यज्ञ करतो, त्याच्या त्या यज्ञाला साधु कांहींच मान देत नाहींत. कोणी धनवान् लोक आपल्या इच्छेनुरूप जें देतील, त्या द्रव्यानें यज्ञ करावा, प्रजेला पिळून काढलेल्या द्रव्यानें करूं नये. प्रजा समृद्ध होऊन राजावर द्रव्याचा अभिषेक करितील, तेव्हांच मोठ्या दक्षिणांचे यज्ञ राजानें करावे. वृद्ध, लहान मुलें, अंधळे, संकटग्रस्त, अशांच्या धनाचें राजानें रक्षण करावें. दुष्काळी कामें करून पोट भरणाऱ्या लोकांचें किंवा रडतखडत उपजीविका करणाऱ्या स्त्रियांचें धन घेऊं नये. संकटग्रस्त लोकांचें धन घेतल्यास राजाचें राष्ट्र व संपत्ति नष्ट होतात. सज्जनांना भोग्य वस्तु देऊन त्यांचें क्षुधेचें भय नाहींसें करावें. ज्याच्या घरचीं गोड अन्नें मुलें केवळ लांबूनच पहातात, पण खाऊं शकत नाहींत, त्यांच्यासारखे पापी तेच. जर अशाप्रकारचे विद्वान् ब्राह्मण तुझ्या राष्ट्रांत भुकेनें तळमळतील तर तुला गर्भहत्येचें मोठें पाप लागेल. ज्याच्या राज्यांत ब्राह्मणाला किंवा दुसऱ्या कोणालाहि उपाशी रहावें लागतें, त्या राजाला धिक्कार असो असें शिबिराजा बोलला आहे. ज्याच्या राज्यांत स्नातक ब्रह्मचारी क्षुधेनें पीडीत होतो. त्या राजाचें राज्य वृद्धि न

पावतां शत्रुराजांच्या तावडींत सांपडतें. ज्या राजाच्या देशांत स्त्रिया त्यांचे पति व पुत्र ओरडत असतां बलात्कारानें पळवून नेल्या जातात तो राजा जीवंत असला तरी मेल्यासारखाच समजावा. प्रजेचें रक्षण न करणारा, त्यांना लुटणारा, त्यांना हतवीर्य करणारा, संकटप्रसंगीं त्यांचा पुढाकार न घेणारा राजा कलिच होय. त्याचा प्रजेनें स्वतःच कंबर कसून नाश करावा. 'मीं तुमचा संरक्षक आहें' असें म्हणून जो राजा प्रजारक्षण करीत नाहीं, त्याला वेड लागलेल्या कुत्र्याप्रमाणें सर्व प्रजेनें मिळून मारून टाकावें. राजाचें संरक्षण बरोबर नसल्यामुळें प्रजा जर पाप करतील, तर त्या पापाचा चवथा भाग राजाच्या माथीं बसतो. कोणी म्हणतात, कीं तो सगळ्याच पापाचा धनी होतो, निदान अर्ध्याचा तरी होतोच. पण मनूला अनुसरून मीं म्हणतों कीं चतुर्थांश पाप राजाकडे जातें. उलट राजाच्या सुरक्षणामुळें प्रजेच्या हातून जें पुण्यकर्म घडेल त्याचाहि चवथा भाग राजाला मिळतो. युधिष्ठिरा, तूं नीट राहून सर्व प्रजेला तसेंच ठेव. प्राणिमात्राला जसा पाऊस, किंवा पक्ष्यांना जसा वृक्ष, तसा तूं प्रजेला आधार आहेस. राक्षसांचा जसा कुबेर, किंवा देवांचा इन्द्र, तसा तूं आपल्या बांधवांचा व इष्टमित्रांचा आधार हो. १३. १. ६१.

---

## अध्याय ६२ वा.

[ १ भूमिदानाचें फळ. २ त्याविषयीं इन्द्रबृहस्पतींचा संवाद ]

(१) **युधिष्ठिर**—हें द्यावें, तें द्यावें असें श्रुति आदरानें सांगते व राजांना देण्यासारखेंहि पुष्कळ असतें, तरी त्या सर्वांत उत्तम दान कोणतें ?

**भीष्म**—सर्व दानांत पृथ्वीदान श्रेष्ठ होय. ती अचल आणि अक्षय असून आपल्या मोठमोठ्या इच्छा पूर्ण करते. वस्त्रें, रत्नें, पशु, धान्यें हीं तीच देते. यास्तव भूमिदान करणारा दीर्घकाल वैभवशाली होतो, म्हणजे भूमि जितका काळ टिकते तितका काळ तो वैभव भोगतो. युधिष्ठिरा, भूमिदानाहून श्रेष्ठ दुसरें कांहीं नाहीं. सर्वांनींच आजपर्यंत थोडेंतरी भूमिदान केलेलें आहे असें आम्हीं ऐकतों. ज्यानीं भूमि दिली तेच सारे भूमीचा उपभोग घेत आहेत. मनुष्यें आपल्या कर्मांनींच इहपरलोकीं निर्वाह करतात. भूमि ही वैभवाची देवता असून ती दात्याचें इष्ट पुरविते. युधिष्ठिरा, जो कोणी अक्षय अशी भूमि दक्षणा देईल तो पुढील जन्मीं मनुष्यजन्मास येऊन राज्य भोगील. जसें दान

करावें तसे भोग पुढें प्राप्त होतात असा धर्माचा ठरावच आहे. यासाठीं क्षत्रियानें एक तर रणावर देह ठेवावा, नाहींतर पृथिवीदान तरी करावें असें सांगितलें आहे. पृथ्वीदान करणारा पवित्र होतो असें आम्हीं ऐकिलें आहे; मग तो पापाचरणी असो, ब्राह्मणघातकी असो कीं असत्य भाषण करणारा असो; ती पृथ्वी त्याचें पाप धुवून काढून त्याला त्यापासून सोडवील. सज्जनहि पापी राजांकडून भूमिदान घेतात, दुसरें कांहीं घेत नाहींत; कारण भूमि ही मातेप्रमाणें पवित्र करणारी आहे व म्हणून तिला प्रियदत्ता असें गुप्त नांवहि दिलेलें आहे. तिला आपलें दान देणें किंवा घेणें हें फार प्रिय आहे. जो राजा विद्वान ब्राह्मणाला भूमिदान करतो त्यानें येथें यज्ञच केला म्हणून समजावें. तो पुढील जन्मींहि राजा होऊन राज्यच भोगील. म्हणून राजानें भूमि मिळवून ती ब्राह्मणाला द्यावी. जो राजा नाहीं अशानें कांहीं झालें तरी पृथ्वीदान करूं नये. तसेंच अपात्र ब्राह्मणानें ती घेऊंहि नये; एकदां ती दान दिल्यावर तिच्यावर आपला अधिकार चालवूं नये. ज्या दुसऱ्या कोणालाहि भूमि पाहिजे असेल त्यानेंहि असेंच करावें. जो सज्जनापासून भूमि काढून घेतो त्याला पुढें ती कधीं मिळत नाहीं; पण सज्जनाला भूमि दिली तर मात्र देणाराला उत्तम भूमि मिळते व या लोकीं तसाच परलोकीं तो कीर्तिमान होतो. अमुक चांगल्या राजानें ही भूमि आपल्याला दिली असें ज्यासंबंधानें ब्राह्मण आदरानें म्हणतात, त्याचे शत्रूहि त्याच्या राज्याविषयीं वाईट बुद्धि ठेवूं शकत नाहींत. दारिद्र्यामुळें जर पुरुषानें कांहीं पाप केलें, तर गाईच्या चामड्याइतकी जमीन दिल्यानें तो पापमुक्त होतो. अनेक प्रकारचीं भयंकर कर्में करणारे जे राजे असतात, त्यांनाहि पवित्र करणारें भूमिदान हेंच सांगितलें आहे. अश्वमेध यज्ञ आणि पृथ्वीदान यांच्या फळांत फारसें अंतर नाहीं असें पुराणवेत्ते मानतात. दुसऱ्या एकाद्या पुण्यकर्माच्या फलाविषयीं ज्ञात्यांना कदाचित् शंका येईल, पण एका भूमिदानासंबंधानें तशी शंका येणें शक्य नाहीं. पृथ्वी देणारा सुज्ञ पुरुष खरोखर सोनें, रुपें, वस्त्रें, रत्नें, मोतीं, द्रव्य हें सर्व देतो म्हणावयाचा. भूमिदान करणाराला तप, यज्ञ, वेदाध्ययन, शील, निर्लोभपणा, सत्यप्रतिज्ञता, गुरु व देव यांची पूजा या सर्वांचें फळ मिळतें. राजाच्या कल्याणासाठीं झटत असतां रणांगणावर देह ठेवून ब्रह्मलोकीं सिद्ध होऊन गेलेले लोकहि भूमिदान करणारापेक्षां अधिक नाहींत. माता जशी आपल्या मुलाला दुधानें तृप्त करते तशी पृथ्वी दात्याला सर्व रसांनीं तृप्त करते. भूमि देणाराला मृत्यु, अपमृत्यु, दंड, तम, भयंकर अग्नि, दारुण पाश,

यांची बाधा होत नाहीं. जो भूमिदान करतो तो शांत स्वभावाचा पुरुष पितृलोकांतील पितरांना, तसेंच देवलोकांतील देवांनाहि तृप्त करतो. कृश व मरावयास टेकलेल्या दरिद्री व दुःखी ब्राह्मणाला निर्वाहसाधन म्हणून जर भूमि दिली, तर देणाराला यज्ञाचें पुण्य मिळतें. जशी प्रेमळ गाय दूध सांडीत वासरामागून धावते, तशी पृथिवी देखील दान करणाराकडे धांव घेते. नांगरलेली, बीं पेरलेली, पिकें आलेली भूमि अथवा मोठें घर दिल्यानें सर्व इच्छा पूर्ण होतात. आहिताग्नि व शुद्ध आचरणाच्या ब्राह्मणाला भूमि दिल्यास देणारा कधींहि मोठ्या संकटांत सांपडत नाहीं. चंद्राच्या कला जशा प्रतिदिवशीं वाढत जातात, तशी दान केलेल्या भूमीची किंमत प्रतिवर्षीच्या धान्याच्या पिकानें वाढत जाते. याविषयीं पुराणवेत्ते भूमिदेवीनें गायिलेली गाथा सांगतात. ती गाथा ऐकूनच परशुरामानें काश्यपाला पृथ्वी देऊन टाकिली. ती गाथा अशी : ‘माझा स्वीकार करा, मला द्या, मला देऊन माझी प्राप्ति करून घ्या. जें दिलें असेल तेंच इहपरलोकीं परत मिळतें. श्राद्ध करीत असतां ही वेदोक्ति जो कोणी उच्चारील, तो ब्रह्मलोकास जाईल. जारणमारणादि कृत्यें केल्यानें लागलेल्या पापाचें निरसन करण्यास पृथ्वी दान द्यावी, म्हणजे देणारा दोन्ही बाजूंच्या दहा पिढ्यांचा उद्धार करतो. हें वेदवचन जो जाणतो तोहि उभयकुळें पवित्र करितो. भूमि ही सर्वांची जननी असून अग्नि ही तिची देवता होय.’ राजाला अभिषेक केल्याबरोबर त्याला ही गाथा ऐकवावी, म्हणजे तो भूमिदान करील, साधुलोकांची भूमि आपण घेणार नाहीं. राजाचें वैभव हें निःसंशय ब्राह्मणांसाठींच होय; कारण धर्मांत कुशल असा राजा हेंच पहिलें उत्कर्षाचें लक्षण आहे. ज्या लोकांना अधर्मी नास्तिक राजा मिळतो, त्यांना जागेपणीं व झोपेंतहि सुख लाभत नाहीं. त्या राजाच्या दुराचारामुळें ते नित्य उद्विग्न असतात व त्यांच्या राष्ट्रांत संपत्तीचें सत्पादन आणि उत्पन्न केलेलीचें रक्षण होत नाहीं. पण ज्या लोकांना सुज्ञ व धार्मिक राजा लाभतो, ते सुखानें जागतात व सुखानेंच झोंपतात. त्या राजाच्या प्रजा त्याच्या सत्कर्मांमुळें उत्कर्ष पावतात, आणि संपत्तीचें उत्पादन व रक्षण आणि पाऊसपाणी या गोष्टी त्या देशांत सुरळीत चालतात. पृथ्वीदान देणारा पुरुषच कुलीन, पौरुषशाली, सर्वांचा सहायक, पुण्यवान्, दाता व पराक्रमी होय. वेदवेत्त्या ब्राह्मणाला जे संपन्न भूमि देतात, ते लोक या लोकींच आपल्या तेजानें सूर्याप्रमाणें तळपतात. जसें धान्य भूमींत पेरलें असतां उगवतें, तसे आपले मनोरथ भूमिदानाच्या आधारावर पूर्ण होतात. चंद्र, सूर्य, अग्नि, वरुण, ब्रह्माविष्णु-

महेश, हे सर्व भूमिदान करणाराची स्तुति करतात. भूमीवर माणसें जन्मतात व भूमीवर लय पावतात. चारी प्रकारची प्राणिसृष्टि भूमिमूलकच होय. पृथ्वी हीच जगाची माता व पिता असून तिच्यासमान दुसरें कोणीहि नाहीं.

( २ ) युधिष्ठिरा, याविषयीं बृहस्पति आणि इन्द्र यांमधील एव प्राचीन संवाद सांगण्यांत येतो. योग्य ती दक्षणा देऊन केलेले शंभर यज्ञ पुरे झाले असतां इन्द्रानें पंडितांमध्यें श्रेष्ठ अशा बृहस्पतीला विचारिलें 'हे भगवन्, कोणत्या दानानें स्वर्गांत सुख प्राप्त होतें, व अक्षय आणि अत्यंत मूल्यवान् असें दान कोणतें?' इन्द्राचा हा प्रश्न ऐकून अत्यंत तेजस्वी अशा बृहस्पतीनें उत्तर केलें, 'देवेन्द्रा, सुवर्णदान, गोदान व भूमिदान हीं देणारा ज्ञानी पुरुष सर्व पापांपासून मुक्त होतो. त्यांतहि भूमिदानाची सर दुसऱ्या कशासहि येणार नाहीं असें मला वाटतें व सुज्ञाचेंहि तसेंच मत आहे. भूमिदान देणारा आपल्यापूर्वींच्या पांच व पुढील सहा अशा अकरा पिढ्यांचें तारण करतो रत्नपूर्ण अशी भूमि जो देतो, तो पापमुक्त होऊन स्वर्गांत श्रेष्ठ पद मिळवितो मध, तूप, दूध, दहीं यांच्या नद्या भूमिदान करणाऱ्याला संतुष्ट करतात. समुद्र वलयांकित पृथ्वी आपल्या शस्त्रानें जिंकून जो तिचें दान करतो त्या राजाची कीर्ति पृथ्वी आहे तों गाईली जाते. रससमृद्ध अशी पवित्र भूमि जो देतो त्याचे स्वर्गादि लोक कधीं नष्ट होत नाहींत. वैभवेच्छु राजानें सत्पात्र ब्राह्मणाला भूमिदान करावें, साप जशी कात टाकून देतो, तसाच भूमिदान देणारा आपली पापें दूर झुगारून देतो. भूमि दिल्यानें नद्या, समुद्र, पर्वत, अरण्यें हीं सारी दिल्याचें श्रेय मिळतें. तसेंच तळीं, पाणपोया, तेलें, नानारस, हेहि दिल्याचें फळ भूमिदानानें मिळतें. वीर्ययुक्त ओषधि, फुलांनीं व फळांनीं भरलेले वृक्ष, ह्यांच्याहि दानाचें फळ भूमिदानानें मिळतें. भूमिदानानें जें फळ मिळतें, तें अग्निष्टोमादि यज्ञांनींहि मिळत नाहीं. भूमि देणारा दहा पिढ्यांचा उद्धार करतो, तर ती लुबाडणारा त्यांचा नाश करतो. एकदां दिलेली भूमि परत घेणारा नरकास जातो. भूमि देतों म्हणून न देणारा, किंवा देऊन परत घेणारा मृत्यूच्या आज्ञेवरून वरुणाच्या पाशांनीं बांधला जातो. अग्निहोत्री, नित्य यज्ञ करणारा, दरिद्री, व अतिथींवर प्रेम करणारा अशा ब्राह्मणाला जो भजतो, तो यमलोकीं जात नाहीं. जो राजा ब्राह्मणाचें ऋण फेडून टाकतो, तो इतर वर्णांच्या कृश व दुर्बळ माणसांचें सहजच रक्षण करतो. दुसऱ्यानें दरिद्री ब्राह्मणाला दिलेल्या भूमीचा आपण कधीं अप-

हार करूं नये. क्षेत्र हरण झाल्यामुळें दीन व दुःखी झालेल्या ब्राह्मणाच्या नेत्रांतून पडणारे अश्रु हरण करणाराच्या तीन पिढ्यांचा नाश करतात. पदच्युत झालेल्या राजाला जो पुनः राज्यावर बसवील, त्याला स्वर्गांतच उत्तम स्थान मिळतें. उंसाचा मळा असलेली, तांदूळ, गहूं यांचें पीक देणारी, गाई घोडे इत्यादिकांनीं भरलेली अशी स्ववीर्यार्जित भूमि देणाराला अक्षय्य असे उत्तम लोक प्राप्त होतात. भूमिदान हें एक यज्ञसत्रच होय. पाण्यांत पडलेला तेलाचा बिन्दु जसा पसरतो, तसें भूमिदान प्रत्येक पिकानें वाढत जातें. रणांगणावर पडलेल्या वीरांना स्वर्ग मिळून दिव्य अप्सरा जशा त्यांच्या सेवेला तत्पर होतात, तसाच प्रकार भूमिदान करणाऱ्याचा होतो. भूमिदान देणाऱ्याला शंख, सिंहासन, छत्र, उत्तम घोडे, सुंदर रथ, सोन्याचे ढीग, जयजयकार, अशीं फलें स्वर्गांत मिळून त्याच्या आज्ञा सर्वांकडून अप्रतिहतपणें पाळल्या जातात. तात्पर्य, भूमिदानासारखें दान नाहीं व मातेसारखा गुरु नाहीं; सत्यासमान धर्म नाहीं व दानासारखा उत्तम सांठा नाहीं. पृथ्वीदानाचा असा महिमा अंगिरसपुत्र बृहस्पतीच्या तोंडून ऐकल्यावर इन्द्रानें अनेक रत्नपूर्ण अशी पृथ्वी त्याला देऊन टाकिली. जो भूमिदानाचा हा इतिहास श्राद्धप्रसंगीं ब्राह्मणांना ऐकवील, त्याला राक्षस व असुर यांपासून उपद्रव होणार नाहीं व पितरांना त्यानें अर्पण केलेल्या वस्तु त्याला अक्षय्य फल देणाऱ्या होतील. म्हणून श्राद्धकाळीं ब्राह्मण भोजन करीत असतां त्यांना हा भूमिदानमहिमा अवश्य ऐकवावा. युधिष्ठिरा, सर्व दानांत श्रेष्ठ असें हें भूमिदान तुला मीं याप्रमाणें सांगितलें. आतां आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे बरें ? १३.१.६२.

---

## अध्याय ६३ वा

[ १. अन्नदानाची प्रशंसा ]

(१) **युधिष्ठिर**—हे भरतकुलश्रेष्ठा, दान देऊं इच्छिणाऱ्या राजानें गुणसंपन्न ब्राह्मणाला कोणतीं दानें या लोकीं द्यावीं बरें ? ते ब्राह्मण कशानें संतुष्ट होतात व संतुष्ट झाले असतां ते काय देतात ? दानाच्या पुण्याचें मोठें फळ काय तें मला सांगा. कोणतें दान इहपरलोकीं फलप्रद होतें, हें मला सर्व ऐकावयास पाहिजे. तरी तें विस्तारानें मला सांगा.

भीष्मः—युधिष्ठिरा, हाच प्रश्न मीं पूर्वी नारदाला केला होता. त्याचें उत्तर त्यानें मला जें दिलें, तेंच मी तुला सांगतों, ऐक. नारद म्हणाला, 'देव आणि ऋषि हे अन्नाची प्रशंसा करतात. सारा लोकव्यवहार व बुद्धि हीं अन्ना-वर प्रतिष्ठित आहेत. अन्नदानासारखें दुसरें दान मागें झालें नाहीं व पुढें होणार नाहीं. म्हणून माणसें विशेषतः अन्नच देऊं इच्छितात. अन्न शक्तिवर्धक असून प्राण अन्नावरच अवलंबून आहेत. सर्व जग अन्नामुळेंच धारण केलें जातें. गृहस्थ, भिक्षु, तापसी यांचे व्यवहार अन्नानेंच होतात. प्राणहि प्रत्यक्ष अन्नापासूनच होतात. कुटुंबवत्सल असून कष्टांत दिवस काढणाऱ्या ब्राह्मणाला उत्कर्षेच्छूनें अन्न द्यावें. मागावयास आलेल्या सत्पात्र ब्राह्मणास जो अन्न देतो तो परलोकीं आपल्यासाठीं निधिच उत्पन्न करून ठेवतो. प्रवासानें थकलेला वृद्ध आणि सत्पात्र असा ब्राह्मण आपल्या घरीं आल्यास वैभवेच्छूनें त्याचा सत्कार करावा. न रागा-वतां व निर्मत्सर बुद्धीनें अन्न देणाराला इहपर लोकींचें सारें सुख मिळतें. घरीं आलेल्या कोणालाहि मग तो चांडाल असो वा कुत्राहि असो अपमान करून घालवूं नये. दान कधीं व्यर्थ जात नाहीं. रस्त्यांत दुःखानें फिरणाऱ्या अनोळखी माणसालाहि जो चांगलें अन्न देईल त्याला फार पुण्य मिळतें. पितर, देव, ऋषि ब्राह्मण व अतिथि यांना जो अन्नानें तृप्त करतो त्यालाहि मोठें पुण्य लागतें. मोठें पातक करूनहि जो विशेषतः ब्राह्मणयाचकाला अन्नदान देईल त्याला पापाची पीडा होत नाहीं. ब्राह्मणाला दिलेलें अन्नदान अक्षय्य होतें, व शूद्राला दिलेलेंहि महाफल देतें. शूद्राला काय किंवा ब्राह्मणाला काय अन्नदान महत्त्वाचें आहे. ब्राह्मण मागत असतां त्याला गोत्र, चरण, शाखा, देश इत्यादि न विचा-रतांच अन्नदान द्यावें. अन्न देणाऱ्या राजाला इहपरलोकीं सर्व इच्छा पुरविणारे अन्नवृक्षच प्राप्त होतात. शेतकरी पावसाकडे डोळे लावून बसतो, त्याप्रमाणें आपला पुत्र नाहीं तर नातू तरी अन्न देईल अशी वाट पितर पहात असतात. ब्राह्मण म्हणजे महाभूत असून तो आपण होऊन अन्न द्या म्हणेल, तर त्याला सकाम किंवा निष्काम बुद्धीनें अन्नदान केल्यानें पुण्य मिळतें; कारण सगळ्या अतिथींत ब्राह्मणच प्रथम देण्यास पात्र आहे. ब्राह्मणांना घरोघर भिक्षा मागून सत्कारपूर्वक जें मिळतें तेंच मोठें फल देणारें होतें. अन्न देणाराला पुढील जन्मीं उत्तम कुळ व उत्तम स्थान मिळतें. नित्य मिष्टान्न देणाराला स्वर्गवास घडतो. अन्न हेंच मनुष्याचे प्राण असल्यामुळें अन्नदान करणारा पशुमान्, पुत्रवान्, धन-वान्, भोगवान्, रूपवान्, व शक्तिमान् होतो. अन्न देणें म्हणजे सर्वच देणें होय

असें म्हणतात. अन्नदात्याला सुख मिळून देवताहि त्याचा सत्कार करतात. ब्राह्मण हा शेतच होय; त्याला दिलेलें दान भूमींत पेरलेल्या बीजाप्रमाणें वाढतें व मोठें फल देतें. अन्नदान देणाराला व घेणाराला प्रत्यक्ष संतोष देतेंच, पण त्याचें अप्रत्यक्ष फलहि असतें. अन्नापासून संतति, व अन्नापासून प्रेमोत्पत्ति होते. धर्म, अर्थ, रोगनाश हे सर्व अन्नानेंच होतात. अन्न हें अमृत होय, असें पूर्वी प्रजापतीनेंच सांगितलें आहे. अन्न न मिळाल्यास शरीरांतील पंच धातु पिचून जातात व अन्नाच्या अभावीं बलिष्ठांचें बळहि नष्ट होतें. देवतापूजन, विवाहादि संस्कार, यज्ञ हे अन्नावांचून होत नाहींत. वेदांचें पर्यवसानहि अन्नांतच होतें. स्थावरजंगम सर्व अन्नमय असल्यामुळें धर्म व अर्थ यांच्या प्राप्तीस्तव अन्नच द्यावें. अन्नदात्याचें बल, ओज, कीर्ति हीं त्रिभुवनांत पसरतात. असें पहा, आकाशांत प्राणपति जो वायु तो मेघांतून जलाचा सांठा करतो. ह्या जलाचा वर्षाव भूमीवर इन्द्र करतो. भूमींतील रस आपल्या किरणांनीं सूर्य वर घेतो, सूर्यापासून वायु त्यांना घेतो व इन्द्र त्यांचा वर्षाव करतो. मेघांचें पाणी पृथ्वीवर पडलें म्हणजे ती स्निग्ध होते व तींत धान्य पिकतें आणि त्या धान्यावर जग जगतें. अन्नापासूनच मांस, मेद, हाडें, शुक्रधातु इत्यादिकांची उत्पत्ति होते व शुक्रापासून प्राणी होतात. अग्नि व सोम त्या शुक्राची उत्पत्ति करून त्याला फुलवितात. याप्रमाणें अन्नापासून सूर्य, वायु, व वीर्य यांची एक राशि होऊन भूतें निर्माण होतात. घरीं आलेल्या याचकाला जो अन्न देतो, तो प्राण्यांना जणूं प्राण व तेजच देतो असें समजावें.'

युधिष्ठिरा, नारदानें मला हें सर्व सांगितल्यापासून मीं नित्य निर्मत्सर बुद्धीनें अन्नदान केलें. तूंहि तसेंच कर. विधिपुरस्सर सत्पात्र ब्राह्मणांना अन्न दिल्यास तुला स्वर्गप्राप्ति होइल. आतां अन्नदात्यांना कोणते लोक मिळतात तें ऐक. त्या महात्म्या दात्यांचीं स्थानें आकाशांत चमकत असतात. तीं चंद्राप्रमाणें स्वच्छ व नानारत्नांनीं सुशोभित असून खांबांवर उभीं असतात. उगवत्या सूर्याप्रमाणें तीं रक्तवर्णाचीं असून कांहीं स्थिर व कांहीं चर असतात. त्यांत शेंकडों जलचर व स्थलचर प्राणी असतात. त्यांत वैडूर्यादि रत्नांचा सूर्यासारखा प्रकाश पडलेला असतो व तीं सोन्यारुप्याचीं बांधलेलीं असतात. वाटेल त्या इच्छा पुरविणारे कल्पवृक्ष त्या स्थानांत असून, त्यांत लहान मोठ्या विहिरी, रस्ते, सभागृहें, सुंदर नादयुक्त सहस्रावधि वाहनें, खाण्यापिण्याच्या पदार्थांच्या डोंगराएवढ्या राशि, वस्त्रें, अलंकार, अशा सर्व वस्तु असून तेथील नद्यांतून दूधच वहातें व

पर्वत अन्नाचे असतात. त्यांतील राजवाडे अभ्रांप्रमाणें शुभ्र व शय्या सोन्या-प्रमाणें लखलखीत असतात. अशीं स्थानें पुण्यवान् अन्नदात्यांना मिळतात. म्हणून, युधिष्ठिरा, तूं अन्नदाता हो. या लोकीं हर प्रयत्नानें अन्नदान करावें. १३. १. ६३.

---

## अध्याय ६४ वा.

[१. कोणत्या नक्षत्रावर कोणतें दान द्यावें, याविषयीं देवकी व नारद यांचा संवाद भीष्म युधिष्ठिरास सांगतो. ]

(१) **युधिष्ठिर:**—आजोबा, अन्नदानाचें महत्त्व व त्याचे प्रकार तुम्हीं सांगितले ते मीं ऐकिले. आतां कोणत्या नक्षत्रावर काय दान द्यावें हें मला सांगा.

**भीष्म:**—युधिष्ठिरा, याविषयीं देवकी आणि महर्षि नारद यांमधील पुरातन संवाद सांगत असतात. एकदां नारद द्वारकेस गेला असतां त्याला देवकीनें हा प्रश्न विचारिला व नारदानें तिला सर्व रीतसर सांगितलें, तेंच मीं तुला सांगतों, ऐक. नारद म्हणाला, 'कृत्तिका नक्षत्रावर तूप व दूध यांनीं युक्त असें अन्न देऊन चांगल्या ब्राह्मणांना तृप्त केल्यास उत्तर लोक मिळतात. रोहिणी नक्षत्रीं दूध, अन्न, पाणी, हीं हरिणाच्या मांसासह ब्राह्मणाला द्यावीं म्हणजे मनुष्य ऋणमुक्त होतो. चंद्र ज्याची देवता आहे त्या मृग नक्षत्रावर दूध देणारी सवत्स गाय दिल्यास मनुष्यलोकाहून उत्तम अशा स्वर्गास जावयास मिळतें. उपास करून आर्द्रा नक्षत्रीं तिळमिश्रित खिचडी द्यावी, म्हणजे मनुष्य संकटां-तून सुटून धारेच्या खडकांतून पार निघाल्यासारखा होतो. पुनर्वसू नक्षत्रीं घारगे तसेंच इतर अन्नदान केलें असतां मनुष्य यशस्वी, रूपसंपन्न, व धान्य-समृद्ध होऊन उत्तम कुळांत जन्मास येतो. पुष्य नक्षत्रीं शुद्ध वा अशुद्ध सोनें दिल्यानें मनुष्य अंधकाराच्या जागींहि चंद्रासमान प्रकाशमान होतो. आश्लेषा नक्षत्रावर जो रुपें किंवा बैल देतो तो सर्व भयापासून मुक्त होऊन समृद्ध होतो. मघांवर तिळांनीं भरलेलीं पात्रें दिल्यानें मनुष्य पुत्रवान् व पशुमान् होऊन इहपरलोकीं सुखी होतो. पूर्वाफल्गुनीवर श्रीखंडपुरीसारखे पदार्थ दिल्यास सौभाग्य मिळतें. उत्तराफल्गुनी नक्षत्रीं दूधतूपमिश्रित भाताचें अन्न दिल्यास स्वर्ग-लोकीं मोठा मान मिळतो. त्या नक्षत्रावर केलेल्या प्रत्येक दानाचेंच फळ फार मोठें

असतें. उपोषण करून हस्त नक्षत्रीं चार हत्तींचा रथ दिल्यानें फार उच्च लोक मिळतात. चित्रा नक्षत्रावर बैल व सुगंधि द्रव्यें दिल्यास देणारा अप्सरांच्या लोकीं जाऊन सुख भोगतो. आपल्याला अत्यंत इष्ट असलेली गोष्ट स्वाती नक्षत्रीं दान दिल्यास या लोकीं कीर्ति मिळून पश्चात् उत्तम लोक मिळतात. विशाखांवर बैल व दुभती गाय तसेंच धान्य भरून वस्त्रांनीं झांकलेले गाडे दिल्यानें पितर व देव यांची तृप्ति होते व मरणोत्तर मनुष्याला मोक्ष मिळतो; त्यावर कधीं संकटें येत नाहींत व तो स्वर्गास जातो. उपास करून अनुराधा नक्षत्रीं उत्तम अन्न व उंची वस्त्रें दान केल्यानें शंभर युगें मानाचा स्वर्गवास मिळतो. ज्येष्ठा नक्षत्रावर ब्राह्मणांना मुळांसकट काळशाक दिल्यास इष्ट वैभव व इष्ट गति प्राप्त होते. मूळ नक्षत्रावर मुळें व फळें दान केल्यानें पितर संतुष्ट होऊन इष्ट गति मिळते. भांडीं भरून दहीं पूर्वाषाढांवर उपोषणपूर्वक उत्तम कुळ व सदाचरण यांनीं संपन्न अशा ब्राह्मणाला दान दिल्यानें मनुष्य पुढील जन्मीं उत्तम कुळांत जन्मून फार मोठ्या गोधनाचा स्वामी होतो. उत्तराषाढा नक्षत्रीं तूपगूळमिश्रित सातूचें अन्न व उदकाचा कुंभ दिल्यानें सर्व इच्छा पूण होतात. मध, तूप यांसह दुधाचें दान अभिजित् नक्षत्रावर केल्यास धर्मनिष्ठ मनुष्य स्वर्गांत महत्त्वाच्या स्थानीं जातो. श्रवण नक्षत्रीं दुसऱ्या वस्त्रासह कांबळें दिल्यानें मनुष्य शुभवाहनांत बसून स्वर्गलोकीं फिरावयास पात्र होतो. धनिष्ठा नक्षत्रावर बैलासह गाडी दिल्यानें या लोकीं वस्त्रें व द्रव्य मिळून पुढील जन्मीं राज्य प्राप्त होतें. चंदनादि सुवासिक वस्तु शततारका नक्षत्रीं दिल्यानें मनुष्याला अप्सरांची प्राप्ति होऊन शाश्वत टिकणारे सुगंध मिळतात. पूर्वाभाद्रपदांवर उडीद दान केल्यानें सर्व उत्तम प्रकारचीं फळें व मरणोत्तर सुख हीं मिळतात. उत्तराभाद्रपदांवर बकऱ्याचें मांस दिल्यानें पितरांचा संतोष होतो व मरणोत्तर मोक्ष मिळतो. रेवतीवर जो कांशाचें भांडें दूध काढण्यासाठीं देऊन गाय दान करतो, त्याच्या सेवेला ती गाय परलोकीं सिद्ध असते. घोडे जोडलेला रथ अश्विनी नक्षत्रीं दान केल्यास राजा पुढील जन्मीं हत्ती, घोडे, रथ, यांनीं संपन्न अशा मोठ्या राजकुळांत जन्मास येऊन पराक्रमी होतो. तिलधेनु करून भरणी नक्षत्रावर तिचें दान केल्यास, पुष्कळ दूध देणाऱ्या गाईंची प्राप्ति होऊन मनुष्याला मरणोत्तर कीर्ति मिळते.'

युधिष्ठिरा, अशा प्रकारें नक्षत्रांवर करावयाच्या विशिष्ट दानांचा विचार नारदानें देवकीला सांगितला व पुढें तो देवकीनें आपल्या सुनांना सांगितला. १३. १. ६४.

---

## अध्याय ६५ वा.

[ १. दानमाहात्म्य ]

**भीष्म:**—जे सोनें देतात, ते साऱ्याच मागण्या पुरवितात असें ब्रह्मदेवाचा पुत्र जो अग्नि त्यानें म्हटलें आहे. हरिश्चंद्रानेंहि म्हटलें आहे, कीं सुवर्णदान हें पवित्र, आयुष्यवर्धक व पितरांना अक्षय करणारें आहे. पेयपदार्थांचें दान मनूनें सर्व दानांत उत्तम म्हटलें असल्यामुळें लहान मोठ्या विहिरी, तळीं इत्यादि पाण्याचीं स्थळें खणावीं. पाण्यानें भरलेल्या विहिरींतून लोक नित्य पाणी नेत असतील, तर ती खणणाराचें अर्धें पाप नष्ट होतें. ज्या पुरुषानें खणलेल्या जलाशयांत गाई, साधु, ब्राह्मण, इत्यादि पाणी पिण्यास जातात, त्याचा सारा वंश त्या पुण्यामुळें तरून जातो. जो आपली विहीर उन्हाळ्यांत नित्य सर्वांना मोकळी ठेवतो, त्याच्यावर मोठें संकट कधींच येत नाहीं. तुपाच्या दानानें बृहस्पति, पूषा, भग, आश्विनीकुमार, अग्नि, या सर्वांचा संतोष होतो. तूप हें महा औषध असून यज्ञांत श्रेष्ठ यज्ञ म्हणजे तुपाचाच होय. रसांतील उत्तम रस व सर्वांत उत्तम फलदायक म्हणजे तूपच आहे. ज्याला आपल्या कामना पूर्ण व्हाव्या असें वाटतें व ज्याला कीर्ति व सुदृढ शरीर पाहिजेत, त्यानें पवित्र मनानें ब्राह्मणाला तूप द्यावें. आश्विन महिन्यांत ब्राह्मणाला तूप देणाराला अश्विनीकुमार देव उत्तम सौंदर्य देतात. तूप घातलेली खीर जो ब्राह्मणाला देतो त्याच्या घरावर राक्षसांची दृष्टि कधींच वळत नाहीं. जो पाण्यानें भरलेल्या घागरी देतो, त्याला तहानेचा त्रास कधीं होत नाहीं. त्याला सर्व इष्ट त्या वस्तु मिळून संकटें त्यावर कधीं येत नाहींत. जो ब्राह्मणांना अशीं भांडीं मोठ्या श्रद्धेनें अर्पण करतो, त्याला त्या ब्राह्मणांच्या तपाचा सहावा भाग मिळतो. सदाचरणी ब्राह्मणांना जो जळाऊ लांकडें स्वयंपाकासाठीं व शीत निवारणासाठीं देतो, त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन सर्व कार्यें तडीस जातात, व तो शत्रूंवर सदा विजय मिळवितो. त्याच्यावर अग्निदेव सदा संतुष्ट असतो, त्याचे गवादि पशु कधीं नष्ट होत नाहींत व त्याला युद्धांत जय मिळतो. जो छत्रदान करतो त्याला संतति व संपत्ति प्राप्त होऊन त्याच्या नेत्रांना कधीं रोग होत नाहीं व यज्ञाचें पुण्य त्याला मिळतें. उन्हाळ्यांत ब्राह्मणाला छत्री देणाराला मानसिक दुःख कधीं होत नाहीं व महा संकटापासूनहि तो मुक्त होतो. सगळ्या दानांमध्यें शकटदान श्रेष्ठ होय, असें भगवान् शांडिल्य ऋषीचें म्हणणें आहे. १३.१.६५.

---

## अध्याय ६६ वा.

[ १ पादत्राणें दिल्याचें फळ. २ तिलदानाचें फल. ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, पाय भाजत असलेल्या ब्राह्मणाला जो पादत्राणें देतो, त्याला कोणतें फळ मिळतें तें मला सांगा.

भीष्म—युधिष्ठिरा, जो मनःपूर्वक ब्राह्मणांना पादत्राणें देतो, त्याच्या मार्गांतील कटकांचें मर्दन होऊन तो सर्व संकटें तरून जातो व शत्रूवर विजय मिळवितो. त्याला खेचरांची सोन्यारुप्यानें मढविलेली शुभ्र गाडी मिळते व उत्तम घोडे जुंपलेली गाडी दान दिल्याचें श्रेय त्याला प्राप्त होतें.

( २ ) युधिष्ठिर—हे पितामहा, तिलदान, भूमिदान, गोदान व अन्नदान यांचें माहात्म्य जें पूर्वीं सांगितलें, तें पुनः एकवार सांगावें.

भीष्म—युधिष्ठिरा, तिलदानाचें फळ काय आहे, तें ऐकून घे व ऐकून तुला जसें युक्त वाटेल तसें कर. पितरांचें उत्तम अन्न म्हणून ब्रह्मदेवानें तीळ उत्पन्न केले. म्हणून तिलदानानें विशेषतः पितर आनंदित होतात. माघमासीं ब्राह्मणांना तिळ देणाराला नरक कधीं दृष्टीसहि पडत नाहीं. तिळांनीं पितृयज्ञ करणाराला सर्व यज्ञ केल्याचें फळ मिळतें. तिलश्राद्ध कधीं निष्कामपणें करूं नये. तीळ महर्षि कश्यपाच्या शरीरापासून निघाले, म्हणून दानवस्तूंत त्यांना दिव्यस्थान मिळालें. ते पुष्टिकारक, सौंदर्यवर्धक व पापनाशक असल्यामुळें त्यांचें दान सर्वदानांत श्रेष्ठ मानिलें आहे. आपस्तंब, शंख, लिखित व गौतम हे सर्व तिलदानानेंच स्वर्गास गेले. स्त्रीसंबंध नियमित करून प्रवृत्तींत रहाणारे ब्राह्मण तिळाचा होम करतील तर गाईच्या तुपाचा होम करण्याचें श्रेय त्यांना मिळेल. सर्व दानांत तिलदान हें श्रेष्ठ असून अक्षय फल देणारें आहे. हविर्द्रव्य संपून गेल्यामुळें कुशिक ऋषीनें पूर्वीं तिळांनींच तिन्ही अग्नींना हवन दिलें व त्यायोगानें उत्तम गति मिळविली. म्हणून तिलदान श्रेष्ठ मानिलें आहे.

आतां देव व ब्रह्मदेव यांचा संवाद ऐक. एकदां देवांना ब्रह्मदेवासह आपण यज्ञ करावा असें वाटलें. तेव्हां ते भूमीवर यज्ञ करावा म्हणून तिची निवड करण्यासाठीं ब्रह्मदेवाकडे आले व शुभ अशी भूमि त्यांनीं त्याजवळ मागितली. ते म्हणाले, 'भगवन्, तूं सर्व भूमि व स्वर्ग यांचा स्वामी असल्यामुळें तुझ्या अनुज्ञेनें आम्हीं यज्ञ करूं इच्छितों. ज्यानें यज्ञ करावयाच्या भूमीविषयीं अनुज्ञा घेतली नाहीं, त्याला यज्ञाचें फल मिळत नाहीं. तूं सर्वांचा स्वामी असल्यामुळें

तूं आम्हाला भूमीची अनुज्ञा दे.' ब्रह्मदेवानें उत्तर केलें, 'देव हो, तुम्हीं जेथें यज्ञ करूं म्हणतां, ती भूमि मी तुम्हांला देतों.' देव म्हणाले, 'हे भगवन्, आतां आम्हीं कृतकृत्य झालों. आतां पुरेशी दक्षिणा देऊन आम्ही यज्ञ करतों. या प्रदेशांत मुनींची वसति नित्य असतेच.' त्याप्रमाणें देवांच्या निमंत्रणावरून अगस्त्य, कण्व, भृगु, अत्रि, वृषाकपि, असित व देवल हे ऋषि देवांच्या यज्ञासाठीं आले. मग देवांनीं यज्ञस्वरूपी अच्युताची पूजा केली व हिमालय पर्वतावर योग्य काळीं त्या यज्ञाची समाप्तीहि केली. नंतर यज्ञाचा सहावा हिस्सा म्हणून त्यांनीं भूमिदानहि केलें. म्हणून वीतभर चांगली जमीन जो दान देतो, त्याला संकटें बाधत नाहींत व कठीण प्रसंग त्यावर येतहि नाहींत. थंडी, वारा व ऊन यांपासून रक्षण करणारी अशी नीट सजविलेली गृहभूमि ब्राह्मणाला दिल्यास देवलोकाची प्राप्ति होऊन तें पुण्य संपल्यावर देखील मनुष्य तेथून हालत नाहीं व इन्द्रासह तेथें आनंदानें रहातो. रहाण्याचें घर दिल्यानें मनुष्याला स्वर्गांत मोठें स्थान मिळतें. अध्यापककुलांत जन्मास आलेला व जितेंद्रिय असा श्रोत्रिय ज्याच्या घरांत राहील, त्याला उच्चलोकाची प्राप्ति होते. गाईंना रहाण्याची थंडीवाऱ्यापासून संरक्षण करणारी जागा दिल्यानें सात पिढ्यांपर्यंत कुळाचा उद्धार होतो. शेतजमीन दिल्यानें उत्तम प्रकारचें वैभव मिळतें. रत्नयुक्त भूमि दिल्यास वंशवृद्धि होते. पण नापीक व जळकट भूमि कधीं दान देऊं नये. तशीच स्मशानाजवळची किंवा दुष्टांनीं ज्यांत वास केला आहे अशीहि भूमि देऊं नये. दुसऱ्याच्या भूमींत श्राद्ध केल्यानें, ती भूमि तसेंच तें श्राद्ध यांचा पितर नाश करतात, म्हणून थोडी कां होईना, पण भूमि विकत घेऊन सुज्ञ माणसानें तींत पितरांना पिंड द्यावा, म्हणजे त्याचें फळ शाश्वत होतें. अरण्य, पर्वत, नद्या, तीर्थें, हीं कोणाच्या स्वामित्वाचीं नाहींत, तेथें श्राद्ध केलें तर चालतें.' युधिष्ठिरा, असें हें भूमिदानाचें फल ब्रह्मदेवानें सांगितलें आहे.

आतां तुला गोदानाचें फळ सांगतों. गाई या सर्व तपस्व्यांपेक्षांहि मोठ्या असल्यामुळें महेश्वर देवानें त्यांच्या संगतींत राहून तप केलें. त्या चंद्रासह ब्रह्मलोकीं रहातात. त्यांच्या योगानें ब्रह्मर्षि व सिद्ध उत्तम गति मिळविण्यास इच्छितात. गाई दूध, तूप, दहीं, शेण, चामडें, शिंगें, हाडें व केश या सर्वांनीं लोकांवर उपकार करितात. त्यांना थंडी ऊन लागत नाहीं. त्या नित्य काम करीत असतात. पावसांत देखील त्यांना दुःख होत नाहीं. त्या ब्राह्मणासह उच्च

पदाला जात असल्यामुळें गोब्राह्मण एकच असें ज्ञानी पुरुष म्हणतात. रन्तिदेवाच्या यज्ञामध्यें गाईंचा पशु म्हणून उपयोग करण्यांत आला; त्यांच्या चामड्यांच्या राशींवरून तेथील नदीला चर्मण्वती नांव मिळालें. नंतर त्यांची पशुत्वापासून मुक्तता होऊन दान देण्याकडे त्यांचा उपयोग होऊं लागला. अशा त्या गाई जो उत्तम ब्राह्मणांना देईल, तो मोठ्याहि संकटांतून मुक्त होईल. सहस्र गाई देणारा मरणोत्तर नरकास जात नाहीं, व त्याला सर्वत्र विजय मिळतो. गाईचें दूध म्हणजे अमृत होय असें इन्द्रानें म्हटलें असून गाय देणारा अमृतच देतो असें समजावें. वेदवेत्ते पुरुष गाईचें दूध म्हणजे अग्नीचें अव्यय होमद्रव्य होय असें समजतात; म्हणून गाय दिल्यानें होमद्रव्य दिल्याचें श्रेय मिळतें. गाईचा पति जो बैल तो मूर्तिमान् स्वर्गच होय; म्हणून गुणवान् ब्राह्मणाला त्याचें दान करणारास स्वर्गांत उच्चस्थान मिळतें. गाई म्हणजे प्राण्यांचे प्राण होत म्हणून गाय देणारा प्राणदानच करतो. गाई सर्व प्राण्यांचा आश्रय होत, असें वेदवेत्ते म्हणतात; म्हणून गोदान करणारा आश्रयदान देतो असें समजावें. युधिष्ठिरा, कसायाला, नास्तिकाला, गाईवर उपजीविका करणाराला गाय कधीं देऊं नये. असल्या माणसांना गाय देणारा अक्षय नरकांत जातो, असें महर्षींनीं सांगितलें आहे. ब्राह्मणाला गाय द्यावयाची ती कृश, वत्सहीन, वांझ, रोगी, अवयवहीन, थकून गेलेली अशी नसावी. दहा सहस्र गाई देणारा इन्द्रासह स्वर्गी आनंद पावतो व एक लाख गाई देणाऱ्याला अक्षय असे लोक मिळतात. याप्रमाणें, युधिष्ठिरा, तुला तिलदान व गोदान यांचा महिमा सांगितला, तसा भूमिदानाचाहि सांगितला. आतां अन्नदानाचा सांगतों, ऐक.

युधिष्ठिरा, अन्नदान हें मुख्य सांगितलें आहे. अन्नदानानेंच रन्तिदेवाला स्वर्ग मिळाला. थकलेल्या भुकेलेल्याला जो राजा अन्न देतो, तो ब्रह्मलोकाला जातो. अन्नदानानें जें श्रेय मिळतें, तें सोनें, वस्त्रें किंवा इतर कोणत्याहि वस्तु दिल्यानें मिळत नाहीं. अन्न हें आद्यद्रव्य असून, अन्नच मोठी संपत्ति होय. अन्नापासून प्राण, तेज, वीर्य, बल हीं उत्पन्न होत असल्यामुळें जो मनःपूर्वक अन्नदान करतो, तो पराशरानें म्हटल्याप्रमाणें संकटांत सांपडत नाहीं. विधियुक्त देवपूजा करून अन्न निवेदन करावें. युधिष्ठिरा, जें अन्न मनुष्य स्वतः खातो, तेंच त्याच्या देवतांचेंहि होय. कार्तिकाच्या शुद्ध पक्षांत अन्नदान करणारा संकटें तरून मरणोत्तर मोक्ष पावतो. आपण खाण्यापूर्वी जो शांतचित्तानें अतिथीला अन्न देतो, त्याला ब्रह्मवेत्त्यांना मिळणारे लोक मिळतात. अन्नदात्यावर मोठें संकट आलें तरी

तो तें तरून जातो. असें हें अन्न, तिळ, भूमि व गाई यांच्या दानाचें फळ सांगितलें आहे. १३. १. ६६.

---

## अध्याय ६७ वा.

[ १ जलदानाचें माहात्म्य ]

**युधिष्ठिर**:—आजोबा, तुम्हीं सांगितलेलीं दानाचीं फलें ऐकिलीं. त्यांत अन्नदान विशेष स्तुत्य होय. आतां जलदानाचें काय फळ आहे तें विस्तारानें ऐकण्याची इच्छा आहे.

**भीष्म**:—युधिष्ठिरा, सांगतों, ऐक. मनुष्य जर ब्राह्मणाला अन्नदान व जलदान करून नंतर आपण अन्न घेईल, तर त्या दानाहून मोठें कांहीं नाहीं असें माझें मत आहे. ब्रह्मदेव व सावित्री यांचेंहि तसेंच मत आहे. लोमश ऋषीनेंहि म्हटलें आहे कीं, प्राणदानाहून श्रेष्ठ कांहीं नाहीं व तो प्राण अन्नापासूनच होत असल्यामुळें अन्नदान म्हणजे प्राणदानच होय. ब्राह्मणाला अन्नदान केल्यानें, शिबिराजाला पूर्वी कपोताला प्राणदान दिल्यानें जी गति मिळाली, तीच गति दात्याला मिळते. आम्हीं तर ऐकिलें आहे कीं प्राणदान करणाराला अन्नदानापेक्षांहि उच्च गति मिळते. अन्न हें पुनः पाण्यापासूनच होत असतें. पाण्याशिवाय कसलीच उत्पत्ति नाहीं. ग्रहगणांचा नायक जो चंद्र तोहि पाण्यापासून झालेला आहे. अमृत, सुधा, औषधिलता, अन्नें, हीं जलापासून होतात व जलांपासून प्राण्यांचे प्राणहि होतात. देवांचें अन्न जसें अमृत, नागाचें सुधा, पितरांचें स्वधा, पशूंचें झाडपाला, तसेंच मनुष्याचे प्राण अन्नावर असून तीं सारीं अन्नें पाण्याच्या योगानें होतात. म्हणून पाण्याच्या दानाहून मोठें कांहीं नाहीं. यास्तव मनुष्याला उत्कर्ष पाहिजे असेल, तर त्यानें जलदान करावें. जलदान हें धन्यता देणारें, कीर्तिवर्धक, व आयुष्यवर्धक असून त्याच्या योगानें शत्रूंवरहि वर्चस्व मिळतें. जलदात्याच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन त्याला अक्षय कीर्ति मिळते व तो पापमुक्त होऊन मरणोत्तर अक्षय्य सुखाचा धनी होतो. १३. १. ६७.

---

## अध्याय ६८ वा.

[ १. तिलदान व दीपदान यांच्या महात्म्याविषयीं ब्राह्मण व यम यांचा संवाद. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—तीळ, दीप, अन्न व वस्त्र यांच्या दानांचें फळ कसें असतें तें मला पुनः सांगा.

भीष्मः—युधिष्ठिरा, याविषयीं ब्राह्मण आणि यम यांमधील पुरातन संवाद प्रसिद्ध आहे. मध्य देशांत गंगा-यमुनांच्या मध्यें यामुन पर्वताच्या पायथ्याशीं पर्णशाला नांवाच्या ब्राह्मण वस्तीचा एक रमणीय गांव होता. तेथें पुष्कळ विद्वान् ब्राह्मण रहात असत. एकदां यम आपल्या कृष्णवस्त्रधारी लाल डोळयांच्या दूताला म्हणाला, 'अरे, तूं त्या ब्राह्मण गांवीं जा आणि शर्मी नांवाच्या अगस्त्य गोत्रांतील विद्वान् अध्यापक वृत्तीच्या शांत ब्राह्मणाला घेऊन ये. पण त्याच्याच सारखा व त्याच गोत्रांतील दुसरा त्याच्या जवळच असतो, त्याला आणूं नको. शर्मीलाच आण, त्याची पूजा करावयाची आहे. तो दूत त्याप्रमाणें गेला, पण त्यानें यमाच्या सांगण्याच्या बरोबर उलट केलें; म्हणजे यमानें ज्याला आणूं नको म्हणून म्हटलें होतें त्यालाच तो घेऊन आला. तो आल्यावर यमानें उठून त्याची पूजा केली व दूताला सांगितलें, 'याला परत घेऊन जा व दुसऱ्याला घेऊन ये.' यम असें म्हणाला असतां अध्ययनामुळें कंटाळून गेलेला तो ब्राह्मण त्याला म्हणाला, 'माझ्या आयुष्याचा जो काळ राहिलेला असेल, तो मीं येथें यमलोकींच राहून कंठीन.' यमानें उत्तर केलें, 'मला कालाचें योग्य प्रमाण ठाऊक नाहीं. जो धर्माचरण करतो त्यालाच मीं जाणतों. ब्राह्मणा, तरी तूं आपल्या घरीं परत जा. मीं तुझ्यासाठीं आणखी काय करूं तें सांग.' ब्राह्मण म्हणाला, 'काय केलें असतां फार मोठें पुण्य घडतें, तें मला सांग.' तूंच सगळ्या गोष्टींत त्रिभुवनाला प्रमाण आहेस.' यम म्हणाला, 'ऐक, दानाचा उत्तम विधि तुला सांगतों. तीळ हेंच फार श्रेष्ठ दान असून शाश्वत पुण्य देणारें आहे. ब्राह्मणा, यथाशक्ति तीळच दान द्यावे. त्याचें दान नित्य करीत गेल्यास, सर्व इच्छा पूर्ण होतात. श्राद्धप्रसंगीं तिळांचेंच महत्त्व सांगितलें आहे, तर विधिपूर्वक तीळच ब्राह्मणाला देत जा. विशेषतः वैशाखी पौर्णिमेला ब्राह्मणांना तीळ द्यावे व भक्षणहि करावे. त्यांनींच सर्व गोष्टींना पूर्णता द्यावी. कल्याणेच्छूनें आपल्या घरीं नित्य असें करावें. त्याचप्रमाणें पाणीहि नित्य दान द्यावें व प्यावें. तसेंच विहिरी, पुष्करिणी तळीं हीं खणावीं. पाणी या लोकीं खरोखर दुर्लभ होय. म्हणून जलदान नित्य करावें, तेंच सर्वश्रेष्ठ दान आहे. त्यासाठीं पाणपोया स्थापाव्या. कोणी अन्न खाल्यावर त्याला पाणी अवश्य द्यावें.' यमानें याप्रमाणें सांगितल्यावर दूतानें त्या ब्राह्मणाला परत त्याच्या घरीं नेलें आणि शर्मीला घेऊन तो पुनः यमाकडे गेला. यमानें शर्मीची योग्य प्रकारें पूजा करून त्याची

पाठवणी करून दिली. त्याला पाठवून देतांना यमानें त्यालाहि सर्व उपदेश केला व तदनुसार परत आल्यावर ब्राह्मणानेंहि तसेंच आचरण ठेविलें. पितरांच्या हितासाठीं यमानें दीपपानहि सांगितलें, म्हणून नित्य दीपदान केल्यास पितरांचा उद्धार होतो. ठिकठिकाणीं उजेडासाठीं दीप लावावे. त्यामुळें देव, पितर व आपण यांची दृष्टि मोठी होते. युधिष्ठिरा, रत्नदानाचेंहि असेंच महापुण्य सांगितलें आहे. त्यांची विक्री करून यज्ञ करणाऱ्या ब्राह्मणास अभय मिळतें. आपल्याला मिळालेलें रत्न दुसऱ्यास दिलें असतां देणाराला व घेणारालाहि अक्षय्य फल मिळतें. योग्य मार्गानें वागून जर चांगल्या सत्पात्र ब्राह्मणाला दान दिलें, तर त्या उभयतांनाहि उत्तम धर्म घडतो, असें धर्मवेत्त्या मनूनें सांगितलें आहे. आपल्या स्त्रीच्या ठिकाणीं संतुष्ट राहून जो वस्त्रदान करतो, त्याला उत्तम वस्त्रें व वेष प्राप्त होतात. युधिष्ठिरा, वेदाच्या आधारानें गाई, सोनें व तीळ यांचें माहात्म्य मीं तुला आतांपर्यंत विविध प्रकारें सांगितलें. असो; मनुष्यानें विवाह करून पुत्र उत्पन्न करावे. पुत्रलाभ हा सर्व लाभांत वरिष्ठ आहे. १३. १. ६८.

---

## अध्याय ६९ वा.

[ १. गाई व भूमि यांच्या दानाचें महत्त्व पुढें चालू ]

**युधिष्ठिर**:—आजोबा, दानांचे विधि मला पुनः एकदां सांगा व विशेषतः भूमिदानाचा प्रकार कथन करा. क्षत्रियानें याज्ञिक ब्राह्मणाला भूमि द्यावी व ब्राह्मणानें ती रीतसर घ्यावी. तिचें दान करण्याचा दुसऱ्याला अधिकार नाहीं. तेव्हां फलेच्छु अशा सर्व वर्णांच्या माणसांनीं काय देणें योग्य आहे किंवा वेदांत त्यासंबंधानें काय सांगितलें आहे, हें मला नीट समजावून द्या.

**भीष्म**—युधिष्ठिरा, गाय, पृथ्वी व सरस्वती यांना गो हें नांव साधारणच असून त्यांच्या दानाचें फलहि एकच आहे. त्यांचें दान केल्यानें सर्व कामना पूर्ण होतात. जो शिष्याला धर्मवर्धक अशी वेदवाणी पढवितो, त्याला भूमि व गाय यांच्या दानाचें श्रेय मिळतें. गाईच्या दानाचें माहात्म्य तसेंच सांगितलें आहे. त्यांच्यापेक्षां अधिक चांगलें असें देण्यासारखें कांहीं नाहीं. त्याच्या दानाचें फळ लगेच सहज रीतीनें मिळतें. त्या सर्व सुख देणाऱ्या व सर्वांना मातेसमान असल्यामुळें उत्कर्षेच्छूंनीं त्यांना नित्य प्रदक्षिणा करून पुढें जावें. त्यांना कधीं

लाथ मारूं नये. त्या मंगलाचें माहेरघर असून सदैव पूज्य आहेत. यज्ञकर्म प्रसंगीं देवांनींहि बैलांना चाबकानें हांकिलें होतें, म्हणून तसें करण्यास माणसांनाहि हरकत नाहीं, पण इतर प्रसंगीं त्यांना ताडण करूं नये. गाई चरत असतां किंवा स्वस्थ बसल्या असतां त्यांना कधीं सुज्ञ पुरुषानें त्रास देऊं नये. तहान लागून त्या पाणी शोधीत असतां त्यांना त्रास दिल्यास त्या मनुष्याचा बांधवांसह नाश करितील. त्यांच्या शेणानें, पितृस्थानें व देवालयेंहि जर पवित्र होतात, तर त्यांच्याहून अधिक पवित्र काय असणार? तिचें दूध, दहीं इत्यादि कांहीं न खातां एक वर्ष जर दुसऱ्याच्या गाईला मूठमूठ गवत चारिलें, तर त्या व्रतानें सर्व कामनांची सिद्धि होते. तसें करणारास पुत्र, यश व संपत्ति प्राप्त होतात, त्याचें पाप नाहींसें होतें व दुःस्वप्नाची बाधा त्याला होत नाहीं.

युधिष्ठिर:—कोणत्या लक्षणांनीं युक्त असलेल्या गाई दानास योग्य होत व कोणत्या दानास वर्ज कराव्या, तसेंच त्या कोणाला द्याव्या व कोणाला देऊं नयेत बरें?

भीष्म:—युधिष्ठिरा, दुराचरणी, पापी, लोभी, असत्यभाषणी व कधीं हव्यकव्य न करणाऱ्या ब्राह्मणाला गाय देऊं नये. ज्याला पुष्कळ मुलें आहेत, अशा अग्निहोत्री याज्ञिक ब्राह्मणाला दहा गाई देणाराला फार उत्तम लोक मिळतात. गाई घेणारा जो धर्म करतो, त्या सर्वांचा अंश दात्यालाहि मिळतो. कारण दाता त्या धर्माला पर्यायानें कारणीभूत होत असतो. जो जन्म देतो, जो भयापासून रक्षण करतो व जो पोषण करतो ते तिघेहि पितृसमान आहेत. गुरूच्या शुश्रूषेनें पाप नष्ट होतें, त्याला मान दिल्यानें मोठी कीर्ति मिळते, तीन पुत्र झाले म्हणजे निपुत्रिकपणा जातो व दहा गाई असल्या कीं निर्वाहाची वाण नष्ट होते. वेदांतज्ञानांत निष्णात, बहुश्रुत, सुज्ञ, इंद्रियनिग्रही, शास्त्रप्रमाणें वागणारा, अनासक्त, सर्वांशीं गोड बोलणारा, भुकेनें व्याकुळ झाला असतांहि वाईट कृत्य न करणारा, शांत स्वभावाचा व अतिथीचा सत्कार करणारा अशा कुटुंबवत्सल ब्राह्मणालाच उदरनिर्वाहाचें साधन द्यावें. सत्पात्रीं दान दिल्याचें जितकें श्रेय आहे, तितकेंच पाप ब्राह्मणाचें द्रव्य लुबाडण्यांत आहे. कांहीं झालें तरी ब्राह्मणाचें द्रव्य व स्त्रिया यांपासून अगदीं दूर रहावें. १३. १. ६९.

---

## अध्याय ७० वा.

[ १. ब्रह्मस्वाच्या अपहाराचें फळ; नृगराजाची कथा ]

( १ ) भीष्म :—युधिष्ठिरा, ब्राह्मणाची वस्तु लुबाडल्यामुळें नृगराजाला कसें मोठें संकट सोसावें लागलें याविषयीं साधु गोष्ट सांगत असतात. द्वारका नगरींत शिरतांना एक मोठी जुनी विहीर लागते, ती गवत व वेली यांनीं अगदीं भरून गेलेली असे. त्या विहिरींतून पाणी काढण्याचा ते लोक मोठे श्रम घेऊन प्रयत्न करीत असतां त्यांना तींत एक मोठा सरडा आढळून आला. तेव्हां त्या सर्वांनीं त्याला बाहेर काढण्याचा यत्न चालविला. त्या अवाढव्य सरड्याचें शरीर त्यांनीं दोऱ्या, चामड्याचे पट्टे यांनीं बांधून तें वर ओढण्याचा प्रयत्न केला, पण त्यांना तें जमलें नाहीं. म्हणून ती मंडळी कृष्णाकडे गेली. विहिरींतील सारी मोकळी जागा त्या सरड्यानें व्यापून टाकिली होती. तेव्हां तो कांहीं आम्हांला काढतां येत नाहीं असें त्यांनीं कृष्णाला सांगितलें. मग कृष्ण तेथें गेला व त्यानें सरड्याला वर काढून त्याचा इतिहास त्याला विचारिला. तेव्हां तो म्हणाला, 'मीं नृग नांवाचा राजा असून पूर्वीं एक सहस्र यज्ञ केले.' कृष्ण म्हणाला, 'हें तुझें कर्म तर पवित्र होतें. तें कांहीं पाप नव्हे. मग तुला ही दुर्गति कशी मिळाली तें सांग. राजा, तूं वेळोवेळीं शेंकडोंच काय, पण सहस्रावधि व लक्षावधि गाई पूर्वीं ब्राह्मणांना दिल्या होत्या असें आम्हीं ऐकिलें आहे. तें तुझें पुण्यकर्म गेलें तरी कोठें?' हा प्रश्न ऐकून नृग म्हणाला, 'एक अग्निहोत्री ब्राह्मण परगांवीं गेला असतां त्याची गाय चुकून माझ्या गाईंच्या कळपांत आली. तेव्हां सहस्रावधि गाईंत तीहि आपलीच असेल असें माझ्या गोंवाऱ्यांनीं मानिलें. पुढें पुढील जन्मासाठीं धर्म करून ठेवावा या इच्छेनें मीं ती गाय एका ब्राह्मणाला दान दिली. अग्निहोत्री ब्राह्मण घरीं आल्यावर गाय पाहूं लागला, तों ती त्या दुसऱ्याच्या घरीं त्याला आढळली व तो "ही गाय माझी आहे" असें त्याला म्हणूं लागला. तेव्हां त्या दोघांत मोठा तंटा लागला; तो तोडण्यासाठीं ते मजकडे आले आणि म्हणाले, "राजा, तूंच गाय दिली, आणि तूंच ती परत घेतोस!" तेव्हां चूक झालेली आहे असें पाहून त्या गाईच्या विनियमांत दहा सहस्र गाई अग्निहोत्र्याला देण्यास मी सिद्ध झालों. तेव्हां "ही माझ्या घरीं नीट नांदलेली दुधाळ, शांत व प्रेमळ गाय मीं देणार नाहीं. माझ्या मुलाला मातेचें दूध सुटल्यावर हिनेंच संभाळलें आहे,"

असें म्हणून तो रागानें निघून गेला. मग मीं दुसऱ्या ब्राह्मणाला तशीच विनंति केली कीं, या गाईच्या विनिमयांत दहासहस्र गाई घे. तेव्हां तोहि ऐकेना. "तीच गाय माझी मला लवकर द्या" असें तो आग्रहानें म्हणाला. मीं त्याला गाईसाठीं सोनें, रुपें, घोडे, रथ, इत्यादि देऊं लागलों, पण त्यांतील तो कांहीं घेईना. असें झालें असतां कालक्रमानुसार मी पितृलोकीं येऊन यमराजापाशीं उभा राहिलों. यमानें माझा सत्कार करून मला म्हटलें, "राजा, तुझ्या पुण्य-कर्मांना तर सीमाच नाहीं. एक मात्र तुझ्या नांवावर पाप आहे, व तेंहि अज्ञानामुळें तुझ्याकडून घडलें. तेव्हां आधीं पुण्य भोगावयाचें असेल तर तसें कर, नाहींतर त्या पापाचें प्रायश्चित्त करून मग पुण्यफल भोग, तुझ्या इच्छेप्रमाणें कर. मीं रक्षण करीन असें तूं म्हणून तसें तूं केलें नाहींस. तेव्हां असत्य प्रतिज्ञा व ब्राह्मणाच्या वस्तूचा अपहार असा तुझा दुहेरी अपराध आहे." यमाच्या भाषणाला मीं उत्तर दिलें कीं, "प्रथम मीं पापाचें प्रायश्चित्त करतों आणि मग पुण्यफल भोगीन." असें म्हणतांच मीं सरडा होऊन पृथ्वीवर पडलों. पडल्यावर मला यमाचे शब्द ऐकूं आले कीं, "सहस्र वर्षें लोटल्यावर तुझें पाप नष्ट झालें कीं कृष्ण तुझा उद्धार करील व मग तूं आपल्या पुण्यानें मिळविलेल्या लोकीं जाशील." लगेच मीं खालीं डोकें करून मनुष्येतर योनींत विहिरींत पडलों, पण माझी स्मृति नष्ट झाली नाहीं. त्या मला आज तूं तारिलें. तपोबलावांचून सारें व्यर्थ आहे. कृष्णा, आतां मला अनुज्ञा दे, मीं स्वर्गास जातों.

असें म्हणून व कृष्णाची नमस्कारपूर्वक अनुज्ञा घेऊन नृग राजा दिव्य मार्गानें स्वर्गीं गेला. युधिष्ठिरा, नृग स्वर्गीं गेला, तेव्हां कृष्णानें पुढील वाक्य म्हटलें, 'जाणत्या पुरुषानें ब्राह्मणाच्या वस्तूच्या अपहार करूं नये. ब्राह्मणाच्या गाईच्या अपहारामुळें नृगाची जशी अवस्था झाली, तशी कोणत्याहि ब्राह्मणस्वाच्या अप-हारामुळें कोणाचीहि होते." असो. युधिष्ठिरा, सज्जनांचा संपर्क कधीं निष्फळ होत नाहीं. पहा, साधूंच्या संगतीमुळें नृग राजाचा नरकापासून उद्धार झाला. दानाच्या फळाप्रमाणें द्रोहाचेंहि फळ असतें. म्हणून, युधिष्ठिरा, गाईचा अपहार वर्ज करावा. १३. १. ७०.

---

## अध्याय ७१ वा.

[ १. गाईच्या दानांच्या फलाचें विस्तृत वर्णन; उद्दालकि व नाचिकेत यांचा संवाद.]

(१) युधिष्ठिर—हे निष्पाप भीष्म पितामहा, गाई दिल्यानें काय फळ मिळतें, तें मला सविस्तर सांगा. तुम्हीं किती सांगितलें तरी माझी तृप्तिच होत नाहीं.

भीष्म :—याविषयीं उद्दालकि ऋषि व नाचिकेत यांमध्यें पूर्वी झालेला संवाद सांगण्यांत येतो. उद्दालकि ऋषीनें व्रतदीक्षा घेऊन आपल्या नाचिकेतनामक पुत्राला आपली शुश्रूषा करावयास सांगितलें. व्रत समाप्त झाल्यावर तो नाचिकेताला म्हणाला, 'बाळा, मी नदीवर स्नानांत व वेदपठणांत दंग झालों असतां समिधा, दर्भ, फुलें, कलश व भोजनसाहित्य तेथेंच विसरून आलों, तरी नदीवरून तेवढें घेऊन ये'. नाचिकेत नदीवर गेला, पण त्या सर्व वस्तु प्रवाहाबरोबर वाहून गेल्यामुळें त्याला सांपडल्या नाहींत. घरीं येऊन, 'तेथें कांहीं नाहीं असें त्यानें पित्याला सांगितलें. तेव्हां भूक, तहान व श्रम यांमुळें व्याकुळ होऊन गेल्यामुळें उद्दालकीला राग आला व त्या तपस्व्यानें 'जा एकदांचा यमाकडे', असें नाचिकेताला म्हटलें. ते कठोर शब्द ऐकून नाचिकेताला दुःख झालें. तो हात जोडून 'कृपा करा' असें उद्दालकीला म्हणतो आहे तोंच त्याचा प्राण जाऊन तो भूमीवर पडला. त्याला पडलेला पहातांच उद्दालकि सुद्धां दुःखविव्हळ होऊन 'काय मी हें केलें?'' असें म्हणत मूर्च्छित झाला. सावध झाल्यावर पुत्रासाठीं तो शोक करीत असतां उरलेला दिवस निघून गेला व भयंकर रात्र पडली. पित्याच्या अश्रुपातानें नाचिकेताचें अंग रेशमी आंथरुणावर भिजून गेलें, जणूं काय वाळूं लागलेलें शेतच पावसानें भिजविलें. थोड्या वेळानें मृत नाचिकेत सावध झाला, व झोपेंतून जागें व्हावें तसें होऊन दिव्य गंधांनीं युक्त होत्साता उठून बसला. तेव्हां उद्दालकि त्याला म्हणाला, 'अरे बाळा, तूं आपल्या पुण्य कर्मानें उत्तम लोक जिंकलेस. सुदैवानें मला तूं पुनः मिळाला आहेस. पण हें तुझें शरीर दिव्य दिसतें, मानुष नव्हे.' पित्याचें भाषण ऐकून सर्व गोष्टी प्रत्यक्ष पाहून आलेल्या नाचिकेतानें त्या महर्षीच्या समुदायांत त्याला सारें वृत्त सांगितलें.

तो म्हणाला, 'बाबा, मीं तुमच्या आज्ञेप्रमाणें तत्काल निघालों, तो सुंदर प्रभायुक्त अशा विशाल यमपुरीस जाऊन पोंचलों असतां तेथें सहस्र योजनें विस्तारलेली अशी सोनेरी यमसभा मला दिसली. समोरून येणाऱ्या मला पहा-

तांच 'याला आसन द्या' अशी आज्ञा यमानें सेवकांना केली आणि तुमच्यासाठीं म्हणून माझी पूजाहि केली. तेथील सभासद माझा बहुमान करून माझ्या भोंवतीं उभे राहिले असतां मीं म्हटलें, 'हे धर्मराजा, मीं तुझ्या प्रदेशांत आलों आहें. तरी मी ज्या स्थानाला पात्र असेन तेथें मला पाठव.' यम मला म्हणाला, 'बाळा, तूं मेलेला नाहींस. तुझ्या पित्यानें "यमाला भेट" एवढेंच सांगितलें.' प्रदीप्त अग्नीप्रमाणें तेजस्वी अशा त्याचे शब्द अन्यथा होणें शक्य नाहीं. तूं मला भेटलास, आतां तूं परत जा. तुझा पिता तुझ्यासाठीं शोक करीत आहे. तूं माझा आवडता पाहुणा असल्यामुळें मीं तुला तुझ्या मनांत कांहीं असेल तर तेंहि देणार आहें. तर तुझी काय इच्छा आहे बोल.'

यमाच्या या बोलण्यावर मीं उत्तर दिलें, 'हे यमराजा, तुझ्या प्रांतांत मी आलों असून येथून माघारें जाणें शक्य नाहीं. तेव्हां तूं मला जर वरदानास पात्र समजत असशील, तर पुण्यवानांना मिळणारे ते समृद्धलोक पहाण्याची माझी इच्छा आहे. मीं असें म्हणतांच सुंदर घोडे जुंपलेल्या रथांत बसवून त्यानें मला आपल्या लोकांतील पुण्यवंतांना मिळणारीं स्थानें दाखविलीं. बाबा, मीं तेथें सोन्याचीं रत्नजडित अनेक घरें पाहिलीं. तीं चंद्रमंडलाप्रमाणें शुभ्र असून त्यांना घुंघुरांच्या जाळ्या लाविल्या होत्या. तीं अनेक मजल्यांचीं असून त्यांत ठिकठिकाणीं पाण्याच्या टांक्या व उपवनें दिसत होतीं. खाण्यापिण्याच्या पदार्थांच्या डोंगराएवढ्या राशी, वस्त्रें, शय्या, फळांनीं भरलेले वृक्ष, दुधातुपाच्या नद्या, रस्ते, सभागृहें, विहिरी, टांक्या, तुतारऱ्या लावलेले रथ, असे अनेक पदार्थ भरपूर असलेलीं यमपुरींतील ठिकाणें मीं पाहिलीं. तीं सर्व पाहून 'या दुधातुपानें नित्य वहाणाऱ्या नद्या कोणाच्या उपभोगासाठीं आहेत?' असें यमाला मीं विचारिलें. यमानें उत्तर केलें, 'ज्यांनीं गोरसदान केलें आहे, त्या सज्जनांसाठीं त्या आहेत. गाई देण्यांत आनंद मानणाऱ्या लोकांसाठीं सुखी लोकांनीं भरलेलीं दुसरींहि शाश्वत स्थळें येथें आहेत. पण, हे ब्राह्मणा, केवळ गाई देणें एवढ्याचेंच कांहीं महत्त्व नाहीं. त्यांत सत्पात्रता, योग्य काळ, गाईचा प्रकार आणि शास्त्रसंमत विधि यांचाहि विचार असतो. या गोष्टी जाणून योग्य प्रकारें दान करावें. वेदाध्ययन करणारा, तपस्वी, याज्ञिक असा ब्राह्मण गाय देण्यास पात्र आहे. संकटांतून सोडविलेल्या व पोषणासाठीं आलेल्या अशा गाई दानयोग्य होत. तीन दिवस केवळ पाण्यावर राहून व भूमीवर शयन करून खाऊन पिऊन तृप्त झालेल्या सवत्स गाई संतुष्ट झालेल्या ब्राह्मणांना द्याव्या, व तीन दिवस गोरसावर रहावें.

दुधासाठीं कांश्याच्या भांड्यासह उत्तम गाय दिल्यास सहस्रावधि वर्षें स्वर्गवास घडतो. उत्तम प्रकारचा दमदार खंदा तरुण बैल ब्राह्मणाला दिल्यास गाय दिल्याचेंच श्रेय मिळतें. गाईंना चांगल्या रीतीनें बाळगणाराच त्या घेण्यास पात्र होय. वृद्ध व रोगग्रस्त यांना पथ्यासाठीं, दुष्काळांत सांपडलेल्याला दुधासाठीं, यज्ञासाठीं, शेतीसाठीं, होमासाठीं किंवा अंगावरील मुलांसाठीं गाय देणें, हा गोदानाला उक्त काल होय. चांगली दुधाळ म्हणून पारख केलेली, विकत घेतांना नीट पाहून घेतलेली, प्राणांची पर्वा न करतांहि संरक्षण करून ठेवलेली, जिंकून आणलेली, किंवा भेट म्हणून मिळालेली गाय दानास योग्य समजावी."

नाचिकेत म्हणतो, यमाचें हें उत्तर ऐकून मीं पुनः त्याला म्हटलें, 'जर एखाद्याला गायच मिळाली नाहीं, तर त्याला गाई देणाराला मिळणारे लोक कसे मिळतील?' तेव्हां यमानें उत्तर केलें, गाईच्या अभावीं सुद्धां ते लोक मिळण्याचें साधन आहे. गाई न मिळाल्यामुळें जर कोणी व्रतस्थ राहून तुपाची गाय देईल तर त्यालाहि या तुपाच्या नद्या उपभोगावयास मिळतील. तूपहि न मिळेल तर व्रतस्थ होऊन गाई एवढे तीळ द्यावे, म्हणजे तोहि दाता संकटमुक्त होऊन दुधाच्या नदींत आनंदानें बुड्या मारितो. तीळहि न मिळाल्यास तशाच पद्धतीनें पाण्याची गाय द्यावी, म्हणजेहि या शीतल जलांच्या नद्यांचा उपभोग घेतां येतो.' असें सांगून मला त्यानें त्या सर्व वस्तु दाखविल्यामुळें फार हर्ष झाला. तुम्हांला कळवावयास मला आनंद वाटतो कीं, हा महत्त्वानें श्रेष्ठ पण अल्पधनानें साध्य असा गोदानरूप यज्ञप्रकार मला कळून आला; तेव्हां तुमचा शाप मला कल्याणकारकच झाला; कारण त्यामुळें यमाची भेट झाली व त्याच्या लोकीं दानाचें माहात्म्य प्रत्यक्ष पहावयास मिळाल्यामुळें आतां मीं तसा दानधर्म निशंकपणें करीन. मला यमानें पुनः पुनः संतुष्ट होऊन सांगितलें तें हेंच कीं, 'नित्य दानानें शुद्धचित्त झालेल्यानें गोप्रदान करीत जावें. हा विषय मोठा पवित्र आहे, त्याची अवहेलना करूं नये. पात्र, देश व काल पाहूनच दान करावें. गाई देण्यासंबंधानें संशय धरूं नये. दानशूर शांत पुरुषांनीं गाई दिल्यामुळेंच ते पवित्र व देदीप्यमान होऊन त्यांना हे लोक मिळाले. काम्याष्टमीच्या दिवशीं सत्पात्र ब्राह्मणाला गाय देऊन पुढें दहा दिवस तिच्या दुधावर, शेणावर, किंवा मूत्रावर रहावें. बैल दान केल्यानें देवव्रताचें श्रेय मिळतें, दोन गाई दिल्यास वेदज्ञानाची प्राप्ति होते, बैल जोडलेली गाडी दिल्यानें तीर्थयात्रेचें पुण्य मिळतें व कपिला गाय दिल्यास पापाचा नाश

होतो. गाई दूध देऊन लोकांचें रक्षण करतात व बैल अन्न उत्पन्न करतात, हें जाणूनहि जो गोवृषभांवर प्रेम करीत नाहीं, तो पापी खरोखर नरकासच जाणार. जो हजार गाई, नाहींतर शंभर, अथवा दहा, पांच, निदान एक तरी सवत्स गाय चांगल्या ब्राह्मणाला देईल त्याला ती परलोकीं पवित्र नदीप्रमाणें उपयुक्त होईल. पुष्टिवर्धक, लोकसंरक्षक, व वैभवप्रद या दृष्टीनीं गाई या सूर्यकिरणांच्या योग्यतेच्या आहेत. शिवाय गोशब्द किरणांनाहि लागत असल्यामुळें गोदान करणारा वंशविस्तार करून सूर्यासारखा तेजस्वी होतो. कोणी गुरूला गाय देऊन त्याचा शिष्य होईल तर तो खचित स्वर्गास जाईल. धर्मविधि जाणणाऱ्यांनीं गुरूला दान देणें हा मोठा धर्म मानिला आहे. तोच मुख्य विधि असून इतरांचा त्यांतच समावेश होतो. सत्पात्र ब्राह्मणाची नीट पारख करून त्याला न्यायानें मिळविलेली गाय दान करावी व ती तो मनःपूर्वक घेईल असें करावें. देव व माणसें तसाच मींहि पुण्यशील अशा तुझी या बाबतींत प्रशंसा करूं." यमानें असें सांगितल्यावर मीं त्याला शिरसा वंदन केलें आणि त्याची अनुज्ञा घेऊन, अहो बाबा, आपल्या पायाशीं परत आलों. १३. १. ७१.

---

## अध्याय ७२ वा.

[ १ गोदानाचा महिमा पुढें चालू ]

( १ ) **युधिष्ठिर** :—हे पितामहा, नाचिकेताला यमानें सांगितलेलें गोप्रदान माहात्म्य तूं मला कथन केलें. नृगाला केवळ अज्ञानामुळें घडलेल्या अपराधावरून फारच मोठें दुःख भोगावें लागलें व त्याचा उद्धार द्वारकेच्या दरवाज्याशीं कृष्णानें केला हेंहि माझ्या लक्षांत आलें. पण अजून गोलोकासंबंधानें मला एक शंका आहे. गाईचें दान करणारे लोक कोठें वास करतात तें तत्त्वतः ऐकण्याची माझी इच्छा आहे.

**भीष्म** :—याविषयीं इन्द्रानें ब्रह्मदेवाला प्रश्न केला असतां त्या दोघांत झालेला पुरातन संवाद प्रसिद्ध आहे. इंद्रानें विचारिलें कीं, 'हे ब्रह्मदेवा, गोलोकीं रहाणारे पुरुष स्वर्गांत रहाणाऱ्यांना आपल्या वैभवानें मागें सारीत आहेत, असें पाहून मला संशय वाटतो. भगवन्, तर हे गोलोक म्हणजे आहेत तरी कसले, हें मला सांगा. ते कोणत्या प्रकारच्या दात्यांना मिळतात, त्यांत विशेष काय असतें, तेथें निश्चित होऊन कसें जातां येतें, किती काळ

त्यांत दात्याला रहावयास सांपडतें, थोडेंहि दान अनेकपट कसें होतें, अनेक गाईंच्या दानाचें फळ काय, थोड्या गाईंच्या दानाचें काय, मुळींच गाई न देतां त्या दिल्याचें श्रेय कशानें मिळतें, हें सर्व मला सांगा. पुष्कळ गाई देऊन थोड्याच दिल्यासारखें कशामुळें होतें, तसेंच थोड्या देऊनहि पुष्कळ दिल्याचें पुण्य कसें लाभतें, गोप्रदानांत दक्षिणा कसली द्यावी, या सर्व गोष्टी यथातथ्य अशा तुम्ही मला सांगाव्या.' १३. १. ७२.

---

## अध्याय ७३ वा.

[ १ ब्रह्मदेव इन्द्राला गोलोकींचें सुख, गोदानफल, इत्यादि सांगतो. ]

( १ ) **ब्रह्मदेव**:—हे इन्द्रा, गोप्रदानफलादि विषयांसंबंधानें जो तूं प्रश्न मला विचारिला, तसा विचारणारा या लोकीं दुसरा कोणी नाहीं. असे अनेक लोक आहेत, कीं जे तुला दिसत नाहींत. ते मला दिसतात व ज्या स्त्रिया पतिव्रता आहेत, त्यांनाहि दिसतात. उत्तम व्रतें आचरणारे ऋषि व सद्‌बुद्धीचे ब्राह्मण हे शरीरासह त्या लोकीं जातात. ते लोक त्यांना समाधिस्थितींत मन निर्मळ झालें असतांना स्वप्नांत दिसावे तसे या लोकींहि दिसतात. इन्द्रा, त्या लोकांत कोणते गुण असतात, तें ऐक. तेथें काळ, वार्धक्य, अग्नि, पाप, रोग, किंवा श्रम यांचा अधिकारच चालत नाहीं. तेथें गाईंच्या मनांत जें जें येईल, तें तें सर्व त्यांना मिळतें हें प्रत्यक्ष पहातों. त्या वाटेल तिकडे जातात, वाटेल तेथें भटकतात, व त्यांच्या इच्छेप्रमाणें त्या वाटेल त्या वस्तूंचा उपभोग घेतात. विहिरी, तळीं, नद्या, नाना वनें, घरें, पर्वत, फार काय सर्व वस्तूंत सुंदर म्हणून जें जें कांहीं आहे तें सर्व तेथें आहे. त्या प्रचंड प्रदेशासारखा दुसरा प्रदेश नाहीं. तेथील पुरुष अत्यंत सहनशील, क्षमायुक्त, प्रेमळ, गुरूच्या आज्ञेप्रमाणें वर्तणारे, अहंकारविहीन असे आहेत. जो मनुष्य श्रद्धायुक्त राहून मांसभक्षण वर्जील, मातापित्यांना बहुमान देईल, ब्राह्मणांची सेवा करील, गोब्राह्मणांशीं शांतपणें वागेल, यावज्जीव सत्यभाषणी, दानरत व दुसऱ्यांच्या अपराधांची क्षमा करणारा असेल, देवभक्ति व इन्द्रियदमन करील, व अतिथींचा सत्कार करील, तो या शाश्वत अशा गोलोकास जाईल. पण परदारागमन, गुरुघात, असत्यभाषण, नित्य वितंडवाद, ब्राह्मणांशीं वैर, या दुष्ट गोष्टी करणाऱ्याच्या हा लोक कधीं दृष्टीस पडावयाचा नाहीं. तसाच तो मित्रद्रोही, फसव्या,

कृतघ्न, कपटी, कुटिल, अधर्मी, ब्रह्मघातकी माणसाला मनानेंहि पहातां येणार नाहीं. गोलोकाचें स्वरूप हें असें आहे.

इन्द्रा, आतां गोप्रदानांत आनंद मानणाऱ्यांना काय फळ मिळतें तें ऐक. वडिलार्जित धनानें विकत घेतलेली गाय जो देईल, त्याला अक्षय सुखाचें स्थान मिळलें. द्यूतांत मिळविलेल्या धनानें गाई घेऊन जो त्या देतो, त्याला देवांचीं दहा सहस्र वर्षेंपर्यंत तें फळ मिळतें. वडिलोपार्जित व न्याय्यमार्गानें मिळविलेल्या गाई दिल्यास त्या दात्यांना शाश्वत फळ देणाऱ्या होतात. दान मिळालेल्या गाई जो शुद्धमनानें पुनः देईल त्यालाहि तेच अक्षय लोक प्राप्त होतात. जो जन्मापासून खरें बोलतो व गुरु आणि ब्राह्मण यांच्याशीं सहनशील व क्षमाशील असतो, त्याला गाईचेंच स्थान मिळतें. इन्द्रा, ब्राह्मणाला कधीं वाईट शब्द बोलूं नयेत, तसाच गाईचा द्रोह मनानेंहि करूं नये. गाईप्रमाणें कसलाहि संग्रह न करितां त्यांना चारापाणी घालावें. जो सत्यधर्माची कास धरितो, त्याला एक गाय दिल्यानें सहस्रगाई दिल्याचें पुण्य मिळतें. क्षत्रियानेंहि तशाच रीतीनें गोदान केल्यास त्यालाहि तसेंच फळ मिळतें. वैश्य या प्रकारें गोदान करील तर त्याला पांचशें गाईच्या दानाचें श्रेय व शूद्राला त्याच्या चतुर्थांश फळ मिळतें. तप व सत्य यांत रत होऊन गुरुसेवा करीत जो सर्व शास्त्रांत नैपुण्य मिळवितो व क्षमाशीलपणें व शांत चित्तानें देवतापूजन करून अहंकाररहित राहून शुद्ध मनानें ब्राह्मणाला एक दुभती गाय देतो, त्याला फार चांगलें फळ मिळतें, म्हणून तशा रीतीनें गोदान करावें. गाईविषयीं आदर बाळगिणारांस राजसूययज्ञाचें किंवा सुवर्णराशी दान केल्याचें पुण्य लाभतें. जो सत्यभाषण करणारा शांतचित्त मनुष्य नित्य नियमानें आपण जेवण्यापूर्वी गाईला अन्न देतो, त्याला सहस्रगोदानाचें पुण्य एका संवत्सरानें मिळतें. जो प्रत्यहीं एकदांच जेवून दुसऱ्या वेळचें अन्न गाईला देतो, तो दहा वर्षें अनन्त सुख भोगतो. एक वेळ जेवून दुसऱ्या वेळच्या अन्नानें चारा विकत घेऊन गाईला घालतो, तो त्या गाईच्या अंगावरील केसांइतक्या गाईंच्या दानाचें फळ भोगतो. ही झाली ब्राह्मणाची गोष्ट. आतां क्षत्रियाची ऐक. क्षत्रियाला असल्या दानानें पांच वर्षें सुख मिळतें; वैश्याला त्याच्या अर्धाकाळ मिळतें व शूद्राला वैश्याच्या अर्ध्याइतकें मिळतें. जो आपल्याला स्वतःला विकून त्या द्रव्यानें गाई घेऊन दान करतो त्याला त्या गाईची खूण पृथ्वीवर आहे तोंवर त्या दानाचें फळ मिळतें. युद्धांत जिंकून आणिलेल्या गाईंच्या दानानेंहि तसेंच

फळ प्राप्त होतें. नद्यांत जशी गंगा तशी गाईंत कपिला गाय श्रेष्ठ होय. नांगर ओढणारा बलवान् बैल ब्राह्मणाला दिल्यानें दहा गाईंच्या दानाइतकें पुण्य मिळतें. अरण्यांत गाई व ब्राह्मण यांचें जो रक्षण करतो त्याचें संकट तत्काल दूर होऊन त्याला अश्वमेधाचें पुण्य मिळतें व इन्द्रा, मृत्युसमयीं त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. त्याच्या मनांत ज्या ज्या लोकांची प्राप्ति व्हावीसें असलें, ते ते सारे या पुण्यकर्मानें त्याला मिळतात. जो या विधीनें वनांत गाईंच्या मागून फिरेल व गवत, शेण व पानें खाऊन दुसऱ्या कशाची इच्छा न करतां पवित्रपणें राहील, त्याच्या वासना नष्ट होऊन तो मोठ्या आनंदानें माझ्या लोकीं देवांसह किंवा त्याला जिकडे वाटेल तिकडे रहातो. १३. १. ७३.

---

## अध्याय ७४ वा.

[ १ गाईचा अपहार करण्याचें फल. इन्द्र–ब्रह्मदेव संवाद ]

( १ ) इन्द्र—द्रव्याच्या इच्छेनें जो जाणून बुजून गाईचा अपहार किंवा विक्री करतो, त्याला कोणती गति मिळते, हें समजून घेण्याची माझी इच्छा आहे.

ब्रह्मदेव—जो कोणी खाण्यासाठीं, विकण्यासाठीं, किंवा ब्राह्मणाला देण्यासाठीं गाईचा अपहार करतो, त्याला काय फळ मिळतें, तें ऐक. विकण्यासाठीं जो गाईचा वध करील किंवा उच्छृंखळपणें तिला खाऊन टाकील, किंवा तिचा वध करणाराला द्रव्यलोभानें अनुमति देईल, तो त्या दोषामुळें त्या गाईच्या अंगावरील केसांइतकीं वर्षे नरकांत बुडून राहील. ब्राह्मणाच्या यज्ञाचा नाश करण्यांत जें पाप आहे, तेंच गाईचा विक्रय किंवा अपहार करण्यांत आहे. चोरी करून जो ब्राह्मणाला गाय दान देईल, त्याला तिच्या दानानें मिळणाऱ्या स्वर्गवासाइतकाच नरकवास घडेल. गाय दान देतांना सोनें दक्षिणा म्हणून द्यावें असें सांगितलें आहे. सोनेंच दक्षिणेसाठीं सर्वांत योग्य होय. गोप्रदानानें पूर्वींच्या सात व पुढील सात पिढ्यांचा उद्धार होतो, तर तिच्या बरोबर सुवर्णदक्षिणा दिल्यानें त्याच्या दुप्पट फळ मिळतें. इन्द्रा, सुवर्ण हें श्रेष्ठ दान तसेंच उत्तम दक्षिणाहि आहे. तें पवित्र वस्तूंनाहि पवित्र करणारें आहे. कुळहि सुवर्णदानानें पवित्र होतें. हा दक्षिणाविधि तुला मीं थोडक्यांत सांगितला.

**भीष्म**—युधिष्ठिरा, असें हें गोप्रदानमाहात्म्य ब्रह्मदेवानें इन्द्राला सांगितलें, न्द्रानें दशरथाला व दशरथानें पुढें रामाला सांगितलें. नंतर रामानें तें आपल्या प्रियबंधु लक्ष्मणाला सांगितलें व वनवासांत असतां लक्ष्मणानें तें ऋषींना ांगितलें. असें हें परंपरागत ज्ञान ऋषींपासून राजांना मिळालें. युधिष्ठिरा, हें ला माझ्या उपाध्यायानें सांगितलें. जो ब्राह्मण हें माहात्म्य ब्राह्मणांच्या सभेंत, ज्ञप्रसंगीं, गोप्रदानाच्या वेळीं किंवा दोन माणसें एकत्र भेटलीं असतां कथन रील त्याला अक्षय्य लोकांत देवांसह रहावयास मिळेल. १३. १. ७४.

---

## अध्याय ७५ वा.

[ १ व्रतनियमादि आचाराचें फल. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, आपण जे धर्म सांगितले ते ऐकून मला माधान वाटलें. पण अजून थोडा संशय मला आहे, त्याचें तेवढें निरसन करा. त, नियम व वेदाध्ययन यांचें फळ काय सांगितलें आहे, तसेंच दानाचें, वेद-ठणाचें, अध्यापनाचें, आपलें कर्तव्य शौर्यानें केल्याचें, ब्रह्मचर्याचें, शुद्धपणाचें, पेतृसेवेचें, मातृसेवेचें, आचार्यसेवेचें, दयाळूपणाचें, व परदुःखहरणाचें फळ काय ाहे, हें सर्व जाणण्याची मला मोठी उत्कंठा लागली आहे.

**भीष्म**—जो कोणी शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें व्रताचरण आरंभून तें योग्य-णें पार पाडतो, त्याला शाश्वत स्थान मिळतें. राजा, नियमपालनाचें फळ त्यक्षच असून त्याचें व यज्ञाचें फळ तुला मिळालेंच आहे. वेदाध्ययनाचेंहि ळ या लोकीं प्रत्यक्ष दिसतें व परलोकींहि मिळतें. वेदाध्ययन करणारा ह्मलोकीं आनंदानें वास करतो. आतां इंद्रियदमनाचें फळ ऐक. इंद्रियदमनानें र्वत्र सुख व शांति मिळते, इच्छेस येईल तिकडे जाण्याचें सामर्थ्य येतें, र्व शत्रूंचा निःपात करतां येतो, फार काय इंद्रियदमन करणाराला इच्छेस ईल तें मिळतें, त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. तप, पराक्रम, दान, यज्ञ, ांच्या योगानें जसें स्वर्गांत सुख मिळतें, तसें इंद्रियनिग्रही क्षमाशील ुरुषांनाहि मिळतें. दानापेक्षांहि इंद्रियनिग्रह श्रेष्ठ होय. दाता क्वचित् रागें रेल, पण इंद्रियदमन करणारा कधींच रागावणार नाहीं. म्हणून दानापेक्षां मच श्रेष्ठ. कारण न रागावतां तो दान करतो व म्हणून त्याला शाश्वत स्थान मळतें. दानावर क्रोधामुळें विरजण पडतें. युधिष्ठिरा, स्वर्गांत ऋषींचीं सहस्रावधि

अदृश्यस्थानें आहेत, तेथें इंद्रियनिग्रहाच्या योगानें मोठमोठे ऋषि जाऊन पोंचतात. अध्यापन करणारा आचार्य शास्त्रानुसार अग्नीला हविर्भाग दिल्यानें ब्रह्मलोकीं अक्षय सुख भोगतो. वेदाध्ययन केल्यावर जो ते वेद चांगल्या शिष्यांना पढवितो, व आपल्या गुरूची स्तुति करतो, त्याला स्वर्गलोकीं बहुमान मिळतो. आपल्या कर्तव्यांत दक्ष राहून दान करणारा वैश्य मोठें फळ मिळवितो व शूद्रालाहि कर्तव्याचरणानें म्हणजे सेवाधर्मानें स्वर्गप्राप्ति होते.

शौर्य पुष्कळ प्रकारचें असतें, त्याचा तुला मीं अर्थ सांगतों व विविध प्रकारच्या शूरांना मिळणारें फळहि सांगतों. यज्ञशूर, इन्द्रियनिग्रहांत शूर, सत्यशूर, युद्धशूर, दानशूर, ज्ञानशूर, योगशूर, अरण्यवासांत शूर, गृहस्थाश्रमांत शूर, स्वार्थत्यागांत शूर, सरळपणांत शूर, तसेंच इतर गुणांत शूर असे पुरुष असतात. कोणी वेदाध्ययनशूर असतो तर दुसरा अध्यापनशूर असतो; एखादा मातृसेवेंत शूर असतो तर दुसरा कोणी पितृसेवेंत असतो. कोणी गुरुशुश्रूषेंत शौर्य दाखवितात, तर कोणी भीक मागण्यांतहि शूर असतात, तर कोणी अतिथिसत्कारांत शूर असतात. ते सर्व जण आपापल्या कर्मांनीं मिळालेल्या उत्तम लोकांस जातात. सर्व वेदांचें ज्ञान व सर्व तीर्थांचें स्नान यांना सत्यभाषणाची बरोबरी येईल किंवा येणारहि नाहीं. सहस्र अश्वमेध व सत्य हीं तराजूंत तोललीं तर सत्यच अधिक भरेल. सत्यानें सूर्य प्रकाशतो, अग्नि प्रदीप्त होतो व वारे वहातात. सर्व सत्यावरच अवलंबून आहे. सत्यानें देव संतुष्ट होतात, तसेंच पितर व ब्राह्मणहि सत्यानेंच संतोष पावतात. सत्य श्रेष्ठ धर्म असल्यामुळें त्याचें उल्लंघन करूं नये. ऋषींना सत्याची आवड असते, सत्य हाच त्यांचा पराक्रम असतो व सत्याचेंच ते वर्तन करतात. म्हणून सत्याची योग्यता मोठी आहे. सत्यानें स्वर्गलोकीं आनंद प्राप्त होतो. आत्मनिग्रह सत्याचेंच फळ होय. विनयसंपन्नालाहि स्वर्गांत बहुमान मिळतो. आतां ब्रह्मचर्याचे गुण ऐक. जो सारा जन्म ब्रह्मचर्य पाळतो, त्याला न मिळणारें असें कांहींच नाहीं. शेंकडों कोटि ऋषि सत्यप्रेमानें, इन्द्रियदमनानें व ब्रह्मचर्यानें ब्रह्मलोकीं रहातात. विशेषतः ब्राह्मणानें केलेली ब्रह्मचर्याची उपासना सर्व पापें जाळून टाकिते. ब्राह्मण म्हणजे अग्निच आहे असें म्हणतात. ब्राह्मणांसंबंधानें ही गोष्ट प्रत्यक्षहि दिसते. इन्द्रहि ब्रह्मचारी ब्राह्मणांच्या धाकाला भितो, असें ऋषींच्या ब्रह्मचर्याचें फळ आहे. मातापित्यांवर न रागावतां जो त्यांची सेवा करतो, तशीच वडील भावाची व गुरूची करतो, त्याला

त्या सेवेचें फळ म्हणून स्वर्गांत पूज्य स्थान मिळतें. गुरुशुश्रूषा करणाऱ्याला नरकाचें दर्शन घेण्याची पाळी कधीं येत नाहीं. १३.१.७५.

---

## अध्याय ७६ वा.

[ १. गोदानविधीचें वर्णन. ]

( १ ) **युधिष्ठिर** :—ज्याच्या योगानें दात्यांना शाश्वत लोक प्राप्त होतात, तो गोदानाचा श्रेष्ठ विधि ऐकण्याची मला इच्छा आहे.

**भीष्म** :—राजा, गोदानापेक्षां अधिक कांहीं नाहीं; योग्य मार्गानें मिळविलेल्या गाईचें दान कुळाचा तत्काल उद्धार करतें. गोदानाचा विधि सज्जनांसाठीं उत्पन्न झाला व सर्व लोकांसाठीं त्याची योजना पुढें झाली. असा अगदीं प्राचीन काळापासून चालत आलेला गोदानविधि आतां ऐक. एकदां दानासाठीं गाई पुढें आणिल्या असतां मांधाता राजाला त्या विधीसंबंधीं कांहीं शंका आली. तेव्हां त्यानें बृहस्पतीला विचारिलें असतां तो म्हणाला, ' ब्राह्मणाचा सत्कार करून दुसऱ्या दिवशींचा दानाचा काळ ठरवावा; दानासाठीं रोहिणी म्हणजे तांबड्या रंगाची गाय घ्यावी; तिचें समंगा, बहुला असें शुभ नांव ठेवावें; आणि त्या नांवानें हाक मारून गोठ्यांत जाऊन ' गौर्मे माता ' इत्यादि श्रुतिवाक्य म्हणावें.* रात्रभर गोठ्यांत राहून दुसऱ्या दिवशीं तो मंत्र पुनः म्हणावा. त्या एका रात्रीच्या गाईंच्या सहवासामुळें मनुष्य गाईंचा मित्र होऊन पापापासून तत्काल मुक्त होतो. मग सकाळीं सूर्योदयीं एक बैल व तिचें वासरूं यांसह ती गाय ब्राह्मणास द्यावी, म्हणजे, हे राजा, त्या मंत्रांतील शुभफलवाचक अर्थवाद तुला प्राप्त होईल. मंत्रांत सांगितलेल्या आशीर्वादांचा अर्थ असा आहे कीं, ' गाई सामर्थ्यवान व बुद्धिमान आहेत. त्या यज्ञप्रसंगीं हविर्भाग उत्पन्न करणाऱ्या व जगाचा आधार असून ऐश्वर्याचा टिकाऊ झरा व संततीचें कारण होत. गाई माझें पाप दूर करोत; त्यांच्यामध्यें सूर्यचंद्रांचे गुण असल्यामुळें त्या मला स्वर्गास नेवोत. मला त्या मातेप्रमाणें आधार देवोत व या मन्त्रांत न सांगितलेल्या कल्याणाच्या गोष्टीहि मला मिळोत.

---

* गाय माझी माता, बैल माझा पिता. तीं मला दिव्य व या लोकींचें सुख देवोत. गायच माझा आधार आहे. (गौर्मे माता वृषभः पिता मे। दिवं शर्म जगती मे प्रतिष्ठा.)

क्षय रोग नाहींसा करण्यांत व देहाला मुक्ति देण्यांत नद्यांप्रमाणें सिद्ध असलेल्या, हे धेनूहो, तुम्हीं प्रसन्न होऊन माझा इष्ट मार्ग मला नित्य दाखवा. ज्या तुम्ही मद्रूपच आहां, त्या तुम्हांला देण्यानें मीं स्वतःचेंच दान केल्यासारखें झालें. अहंकारापासून मुक्त झालेल्या माझें मनच तुम्हीं स्वाधीन करून घेतलें, तरी सौम्य व उग्रस्वरूपांच्या अशा तुम्हीं आतां माझ्या इच्छा पूर्ण करा.' या श्लोकांपैकीं अर्धाभाग दात्यानें म्हणावा व दुसरा भाग घेणाऱ्यानें म्हणावा, असा हा गोप्रदानाचा विधि आहे. गाय न देतां तिचें मूल्य, वस्त्र, किंवा द्रव्य देतांनाही 'मी गाय देत आहें' असें म्हणावें. मूल्य दिल्यास 'गो' च्या जागीं 'उर्ध्वास्याम्' ( वर तोंड केलेली ), वस्त्र दिल्यास 'भवितव्याम्' आणि द्रव्य दिल्यास 'वैष्णवीं' असे शब्द घालावे. असें गोप्रदान करणारास अनुक्रमें छत्तीस सहस्र, आठ सहस्र व वीस सहस्र वर्षें स्वर्गवास घडतो. गाईचें मूल्य देणाराला जें फळ मिळतें तें प्रत्यक्ष गाय देणारालाहि मिळतें, पण तें घेणारा आठ पावलें जात आहे तोंच मिळतें. गाय देणारा शीलवान् व घेणारा निर्भय होतो. तिच्या-बद्दल द्रव्य देणाराला कधीं दुःख होत नाहीं. नित्य प्रातःस्नान करून आपलीं कर्में करणारे, महाभारतांत निष्णात असे पुरुषहि चंद्रलोकाला व सूर्यलोकाला जातात. गाय दिल्यावर तीन रात्री गोव्रत पाळावें व एक रात्र गाईबरोबर रहावें. गोदान विधियुक्त केल्यासच फळ मिळतें, एरवीं नाहीं. एक दुभती गाय देणारास सर्व ऐहिक भोग दिल्याचें श्रेय मिळतें. मग पुष्कळ दूध देणाऱ्या व हव्यकव्याला उपयुक्त अशा अनेक गाई दिल्यास किती मिळेल बरें ? पण उत्तम बैल दिल्याचें श्रेय त्याहूनहि अधिक आहे. शिष्य न झालेल्या, व्रतहीन, श्रद्धाहीन, किंवा वांकड्या बुद्धीच्या माणसाला हा गोदानाचा गुह्य विधि सांगूं नये, तसाच तो वाटेल तेथेंहि सांगूं नये. या जगांत जसे कांहीं श्रद्धावान् पुरुष असतात, तसे कांहीं क्षुद्र व मनुष्यरूपी राक्षसहि असतात, तशांना किंवा पापी व नास्तिक मताच्या लोकांनाहि हा विधि सांगणें अनिष्ट होय. युधिष्ठिरा, बृहस्पतीचें हें वचन ऐकिल्यावरून ज्या राजांनीं गोप्रदानें केलीं व त्यामुळें पुण्य प्राप्त करून जे उत्तम लोकास गेले त्यांचीं नावें आतां मीं सांगतों, तीं ऐक. उशीनर, विष्वगश्व, नृग, भगीरथ, यौवनाश्व, मान्धाता, मुचुकुन्द, भूरिद्युम्न, नैषध, सोमक, पुरूरवा, चक्रवर्ती भरत ( त्याच्या वरूनच त्याच्या वंशजांना भरत म्हणतात ), दाशरथि राम, तसेच आणखीहि कित्येक प्रसिद्ध कीर्तिमान् राजे गोप्रदानें करून स्वर्गास गेले. दिलीप राजा विधियुक्त

गोप्रदानानेंच स्वर्गास गेला. मान्धाता राजा यज्ञ, दान, तप, प्रजारक्षण, याप्रमाणेंच गोप्रदानानेंहि युक्त होता. राजा युधिष्ठिरा, यास्तव तूंहि या बृहस्पतीच्या वचनाप्रमाणें वाग, आणि कुरूंचें राज्य मिळाल्यामुळें आतां मोठ्या प्रेमानें चांगल्या सत्पात्र ब्राह्मणांना विधिपुरस्सर पवित्र गाई दे.

वैशंपायन म्हणतो, हे जनमेजय राजा, याप्रमाणें भीष्मानें गोप्रदानाचा विधि जसा सांगितला, तसा सर्व युधिष्ठिरानें करून गाई दिल्या व मान्धात्याला देवानें केलेला उपदेश जाणून योग्य धर्माचें आचरण केलें. त्यानें गोप्रदान करतांना नित्य गोमयासह यवाच्या कण्या भक्षण केल्या व भूमीवर शयन करून मनोनिग्रहपूर्वक तो इन्द्रासारखा राजेन्द्र झाला. तो देवतांवर निष्ठा ठेवून त्यांचें स्तवन करी व राज्यशकटावर गाईची योजना करून तेजस्वी घोड्यांवर बसून वाटेल तिकडे हिंडे. १३.१७.६.

---

## अध्याय ७७ वा.

[ १. गाईच्या उत्पत्तीची कथा. ]

( १ ) वैशंपायन म्हणतो, राजा, मग धर्मराज युधिष्ठिरानें गोप्रदान विधिसंबंधानें अधिक विस्तार करून तो पुनः सांगण्याची भीष्माला विनंति केली व भीष्मानें त्याला पुनः गोदानाचा महिमा सविस्तर कथन केला.

भीष्मः—वासरावर प्रेम करणारी, गुणी, तरुण, अशी गाय पाठीवर वस्त्र घालून ब्राह्मणास दिल्यानें दाता सर्व पापांपासून मुक्त होतो. गोदान दिल्यास अंधकारमय अशा लोकीं जाण्याचा प्रसंग येत नाहीं. जिला आतां पाणी पिववत नाहीं, गवत खाववत नाहीं, ओंटी सुकून गेल्यामुळें जी दूध देऊं शकत नाहीं, वृद्धपण व रोग यांनीं वेंगून गेल्यामुळें जी निर्जल विहिरीप्रमाणें भासूं लागली, अशी गाय ब्राह्मणाला दिल्यास त्याला क्लेशच दिल्यामुळें दात्याला अंधारमय लोकीं जावें लागतें. मारकी, रोगी, दुबळी व जिचें मूल्य दिलेलें नाहीं अशी गाय देऊं नये. तसें केल्यानें ज्याला ती द्यावी त्याला क्लेश होत असल्यामुळें तें दान निष्फळ होतें. सशक्त, तरुण, गरीब व सुगंधयुक्त अशाच गाईंची लोक स्तुति करतात व कपिला गायच श्रेष्ठ असें मानितात ?

युधिष्ठिर :—बहुला गाय कपिलेसारखीच असतां कपिलेचीच योग्यता अधिक कां मानतात ?

भीष्म—तांबड्या रंगाच्या रोहिणी गाई कां निर्माण झाल्या याविषयीं वृद्ध लोकांच्या तोंडून मीं जें ऐकिलें तेंच तुला सांगतों. ब्रह्मदेवानें प्रजा उत्पन्न करण्याची दक्ष प्रजापतीला आज्ञा केली असतां प्रथम त्यानें प्रजाहितासाठीं त्यांच्या निर्वाहाचें साधन उत्पन्न केलें व त्यामुळें देव अमृतावर रहातात तशा त्या उत्पन्न केलेल्या प्रजाहि त्या साधनावर राहूं लागल्या. त्या स्थावरसृष्टीपेक्षां जंगमसृष्टि व जंगमांतहि मनुष्यसृष्टि उत्तरोत्तर श्रेष्ठ होय. मनुष्यांत ब्राह्मण श्रेष्ठ, कारण यज्ञाचा भार त्यांच्यावर आहे. यज्ञांच्या योगानें सोम मिळतो व तो तर गाईवर अवलंबून असतो व त्यामुळें देवांना हर्ष होतो. याप्रमाणें आधीं निर्वाहसाधन व नंतर प्रजोत्पत्ति असा क्रम आहे. प्राणिमात्र उत्पन्न झाल्याबरोबर ते अन्नासाठीं ओरडूं लागले व तहानलेलें मूल आईबापांकडे धांव घेतें तशी त्यांनीं प्रजापतीकडे धांव घेतली. त्यांची इच्छा जाणून दक्षप्रजापतीनें अमृत प्राशन केलें. त्यानें त्याची तृप्ति झाली व सुगंधी ढेंकर त्यांच्या तोंडांतून निघाला. त्या ढेंकराबरोबर त्याच्या मुखांतून कामधेनु निघालेली त्याला दिसली. अर्थात् ती दक्षाची कन्या होय. मग त्या कामधेनूनें आपल्यासारख्या अनेक धेनु उत्पन्न केल्या व त्या प्रजांना मातांसारख्या झाल्या. त्यांचा वर्ण पिंगट सोनेरी असल्यामुळें त्यांना कपिला म्हणतात. त्या प्रजांना अन्न देऊं लागल्या. नद्यांच्या लाटांपासून फेंस उत्पन्न व्हावा, तसा त्या अमृतवर्ण गाईंच्या दुधाचा फेंसहि सभोंवार पसरला. वासरें तो पीत असतां त्यांच्या तोंडांतून तो गळून खालीं पृथ्वीवर शंकराच्या मस्तकावर पडला. तेव्हां शंकरानें रागानें वर पाहिलें, तेव्हां त्याच्या मस्तकांतील नेत्राच्या तीव्र तेजामुळें त्या सगळ्या कपिला गाईंचा रंग मेघांच्या रंगाप्रमाणें विविध होऊन गेला. पण त्यांपैकीं ज्या तेथून चटकन पळून सोमाचा आश्रय करून राहिल्या त्यांचा वर्ण मात्र मूळचाच राहिला. मग त्या क्रुद्ध झालेल्या महादेवाला दक्ष म्हणाला, 'देवा, तुझ्या मस्तकावर खरोखर अमृतवर्षाव झाला. गाईंच्या बाबातींत उष्टें हा शब्दच नाहीं. चंद्र ज्याप्रमाणें अमृत भरून घेऊन पुनः तें सोडून देतो, तशाच या रोहिणी गाई अमृतोत्पन्न दूध सोडीत असतात. अग्नि, वायु, सुवर्ण, समुद्र, देवांनीं प्यालेलें अमृत, व वासरांना पाजणाऱ्या गाई, यांना उष्टेपणाचा दोष कधीं लागत नाहीं. सर्व लोक त्या आपल्या दुग्धरूपी हविर्द्रव्यानें भरून काढतील. यांचें अमृतमय ऐश्वर्य सर्वजण इच्छितात.' असें म्हणून दक्षानें कांहीं गाई व त्यांबरोबर एक बैल अशीं शंकराला दिलीं व अशा रीतीनें रुद्राचें मन संतुष्ट केलें.

तेव्हां संतुष्ट होऊन शंकरानेंहि त्या बैलाला आपलें वाहन व ध्वजचिन्ह केलें. तेव्हांपासून शंकराला वृषभध्वज म्हणतात. मग देवांनींहि महादेवाला पशुपति ही पदवी दिली व तो वृषभांक म्हणून गाईमध्यें शोभूं लागला. याप्रमाणें महाप्रतापी कपिला गाईचीच योजना दानामध्यें पहिल्या प्रतीची म्हणून सर्वांनीं ठरविली. म्हणून लोकांमध्यें वडील, प्रजेला अन्न पुरविणाऱ्या, अमृतमय, रुद्रयुक्त, पवित्र गाई दिल्यानें सर्व प्रकारचें इष्ट दान केल्यासारखें होतें. गाईच्या माहात्म्याचें हें वर्णन पठन करणारा मनुष्य कलिमलापासून मुक्त होऊन संतति, संपत्ति, धन व पशु मिळविण्यास समर्थ होतो. हव्य, कव्य, देवपितृतर्पण, शान्तिकर्म, गाड्या ओढण्याचें काम, लहानापासून वृद्धापर्यंत सर्वांचें संतोषकारक अन्न, इत्यादि सर्व गुण गोप्रदानांत असल्यामुळें गाई देणाऱ्या राजाला हे सर्व गुण प्राप्त होतात.

वैशंपायन म्हणतो, जनमेजया, भीष्माचें भाषण ऐकून युधिष्ठिरानें आपल्या बंधूंसह सोनेरी रंगाच्या गाई व बैल सत्पात्र ब्राह्मणांना अर्पण केले. तसेंच यज्ञाची दक्षिणा म्हणून त्यानें उत्तम लोक मिळावे व कीर्ति व्हावी म्हणून शेंकडों सहस्रावधि गाई त्या ब्राह्मणांना दान दिल्या. १. ३७. १७.

---

## अध्याय ७८ वा.

[ १. गोप्रदानविधीचें आणखी वर्णन; सौदास-वसिष्ठ संवाद ]

( १ ) **भीष्मः**—एकदां इक्ष्वाकुकुलोत्पन्न सौदास राजानें आपला परंपरागत पुरोहित जो वसिष्ठ ऋषि त्याला नमस्कार करून विचारिलें कीं ‘ साऱ्या त्रिभुवनांत जिच्या योगानें मनुष्याला उत्तम पुण्य मिळेल अशी पवित्र गोष्ट कोणती?’ तेव्हां वसिष्ठानें त्याला गाईचें उपनिषद् सांगितलें. तो म्हणाला, ‘गाईच्या अंगाला उत्तम गन्ध व गुळाचा वास असून प्राणिमात्राचा भार त्यांच्यावर आहे व सर्वांच्या कल्याणाचें त्या माहेरघर होत. भूत व भविष्य सर्व गाईच असून त्या पुष्टिवर्धक, लक्ष्मीस्वरूपी व सर्वांचें मूळ होत. त्यांचें दान कधीं विफळ होत नाहीं. गाई उत्तम प्रकारचें अन्न माणसांना देतात व देवांना द्यावयाचें हविर्द्रव्य त्यांच्यापासूनच मिळतें. स्वाहाकार व वषट्कार त्यांच्यायोगानेंच सिद्ध होतात. सकाळ-संध्याकाळचें होमद्रव्य ऋषींना गाईपासूनच

मिळतें. जीं कांहीं संकटें येतात, जीं कांहीं हातून पापें घडतात, त्या सर्वांतून गोदानाच्या योगें मनुष्य तरून जातो. दहा गाई जवळ असतील तर एक दान द्यावी, शंभर असतील तर त्यांतील दहा द्याव्या, सहस्र गाईंच्या धन्यानें शंभर द्याव्या, म्हणजे सर्वांना सारखेंच फळ मिळतें. शंभर गाई जवळ असून अग्निहोत्र न बाळगणारा, आणि सहस्र गाई असतांहि यज्ञ न करणारा व श्रीमंत असून कृपणपणें वागणारा, हे सारखेच दोषार्ह होत. सवत्स वस्त्राच्छादित कपिला गाय व दुधासाठीं काशाचें भांडें यांच्या दानानें मनुष्य दोन्ही लोक जिंकतो. तरुण, शंभरांच्या तांड्याचा नाईकच जसा असा लांब शिंगांचा बैल, त्यावर अलंकार घालून श्रोत्रिय ब्राह्मणाला दिल्यास दात्याला जन्मोजन्मीं ऐश्वर्य मिळतें. गाईंचें स्तोत्र म्हटल्याशिवाय निजूं नये, तसेंच उठतांनाहि त्यांचें स्मरण करावें; त्यांना सकाळसंध्याकाळ नमस्कार करावा म्हणजे मनुष्य पुष्ट होतो. गाईंच्या शेणामुताची खंती कधीं बाळगूं नये व त्यांचें मांसहि खाऊं नये. गाईंचें नित्य स्तवन करावें व त्यांचा अनादर करूं नये. केव्हां अनिष्ट स्वप्न पडल्यास गाईंचें स्तोत्र गावें, गोमयानें नित्य स्नान करावें व गाईंच्या गोवरीवर बसावें. गाईंच्या शेणांत शेंबूड व मलमूत्र केव्हांहि टाकूं नये. तिच्या ओल्या कातड्यावर बसून व पश्चिमेस तोंड करून जेवावें, म्हणजे गाईंची समृद्धि प्राप्त होते. तिच्या तुपानें अग्नीला हवन द्यावें, त्यानेंच स्वस्तिवाचन करावें, तिचें तूप द्यावें व प्यावें म्हणजे गाईंचें वैभव मिळतें. गोमती मंत्रानें तिळांच्या गाईंचें अभिमंत्रण करून व तिला रत्नांनीं मढवून दान दिल्यास कृत दुष्कर्मांचा किंवा घडलेल्या सत्कर्मांचा पश्चात्ताप करण्याचा प्रसंग येत नाहीं. गोमती मंत्राचा अर्थ असा कीं "सोनेरी शिंगाच्या दुधाळ व कामधेनूच्या सुगंधयुक्त कन्या अशा गाई, नद्या समुद्राकडे जातात तशा मजकडे येवोत. गाईंचें दर्शन मला नित्य घडावें, व गाईंची कृपादृष्टि मजवर नित्य असावी. गाई आमच्या व आम्ही त्यांचे. जिकडे गाई तिकडे आम्हीहि." हा गोमतीमंत्र रात्री दिवसा बऱ्यावाईट प्रसंगीं व महाभय प्राप्त झालें असतां पठन करणारा भयमुक्त होतो.' १३.१.७८.

---

## अध्याय ७९ वा.

[ १. गोप्रदानविधिवर्णन पुढें चालू. ]

( १ ) **वसिष्ठः**—हे राजा, पूर्वी एकदां आपल्याला श्रेष्ठपणा मिळावा या हेतूनें गाईंनीं एक लक्ष वर्षें दुर्धर तपश्चर्या केली. सर्व दक्षिणांमध्यें आपण उत्तर व्हावें, आणि आपल्याला कोणताहि दोष लागूं नये अशी त्यांची इच्छा होती. आपल्या शेणाच्या स्नानानें माणसें पवित्र व्हावीं, शेणाचा उपयोग देव व माणसें यांनीं सर्व घरदार व वस्तु स्वच्छ करण्यासाठीं करावा, व आपलें दान करणारे आपल्या लोकीं यावे, असाहि त्यांचा तप करण्यांत हेतु होता. त्यांचें तप पुरें झालें, तेव्हां ब्रह्मदेवानें स्वतः त्यांना वर दिला कीं तुमच्या इच्छेप्रमाणें घडून तुम्हीं लोकांचें तारण करा. आपल्या तपश्चर्येचा हेतु सिद्ध झाला हें पाहून गाई उठल्या; म्हणून त्यांना प्रातःकाळीं नमन करावें म्हणजे आपल्याला पुष्टि मिळते. याच कारणास्तव त्या पवित्र झाल्या व सर्व प्राण्यांच्या शिरोभागीं बसल्या. सवत्स दुभती कपिला गाय वस्त्रासहित दिल्यानें ब्रह्मलोकीं मान मिळतो, तशीच पण लोहित गाय दिल्यास सूर्यलोकांत बहुमान मिळतो. त्याच वर्णाची पण शबलवर्णाची गाय दिल्यानें चंद्रलोकीं उच्चपद मिळतें. त्याच स्वरूपाची पण कृष्णवर्णाची गाय दान दिल्यास अग्निलोकांतील उच्चस्थान मिळतें. धूम्र वर्णाची त्याच गुणांची गाय द्यावी म्हणजे यमलोकीं महत्त्व प्राप्त होतें. पाण्याच्या फेसांच्या रंगाची गाय कांशाच्या दुधाच्या भांड्यासह दिली, तर वरुण लोकांतील उच्चस्थान मिळतें. हवेंतील धुळीच्या कणांच्या रंगाची तशाच प्रकारची गाय दिल्यानें वायुलोकांत बहुमानाचें पद मिळतें. सोनेरी रंगाची तशी गाय सवत्स द्यावी म्हणजे कुबेराचा लोक मिळतो. त्याचप्रमाणें काडीच्या धुराच्या वर्णाची गाय दिल्यानें पितृलोक, गळ्याखालीं लांब पोळी असलेली गाय दिल्यानें विश्वेदेवांचें स्थान, गौरवर्णाच्या गाईच्या दानानें वसु-लोक, पांढऱ्या कांबळ्यासारख्या रंगाची गाय दिल्यास साध्यांचा लोक, असे मिळतात. उंच वशिंडाचा बैल रत्नांनीं अलंकृत करून दिल्यास मरुतांचा लोक प्राप्त होतो. वयांत आलेला भरींव अंगाचा बैल सालंकार दिल्यास गंधर्व व अप्सरा यांचा लोक मिळतो. पोळीचा बैल तसाच शृंगारून दिल्यानें शोकमुक्त होऊन मनुष्य प्रजापतीच्या लोकास जातो. हे राजा, गोप्रदानांची आवड असणारा मनुष्य मेघांचे थवे फोडून सूर्यासारखा तेजस्वी होत्साता विमानांतून वर

जाऊन आकाशांत प्रकाशतो. तशा पुरुषाला तेथें सुंदर वेषाच्या सहस्रावधि रम्य देवस्त्रिया रमवितात. त्या सुंदरींच्या वीण्यांच्या नादानें, नूपुरांच्या मंजुळ ध्वनीनें व सुंदर हास्यानें तो झोपीं जातो व तशाच साधनांनीं जागा होतो. गाईंच्या अंगावरील केसांइतकीं वर्षें तो स्वर्गीं रहातो आणि तेथून मृत्युलोकीं आला तरी उत्तम श्रीमंत घरांत जन्मास येतो. १३.१.७९.

## अध्याय ८० वा.

[ १. वसिष्ठाचें गोप्रदानविधिवर्णन पुढें चालू ]

( १ ) **वसिष्ठ**:—'तूप व दूध देणाऱ्या, तुपापासून उत्पन्न झालेल्या व तुपाचे भोंवरे असलेल्या तुपाच्या नद्याच जणूं अशा गाई माझ्या घरीं सदा असोत. माझ्या हृदयांत व नाभींत तूपच राहिलेलें असून, शरीराच्या सर्व भागांत व मनांत तूपच भरून राहिलें आहे. माझ्यापुढें गाई व मागेंहि गाईच; माझ्या सभोंवतीं सर्वत्र गाईच असून मीं गाईंच्या मध्यभागीं असतों.' अशा अर्थाचा मंत्र जो कोणी सकाळीं आचमनपूर्वक जपेल तो दिवसभर झालेल्या पापांतून मुक्त होईल. जेथें सुवर्णाचे वाडे व द्रव्याचे झरे आहेत अशा गंधर्व व अप्सरांच्या लोकीं सहस्र गाई देणारे लोक जातात. ज्यांत लोण्याचा चिखल, दुधाचा प्रवाह व दह्याचें शेवाळ असतें अशा नद्या ज्यांत वहातात, त्या लोकीं सहस्र गाई देणारे जातात. एक लक्ष गोदान यथाविधि करणारा मोठें वैभव मिळवून स्वर्गलोकीं उच्चस्थान पटकावतो. असा मनुष्य आपल्या मातापित्यांच्या दहा दहा पिढ्या आपल्या पुण्यानें उद्धरून सर्व कुलाला पावन करतो. प्रत्यक्ष गाईएवढी तिळांची गाय जो जलासह देतो त्याला यमलोकीं मुळींच यातना होत नाहींत. पवित्र व देवांनाहि आधारभूत असलेल्या ज्या जगन्माता गाई त्यांना प्रदक्षिणा घालून मग सत्पात्रीं त्यांचें योग्य वेळीं दान करावें, व 'उत्तम रूपाच्या, नाना रूपांच्या, सर्व रूपांच्या, जगन्माता अशा गाई मजजवळ असोत,' असा मंत्र नित्य जपावा. याहून पुण्यकारक दान व अधिक फल देणारी गोष्ट जगांत दुसरी कांहीं नाहीं. गाय आपल्या त्वचेनें, केसांनीं, शिंगांनीं, दुधानें, व मदानें यज्ञसिद्धि करीत असल्यामुळें तिच्याहून श्रेष्ठ काय असणार? जिनें हें स्थावरजंगम जग व्यापून टाकिलें आहे, त्या भूतभविष्य अशा प्राणिमात्रांच्या धेनुरूप मातेला मी शिरसावंदन करतों. हे सौदास राजा, गाईंच्या

गुणवर्णनांतील हा एक लहानसा भाग मीं तुला सांगितला. गोदानापेक्षां मोठें दान नाहीं, तसें दुसरें त्याहून कांहीं श्रेष्ठहि नाहीं.

भीष्मः—युधिष्ठिरा, सौदास राजानें वसिष्ठ ऋषीचें भाषण ऐकून 'ठीक आहे' असें म्हटलें व आत्मनिग्रहपूर्वक अनेक गाईंचें दान ब्राह्मणांना देऊन उत्तम लोकांची प्राप्ति करून घेतली. १३.१.८०.

---

## अध्याय ८१ वा.

[ १. गोमाहात्म्य वर्णन—शुक-व्यास संवाद ]

( १ ) **युधिष्ठिरः**—हे पितामहा, जगांत अत्यंत पवित्र, प्रशंसनीय व पावन करणारें असें काय आहे तें मला सांगा.

**भीष्मः**—गाईंचेंच महत्त्व मोठें असून त्या माणसांना तारतात व आपल्या तुपानें व दुधानें प्रजेचें पोषण करतात. युधिष्ठिरा, गाईंहून अधिक पुण्यकारक कोणतीच वस्तु नाहीं. त्रिभुवनांत त्याच पुण्य, पवित्र व श्रेष्ठ होत. देवांच्याहि वरतीं त्यांचें स्थान आहे. मनोनिग्रही पुरुष त्यांचें दान करून स्वर्गास जातात. मांधाता, यौवनाश्व, ययाति, नहुष इत्यादि लक्षावधि पुरुष सतत गोदान केल्यानेंच देवांनाहि दुर्लभ अशा स्थानीं गेले. याविषयीं तुला मी जुना इतिहास सांगतों. एकदां शुकानें सर्वज्ञ ऋषिश्रेष्ठ जो पिता व्यास त्याला नमस्कार करून पवित्र अंतःकरणानें आपलीं आह्निक कृत्यें आटोपल्यावर विचारिलें कीं, 'सर्व यज्ञांत श्रेष्ठ यज्ञ कोणता व काय केल्यानें मनोनिग्रही पुरुषांना उच्चस्थान मिळतें? तसेंच यज्ञाचा यज्ञपणा कशांत असतो, यज्ञाचा मूळ आधार काय, देवांना अत्यंत श्रेयस्कर काय, तें मला सांगा.' तेव्हां धर्मज्ञ व्यासानें आपल्या पुत्राला सर्व गोष्टी याथातथ्यानें सांगितल्या.

व्यास म्हणाला, 'गाई प्राणिमात्रांचा आधार असून सर्वांत श्रेष्ठ, पुण्य व पवित्र त्याच होत. गोधनच पावन करणारें आहे. आम्हीं असें ऐकिलें आहे कीं पूर्वी गाईंना शिंगें नव्हतीं, म्हणून त्यांनीं अव्यय अशा परमेश्वराची शिंगें मिळावीं म्हणून उपासना केली. त्यांनीं मरेतों उपवास करण्याचें ठरविलें हें पाहून ब्रह्मदेवानें त्यांच्या इच्छा प्रत्येकीं पुरविल्या व तदनुसार त्यांना जिला जशीं हवीं तशीं शिंगें फुटलीं. बाळा, मग त्या चित्रविचित्र रंगाच्या गाई शिंगांनीं शोभूं लागल्या. ब्रह्मदेवानें त्यांना वर दिल्यामुळें त्या हव्यकव्यास उपयुक्त, सुंदर, पवित्र

व दिव्यस्वरूपी झाल्या. गाई म्हणजे दिव्य तेज असल्यामुळें त्यांचें दान प्रशस्त मानिलें आहे. जे निर्मत्सर सज्जन त्यांचें दान करतात, ते पुण्यवान सर्व दानें देणारे होत, असें म्हणतात. त्यांना गोलोक व गाईचें पुण्य मिळतें. त्या ठिकाणीं गोड फळांचे वृक्ष, दिव्य व सुगन्धि पुष्पें असून सारी भूमि रत्नमय, सारी वाळू सोन्याची, सारे ऋतु शीतल, व पाणी नित्य स्वच्छ व पवित्र असतें. तेथील तळ्यांत सोनेरी दांड्यांचीं तांबडीं कमळें दुपारच्या सूर्यासारखीं तळपत असतात. त्यांतील निळया कमळांचीं पानें रत्नाचीं, व केसर सोन्याचे असतात. त्यांतील फुललेल्या कण्हेरींचीं वनें सहस्रावधि वेलींनीं वेष्टिलेलीं असून पुष्पयुक्त अशा संतानक वृक्षाच्या रांगांनीं तो लोक सुशोभित झालेला असतो. तेजस्वी मणि व पाणीदार मोतीं यांनीं तेथील नद्यांचीं वाळवंटें भरलेलीं असून पर्वत अग्नीप्रमाणें लकाकणाऱ्या सोनेरी वृक्षांनीं आच्छादिलेले असतात. त्यांतील वृक्ष सदा फळपुष्पांनीं ओथंबलेले व पक्ष्यांनीं गजबजलेले असतात. तेथें गेलेले पुण्यवान पुरुष सर्व इच्छा परिपूर्ण होत असल्यामुळें सुखानें व शांतपणें विचित्र रमणीय विमानांतून विहार करतात व त्यांच्यासाठीं अप्सरांचे थवे नृत्य करीत असतात. गाय देणाराला ह्या स्थानांची प्राप्ति होते. त्यांचा अधिपति जो पूषादेव तो बलवान्, ऐश्वर्यांत वरुणासारखा व नांवानें युगन्धर आहे. ‘सुरूपा बहुरूपाश्च विश्वरूपाश्च मातरः प्राजापत्यम्’ हा मंत्र व्रतस्थ राहून जो जपेल व गाईची शुश्रूषा करीत तिच्या मागून नित्य जाईल, त्याच्यावर गाई संतुष्ट होऊन त्याला दुर्लभ वरहि देतील. मनानेंहि गोद्रोह करूं नये. तिची नित्य नमस्कारपूर्वक पूजा करावी, म्हणजे मनुष्य आनंदित होऊन गाईची समृद्धि भोगतो. तीन दिवस उष्ण गोमूत्र प्यावें, त्यावर तीन दिवस उष्ण गोदुग्ध प्यावें, व नंतर तीन दिवस कढत तूप प्यावें. पुढें तीन दिवस वायुभक्षण करावा व ज्याच्या योगानें देव उत्तम लोकाचा उपभोग घेतात तें अत्यंत पवित्र असें तूप मस्तकावर ठेवावें. तुपानें अग्नीचें हवन करून स्वस्ति स्वस्ति असें म्हणावें व तूप पिऊन त्याचें दान करावें म्हणजे गाईचें वैभव भोगावयास मिळतें. गाईच्या शेणांतून काढलेल्या यवाच्या कणांवर एक महिना राहिल्यास ब्रह्महत्येसारखें पापहि धुवून निघतें. दैत्यांनीं पराभव केला असतां देवांनीं हें व्रत शुद्धीसाठीं केलें, तेव्हां ते पुनः देवत्वाला पावून बलिष्ठ झाले. गाई पवित्र व पुण्यकारक असल्यामुळें त्यांच्या दानानें मनुष्य स्वर्गास जातो. पवित्र होऊन गाईच्या गोठ्यांत शुद्ध पाण्यानें आचमन करून गोमती मंत्र जपल्यास मनुष्य निष्पाप होतो. अग्नींच्या मध्यभागीं

गाईंच्या मध्यें, किंवा ब्राह्मणांच्या सभेंत, वेद पठन केलेल्या पुण्यवान् ब्राह्मणांनीं गोमती मंत्राचा शिष्यांना पाठ द्यावा. तीन दिवस उपोषण करून गोमती मंत्र जपल्यास त्याचें फळ मिळतें. ज्याला पुत्र पाहिजे त्याला पुत्र मिळतो, धनेच्छूला धन मिळतें, पतीची इच्छा करणारीला पति मिळतो व सामान्यतः माणसाच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. सेवेनें संतुष्ट झालेल्या थोर मनाच्या गाई सर्व मनोरथ पुरवितात. रोहिणी गाईपेक्षां श्रेष्ठ असें कांहींच नाहीं.' भीष्म म्हणतो, युधिष्ठिरा असें व्यासानें सांगितलें असतां तो महातेजस्वी शुक नित्य गाईची पूजा करूं लागला; तशीच तूंहि कर. १३. १. ८१.

---

## अध्याय ८२ वा.

[ १ लक्ष्मी व गाई यांचा संवाद; गाईच्या शेणाचें माहात्म्य. ]

( १ ) **युधिष्ठिर:**—हे पितामहा, गाईंच्या शेणांत लक्ष्मी वास करते असें मीं ऐकिलें आहे, तरी त्याविषयीं सत्य काय हें ऐकण्याची माझी इच्छा आहे.

**भीष्म:**—युधिष्ठिर राजा, याविषयीं गाईंचा लक्ष्मीशीं झालेला प्राचीन संवाद आहे. एकदां लक्ष्मी आपलें शरीर नीटनीटकें करून गाईंच्या कळपांत गेली. तेव्हां तिचें तें ऐश्वर्यशाली रूप पाहून त्यांना विस्मय वाटला. त्या म्हणाल्या, 'देवि, तूं कोण आहेस, व कोठून आलीस? तुझें लावण्य तर जगांत अप्रतिम आहे. आम्हीं तुझ्या रूपवैभवानें चकित झालों आहों. तूं कोण व तुला कोठें जावयाचें आहे हें जाणण्याची आमची इच्छा आहे, तरी काय सत्य असेल तें आम्हाला सर्व सांग.'

गाईंचा प्रश्न ऐकून लक्ष्मी म्हणाली, 'गाईंनो, तुमचें कल्याण असो, मीं सर्व जगांत सुंदर अशी प्रसिद्ध असून मला लक्ष्मी म्हणतात. मीं दैत्यांचा त्याग केल्यामुळें ते आज अनेक वर्षें नष्टप्राय झालेले आहेत. मी आतां देवांचा आश्रय केल्यामुळें, ते कित्येक वर्षें सुखोपभोग घेत आहेत. इन्द्र, सूर्य, चन्द्र, विष्णु, आप, अग्नि इत्यादि देव तसेच ऋषि व देवता यांना यश मिळालें असून हे गाईंहो, ज्यांच्यांत मी जात नाहीं ते सर्वथा नष्ट होतात. धर्म, अर्थ व काम हे माझ्याचमुळें मिळतात. अशा प्रभावाची मी आहें. तुम्हां सर्वांमध्यें रहावें अशी इच्छा मला झाल्यामुळें मी येथें येऊन तुमची प्रार्थना करीत आहें, तरी तुम्हीं लक्ष्मीनें युक्त व्हा.' गाईंनीं उत्तर दिलें, 'तूं

धरसोड वृत्तीची चंचल असून पुष्कळांच्या मागून तूं सामान्यतः जातेस, यास्तव तुझी आवश्यकता आम्हाला नाहीं, तुला गोड वाटेल तिकडे तूं जा. आम्ही साऱ्या सुबक शरीराच्या असल्यामुळें तुझ्याशीं आमचें प्रयोजन काय ? तुला इष्ट वाटेल तिकडे जा. तुझ्याशीं आमचें कार्य होऊन गेलें आहे.'

लक्ष्मी म्हणाली, 'गाईनो, माझा स्वीकार तुम्हीं करीत नाहीं हें तुम्हांला बरें दिसतें काय ? मीं वस्तुतः दुर्लभ असतां माझा तुम्हीं कां स्वीकार करीत नाहीं ?' कोणतीहि गोष्ट न मागतां दारीं चालत आली म्हणजे ती झिटकारिली जाते अशी लोकांत म्हण आहे, ती खरी दिसते ! माणसें तर मोठें खडतर तप करून माझी सेवा करतात, तसेच देव, दानव, गन्धर्व, पिशाच, नाग व राक्षस हेहि करतात. तुम्हीं प्रतापशाली आहां तरी आमचा स्वीकार करा. माझी अवहेलना त्रैलोक्यांत कोणी करीत नाहींत.' लक्ष्मीच्या बोलण्यावर गाई म्हणाल्या, 'देवि, आम्ही तुझी अवहेलना करीत नाहीं व तुझा तिरस्कारहि करीत नाहीं. तूं धरसोडीची व चंचल मनाची आहेस, म्हणून तुझी संगति आम्हीं टाळीत आहों. अधिक बोलून काय उपयोग ? तुझी इच्छा असेल, तिकडे तूं जा, आम्ही साऱ्या ठाकठीक आहों, तुझ्यावांचून आमचें कांहीं अडलेलें नाहीं.'

लक्ष्मी म्हणाली, 'गाईनो, तुम्हींच माझी अवज्ञा केल्यास सर्व लोक तसेंच करतील, तरी तुम्ही मजवर कृपा करा. हे भाग्यशाली गाईनो, तुम्ही माझा आधार आहांत. मी तुम्हांला शरण आलेली आहें. तरी माझें रक्षण करा. तुमच्याकडून मला मान्यता मिळावी अशी माझी इच्छा आहे. तरी तुमच्या कोणत्यातरी बऱ्यावाईट अंगांत मी वास करूं इच्छितें. तसें म्हटलें तर तुमच्या शरीरांत वाईट असें अंगच दिसत नाहीं. तुम्ही पुण्यकारक, पवित्र, व सुंदर आहां. यास्तव कोठेंतरी मला आधार द्या. मग कोठें राहूं सांगा बरें ?' लक्ष्मीनें असें म्हटलें असतां दीनवत्सल अशा त्या गाईंना दया आली व त्यांनीं आपसांत विचार करून तिला उत्तर दिलें. त्या म्हणाल्या, 'हे देवि, आम्ही तुझा मान अवश्य करूं. आमचें शेण व मूत हीं पवित्र आहेत, तरी त्यांत तूं रहा.'

लक्ष्मी म्हणाली, 'माझ्या भाग्यानेंच तुमची मजवर कृपा झाली. ठीक आहे, तसें करतें. तुमचें कल्याण असो. तुम्हीं माझा खरोखरच बहुमान केला.' याप्रमाणें निश्चय झाल्यावर लक्ष्मी तेथेंच गुप्त झाली. गाईच्या शेणाचें माहात्म्य हें असें आहे, तें मी तुला सांगितलें. आणखी गाईचें महात्म्य सांगतों, तें ऐक.
१३. १. ८२

## अध्याय ८३ वा.

[ १. गोलोकवर्णन; ब्रह्मदेव आणि इन्द्र यांचा संवाद. ]

( १ ) **भीष्म :**—युधिष्ठिरा, जे गोप्रदान करतात किंवा यज्ञांत अवशिष्ट राहिलेलें अन्नच खाऊन रहातात, त्यांचींच सत्रें आणि यज्ञ सार्थ होतात. दहीं व तूप यांवांचून यज्ञ चालूच होत नाहीं. म्हणून यज्ञाचा यज्ञपणा कशांत आहे व त्याचें मूळ काय हें सांगतों. सर्व दानांत गोदान उत्तम होय. गाई पवित्र व श्रेष्ठ असल्यामुळें गोदानहि उत्तम व पवित्र करणारेंच होय. वैभवेच्छूनें व शांतीची इच्छा करणाऱ्यानें गाईचें दूध, दहीं व तूप सेवन करावें म्हणजे तो सर्व पापापासून मुक्त होतो. इहपरलोकीं गाई हेंच मोठें तेज आहे असें म्हणतात. गाईहून अधिक पवित्र कांहींच नाहीं.

राजा, याविषयीं ब्रह्मदेव व इन्द्र यांमधील प्राचीन संवाद प्रसिद्ध आहे. पूर्वी देवदैत्यांच्या युद्धांत दैत्यांचा पराभव झाला असतां इन्द्र त्रिभुवनाचा स्वामी झाला व सत्य आणि धर्म यांची आवड असणाऱ्या सर्व लोकांना हर्ष झाला. मग ऋषि, गंधर्व, किन्नर, नाग, राक्षस, देव, असुर, पक्षी व प्रजापति ब्रह्मदेवापाशीं आले. नारद, पर्वत, हे मुनि व विश्वावसु, हाहा, हूहू हे गंधर्व दिव्य ताना घेऊन गात गात त्या प्रभूची उपासना करूं लागले. वायूनें दिव्य पुष्पें तेथें वाहून आणिलीं. ऋतूंनीं आपआपल्या परीनें सुगंधी फुलें पुढें केलीं. अशा त्या प्रसंगींच्या देवसमुदायांत सर्व प्राणिमात्र जमले असून दिव्यवाद्यें वाजत असतां व अप्सरा व चारण यांचें गायन चाललें असतां, ब्रह्मदेवाला नमस्कार करून इन्द्र त्याला म्हणाला, ' हे पितामहा, गाईचें स्थान देवांच्या स्थानाच्या वर आहे तें काय म्हणून हें जाणण्याची मला इच्छा आहे. देवा, गाईनीं असें तप किंवा ब्रह्मचर्यासारखें व्रत काय केलें आहे कीं तेणेंकरून त्यांना देवांच्या वर सुखानें रहातां येत आहे ?' इन्द्राचा प्रश्न ऐकून ब्रह्मदेव म्हाणाला, ' इन्द्रा, तूं आजवर सदा गाईची अवज्ञा करीत आला आहेस. म्हणून, बेट्या, तुला त्यांचें महत्त्व समजून आलेलें नाहीं. त्यांचा पराक्रम मोठा आहे, तसें महत्त्वहि फार आहे. गाईना यज्ञाचें अंग म्हणतात. किंबहुना, त्या यज्ञच होत. त्यांच्याशिवाय यज्ञ चालूच होणार नाहीं. त्या आपल्या दुधानें व तुपानें मनुष्यांचें पोषण करतात. त्यांचे पुत्र म्हणजे बैल शेतीचें काम करून विविध धान्यें व बीजें उत्पन्न करितात. त्या धान्यामुळें यज्ञ, हव्य, कव्य इत्यादि कृत्यें साध्य

होतात. त्या भूक व तहान सहन करून लोकांना दूध, तूप, दहीं इत्यादि निर्माण करून देतात. त्यांचा व्यवहार अगदीं सरळ असून ऋषि व प्रजा यांचें त्या आपल्या पुण्यकर्मानें पोषण करतात. इन्द्रा, या कारणास्तव त्यांना देवांच्या वरचें स्थान मिळालें आहे. त्यांना इतरांकडून वर मिळालेले असून त्याहि लोकांना वर देण्यास समर्थ आहेत. त्या पवित्र, शुभलक्षणी व पावन करणाऱ्या असल्यामुळें त्याच कार्यासाठीं त्या भूलोकीं आल्या आहेत. त्या संबंधाची सविस्तर कथा मीं तुला सांगतों, ती ऐक.

पूर्वी देवयुगांत मोठे देवेन्द्र त्रिभुवनाचें राज्य करीत असतां, विष्णु घोर तप करणाऱ्या अदितीच्या गर्भांत होता. एका पायावर उभी राहून पुत्रप्राप्तीसाठीं तीहि तपश्चर्या करीत होती. तिला पाहून सुरभि नांवाची दक्ष कन्याहि तसेंच तप करूं लागली. तिनें कैलास पर्वताच्या देव व गंधर्व रहात असलेल्या शिखरावर एका पायावर उभें राहून योगाच्या साह्यानें अकरा सहस्र वर्षें तप केलें. त्या कडक तपानें देव, ऋषि, नाग हे संतप्त झाले व तिच्या जवळ माझ्यासंगें जाऊन तिची सेवा करूं लागले. मग मीं त्या तपस्विनीला म्हटलें, हे सच्छील देवि, तूं हें घोर तप कशासाठीं करीत आहेस? मीं तुझ्यावर या तुझ्या तपामुळें संतुष्ट झालों आहें. तुला इच्छा असेल तो वर माग, तो मीं देतों.' माझें म्हणणें ऐकून सुरभि म्हणाली, 'देवा, मला वर काय करावयाचा? तूं माझ्यावर संतुष्ट झालास, हाच मोठा वर होय.' इन्द्रा, मग मीं तिला सांगितलें, 'हे सुरभि, तुझ्या निर्लोभी-पणामुळें तर मीं अधिकच प्रसन्न झालों आहें, तर मी तुला अमरत्व देतों. तूं तिन्ही लोकांच्या वरतीं रहाशील व माझ्या कृपेमुळें गोलोक प्रसिद्ध होईल. शुभ कर्में करणाऱ्या तुझ्या सर्व कन्या मनुष्यलोकीं रहातील. तुझ्या मनांत येतील ते सर्व दिव्य किंवा मानुष भोग तसेंच सर्व सुख तुला प्राप्त होईल.' इन्द्रा, या माझ्या वरामुळें तिचें स्थान सर्व भोगांनीं युक्त झालेलें असून तेथें जरा, मृत्यु व अग्नि यांचा संपर्क पोंचत नाहीं. तेथें वाईट दैव असें नाहींच. सर्व वस्तु तेथें दिव्य असून विमानें इच्छेस येईल तिकडे घेऊन जाणारीं आहेत. इन्द्रा, त्या गोलोकाची प्राप्ति करून घेणें, तर मोठ्या प्रयत्नानें इंद्रियदमन करून ब्रह्मचर्य, तप, विविध दानें, तीर्थाटनें, दुसरें कांहीं पुण्यकर्म, यांनींच ती होणें शक्य आहे. आतां तूं विचारल्याप्रमाणें तुला मीं सर्व सांगितलें आहे, तरी यापुढें गाईचा उपमर्द करूं नकोस.'

याप्रमाणें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकल्यानंतर इन्द्र नित्य गाईची सन्मानपूर्वक

पूजा करूं लागला. युधिष्ठिरा, गोमाहात्म्य तुला आतांपर्यंत सविस्तर सांगितलें. तें अत्यंत पवित्र असून हव्यकव्य, यज्ञ, श्राद्ध, इत्यादि प्रसंगीं जो हें ब्राह्मणांना सांगेल, त्यांच्या पितरांना तें उपयुक्त होईल. गोभक्ताला जें मनांत येईल तें प्राप्त होतें. स्त्रिया गाईंची भक्ति करितील, तर त्यांनाहि सर्व इष्ट वस्तु प्राप्त होतील. पुत्रार्थीला पुत्र मिळेल व कन्येच्छूला कन्या मिळेल, धनेच्छूला धन व धर्मेच्छूला धर्म प्राप्त होईल; विद्यार्थ्याला विद्या येईल, व सुखेच्छूला सुख मिळेल. गोभक्ताला दुर्लभ असें कांहींच उरत नाहीं. १३.१.८३.

---

## अध्याय ८४ वा.

[ १. सुवर्णोत्पत्तीची कथा; शास्त्रप्रामाण्याचें माहात्म्य. ]

(१) **युधिष्ठिर**:—आजोबा, आपण आतांपर्यंत गोदानाचें महत्त्व, विशेषतः धर्मेच्छु राजांना कसें आहे तें सांगितलें. ज्यांचें अंतःकरण शुद्ध नाहीं त्यांना राज्य हें नित्य दुःखप्रदच होतें. सामान्यतः राजांना उत्तम गति मिळणें कठीणच. त्यांतल्या त्यांत भूमिदान करणारे पवित्र होतात. इतर सर्व धर्महि आपण मला सांगितले. नृगराजानें कसें गोदान केलें, नाचिकेत ऋषीनें कसें केलें हेंहि सांगून झालें. सर्व कर्में व यज्ञ यांत दक्षिणा म्हणून भूमि, गाई व सोनें हींच वेदांत व उपनिषदांत उत्तम आहेत हेंहि कथन केलें. त्यांत सोन्याचें महत्त्व वेदांत विशेषेंकरून सांगितलें आहे, तर तें सोनें केव्हां व कसें उत्पन्न झालें, त्याचें स्वरूप काय, त्याची देवता कोण, त्याचें फळ काय, त्याला महत्त्व कां देतात, त्याचें दान ज्ञाते श्रेष्ठ कां मानतात, यज्ञादि कर्मांत दक्षिणेसाठीं तेंच उत्तम कां, भूमि व गाय यांहूनहि त्याची योग्यता अधिक काय म्हणून, हें सर्व मला सांगा.

**भीष्म**:—राजा युधिष्ठिरा, सोन्याच्या उत्पत्तीसंबंधानें व इतर प्रश्नासंबंधींचा अनुभव मी तुला सविस्तर सांगतों, ऐक. माझा तेजस्वी पिता शांतनु स्वर्गस्थ झाल्यावर त्याचें श्राद्ध करण्याच्या हेतूनें मीं गंगातीरीं गेलों. तेथें जाऊन श्राद्धाला मीं आरंभ केला व माता गंगेनेंहि मला त्यांत साह्य केलें. मग तपसिद्धि मिळविलेल्या अनेक ऋषींना पुढें बसवून पाणी देण्यापासूनच्या कार्याला मीं आरंभ करून तें पुरें केलें आणि पित्याला विधियुक्त पिंड द्यावयास लागलों. त्यावेळीं त्यासाठीं पसरलेले दर्भ दूर करून सुंदर बाहुभूषणांनीं अलंकृत असा बाहु वर आला.

तो पहातांच मला विस्मय वाटला व माझा पिता प्रत्यक्ष पिंड घेण्यास हात पुढें करीत आहे असें वाटलें; पण शास्त्राचा विचार करतांच मला समजून आलें कीं, प्रत्यक्ष हात पुढें करणें हा विधि वेदांत सांगितलेला नाहीं. तेव्हां मनुष्यानें पिंड दर्भावरच दिला पाहिजे, असें मनानें घेऊन पित्याच्या हस्ताचा अनादर केला व शास्त्राला प्रमाण मानून पिंडदानाच्या विधीप्रमाणें दर्भावरच पिंड दिला. तेव्हां तो पित्याचा हस्त गुप्त झाला. मग माझ्या पितरांनीं स्वप्नांत मला दर्शन दिलें व संतुष्ट होऊन सांगितलें कीं 'तूं शास्त्राला अनुसरलास व धर्माविषयीं मोह पावलास नाहीं, हें पाहून आम्ही संतुष्ट झालों आहों. तूं धर्म, वेद, शास्त्रें, गुरु यांचें प्रामाण्य अबाधित राखलेंस, हें फार उत्तम झालें. पण आतां भूमि किंवा गाई यांच्या जागीं दक्षिणा म्हणून सोनें दे; म्हणजे आम्ही आमच्या पितामहासह सर्वजण पवित्र होऊं; कारण सोनें हें मोठें पवित्र करणारें आहे. सुवर्णदान करणारे पूर्वीच्या दहा व पुढील दहा पिढ्यांना उद्धरतात.' पितरांचें भाषण ऐकून मीं विस्मित झालों व जागा होऊन दुसऱ्या दिवशीं सुवर्णदान केलें.

युधिष्ठिरा, याविषयीं दुसरीहि एक इतिहासांतील जामदग्न्याची कथा तुला मी सांगतों, ती ऐक. पूर्वीं जमदग्निपुत्र रामानें तीव्र रागाच्या भरांत एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली. मग ती सर्व पृथ्वी जिंकून ब्राह्मणक्षत्रियांनीं मान्य केलेला असा अश्वमेध यज्ञ त्यानें केला. तो यज्ञ सर्व कामना पुरविणारा, सर्व प्राण्यांना पावन करणारा, तेज वाढविणारा व पापनाशक आहे; तरी त्याच्या मनाला मोकळेपणा कधीं आला नाहीं. म्हणून तो यज्ञ झाल्यावर रामानें वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मणांना व देवांना विचारलें, 'महाराज, उग्र कर्म करणाऱ्या मनुष्यांना पावन करणारें काय आहे तें सांगा.' क्षत्रियनाश केल्यामुळें त्याला मनांतून खिन्नता आली होती. त्याचा प्रश्न ऐकून ते वेदशास्त्रज्ञ ऋषि म्हणाले, 'रामा, वेदांत सांगितल्याप्रमाणें ब्राह्मणांना पुनः एकदां सत्कारपूर्वक बोलावून त्यांच्यापुढें हा प्रश्न मांड व ते जसें सांगतील तसें कर.' त्याप्रमाणें रामानें वसिष्ठ, अगस्त्य, काश्यप, यांना त्यासाठीं बोलावून म्हटलें, 'ब्राह्मणहो, मी क्षत्रियवधाच्या पातकापासून कसा सुटेन अशी मला चिंता लागून राहिली आहे. त्यासाठीं मी काय व्रत किंवा दान करूं? तुमची माझ्यावर कृपा असेल तर मी कोणत्या उपायानें पावन होईन तें मला सांगा.'

तेव्हां ऋषींनीं उत्तर दिलें, 'भार्गवा, आम्हीं ऐकत आलों आहों कीं पाप

ालेल्या माणसानें गाई, भूमि व द्रव्य यांचें दान केल्यास तो पावन होतो. सरें तसेंच मोठें पवित्र करणारें दान सांगतों, तें ऐक. तेंहि अग्नीपासून उत्पन्न ालेलें आहे. आम्हीं असें ऐकिलें आहे कीं, महादेवाच्या वीर्यापासून लोक ळून गेल्यावर तें निर्माण झालें. त्याला सुवर्ण असें नांव असून त्याच्या दानानें ला सिद्धि मिळेल.' मग वसिष्ठ रामाला म्हणाला, 'रामा, अग्नीसारखें तेजस्वी सें हें सुवर्ण मूळ झालें कसें, ऐक. त्याच्या दानामुळें तुला इष्ट फल मिळेल. ाला सुवर्ण कां म्हणतात, त्याचे गुण काय, हें सर्व मीं तुला सांगतों, ऐकून . सुवर्ण हें अग्नि व सोम यांचेंच स्वरूप होय. शास्त्रांत सांगितलें आहे कीं, ाज म्हणजे अग्नि, मेंढा म्हणजे वरुण, सूर्य म्हणजे घोडा, हत्ति, हरिण, नाग व ाहिष म्हणजे असुर, कोंबडे व वराह हे राक्षस, पृथ्वी म्हणजे यज्ञ, दूध म्हणजे ोम, सगळ्या जगाचें मन्थन करून त्यांतून उत्तम रत्नरूप सुवर्ण बाहेर काढण्यांत ालें. म्हणून देव, गंधर्व, राक्षस, मनुष्यें, पिशाच, हे सर्व प्रयत्नपूर्वक तें अलं- ार म्हणून धारण करतात. मुकुट, बाहुभूषणें, इत्यादि नाना प्रकारच्या सुव- र्णांच्या विकृति अलंकार म्हणून प्रसिद्ध आहेत. यास्तव सर्व पवित्रवस्तु, भूमि, ाई यांपेक्षांहि तें श्रेष्ठ आहे. भूमि किंवा गाई यांच्या दानापेक्षां सुवर्णदान ार श्रेष्ठ आहे. कधीं नाश न पावणारें व शुद्धिकारक असें सुवर्ण उत्तम ब्राह्म- ांना दान द्यावें. दक्षिणा म्हणून सर्वत्र सुवर्णच सांगितलें आहे. सुवर्ण देणाराला ्तर सर्व वस्तु दिल्याचें श्रेय मिळतें. सुवर्णदाता देवतादानच करतो; कारण ाग्नि म्हणजे देवांचा देव असून सुवर्ण त्याचेंच स्वरूप आहे.'

वसिष्ठ म्हणतो, 'हे रामा, सुवर्णाचें आणखीहि माहात्म्य सांगतों, तें ऐक. ्वीं ब्रह्मदेवाच्या तोंडून तें मीं ऐकिलें आहे. भगवान् रुद्रानेंहि तें सांगितलें ोतें. भार्गवा, हिमालय पर्वतावर देवी पार्वतीचा विवाह उरकल्यानंतर तिचा ागवंताशीं समागम झाला, तेव्हां सर्व देव उद्विग्न होऊन शंकराकडे गेले. महा- ्व देवी पार्वतीसह बसला होता. त्यांना नमस्कार करून ते म्हणाले, 'देवा, ्झा हा जो देवी उमेशीं संबंध घडला आहे, तो तपस्व्याचा तपस्विनीशीं, ाजस्व्याचा तेजस्विनीशीं होय. तूं व उमादेवी अमोघवीर्य आहां. तेव्हां तुमचें ापत्य अत्यंत बलसंपन्न होऊन जगांत कांहीं उरूं देणार नाहीं. यास्तव या शरण ालेल्या ऋषिदेवादिकांवर दया कर व त्रैलोक्याच्या हिताचाहि विचार कर. ापत्याप्रीत्यर्थ आपल्या तेजाचा निग्रह कर. तुमचें सामर्थ्य त्रैलोक्याहून अधिक ासल्यामुळें लोकांना संताप देत आहे व तुमचें अपत्य देवांना त्राहि त्राहि करून

सोडील. तें धारण करावयास पृथ्वी, आकाश किंवा स्वर्गहि समर्थ नाहीं, असें मला वाटतें. तुझ्या तेजाच्या प्रभावानें सारें जग जळून जात आहे. तरी आमच्यावर कृपा कर आणि उमादेवीच्या ठिकाणीं तुझ्यापासून पुत्र न होईल असें कर. आपलें हें जळणारें तेज धैर्यानें आवरून घे.' देवांचें असें बोलणें झालें असतां शंकरानें 'ठीक आहे' असें देवांना सांगितलें व वीर्य आवरून घेतलें. तेव्हांपासून तो ऊर्ध्वरेता झाला. पण आपल्या संततीचा उच्छेद झालेला पाहून देवी पार्वतीला राग आला व आपल्या स्त्रीस्वभावाला अनुसरून तिनें देवांना कठोर शब्दांनीं शाप दिला. ती म्हणाली, 'देवहो, ज्या अर्थीं अपत्याची इच्छा असलेल्या माझ्या पतीला तुम्हीं निवृत्त केलें, त्याअर्थीं तुम्हीं सर्व देव निपुत्रिक व्हाल. तुम्हीं माझा संततीचा उच्छेद केला, यास्तव तुम्हांलाहि कोणाला संतति होणार नाहीं.' पण, रामा, पार्वतीनें हा शाप दिला तेव्हां अग्नि मात्र तेथें नव्हता. तेव्हां इतर देव मात्र आपल्या देवींसह निःसंतान झाले. रुद्रानें आपलें तेज आवरून घेतलें खरें, पण त्यांतील कांहीं भाग तेथें भूमीवर पडलाच. तो अग्नींत जाऊन पडला व तेथें अद्भुत रीतीनें वाढूं लागला. तेज तेजांत मिळाल्यामुळें तें आपल्या मूळ स्वरूपावर गेलें.'

वसिष्ठ म्हणतो, 'रामा, इकडे त्याच सुमारास तारक नांवाच्या असुरानें इन्द्रादि देवांना अगदीं भंडावून सोडिलें. आदित्य, वसु, रुद्र, मरुत्, अश्विनी कुमार, साध्य, हे सर्व त्या तारक दैत्याच्या पराक्रमानें अगदीं गांगरून गेले. असुरांनीं देवांचीं घरें, विमानें, नगरें तसेच ऋषींचे आश्रम हे लुटून नेले. तेव्हां दीन झालेले ते सर्व देव व ऋषि ब्रह्मदेवाला शरण गेले.' १३. १. ८४.

---

## अध्याय ८५ वा.

[ १. सुवर्णोत्पत्तीची कथा पुढें चालू ]

देव ब्रह्मदेवाला म्हणाले, 'प्रभो, तारक नांवाचा असुर तूं वर दिल्यामुळें बलिष्ठ होऊन देव आणि ऋषि यांना क्लेश देत आहे, तरी त्याच्या वधाचा कांहीं उपाय काढ. आम्हांला त्याच्यापासून मोठें भय उत्पन्न झालें आहे. तरी आमचें रक्षण कर; देवा, आम्हांला तुझ्याशिवाय कोणाचा आधार नाहीं.'

ब्रह्मदेव—मीं सर्व प्राण्यांशीं सारखाच वागणारा आहें. मला अधर्म रुचत नाहीं. तरी देव व ऋषि यांना पीडा देणाऱ्या तारकाचा वध लवकरच होईल.

वेद व धर्म यांचा उच्छेद होणें योग्य नाहीं. देवहो, यास्तव मीं पूर्वींच त्याची सारी व्यवस्था करून ठेविली आहे. तरी तुम्हीं आतां निश्चिंत असा.

देव:—भगवन्, तुमच्या वरदानानेंच तर तो दैत्य बलवान् होऊन गर्व करीत आहे. देवांना त्याचा वध करणें शक्य नाहीं. मग तो आटोपणार कसा? हे पितामहा, देव व असुर किंवा राक्षस यांच्याकडून आपला वध होऊं नये, असा वर तो तुमच्याकडून घेऊन गेलेला आहे. देवांना तर पूर्वीं उमेनें शाप दिला व त्यामुळें त्यांना अपत्य होणें शक्य नाहीं.

ब्रह्मदेव:—देवहो, उमादेवीनें शाप दिला तेव्हां अग्नि तेथें नव्हता, तेव्हां त्या असुराच्या वधाला समर्थ असें अपत्य तो उत्पन्न करील. तें अपत्य देव, दानव, राक्षस, मनुष्यें, गंधर्व, नाग, पक्षी यांच्याहून बलवत्तर होऊन अमोघ अस्त्राच्या माऱ्यानें तुम्हांला भयप्रद झालेल्या दैत्याचा वध करील. अक्षय असा जो मन:संकल्प त्यालाच काम म्हणतात. रुद्रदेवाचें वीर्य स्खलन पावून जें अग्नींत पडलें आहे, त्यापासून दुसरा अग्निच असें महाभूत अग्नि गंगेंत उत्पन्न करील व तेणेंकरून देवशत्रूंचा नाश होईल. तुमचें भय नष्ट करणारा पावकि तेथून जन्मास येईल. शापाच्या वेळीं अग्नि कोठें पळाला होता, त्याला शोधून काढा व त्याची या कामीं योजना करा. देवहो, तारकाचा वध करण्याचा उपाय मीं तुम्हांला सांगितला. तेजस्व्यांचे शाप तेजस्व्यांना बाधत नाहींत. अवध्य अशांचाहि वध तपस्वी करूं शकतात. अतिबलिष्ठांशीं प्रसंग आला असतां बलिष्ठहि दुर्बल ठरतात. तुमच्या इच्छेप्रमाणें तुम्हीं अग्नीची प्रार्थना करावी म्हणजे तो ती पूर्ण करील. तो अतिप्राचीन असून त्याला ओळखून काढणें कठीण आहे. तो वाटेल तेथें जाणारा, जगाचा पति, वाटेल तेथें रहाणारा, हृदयांत वास करणारा, व रुद्रापेक्षांहि श्रेष्ठ आहे.

ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून आपलें कार्य झालें असें देवांना वाटलें व ते अग्नीचा शोध करावयास निघाले. त्यांनीं व ऋषींनीं मिळून त्याला शोधण्यासाठीं सारें त्रिभुवन धुंडाळिलें. ते मोठे तपस्वी, श्रीमान् व लोकप्रसिद्ध होते. पण आपल्यांतच लीन होऊन राहिलेला तो गुप्त अग्नि त्यांना सांपडला नाहीं. मग अग्निदर्शनाच्या उत्कंठेमुळें अगदीं त्रासून गेलेल्या त्यांना अग्नितेजानें भाजून चाललेला पाण्यांतील बेडूक बाहेर येऊन म्हणाला, ' देवहो, अग्नि रसातळाच्या तळीं असून त्याची धग लागल्यामुळेंच मीं वर आलों आहें. तो तेथें झोंपीं

गेला आहे. आपल्या तेजानें त्यानें जल उत्पन्न केल्यामुळें त्यानें आमचा दाह झाला. तुम्हांला तो दिसावयास पाहिजे, तर तुम्ही तेथें जा. आम्ही आतां जातों, आम्हांला अग्नीची भीति वाटते.' असें बोलून बेडूक तसाच पाण्यांत निघून गेला. पण त्याचें हें लावालावीचें कृत्य अग्नीला समजून आलें व त्यानें बेडकाला शाप दिला कीं 'तुला कसली चव कळणार नाहीं.' शाप देऊन अग्नि तेथून निघून दुसरीकडे रहावयास गेला व कोणाच्या दृष्टीस पडेनासा झाला. इकडे देवांनीं बेडकावर कृपा करून त्याला काय दिलें तें सांगतों, ऐका. ते बेडकांना म्हणाले, 'अग्निशापामुळें तुम्हांला जीभ नाहींशी होऊन चव घेण्याला तुम्ही अपात्र झालांत, तरी तुम्हीं अनेक प्रकारचा शब्द काढूं शकाल; तुम्ही बिळांत जाऊन खायला प्यायला न मिळाल्यामुळें सुकून मृतप्राय झालांत तरी भूमि तुम्हांला जीवंत ठेवील; व तुम्हांला काळ्या कुट्ट अंधाऱ्या रात्रींहि फिरतां येईल.' असें बेडकांना सांगून देव पुनः अग्निशोधार्थ पृथ्वीवर भटकूं लागले. पण त्यांना तो सांपडला नाहीं.

तेव्हां इंद्राच्या ऐरावतासारखा एक हत्ती त्यांना भेटला व 'अग्नि पिंपळाच्या झाडांत आहे,' असें त्यानें त्यांना सांगितलें. अग्नीला तेणेंकरून राग आला व त्यानें 'तुमची जीभ उलटी होईल' असा त्यांना शाप दिला. त्यांना शाप देऊन तो पिंपळांतून निघाला व झोंप घेण्यासाठीं शमीवृक्षांत शिरला. इकडे देवांनीं हत्तीवर कृपा केली. ते त्यांना म्हणाले, 'तुमची जीभ उलटी वळली, तरी तुम्हांला सर्व पदार्थ खातां येतील व अस्पष्ट पण उच्च असा शब्दहि करतां येईल.' त्यांना असें म्हणून देव पुनः अग्नीचा शोध करूं लागले. पिंपळांतून शमींत येऊन बसलेला अग्नि शुकाला समजला व त्यानें देवांना त्याची वार्ता सांगितली. तेव्हां देव शमीजवळ आले. तेव्हां अग्नीनें पोपटावर रागावून त्याला शाप दिला कीं, 'तूं वाचाहीन होशील!' असें म्हणून अग्नीनें त्याची जीभ फिरवून टाकिली. पण अग्निदर्शन झाल्यामुळें देवांना पोपटाची दया आली व त्यांनीं त्याला सांगितलें, 'अगदीं वाचाहीन तूं होणार नाहींस. तुझी जीभ उलट वळली तरी तुझें बोलणें मनोहर होईल व मुलें किंवा वृद्ध माणसें यांच्या सारखें अस्पष्ट तुला बोलतां येईल.' असें सांगितल्यावर देवांनीं अग्नि शमींत सांपडला म्हणून त्या वृक्षाला सर्व धर्मकार्यांत अग्नीचें घर असें ठरविलें व तेव्हांपासून अग्नि शमीवृक्षांच्या अन्तर्भागांत आढळून येतो. अग्नि निर्माण करण्याचा हा उपाय मनुष्यांना सांपडला. रसातळांतील ज्या पाण्याला अग्नीचा स्पर्श झाला,

तें पर्वतांवरून कढत पाण्याच्या झऱ्यांच्या रूपानें बाहेर पडतें, कारण अग्नीनें त्यांत शयन केलें तेव्हां त्याच्या तेजानें तें तापून गेलें. असो. देवांना पाहून अग्नीला कोठून ही कटकट आली असें वाटलें व तुम्ही येथें कां आलां असें त्यानें त्यांना विचारिलें. तेव्हां देव व ऋषि त्याला म्हणाले, 'आम्ही तुला ज्या कार्यांत योजणार आहों तें तूं अवश्य केलें पाहिजे. तें तूं केल्यास तुझ्या गुणाची महती वाढेल.'

अग्नि म्हणाला, 'देवहो, बोला काय तुमचें काम आहे तें. मी तें करतों. तुम्ही योजना मात्र करा, अधिक विचार करण्याचें कारण नाहीं.' हें ऐकून देव म्हणाले, 'तारक नांवाचा असुर ब्रह्मदेवाच्या वरानें गर्विष्ठ होऊन आपल्या शौर्यानें आम्हांला पीडित आहे, त्याचा वध कर व हे देव, हे प्रजापति व हे ऋषि यांचें रक्षण कर. असें तेजोयुक्त व वीर्यशाली अपत्य उत्पन्न कर कीं तें त्या असुरापासून आमच्यावर आलेलें संकट दूर करील. आम्हांला अपत्य होणार नाहीं, असा उमेचा शाप मिळाल्यामुळें आम्हांला तुझ्या वीर्याशिवाय दुसरा मार्ग राहिलेला नाहीं. तरी, हे प्रभो, आमचें रक्षण कर.' देवांच्या विनंतीला 'ठीक आहे, तसें करतों.' असें उत्तर देऊन अग्नि गंगेकडे गेला आणि तिच्याशीं मिश्रित होऊन तिच्यांत त्यानें गर्भ ठेवून दिला. तेव्हां तो गर्भ सुकलेल्या गवतांत अग्नि वाढावा तसा वाढूं लागला. त्याच्या तेजानें गंगानदी विव्हळ झाली व तिला तो ताप सहन होईनासा झाला. अग्नीनें तो तेजस्वी गर्भ गंगेंत ठेविला असतां एका असुरानें भयंकर नाद केला. अकस्मात् ऐकिलेल्या त्या उच्च नादामुळें गंगा घाबरून कावरीबावरी झाली व बेशुद्ध होऊन तिला तो गर्भ धरवेनासा झाला. तेव्हां गर्भाच्या बलामुळें भ्रमिष्ठासारखी होऊन ती कांपत कांपत अग्नीला म्हणाली, 'भगवन्, हा तुझा गर्भ धारण करण्यास मीं समर्थ नाहीं. त्यानें मी वेडी होऊन गेलें आहे. मला मुळींच स्वास्थ्य राहिलें नाहीं. मीं अगदीं विव्हळ झालें असून माझें मन नष्ट झाल्यासारखें वाटतें. आतां मीं हा टाकून देतें. तसें करण्याची माझी इच्छा नाहीं, पण मला दुःख सहन होत नाहीं. अग्ने, या बाबतींत बरेंवाईट जें कांहीं असेल त्याचा धनी तूंच आहेस.' अग्नि म्हणाला, 'टाकूं नको, टाकूं नको; माझ्या तेजानें युक्त असा हा गर्भ महागुणवान् आहे. तूं सगळें जग धारण करण्यास समर्थ आहेस.' अशा रीतीनें अग्नि व इतर देव गंगेचें निवारण करीत असतांहि तिनें तो गर्भ मेरु पर्वतावर टाकून दिला. तो धारण करण्यास समर्थ असतांहि रुद्रतेजामुळें तिला

तो असह्य झाला. प्रदीप्त अग्नीसारख्या त्या गर्भाला तिनें टाकून दिलें असतां अग्नीनें तो तिला दाखविला आणि तो कसा काय आहे असें तिला विचारिलें. तो म्हणाला, 'त्याचा वर्ण कसा आहे, त्याचें रूप कसें आहे, कोणत्या तेजानें तो युक्त आहे, तें सर्व मला सांग.'

गंगेनें उत्तर केलें, 'अग्ने, तो तुझ्याचसारखा तेजाचा आहे. त्याचा वर्ण सुंदर असून त्यावर मलाचा संपर्केहि नाहीं. सारा पर्वत त्यानें चकाकित करून सोडला. कमळांचा वास मिसळलेल्या तलावाप्रमाणें त्याचा गंध शीतल व कदंबाच्या फुलां-सारखा रम्य आहे. सूर्याच्या किरणासारख्या त्या गर्भाच्या तेजानें पृथ्वीवर किंवा पर्वतावर जी वस्तू प्रकाशित झाली, ती चोहोंकडून सोन्यासारखी झालेली दिसली. तो नद्या, पर्वत, झरे यांनाच काय, पण साऱ्या त्रिभुवनाला लखलखित करीत धांवत होता. अग्ने, तुझा पुत्र अशा स्वरूपाचा, तेजानें सूर्यासारखा व रमणीयतेंत चंद्रासारखा आहे.' असें सांगून देवी गंगा तेथेंच गुप्त झाली व तो तेजस्वी अग्नीसुद्धां देवांचें कार्य तडीस नेऊन आपल्या इष्ट स्थानीं निघून गेला. या त्याच्या कार्यामुळें ऋषि व देव यांनीं अग्नीचें नांव हिरणरेतस् असें ठेविलें व पृथ्वी तेव्हांपासून वसुमती म्हणजे सुवर्णयुक्त या नांवानें प्रसिद्ध झाली.

अग्नीचा तो गंगेंत वाढलेला महातेजस्वी व अद्भुत स्वरूपाचा गर्भ दिव्य लव्हाळ्यांच्या बेटांत पडून वाढूं लागला असतां बालसूर्यासारखी त्याची कांति कृत्तिकांच्या दृष्टीस पडली व त्यांनीं त्याला आपला पुत्र म्हणून आपल्या स्तनां-तील दुधानें पोसलें. त्यामुळें त्याला कार्तिकेय हें नांव मिळालें. तो प्रथम स्कन्न म्हणजे गलित झाला म्हणून त्याला स्कंद म्हणतात, पुढें तो गुहेंत राहिला म्हणून गुह नांवानें प्रसिद्ध झाला. याप्रमाणें अग्नीची संतति म्हणून सुवर्णाची उत्पत्ति झाली. त्यांत जांबूनद नांवाचें सुवर्ण श्रेष्ठ असून देवतांचेंहि तें भूषण आहे. तेव्हांपासून हें सोनें रत्नांतील उत्तम रत्न व भूषणांतील उत्तम भूषण होऊन बसलें. तें सर्वांत पवित्र व मंगल असून अग्निस्वरूपी किंवा प्रजापति स्वरूपीच आहे.'

वसिष्ठ म्हणतो, 'हे भार्गव रामा, पूर्वीं मीं ब्रह्मदेवाचें एक वृत्त ऐकिलें आहे. रुद्रानें वरुणरूप घेऊन यज्ञ केला तेव्हांचें तें आहे. त्या रुद्रयज्ञाला सर्व मुनि व अग्नीसह सर्व देव आले होते. तशींच वषट्कारादि सर्व यज्ञांगें, सामें, सहस्रावधि यजुर्मंत्र, पदक्रमासह ऋग्वेद, स्वर, स्तोभ, निरुक्त, ओंकार, निग्रह, इत्यादि सारे

मूर्तिमंत उपस्थित होते. वेद, उपनिषदें, सावित्री, भूतभविष्य इत्यादि काळ हेहि त्या शिवयज्ञाला आले. अशा रीतीनें आपल्यांतच आपलें हवन करून रुद्रानें यज्ञ सजविला. आकाश, स्वर्ग, पृथ्वी, अग्नि, ब्रह्मदेव, शिव, रुद्र, वरुण, प्रजापति हीं सारीं त्याचींच स्वरूपें होत. सर्व प्राणिमात्राचा स्वामी तोच आहे. तो वरुणस्वरूपी महात्मा पशुपति रुद्राचा यज्ञ पहाण्यासाठीं यज्ञ, तप, क्रतु, दीक्षा, दिशा व त्यांचे स्वामी, देवस्त्रिया, देवांच्या माता हीं एकत्र जमून तेथें आलीं असतां देव-कन्यांना पाहून ब्रह्मदेवाचें रेतस्खलन झालें व तें भूमीवर पडलें. त्या रेताचे इकडे तिकडे पसरलेले कण गोळा करून पूषादेवानें ते आपल्या हातांनीं अग्नींत टाकिले. अशा रीतीनें तो यज्ञ चालला असतां व त्यासाठीं अग्नि भडकून पेटत असतां ब्रह्मदेव त्यांत हवन करीत होता. त्यावेळीं कांहीं उत्पत्ति झाली. गळलेलें तेवढें रेत पळीनें गोळा करून त्याचें तुपाप्रमाणें मंत्रयुक्त असें ब्रह्मदेवानें अग्नींत हवन केलें व त्यापासून त्यानें प्राणिसमुदाय निर्माण केले. तसेच त्याच्या त्या तेजाच्या रजोमय अंगापासून लोकांमध्यें तेजोयुक्त जंगम सृष्टि उत्पन्न झाली. त्या तेजांत सत्व, रज व तम असे तीन भाग होते. त्यांतील तमापासून तामस अशी स्थावर सृष्टि झाली व सत्वापासून व्यापक अशी सात्त्विक सृष्टि झाली. सत्त्वगुण हा तेजोमय असून त्यापासून आकाश झालें. सर्व प्राणिमात्रांत सत्त्व व रज अशीं दोन्ही मोठ्या प्रमाणांत असतात. असो. ब्रह्मदेवाचें तें शुक्र अग्नींत टाकिलें असतां त्यापासून सुंदर शरीराचे तीन पुरुष आपापल्या गुणानुसार उत्पन्न झाले. त्यांतील भृक् म्हणजे भडकणाऱ्या ज्वाळेपासून भृगु झाला, अंगार म्हणजे निखाऱ्यापासून अंगिरा झाला व त्यापासूनच कवि हा आणखी झाला. मरीचीपासून म्हणजे किरणांपासून मरीचि व त्यापासूनच मारीच कश्यप झाला व वालखिल्य दर्भांपासून झाले. 'अत्र अत्र' म्हणजे 'येथें येथें' झाला, असें म्हटल्यावरून त्यांतील एकाला अत्रि असें नांव मिळालें. राखेच्या राशींपासून तपस्वी व विद्वान् असे वैखा-नस उत्पन्न झाले. अग्नीच्या नेत्रांतील अश्रूंपासून सुस्वरूपी अश्विनीकुमार जन्मले व त्याच्या कानापासून प्रजापतीची उत्पत्ति झाली. केंसांच्या छिद्रांपासून ऋषि, घामापासून छंद व बलापासून मन झालें. या कारणास्तव अग्नि म्हणजे सर्व देवता असें म्हणतात. त्या अग्नींतील लांकडें म्हणजे महिने व लांकडांतून बाहेर येणारे रस म्हणजे पक्ष होत. त्याचा पित्ताशय म्हणजे अहोरात्र व प्रखर तेज म्हणजे मुहूर्त. त्याचें रक्त रुद्रस्वरूपी असून त्यापासून मित्र देवता असलेलें सोनें झालें. धुरापासून वसुदेव झाले. त्याच्या ज्वाळा म्हणजेच रुद्र व प्रभा म्हणजे

आदित्य होत. आकाशांत आपापल्या ठिकाणीं राहिलेले ग्रहनक्षत्रादि तेजोगोल त्याचे निखारे किंवा ठिणग्या होत. सृष्टीच्या आदिकर्त्यानें त्यालाच शाश्वत व सर्वश्रेष्ठ म्हटलें आहे व तो सर्व इच्छा पुरविणारा आहे, असें त्याविषयींचें रहस्य सांगितलें आहे. याप्रमाणें सर्व निर्मिति झाल्यावर वरुणस्वरूपी अग्न्यात्मक असा महादेव म्हणाला, 'हें दिव्य सत्र माझें आहे व मीं त्याचा यजमान आहें'. या सृष्टींतील पहिलीं तीन अपत्यें माझीं होत यांत संशय नाहीं, कारण माझ्याच यज्ञाचें तीं फलें आहेत.'

महादेवाच्या बोलण्यावर अग्नि म्हणाला, 'माझ्या अंगापासून माझ्या आश्रयानेंच हीं झालेलीं असल्यामुळें तीं माझींच होत; वरुण कांहीं तरी भ्रमानें बोलत आहे.' तें ऐकून सर्व लोकांचा गुरु व पितामह असा ब्रह्मदेव म्हणाला, 'छे, छे, तसें नाहीं. हीं अपत्यें माझीं होत, कारण त्यासाठीं माझ्याच रेताचें हवन करण्यांत आलें. सत्राचा कर्ता व शुक्र धातूचा होता ( हवन करणारा ) मीच असल्यामुळें 'ज्याचें बीज त्याचें फळ' या न्यायानें माझ्या शुक्रापासून झालेलीं तीं माझींच होत.' हीं सर्व बोलणीं ऐकल्यावर देव ब्रह्मदेवाजवळ येऊन त्याला हात जोडून म्हणाले, 'महाराज, आम्ही सारेजण तसेंच हें सारें स्थावरजंगम जग तुझेंच अपत्य होय. यास्तव हा अग्नि व वरुणस्वरूपी ईश्वर यांच्या मनाप्रमाणें त्यांची इच्छा पूर्ण होवो.' देवांच्या विनंतीला मान देऊन ब्रह्मदेवानें आपलें म्हणणें मागें घेतल्यामुळें वरुणानें पहिलें अपत्य भृगु हें आपल्याला घेतलें, व अंगिरसाला अग्नीच्या स्वाधीन केलें. उरलेला कवि हा ब्रह्मदेवानें घेतला. तेव्हांपासून भृगूला वारुण म्हणतात, अंगिरसाला आग्नेय म्हणतात व कवीला ब्राह्म म्हणतात. भार्गव व अंगिरस हे मोठे वंशस्थापक म्हणून प्रसिद्ध झाले. हे सर्व प्रजापति झाले व त्यांची संतति म्हणजे हे सारे प्राणिमात्र होत असें समज. भृगूला गुणांनीं त्याच्याचसारखे सात पुत्र होते. त्यांचीं नांवें च्यवन, वज्रशीर्ष, शुचि, और्व, शुक्र, वरेण्य आणि सवन अशीं होतीं. साऱ्या भार्गवांना वारुणच म्हणतात. रामा, तूंहि त्यांच्याच वंशांत झालास. अंगिरसाच्या आठ पुत्रांनाहि वारुणच म्हणतात. त्यांचीं नांवें बृहस्पति, उतथ्य, पयस्य, शांति, घोर, विरूप, संवर्त व सुधन्वा अशीं होतीं. हे सर्व आठी जण ज्ञाननिष्ठ व निरोगी होते. ब्रह्मदेवाच्या कविनामक पुत्राला आठ पुत्र असून त्यांनाहि वारुणच म्हणतात. त्यांचीं नांवें कवि, काव्य, धृष्णु, उशना, भृगु, विरजा, काशी व उग्र अशीं होतीं. या आठ कविपुत्रांपासून हें सगळें जग विस्तारलें. हे सर्व आपापल्या भागापुरते

प्रजापति होत. याप्रमाणें सर्व जगाचा विस्तार अंगिरा, कवि व भृगु यांच्या संततीच्या योगानें झाला. कवि भृगु यांना प्रथम वरुणानें घेतलें म्हणून त्यांना वारुण म्हटलें आहे. अग्नीनें अंगिरसाला घेतलें; त्याचे वंशज आंगिरस म्हणून प्रसिद्ध आहेत.

देवतांनीं एकदां ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेतलें व त्याला सांगितलें कीं, 'हे प्रजापति प्रजा उत्पन्न करून आमचा उद्धार करतील. तुझ्या कृपेनें ते या लोकांनाहि तारतील. हे सर्व सुखी व वेदवेत्ते होऊन तुझा वंश चालवितील व तेज वाढवितील. ते देवांचे पक्षपाती राहून तप करतील व कडक ब्रह्मचर्य पाळितील. हे सर्व, तसेच आम्हीहि तुझीच संतति आहों. वेद व ब्राह्मण यांना उत्पन्न करणारा तूंच आहेस. मारीचापासून सगळे भृगुवंशीय तुझी संतति होत हें लक्षांत घेऊन आम्ही एकमेकांशीं सलोख्यानें राहूं. ते याच रूपानें (शांतवृत्तीनें) प्रजा उत्पन्न करतील व युगाच्या अन्तीं पुनः आत्मस्वरूपांत त्यांचा लय करतील.' देवांनीं असें म्हटल्यावर ब्रह्मदेवानें 'तसेंच होईल' असें सांगितलें व सर्वजण आपापल्या आल्या जागीं निघून गेले. रामा, असें वृत्त वरुणाचें रूप घेतलेल्या महादेवाच्या यज्ञांत घडून आलें. ब्रह्मदेव, पशुपति शर्व, रुद्र, प्रजापति हे सारे अग्निस्वरूपीच असून सुवर्णहि अग्निपासूनच झालें. म्हणून अग्नि नसला तर त्याच्या स्थानीं सुवर्ण ठेवतात. श्रुतिप्रमाणावरून हें सिद्ध आहे व जामदग्न्याला तें ठाऊक आहे. दर्भांच्या राशीवर सुवर्ण ठेवून त्याला अग्नि समजून हवन करतात. वारुळाच्या मुखांत, अजाच्या उजव्या कानांत, गाड्यांच्या तळावर, लोकांच्या जलाशयांत, किंवा ब्राह्मणाच्या हातावर हवन दिल्यास भगवान् अग्नि त्याला आनंददायक असें वैभव समजतो व म्हणूनच सर्व देव अग्निपर आहेत असें म्हणतात. ब्रह्मदेवाहून अग्नि अधिक व अग्नीहून सुवर्ण अधिक, म्हणून जे धर्मवेत्ते सुवर्ण देतात, ते सर्व देवताच देतात असें आम्हीं ऐकलें आहे. ते उत्तम गतीला जातात व स्वर्गामध्यें कुबेर त्यांवर अभिषेक करतो. सूर्योदयीं मंत्रोच्चारपूर्वक यथाविधि जो सुवर्णदान देतो, त्याच्या दुष्ट स्वप्नांचा परिहार होतो. सूर्योदय झाल्याबरोबर जो सोनें देतो त्याचें पाप धुऊन निवतें. मध्याह्नीं सुवर्णदान करणाराचें आगामी पापहि नष्ट होतें. व्रतस्थ राहून जो संध्याकाळीं सोनें देतो, त्याला ब्रह्मा वायु अग्नि व सोम यांचें सालोक्य मिळतें व स्वर्गांत उत्तम प्रतिष्ठा प्राप्त होते. त्याला या लोकीं यश मिळून पापनाश झाल्यामुळें आनंद होतो, व परलोकीं तो अप्रतिम होऊन

बसतो. त्याच्या गतीला कोठेंहि प्रतिबंध न होतां इष्ट तिकडे त्याला जातां येतें. त्या उच्च स्थानांतून त्याला परतावें लागत नाहीं व मोठी कीर्ति मिळते. अक्षय असें सुवर्ण दिल्यानें त्याला अनेक चांगले लोक मिळतात. सकाळीं सूर्योदयाच्या वेळीं अग्नि प्रदीप्त करून व्रताच्या निमित्तानें जो सुवर्ण दान देतो, त्याला सारे इष्ट भोग भोगावयास मिळतात. सुवर्णाला अग्निच म्हणत असून त्याचें दान सुखावह आहे. सूर्यासारखेंच तेंहि इष्ट गुण देणारें असल्यामुळें सूर्यास्तानंतरहि सूर्याच्या ठिकाणीं सुवर्ण कल्पून दान द्यावें म्हणजेहि तेंच फळ मिळतें.

रामा, याप्रमाणें सुवर्णाची उत्पत्ति व कार्तिकेयाचा जन्म या कथा तुला सांगितल्या. कार्तिकेय कालान्तरानें वाढून मोठा झाल्यावर इन्द्रादि देवांनीं त्याला आपल्या सेनापतीची पदवी दिली व तदनुसार त्यानें तारक व इतर दैत्य व असुर यांचा वध केला आणि इन्द्राच्या आज्ञेनुसार वागून त्रैलोक्याचें हित साधलें. तुला सुवर्णदानाचें फळ सांगितलें आहेच, तरी आतां तूं ब्राह्मणांना सुवर्ण देत जा.'

भीष्म म्हणतो, युधिष्ठिरा, वसिष्ठानें हा उपदेश केला असतां त्या प्रतापशाली भार्गवरामानें ब्राह्मणांना सुवर्णदान करून पापापासून आपली मुक्तता करून घेतली. युधिष्ठिरा, येणेंप्रमाणें सुवर्णाची उत्पत्ति व त्याच्या दानाचें फळ हें सर्व सांगून झालें. आतां तूंहि ब्राह्मणांना पुष्कळ सोनें दे. सोनें दिल्यास तूंहि पापापासून मुक्त होशील. १३. १. ८५.

---

## अध्याय ८६ वा.

[ १ तारकासुराच्या वधाची कथा ]

( १ ) **युधिष्ठिर**:—आजोबा, श्रुतींत सांगितलेलें विधियुक्त सुवर्णदानाचें फळ आपण मला विस्तारानें सांगितलें. सुवर्णाच्या उत्पत्तीचें कारण म्हणून जो तारक दैत्य आपण सांगितला, तो वध कसा पावला, तें आतां सांगा. तो देवांना अवध्य होता असें पूर्वी सांगण्यांत आलें. तरी त्याला मृत्यु कसा आला तें विस्तारानें कथन करा.

**भीष्म**:—युधिष्ठिरा, देव आणि ऋषि यांच्या उद्देशाला खो पडल्यामुळें त्यांनीं त्या गंगेनें टाकून दिलेल्या गर्भाचें धारणपोषण करण्यासाठीं कृत्तिकांची विनवणी केली. देवतांपैकीं कोणीहि अग्नीचा तो गर्भ धारण करण्यास समर्थ नव्हतें,

पण कृत्तिका तशा होत्या. कृत्तिकांनीं त्या गर्भाचें धारण करण्याचें मान्य केलें असतां अग्नीला आनंद झाला व त्यांनीं त्या गर्भाचें पोषण केलें. अग्नीचें तें सगळें तेज त्यांनीं सहा भागांनीं वांटून घेतलें. तेव्हां त्या वाढीस लागलेल्या कुमाराच्या तेजानें विव्हळ होऊं लागलेल्या कृत्तिकांना सुख होत नाहींसें झालें. शेवटीं योग्य काळ आला असतां तेजानें ओतप्रोत भरलेल्या त्यांनीं एकाच वेळीं प्रसूत होऊन कुमाराला जन्म दिला. मग तो सहा ठिकाणचा गर्भ एकत्र आला व त्याचा सुवर्णासन्निध पृथ्वीनें स्वीकार केला. तो कुमार दिव्य स्वरूपाचा, देदीप्यमान, व अग्नीसारखा तेजाळ होता. लव्हाळयांच्या बेटांत तो वाढूं लागला. त्या सूर्यासमान तेजस्वी बालकाला पाहून कृत्तिकांच्या मनांत पुत्रप्रेम जागृत झालें व त्यांनीं आपलें स्तनांतील दूध पाजून त्याचें पोषण केलें. म्हणून तो कार्तिकेय नांवानें प्रसिद्ध आहे. त्या अद्भुत स्वरूपाच्या अग्निकुमाराला पहाण्यासाठीं तेहतीस देव, दिक्पालांसह सर्व दिशा, रुद्र, ब्रह्मदेव, विष्णु, यम, पूषा, अर्यमा, भग, अंश, मित्र, साध्य, इन्द्रावसु, अश्विनीकुमार, आपोदेवता, वायु, नभोदेवता, चंद्र, नक्षत्रें, ग्रह, रवि व इतर सर्व भूतें जीं देवपक्षाचीं होतीं तीं सारीं, त्या ठिकाणीं आलीं. ऋषि त्या कुमाराची स्तुती करूं लागले व गंधर्व गाऊं लागले. त्याला सहा मुखें, बारा नेत्र, पुष्ट खांदे, बारा हात, असून त्याचें तेज अग्नीसारखें होतें. लव्हाळयांच्या बेटांत झोंपलेल्या त्याला पाहून देवांना व ऋषींना परमानंद झाला आणि आतां तारकासुर मेलाच असें त्यांना वाटलें. देवांनीं त्याला प्रिय असणाऱ्या सर्व गोष्टी केल्या. तो खेळूं लागला तेव्हां त्यांनीं त्याला खेळणीं दिलीं; पक्ष्यांनींहि तसेंच केलें. गरुडानें त्याला विचित्र पिसाऱ्याचा मोर दिला. राक्षसांनीं त्याला वराह व महिष अशीं दोन खेळणीं दिलीं. अरुणानें स्वतः त्याला एक झगझगीत कोंबडा दिला; चंद्रानें मेंढा, रवीनें सुंदर तेज, कामधेनूनें लक्षावधि गाई, अग्नीनें उत्तम बकरा, पृथ्वीनें फळें व फुलें, सुधन्व्यानें छकडा व सोन्याचा रथ दिला. वरुणानें सुंदर हत्ती, इंद्रानें सिंह, वाघ व पक्षी दिले. राक्षस व असुर यांचेहि संघ त्याच्या मागें लागले.

तो वाढूं लागलेला पहातांच तारकाला चिंता उत्पन्न झाली व त्यानें त्याला ठार करण्यासाठीं पुष्कळ उपाय केले, पण ते सारे व्यर्थ गेले. मग देवांनीं त्याचा बहुमान करून त्याला सैनापत्य दिलें आणि तारकासुरानें केलल्या साऱ्या आगळिकी त्याच्या कानावर घातल्या. तेव्हां पूर्ण वाढ झालेल्या त्या वीर्यशाली देवसेनापतीनें आपल्या अमोघ शक्तीचा प्रयोग करून त्या तारक दानवाचा

वध केला. तारक मरण पावल्यावर त्या कुमारानें खेळतां खेळतां देवांच्या राज्यावर इन्द्राची पुनः स्थापना केली व आपण सेनापति म्हणूनच तळपत राहिला. असा तो देवांचा समर्थ संरक्षक व शंकराचा प्रियकर्ता सुवर्णमूर्ति अग्निपुत्र कुमार देवांचा नित्याचा सेनापति झाला. सुवर्ण हें मंगलकारक उत्तम रत्न कार्तिकेयाच्या समागमानेंच उत्पन्न झालें व म्हणून त्याला श्रेष्ठत्व आलें.

युधिष्ठिरा, अशी ही कथा पूर्वी वसिष्ठानें भार्गवरामाला सांगितली. तरी तूं सुवर्णदानाचा प्रयत्न कर. भार्गवराम सुवर्णदानानेंच पापमुक्त होऊन दुर्लभ असें स्वर्गांतील उच्चस्थान मिळविता झाला. १३. १. ८६

---

## अध्याय ८७ वा.

[ १. श्राद्धविधीचें वर्णन ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, पूर्वी तुम्हीं चातुर्वर्ण्याचे धर्म सांगितले, तसा आतां समग्र श्राद्धविधि मला सांगा.

भीष्म—राजा, ऐक. श्राद्धविधि हा शुभ, कल्याणकारक, पुत्र देणारा व यश देणारा असा पितृयज्ञ होय. देव, असुर, मनुष्य, गंधर्व, नाग, राक्षस, पिशाच, किन्नर इत्यादि सर्वांनीं पितृपूजा अवश्य करावी. पितरांची पूजा केल्यावर देवांचें तर्पण करतात, यास्तव पितरांची पूजा प्रयत्नपूर्वक करावी. पितृश्राद्ध हें अन्वाहार्य आहे. म्हणजे तें प्रत्येक महिन्याला करावयाचें असतें, तरी त्याचा सामान्य विधि कांहीं विशिष्ट विधीनें मर्यादित केलेला आहे. कोणत्याहि दिवशीं श्राद्ध केलें तरी पितर संतुष्ट होतात. तथापि विशिष्ट तिथींचे विशेष गुण व दोषहि तुला सांगतों. कोणत्या दिवशीं श्राद्ध केलें असतां काय फळ मिळतें हें तुला मी यथास्थित सांगतों, तें समजून घे.

पितरांची पूजा प्रतिपदेला केल्यास सुंदर घरांत सुंदर प्रजा उत्पन्न करणाऱ्या सुंदर स्त्रिया प्राप्त होतात. द्वितीयेला श्राद्ध केल्यानें कन्या संतति होते. तृतीयेच्या श्राद्धानें घोडे मिळतात. चतुर्थी श्राद्धानें घरांत पुष्कळ किरकोळ पशु मिळतात. पंचमीला श्राद्ध केल्यास पुष्कळ पुत्र होतात. षष्ठीश्राद्धानें मनुष्य तेजस्वी होतो. सप्तमीस श्राद्ध केल्यास शेती मिळते. अष्टमीश्राद्धानें व्यापारांत लाभ होतो. नवमीच्या श्राद्धानें घोड्यासारखीं पुष्कळ जनावरें मिळतात. दशमीस श्राद्ध केलें असतां गाईंची समृद्धि होते. एकादशीस श्राद्ध करणाराला

भांडींकुंडीं व वस्त्रपात्र यांचा लाभ होतो व त्याच्या घरांत ब्रह्मवर्चसी पुत्र जन्मास येतात. द्वादशीस जो पितृपूजा करतो त्याच्याकडे सोनें रुपें इत्यादि द्रव्य नित्य दृष्टीस पडतें. त्रयोदशीस श्राद्ध केल्यास आपल्या ज्ञातिबांधवांत श्रेष्ठपणा मिळतो. चतुर्दशीश्राद्धानें मात्र मनुष्य युद्धांत गुंतला जाऊन त्याच्या घरांतील तरुणांचें आयुष्य संपुष्टांत येतें. अमावास्येला पितरांस पिंड दिल्यास सर्व इच्छा परिपूर्ण होतात. कृष्णपक्षांतील चतुर्दशी वगळून दशमीपासूनच्या तिथी श्राद्धकर्माला प्रशस्त मानिल्या आहेत; तशा इतर नाहींत. त्याचप्रमाणें कृष्णपक्ष जसा शुक्लपक्षाहून प्रशस्त, तसा अपराह्न काळ पूर्वाह्णाहून प्रशस्त होय. १३. १. ८७.

---

## अध्याय ८८ वा.

[ १ श्राद्धविधीचें वर्णन पुढें चालू ]

(१) युधिष्ठिर :—हे समर्थ पितामहा, पितरांना काय अर्पण केलें असतां तें अक्षय होतें, कोणतें हविर्द्रव्य दीर्घ फल देणारें व कोणतें अनंत फल देणारें आहे बरें ?

भीष्म :—युधिष्ठिरा, श्राद्धविधि जाणणारांनीं याविषयीं काय सांगितलें आहे, तें आतां ऐक. तीळ, तांदूळ, यव, उडीद, पाणी व फळेंमुळें यांनीं केलेल्या श्राद्धानें पितर एक महिना तृप्त होतात. पण पुष्कळ तिळांनीं श्राद्ध केल्यास पितरांची तृप्ति अक्षय होते असें मनु म्हणतो. सर्व भक्ष्यवस्तूंत तिळांना विशेष महत्त्व आहे. मासे दिल्यानें पितरांची दोन महिन्यांची तृप्ति होते, मेंढ्यांच्या मांसानें तीन महिने, ससाच्या मांसानें चार महिने, बकऱ्याच्या मांसानें पितर पांच महिने तृप्त होतात. रानडुकराच्या मांसदानानें सहा महिने, पक्ष्यांच्या मांसानें सात महिने, कबऱ्या रंगाच्या हरिणाच्या मांसानें आठ महिने, काळविटाच्या मांसानें नऊ महिने, व गव्याच्या मांसानें पितरांची तृप्ति दहा महिने होते. रेड्याच्या मांसानें अकरा महिने व गाईच्या मांसानें पितर बारा महिने तृप्त होतात. तूप घातलेली खीर गोमांसाइतकीच तृप्तिकारक आहे. बैलाच्या मांसानें बारा महिन्यांची तृप्ति त्यांना लाभते. पितृश्राद्ध मृततिथीस करून गेंड्याचें मांस दिल्यास मात्र पितर अनंतकाल तृप्त होतात. चुक्याची भाजी, कांचनाचीं फुलें व बकऱ्याचें मांस यांनींहि त्यांना अक्षय तृप्ति मिळते. युधिष्ठिरा, याविषयीं पितरांनीं गाइलेल्या गाथाहि लोक

गातात. त्या पूर्वीं सनत्कुमारानें मला सांगितल्या होत्या. त्यांचा अर्थ असा :— ‘दक्षिणायनांत त्रयोदशीला मघा नक्षत्रीं जो आम्हाला तूप घातलेली खीर देईल असा पुत्र आमच्या कुळांत जन्मास येईल काय ? मघानक्षत्रीं बकऱ्याचें मांस किंवा कांचनाचीं फुलें व्रतस्थ राहून हत्तीच्या सावलींत त्याच्या पंख्यां-सारखा कानांच्या वाऱ्यांत आम्हांला देईल असा पुत्र आमच्या कुळांत होईल काय ?’ यासाठीं पुष्कळ पुत्र होण्याची इच्छा करावी, म्हणजे त्यांतील एखादा तरी गयेस जाईल व तेथें जो अक्षय्य वट प्रसिद्ध आहे, त्याच्या खालीं पितृति-थीस पाणी, फळें-मुळें, मांस, अन्न, यांपैकीं कांहीं तरी मध मिसळून तो पितरांना देईल, कारण त्या दानाचें फळ अनंत काळ मिळतें. १३. १. ८८.

---

## अध्याय ८९ वा.

[ १. श्राद्धविधीचें वर्णन पुढें चालू ]

१ भीष्म :—राजा, यमानें जीं काम्य श्राद्धें शशबिन्दूला सांगितलीं, तीं वेगवेगळीं कोणत्या नक्षत्रांवर करावीं हें तुला आतां सांगतों, ऐकून घे. कृत्तिका नक्षत्रावर जो नित्य श्राद्ध करील, तो अग्न्याधानपूर्वक यज्ञ करील व निश्चिंत होत्साता पुत्रांसह स्वर्गास जाईल. मुलांची इच्छा असणारानें रोहिणीवर, व तेजस्वितेची इच्छा करणारानें मृगावर श्राद्ध करावें. आर्द्रानक्षत्रीं श्राद्ध करणारा क्रूरकर्मी होतो. द्रव्याची इच्छा असेल त्यानें पुनर्वसूंवर श्राद्ध करावें व पुष्ट होऊं इच्छिणारानें पुष्यनक्षत्रावर करावें. आश्लेषा नक्षत्रीं श्राद्ध करणाराला धैर्यशाली पुत्र होतात व मघांवर करणारा आपल्या बांधवांत श्रेष्ठ होतो. पूर्वा व उत्तरा फल्गुनी नक्षत्रावर श्राद्ध केल्यास मनुष्य अनुक्रमें भाग्यवान् व पुत्रवान् होतो व हस्तावर करणाराच्या मनांतील इच्छा पूर्ण होतात. चित्राश्राद्धानें सुस्वरूप पुत्र मिळतात, तर स्वातीवर पितृपूजा केल्यास व्यापारांत मोठा लाभ होतो. पुष्कळ पुत्रांची इच्छा करणारानें विशाखा नक्षत्रीं श्राद्ध करावें व राज्याची इच्छा असल्यास अनुराधावर तें करावें. ज्येष्ठानक्षत्रीं पितृश्राद्ध करणाऱ्या माणसाला आधिपत्य मिळतें व तो वैभवशाली व आत्मनिग्रही होतो. आरोग्ये-च्छूनें मूळ नक्षत्रावर श्राद्ध करावें व उत्तम कीर्ति मिळवूं इच्छिणारानें पूर्वा-षाढांवर करावें. उत्तराषाढांवर श्राद्ध केल्यास मनुष्य शोकमुक्त होतो. अभिजित् नक्षत्रांवर श्राद्ध करणारा उत्तम वैद्य होतो. श्रवणांवर तें केल्यानें मनुष्याला

परलोकीं उत्तम गति मिळते. राज्य पाहिजे तर खरोखर धनिष्ठांवर श्राद्ध करावें व वैद्यकांत सिद्धि मिळवावयाची असेल तर तें शततारकांवर करावें. पूर्वाभाद्रपदांवर श्राद्ध करणारा मेंढ्या-बकऱ्यांच्या कळपांचा स्वामी होतो, तर उत्तराभाद्रपदांवर तें करणारास सहस्रावधि गाई मिळतात. रेवती नक्षत्रीं श्राद्ध केलें असतां भांडींकुडीं व वस्त्रपात्र यांची प्राप्ति होते. अश्विनी नक्षत्रावर केलेल्या श्राद्धानें अश्व व भरणींवर केलेल्यानें पुष्कळ आयुष्य हीं मिळतात. शशबिन्दूनें हा श्राद्धविधि ऐकिल्यावर तसें केलें व त्यामुळें क्लेश न पडतां पृथ्वी जिंकून त्याला राज्य करतां आलें. १३. १. ८९.

---

## अध्याय ९० वा.

[ १. श्राद्धविधीचें वर्णन पुढें चालू ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, कोणत्या प्रकारच्या ब्राह्मणांना श्राद्धकाळीं दान करावें तें मला स्पष्ट करून सांगावें.

**भीष्म** :—युधिष्ठिरा, दानधर्म जाणणाऱ्या क्षत्रियानें सामान्य प्रसंगीं ब्राह्मणाची परीक्षा करण्याचें कारण नाहीं. पण देवकार्यांत व पितृकार्यांत मात्र ती करावी. दैवशाली पुरुषच देवपूजा करितात. तेव्हां देवांना उद्देशून कोणालाहि द्यावें. ब्राह्मणांमध्यें कांहीं पंक्तिदूषण व दुसरे पंक्तिपावन असतात. म्हणून श्राद्धप्रसंगीं ब्राह्मणाची कुलशीलादि परीक्षा करावीच. प्रथम पंक्तीला घेण्यास अयोग्य कोण तें सांगतों. कपटी, गर्भघातक, रोगी, पशु बाळगणारा, अध्ययनशून्य, व्याजबट्टा करणारा, गवई, वाटेल तें विकणारा, घरें जाळणारा, विषप्रयोग करणारा, कुंटणपणा करणारा, सोम विकणारा, सामुद्रिक, राजसेवक, तेलाचा धंदा करणारा, फसवेपणा करणारा, पित्याशीं भांडणारा, जारिणीपति, शापदग्ध, चोर, शिल्पावर उपजीविका करणारा, बहुरूपी, मित्रद्रोही, परस्त्रीशीं गमन करणारा, व्रतहीन लोकांचा उपाध्याय, हत्यारांवर निर्वाह करणारा, कुत्रे बरोबर घेऊन फिरणारा, कुत्र्याचा दंश झालेला, वडील भावापूर्वीं विवाह केलेला, दुराचारी, गुरुपत्नीगमन करणारा, शेतकरी, पुजारी, जोशी, हे ब्राह्मण पंक्तीला अयोग्य असून त्यांना श्राद्धास बोलाविलें असतां त्यांना दिलेलें हव्य राक्षसांकडे जातें असें ब्रह्मवादी म्हणतात. श्राद्धाचें भोजन केल्यावर जो वेदाध्ययन करतो, अथवा शूद्र स्त्रीशीं रत होतो, अशा ब्राह्मणाला श्राद्धदान केल्यास त्याच्या विष्ठेंत

पितरांना एक महिना रहावें लागतें. सोम विकणाऱ्याला बोलाविल्यास दिलेलें अन्न विष्ठेसमान होतें, वैद्यकर्म करणाराला दिलेलें पू व रक्त होतें, पुजाऱ्याला दिलेलें नष्टप्राय होतें, व व्याज घेणाऱ्याला दिलेलें अन्न दुष्कीर्तीला कारण होतें. वैश्यवृत्ति ब्राह्मणाला दिल्याचा इहपरलोकीं कांहींच उपयोग होत नाहीं. पुनर्विवाहित स्त्रीच्या पुत्राला दिलेलें भस्मावर दिलेल्या हवनासारखें आहे. धर्मभ्रष्ट व दुराचारी ब्राह्मणांना दिलेलें हव्यकव्य नष्टच होतें. अशा ब्राह्मणांना जाणूनबुजून दिल्यास त्यांच्या नरकांत पितरांना पडावें लागतें. तसेंच आणखी कित्येक पंक्तीला अयोग्य असतात. मूर्खपणानें शूद्राला वेदोपदेश करणारे याच वर्गांत येतात. पंक्तीला बसलेला अंध साठ जणांना, षंढ शंभर जणांना, व कोड असलेल्या जितक्यांकडे पाहील तितक्यांना दूषित करतो. जो डोक्याला वस्त्र गुंडळून जेवतो, दक्षिणेकडे तोंड करून किंवा पायांत जोडा घालून खातो, तो आसुर वृत्तीचा समजावा. रागानें किंवा अश्रद्धेनें दिलेलें तें असुरांचा भाग होतें. श्राद्धान्नावर कुत्रे व पंक्तिदुष्ट यांची दृष्टि जाऊं देऊं नये, म्हणून सर्व बाजूंनीं झांकलेल्या स्थानीं तीळ पेरून श्राद्ध करावें. तिळांशिवाय रागारागानें केलेलें श्राद्ध राक्षस व पिशाच हेच उपटतात. अपंक्त मनुष्य जितक्या पंक्तियोग्य ब्राह्मणांना पहातो तितक्या अंशानें दात्याचें फळ नष्ट होतें.

युधिष्ठिरा, आतां तुला पंक्तिपावन कोण ते सांगतों. तसे ब्राह्मण परीक्षा करून श्राद्धाला घ्यावे. वेदशास्त्रसंपन्न, व सदाचारी असे सर्वत्र ब्राह्मण पंक्तिपावन होत; कारण ते सर्वांनांच पावन करतात. त्रिणाचिकेत मंत्र जपणारे, पंचाग्नि बाळगणारे, त्रिसुपर्ण व साही वेदांगें जाणणारे, वेदाभ्यासी कुलांत जन्मलेले, छंदःशास्त्रवेत्ते, ज्येष्ठ साम गाणारे, मातापित्यांचे आज्ञाधारक, दहा पिढ्या यज्ञकर्म जाणणारे, धर्मपत्नीशीं ऋतुकालींच गमन करणारे, असे ब्राह्मण पंक्तीला पवित्र करतात. अथर्वशीर्ष पढणारा, ब्रह्मचारी, व्रतनिष्ठ, सत्यभाषणी, धर्मशील, स्वकर्म न सोडणारा, तीर्थाटन केलेला, समंत्र यज्ञांत अवभृथ स्नान घडलेला, शांतवृत्तीचा, क्षमाशील, इंद्रियनिग्रही, व सर्व प्राण्यांवर प्रेम करणारा, असे ब्राह्मण श्राद्धास बोलवावे. त्यांना दिलेलें अक्षय्य फलदायक होतें; ते पंक्तिपावन होत. तसेंच आणखी मोक्षधर्म जाणणारे यति, योगी, व्रतानुष्ठानी, ब्राह्मणांना इतिहास सांगणारे, भाष्यवेत्ते, व्याकरणनिष्णात, पुराणाभ्यासी, धर्मशास्त्रवेत्ते, धर्माचरणी, गुरुगृहीं राहिलेले, सहस्रशः दानें केलेले, वेद व त्यांतील वचनें यांत प्रवीण, हेहि पंक्तिपावन असून जितक्यांना ते पहातात तितके सारे

पावन होतात. म्हणूनच त्यांना पंक्तिपावन म्हटलें आहे. वेदाध्यापकाच्या कुळांत जन्मलेला व स्वत: वेदवेत्ता असा ब्राह्मण एकटाच आसपासच्या साडेतीन कोसांतील सर्वांना पवित्र करतो. स्वतः ऋत्विज् किंवा वेद पढविणारा नाहीं अशा ब्राह्मणानें तेथील ऋत्विजांच्या अनुज्ञेनें देखील श्राद्धांत मुख्य स्थान घेऊं नये. तसें केल्यास त्या ठिकाणच्या सर्वांचें पाप त्याच्या माथीं बसतें. वेदज्ञान असून पंक्तिदूषकांचे दोष ज्याला नाहींत तो पतित नसून पंक्तिपावनच असतो. या गोष्टी लक्षांत ठेवून श्राद्धीय ब्राह्मणाची निवड करावी. आपलीं उचित कर्तव्यें करणारा कुलीन व विद्वान् ब्राह्मण श्राद्धाला बोलवावा. जो कोणी श्राद्धप्रसंगीं सत्पात्र ब्राह्मणाकडे लक्ष न देतां केवळ मित्रमंडळीवर सारें लक्ष देतो त्याच्यावर पितर व देव संतुष्ट होत नाहींत व त्याला स्वर्गहि मिळत नाहीं. तो देंठापासून सुटलेल्या फळाप्रमाणें स्वर्गांतून खालीं पडतो. यास्तव श्राद्धप्रसंगीं मित्राचा आदर करण्यांत गुंतूं नये. अन्य प्रसंगीं त्यांना भोजन द्यावें. ज्याला कोणी शत्रु व मित्र असे वाटत नाहीं, अशा समबुद्धीच्या ब्राह्मणाला हव्यकव्यप्रसंगीं जेऊं घालावें. नापीक भूमींत पेरलेलें बीं जसें उगवत नाहीं, व पेरणाराजवळहि रहात नाहीं, त्याप्रमाणें अयोग्य ब्राह्मणांस श्राद्धीं जेऊं घातल्यास तें फळ इहपरलोकीं कोठेंच मिळत नाहीं. अनभ्यासी ब्राह्मण पेटणाऱ्या गवताच्या काडीप्रमाणें लवकरच थंड होतो. म्हणून त्याला श्राद्धदान देऊं नये. राखेंत कोणी हवन करीत नाहीं. एकमेकांच्या देवघेवीसारखा भोजनव्यवहार श्राद्धाच्या निमित्तानें केला, तर त्यास संभोजनी नांव असून तो पिशाचदक्षिणेचा प्रकार आहे. तसलें श्राद्धभोजन पितरांना व देवांना पोंचत नाहीं. चुकलेल्या वत्सहीन गाईप्रमाणें तें येथेंच घुटमळत रहातें. अग्नि शांत झाल्यावर त्यांत टाकलेलें हवि जसें देवांना किंवा पितरांना पोंचत नाहीं, त्याप्रमाणें गायन नर्तन इत्यादीसाठीं दिलेल्या दानाचा किंवा अपात्रीं दिलेल्या दक्षिणेचा कांहीं उपयोग होत नाहीं. अपात्रीं दिलेली दक्षिणा देणारा व घेणारा या दोघांनाहि घातक होते, फलदायक होत नाहीं. म्हणून ती निंद्य होय. ती देणारांचे पितर देवमार्गापासून भ्रष्ट होतात. ऋषींनीं घातलेल्या नियमाप्रमाणें जे नित्य निश्चितपणें आचरण करतात त्या धर्मज्ञांनाच देवब्राह्मण असें म्हणतात. ते तपोनिष्ठ, कर्मनिष्ठ, वेदाभ्यासनिष्ठ व ज्ञाननिष्ठ असतात. श्राद्धदानें ज्ञाननिष्ठ ब्राह्मणांनाच द्यावीं. जे ब्राह्मणांची नित्य बोलण्यांत निंदा करतात, त्यांना श्राद्धाचें भोजन देऊं नये. ब्राह्मणांची निंदा तीन पिढ्यांचा घात करते. वेदज्ञानी ब्राह्मण लांबूनच ओळखावे असें तपस्वी ऋषींचें मत आहे. तसा

ब्राह्मण आपल्याला प्रिय असो वा अप्रिय असो त्याला श्राद्धान्न अर्पण करावें. अपात्र अशा सहस्रावधि ब्राह्मणांना जेऊं घालणें हें जितकें पुण्यकारक आहे तितकेंच मंत्रवेत्त्या एकाच ब्राह्मणाला घालणें आहे. १३. १. ९०.

---

## अध्याय ९१ वा.

[ १. श्राद्धविधीची उत्पत्ति, त्यांतील वर्ज्यावर्ज्य पदार्थ इत्यादि ]

(१) **युधिष्ठिर**—आजोबा, श्राद्धाची कल्पना मूळ कोणी व केव्हां काढली, तसेंच भृगु व अंगिरस यांच्या काळीं त्या विधीचें स्वरूप कसें होतें, त्यांत वर्ज्य श्राद्धें कोणतीं, कोणतीं फळें, मुळें व धान्यें त्यांत वर्ज्य आहेत, हें सर्व मला सांगा.

**भीष्मः**—सर्व सांगतों, ऐक. ब्रह्मदेवाचा पुत्र अत्रि मुनि मोठा प्रतापशाली होता. त्याच्या वंशांत दत्तात्रेय झाला. दत्तात्रेयाचा पुत्र निमि नांवाचा तपस्वी होता. निमीचा पुत्र श्रीमान्; पूर्वीं सहस्रवर्षें तप केल्यावर तो कालधर्माला अनुसरून मरण पावला. तेव्हां निमीनें त्याचें उत्तरकार्य यथाविधि केलें, पण पुत्रशोकामुळें त्याला अत्यंत संताप झाला. मग चतुर्दशीच्या दिवशीं त्या बुद्धिमान् निमीनें चांगले गोड अन्नाचे पदार्थ व इतर शय्यादि उपभोगाच्या वस्तु एकत्र करून त्यांच्याकडे पहात शोक केला व त्या स्थितींत त्याला झोंप लागली असतां पहाटेच्या प्रहरीं तो जागा झाला. जागा झाला तरी त्याचें मन शोकाकुलच होतें. पण त्यानें तो शोक आवरून बुद्धि विस्तृत केली. मग शांत मन करून त्यानें श्राद्धविधि मनांत आणिला. श्रीमानाला जे खावयाचे पदार्थ फळमूळें आवडत तीं व दुसरे विहित पदार्थ गोळा करून त्यानें अमावास्येच्या दिवशीं ब्राह्मणांना बोलाविलें व त्यांची पूजा केली. त्यांना प्रदक्षिणा करून त्यानें स्वतः आसनांवर बसविलें व एकाच वेळीं त्या सात ब्राह्मणांना बसवून भोजन घातलें. त्यांत मीठ वगळलें असून श्यामाक (सावे) नांवाच्या भाताचें तें केलेलें होतें. मग दक्षिणेकडे टोकें करून त्यानें दर्भ ठेविले आणि श्रीमानाचें नांव व गोत्र उच्चारून त्याला पिंड दिले. एवढें केल्यावर त्या मुनीपुढें असा प्रश्न उभा राहिला कीं, हा नवीन प्रकार काढून आपण धर्मसंकर तर केला नाहींना? असें मनांत येतांच त्याला वाईट वाटलें व पूर्वीं ऋषींनीं न केलेली गोष्ट मीं केली,* त्यामुळें ब्राह्मण मला शाप देऊन जाळून तर

---

* पित्यासाठीं सांगितलेला विधि पुत्राकडे लाविला, म्हणून धर्मसंकर झाला.

टाकणार नाहींत ना, असा विचार त्याच्या मनांत आला. तेव्हां त्यानें आपला मूळपूरुष जो अत्रि त्याचें स्मरण केलें. स्मरण करतांच अत्रि मुनि तेथें आला व निमि पुत्रशोकानें कृश झाला आहे असें पाहून त्याचें त्यानें गोड शब्दांनीं सान्त्वन केलें. तो म्हणाला, 'निमे, तूं जो हा श्राद्धविधि योजिलास, त्याविषयीं तुला भीति बाळगावयास नको. तो ब्रह्मदेवानें पूर्वींच ठरविलेला होता. ब्रह्मदेवानें घालून दिलेल्या धर्मविधीचेंच तूं आचरण केलेंस. ब्रह्मदेवाशिवाय दुसरा कोण असा श्राद्धविधि घालून देईल ? ब्रह्मदेवानें घालून दिलेला उत्तम विधि मी तुला आतां सांगतों त्याप्रमाणें तूं करीत जा. प्रथम मंत्र म्हणून अग्नौकरण केल्यावर अग्नि, सोम व वरुण तसेच जे नित्य पितरांबरोबर फिरतांना दिसतात ते विश्वेदेव यांसह पितरांना ब्रह्मदेवानें भाग योजून दिले. तसें केल्यावर पिंड धारण करणारी जी पृथ्वी तिची 'वैष्णवी, काश्यपी, अक्षया' या शब्दांनीं स्तुति करावी. श्राद्धासाठीं पाणी आणितांना वरुणाचें स्तोत्र म्हणावें. मग अग्नि व सोम त्यांना तृप्त करावें. नंतर ब्रह्मदेवानें ज्यांना पितरांच्या वर्गांत घातलें त्या देवांना व उष्णपांना त्यांचा भाग निवेदन करावा. श्राद्धप्रसंगीं त्यांची पूजा केल्यानें ते सारे पितर पापमुक्त होतात. आतां पितर म्हणून ज्यांना म्हणतात त्यांत ब्रह्मदेवानें पूर्वीं सांगितलेले पितृवंशांतील सात पुरुष व अग्निप्रमुख विश्वेदेव, यांचा समावेश होतो. त्या सर्वांना श्राद्धान्नाचा भाग मिळणें योग्य आहे. त्या पितृदेवांचीं नांवें:— बल, धृति, विपाप्मा, पुण्यकृत्, पावन, पार्ष्णिक्षेम, समूह, दिव्यसानु, विवस्वान्, वीर्यवान्, ऱ्हीमान्, कीर्तिमान्, कृत, जितात्मा, मुनिवीर्य, दीप्तरोम, भयंकर, अनुकर्मा, प्रतीत, प्रदाता, अंशुमान्, शैलाभ, धीरोष्णी, भूपति स्रज, वज्री, वरी; हे विश्वेदेव होत. विद्युद्वर्च, सोमवर्च, सूर्यश्री, सोमष, सूर्यसावित्र, दत्तात्मा, पुंडरीयक, उष्णीनाभ, नभोद, विश्वायु, दीप्ति, चमूहर, सुरेश, व्योमारि, शंकर, भव, ईश, कर्ता, कृति दक्ष, भुवन, पद्मवीर्य, अदित्य, रश्मिवान्, सप्तकृत्, सोमवर्चा, विश्वकृत् कवि, अनुगोप्ता, सुगोप्ता, नप्ता, ईश्वर, अशीं त्या पितरांचीं नांवें प्रसिद्ध असून, ते काळाची गति जाणणारे आहेत.

आतां श्राद्धाला विहित नाहीं अशीं धान्यें म्हणजे, हरीक व पुलक नांवाचें भात हीं होत. मसाल्याच्या पदार्थांत कांदा व लसूण हीं वर्ज्य होत. भाज्यांत शेवगा, कांचन, गाजर, कोहळा, काळा भोपळा, व मीठ हीं घेऊं नयेत. गांवडुकराचें मांस, तसेंच दुसऱ्या कोणाचेंहि प्रोक्षण न केलेलें मांस, हीं वर्ज्य समजावीं. काळें जिरें, बिडलोण, शीतपाकी, व अंकुर फुटणाऱ्या

भाज्या, तसेच शिंगाडे हीं देखील अग्राह्य होत. सर्व प्रकारचें मीठ श्राद्धांत वर्ज्य होय. जांभळाचा तोच प्रकार. थुंकी किंवा आंसवें पडलेले पदार्थहि श्राद्धांत वर्ज्य करावे. सुदर्शनाची भाजीहि हव्यकव्यांत तशीच अग्राह्य होय. वर्ज्य पदार्थांच्या संपर्कानें दुष्ट झालेलें हवि देवांना व पितरांना आवडत नाहीं. पिंड देतांना चाण्डाल व श्वपच यांना जवळ येऊं देऊं नये. लाल वस्त्र नेसलेले, कुष्ट अंगावर असलेंले, ब्रह्महत्यादि पापांमुळें पतित झालेले, संकर जातीचे ब्राह्मण, यांनाहि पिंडदानप्रसंगीं वर्ज्य करावें.'

याप्रमाणें आपला वंशज जो निमिऋषि त्याला सांगून अत्रिमुनि ब्रह्मदेवाच्या दिव्य सभेला निघून गेला. १३. १. ९१.

---

## अध्याय ९२ वा.

### [ १. श्राद्धविधीचा इतिहास. ]

( १ ) भीष्मः—युधिष्ठिरा, निमीनें याप्रमाणें केल्यापासून सारेच ऋषि ब्रह्मदेवानें घालून दिलेल्या विधीनें पितृयज्ञ करीत आले आहेत. नित्य धर्माचरण करणाऱ्या ऋषींनीं पितरांना पिंड दिल्यावर व्रतस्थ राहून तीर्थोदकांनीं त्यांचें तर्पणहि केलें. चारी वर्णांचे लोक त्यांना अनुसरून पिंडदान व तर्पण करूं लागल्यामुळें पितर व देव यांना तें सगळें जिरत नाहींसें झालें. दोघांनाहि अजीर्णाची पीडा होऊं लागली. तेव्हां अजीर्णानें पीडिलेले ते सोमाकडे जाऊन त्याला म्हणाले, 'पिंडांच्या अन्नानें आम्हांला फार त्रास होऊं लागला, तरी त्याला कांहीं उपाय कर.' सोमानें उत्तर दिलें, 'तुम्हांला उपाय हवाच असेल तर तुम्हीं ब्रह्मदेवाकडे जा, तो कांहीं उपाय करील.' सोमाच्या सांगण्याप्रमाणें ते देव व पितर ब्रह्मदेवाकडे गेले. तेव्हां तो मेरुपर्वताच्या शिखरावर बसला होता. तेथें जाऊन ते म्हणाले, 'भगवन्, पिंडांच्या अन्नानें आम्हीं पिडून निघालों आहों. तरी कृपा करून कांहीं उपाय त्यावर सांग.' तेव्हां ब्रह्मदेव त्यांना म्हणाला, 'हा माझ्या बाजूला जो अग्नि बसला आहे, तो तुम्हांला उपाय करील.' तें ऐकून अग्नि म्हणाला, 'आपण सर्वांनीं मिळून मिळालेल्या पिंडांचा उपभोग घेऊं. माझ्या सहकारितेनें तुम्हांला तें अन्न सहज जिरवितां येईल.' हें ऐकून पितरांची चिंता दूर झाली. या कारणास्तव श्राद्धाच्या आरंभीं आधीं अग्नीला भाग देण्यांत येतो. अग्नीला आधीं भाग देऊन मग पितरांना पिंड दिल्यास ब्रह्मराक्षसांना ते

लुटतां येत नाहींत; कारण अग्नि जवळ असल्यामुळें राक्षस भिऊन दूर जातात. असो, पिंड देतांना प्रथम पित्याला, मग पितामहाला व शेवटीं प्रपितामहाला द्यावे. असा हा श्राद्धविधि आहे. प्रत्येक पिंड देतांना, सावित्रीमंत्र जपून, 'पितृमान् सोमाला' हे शब्द उच्चारावे. रजस्वला किंवा कानतुटक्या स्त्रीला श्राद्धाच्या वेळीं जवळ येऊं देऊं नये. तसेंच अन्य कुळांतील स्त्रीलाहि येऊं देऊं नये. जल ओलांडीत असतां पितरांना त्याचें नांव घेऊन पिंडदानानें तृप्त करावें. प्रथम आपल्या वंशांतील पुरुषांचें जलानें तर्पण करून मग मित्र व इतर संबंधी वर्गाला जलांजलि द्यावी. रंगीबेरंगी बैल जुंपलेल्या गाडींतून किंवा नावेंत बसून नदी उतरीत असतां पितरांना पाण्याची इच्छा होते, यास्तव नावेंत सुज्ञ लोक नित्य पितरांना जलदानानें तृप्त करतात. अर्धा महिना झाला असतां अमावास्येला* पिंडदान करावें. पितृभक्ति केल्यानें पुष्टि, आयुष्य, वीर्य, संपत्ति हीं प्राप्त होतात. ब्रह्मदेव, पुलस्त्य, वसिष्ठ, पुलह, अंगिरा, क्रतु, व कश्यप यांना महायोगेश्वर म्हणतात व त्यांची गणना पितरांत होते. असा हा श्रेष्ठ श्राद्धविधि आहे. मृतपूर्वज त्याच्या योगानें दुःखमुक्त होतात. अशी ही श्राद्धोत्पत्तीची कथा यथाशास्त्र तुला सांगितली.

---

## अध्याय ९३ वा.

[ १. व्रतभंग केव्हां होतो ? २. तप म्हणजे काय ? ३. नित्योपवास, ब्रह्मचर्य, विघसाशन म्हणजे काय ? ४. दानाच्या बाबतींत देत्याघेत्यांमधील विशिष्ट भेद : वृषादर्भि व सप्तऋषि यांमधील संवाद. ]

(१) **युधिष्ठिर**—व्रतस्थ ब्राह्मण जर यजमानाच्या संतोषासाठीं श्राद्धान्न भक्षण करितील, तर त्यांचें व्रत मोडेल कीं नाहीं ?

**भीष्म**—त्यांचें व्रत जर वेदोक्त नसेल, तर यजमानाचा संतोष ठेवण्यासाठीं भोजन करण्यास हरकत नाहीं. पण तें जर वेदोक्त असेल तर श्राद्धान्नभक्षणानें ते लुप्तव्रत होतील.

( २ ) **युधिष्ठिर** :—सामान्य लोक उपवास म्हणजेच तप होय असें जें म्हणतात, तें खरें आहे कीं तप म्हणजे वस्तुतः दुसरें कांहीं तरी आहे ?

---

* पौर्णिमान्त महिने पूर्वी धरीत असत. त्याअन्वयें अमावास्येला अर्धा महिना होतो.

**भीष्म**:—महिना, अर्धा महिना उपास करणें याला सामान्य लोक तप म्हणतात खरें, पण अशा रीतीनें आपल्या शरीराला किंवा कुटुंबाला कष्ट देणारा खरा तपस्वी पण नव्हे व धर्मज्ञहि नव्हे. त्यागरूप संपत्ति म्हणजेच उत्तम तप होय. मनुष्यानें नित्य उपवास करावा, ब्रह्मचर्य पाळावें, सदा मौनव्रती असावें व वेदजप करावा. नित्य कुटुंबांत राहून धर्माचरण करावें व जागरूक असावें. मांस भक्षण करूं नये, व पवित्रपणें वेदपठन करावें. सदा सत्य बोलून इंद्रियांचा निग्रह करावा व विघसाशी होऊन अतिथींवर प्रेम करावें. नित्य अमृत भक्षण करून पवित्र रहावें.

( ३ ) **युधिष्ठिर**:—हे पितामहा, नित्य उपवासी कसें रहावें ? तसेंच नित्य ब्रह्मचर्यपालन कसें होईल ? विघसाशन म्हणजे काय व अतिथींवर प्रेम करावयाचें म्हणजे कसें ?

**भीष्म**:—युधिष्ठिरा, जो मनुष्य सकाळच्या व संध्याकाळच्या जेवणांच्यामध्यें पुनः कांहीं खात नाहीं तो सदा उपवासी होय. जो ऋतुकालींच आपल्या पत्नीशीं गमन करतो तो नित्य ब्रह्मचारीच होय. सत्यभाषणी व दानशील असें नित्य रहावें. जो निष्कारण ( म्हणजे यज्ञाहून इतरत्र ) मांस खात नाहीं, तो निवृत्तमांसच समजावा. दानशीलता म्हणजेच पवित्रपणा व दिवसा झोंप न घेणें म्हणजे सदाजागृति. सेवक आणि अतिथि यांचें भोजन झाल्यावर जो स्वतः जेवतो त्याचें जेवण म्हणजेच अमृतभक्षण होय. ब्राह्मण जेवले नसतांना जो स्वतः भोजन करीत नाहीं, त्याच्या त्या सत्कर्मामुळें त्यानें स्वर्ग जिंकल्यासारखें होतें. देव, पितर व आश्रित यांच्या भोजनानंतर उरलेलें अन्न भक्षण करणें याला विघसाशन म्हणतात. याप्रमाणें वर्तन करणारांना ब्रह्मलोकीं अमर्याद स्थानें प्राप्त होतात व अप्सरा आणि गंधर्व तेथें त्यांच्या सेवेला तत्पर असतात. देवता, पितर व अतिथि यांसह जो भोजन करतो, तो पुत्रपौत्रांसह सुखी होऊन उत्तम गतीस जातो.

( ४ ) **युधिष्ठिर**:—हे पितामहा, ब्राह्मणांना जीं अनेक प्रकारचीं दानें देतात, त्यांत देणारा व घेणारा यांमध्यें विशेष काय ?

**भीष्म**—राजा, सज्जन व गुणवान् दात्यापासून दान घेणाराला फारसा दोष लागत नाहीं. पण दुष्ट व दुर्गुणी दात्याच्या दानानें दान घेणारा नरकांत बुडतो. याविषयीं एक प्राचीन इतिहास सांगतात. वृषादर्भि व सप्तऋषि यांच्यामध्यें

या विषयावर एकदां संवाद झाला होता. कश्यप, अत्रि, वसिष्ठ, भरद्वाज, गौतम, विश्वामित्र, जमदग्नि, आणि साध्वी अरुंधती या सर्वांची गंडा नांवाची एक मोलकरीण होती. तिचा पति शूद्र असून गुरें वाळगीत असे. ते सर्व ऋषि तप करीत सर्व जगभर भ्रमण करीत. त्यांनीं समाधिबळानें शाश्वत असा ब्रह्मलोक मिळविला होता. युधिष्ठिरा, एकदां असें झालें कीं, मोठा दुष्काळ पडला, व सर्व लोक भुकेनें व्याकूळ होऊन कंठीं प्राण घेऊन राहिले. पूर्वीच्या एका यज्ञांत शिबिराजाचा पुत्र शैब्य किंवा वृषादर्भि यानें ऋत्विजांना दक्षिणा म्हणून एक पुत्र दिला होता. या दुष्काळप्रसंगीं तो अल्पायु होत्साता मरण पावला. तेव्हां क्षुधेनें अत्यंत पीडिलेले ते त्याच्या भोवतीं वेढा देऊन बसले. आपल्या यजमानाचा पुत्र मृत झालेला पाहून त्या क्षुधार्त ऋषींनीं त्याला थाळींत घालून शिजविलें. मृत्युलोकीं कोठें अन्न मिळेनासें झाल्यामुळें स्वतःचें रक्षण कसें-बसें करण्याच्या बुद्धीनें त्या तपस्व्यांनीं हा कष्टदायक मार्ग स्वीकारला होता. त्या मृत पुत्राला ते शिजवीत असतां वृषादर्भि राजा फिरत फिरत त्या मार्गानें आला व त्याला ते क्षुधेमुळें क्लेश पावलेले ऋषि तेथें आढळले. तेव्हां त्यांच्यांत संवाद झाला तो असाः—

राजाः—हे तपोधनहो, तुम्हीं मजकडून प्रतिग्रह घ्याल तर तुमचें या प्रसंगीं तारण होऊन तुम्हीं पुष्ट व्हाल. मजजवळ जें धन आहे त्यांतील तुम्हीं वाटेल तें पसंत करा. ब्राह्मण याचक मला अत्यंत प्रिय आहेत. मीं तुम्हांला पाहिजे तर एक सहस्र खेचरें देतों. व्यालेल्या चपळ पांढऱ्या केसांच्या गाई एकेक बैलासह मीं सर्वांना देतों. ओझीं वहाणारे शंभर बैल देतों, किंवा शंभर पांढरे गाडीचे बैल देतों; एक विणीच्या लठ्ठ गाभण्या सुंदर गाई देतों; चांगले गांव, तांदूळ, यव, रत्नें, किंवा जें दुसरें काय पाहिजे असेल तें दुर्लभ असलेलेंहि देतों. पण तुम्हीं या अभक्ष्य पदार्थावर मन ठेवूं नका. तुमच्या क्षुधाशमनार्थ मीं काय देऊं तें बोला.

ऋषिः—राजा, राजाकडून घेतलेला प्रतिग्रह म्हणजे चवीनें गोड पण परिणामीं विषासारखा असतो. हें तुला ठाऊक असतां तूं आम्हांला लोभ कां बरें दाखवितोस? ब्राह्मणाचें शरीर म्हणजे देवतांचा आश्रय असून तपानें निष्पाप झालेला ब्राह्मण संतुष्ट झाला असतां देवता संतुष्ट होतात. ज्या दिवशीं राजप्रतिग्रह घ्यावा त्या दिवशीं त्या ब्राह्मणाचें झालेलें तप तो वणव्याप्रमाणें जाळून टाकतो. राजा, यास्तव तूं आपल्या सर्व दानांसह खुशाल अस, किंवा कोणा याच-

कांना तीं सारीं देऊन टाक.' असें म्हणून ते ऋषि तेथून दुसऱ्या वाटेनें निघून गेले. तेव्हां तें मांस असेंच अर्धवट शिजलेलें राहिलें, म्हणून तें टाकून देऊन ते ऋषि आहाराच्या इच्छेनें वनांत गेले. मग राजाच्या आज्ञेवरून त्याचे मंत्रीहि वनांत गेले व उंबराचीं फळें गोळा करून तीं त्या ऋषींना देऊं लागले. इकडे त्यांचे सेवक दुसऱ्या उंबरांच्या फळांत सोनें घालून तीं देण्यासाठीं दुसऱ्या बाजूनें धांवत गेले. तेव्हां तीं फळें मोठीं आहेत असें पाहून तीं आपल्याला नकोत असें अत्रि म्हणाला. त्यानें त्या राजसेवकांना सांगितलें, कीं 'आम्ही कांहीं मंदबुद्धीचीं अडाणी माणसें नाहीं; हीं फळें सोन्यानें भरलेलीं आहेत हें आम्हांला कळतें. आम्ही चांगले जागे आहोंत बरें! या ठिकाणीं हें दान घ्यावें आणि परलोकीं त्याचें कटु फळ चाखावें काय? इहपरलोकीं सुख पाहिजे तर हें दान घेतां कामा नये.'

**वसिष्ठः**—एक निष्क घेतल्यानें शंभर किंवा सहस्र निष्क घेतल्याचें जर पाप लागतें, तर अनेक घेणारा अत्यंत मोठ्या दुर्गतीलाच जाईल.

**कश्यपः**—साऱ्या पृथ्वींत जेवढें म्हणून धान्य, सोनें, पशु, स्त्रिया इत्यादि आहे, तें एकालाहि पुरेसें होत नाहीं. यासाठीं ज्ञात्यानें समाधानाचाच मार्ग धरावा.

**भरद्वाज :**—जन्मास आलेल्या रुरु हरिणाचीं शिंगें त्याच्या वाढीबरोबर जशीं वाढतात, तशी मनुष्याची आशाहि वाढत जाते. तिला मर्यादा नाहीं.

**गौतम :**—असें या जगांत द्रव्यच नाहीं कीं ज्याच्या योगानें माणसाची तृप्ति होईल. मनुष्य समुद्रासारखा आहे, तो कधींच भरणार नाहीं.

**विश्वामित्र :**—एकदां मनुष्य आशा करूं लागला कीं त्याची एक आशा पूर्ण होतांच दुसरी पुढें येते. आशा ही बाणा सारखी वेधीत जाते.

**जमदग्नि :**—दान घेतांना आत्मसंयमन केलें तरच तपाचें रक्षण होतें. पण ब्राह्मणानें त्यावेळीं जर लोभ केला तर तें गळून जातें.

**अरुन्धती :**—धर्मासाठीं द्रव्याचा संचय करावा असें म्हणणारा एक पक्ष आहे. पण द्रव्यसंचयापेक्षां तपःसंचयच कांहीं झालें तरी अधिक होय.

**गण्डा :**—माझे स्वामी ज्याअर्थीं समर्थ असूनही या दानाला भितात, त्याअर्थीं मी दुबळी असल्यामुळें सहजच त्याला भिणार.

**पशुसख :**—( म्हणजे गंडेचा पति ) विधर्मांत कांहीं चांगलें फळ नाहीं. ब्राह्मणांनाच तें मोक्षरूपी धन ठाऊक आहे. तें शिकण्यासाठीं तर मी होईल तितकी या ज्ञात्यांची सेवा करीत आहें.

**सर्वऋषि :**—आम्ही सर्व ज्याच्या प्रजा आहों व जो आम्हांला फसवून फळ देत आहे, त्याचें व त्या दानाचें कल्याण असो !

याप्रमाणें सांगून ऋषींनीं तीं सुवर्णानें भरलेलीं फळें टाकून दिलीं व व्रतनिष्ठ असे ते दुसरीकडे निघून गेले. तेव्हां वृषादर्भीचे मंत्री त्याच्याकडे परत आले व त्यांनीं त्याला घडलेलें वर्तमान सांगितलें व ऋषि सोनें भरलेलीं फळें टाकून गेले असें त्याला कळविलें. तें ऐकून राजाला राग आला, व ऋषींचा प्रतिकार करण्याचा उपाय करावा म्हणून घरीं गेला. तेथें गेल्यावर कडक व्रत घेऊन त्यानें हवनीय अग्नीमध्यें सुसंस्कृत मंत्र म्हणून एकेक आहुति दिली. तेव्हां त्या अग्नींतून एक भयंकर राक्षसी बाहेर आली. तिचें नांव राजानें यातुधानी ठेविलें. ती काळरात्रीसारखी राक्षसी राजापुढें हात जोडून उभी राहिली व 'राजा, काय आज्ञा आहे' असें त्याला विचारूं लागली. वृषादर्भि म्हणाला, 'जा, आणि ते सात ऋषि, ती अरुन्धती, त्यांची दासी, व त्या दासीचा पति यांचीं नांवें नीट विचारून ध्यानांत घे, आणि तीं जाणून सर्वांचा नाश कर. तीं सर्व नष्ट झाल्यावर मग तुला वाटेल तिकडे तूं जा.' हें ऐकून नांवाची खरी अशी यातुधानी राक्षसी, जेथें ते सप्तर्षि होते तेथें वनांत गेली.

युधिष्ठिरा, अत्रिप्रमुख ते ऋषि त्या वनांत फळें व मुळें खात भटकत होते. त्यांना तेथें हातपाय आदिकरून अवयव लठ्ठ असलेला एक संन्यासी कुत्रा संगें घेऊन चाललेला दिसला. सर्वांगीं लठ्ठ असलेल्या त्याला पाहून अरुन्धती ऋषींना म्हणाली, 'तुम्हीं असे पुष्टशरीराचे कधींच होणार नाहीं.' तेव्हां ते ऋषि एका मागून एक तिला उत्तर देऊं लागले.

**वसिष्ठ**—आमच्या अग्निहोत्राप्रमाणें याच्याला कधीं आहुति मिळाली नाहीं असें होत नसेल. सकाळ संध्याकाळ ती मिळते, म्हणून हा कुत्र्यासह असा धष्टपुष्ट झाला आहे.

**अत्रि**—याचें सामर्थ्य आमच्याप्रमाणें भुकेनें नष्ट झालेलें नाहीं. तसेंच यानें मोठ्या संकटानें पढलेले वेदहि हा विसरला नसावा, म्हणून हा असा कुत्र्यासह लठ्ठ आहे.

**विश्वामित्र**—आमच्याप्रमाणें हा शास्त्रोक्त धर्म पाळण्यास असमर्थ, आळशी, भुकेनें गांजलेला व मूर्ख झालेला नाहीं. म्हणून कुत्र्यासह हा पुष्ट झाला आहे.

**जमदग्नि**—आमच्याप्रमाणें याला भात व जळवण यांचा वार्षिक सांठा करण्याची अडचण मनांत भासत नसावी म्हणून कुत्र्यासह हा असा धष्टपुष्ट झाला आहे.

**कश्यप**—आमच्याप्रमाणें याचे चार बंधु 'दे दे' म्हणून भीक मागत फिरत नाहींत, म्हणून हा कुत्र्यासह इतका लठ्ठ झालेला आहे.

**भरद्वाज**—आमच्याप्रमाणें या क्षुद्र ब्राह्मणाला बायकोच्या कीर्तीपासून दुःख होत नसावें, म्हणून कुत्र्यासह तो लठ्ठ झाला आहे.

**गौतम**:—आमच्याप्रमाणें याला तीन वर्षांचें जुनें हरिणाजिन किंवा तसलेंच जुनें दर्भासन यांवर काळ कंठावा लागत नसावा, म्हणून कुत्र्यासह हा असा लठ्ठ आहे.

ते आपसांत असें बोलत आहेत, तों तो संन्यासी त्यांना पाहून कुत्र्यासह त्यांच्याजवळ आला आणि रीतीप्रमाणें त्यानें त्यांच्याशीं हस्तस्पर्श केला. त्या वनांत दुष्काळामुळें क्षुधानिवारणाची पंचाईत पडली आहे असें एकमेकांशीं बोलत ते एकमेकांसह पुढें चालूं लागले. सगळ्यांपुढें प्रश्न एकच होता. तो म्हणजे पोटापाण्याचा. फळें तोडून व मुळें उपटून तीं घेत ते चालत असतां दाट वृक्षांनीं आच्छादिलेलें व शुद्ध पाण्यानें भरलेलें एक तळें त्यांच्या दृष्टीस पडलें. त्यांतील कमळें उगवत्या सूर्यासारखीं रमणीय, व त्यांचीं पानें वैडूर्य मण्याच्या रंगाचीं होतीं. पाणी पिण्यासाठीं तेथें नानाप्रकारचे पक्षी येत. त्याच्याकडे जावयाला एकच मार्ग असून त्यांत चिखल नव्हता, व त्यांत उतरण्याला चांगल्या पायऱ्याहि केलेल्या होत्या. त्या कमळांच्या सरोवराचें रक्षण वृषादर्भीनें नेमलेली ती कुरूप राक्षसी यातुधानी करीत होती. ते सात ऋषि पशुसखासह तळ्याशीं गेले व खाण्यासाठीं कमळांचे तंतु काढावे म्हणून आंत उतरूं लागले. इतक्यांत ती भयंकर स्वरूपाची राक्षसी तेथें दिसल्यामुळें ते तीरावरच थबकले आणि तिला म्हणाले, 'तूं येथें एकटीच कोणासाठीं उभी आहेस? तुझें काम काय आहे? या तळ्याच्या पाळीवर बसून तूं काय करीत आहेस?' राक्षसी म्हणाली, 'मी कोणी कां असेना, तुम्हांला तें विचारण्याचें मुळींच कारण नाहीं. मी या तळ्याची रखवालीण आहें एवढें लक्षांत ठेवा म्हणजे झालें.' तेव्हां ऋषि

म्हणाले, ' बाईग, आम्ही सर्व भुकेनें व्याकुळ झालेले आहों. आमच्याजवळ दुसरें कांहींच नसल्यामुळें, तुझ्या संमतीनें आम्ही कमळतंतु काढून घेणार आहों.'

यातुधानी :—तुम्ही इच्छेस येईल तितके तंतु काढा. पण माझी एक अट आहे. एकेकानें आपलें नांव सांगावें व तंतु काढून घ्यावे. चला, लवकर आटपा.

ती यातुधानी राक्षसी आपल्याला मारण्याला टपलेली आहे असें जाणून भुकेनें व्याकुळ झालेला असतांहि अत्रि तिला प्रथम उत्तर देऊं लागला.

अत्रि :—हे सुंदर राक्षसी, सर्वांचें मी पापापासून रक्षण करीत असून रात्रंदिवस वेदपठन करतों. मी अध्ययन करीत नाहीं अशी एक रात्रहि जात नाहीं. म्हणून मला अत्रि असें नांव आहे.

यातुधानी :—हे तेजस्वी तपस्व्या, ज्या प्रकारानें तूं आपलें नांव मला सांगितलेंस, तो माझ्या लक्ष्यांत रहाण्यासारखा नाहीं. तरी तूं तळ्यांत उतर.

वसिष्ठ :—मी इंद्रियांचें दमन करून गृहस्थाश्रमांत रहात असल्यामुळें सर्वांहून श्रेष्ठ आहे. म्हणून मला वसिष्ठ म्हणतात.

यातुधानी :—तुझ्याहि नांवाची व्युपत्ति मोठ्या कष्टानेंच कळण्यासारखी आहे. ती पण ध्यानांत धरणें मला शक्य दिसत नाहीं. जा, तूं तळ्यांत उतर.

कश्यप :—मी सूर्यासारखा तेजस्वी व काश पुष्पासारखा शुभ्र असून प्रत्येक कुळाचा मीच रक्षण करणारा आहें. म्हणून माझें नांव कश्यप हें लक्ष्यांत ठेव.

यातुधानी :—तुझ्याहि नांवाचा तोच प्रकार; जा, उतर तळ्यांत.

भरद्वाज :—पुत्र नसलेल्या व शिष्य नसलेल्या अशा सर्वांचें मी पोषण करतों, तसेंच देवाचें व द्विजाचेंहि करतों आणि स्त्रीचेंहि करतों. अशासाठीं मी नांवाचा भरद्वाज आहें.

यातुधानी :—तुझ्या नांवाच्या व्युत्पत्तीची तीच कथा. जा, तळ्यांत उतर.

गौतम :—मी स्वर्ग व पृथ्वी यांना वश करणारा निर्दोष व समदृष्टि असल्यामुळें, हे कृत्ये, मला गौतम नांवानें ओळख.

यातुधानी :—तूं सांगितलेल्या रीतीनें तुझें नांव लक्षांत ठेवणें कठीणच. तर जा, तळ्यांत उतर.

विश्वामित्र :—सारे देव माझे मित्र असून मीहि गाईचा मित्र आहें. म्हणून मी विश्वामित्र या नांवानें प्रसिद्ध आहें.

**यातुधानी** :—जा, तळ्यांत उतर, तुझ्या नांवाची व्युत्पत्तीहि समजण्यास कष्टच पडतील. मला नाहीं ती समजणार.

**जमदग्नि** :—देवांच्यासाठीं यज्ञ चालला असतां अग्नींतून माझा जन्म झाला, म्हणून माझें जमदग्नि हें नांव प्रख्यात झालें.

**यातुधानी** :—तूं सांगितलेल्या रीतीनें तुझें नांव लक्षांत येणें कठीणच आहे. जा, तूंहि उतर तळ्यांत.

**अरुन्धती** :—पर्वतांना आधार असलेल्या पृथ्वीवर व देवांचें स्थान असलेल्या स्वर्गावर माझें अधिष्टान असून मी पतीच्या मनाप्रमाणें वागतें म्हणून मला अरुन्धती म्हणतात.

**यातुधानी** :—तुझ्या नांवाची निरुक्तिहि समजण्यास तितकीच दुष्कर आहे. मला नाहीं ती झेंपणार. जा तर, तूंहि तळ्यांत उतर.

**गंडा** :—मुखाच्या एका भागाला गंड म्हणजे गाल म्हणतात, ते माझे फुगलेले असल्यामुळें माझें नांव गंडा असें पडलें.

**यातुधानी** :—तुझेंहि नांव समजावयाला कठीणच आहे. मला तें लक्षांत ठेवणें कठीण असल्यामुळें तूंहि तळ्यांत उतर, जा.

**पशुसख** :—पशूंचें मी रंजन करतों व पशूंशीं सदा प्रेमानें वागतों, म्हणून पशुसख हें माझें गुणदर्शक नांव आहे.

**यातुधानी** :—तुझें नांवहि तसेंच लक्षांत यावयास कठीण; जा तर, तूंहि तळ्यांत उतर.

**शुनःसख** :—बाईग, या मुनींनीं आपलीं नांवें ज्या रीतीनें सांगितलीं त्या रीतीनें माझें नांव मला सांगतां येणार नाहीं. पण मी शुनःसखांचा म्हणजे ऋषींचा मित्र आहें हें लक्षांत ठेव.

**यातुधानी** :—तूं आपलें नांव संदिग्ध शब्दांनीं सांगितलेंस. तर तें पुनः एकदां स्पष्ट सांग.

**शुनःसख** :—मीं एकदां आपलें नांव तुला सांगितलें. तुला जर तें समजलें नाहीं, तर या माझ्या त्रिदंडाच्या आघातानें मर जा आणि हो भस्म.

असें म्हणून त्यानें आपला ब्रह्मदंडाचा तिच्या मस्तकावर प्रहार केला. तेव्हां ती भूमीवर पडली आणि तिचें भस्म झालें. शुनःसखानें तिचा वध केल्यावर

आपला दंड त्या हिरवळीवर रोंवला आणि तो खालीं बसला. मग त्या ऋषींनीं कमळें व तंतु यथेष्ट गोळा केले व ते घेऊन आनंदानें ते तळ्यांतून वर आले. मग श्रम घेऊन त्यांनीं कमलतंतूंचे भारे बांधिले आणि तळ्याच्या तीरावर ते ठेवून जलानें पितृतर्पण व देवतर्पण केलें. तें करून ते पुनः बाहेर येतात तों भारे त्यांना दिसले नाहींत. तेव्हां ते म्हणाले, 'भुकेनें व्याकुळ झालेल्या आमच्या भाग्यहीनांचे कमलतंतु कोणा दुष्टानें चोरले बरें?' त्यांना वाटलें, ती चोरी आपल्यांतीलच कोणी तरी केली असावी; तेव्हां ते म्हणाले, 'आतां आपण प्रत्येकानें शपथ घेऊं या.' असें म्हणून एकेक बोलूं लागला.

**अत्रि:**—ज्यानें तंतु चोरले असतील त्याला गाईला लाथ मारल्याचें किंवा सूर्यासमोर मूत्रोत्सर्ग केल्याचें अथवा अनध्यायाच्या दिवशीं पठण केल्याचें पाप लागेल.

**वसिष्ठ:**—बिसतन्तु चोरणारा जो असेल त्याला अनध्यायाच्या दिवशीं वेद म्हणणाराला, कुत्र्याला बरोबर घेऊन फिरणाराला किंवा वाटेल तसें वागणाऱ्या संन्याशाला जें पाप लागतें, तें पाप लागो. शरण आलेल्याला मारणारा, मुलीच्या शुल्कावर उपजीविका करणारा किंवा क्षुद्र माणसापासून द्रव्य घेणारा, यांना जें पातक लागतें तें बिसें चोरणाऱ्याला लागो.

**कश्यप:**—जो बिसतन्तु चोरणारा असेल, तो वाटेल तेथें बडबड करील, लोकांच्या द्रव्याच्या ठेवी गडप करील, खोटी साक्ष देईल, स्वैरपणें मांसभक्षण करील, अपात्रीं दान करील किंवा दिवसाहि स्त्रीगमन करील!

**भरद्वाज:**—ज्यानें बिसें चोरलीं असतील, तो धर्मभ्रष्ट होईल, स्त्रिया, ज्ञाति व पशु यांना दुष्टपणें वागवील, किंवा ब्राह्मणांचा वादांत पाडाव करील. तसाच तो गुरूशिवायच ऋग्वेद व यजुर्वेद यांचें पठन करील, नाहींतर सुख्या गवताच्या अग्नीवरच आहुति देईल!

**जमदग्नि:**—ज्यानें बिसें चोरलीं असतील तो पाण्यांत मलविसर्ग करील, गोवध करील, गाईचा द्वेष करील, ऋतुकालावांचूनहि स्त्रीगमन करील, आपल्या बायकोच्या जिवावर पोट भरील! त्याचा सारे द्वेष करतील, त्याला कोणी मिळणार नाहींत, सारेच त्याचे शत्रु होतील व पाहुणचाराचीहि तो देवघेव करील!

**गौतम:**—वेदाध्ययन केल्यावर तें सोडून देणारा, तीन अग्नि न बाळग-

णारा, सोमविक्रय करणारा, पाण्याच्या टंचाईच्या गांवीं रहाणारा, किंवा शूद्र स्त्रीशीं लग्न करणारा, अशा ब्राह्मणाला जो दोष आहे, तो बिसें चोरणाराला लागो.

**विश्वामित्र** :—स्वतः जीवंत असतांना वडील व सेवक यांचें पोषण लोकांकडून होत असलेलें पहाणाराला जें पातक लागतें, तें बिसतन्तु चोरणाराला लागो. त्याला चांगली गति मिळणार नाहीं, व फार मुलें होतील. तो अपवित्र निंद्य, समृद्धि असून गर्विष्ठ, व मत्सरी होईल. त्याला पावसाळ्यांत बाहेर रहावें लागेल, तो राजाचें पौरोहित्य करील व यज्ञाधिकार नसलेल्याकडून तो यज्ञ करवील !

**अरुन्धती** :—जी बिसें चोरणारी असेल, तिला सासूचा अपमान केल्याचें पतीला दुखविल्याचें, व एकीकडे एकटी बसून गोड खाण्याचें पाप लागो तिला नातेवाईकांच्यामध्यें राहूनहि संध्याकाळीं सातूचें पीठ खावें लागेल, ती उपभोगाला असमर्थ होईल, व तिचीं मुलें क्रूर होतील.

**गण्डा** :—बिसें चोरील, ती खोटें बोलेल, नातेवाईकांशीं भांडेल, कन्येचें मोल घेईल, गोड अन्न करून एकटीच खाईल, तिला नित्य दास्यांत रहावें लागेल व नीच काम करण्यांत तिचा जन्म जाईल.

**पशुसख** :—बिसें ज्यानें चोरलीं असतील तो दास होऊन जन्मास येवो त्याला दारिद्र्य येवो, व देवांना नमस्कार न करण्याचें पाप त्याला लागो.

**शुनःसख** —ज्यानें बिसें चोरलीं असतील त्याला सर्व सामवेद व यजुर्वेद पढलेल्या व ब्रह्मचर्यानें राहिलेल्या अध्वर्यूला कन्या देण्याचें श्रेय मिळो. तसेंच अथर्ववेद पढून अवभृथ स्नान केल्याचेंहि पुण्य मिळो !

शुनःसखाची शपथ ऐकून ऋषि त्याला म्हणाले, 'वा, ब्राह्मणांना इष्ट अशीच तूंहि शपथ घेतलीस. तेव्हां आमचीं बिसें तूंच चोरलींस.' शुनःसखानें उत्तर केलें, 'ऋषिहो, येथें ठेवलेलीं तुमचीं खाण्याचीं बिसें तुम्हांला न दिसल्यामुळें तुम्ही म्हणतां तें खरें आहे, खोटें कांहीं नाहीं. मींच तुमचीं बिसें चोरलीं. तुमची परीक्षा करण्यासाठीं हीं पहा मीं येथें लपवून ठेविलीं आहेत. मी तुम्हां सर्वांचें रक्षण करण्यासाठीं तुमच्या समागमें चाललों आहें. ती क्रूर राक्षसी तुम्हांला ठार करण्यासाठीं टपली होती. वृषादर्भीनेंच तिची त्या कामीं योजना केली होती, पण मींच तिला ठार केलें. अग्नींतून निघालेली ती कृत्या तुमचा वध

करील म्हणून मी तुमच्याकडे आलों. ऋषिहो, मी इन्द्र आहें. तुमच्या निर्लोभी-पणामुळें तुम्हांला सर्व इच्छा पूर्ण करणारे अक्षय लोक मिळाले आहेत; तर येथून आतां उठा आणि त्या अक्षय लोकीं जा.'

युधिष्ठिरा:—इन्द्राचें बोलणें ऐकून ऋषींना आनंद झाला व 'ठीक आहे' असें म्हणून ते इन्द्रासह स्वर्गी गेले. याप्रमाणें ते थोर ऋषि राजानें नानाविध भोग्य वस्तूंचें आमिष दाखवून लोभविले असतांहि व क्षुधेनें व्याकुळ झालेले असूनहि त्या लोभाला बळी पडले नाहींत. म्हणून त्यांना स्वर्ग मिळाला. यास्तव कोणत्याहि परिस्थितींत लोभ धरूं नये. लोभ वर्ज करणें हा श्रेष्ठ धर्म होय. जो ही सुंदर कथा समाजांत सांगेल तो संपत्तिमान् होईल व त्यावर संकटें येणार नाहींत. त्याच्यावर पितर, देव व ऋषि संतुष्ट होतील, व कीर्ति, धर्म, आणि संपत्ति यांचा तो परलोकीं उपभोक्ता होईल. १३. १. ९३.

---

## अध्याय ९४ वा.

[ १. शपथविधि; कमळांची चोरी, ऋषि, राजे व देव यांच्या शपथा. ]

( १ ) भीष्म:—युधिष्ठिरा, याविषयीं आणखी एक जुना इतिहास आहे. तीर्थयात्रेच्या प्रसंगानें हा शपथेचा प्रकार घडला. राजे, ऋषि यांनीं कमळाची चोरी झाली असतां शपथा घेतल्या. पश्चिम प्रभासक्षेत्रीं ते ऋषि मिळून चालत असतां एकमेकांना म्हणाले, 'आपण तीर्थाटण करीत सर्व पृथ्वीभर फिरूं या.' तेव्हां शुक्र, अंगिरा, कवि, अगस्त्य, नारद व पर्वत, भृगु, वसिष्ठ, कश्यप, गौतम, विश्वामित्र, जमदग्नि, गालव, अष्टक, भरद्वाज, अरुन्धती, वालखिल्य हे ऋषि तसेच शिबि, दिलीप, नहुष, अंबरीष, ययाति, धुन्धुमार, पुरु, इत्यादि राजे इन्द्राला पुढें करून सर्व तीर्थस्थानीं भटकत चालले व माघी पौर्णिमेला कौशिकी तीरावरील तीर्थाशीं आले. तेथून तीर्थस्नानानें पवित्र झालेले ते पुण्य-प्रद अशा ब्रह्मसराला गेले. तेथें पाण्यांत स्नान करून त्यांनीं कमळाचीं बिसें खाल्लीं. कांहींनीं तेथें कमळांचे कांदे खणून घेतले, कांहींनीं कमळांचे देंठ उपटून घेतले. असें चाललें असतां तेथील एक कमळ अगस्त्यानें उपटून तीरावर ठेविलें होतें, तें तो पुनः पहावयास आला तों कोणी नेलेलें आढळतें. तेव्हां तो सर्व ऋषींना म्हणाला, 'माझें तें सुंदर कमळ कोणी बरें नेलें? तुमचाच मला संशय येतो. माझें कमळ घेणें बरें नव्हे. धर्माचें वीर्य काळ नष्ट करतो

असें मी ऐकत होतों. तो काळ सांप्रत आलासा दिसतो. नाहींतर हा अधर्म कसा घडता? जोंपर्यंत अधर्माचा पगडा बसला नाहीं तोंच देवलोकीं निघून जाणें बरें! आतां लवकरच ब्राह्मण गांवांत राहून मोठ्या दणदणीत स्वरानें शूद्रांना वेद पढवूं लागतील. आतां राजे धर्माला व्यवहाराचें रूप देतील. तेव्हां तें पहाण्यापूर्वींच आपण डोळे मिटणें बरें. बलिष्ठ दुर्बलांना खाऊन टाकीत असलेले माझ्यापुढें दिसूं लागले आहेत. तेव्हां मला लवकरच परलोकीं जाऊं दे. या लोकांकडे मला बघवत नाहीं.'

याप्रमाणें दुःखानें बोलत असलेल्या आगस्त्याला इतर ऋषि म्हणाले, 'आम्हीं कांहीं तुझें कमळ चोरलें नाहीं. आमच्यावर नसता आळ घेऊं नको. अगस्त्यमुने, पाहिजे तर आम्ही अगदीं कठीण शपथ घेतों.' असा निश्चय करून धर्म जाणण्याऱ्या त्या ऋषींनीं एकामागून एक अशा क्रमानें शपथा घेतल्या.

**भृगुः**—तुझें ज्यानें कमळ घेतलें असेल तो घोड्या-बैलांचें मांस खाईल.

**वसिष्ठः**—तुझें मी कमळ चोरिलें असेल तर नगरांतला भिकारी होईन.

**कश्यपः**—तुझें कमळ घेतलें असेल त्याला खोटी साक्ष दिल्याचें पाप लागो.

**गौतमः**—तुझें पुष्कर चोरणारा शेती करणारा व मत्सरीच होईल.

**अंगिराः**—तुझें कमळ चोरणाराला ब्रह्महत्येचें पाप लागेल.

**धुन्धुमारः**—तुझें कमळ चोरील तो शूद्रेच्या पोटीं जन्मास येइल.

**पूरुः**—तुझें कमळ चोरणारा वैद्य होईल व सासऱ्याच्या पैशावर जगेल.

**दिलीपः**—तुझें पुष्कर हरण केलें असेल, त्याला शूद्रस्त्रीशीं लग्न केलेल्या ब्राह्मणाचें पाप लागेल.

**शुक्रः**—तुझ्या कमळाची चोरी करणारा राजाचा दास होईल.

**जमदग्निः**—तुझें कमळ हरण करणाराला शूद्रगृहीं श्राद्धान्न खाल्याचें पाप लागेल.

**शिबिः**—तुझें कमळ पळविणाराच्या यज्ञांत विघ्न येऊन त्याचें तपस्व्यांशीं भांडण होईल.

**ययातिः**—तुझें कमळ नेणाराला वेदनिंदेचें पातक लागेल.

**नहुषः**—तुझें पुष्कर घेऊन जाणाराला विद्येच्या विक्र्याचें पाप लागेल.

**अम्बरीषः**—तुझ्या कमळाचें हरण करणाराला ब्राह्मणनिंदेचा दोष लागेल.

**नारद**:—तुझें कमळ चोरून नेणाराला थोरांच्या अवज्ञेचें पातक लागो.

**नाभाग**:—तुझें कमळ पळवून नेणाराला खोटें बोलल्याचा दोष लागो.

**कवि**:—तुझें पुष्कर चोरून नेलें असेल त्याला गाईला लाथ मारल्याचें पाप लागो.

**विश्वामित्र**:—तुझें कमळ नेलें असेल त्याला भलत्याकडून यज्ञ करविल्याचा दोष लागो.

**पर्वत**:—तुझें कमळ चोरणाराला गाढवाच्या खटाऱ्यांत बसावें लागेल.

**भरद्वाज**:—तुझें कमळ घेऊन जाणाराला क्रूर व असत्यभाषणी माणसाचीं सारीं पापें लागोत.

**अष्टक**:—तुझें कमळ ज्यानें नेलें असेल त्याला अधर्मानें राज्य करणाऱ्या राजाचें पाप लागो.

**गालव**:—तुझें कमळ ज्यानें घेतलें असेल तो पाप्यांतला पापी होवो.

**अरुन्धती**:—तुझें कमळ घेतलें असेल, तिला सासूची निंदा केल्याचें पाप लागूं दे.

**वालखिल्य**:—तुझें कमळ चोरून नेणाराला पोटासाठीं गांवाच्या शिवेवर एका पायावर उभें रहावें लागेल.

**शुनःसख**:—तुझें पुष्कर नेणाराला स्वैरवर्तनी संन्याशाचें पाप लागेल.

**सुरभि**:—तुझें कमळ चोरलें असेल त्याला दोरीनें पाय बांधून गाईचें दूध काढल्याचें पाप लागो.

युधिष्ठिरा, याप्रमाणें ती मंडळी नानाप्रकारच्या शपथा घेत आहेत व अगस्त्यमुनि रागावलेला आहे असें पाहून इंद्र त्यांना म्हणाला, 'आतां मी शपथ घेतों. अगस्त्यमुने, तुझें कमळ चोरणारा सर्व वेदपठन करील, पुण्यशील व धार्मिक होईल व त्याला ब्रह्मलोक मिळेल.' हें ऐकून अगस्त्य म्हणाला, 'इन्द्रा, ही काय शपथ कीं आशीर्वाद? चल, तूंच माझें कमळ घेतलेंस. दे तें परत.' इन्द्रानें उत्तर केलें, 'मुने, होय. मीं तुझें कमळ घेतलें. पण तें लोभामुळें घेतलें नसून, तुमच्या तोंडून विधिनिषेधरूपी धर्म ऐकावयास मिळावा म्हणून घेतलें. रागावूं नकोस. बरें, मला आज फार उत्तम धर्म ऐकावयास मिळाला. आतां हें कमळ घे व माझ्या अतिक्रमाची क्षमा कर.' हें ऐकून अगस्त्यानें कमळ घेतलें व तो प्रसन्न झाला. मग ते ऋषि तेथून निघाले व त्यांनीं अनेक पवित्र

तीर्थांत स्नानें केलीं. हें आख्यान जो प्रत्येक पर्वणीच्या दिवशीं पठन करील, त्याला विद्वान पुत्र होतील. त्याला आपत्ति स्पर्श करणार नाहींत व तो निष्पाप होत्साता स्वर्गी जाईल. ऋषींनीं सांगितलेल्या धर्माचें जो पठन करील त्याला अव्यय अशा ब्रह्मलोकाची प्राप्ति होईल. १३.१.९४.

---

## अध्याय ९५ वा.

[ १ छत्री व जोडे यांच्या उत्पत्तीची कथा. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—हे भीष्म पितामहा, श्राद्धकर्मांत जोडे व छत्री यांचें जें दान करण्यांत येतें तें कोणी चालू केलें? या वस्तु उत्पन्न कशा झाल्या व त्या काय म्हणून दान देतात? त्या श्राद्धाच्या वेळींच देतात असें नाहीं, तर इतर व्रतें-उत्सव इत्यादि प्रसंगीं सुद्धां देतात. पुण्याच्या इच्छेनें त्या पुष्कळ निमित्तानें देण्यांत येतात. तरी त्यांचें रहस्य मला विस्तारानें ऐकण्याची इच्छा आहे.

**भीष्म**:—राजा, हा सगळा इतिहास तुला सांगतों, ऐक. याविषयीं जमदग्नि व सूर्य यांमधील संवाद तुला सांगतों म्हणजे झालें. पूर्वी भगवान् जमदग्नि धनुष्य घेऊन खेळत असे. तो धनुष्याच्या दोरीवर बाणामागून बाण लावून ते सोडी, आणि त्यानें सोडलेले ते सारे तेजस्वी बाण रेणुका गोळा करून त्याला पुनः आणून देई. धनुष्याच्या दोरीचा टण् व बाणाचा सूं असा शब्द होऊन बाण सुटला म्हणजे जमदग्नीला आनंद वाटे व रेणुका तो परत आणून देई. ज्येष्ठ महिन्यांत एके दिवशीं भर दुपारीं तो ब्राह्मण तसेच बाण सोडीत रेणुकेला म्हणाला, 'जा, ते सोडलेले बाण घेऊन येना, म्हणजे ते मीं पुनः सोडतों. त्याप्रमाणें ती जात असतां वाटेंत तिचे पाय भाजून मस्तक तापूं लागे व ती वृक्षाच्या छायेला उभी राही. पण थोडावेळ उभी राहून ती पतीच्या शापाला भिऊन बाण परत आणण्यासाठीं पुनः जाई. तिला खरोखर दुःख होई, पण पायांना होणारा ताप सहन करीत ती पतीजवळ कांपत कांपत पुनः पुनः येई. तिला यावयाला वेळ लागलेला पाहून ऋषि जरा रागानें तिला म्हणे, 'यावयाला इतका वेळ कां लागतो'?

रेणुकेनें उत्तर दिलें, 'प्रभो, माझें मस्तक तापून गेलें व पाय पोळूं लागले. सूर्याच्यां उन्हानें मीं त्रस्त होऊन जरा वृक्षाखालीं छायेंत उभी राहिलें, म्हणून परत यावयाला जरा वेळ लागला, तरी कृपा करा व रागावूं नका.' तेव्हां

जमदग्नि म्हणाला, 'रेणुके, तुला ताप देणाऱ्या या उष्ण किरणांच्या सूर्याला मी बाण मारून अस्त्राच्या तेजानें आतांच खालीं पाडतों.

युधिष्ठिरा, असें म्हणून जगदग्नीनें आपलें दिव्य धनुष्य व बाण घेतले आणि सूर्य जसा जाई तसा त्याच्या समोर तो उभा राहिला. त्याला याप्रमाणें कंबर कसून उभा राहिलेला पाहून सूर्य ब्राह्मणरूपानें त्याजवळ आला आणि म्हणाला, 'मुने, सूर्यानें तुझा असा अपराध तरी काय केला ? तो आकाशांत राहून तेथून आपल्या किरणांनीं जल शोषून घेतो व तें घेतल्यावर वर्षाकाळीं पुनः सोडून देतो. त्यामुळें मनुष्याचें सुखानें पोषण करणारें अन्न पिकतें. अन्न म्हणजे प्राण असें वेदांतच सांगितलें आहे. पावसाळ्यांत तो ढगांनीं झांकलेला व किरणांनीं वेष्टिलेला सूर्य या सप्तद्वीपात्मक पृथ्वीवर जलाचा वर्षाव करतो. तेव्हां औषधि व वेली यांच्या फुलांपासून व पानांपासून त्या पावसामुळें सर्व प्रकारचें अन्न उत्पन्न होतें. त्या अन्नाच्या योगानेंच जातकर्म, सर्व व्रतें, उपनयन, गोदान, विवाह इत्यादि सर्व संस्कार, व यज्ञसमारंभ साजरे होऊन दानें, द्रव्यसंचय याहि गोष्टी अन्नामुळेंच घडून येतात. भार्गवा, हें काय तुला ठाऊक नाहीं ? सर्व रमणीय वस्तु, सगळे उद्योग, हीं अन्नापासून होतात. मी हें तुला ठाऊक असलेलेंच पुनः सांगत आहें. तरी कृपा कर. मुने, सूर्याला खालीं पाडून तुला काय मिळणार आहे ?' १३. १. ९५.

---

## अध्याय ९६ वा.

[ १ छत्री व जोडे यांच्या उत्पत्तिकथा पुढें चालू ]

( १ ) **युधिष्ठिरः**—आजोबा, सूर्यानें अशी विनवणी केली असतां, तो मुनि काय म्हणाला ? व त्यानें काय केलें ?

**भीष्मः**—युधिष्ठिरा, सूर्यानें विनवणी केली, तरी जमदग्नि कांहीं शांत झाला नाहीं. तेव्हां ब्राह्मणरूपी सूर्यानें पुनः हात जोडून गोड शब्दांनीं त्याला पुनः म्हटलें, 'ऋषिश्रेष्ठा, सूर्य नित्य चल आहे. तरी त्या एकसारखा सतत गतिमान् सूर्याचा तूं कसा वेध करशील ?' जमदग्नीनें उत्तर केलें, 'सूर्या, तूं स्थिर आहेस आणि चलहि आहेस, हें मी ज्ञानदृष्टीनें ओळखतों. तरी तुला नम्रता शिकविण्याचें काम आज मला अवश्य केलें पाहिजे. तूं इतर वेळीं चल असलास तरी मध्याह्नीं क्षणभर एका ठिकाणीं उभा रहातोस, त्यावेळीं मी तुला वेधीन;

त्यांत विचार कसला करावयाचा?' सूर्य म्हणाला, 'ब्राह्मणश्रेष्ठा, तूं धनुर्धरांम अग्रगण्य आहेस, माझा वेध तूं निःसंशय करशील. मी तुझा अपराधी अस तुला शरण आलों आहें.

सूर्याचें भाषण ऐकून जमदग्नीनें हंसून उत्तर केलें, 'सूर्या, तूं मुळींच भीं बाळगूं नको. तूं मला शरण येऊन नमस्कार केला आहेस. शरणागताला मर देणें म्हणजे ब्राह्मणाचा सरळपणा, पृथ्वीचें स्थैर्य, चंद्राचा शीतलपणा, वरुणा गांभीर्य, अग्नीची प्रभा, मेरूचें तेज, व सूर्याचा ताप यांचें उल्लंघन करणें होय. शरणागताला मरण देणाराला गुरुपत्नीगमन, ब्राह्मण-वध, सुरापान यां पातक लागतें. पण आतां तुझ्या किरणांनीं तापून गेलेल्या मार्गावरून सुखा चालतां येईल असा उपाय शोधून काढ, म्हणजे तुझ्या अपराधाची भरपा होईल.' जमदग्नीचें भाषण ऐकून सूर्यानें त्याला तत्काल छत्री व जोडे दिले तो म्हणाला, 'ऋषे, या छत्रीनें माझ्या किरणाचें निवारण होऊन मस्तका रक्षण होईल. आणि पायाच्या रक्षणासाठीं या चामड्याच्या पादुका घे. आज पासून या वस्तु जगांत चालू होतील व सर्व पुण्यकर्मांत यांचें दान अक्षय फल देणारें होईल.'

युधिष्ठिरा, याप्रमाणें छत्री व जोडा या वस्तु सूर्यानें चालू केल्या. आख्यान त्रिभुवनांत पुण्यकारक आहे. यास्तव तूं ब्राह्मणांना छत्री व जोडे दा दे. त्यांमुळें मोठा धर्म घडतो, यांत कांहीं शंका नाहीं. जो ब्राह्मणाला शंभ काड्यांची पांढरी छत्री देतो त्याला मरणोत्तर सुख मिळतें. त्याला स्वर्ग मिळू ब्राह्मणांकडून बहुमान प्राप्त होतो. पाय पोळून निघणाऱ्या वेदपाठक व्रतस्थ ब्राह्मणाला जो जोडे देतो त्यालाहि देवतांना इष्ट असे लोक मिळतात व मरणो त्तर तो गोलोकीं आनंदानें रहातो. असें हें छत्री व जोडे यांच्या दानाचे माहात्म्य तुला मीं सविस्तर सांगितलें. १३.१.९६.

## अध्याय ९७ वा.

[ १. गृहस्थधर्माचें वर्णन; वासुदेव व पृथ्वी यांमधील संवाद. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—आजोबा, आतां मला गृहस्थाश्रमाचे धर्म सविस्तर सांगा. तसेंच काय केल्यानें मनुष्य वैभवास चढतो, तेंहि सांगा.

**भीष्म**:—युधिष्ठिरा, याविषयीं मी तुला वासुदेव आणि पृथ्वी यांमध्यें पूर्वीं झालेला संवाद सांगतों. एकदां प्रतापी वासुदेवानें पृथ्वीची स्तुति करून तूं आतां विचारलेला प्रश्नच तिला विचारला. तो म्हणाला, 'हे पृथ्वि, माझ्या सारख्यानें गृहस्थधर्माचा स्वीकार केल्यावर कोणत्या गोष्टी अवश्य कराव्या म्हणजे तो कृतकृत्य होईल.' तेव्हां पृथ्वीनें उत्तर दिलें, 'माधवा, ऋषि, पितर, देव व माणसें यांची पूजा करावी; ती कशी करावी तें ऐक; यज्ञ करून देवांची पूजा करावी व आदरसत्कारानें माणसांची करावी. सत्पात्र ब्राह्मणांना त्यांच्या इच्छेप्रमाणें भोजन द्यावें, म्हणजे ऋषि संतुष्ट होतात. नित्य अग्निसेवा करून वैश्वदेव करावा म्हणजे देव संतुष्ट होतात. पितरांना संतोष द्यावयाचा तर प्रतिदिवशीं अन्न, उदक, दूध, फळें व मुळें यांनीं श्राद्ध करावें. शिजविलेल्या अन्नानें यथाविधि अग्नींत आहुति देऊन वैश्वदेव करावा. अग्नीषोम, विश्वेदेव, धन्वंतरि यांना पृथक् होम सांगितला आहे, त्या क्रमानें बलिकर्म करावें. दक्षिण दिशेस बलि ठेवतांना 'यमाय,' पश्चिमेस 'वरुणाय,' उत्तरेस 'सोमाय,' मध्यभागीं 'प्रजापतये,' ईशान्येस 'धन्वन्तरये' व पूर्वेस 'इंद्राय' असें म्हणावें. मनुष्याच्या नांवें ठेवावयाचा बलि घराच्या दाराजवळ ठेवावा. मरुत् आणि इतर दैवतें यांचा घरांत ठेवावा व विश्वेदेवांचा बलि आकाशांत फेकावा. भूत व पिशाच यांना रात्रीचा बलि द्यावा. याप्रमाणें बलिदान झाल्यावर ब्राह्मणास भिक्षा वाढावी. ब्राह्मण नसल्यास ती भिक्षा अग्नींत टाकावी. पितरांचें श्राद्ध करावें असें जेव्हां माणसाच्या मनांत येईल, तेव्हां तें लगेच करावें व तें झाल्यावर विधियुक्त बलिदान करून वैश्वदेव करावा. नंतर ब्राह्मणांना बोलावून त्यांच्यासह अतिथींनाहि भोजन घालावें. तेणेंकरून मानव तृप्त होतात. नित्य स्थित नसतो म्हणून अतिथीला अतिथि ( अस्थित ) म्हणतात. आचार्य, पिता, मित्र, संबंधी व अतिथि यांना 'हें माझ्या घरीं आहे' असें सांगितल्यावर त्यांतून ते जें मागतील तें त्यांना अर्पण करावें, असा धर्म सांगितला आहे. गृहस्थानें सदा शिष्टांसह भोजन करावें. राजा, ऋत्विज, स्नातक, गुरु व श्वशुर यांची ते एक वर्ष घरीं रहाणार असतील तर मधुपर्कानें पूजा करावी. कुत्रे, श्वपच् ( चांडाळ )

व पक्षी यांना जमिनीवर अन्न द्यावें. असा हा वैश्वदेवविधि सकाळ संध्याकाळ करावा. हे गृहस्थाचे धर्म असून जो निर्मत्सर बुद्धीनें ते आचरतील त्यांना ऋषींचा वर मिळून मरणोत्तर स्वर्गांत उच्च स्थान मिळेल. पृथ्वीचें हें बोलणें ऐकून वासुदेवानें तसें आचरण नित्य ठेविलें. युधिष्ठिरा, तूंहि तसेंच ठेव. याप्रमाणें गृहस्थधर्माचें आचरण तूं केलें असतां या लोकीं तुला कीर्ति मिळून मरणोत्तर स्वर्गप्राप्ति होईल. १३.१.९७.

---

## अध्याय ९८ वा.

[ १. फुलें, धूप, दीप यांच्या दानाचा महिमा; सुवर्ण–मनु संवाद; शुक्रबलिसंवाद ]

**युधिष्ठिर**:—हे भीष्मपितामहा, दीपदानाची उत्पत्ति कशी झाली, तें कसें करावयाचें व त्याचें फळ काय तें मला सांगा.

**भीष्म**:—युधिष्ठिरा, याविषयीं प्रजापति मनु आणि सुवर्ण ब्राह्मण यांमधील प्राचीन संवाद ऐकण्यांत येतो. सुवर्ण नांवाचा कोणी तपस्वी होता. त्याचा वर्ण सोन्यासारखा असल्यामुळें त्याला सुवर्ण म्हणत. तो कुल, शील व गुण यांनीं युक्त व वेदाभ्यासांत गढलेला असे. उत्तम वंशांत जन्मलेल्या अनेकांपेक्षां तो आपल्या गुणांनीं श्रेष्ठ झाला होता. एकदां मनु प्रजापति त्याच्या दृष्टीस पडला असतां, तो त्याच्याजवळ गेला आणि दोघांनीं एकमेकांना कुशल प्रश्न विचारिले. मग मेरूच्या एका रम्य शिळेवर बसून त्यांनीं अनेक विषयांची चर्चा केली व ब्रह्मर्षि, देव, दैत्य इत्यादि थोरांच्या पुराणांतील गोष्टी एकमेकांस सांगितल्या. नंतर त्या स्वायंभुव मनूला सुवर्ण म्हणाला, ‘मी तुला कांहीं प्रश्न विचारतों, त्यांचीं सर्व लोकांच्या हितासाठीं तूं उत्तरें दे. दैवतांची फुलांनीं पूजा करतात, हा प्रकार प्रथम कसा उत्पन्न झाला, त्याचा विधि कसा व त्याचें फळ काय हें मला सांग.’

मनूनें उत्तर दिलें, ‘सुवर्णा, याविषयीं शुक्र व बलि यांमधील प्राचीन संवाद सांगण्यांत येतो. विरोचनपुत्र बलि त्रैलोक्याचें राज्य करीत असतां शुक्र एकदां त्याच्याकडे गेला. तेव्हां बलीनें त्याला अर्घ्य पाद्य इत्यादि देऊन पूजा केली व त्याला आसन व विधियुक्त दक्षिणा देऊन तो स्वतःहि एका आसनावर बसला. मग तूं ज्याविषयीं प्रश्न केलास, त्याविषयीं त्यांच्यांतहि प्रश्नोत्तरें झालीं. म्हणजे बलीनें फुलें, धूप, दीप यांच्या दानाचें फल काय, असें शुक्राला विचारिलें. तेव्हां शुक्र म्हणाला ‘प्रथम तप उत्पन्न झालें व त्यानंतर धर्म झाला. त्यांच्या-

मध्यें लता व औषधि झाल्या. या औषधि अनेक प्रकारच्या होत्या. अमृत व विषहि उत्पन्न झालें. गवताच्या जातीहि अनेक झाल्या. अमृतानें मनाला तत्काल आनंद व तृप्ति होतात व विष आपल्या तीव्र गंधानें मनाला ग्लानि आणितें. अमृत हें मंगलकारक व विष हें अगदीं अमंगल होय. सर्व ओषधि अमृतमय असून तेज व अग्नि यांपासून विष उत्पन्न झालें. फुलें मनाला आनंद देतात व शोभाहि आणितात, यास्तव त्यांना पुण्यवान् माणसांनीं 'सुमनें' हें नांव दिलें. जो शुद्ध होऊन देवतांना फुलें अर्पण करतो त्यावर देव संतुष्ट होऊन त्याला पुष्ट करतात. ज्याला उद्देशून फुलें अर्पण करावीं तो त्यांनीं प्रसन्न होतो. सोमापासून झालेल्या अशा शीतल तशाच दुसऱ्या कडक ओषधि याहि झाल्या. त्या अत्यंत हितकारक व पुष्कळ रूपांच्या असतात.

आतां यज्ञिय वृक्ष आणि अयज्ञिय वृक्ष कोणते, तसेंच असुरांना इष्ट फुलें कोणतीं व देवांना आवडणारीं कोणतीं हें सांगतों. यक्ष, राक्षस, नाग, मनुष्यें, व पितर यांना कोणतीं प्रिय आहेत व तसेंच पत्नीला कोणतीं आवडतात तेंहि क्रमानें ऐक. फुलें रानटी व गांवठी तशींच नांगरलेल्या भूमींत व पर्वतावर उगवणारीं, कांटेरी व बिनकाट्यांचीं अशीं असून त्यांना सुवास, सौंदर्य, रस व गोडी हीं असतात. वास दोन प्रकारचा असतो; मधुर व अनिष्ट. त्यांतील मधुर वासांचीं फुलें देवांना आवडतात. बिनकाट्यांच्या वृक्षांचीं फुलें बहुधा पांढरीं असतात व तीं देवांना आवडतात. पाण्यांत उगवणारीं जीं कमलादि फुलें आहेत, तीं गंधर्व, नाग, यज्ञ यांना द्यावीं. ओषधि तांबड्या फुलांच्या, कडू व कांटेरी असतात. त्यांचा उपयोग मंत्रप्रयोगानें शत्रुवध करण्याच्या कामीं करावा असें अथर्ववेदांत सांगितलें आहे. भूतांना अर्पण करावयाच्या ओषधि तीव्र तेजाच्या, कांटेरी, बहुधा तांबड्या आणि काळ्या वर्णाच्या असाव्यात. मनाला रमविणारीं फार मधुर, व सुंदर फुलें मनुष्यांना आवडतात. श्मशान किंवा देवळें यांत वाढलेलीं फुलें पुष्टिप्रद कार्यांत, विवाहांत, किंवा स्त्रीपुरुषांच्या एकान्तांत नेऊं नयेत. डोंगराच्या माथ्यावर उगवणारीं, मधुर वासाचीं सुंदर फुलें धुवून व वरतीं वास शिंपडून विधिपुरस्सर देवांना द्यावीं. वासानें देव संतुष्ट होतात, सौन्दर्यानें यक्ष, राक्षस व नाग उपभोगानें व मनुष्यें या सर्वांनीं संतुष्ट होतात. देव तत्काल संतोष पावतात व संतुष्ट झाले कीं मनुष्याच्या इच्छा पूर्ण करतात. त्यांना आनंद व संतोष दिल्यास ते उलट आनंद व संतोष देतात पण त्यांचा अवमान करणाऱ्या नीच माणसांना ते जाळून टाकितात.

आतां धूपदानविधीचें फळ सांगतों. धूप चांगले वाईट पुष्कळ प्रकारचे आहेत; गुग्गुळासारखे कांहीं वृक्षरसांपासून निघतात, अष्टगंधासारखीं लांकडें विस्तवांत घालून कांहीं काढतात व कांहीं मिश्रणानें कृत्रिम बनवितात. त्यांचे वासहि इष्ट व अनिष्ट असे दोन्ही आहेत. सालईवांचून इतर वृक्षांच्या चिकाचा सर्व प्रकारचा धूप देवांना प्रिय असतो. अगरूसारखे अग्नीच्या साह्यानें काढिलेले धूप यक्ष, राक्षस व नाग यांना आवडतात, आणि सालईसारखे धूप दैत्यांना आवडतात. सर्जासारख्या झाडांचे चीक खनिज व लांकडी भुकींत मिसळून व त्यावर आसव घालून केलेले धूप माणसांसाठीं सांगितले आहेत. असले धूप देव, दानव, भूतें यांनाहि संतुष्ट करतात. यावांचून आणखीहि धूप आहेत, त्यांचा उपयोग लोक विहारप्रसंगीं करतात. फुलें अर्पण करण्यानें जें फळ मिळतें, तेंच धूपदानानेंहि मिळतें.

आतां दीपदानाचें फल सांगतों. दीप कसा असतो व तो कोणी, केव्हां व कशा प्रकारें द्यावा हें ऐक. दीपाला ज्योति, तेज, प्रकाश अशीं नांवें असून त्याची ऊर्ध्वगति आहे; यास्तव दीपरूपी तेजाच्या दानानें माणसाचें तेज वृद्धि पावतें. अंधतम नरक व अंधकारमय असा दक्षिणायन मार्ग यांतून सुटावयासाठीं दीपदान प्रशस्त मानिलें आहे. दीप ऊर्ध्वगतीचा व अंधकार नाहींसा करणारा असल्यामुळें दीप देणारा ऊर्ध्वगतिमान होतो. दीपदानामुळें देव तेजस्वी व प्रभाशाली झाले व त्याच्या अभावीं राक्षस तमोव्याप्त झाले. यास्तव दीपदान करावें. प्रकाशदानानें मनुष्य तीक्ष्ण दृष्टीचा व तेजस्वी होतो. दीप दिल्यावर तो परत घेऊं नये किंवा मालवूंहि नये. दीप चोरणारा आंधळा व तामसी होतो, तर दीपदाता स्वर्गलोकीं दीपमाळेसारखा विराजमान होतो. तुपाचा दिवा सर्वांत उत्तम. त्याच्या खालोखाल वनस्पतीच्या तेलाचा. वसा आदिकरून प्राणिज पदार्थांचा दिवा वैभवेच्छूनें कधीं देऊं नये. डोंगराच्या कड्यांवर, रानांत, देवळांत, चौकांत दिवा लावणाऱ्याच्या सर्व वैभवेच्छा पूर्ण होतात. तो कुलदीपक व शुद्ध मनाचा होऊन प्रसिद्धीस येतो व आकाशस्थ ज्योतीच्या तोडीचा होऊन बसतो.

आतां देव, यक्ष, नाग, मनुष्य, राक्षस व भूतें यांना बलि देण्यानें काय फळ मिळतें तें सांगतों. ब्राम्हण, देवता, अतिथि व मुलें यांच्यापूर्वी जे भोजन करतात त्या अमंगलांना राक्षसच म्हणावें. म्हणून देवांना शिरसावंदन करून आधीं बलिदान करावें. म्हणजे देवता त्याचा स्वीकार करून दात्याचें कल्याण चिंतितात. यक्ष, राक्षस, नाग इत्यादि दुसरे बाहेरचेहि आगंतुक बलिदानानें संतुष्ट होतात. या लोकीं दिलेल्या दानावर देवता व पितर हीं जगतात व संतुष्ट होऊन

दात्याला आयुष्य, कीर्ति व धन देतात. देवांना बलि द्यावयाचे ते फुलांसह द्यावे व ते दहीं, दुध, सुगंधि द्रव्यें असे सुंदर असावे. यक्ष राक्षसादिकांचे बलि रक्त-मांसयुक्त असावे, व मद्य, आसव, लाह्या हींहि त्याबरोबर असावीं. नागांना कमळासारख्या फुलांनीं मिश्रित असे बलि आवडतात.

भूतांना भरपूर गूळ असलेले बलि द्यावे. प्रथम बलिदान करून नंतर स्वतः भोजन करणारा बलशाली व वीर्यवान् होतो, म्हणून देवांना आधीं बलिदान करावें. अशा दात्याचें घर देवतांच्या कृपेनें नित्य झळकत असतें. याप्रमाणें शुक्रानें बलिराजाला, मनूनें सुवर्ण ब्राह्मणाला, व शेवटीं नारदानें मला पुष्प दीप धूप यांच्या दानाचें स्वरूप व माहात्म्य सांगितलें. युधिष्ठिरा, तूंहि हें समजून घेऊन त्याप्रमाणें आचरण कर. १३. १. ९८.

---

## अध्याय ९९ वा.

[ १ धूपदान, दीपदान व बलिदान यांचें माहात्म्य पुढें चालू; नहुषाची कथा; अगस्त्य आणि भृगु यांचा संवाद ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, पुष्पदान, धूपदान तसेंच बलिदान यांच्या फलाविषयीं तुम्हीं सांगितलेलें मीं ऐकिलें. पण तें पुनः आपण सांगाल तर बरें होईल. दीपदानाचें फल काय व बलिदान गृहस्थांकडून कां देण्यांत येतें बरें ?

**भीष्म**:—युधिष्ठिरा, या विषयावर नहुष आणि अगस्त्य व भृगु यांमध्यें पूर्वीं संवाद झाला होता, तो सांगण्यांत येतो. नहुष राजाला कांहीं पुण्याई-मुळें एकदां देवांचें राज्य मिळालें. तो स्वर्गांत रहात होता. तरी मनुष्यलोकीं सर्व कर्में तो दिव्यकर्मांसमागमें करीत असे. अग्नीला होम देणें, त्याला समिधा, कुश, व फुलें वहाणें, भात लाह्या यांचे बलि देऊन धूपदीप दाखविणें, हें सर्व त्या राजाच्या घरांत रीतसर चाले. स्वर्गांत देखील तो जपयज्ञ, मनोयज्ञ व देवपूजा भूलोकींप्रमाणेंच विधियुक्त करी. पण असें चाललें असतां एकदां 'आपण इन्द्र आहों' असा अभिमान त्याच्या मनांत शिरला व त्यामुळें हीं सर्व, कर्में बंद पडलीं. वरदानानें मदोन्मत्त होऊन त्यानें आपलें वाहन उचलून नेण्यासाठीं ऋषींची योजनाहि केली. पण कर्महीनत्वानें त्याचें बल नष्ट झालें. बराच काळ ऋषींनीं त्याचें वाहन वाहून नेण्याचें काम केलें. ऋषींना पाळीनें तो हें काम सांगूं लागला. तेव्हां एकदां अगस्त्य ऋषीची पाळी आली. तेव्हां

ब्रह्मवेत्ता भृगु अगस्त्याच्या आश्रमांत आला आणि त्याला म्हणाला, 'मुने, या दुष्ट इन्द्राचा हा दांडगेपणा आपण काय म्हणून सहन करावा ?'

अगस्त्यानें उत्तर केलें, त्याला शाप देणें माझ्याकडून कसें होईल बरें? त्याला वर मिळालेला आहे कीं त्याच्या दृष्टीसमोर जो येईल तो त्याला वश होईल. असा त्याला स्वर्गी येतांना देवांकडून वर मिळाला आहे. म्हणून तुझ्याकडून काय किंवा माझ्याकडून काय तो जाळून टाकण्यांत आला नाहीं. दुसऱ्याहि कोणा ऋषीला तसें न करतां येण्याचें हेंच कारण. आणखी त्याला पिण्यासाठीं अमृतहि देण्यांत आलें, तेव्हां आपल्याकडून त्याचें पतन घडून येणें शक्य नाहीं. देवांच्या वरामुळें त्यानें ब्राह्मणांवर हा अतिक्रम चालविला आहे.'

भृगु म्हणाला, 'ऋषि हो, मी आतां ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरूनच दैवयोगानें मूढ झालेल्या बलिष्ट नहुषाचा प्रतिकार कसा करावा याचा विचार करण्यासाठीं तुझ्याकडे आलों आहें. आजहि जर तो दुर्बुद्धि तुला वाहनाला जोडील तर त्या दांडग्याला मी आपल्या सामर्थ्यानें इन्द्राचा अनिन्द्र करून टाकीन व जुन्या इन्द्राची पुनः स्थापना करीन. आज तो तुला पायानें ढकलील, व तसें झालें म्हणजे दैवानें त्याचें चित्तच नष्ट करून त्याला आत्मनाशाला प्रवृत्त केल्यामुळें मी त्याला 'सर्प हो' असा शाप देईन व अशा रीतीनें तुमच्या समक्ष मी त्या पापी व ऐश्वर्यमूढ नहुषाला स्वर्गातून पृथ्वीवर पाडीन. तुला ज्याअर्थी तसें करणें रुचत नाहीं, त्याअर्थी मीच तें करतों झालें. भृगूनें असें सांगितलें असतां अगस्त्याची चिंता दूर होऊन त्याला परम हर्ष झाला. १३. १. ९९.

---

## अध्याय १०० वा.

[ १. नहुषाची कथा पुढें चालू ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, नहुष विपद्ग्रस्त कसा झाला, त्याला पृथ्वीवर कसें पाडण्यांत आलें व त्याचें इन्द्रपद नष्ट कसें झालें हें मला कृपा करून सांगा.

भीष्म—याप्रमाणें त्यांचा संवाद चालला असतां नहुषाचें स्वर्ग व पृथ्वी अशा दोन्ही ठिकाणचें सर्व काम नित्याप्रमाणें चाललें होतें. दीपदान, बलिदान, मुलांचे वाढदिवस इत्यादि सर्व चालू होते. सुज्ञांचे आचार कोठेंहि चांगलेच असतात. तसे चालले आहेत तोंपर्यंतच गृहस्थांकडे समृद्धि असते. शिजविलेल्या

अन्नाचा पहिला वांटा अतिथीला देण्यांत येई. बलिदानानें देवता तृप्त होत होत्या. बलिदानानें गृहस्थाला जो आनंद होतो, त्याच्या शंभरपट देवतांना होत असतो. विधिपुरःसर पूजा केल्यानें गृहदेवता, ऋषि व पितर संतुष्ट होणारच. या गोष्टी लक्षांत ठेवून नहुष इन्द्रपद मिळाल्यावरहि हीं सारीं धर्मकृत्यें यथाविधि करीत असे. पण एक काळ असा आला कीं त्याच्या भाग्याला त्या काळीं उतरती कळा लागली. तो या सर्व कृत्यांची अवज्ञा करूं लागला, व पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्याचें वर्तन चालू झाल्यामुळें बलाच्या गर्वानें त्याचें वैभव नष्ट झालें. पूर्वींप्रमाणें धूपदान, दीपदान, देवपितृतर्पण या गोष्टी तो करीत नाहींसा झाला. त्याच्या यज्ञांत राक्षस अडथळे आणूं लागले. अशा प्रसंगीं त्यानें अगस्त्य ऋषीला आपल्या वाहनाला लाविलें. सरस्वतीच्या कांठावरून त्यानें त्याला अभिमानानें हाक मारिली. तेव्हां भृगु त्याला म्हणाला, 'बा अगस्त्या, तूं डोळे मीट म्हणजे मी तुझ्या जटेंत शिरतों.' असें म्हणून भृगु त्याच्या जटेंत शिरला व तेथून नहुषाचा पाडाव करण्याची योजना त्यानें केली. मग इन्द्रपदावर बसलेल्या नहुषानें वाहन ओढण्यासाठीं अगस्त्याला सांगितलें असतां तो म्हणाला, 'सांगा, कोणत्या देशाला रथ नेऊं तें म्हणजे तसें करतों.' मग नहुषानें अगस्त्याला रथाला जुंपलें व रथ चालू झाला. भृगु अगस्त्याच्या जटेंत नहुषाची व आपली दृष्टादृष्ट होणार नाहीं अशा रीतीनें लपून बसला; कारण नहुषाला मिळालेल्या वराचा प्रभाव त्याला ठाऊक होता. नहुषानें वाहनाला जुंपलें असतां व लवकर चालावें म्हणून तो अगस्त्याला रागानें चाबकानें व पायानें हाणीत असतांहि धर्मात्मा अगस्त्य मुळींच रागावला नाहीं. पण नहुषानें त्याच्या मस्तकावर जेव्हां लाथ मारिली, तेव्हां त्याच्या जटेंत लपून बसलेल्या भृगूला राग आला व त्यानें त्या पापी नहुषाला शाप दिला कीं, 'ज्याअर्थीं या महामुनीला तूं पायानें मस्तकावर हाणिलेंस, त्याअर्थीं तूं लवकरच सर्प होऊन भूमीवर पड.' भृगूनें याप्रमाणें शापिलें असतां नहुष सर्प होऊन भूमीवर पडला. हें सारें भृगूनें नहुषाच्या दृष्टीस न पडतांच केलें; कारण त्यानें जर भृगूला पाहिलें असतें, तर त्याला भूमीवर पाडणें भृगूला जुळतें ना. नहुष भूमीवर पडला तरी त्याची स्मृति मात्र टिकून राहिली; कारण त्यानें पूर्वीं अनेक दानें, तपें आणि नियम आचरिले होते. शाप झाल्यावर नहुष 'माझ्या शापाचा अन्त होवो' म्हणून भृगूला विनवूं लागला. तेव्हां अगस्त्याला त्याची दया आली व त्यानेंच भृगूला प्रसन्न करून त्याच्याकडून शापाचा अन्त मागून घेतला. भृगु

म्हणाला, 'नहुषा, तुझ्या कुलांत पुढें युधिष्ठिर राजा होईल, तो तुला शापांतून सोडवील.' भृगु निघून गेल्यावर अगस्त्यहि इन्द्राचें कार्य झालें असें समजून आपल्या आश्रमास गेला. राजा, नहुष त्या शापापासून सुटून तुझ्या देखतच ब्रह्मलोकीं गेला. भृगु त्याला भूमीवर पाडल्यावर स्वतः ब्रह्मलोकीं गेला आणि त्यानें घडलेला प्रकार ब्रह्मदेवाला सांगितला. तेव्हां ब्रह्मदेवानें इन्द्रासह देवांना हाक मारून सांगितलें कीं, 'माझ्या वरदानामुळें नहुषाला देवराज्य मिळालें, पण अगस्त्याच्या रागामुळें तो पुन्हां भूतलावर गेला. आतां देवांनीं राजावांचून रहाणें शक्य नसल्यामुळें इन्द्राला पुनः देवराज्यावर बसवावें.' हें ऐकून देव आनंदानें 'ठीक आहे' असें म्हणाले व इन्द्राला त्याप्रमाणें ब्रह्मदेवानें पूर्वीप्रमाणें देवराज्यावर बसविलें. याप्रमाणें धर्माच्या अतिक्रमामुळें नहुषावर असा प्रसंग आला, पण कर्मानेंच त्याला पुनः सिद्धि मिळाली. यासाठीं गृहस्थांनीं संध्याकाळीं दिवे द्यावे, म्हणजे मरणोत्तर त्यांना दिव्य डोळे मिळतील. दीप देणारे पूर्णचंद्राप्रमाणें तेजस्वी होतात. डोळ्याचीं पातीं जितके वेळ लवतात तितकीं वर्षें दीपदान करणाराला रूप आणि बल हीं प्राप्त होतात. १३. १. १००.

---

## अध्याय १०१ वा.

[ १. ब्राह्मणाचें द्रव्य हरण करणाराला मिळणारी गति; चांडाल आणि क्षत्रिय यांचा संवाद ]

( १ ) **युधिष्ठिर**—जे मूर्ख लोक ब्राह्मणाचें द्रव्य दुष्टपणें लुबाडतात ते कोठें जातात बरें ?

**भीष्मः**—युधिष्ठिरा, याविषयीं चांडाल व एक क्षुद्र क्षत्रिय यांमधील संवाद प्रसिद्ध आहे. तो क्षत्रिय चांडालाला म्हणाला, 'चाण्डाला, तूं वृद्ध दिसतोस, पण तुझी कृति तर आहे पोरासारखी ! कुत्रीं आणि गाढवें यांनीं उडविलेल्या धुळीनें तुझें अंग माखत असतां, गाईच्या दुधाच्या कणांचा मात्र तुला कंटाळा येतो, हें कसें ? चांडालाचा व्यवहार म्हणजे साधूंनीं निंदलेला, आणि तूं तर गाईच्या दुधाचे तुषार अंगावर उडाले असतां कुंडांत जाऊन ते धुतोस !' चांडालानें उत्तर केलें, 'राजा, पूर्वीं असें झालें कीं, एका ब्राह्मणाच्या गाई राजा पळवून नेत असतां त्यांच्या ओंठ्यांतून निघणाऱ्या दुधाचे तुषार वाटेवरील सोमाच्या

वेलीवर उडाले. पुढें तो सोम यज्ञांत नेला असतां यजमान, राजा व त्याचे ऋत्विज् ब्राह्मण हे तो सोमरस प्याले व ब्रह्मस्वाच्या अपहारानें दूषित झालेला सोमरस त्यांच्या पोटांत गेल्यामुळें ते सारे नरकास गेले ! जे ब्राह्मण व राजे पुढें त्या गाईचें दूध प्याले व दहींतूप सेविते झाले तेहि नरकास गेले. त्या राजाची स्त्री, पुत्र व नातू यांचींहि आयुष्यें त्यामुळें क्षीण झालीं. त्यावेळीं मीं ब्रह्मचारी होऊन, इन्द्रियदमन करीत त्या गांवीं रहात होतों. एकदां मीं भिक्षा मागून आणलेल्या अन्नावर त्या गाईच्या दुधाचे कण उडाले. तें अन्न मीं खाल्ल्यामुळें चांडालाच्या जन्मास आलों. तो राजा ब्राह्मणाच्या द्रव्याच्या अपहारामुळें दुर्गतीस गेला. यास्तव ब्राह्मणाचें द्रव्य केव्हांहि हरण करूं नये. तसेंच सुज्ञ पुरुषानें सोमाचा विक्रयहि करूं नये. सुज्ञांनीं तो विक्रय निंद्य मानिला आहे. जे सोम विकतात किंवा विकत घेतात ते यमलोकीं गेल्यावर नरकांत पडतात. धुळीनें भरलेला सोम श्रोत्रिय ब्राह्मण विकील तर तो व्याजबट्टा करणारा होऊन नाश पावेल व तीनशें वर्षें नरकांत पडून आपलीच विष्ठा भक्षण करीत राहील. नीचसेवा, अभिमान, मित्राच्या स्त्रीशीं व्यभिचार करणारा यांशीं तुलना केल्यास धर्माचा अतिक्रम करणारा अभिमानीच अधिक पापी दिसतो. नीच वृत्तीचा कुत्रा व कृश असा तेजोहीन हरिण हे अभिमानामुळेंच या गतीला पोंचले. राजा, मीहि पूर्वजन्मीं चांगल्या श्रीमंत कुळांत जन्मलेला ज्ञानी होतों. पण हे दोष जाणत असतांहि मी प्राण्यांवर रागावून त्यांचें मांस खाई. त्या कृत्यामुळें मी या दशेला येऊन पोंचलों. काळाचा फेरा कसा आहे पहा. टोंक पेटलेल्या वस्त्राप्रमाणें किंवा भुंगे मागें लागलेल्या माणसाप्रमाणें मी कसा धांवत आहें पहा ! गृहस्थाश्रमी पुरुष वेदाध्ययनानें मोठीं पापें नष्ट करतात तशींच विविध दानांनींहि करतात असें ज्ञानी म्हणतात. पापी ब्राह्मणाला तो आश्रमधर्म संभाळून सर्व प्रकारच्या आसक्तींचा त्याग करील तर, वेद तारतात. पण मी पापी कुळांत जन्मल्यामुळें माझी सोडवणूक कशी होणार हें मला समजत नाहीं. कांहीं पूर्वपुण्यामुळें मागील जन्मींची आठवण मला राहिली आहे, त्यामुळें शुभ कर्म करून मुक्ति मिळविण्याची माझी इच्छा आहे. मी तुला शरण आलों आहें. तरी माझ्या संशयाचें निरसन कर. या चांडाळजन्मापासून मी मुक्त कसा होईन ?'

क्षत्रियानें उत्तर केलें, 'चांडाला, कसा सुटशील तें ऐक. ब्राह्मणांसाठीं जर तूं प्राणत्याग करशील, तर तुला उत्तम गति मिळेल. हिंस्र पशूंना आपलें शरीर ब्राह्मणासाठीं रणयज्ञांत अर्पण केल्यानेंच तुला मोक्ष मिळेल, एरवीं नाहीं.'

युधिष्ठिरा, क्षत्रियाचें भाषण ऐकून चांडालानें ब्राह्मणासाठीं स्वतःच्या प्राणाचा रणकुंडांत होम केला व उत्तम गति मिळविली. तात्पर्य ब्राह्मणाचें द्रव्य केव्हांहि न घेतां तूं त्याचें नित्य रक्षण करीत जा; म्हणजे तुला शाश्वत स्थानाची प्राप्ति होईल. १३.१.१०१.

---

## अध्याय १०२ वा.

[ १. पुण्यलोक व पापलोक; गौतम आणि इन्द्र यांचा संवाद; हत्तीची कथा. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, पुण्यकर्में करणाऱ्या सर्वांना एकच लोक मिळतात, कीं भिन्न भिन्न मिळतात, तें मला सांगा.

**भीष्म**:—मनुष्यांना आपआपल्या कर्मानुसार निरनिराळे लोक मिळतात. त्यांत पुण्यकर्में करणारांना पुण्यलोक मिळतात व पापकर्में करणारांना पापलोक मिळतात. याविषयीं गौतम आणि इन्द्र यांचा प्राचीन संवाद प्रसिद्ध आहे. गौतम नांवाचा इन्द्रियदमन केलेला व मृदु अंतःकरणाचा ब्राह्मण होता. त्याला एका मोठ्या वनांत हत्तीचें पोर अगदीं कोमेजून गेलेलें दिसलें असतां त्याला दया आली व त्यानें त्याला अन्नपाणी घालून वाढविलें. कालान्तरानें तें वाढून मोठा बलवान् हत्ती बनलें. त्याच्या गंडस्थळांतून मद वाहूं लागला व तो पर्वतासारखा दिसूं लागला, तेव्हां इन्द्रानें धृतराष्ट्राच्या रूपानें त्याला पकडिलें आणि तो त्याला घेऊन चालला. तें पाहून व्रतस्थ गौतम त्याला म्हणाला, ' हा हत्ती माझ्या मुलासारखाच आहे व मीं याला मोठ्या कष्टानें वांचविलें आहे. याला तूं नेऊं नको. आपण सात पावलें एकत्र चालल्यामुळें मित्र झालों आहों; तरी याला नेऊन मित्रद्रोह करूं नको. हा हत्ती मला समिधा, पाणी इत्यादि आणून देतो व माझ्या आश्रमाचें रक्षण करतो. तो माझीं इतरहि मोठीं कामें करीत असून नम्र आहे. तो सभ्य, व कृतज्ञ असल्यामुळें मला फार प्रिय आहे. मी त्याच्यासाठीं ओरडत आहें, तरी त्याला नेऊं नको. '

**धृतराष्ट्र**:—अरे ब्राह्मणाला हत्ती काय करावयाचा ? तुला पाहिजे तर मी सहस्र गाई देतों; वाटेल तर शंभर दासी, नाहींतर पांचशें निष्क देतों, किंवा दुसरें कांहीं द्रव्य देतों.

**गौतम**:—राजा, गाई, दासी, सोनें, रत्नें हीं तुझीं तुला लाभोत. ब्राह्मणाला असलें धन काय करावयाचें आहे ?

**धृतराष्ट्र**ः—गौतमा, ब्राह्मणांला हत्तींचा उपयोग नाहीं. क्षत्रियांजवळच ते असणें योग्य. आपलें योग्य तें वाहन घेऊन जाण्यांत पाप कसलें? तरी हे ब्राह्मणा, हत्तीला माघारा वळविण्याच्या भानगडींत तूं पडूं नको.

**गौतम**ः—ज्या ठिकाणीं पुण्यकर्में करणारा मरणोत्तर आनंद भोगतो, किंवा जेथें पापी माणूस मेल्यावर दुःख भोगतो, त्या यमलोकीं तूं या हत्तीसह गेलास तरी तेथूनहि मी याला माघारा आणीन.

**धृतराष्ट्र**ः—जे कोणी नास्तिक, पापी, इन्द्रियांचेंच चोज पुरविणारे असतात त्यांनाच यमलोकीं यातना होतात. पण हा धृतराष्ट्र कांहीं तेथें जाणारा नाहीं.

**गौतम**ः—ज्या ठिकाणीं असत्य कोणी बोलत नाहीं, सत्यच जेथें असतें, जेथें दुर्बळांनाहि सबळांविरुद्ध न्याय मिळतो त्या संयमनी नामक यमनगरींतूनहि तुझ्यापासून मी हत्तीला परत आणीन.

**धृतराष्ट्र**ः—वडील बहीण, आईबाप यांना जे मदमत्त होऊन शत्रूंप्रमाणें वागवितात, त्यांना तो यमलोक मिळतो, पण ऋषे, तेथें जाणारा हा धृतराष्ट्र नव्हे बरें!

**गौतम**ः—राजा, कुबेराची भाग्यशाली नगरी जी मन्दाकिनी, जींत पुण्यकर्म करणाऱ्यांनाच प्रवेश मिळतो व जी यक्ष, गंधर्व आणि अप्सरा यांनींच वसविलेली आहे, तेथूनहि मी हा हत्ती तुजकडून माघारा आणीन.

**धृतराष्ट्र**ः—अतिथींना संतुष्ट करणारे, व्रतस्थ, ब्राह्मणांना आश्रय देणारे, आश्रितांना भोजन दिल्यावर उरलेलें स्वतः खाणारे, असेच लोक मन्दाकिनीला जातात.

**गौतम**ः—मेरूच्या शिखरावर फुलांनीं भरलेलें व किन्नरींच्या गायनानें निनादित असें जें रम्य वन आहे, व ज्यांत सुंदर व विशाल असा जंबू वृक्ष आहे, तेथूनहि मी तुझ्यापासून हत्तीला परत आणीन.

**धृतराष्ट्र**—जे ब्राह्मण कनवाळू, सत्यभाषणी, बहुश्रुत व सर्व प्राण्यांना प्रिय असून इतिहासपुराणांचा अभ्यास करतात व ब्राह्मणांना मधुपर्कपूर्वक दानें देतात, त्यांनाच तो मेरुलोक मिळतो, पण धृतराष्ट्र तेथें जावयाचा नाहीं. तेव्हां तुला दुसरें कांहीं ठिकाण माहीत असेल तर लवकर बोल. हा मी चाललों पहा.

**गौतम**ः—राजा, नारदाचें आवडतें पुष्पयुक्त सुंदर वन जें आहे, व ज्यांत

गंधर्व आणि अप्सरा हींच नित्य असतात, तेथूनहि मी तुझ्याकडून हत्ती परत घेईन.

धृतराष्ट्रः—नृत्यगीतामध्यें कुशल असून जे कांहीं न मागतां समाधानानें रहातात, त्याच माणसांना तो लोक मिळतो. पण धृतराष्ट्र तेथेंच जाऊन थांबणारा नव्हे.

गौतमः—ज्या ठिकाणीं रमणीय असे उत्तर कुरुप्रदेश झळकत आहेत, जेथें देव आनंदानें रहातात व अग्निज, जलज आणि पर्वतोत्पन्न प्राणी जेथें आढळतात. जेथें इन्द्र सर्व इच्छा पूर्ण करतो, स्त्रिया स्वैरवर्तन करतात व स्त्रीपुरुषांना परस्परांची गरज लागत नाहीं, तेथूनहि मी हा हत्ती तुजपासून परत आणीन.

धृतराष्ट्रः—ज्यांनीं सर्व इच्छांचा त्याग केला असून मांसवर्जन करून जे हातांत काठी न घेतांच फिरतात, जे कोणाचा घात करीत नाहींत व सर्व प्राणीमात्रांना आत्मस्वरूपीच मानितात, वासना, अहंकार, आसक्ति हीं टाकून लाभ अलाभ, निन्दास्तुति इत्यादि द्वंद्वांना समान लेखितात, अशा लोकांना तो पुण्य लोक मिळतो; पण हा धृतराष्ट्र तितकाच मात्र जाणारा नव्हे.

गौतमः— त्याच्या पलीकडे पवित्र गंधाचे, दुःखापासून अलिप्त असे जे सनातन लोक सोमाच्या ठिकाणांत झळकत आहेत, तेथूनहि मी माझा हत्ती तुझ्याकडून परत मिळवीन.

धृतराष्ट्रः—जे दानशीलांकडूनच प्रतिग्रह घेतात व दुसऱ्याचें धन कधीं चोरीत नाहींत, सत्पात्रीं न देण्यासारखें असें ज्यांना कांहींच नसतें, जे सर्व अतीथींचा सत्कार करून नित्य प्रसन्न असतात, जे क्षमाशील असून निष्कारण बडबड करीत नाहींत व यज्ञादि पुण्यकर्में करतात, अशाच माणसांना तूं म्हणतोस तसा लोक मिळतो; तरी हा धृतराष्ट्र मात्र तेथपर्यंतच जाणारा नव्हे.

गौतमः—सोमलोकापलीकडे सूर्यलोकांत जीं तशींच सुंदर व दुःखापासून अलिप्त अशीं ठिकाणें चकाकत आहेत तेथूनहि मी हत्ती परत आणीन.

धृतराष्ट्रः—वेदाभ्यासरत, गुरुसेवादक्ष, तपस्वी, सत्यभाषणी, आचार्यांना उलट न बोलणारे, सदा जागरूक, न सांगतांच गुरूचीं कामें करणारे, असे जे पवित्र व मितभाषणी वेदवेत्ते पुरुष असतात त्यांनाच तीं सूर्यलोकांतील शाश्वत ठिकाणें मिळतात. पण धृतराष्ट्र तेथेंच थांबणारा नाहीं.

**गौतम** :—सूर्यलोकाच्या पलीकडे असलेल्या वरुणाच्या राज्यांतील शोकमुक्त व पुण्यगंध अशा ठिकाणाहूनहि मी माझा हत्ती तुजकडून परत मिळवीन.

**धृतराष्ट्र** :—जे पुरुष चातुर्मास्य तशाच इतर सहस्र इष्टि करून वेदविधीयुक्त तीन वर्षें श्रद्धेनें अग्निहोत्र चालवितात, धर्मरूप क्षुरावर स्वतःला ठेवून नित्य सरळ मार्गानें जातात, त्या धर्मात्म्यांनाच ते लोक मिळतात; पण धृतराष्ट्र तेथें जाणार नाहीं.

**गौतम** :—मनुष्यांना इष्ट निष्पाप व शोकरहित असे जे इन्द्राचे लोक, त्यांतील तुझ्या घरांतूनहि, हे राजा, मी हत्तीला तुजपासून परत आणीन.

**धृतराष्ट्र** :—शंभर वर्षें जगणारा शूर मनुष्य किंवा वेदाध्ययन व विधियुक्त यज्ञ जो करतो, तोच इन्द्रलोकीं जाऊं शकतो. पण धृतराष्ट्र तेथें जाणार नाहीं.

**गौतम** :—स्वर्गाच्या वरतीं विस्तीर्ण व शोकरहित असे जे मोठे ब्रह्मलोक आहेत, ते सर्व लोकांना इष्ट आहेत; तेथूनहि मी तुझ्याकडून हत्ती परत आणीन.

**धृतराष्ट्र** :—राजसूययज्ञाची दीक्षा घेतलेले जे धर्मशीलराजे योग्यप्रकारें प्रजारक्षण करतात, किंवा ज्यांनीं अश्वमेध करून अवभृथस्नानानें आपलें शरीर पवित्र केलें आहे, त्यांना ते प्रजापतिलोक मिळावयाचे असतात. तेथें धृतराष्ट्र दिसणार नाहीं.

**गौतम** :—प्रजापतिलोकांपलीकडे तशाच प्रकारचे जे गोलोक आहेत, त्या दुर्लभ अशा लोकांतूनहि मी हत्ती परत आणीन.

**धृतराष्ट्र** :—जो सहस्र गाईंचा स्वामी असून वर्षास शंभर गाई दान करतो, किंवा शंभर गाईंचा स्वामी असून दहा गाई वर्षास देतो, तसाच दहा बाळगून प्रतिवर्षीं एकेक देतो किंवा पांचांतील एकेक देतो, किंवा जो ब्रह्मचर्यांतच वृद्ध होतो व वेदाचें रक्षण करतो, तसले मनोनिग्रही व तीर्थयात्रापरायण लोकच गोलोकीं सुखी होतात. प्रभास, मानस, पुष्कर, इत्यादि तीर्थांस जे जातात ते दिव्यशरीरी पवित्र पुरुष गोलोकास जातात. धृतराष्ट्र तेथें खरोखर आढळणार नाहीं.

**गौतम** :—ज्या ठिकाणीं थंडी व उष्णता यांचें भय नाहीं, क्षुधा व तृषा यांची बाधा होत नाहीं; थकवा सुख दुःख हीं जेथें अज्ञात आहेत, जेथें कोणाचा कोणी द्वेष करीत नाहीं किंवा कोणी कोणाला विशेष प्रियहि नसतो, शत्रु मित्र

असा भेद जेथें नाहीं, जन्ममरण किंवा पुण्य पाप हीं जेथें ठाऊक नाहींत, त्या निष्पाप, विशाल व ज्ञानशक्तियुक्त अशा पवित्र ब्रह्मलोकांत तरी तूं माझा हत्ती मला परत देशीलच.

**धृतराष्ट्र :**—सर्व विषयांचा त्याग करून कृतकृत्य झालेले जे कोणी अध्यात्मयोगाच्या साह्यानें स्वर्गास गेले तेच सत्वशील पुरुष ब्रह्मलोकास जातात. पण, मुने, त्या ठिकाणींहि धृतराष्ट्र तुला दिसणार नाहीं.

**गौतम :**—ज्यांत रथंतर आणि बृहत् हीं सामें गायिलीं जातात, जेथें वेदीवर कमळें आस्तरलेलीं असतात व जेथें सोमपान करणारे लोकच जाऊं शकतात, त्या लोकींहि मी तुझ्याकडून हत्ती परत मिळवीन. तूं इंद्र आहेस हें मी ओळखिलें. सर्व लोकांत तर तूं भटकत फिरत असतोस. माझ्या तोंडून तुजविषयीं एखादा वाईट शब्द तर गेला नाहीं ना ? नाहीं असें मला वाटतें.

**इंद्र :**—मीं इंद्र असून वाद करून हत्ती घेण्यासाठीं या मनुष्यलोकीं आलों होतों. आतां मी तुला नमस्कार करतों, मला योग्य तो उपदेश कर व मीं काय करावें तें सारें सांग.

**गौतम :**—माझा हा श्वेत बालहत्ती जो तूं नेत आहेस, तो माझा मला वनवाशाला परत दे. वनांतला तो माझा एकच सांगाती आहे.

**इंद्र :**—हा तुझ्या पुत्रासारखा असलेला हत्ती तुझ्याकडे पहात जवळ येत आहे. तो तुझे पाय नाकानें हुंगीत आहे. माझें कल्याण मनांत आण, मी आतां जातों. नमस्कार.

**गौतम :**—इन्द्रा, तुझें मी नित्य कल्याण चिंतीन व तुझी पूजाहि करीन. तूंहि माझें शुभ चिंतीत जा. हा हत्ती मी तुजपासून घेत आहेंच.

**इंद्र :**—ज्यांच्या हृदयांत नित्य वेद राहिले आहेत, त्या सत्यशाली महात्म्यांत तूंच मला ओळखिलें, म्हणून मी तुजवर संतुष्ट झालों आहें. ब्राह्मणा, ह्या आपल्या हत्तीसह तूं आनंदानें उत्तम लोकीं लवकर चल.

युधिष्ठिरा, याप्रमाणें संवाद झाल्यावर हत्तीसह गौतमाला पुढें करून इन्द्र सज्जनांनाहि दुर्लभ अशा स्वर्गी गेला. हें आख्यान जो इंद्रियांवर जय मिळवून नित्य ऐकेल किंवा वाचील, तो गौतमाप्रमाणेंच ब्रह्मलोकास जाईल. १३.१.१०२.

---

## अध्याय १०३ वा.

[ १ उपवासाचें तपोदृष्टया श्रेष्ठत्व; भगीरथ आणि ब्रह्मदेव यांचा संवाद. ]

( १ ) **युधिष्ठिर :—** आजोबा, नानाविध दान, शांति, सत्य, अहिंसा, स्वस्त्रीविषयीं संतोष इत्यादिकांचीं फलें आपण सांगितलीं. तपोबलाहून श्रेष्ठ कांहीं नाहीं हेंहि आम्हांला आपल्यापासून कळलें. आतां त्या तपाच्या प्रकारांतच अधिक योग्यता कोणाची तें आम्हांला स्पष्ट करून सांगा.

**भीष्म :—** ज्याप्रकारचें तप करावें त्या प्रकारचा लोकहि मिळतो. त्या तपःप्रकारांत माझ्या मतें उपवासाहून दुसरा कोणताच अधिक नाहीं. याविषयीं भगीरथ आणि ब्रह्मदेव यांमधील प्राचीन संवाद पुराणवेत्ते सांगत असतात. भगीरथ राजा देवलोक, गोलोक आणि ऋषिलोक हे ओलांडून पलीकडे गेला असें सांगतात. तेथें तो गेला असतां ब्रह्मदेवानें त्याला विचारिलें, 'बा भगीरथा, तूं या दुष्प्राप्य लोकीं आलास तरी कसा ? देव, गंधर्व किंवा मनुष्य यांना तपश्चरणाशिवाय येथें येतां येत नाहीं, मग तूंच कसा आलास ?'

भगीरथ म्हणाला, 'ब्राह्मणांना मी नित्य सहस्रावधि निष्कदान देत असें व ब्राह्मव्रतहि मीं सदा आचरिलें. पण त्याचें फळ म्हणून मात्र मी येथें आलेला नाहीं. दहा एकरात्र याग, दहा पंचरात्र याग, अनेक एकादशाह याग, तसेच शंभर ज्योतिष्टोम मीं केले, पण त्यांचेंहि फळ म्हणून मी येथें आलेला नाहीं. मी गंगातीरीं शंभर वर्षें तप करीत सतत राहिलों, सहस्र खेचरें तेथें दान केलीं, अनेक कन्याहि दिल्या, पण त्यामुळेंहि मी येथें आलेला नाहीं. लक्ष घोडे, दोन लक्ष गाई, अशीं दानें मीं पुष्कर तीर्थीं ब्राह्मणांना दिलीं; सोन्याचे चांद घातलेल्या सहस्र उत्तम कन्या दिल्या, दुसऱ्या साठ सहस्र कन्या सुवर्णालंकारांनीं नटवून मीं दिल्या, पण हेंहि माझ्या येथें येण्याला साधन झालें नाहीं. गोसवयागांत एकेका ब्राह्मणाला दहा याप्रमाणें कोटि गाई दिल्या; त्यांचीं वांसरें असून त्या दूध देणाऱ्या होत्या व तें काढण्यासाठीं मीं कांशाचीं भांडींहि दिलीं. पण तें माझ्या येथें येण्याचें कारण नव्हे. आप्तोर्याम याग करून एकेका ब्राह्मणाला दहा अशा शेंकडों दुभत्या पहिल्या वेताच्या रोहिणी गाई मीं दिल्या, तशाच दुसऱ्याहि दुभत्या लक्षावधि गाई दिल्या; पण त्यामुळें कांहीं मी येथें आलों नाहीं. बाल्हिक देशांतील दहासहस्र श्वेत अश्व सोन्याच्या माळा घालून मीं दिले व एकेका यज्ञांत सोन्याचे अठरा कोटि निष्क दिले. सतरा कोटी श्यामकर्ण हिरव्या रंगाचे वारू सोन्याच्या

माळांसह मीं दिले; तसेच मोठ्या जातीचे सुवर्णभूषित सतरा सहस्र पद्मचिन्हाचे घोडे दिले, सतरा सहस्र सोन्याचे रथ घोडे जुंपून दिले, दहा वाजपेय यज्ञांत वेदांत सांगितल्याप्रमाणें दक्षिणा म्हणून हें सर्व दिलें; आठ राजसूय यज्ञ केले, त्याप्रसंगीं राजे जिंकून इन्द्रासारखे पराक्रमी असे सहस्र वीर पुरुषहि सुवर्णभूषित करून दक्षिणा म्हणून दिले. ब्रह्मदेवा, माझ्या त्या दक्षिणांच्या प्रवाहानें गंगेचा प्रवाहहि झांकून टाकिला; पण तें सारेंहि माझ्या येथें येण्याचें कारण नव्हे. एकेक गांव तीन ब्राह्मणांना असे शंभर गांवहि मीं दिले; आहार नियमित करून शांतवृत्तीनें मौनव्रत स्वीकारून हिमालयावर गंगेचा ओघ शंकरानें जेथें मस्तकावर घेतला, तेथें दीर्घ काळ तप केलें; शम्याक्षेप, साद्यस्क, त्रयोदशाह, द्वादशाह, पुंडरीक, हे यज्ञहि अनेक केले व त्यांत मोठ्या वाशिंडाचे आठ सहस्र शुभ्र बैल शिंगें सोन्यानें मढवून ब्राह्मणांना दिले व त्यांचीं सुवर्णालंकृत स्त्रियांशीं लग्नेंहि करून दिलीं; सोनें व रत्नें यांचे पर्वतासारखे ढीग, धनधान्यांनीं भरलेले सहस्रावधि गांव, दहा सहस्र नुकत्याच व्यालेल्या गाई अशी दक्षिणा म्हणून यज्ञप्रसंगीं ब्राह्मणाला दिली; सोळा अर्कायण त्याग केले; कांचनवृक्षांनीं भरलेलें योजनाएवढें वन सोन्यानें मढवून दिलें; क्रोध वर्ज्य करून कठीण असें तुरायण व्रत तीनशें वर्षें केलें; पण त्यामुळें कांहीं मी येथें आलों असें नाहीं. तीस अग्नींची पूजा, आठ सर्वमेध, सात नरमेध, दहा विश्वजित्, शरयू आणि बाहुदा या नद्यांच्या तीरीं व गंगेवर निमिष क्षेत्रांत लक्षावधि गाईंचें दान, याहि गोष्टी मला येथें येण्याचें साधन झालेल्या नाहींत. पण इन्द्रानें गुप्त म्हणून मनांत ठेविलेलें व भार्गवाला जें तपाच्या योगानें मिळालें, तें शुक्रतेजानें जाज्वल्य झालेलें अनशन किंवा निराहाररूप तप मीं केलें. तें संपल्यावर तेथें सहस्र ऋषि आले होते ते माझ्यावर संतुष्ट झाले व मला म्हणाले, 'तूं आतां ब्रह्मलोकीं जा." त्या सहस्र ब्राह्मणांनीं संतोषानें असें सांगितल्यामुळें मीं येथें आलों. याविषयीं तुला विचार करण्याचें कारणच नाहीं. ब्रह्मदेवानें जें घालून दिलें आणि तूं विचारल्यावरून मीं जें सांगितलें, त्या अनशनव्रताहून अधिक दुसरें कांहीं नाहीं असें माझें मत आहे !'

युधिष्ठिरा, भगीरथराजानें असें सांगितलें असतां ब्रह्मदेवानें त्याचा यथोचित सत्कार केला. म्हणून तुला सांगतों कीं तूं अनशनपूर्वक नित्य ब्राह्मणांची पूजा कर. ब्राह्मणांच्या शब्दानें इहपरलोकीं सर्व साध्य होतें. वस्त्रें, गाई व घरें देऊन सर्वांनीं ब्राह्मणांना संतोषवावें; हें अत्यंत गुह्य व्रत आहे; राजा निर्लोभीपणें तूं हें आचर. १३. १. १०३.

---

## अध्याय १०४ वा.

[ १. पुरुष शतायु असतां तो अल्पायु कसा होतो. ]

( १ ) **युधिष्ठिर:**—हे पितामहा, पुरुषाला शंभर वर्षें आयुष्य आहे असें वेदांत सांगितलें आहे. त्यामानानें त्याचें वीर्यहि असलें पाहिजे. असें असतां सांप्रत पुरुष बालवयांतच काय म्हणून मरतात? मनुष्यें दीर्घायुषी किंवा अल्पायुषी कोणत्या कारणानें होतात? त्यांना कीर्ति व संपत्ति कशानें मिळते? तपानें, ब्रह्मचर्यानें, जपानें, होमानें, औषधींनीं, कर्मानें, मनानें कीं वाणीनें, हें मला सांगा.

**भीष्म:**—युधिष्ठिरा, तूं विचारलेल्या प्रश्नांचीं मी उत्तरें देतों. मनुष्यें दीर्घायु किंवा अल्पायु कां होतात, तसेंच त्यांना कीर्ति आणि संपत्ति कशानें मिळते, व कसें वागलें असतां श्रेयःप्राप्ति होते, हें ऐक. मनुष्याला या लोकीं तशीच परलोकीं कीर्ति मिळते ती चांगल्या आचारामुळेंच होय. दीर्घायुष्य आणि संपत्ति हीं सुद्धां आचारानेंच मिळतात. दुराचारी माणसाला दीर्घायुष्य लाभत नाहीं. ज्याला वैभव पाहिजे असेल त्यानें सदाचारी झालें पाहिजे. कारण दुराचरणाला प्राणिमात्र भितात व दुराचारी माणसापासून अपमानहि पावतात. पापयोनींत जन्मलेल्या माणसाचीं वाईट लक्षणें सदाचरणामुळें नष्ट होतात. सदाचार हेंच धर्माचें लक्षण असून सच्छीलपणावरच साधुत्व अवलंबून आहे. साधूंचा वर्तनमार्ग सदाचरण होय. धर्माचरणी पुरुषाला प्रत्यक्ष पाहिलेलें नसलें तरी तो सत्कर्में करतो एवढें ऐकूनच लोकांना तो प्रिय होतो. जो नास्तिक, निष्क्रिय, गुरु आणि शास्त्र यांचा अतिक्रम करणारा, धर्म न जाणणारा व दुराचारी असतो, तो अल्पायुषी होतो. दुष्ट शीलाचे, मर्यादोल्लंघन करणारे, व जातिसंकर करणारे लोक अल्पायुषी होऊन नरकांत जातात. इतर लक्षणें वाईट असतांहि जर मनुष्य सदाचारसंपन्न, श्रद्धावान्, सरळ वर्तनाचा आणि निर्मत्सर असेल, तर तो शंभर वर्षें जगतो. चिखल मळणारा, गवताच्या काड्या तोडणारा, नखें खाणारा, उष्टें खाणारा व अस्थिर वृत्तीचा मनुष्य बहुधा दीर्घायुषी होत नाहीं.

मनुष्यानें पहाटे लवकर जागें होऊन धर्म व अर्थ यांचें चिंतन करावें. मग उठून आचमन केल्यावर पहिल्या संध्येचें पूजन करावें. त्याचप्रमाणें सायंकाळच्या संध्येचीहि मौनपूर्वक उपासना करावी. उगवत्या व मावळत्या सूर्याकडे पहात बसूं नये. तसाच ग्रहणसमयींहि तो पाहूं नये. पाण्यांतील त्याचें प्रतिबिंब पाहूं नये

व भर दुपारींहि त्याकडे बघूं नये. नित्य संध्यावंदन केल्यामुळेंच ऋषींना दीर्घायुष्य मिळालें. म्हणून प्रातःसंध्या व सायंसंध्या यांचें नेमानें वंदन करावें. जे ब्राह्मण या उभय संध्यांची उपासना करीत नाहींत, त्या सर्वांना धार्मिक राजानें शूद्रांचीं कामें करावयास लावावीं. कोणत्याहि वर्णांत परदारागमन करूं नये; कारण त्याच्यासारखें आयुष्याची हानि करणारें दुसरें कांहीं नाहीं. स्त्रियांच्या अंगावर जितकीं केसांचीं छिद्रें असतात, तितकीं सहस्र वर्षें परदारागमनी मनुष्य नरकांत रहातो. दिवसाच्या प्रथम भागांत केशप्रसाधन, डोळ्यांत अंजन घालणें, दांत घासणें, व देवतापूजन हीं कार्यें करावीं. विष्ठा व मूत्र यांकडे पाहूं नये व त्यांवर पाय देऊं नये. अगदीं पहाटेस, दिवस मावळल्यावर, तसेंच भर दुपारीं अनोळखी माणसाबरोबर किंवा शूद्रांबरोबर एकट्यानें जाऊं नये. ब्राह्मण, गाई व राजा, यांना प्रथम वाट द्यावी, तशीच न्हातार्‍या माणसाला, डोक्यावर भार घेऊन जाणार्‍याला, गरोदर स्त्रीला व दुबळ्यालाहि द्यावी. ओळखीचे वृक्ष व चव्हाटे यांना उजवा घालून जावें. दुपारीं, रात्रीं व मध्यरात्रीं तसेंच सकाळीं व संध्याकाळीं चव्हाट्यावर उभें राहूं नये. जोडे व वस्त्रें दुसर्‍यानें वापरलेलीं वापरूं नयेत. नित्य ब्रह्मचर्य पाळावें व पायानें पाय ओलांडूं नयेत. अमावास्या, पौर्णिमा, कोणत्याहि पक्षांतील चतुर्दशी व अष्टमी या तिथींना ब्रह्मचर्य पाळावें. यज्ञाशिवाय मांसभक्षण करूं नये, व पाठीच्या कण्याचें मांस खाऊं नये. दुसर्‍याच्या नांवानें ओरड करूं नये व परनिंदा आणि दुष्टपणा वर्ज्य करावीं. कोणाच्या मर्मावर आघात करूं नये, कठोर बोलूं नये, नीचापासून कांहीं घेऊं नये, व ज्या शब्दांनीं लोक उद्विग्न होतील असे क्रूर शब्द उच्चारूं नयेत. जे वाग्बाण तोंडांतून सुटले असतां त्यांनीं हाणिलेला मनुष्य रात्रंदिवस दुःखी होतो किंवा जे दुसर्‍याच्या मर्मावर लागतात, असे वाग्बाण सुज्ञांनीं इतरांवर सोडूं नयेत. बाणांनीं वेधिलेलें किंवा कुर्‍हाडीनें तोडलेलें वन पुनः वाढतें, पण शब्दांनीं तोडून केलेलें क्षत भरून निघत नाहीं. निरनिराळ्या जातीचे बाण अंगांत रुतले असतां ते त्यांतून ओढून काढतां येतात. पण वाक्छल्य तसें काढतां येत नाहीं. तें हृदयांत कायमचेंच घुसतें. एखाद्या अवयवानें हीन, एखादा अवयव अधिक असलेला, विद्याहीन, निंद्य, कुरूप, दरिद्री, खोटें बोलणारा, अशांना हिणवूं नये. नास्तिकपणा, वेदनिन्दा, देवतांविषयीं कुत्सित विचार, द्वेष, अभिमान, ताठा, निष्ठुरपणा, हे दुर्गुण सोडून द्यावे. कोणावर सोटा उगारूं नये व रागाच्या भरांत कोणाला तो हाणूं नये. पुत्र किंवा शिष्य यांशिवाय शिक्षा म्हणून कोणाला

ताडन करूं नये. ब्राह्मणांना निन्दूं नये, नक्षत्रें हातानें दाखवूं नयेत, व पक्षाच्या तिथि सांगण्याचें काम ( जोशीपणा ) करूं नये; म्हणजे आयुष्यहानि होत नाहीं; मलमूत्रोत्सर्ग केल्यावर, रस्ता ओलांडल्यावर, आणि अभ्यासास व जेवावयास बसतांना पाय धुवावे. जें अशुद्ध होतांना दिसलेलें नाहीं, जें पाण्यानें धुतलेलें आहे व जें तोंडानें चांगलें म्हटलें आहे, अशीं तिन्ही देवांनीं ब्राह्मणांना पवित्र ठरविलीं आहेत. संयाव, तिळभात, मांस, करंजी, खीर, हे पदार्थ स्वतःसाठीं न करतां देवासाठीं करावे. नित्य अग्निसेवा करावी, भिक्षा वाढावी, व मौन स्वीकारून काडीनें दांत स्वच्छ करावे. दिवस उगवेपर्यंत निजून राहूं नये, तसें केल्यास प्रायश्चित्त करावें लागतें. उठल्यावर आईबापांना वंदन करावें, तसेंच आचार्य किंवा इतर वडील माणसें यांनाहि करावें, म्हणजे आयुष्य वाढतें. दांत धुण्याच्या काड्या प्रतिदिवशीं नव्या घ्याव्या, शास्त्रानुसार खाणें पिणें ठेवावें व पर्व-काळीं खाऊं नये. उत्तरेस तोंड करून शौचविधि करावा. दांत घासल्याशिवाय देवपूजा करूं नये व देवपूजा केल्यावांचून कोणाच्या भेटीला जाऊं नये, पण गुरु, वृद्ध माणसें, धार्मिक व सुज्ञ पुरुष यांजकडे जाण्यास हरकत नाहीं. बुद्धि-मानांनीं मलिन आरशांत पाहूं नये. जिच्याविषयीं कांहीं माहिती नाहीं व जी गर्भिणी आहे, अशा स्त्रीशीं गमन करूं नये. उत्तरेस किंवा पश्चिमेस डोकें करून निजूं नये, दक्षिणेस किंवा पूर्वेस करून निजावें. मोडक्या किंवा जीर्ण पलंगावर निजूं नये; अगदीं अंधाऱ्या जागेंत निजूं नये, तसेंच कोणाला बरोबर घेऊन किंवा वांकडें तिरपें निजूं नये. नास्तिकाबरोबर संकेत करून कोणात्याहि कामाला जाऊं नये. बैठक नुसती पायानें ओढून तिजवर बसूं नये. नग्नपणें किंवा रात्रौ स्नान करूं नये व स्नान झाल्यानंतर मग अंग चोळूं नये. स्नानापूर्वीं अंगाला उटी लावूं नये व स्नानानंतर ओलें वस्त्र हालवून वाळवीत बसूं नये. तसेंच ओलें वस्त्र नेसूं नये. गळ्यांतील माळा काढून टाकूं नयेत व वस्त्राच्या वरूनहि त्या घालूं नयेत. रज-स्वलेशीं कधीं बोलूं नये व शेतांत किंवा गांवाच्या जवळ मलोत्सर्ग करूं नये. तसाच पाण्यांतहि मूत्रपुरीषोत्सर्ग कधीं करूं नये. अन्न खाण्यापूर्वीं तीन वेळां मुखानें उदकस्पर्श करावा, व जेवल्यानंतरहि तसेंच करावें. नित्य पूर्वेस तोंड करून जेवावें व जेवतांना अन्नाची चेष्टा करूं नये. मुकाट्यानें जेवावें व शेवटीं थोडें अन्न ठेवावें. जेवणानंतर मनानें अग्निस्पर्श करावा. पूर्वेस तोंड करून जेव-णारा दीर्घायुषी होतो, दक्षिणेस तोंड करणारा यशस्वी व पश्चिमेस तोंड करून जेवणारा धन्य होतो आणि उत्तरेस तोंड करून जेवणारा सत्यभाषणी होतो. भोजना-

नंतर मनानें अग्निस्पर्श करून नाक तोंड इत्यादि वरचे सर्व अवयव धुवावे. धान्याचें तूस, केश, भस्म, मडक्याचीं खापरें यांवर बसूं नये. दुसऱ्यानें स्नान केलेलें पाणी दुरूनच टाकावें. शांति होम करून सावित्री मंत्र जपावा. चालतां चालतां कधीं खाऊं नये. बसून खावें. उभ्यानें मूत्रोत्सर्ग करूं नये, तसाच तो भस्म व गोठा यांतहि करूं नये. जेवणापूर्वी पाय धुवावे, पण ओल्यापायांनीं निजूं नये. ओल्यापायांनीं जेवणाराला शंभर वर्षें आयुष्य मिळतें. सूर्य, चंद्र व नक्षत्रें या तीन तेजांना उष्टयानें पाहूं नये, व गाय, ब्राह्मण व अग्नि यांना उष्टयानें शिवूं नये. वृद्ध मनुष्य जवळ आला असतां तरुणांचे प्राण बाहेर पडूं पहातात, पण उठून वृद्धांना अभिवादन केल्यानें ते पुनः स्थिर होतात. यासाठीं वृद्ध आले असतां त्यांना आसन देऊन नमस्कार करावा व हात जोडून त्यांना काय पाहिजे तें विचारावें. तसेंच ते परत जात असतां त्यांना पोंचवावयास जावें. फाटक्या आसनावर बसूं नये व फुटकें कांशाचें पात्र वर्ज्य करावें. एका वस्त्रानें जेऊं नये व नग्नस्नान करूं नये. नागव्यानें झोंपहि घेऊं नये व उष्टयानें निजूं नये. सर्व प्राण मस्तकाच्या आश्रयानें असल्यामुळें मस्तकाला उष्टा हात लावूं नये. मस्तकाचे केस ओढूं नयेत व त्यावर प्रहारहि करूं नयेत. दोन्ही हातांनीं डोकें खाजवूं नये व वारंवार तें धुवूं नये; असें वागल्यानें आयुष्य हीन होत नाहीं. डोक्यावरून स्नान केल्यावर अंगाला तेल लावूं नये, व तिलयुक्त अन्न खाऊं नये; म्हणजे आयुष्यहानि होत नाहीं. उष्टयानें शिकवूं नये आणि अभ्यासहि करूं नये व घाणेरडा वारा वहात असतांहि वेदाचा विचार करूं नये. याविषयीं पुराणवेत्ते यमानें गाइलेली गाथा सांगतात. "उष्टयानें जो पळत सुटतो, किंवा वेदपठन करतो, किंवा अनध्यायाच्या वेळीं मोहानें अध्ययन करतो, त्या ब्राह्मणाचें आयुष्य मी कातरतों व त्याची संततिहि घेऊन जातों; तसाच त्याचा वेदाभ्यास नष्ट होतो व आयुष्यहि कमी होतें. यास्तव अनध्यायाच्या वेळीं कोणी अभ्यास करूं नये." सूर्य, अग्नि, गाई, ब्राह्मण यांच्या समोर रस्त्यांत जो मूत्रोत्सर्ग करतो तो अल्पायु होतो. मूत्रपुरीषोत्सर्ग दिवसा उत्तरेस तोंड करून करावा व रात्रौ दक्षिणेस तोंड करून करावा, म्हणजे आयुष्यहानि होत नाहीं. ब्राह्मण, क्षत्रिय व सर्प हे तिघे कृश असले तरी त्यांची अवज्ञा करूं नये; तिघेहि सर्पतुल्यच होत. जसा सर्प क्रुद्ध झाला असतां नुसत्या डोळयांनीं पाहूनच जाळतो, तसा क्षत्रिय देखील आपल्या तेजाच्या स्पर्शानेंच जाळतो व ब्राह्मण तर केवळ मनानें व दृष्टिपातानें सर्व कुलाचा नाश करूं शकतो. यास्तव

सुज्ञानें त्या तिघांची अवज्ञा होणार नाहीं असा प्रयत्न करावा. गुरूशीं वाद न घालतां तो रागावला असल्यास त्याला मान देऊन प्रसन्न करावें. गुरु प्रसंगीं वांकडा गेला, तरी आपण त्याशीं सरळ वागावें, कारण गुरुनिन्दा माणसांची आयुष्यहानि करते. हिताची इच्छा करणारानें घरापासून दूर मूत्रोत्सर्ग करावा व पायधुणें व उष्टीं टाकणें हें दूरच करावें. सुज्ञांनीं तांबडीं फुलें अंगावर घालूं नयेत, पांढरीं घालावीं. पण कमळ व कुवलय हीं मात्र घालूं नयेत. इतर तांबडीं फुलें व पाण्यांत उगवणारीं फुलें मस्तकावर घालण्यास हरकत नाहीं. सोन्याच्या माळेला तर केव्हांच दोष नाहीं. स्नान केलेल्याला ओली उटी लावावयास द्यावी. पण बुद्धिवान् पुरुषानें वस्त्रांची अदलाबदल कधीं करूं नये, म्हणजे दुसऱ्याचें वस्त्र आपण घालून आपलें दुसऱ्याला देऊं नये. दशा नसलेलें वस्त्रहि नेसूं नये. निजण्याच्या वेळचें रस्त्यांत चालतेवेळचें, व देवपूजेच्या वेळचें अशीं वस्त्रें निरनिराळीं असावीं. प्रियंगु, चंदन, बिल्व, तघर, व केशर यांची उटी पृथक् पृथक् लावावी. उपवास करावयाचा तो स्नान करून शुचिर्भूत व अलंकृत होऊन करावा. पर्वकाळीं ब्रह्मचर्य पाळावें. एकाच पात्रांत अनेकांनीं खाऊं नये व रजस्वलेनें शिजविलेलें अन्न भक्षूं नये. ज्यांतील सार काढून घेतलें आहे असा पदार्थ, किंवा कोणी पहात असतां त्याला दिल्याशिवाय, खाऊं नये. बुद्धिवान् माणसानें अपवित्र मनुष्याच्या किंवा श्रेष्ठ पुरुषांच्या अगदीं जवळ बसूं नये. धर्मकार्यांत निषिद्ध असलेले पदार्थ इतर वेळींहि खाऊं नयेत. पिंपळ, वड, व उदुंबर यांचीं फळें व तागाची भाजी उत्कर्षेच्छूनें खाऊं नये. अज, गाय व मोर यांचें मांस तसेंच सुकलेलें व शिळें मांस भक्षूं नये. जाणत्यानें हातांतून मीठ खाऊं नये व रात्रौ दहीं व सातूचें पीठ खाऊं नये, तसेंच यज्ञावांचून मांस खाऊं नये. सकाळीं व संध्याकाळीं जेवावें, मध्यंतरीं कांहीं खाऊं नये. केंस पडलेलें अन्न खाऊं नये व शत्रूच्या श्राद्धाचें अन्न खाऊं नये. न बोलतां जेवावें, एक वस्त्रानें जेऊं नये, उभ्यानें जेऊं नये, जमिनीवर अन्न ठेवून खाऊं नये. अतिथीला पाणी देऊन मग अन्न द्यावें व नंतर दुसऱ्या गोष्टींचा विचार न करतां जेवावें. एकाच पंक्तीला बसून जो कोणी एखादा पदार्थ इतरांना न देतां खातो, तो जणूं हालाहलच खातो. पाणी, दूध, सातू, दहीं, तूप, व मध हीं खाऊन उरलेला भाग कोणालाहि देऊं नये. खातांना अन्नाविषयीं शंका घेत घेत खाऊं नये व भोजनाच्या शेवटीं अनुपान म्हणून दहीं खाऊं नये. जेवणानंतर एका हातानें आचमन करून तोंड धुवावें व उजव्या पायाचा आंगठा पाण्यानें भिजवावा. हात डोक्या-

वर ठेवून स्थिर मनानें अग्नीला स्पर्श करावा. असें कुशलतेनें केल्यास तो मनुष्य आपल्या ज्ञातींत श्रेष्ठ होतो. नाक, डोळे यांना पाण्यानें धुवून बेंबीला हात लावावा व ओले हात ठेवूं नये. अंगठ्यामध्यें ब्राह्मतीर्थ असतें व करांगुलीच्या मार्गे देवतीर्थ असतें असें म्हटलें आहे. अंगठा व तर्जनी यांच्या मधील भागानें उदकस्पर्श करून पितृकर्मे करावीं. दुसऱ्याची निंदा करूं नये व अप्रिय बोलूं नये. उत्कर्षेच्छूनें कोणाला राग आणूं नये. पतित माणसाशीं गोष्टी बोलत बसूं नये, त्याचें दर्शन घेऊं नये व त्याशीं संसर्ग ठेवूं नये; असें केल्यानें आयुष्य वाढतें. दिवसा स्त्रीसंबंध करूं नये, तसाच तो लहान मुलगी, वेश्या किंवा रजस्वला यांशींहि करूं नये. आपल्या शरीरावरील तीर्थस्थानीं आचमन करून धर्मकृत्य आरंभिल्यावर, तीन वेळां पाणी तोंडांत घेऊन व दोनदां तोंड धुवून पवित्र व्हावें. सर्व अवयव एकदां पाण्यानें स्वच्छ करून तीनदां त्यांवर प्रोक्षण करावें व नंतर देवविहित विधीनें पितृकृत्यें व देवकृत्यें करावीं.

आतां ब्राह्मणासाठीं सांगितलेलें जें पवित्रीकरण तें ऐक. प्रत्येक विधीमध्यें प्रथम ब्राह्मतीर्थानें उदकस्पर्श करावा. थुंकी टाकल्यावर किंवा शिंकल्यावर उदकस्पर्श करून शुद्ध व्हावें. आपल्या ज्ञातींतील वृद्ध, मित्र किंवा दरिद्री असा कोणी असल्यास त्यास आपल्या घरीं रहावयास बोलवावें. पारवे, पोपट, मैना हे पक्षी घरीं असणें उत्तम, पण वडवाघूळ, गिधाड, कबूतर, भुंगे हे घरांत राहिल्यास शांति करावी; कारण हे प्राणी अमंगल होत. थोर लोक रुदन करतील तर तेंहि अमंगल असल्यामुळें शांति करावी. थोर लोकांच्या गुह्यांचा स्फोट कोठें करूं नये. अगम्य स्त्रिया, राजाची पत्नी, दासी यांशीं गमन करूं नये. वैद्य, मुलें, वृद्ध, सेवक, बंधु, ब्राह्मण व शरण आलेला मनुष्य यांच्याशीं फारसा संबंध ठेवूं नये. ब्राह्मण व शिल्पशास्त्रज्ञ यांनीं निर्मिलेल्या घरांत सुज्ञानें रहावें. संध्याकाळीं झोपूं नये, अभ्यास करूं नये, व जेवूं नये. श्राद्धकर्म रात्रीं करूं नये व जेवल्यावर केश विंचरूं नयेत. रात्रौ कल्याणेच्छूनें स्नानहि करूं नये. तसेंच सातू रात्रीं वर्ज करावे. जेवते वेळीं देवांचीं तीर्थें व इतर पेयें पिऊं नयेत रात्रौ जेवतांना दुसऱ्यांना आग्रह करूं नये व आपणहि आकंठ जेवूं नये; पक्षिवध करूं नये, पण पक्षिमांस खाणेंच असेल तर स्वतः आपण त्याला न मारतां इतरांकडून मांस घ्यावें.

चांगल्या कुळांत जन्मलेल्या व चांगल्या लक्षणांनीं युक्त अशा वयांत आलेल्या कन्येशीं सुज्ञानें विवाह करावा व अपत्य उत्पन्न करून कुलाची स्थापना

केल्यावर पुत्रांना ज्ञान व कुलधर्म समजावून द्यावे. कन्या झाल्यास त्या कुलीन व बुद्धिमान् पुरुषांना द्याव्या. पुत्रांची योग्य व्यवस्था करून त्यांचे कुलीन कन्यांशीं विवाह करून द्यावे. पितृकर्म व देवकार्य करण्यापूर्वी डोक्यावरून स्नान करावें. जन्मनक्षत्रीं हीं कृत्यें करूं नयेत. पूर्वा व उत्तरा भाद्रपदा, कृत्तिका आणि सर्व क्रूर नक्षत्रें व प्रत्यरि नक्षत्र, तशींच ज्योतिष शास्त्रांत जीं इतर नक्षत्रें वर्ज्य म्हणून सांगितलीं आहेत, तीं सर्व देवपितृकार्याला घेऊं नयेत.

श्मश्रु करणें तो स्वस्थ चित्तानें पूर्वेस किंवा उत्तरेस तोंड करून करावा. दुसऱ्या कोणाची तशीच स्वतःची निंदा करूं नये. तसें करणें अधर्म होय. एखादा अवयव नसलेली, किंवा अधिक असलेली, समान प्रवराची, किंवा आईच्या कुलाशीं संबद्ध, वृद्ध, संन्यास घेतलेली, विवाहित, हीन वर्णाची, किंवा आपल्याहून उच्च वर्णाची, कुळगोत माहीत नसलेली, हीन कुळांतील, पिंगट रंगाची, अंगावर कोड असलेली, अशा स्त्रीशीं लग्नसंबंध करूं नये. तशीच अपस्माराचा किंवा क्षयाचा विकार असलेल्या कुळांतील मुलगीहि पत्नी करूं नये. उत्तम लक्षणांनीं युक्त, सौंदर्ययुक्त अशीच कन्या करावी. थोर किंवा समान कुळाशीं संबंध करावा, हीन किंवा पतित कुळाशीं करूं नये.

प्रयत्नानें अग्नि निर्माण करून सर्व वेदविहित व ब्राह्मणांनीं सांगितलेल्या क्रिया कराव्या. स्त्रियांचा मत्सर कधीं न करतां त्यांचें सदा रक्षण करावें. मत्सरानें आयुष्यहानि होते, म्हणून तो टाळावा. दिवसा झोंप घेणें किंवा सूर्य उगवल्यावर निजून रहाणें हें आयुष्यहानिकारक आहे. संध्याकाळीं लवकर किंवा उष्टयानें झोंप घेणें हेंहि वाईटच. परदारागमन जसें आयुष्यहानिकारक तसें श्मश्रु केल्यावर स्नान न करतां अभ्यासादि करणेंहि आहे, म्हणून त्या गोष्टी प्रयत्नानें टाळाव्या. संध्यासमयीं जेऊं नये, न्हाऊं नये व वाचूं नये; त्यावेळीं मनोनिग्रहपूर्वक ध्यानस्थ असावें. स्नान करून ब्राह्मणपूजा करावी, देवांना नमस्कार करावा व गुरूंना वंदावें. बोलावल्यावांचून यज्ञ पहाण्यासाठीं जाऊं नये. कारण तेथें जाऊन मान न मिळाल्यास जाण्यानें आयुष्यहानि होते. एकट्यानें फार दूर जाऊं नये, तसेंच रात्रींहि जाऊं नये. संध्याकाळ येण्यापूर्वी घरींच रहावें. माता, पिता व गुरू यांच्या आज्ञा योग्यायोग्य न पहातां मानाव्या. धनुर्वेद आणि इतर वेद यांचा अभ्यास यत्नपूर्वक करावा; तसाच हत्ती, घोडे, रथ यांवर बसण्याचाहि करावा. राजा, नित्य यत्न करीत जा, यत्नानेंच सुख मिळतें. यत्नानेंच शत्रूंना आपण अजिंक्य होतों, व सेवक आणि बांधव यांवर अधिकार मिळतो. प्रजापालनांत

दक्ष असणाऱ्या राजाची कधीं हानि होत नाहीं. युधिष्ठिरा, युक्ति–शास्त्र, शब्द–शास्त्र, गांधर्व विद्या व इतर कला यांचें ज्ञान तूं करून घे; पुराणें, इतिहास, आख्यानें, थोरांचीं चरित्रें यांचेंहि ज्ञान व श्रवण करीत जा. रजस्वला पत्नीला हांकहि मारूं नये, ती न्हाली असतां चवथ्या दिवशीं सुज्ञानें गमन करावें. पांचव्या दिवशीं गमन केल्यास कन्या व सहाव्या दिवशीं केल्यास पुत्र यांची उत्पत्ति होते. पत्नीसमागमाचा असा विधि आहे. ज्ञातिबांधव व इष्टमित्र यांचा सन्मान करावा व सामर्थ्यानुरूप यज्ञ करून दक्षिणा द्यावी. त्यानंतर अरण्यवास स्वीकारावा. आयुष्यवर्धनाचे मार्ग याप्रमाणें तुला संक्षेपानें सांगितले. युधिष्ठिरा, या विषयींचें अधिक ज्ञान तूं वेदपारंगत ज्ञानी पुरुषांकडून करून घे. सदाचार हा उत्कर्षाचा जनक व कीर्तीचा वर्धक आहे. सदाचारानें आयुष्य वाढतें व सदाचारानें अनिष्ट गोष्टींचा नाश होतो. सर्व शास्त्रांत आचारच श्रेष्ठ मानिला आहे. धर्माचें अधिष्ठान आचारावरच असून धर्मानें आयुष्यवर्धन होतें. हें सदाचारवर्णन कीर्तिकारक, आयुष्यदायक, स्वर्गप्रद व मोठें कल्याणकारक असल्यामुळें ब्रह्मदेवानें सर्व वर्णांवर कृपाळु होऊन घालून दिलें आहे. १३.१.१०४.

---

## अध्याय १०५ वा.

[ १. वडील आणि लहान भावंडांनीं एकमेकांशीं कसें वागावें. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—हे भरतकुलश्रेष्ठ पितामहा, वडील भावानें धाकट्यांशीं आणि धाकट्यांनीं वडील भावाशीं कसें वागावें तें मला सांगा.

**भीष्म**:—युधिष्ठिरा, तूं वडील बंधु असल्यामुळें त्या नात्याला शोभेल असाच सदा वागत जा. गुरूची शिष्याविषयीं जशी वृत्ति असते तशी तुझी धाकट्या भावांविषयीं असावी. गुरु जर सुज्ञ नसेल तर शिष्याला त्याच्याशीं नीट वागणें कठीण असतें. कारण गुरूचें जसें दूरदर्शित्व असेल, तसेंच शिष्यालाहि वळण लागतें. शिष्याच्या किंवा धाकट्या भावांच्या कृत्यांकडे कांहीं प्रसंगीं जाणूनहि काणाडोळा करावा व त्यांची चूक झाली असल्यास तशी पुनः होणार नाहीं असें युक्तीन त्यांना बोलावें. कारण एकमेकांचीं मनें एकदां भिन्न झालीं म्हणजे शत्रु त्यांना आणखी फोडावयास सिद्धच असतात. त्यांच्या संपत्तीच्या मत्सरानें ते त्यांच्यांत भेद पाडण्यास उत्सुक असणें स्वाभाविक आहे. कुळाचा उत्कर्ष किंवा ऱ्हास वडील भावाच्याच हातीं असतो. ज्या कुळांत वडील भाऊ

दुष्ट वृत्तीचा असतो, तें कुळ नष्ट होतें. जो वडील भाऊ धाकट्यांना नीट वागविणार नाहीं, त्याला धाकटेपण येऊन द्रव्याच्या वांटणीवर त्याचा अधिकार रहाणार नाहीं, म्हणून राजानें त्याचें नियंत्रण करावें. धाकट्यांना वाईट वागविणारा मनुष्य निःसंशय वाईट लोकाला जातो. तसला मनुष्य वेताच्या फुलासारखा पित्याला निरुपयोगी होय. ज्या कुळांत दुष्ट पुरुष उत्पन्न होतो, त्यांत सर्व अनर्थांना स्थान मिळून त्याची दुष्कीर्ति होते व असलेली कीर्ति नष्ट होते. वाईट कर्मं करणाऱ्या कोणत्याच भावांचा पित्याच्या द्रव्यावर अधिकार रहात नाहीं. धाकट्या बंधूंना वांटा दिल्यावांचून वडील भावानें पितृद्रव्याचा उपभोग घेऊं नये. पित्याच्या धनाचा उपयोग न करतां मनुष्य बाहेर पडून स्वतःच्या श्रमानें जर द्रव्य मिळवील, तर त्यानें तें इतरांना देण्याचें कारण नाहीं. आपण जीवंत असतांनाच जर आपल्या मुलांत वांटणीचा प्रसंग आला, तर पित्यानें कोणाला विषम भाग देऊं नये. वडील भाऊ दुष्कर्मी किंवा सत्कर्मी कसाहि असला, तरी त्याचा अपमान करूं नये. तसेंच स्त्री व धाकटा भाऊ यांचें जें कल्याण असेल तेंच करावें. धर्मवेत्ते पुरुष धर्मालाच श्रेष्ठ समजतात. उपाध्यायाची योग्यता दहा आचार्यांहून जशी अधिक तशी दहा उपाध्यायांहून पित्याची अधिक आणि मातेची योग्यता पित्याच्या दहापटच काय साऱ्या पृथ्वीहूनहि अधिक आहे. मातेसारखें श्रेष्ठ कोणी नाहीं; म्हणूनच तिला लोक एवढा मान देतात. पित्याच्या पश्चात् वडील भाऊच पित्यासारखा समजावा. तोच कुटुंबाचा पोषक व पालक असतो; म्हणून धाकट्यांनीं त्याच्या कलानें वागून त्याला मान द्यावा, व पित्याला अनुसरून वागतों, तसें त्याला अनुसरावें. मातापिता आपलें शरीर उत्पन्न करतात, पण आचार्य आपल्याला शिक्षण देतो. म्हणून शिक्षणरूपी जन्मच सत्य, तोच अजर आणि अमर होय. युधिष्ठिरा, वडील बहीणसुद्धां मातेप्रमाणेंच समजावी. वडीलबंधूची पत्नीहि लहानपणीं आपल्याला स्तनपान देणाऱ्या मातेप्रमाणेंच होय. १३.१.१०५.

---

## अध्याय १०६ वा.

[ १. उपवासविधीचें वर्णन ]

(१) युधिष्ठिर:—हे पितामहा, ब्राह्मणक्षत्रियादि सारे वर्ण आणि म्लेच्छ यांना उपवास करणें आवडतें, याचें कारण आम्हांला समजत नाहीं. ब्राह्मण व क्षत्रिय यांनींच नियम आचरावे, असें आम्हीं ऐकिलें आहे. मग सर्वांना त्यांचें काय काम? तेव्हां सर्वांना कोणते नियम व उपवास लागू आहेत व उपवास करणाराला कोणती गति मिळते तें मला सांगा. उपवास पुण्यकारक व श्रेष्ठ आहे, तर त्याच्या योगानें कोणतें फळ मिळतें? कशानें मनुष्य अधर्मापासून मुक्त होतो व धर्म कशानें घडतो? स्वर्ग किंवा पुण्य हीं कशीं मिळतात, उपवास केल्यावर काय दान द्यावें, व कोणत्या धर्माचरणानें सुखानें द्रव्य मिळतें, तें मला कथन करा.

भीष्म–राजा, या सर्व गोष्टी मीं पूर्वीं ऐकिल्या आहेत. उपवासाचें उत्तम फल काय, असें अंगिरा ऋषीला मीं तुझ्याप्रमाणेंच विचारिलें, तेव्हां त्यानें मला पुण्यकारक असा उपवासाचा विधि सांगितला. तो म्हणाला, 'ब्राह्मण आणि क्षत्रिय यांना तीन दिवस पर्यंतच उपास सांगितला आहे. तीन, दोन किंवा एक दिवस असा तो त्यांनीं करावा. पण वैश्य व शूद्र यांनीं तीन किंवा दोन दिवस मोहानें उपास केल्यास, त्याचें फळ कांहींच मिळत नाहीं. वैश्य व शूद्र यांना चवथें जेवण टाळण्यास सांगितलें आहे. पण तीन रात्री कांहीं सांगितलेलें नाहीं. पंचमी, षष्ठी व पौर्णिमा या तिथींना एक वेळ जेवून दुसरी वेळ उपास करणारा जितेंद्रिय व क्षमाशील मनुष्य रूपसंपन्न व विद्वान् होतो व तो निपुत्रिक किंवा दरिद्री कधीं होत नाहीं. देवतापूजन करणारा जो पुरुष पंचमी, षष्ठी, अष्टमी व कृष्ण चतुर्दशी या तिथींना स्वत: उपास करून ब्राह्मणांना आपल्या घरीं जेवावयास घालतो, तो रोगमुक्त व वीर्यवान् होतो. जो मार्गशीर्ष महिन्यांत एक वेळ जेऊन एक वेळ उपास करील व शक्त्यनुसार ब्राह्मणभोजन घालील तो रोग व पाप यांपासून मुक्त होईल, व त्याला शेती मिळून पुष्कळ धान्य लाभेल. पौष महिन्यांत जो असें करील तो सुस्वरूपी व यशस्वी होईल. माघ महिना एकभुक्त रहाणारा श्रीमंत कुळांत जन्मून ज्ञातीवर वर्चस्व मिळवील. फाल्गुनांत एकभुक्त रहाणारा स्त्रियांना प्रिय होईल व त्या त्याच्या अंकित होतील. चैत्रांत एक वेळ जेऊन रहाणारा सोनें, रत्नें, मोतीं यांनीं भरलेल्या घरांत जन्मास येईल

व ज्ञातींत श्रेष्ठ होईल. ज्येष्ठमासीं एकभुक्त करणारी स्त्री असो कीं पुरुष असो, त्याला मोठें ऐश्वर्य मिळेल. आषाढांत तसें करणाराला पुष्कळ धनधान्य व पुत्र मिळतात. श्रावणांत एकभुक्त रहाणारा ज्ञातीचा उत्कर्ष करून मोठ्या योग्यतेस चढतो. भाद्रपदांत एकाहार करणाराला गोधन व अतुल ऐश्वर्य मिळतें. आश्विन महिन्यांत एक वेळ जेवणारा शुद्ध अंतःकरणाचा होऊन, त्याला अश्व-रथादि वाहनें व अनेक पुत्र मिळतात. कार्तिकांत एक भोजन करणारा शूर, अनेक स्त्रियांचा पति व कीर्तिमान् होतो. हा महिन्यांचा विचार झाला. आतां तिथींचा ऐक. एका महिन्यांत एक पक्ष उपास करून जो दुसऱ्यांत मात्र भोजन करतो तो गोधनसंपन्न, बहुपुत्री व बहुपत्नीक होतो. प्रति महिन्यांत तीन रात्री याप्रमाणें बारा वर्षें उपवास करीत गेल्यास गणांचें निष्कंटक व निर्वेध असें आधिपत्य मिळतें. हे सारे व्रतनियम बारा वर्षें केले पाहिजेत. जो सकाळ संध्याकाळ दोनच वेळ जेवून मध्यें कांहीं पिणारहि नाहीं व अहिंसाव्रत स्वीका-रून अग्नीला आहुति देईल, त्याला सहा वर्षांनीं सिद्धि प्राप्त होईल व अग्निष्टोम यज्ञाचें फळ मिळेल; तो अप्सरांच्या लोकीं सहस्त्रस्त्रियांच्या रमण्यांत भोग भोगून तापलेल्या सोन्याच्या वर्णाच्या विमानांतून ब्रह्मलोकास जाईल व तेथें पूर्ण सहस्त्र वर्षें राहील व तें पुण्य संपल्यावर जेव्हां या लोकीं परत येईल, तेव्हां त्याला मोठेपणा मिळेल. सर्व वर्षभर जो एकवेळ जेऊन राहील त्याला अतिरात्र यागाचें फळ मिळून दहा सहस्त्र वर्षें तो स्वर्गांत मोठेपणा भोगल्यावर पुनः या लोकीं महात्मा होईल. जो सारें वर्ष प्रत्येक चार जेवणांपैकीं एकच जेवण जेवील, त्याला वाजपेय यागाचें फळ मिळेल व दहा सहस्त्र वर्षें तो स्वर्गसुख भोगील. वर्षभर जो सहापैकीं पांच भोजनें टाळील त्याला अश्वमेधाचें फळ मिळून तो चक्रवाक पक्षी जोडलेल्या विमानांतून स्वर्गास जाऊन तेथें चाळीस सहस्त्र वर्षें सुख भोगील. सात टाकून आठवें जेवणच जेवणाराला गवामयन यागाचें फळ मिळून तो हंस व सारस पक्षी जोडलेल्या विमानांतून स्वर्गास जाऊन तेथें पन्नास सहस्त्र वर्षें राहील. वर्षभर जो पक्षांतून एकवेळ जेवून राहील, तो सहा महिन्यांच्या उपासाचें फळ मिळवून साठ सहस्त्र वर्षें स्वर्गवास भोगील, असें अंगिरा ऋषीनें सांगितलें आहे. असा मनुष्य वीणा, वेणु इत्यादि वाद्यांच्या मधुर ध्वनीनें सकाळीं झोंपेंतून जागा होईल. एक वर्षभर प्रतिमासीं एकदांच पाणी पिऊन जो राहील त्याला विश्वजित् यज्ञाचें फळ मिळेल व तो सिंहवाघ जोडलेल्या विमानांतून स्वर्गीं जाऊन तेथें सत्तर सहस्त्र वर्षें आनंदांत राहील. एक

महिन्याहून अधिक काळ उपवास सांगितलेलाच नाहीं, असें धर्मवेत्त्यांनीं उपासविधीसंबंधानें म्हटलें आहे. कष्ट न होतां जो रोगरहित मनुष्य उपवास करील, त्याला पदोपदीं यज्ञाचें फल मिळेल व हंसांच्या विमानांतून तो स्वर्गास जाऊन तेथें एक लक्ष वर्षें आनंदानें राहील, आणि त्याला शंभर अप्सरा रमवितील. दुःखी किंवा रोगग्रस्त असतांहि जो उपवास करील तोहि तितकाच काळ स्वर्गसुख भोगील. त्याला काञ्ची व नुपूरें घातलेल्या अप्सरा नृत्य करून सकाळीं जागा करतील व सहस्र हंसाच्या विमानांतून तो हिंडेल. शेकडों स्त्रिया त्याला रमविण्यास सिद्ध असतील. क्षीण पुरुषाला लठ्ठ व्हावेंसें वाटतें, क्षत झालेल्याला तें बरें होण्याची इच्छा असते, रोगग्रस्ताला औषध पाहिजे असतें, रागावलेल्याला प्रसन्नता हवी असते व दुःखिताला द्रव्य व बहुमान यांनीं दुःख कमी करून घेण्याची आवश्यकता भासते; पण स्वर्गेच्छूला यांतील कांहीं नको असतें. यास्तव तसला शुद्ध मनाचा पुरुष कामचारी सुवर्णाच्या विमानांतून आनंदानें फिरतो. कांहीं न खातां देह ठेवणारा स्वस्थपणा मिळून निष्पाप व सुखी होतो, त्याचे सारे संकल्प पूर्ण होतात व त्याला उत्तम गति मिळते. बालसूर्यासमान तेजस्वी व पताकांनीं आणि घुंघुरांनीं युक्त अशा सोन्याच्या विमानांतून तो सहस्रावधि स्त्रियांसह आनंदानें फिरत रहातो व त्याच्या अंगावर जितकीं केशच्छिद्रें असतील तितकीं सहस्र वर्षें तो स्वर्गसुख भोगतो. वेदाहून श्रेष्ठ शास्त्र नाहीं, मातेसमान गुरू नाहीं, धर्माहून मोठा लाभ नाहीं, तसें उपवासाहून मोठें तप नाहीं. ब्राह्मणांसमान इहपरलोकीं कांहीं पवित्र नाहीं, तसें उपवासासारखें दुसरें तप किंवा पुण्यकर्म नाहीं. विधियुक्त उपास केल्यानेंच देवांना तरी स्वर्ग मिळाला. ऋषींनाहि सिद्धि मिळण्याचें कारण उपवासच. विश्वामित्र ब्राह्मण झाला तो देवांचीं सहस्रावधि वर्षें एकयुक्त तप केल्यामुळेंच. च्यवन, जमदग्नि, वसिष्ठ, गौतम, भृगु हे सर्व अशा तपानेंच स्वर्गीं गेले. पूर्वीं अंगिरा ऋषीनें हें उपासरूपी तप महर्षींना दाखवून दिलें. तें जो लोकांना सांगेल, त्याला कधीं दुःख होणार नाहीं व पापहि त्याला स्पर्श करणार नाहीं; तो सर्व संकटांपासून मुक्त होऊन पक्ष्यादिकांची भाषा त्याला कळेल; त्याच्या मनाला दोषांची बाधा होणार नाहीं व त्याला निश्चल कीर्तीचा लाभ होईल. १३. १. १०६.

## अध्याय १०७ वा.

[ १ यज्ञाचा कठीणपणा; यज्ञाचें फल अन्य कशानें मिळतें. ]

( १ ) **युधिष्ठिर**–आजोबा, अनेक यज्ञ व त्यांचे विधि ब्रह्मदेवानें लावून दिले आहेत व त्याचीं इहपरलोकीं मिळणारीं फळेंहि सांगितलीं आहेत. पण ते यज्ञ पुष्कळ सामग्रीच्या अभावीं दरिद्र्यांना झेपत नाहींत. राजे व पृथ्वीपति यांनाच ते शक्य. द्रव्याशिवाय होणारा, दोषहीन व एकट्याला झेपणारा दुसरा विधि नित्य साध्य होणारा असा कांहीं मला तर दिसत नाहीं. तुम्हांला तसा यज्ञसमान फळ देणारा विधि ठाऊक असेल तर सांगा.

**भीष्म**–युधिष्ठिरा, अंगिरा ऋषीनें सांगितलेला उपवासविधि यज्ञाचेंच फळ देणारा असून तो मी तुला सांगतों, तो समजून घे. जो सकाळसंध्याकाळ मध्यें कांहीं पिणारहि नाहीं व अहिंसाव्रत स्वीकारून अग्नीला आहुति देईल, त्याला सहा वर्षांत निःसंशय सिद्धि मिळेल व तो चकचकीत विमानांतून ब्रह्मलोकीं जाऊन तेथें नृत्यगीतांच्या ध्वनीनें निनादित झालेल्या देवस्त्रियांच्या स्थळीं एक पद्म वर्षें राहील. तीन वर्षें जो सारखा एकभुक्त राहील त्या पत्नीव्रती, सत्य-भाषणी, दानशूर, निर्मत्सरी, क्रोधहीन मनुष्याला अग्निष्टोमाचें फळ मिळून तो इंद्राला प्रिय असा मोठ्या सुवर्णदानाचा यज्ञ करील व हंसांच्या शुभ्र विमानांतून अप्सरांच्या लोकीं जाऊन दोन पद्में वर्षें राहील. एक दिवस उपास करून जो दुसऱ्या दिवशीं एकच वेळ जेवेल व अशा रीतीनें वर्षभर राहून अग्नीला आहुति देईल आणि सदा अग्निसेवातत्पर राहून सकाळीं लवकर उठेल, त्यालाहि अग्निष्टोमाचें फळ मिळेल, तो हंससारसांच्या विमानांतून फिरेल व सुंदर स्त्रियांसह इंद्रलोकीं राहील. दोन दिवसांच्या उपवासानंतर एक वेळ खावयाचें असें वर्षभर करून जो अग्निसेवा करील त्याला अतिरात्रयागाचें फळ, मोर व हंस यांचें विमान, व सप्तर्षिलोकीं अप्सरांसह तीन पद्म वर्षें वास यांची प्राप्ति होईल. इतर गोष्टी तशाच करून जो उपासाच्या चवथ्या रात्रीं जेवील त्याला वाजपेय यज्ञाचें श्रेय, इन्द्रकन्यायुक्त विमान, सागराच्या टोंकाला इन्द्रलोकीं वास व इंद्राच्या क्रीडेचें नित्य दर्शन हीं मिळतील. पांचव्या दिवशीं एक वेळ जेवून वर्षभर अग्निसेवा केल्यास, मनुष्य निर्लोभी, सत्यशील, ब्राह्मणप्रिय, कनवाळु व निष्पाप होऊन त्याला द्वादशाह यागाचें फळ, सुवर्णाचें हंस जोडलेलें विमान, सूर्यमालेसारखें

तेजस्वी घर व एकावन पद्म वर्षें तेथें निवास यांची प्राप्ति होईल. सहाव्या दिवशीं पारणें करीत जो त्याचप्रमाणें राहून प्रत्यहीं तीन स्नानें करील व ब्रह्मचर्यानें मत्सरविरहित राहील, त्याला गोमेधाचें पुण्य, अग्नीप्रमाणें तेजस्वी असें हंस व मोर यांचें सोन्याचें विमान, अप्सरांच्या मांडीवर शयन व अनंत काल ब्रह्मलोकीं वास हीं मिळतील. सातव्या दिवशीं पारणें करणारास मोठ्या दक्षिणेच्या यज्ञाचें श्रेय, व इन्द्रलोकीं अमित वर्षें निवास मिळेल. आठव्या दिवशीं एक वेळ जेवणें याप्रमाणें संवत्सरपर्यंत व्रत केल्यास पुंडरीक यज्ञाचें फळ, कमळासारखें विमान व गौरवर्ण सुंदर तरुण स्त्रिया यांचा लाभ होईल. प्रति नवव्या दिवशीं जो जो एकच वेळ जेवून वर्ष काढील, त्याला सहस्र अश्वमेधांचें फळ मिळून दिव्य स्त्रियांसह अंतरिक्षांत गमन करतां येईल, व सहस्रकोटि वर्षें त्यांच्या लोकीं रहावयास मिळेल. प्रति दहाव्या दिवशीं एक वेळ जेवून वर्षभर रहाणारासहि तसेंच उत्तम फळ मिळेल. याचप्रमाणें अकराव्या, बाराव्या, इत्यादि एकाहून एक अधिकाव्या दिवशीं उपासाचें पारणें फेडावयाचें व्रत वर्षभर सारखें करीत जो अग्नीला नित्य आहुति देईल, परस्त्रीचा अभिलाष मनानेंहि करणार नाहीं, कधीं असत्य बोलणार नाहीं, त्याला त्याच्या उपासाच्या दीर्घपणाच्या अनुरोधानें अश्वमेधाचें श्रेय, शिवलोक, ब्रह्मदेवाचें विमान, सूर्याचें विमान, ब्रह्मलोक, अप्सरांकडून मान, राजसूय यज्ञाचें फळ, वरुणलोक, मरुतांचा लोक, सोमयज्ञाचें फळ, उशनाचा लोक, वसूंचा लोक, अश्विनांचा लोक, वायुलोक, रुद्रलोक, आदित्यलोक, अमृतपान, साध्यलोक यांची प्राप्ति होऊन तेथें जावयास निरनिराळ्या वाहनांचीं विमानें व अनेक प्रकारचे दिव्य भोग भोगावयास मिळतील. तो त्या लोकीं अमित वर्षें राहील. वर्षाकाळांत आकाशांतून जितके पाण्याचे थेंब पडतात, तितकीं वर्षें तो त्या देवलोकीं सुख भोगील. वर्षांतून एक महिना उपास करणाराला दहा वर्षांनीं स्वर्ग मिळेल. महर्षिपद प्राप्त होऊन तो तेथें शरीरासह जाईल व तेथें यथेष्ट आपल्या पुण्याचा उपभोग घेईल. युधिष्ठिरा, हा यज्ञाचा उत्तम विधि उपासाच्या फलाच्या रूपानें तुला क्रमवार सांगितला. दरिद्री असतांहि मनुष्याला या उपासाच्या योगानें यज्ञफल मिळतें. हे उपास केले असतां देव व ब्राह्मण यांविषयीं आदरबुद्धि उत्पन्न होऊन मनुष्य उत्तम गतीला जाईल. हा उपवासाचा विधि सदाचरणी, शुद्धान्तःकरणाच्या, दंभहीन, निश्चयी महात्म्यांसाठीं विस्तारानें सांगितला आहे. यांत संशय घेण्याचें तुला मुळींच कारण नाहीं. १३.१.१०७.

---

## अध्याय १०८ वा.

[ १. सर्व तीर्थांत श्रेष्ठ तीर्थ कोणतें. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—आजोबा, सर्व तीर्थांत श्रेष्ठ कोणतें व कोणत्या तीर्थांत अत्यंत मोठें पावित्र्य आहे तें मला सांगा.

**भीष्म**:—युधिष्ठिरा, सारींच तीर्थें फलदायक आहेत. पण त्यांत विशेष पवित्र कोणतें तें लक्ष्य देऊन ऐक. मानस तीर्थ फार खोल, निर्मळ व शुद्ध असून सत्य हेंच त्यांतील जल व धैर्य हा त्यांतील डोह होय; धैर्य धरून त्यांतच सदा स्नान करावें. तसें केल्यास निष्कामपणा, सरळपणा, सत्य, कनवाळुपणा, दया, इन्द्रियदमन व शांति या रूपानें आपली शुद्धि होते. ममत्व व अहंकार सुटलेले, द्वंद्वातीत, जवळ कांहीं न बाळगणारे असे जे पुरुष भिक्षेवर उपजीविका करतात, ते पवित्र अशीं तीर्थेंच होत. त्यांत अहंकार टाकून तत्ववेत्ता होतो तो सर्वांत श्रेष्ठ होय. सर्वत्र शोधून काढण्यासारखें शुद्धिलक्षण म्हणजे हेंच होय. सत्वादि तिन्ही गुण ज्यांनीं धुवून काढिले आहेत व अशा रीतीनें पूर्ण शुद्ध होऊन जे आत्मज्ञानाच्याच मार्गें लागले आहेत, ज्यांनीं सर्व वस्तूंचा त्याग करून सर्वत्र समबुद्धि ठेविली आहे, असे अन्तःकरणशुद्धीनें शुद्ध झालेले पुरुषच पवित्र तीर्थें होत. पाण्यानें शरीर धुतलें म्हणजे स्नान झालें असें नाहीं. जो इन्द्रियदमन करून अंतर्बाह्य शुद्ध झाला तोच खरा स्नात समजावा. आपल्या हातून गेलेल्या वस्तूंची अपेक्षा न बाळगणारा व हातीं असलेल्यांवरहि ममत्व न ठेवणारा असा वासनारहित मनुष्यच खरा शुद्ध होय. आत्मज्ञान हेंच शरीराचें विशिष्ट शुद्धपण होय. निःसंगपणा व मनाची प्रसन्नता यांचाहि त्यांत समावेश आहे. प्रथम शुद्ध आचार, मग शुद्ध अंतःकरण व त्यानंतर तीर्थशौच. पण जें शौच ज्ञानानें मिळालें तेंच सर्वश्रेष्ठ होय. प्रदीप्त मनानें जो ब्रह्मज्ञानरूप जलांत मानसतीर्थीं स्नान करतो, त्या तत्वज्ञाचें स्नानच खरें स्नान म्हणावें. सद्भावानें जो कोणी शौच साधतो असा गुणसंपन्न पुरुष नित्य शुद्धच होय. शरीरांत असणारीं हीं तीर्थें तुला सांगितलीं. आतां पृथ्वीवरील पवित्र तीर्थें ऐक. शरीराचे कित्येक भाग जसे पवित्र मानिले आहेत, तसे पृथ्वीचे कांहीं भाग आणि जलस्थलें पवित्र मानलेलीं आहेत. जे तीर्थस्थानांची स्तुति करून पितरांचें तर्पण करतात व अशा रीतीनें आपलें पाप धुवून काढितात, ते सुखानें स्वर्गास जातात. साधूंची संगति, पृथ्वीचें तेज व जलाचा प्रताप यांच्या योगानें ते अतिशय पुण्यशाली झालेले

असतात. मनांतील व पृथ्वींतील अशा या दोन्ही प्रकारच्या पवित्र तीर्थांत जो स्नान करील त्याला सिद्धि लवकर मिळेल. नुसतें बळ जसें क्रियेवांचून व्यर्थ तशी नुसती क्रियाहि बलावांचून व्यर्थ होय. केवळ एकानें कांहींच कार्य होत नाहीं. त्यांच्या जोडगोळीनेंच सिद्धि मिळते. राजा, याप्रमाणें शुद्धि दोन प्रकारची आहे, शारीर व बाह्य. या दोन्ही शुद्धींनीं युक्त अशा पुरुषालाच सिद्धि प्राप्त होते. १३. १. १०८.

---

## अध्याय १०९ वा.

[ १. सगळ्या उपवासांत अधिक फळ कोणाचें ? ]

( १ ) **युधिष्ठिर :**—आजोबा, सर्व उपवासांत जो अधिक श्रेयस्कर व मोठें फल देणारा असा निःसंशय असेल तो तुम्ही मला सांगा.

**भीष्म :**—राजा, काय केलें असतां मनुष्य निःसंशय सुखी होईल, तें स्वतः ब्रह्मदेवानें सांगितलें आहे. तें आतां ऐक. मार्गशीर्षद्वादशीला रात्रंदिवस केशवाची पूजा केल्यास अश्वमेधाचें फळ मिळून सर्व पाप नष्ट होतें. त्याचप्रमाणें पौषमासीं द्वादशीला नारायणाची पूजा केल्यास वाजपेयाचें फळ व मोठी सिद्धि मिळतात. माघ मासांत माधवाची पूजा करणाराला राजसूय यज्ञाचें फळ मिळून तो सर्व कुळाचा उद्धार करतो. फाल्गुन महिन्यांत गोविंद गोविंद म्हणून जो त्याची पूजा करील, त्याला अतिरात्र यागाचें फळ मिळेल व तो सोमलोकीं जाईल. चैत्रांतील द्वादशीला विष्णुस्मरण अहोरात्र करणाराला पौंडरीक यज्ञाचें फळ मिळून देवलोकाची प्राप्ति होते. वैशाखी द्वादशीला मधुसूदनाला पूजिल्यानें अग्निष्टोम यज्ञाचें फळ व सोमलोक हीं मिळतात. ज्येष्ठद्वादशीला त्रिविक्रमाला स्मरल्यास गोमेधाचें फळ व अप्सरांचा भोग मिळतात. आषाढी द्वादशीला वामनाला पूजिल्यास नरमेधाचें फळ व मोठें पुण्य मिळतात. श्रावणी द्वादशीला श्रीधराला पुजावें म्हणजे पंच यज्ञाचें फळ व विमानसंचार हीं प्राप्त होतात. भाद्रपदांत हृषीकेशाची पूजा केल्यानें सौत्रामणि यागाचें फळ मिळून मनुष्य शुद्ध अंतःकरणाचा होतो. आश्विनांतील द्वादशीची पद्मनाभाची पूजा सहस्र गोदानाचें श्रेय व मोठें पुण्य निःसंशय देते. दामोदर नांवानें कार्तिकी द्वादशीला देवाला पूजिल्यास पुरुष असो कीं स्त्री असो त्याला किंवा तिला गोयज्ञाचें निःसंशय फळ मिळतें. याप्रमाणें वर्षभर भगवान् पुंडरीकाक्षाची पूजा

करीत गेल्यास पूर्वजन्मींचें स्मरण राहून पुष्कळ सुवर्ण प्राप्त होतें. प्रतिदिवशीं उपेन्द्राची भक्ति करून व्रतसमाप्तीनंतर ब्राह्मणांना भोजन घालावें किंवा त्यांना घृतदान करावें. याहून उपवास अधिक नाहीं, असें प्रत्यक्ष भगवान् विष्णूनें पूर्वी निश्चित सांगितलें आहे. १३.१.१०९.

---

## अध्याय ११० वा.

[ १. शरीरसौंदर्य व पुरुषार्थ यांची प्राप्ति कशी होते. ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, मनुष्याला पाहिजे असलेलें स्वरूपसौंदर्य आणि धर्म, अर्थ, काम हे पुरुषार्थ मिळून तो सुखी कसा होईल बरें ?

भीष्म—युधिष्ठिरा, मार्गशीर्ष महिन्यांत चंद्र मूळनक्षत्रीं असतां चांद्रव्रत करावें. तें असें कीं मूळ हे चंद्राचे पाय, रोहिणी या तंगड्या, अश्विनी गुडघे, पूर्वाषाढा व उत्तराषाढा या मांड्या, पूर्वाफाल्गुनी गुदद्वार, कृत्तिका कटि, पूर्वा व उत्तरा भाद्रपदा या बेंबी, रेवती हा डोळ्यांचा घेर, धनिष्ठा, अनुराधा व उत्तरा फाल्गुनी ही त्याची पाठ, विशाखा हे बाहु, हस्त म्हणजे त्याचे हात, पुनर्वसू म्हणजे त्याच्या हाताचीं बोटें व आश्लेषा म्हणजे नखें, ज्येष्ठा ही त्याची मान, श्रवण म्हणजे त्याचे कान, पुष्य हें मुख, स्वाति हे त्याचे दांत व ओंठ, शततारका हें त्याचें हंसणें, मघा म्हणजे त्याचें नाक, मृगशीर्ष हे नेत्र, चित्रा हें कपाळ, भरणी म्हणजे मस्तक, व आर्द्रा म्हणजे त्याचे केश, अशी कल्पना करून चंद्राचें ध्यान प्रत्यहीं करावें व अग्नीला मंत्रोच्चारपूर्वक घृताची आहुति द्यावी. पौर्णिमेला व्रत पुरें झालें म्हणजे उरलेलें होमाचें तूप वेदविशारद ब्राह्मणाला देऊन टाकावें. असें चांद्रव्रत केल्यानें मनुष्य दर्शनीय स्वरूपाचा, सुबक व ज्ञानी होतो आणि त्याच्या अवयवांत कांहीं न्यून असेल तर तें भरून निघून तो पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें परिपूर्ण शरीराचा होतो. १३. १. ११०

---

## अध्याय १११ वा.

[ १. मनुष्यांचा संसार; त्यांना स्वर्गनरकांची प्राप्ति कशी होते; मृत माणसाच्या मागून काय जातें. २ कर्मानुसार प्राप्त होणाऱ्या योनि. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—हे सर्वशास्त्रपारंगत पितामहा, मनुष्यांचा संसार उत्तम प्रकारें कसा चालतो, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे. कोणत्या पद्धतीनें वागलें असतां मनुष्यांना स्वर्ग अथवा नरक मिळतो? मातीच्या ढेकळाप्रमाणें किंवा लांकडाच्या ओंड्याप्रमाणें झालेलें मृत शरीर टाकून तीं जेव्हां परलोकीं जाऊं लागतात, तेव्हां त्याच्या मागोमाग कोण जातें?

**भीष्म**—युधिष्ठिरा, हा पहा उदारबुद्धीचा भगवान् बृहस्पति इकडेच येत आहे. आतां त्यालाच हा गुह्य प्रश्न विचार. आजकाल त्याचें उत्तर देणारा दुसरा कोणी दिसत नाहीं. बृहस्पतीसमान दुसरा कोण वक्ता आहे?

वैशंपायन म्हणतो, भीष्मानें असें सांगितलें तोंच बृहस्पति स्वर्गपृष्ठावरून खालीं उतरून तेथें आला. युधिष्ठिरानें धृतराष्ट्राला पुढें करून त्याचें उठून स्वागत केलें आणि त्यानें व इतर सर्वांनीं त्याला बहुमान दिला. मग युधिष्ठिर त्याच्याजवळ गेला आणि त्याला प्रश्न विचारूं लागला.

**युधिष्ठिर**:—हे भगवन्, आपण सर्व धर्म जाणणारे व सर्व शास्त्रपारंगत आहां. मनुष्याला खरा आधार कोणाचा? बापाचा, आईचा, मुलाचा, गुरूचा, ज्ञातिबांधवांचा कीं इष्ट मित्रांचा? मनुष्य शरीरत्याग करून परलोकीं जात असतां त्याच्या समागमें कोण जातें?

**बृहस्पति**:—राजा, मनुष्य एकटाच जन्मास येतो व एकटाच नाशहि पावतो. एकट्यानेंच तो संकटें तरून जातो व संकटांतहि एकट्यानेंच पडतो. त्याला त्या प्रसंगीं माता, पिता, भाऊ, पुत्र, गुरु इत्यादिकांचें साह्य होत नाहीं. काष्ठवत् झालेलें शरीर टाकून तो परलोकीं निघाला असतां तीं सारीं घटकाभर रडून तोंड वळवून माघारीं जातात. त्यांनीं सोडून दिलेल्या शरीराबरोबर एक धर्म मात्र जातो. म्हणून धर्माला आपला सहायक समजून मनुष्यांनीं त्याचें नित्य आचरण करावें. धर्मयुक्त मनुष्याला उत्तम स्वर्गगति मिळते व अधर्मयुक्ताला सहजच नरकप्राप्ति होते. यास्तव सुज्ञानें न्यायमार्गानें मिळालेलें द्रव्य वेंचून धर्मसेवाच करावी. धर्म हा एकटाच मनुष्याला परलोकीं साह्य करतो.

ोभ, मोह, दया, भय इत्यादि कारणांनीं मनुष्य स्वतःसाठीं किंवा दुसऱ्यासाठीं ाईट कृत्यें करतो. जीवंतपणीं धर्म, अर्थ व काम या त्रिकूटाचें महत्त्व आहे, ण तें अधर्म होणार नाहीं अशाच रीतीनें संपादावें.

( २ ) **युधिष्ठिर**:—हे भगवन्, आपलें धर्मयुक्त व हितकर भाषण मीं ;किलें. आतां शरीराची रचना व स्थिति कशी असते हें मला कळावयास पाहिजे ाहे. शरीर मृत झालें कीं तें सूक्ष्मस्वरूप व अव्यक्त होतें आणि मग अर्थात् त्रांना दिसत नाहीं. तेव्हां धर्म त्याच्या मागोमाग जातो तो कसा?

**बृहस्पति**:—युधिष्ठिरा, पृथ्वी, वायु, आकाश, जल, अग्नि, मन, यम, ुद्धि, आत्मा हीं सर्व सगळ्या प्राण्यांच्या धर्माला सदा पहात असतात. रात्रं-देवस तीं त्याच्या साक्षीला असून त्या सर्वांसह धर्म जीवाच्या मागोमाग जातो. ाजा, शरीर जीवितविरहित झालें कीं त्वचा, अस्थि, मांस, शुक्र, शोणित हीं ,खील त्याला सोडून जातात. मग धर्मासह एकटा जीवच परलोकीं जातो. ेथें त्याच्या शुभाशुभ कर्मांची छाननी पंचभूतान्तर्गत देवता करतात. जीव ार्मानें म्हणजे शुभकर्मानें युक्त असेल तर तो तेथें सुख भोगतो. आतां आणखी ;ला काय सांगावयाचें राहिलें?

**युधिष्ठिर**:—भगवन्, धर्म जीवामागोमाग कसा जातो तें मला आपण ांगितलें. आतां त्याचा प्रवेश पुढील जन्मासाठीं रेतांत कसा होतो तें सांगावें.

**बृहस्पति**:—राजा, मनुष्यशरीरांत वास करणारे देव म्हणजे पंच भूतें जें ान्न खातात, त्यानें ते तृप्त झाले म्हणजे त्यापासून रेत बनतें. त्या रेतापासून ्रीपुरुषांच्या संबंधांत गर्भाची उत्पत्ति होते. याप्रमाणें तुझ्या प्रश्नाचें सर्व उत्तर ीं दिलें. आतां आणखी काय ऐकण्याची तुला इच्छा आहे?

**युधिष्ठिर**:—महाराज, गर्भाची उत्पत्ति कशी होते तें मला तुम्हीं सांगि-ालें. पण आतां जन्मणाऱ्या जीवाचा त्यांत प्रवेश कसा होतो तें सांगा.

**बृहस्पति**:—जीव जवळ वावरणाऱ्या पंचमहाभूतांनीं घेरलेला असतो. ाचा जेव्हां त्यांच्यापासून वियोग होतो, तेव्हां तो पुनः पंचभूतांनीं युक्त होऊन ;सऱ्या जन्मास जातो. तेथें त्या भूतान्तर्गत असलेल्या देवता त्याचें शुभाशुभ ंर्म पहातात व तदनुसार त्याला सुखदुःखाची प्राप्ति होते.

**युधिष्ठिर**:—त्वचा, अस्थि, मांस, इत्यादि सोडून जीव पंचभूतांपासून ेला झाला, म्हणजे कोणत्या अधिष्ठानावरून तो सुखदुःख भोगतो?

बृहस्पति :—कर्मानें युक्त असलेला जीव पंचमहाभूतवियोगानंतर लगेच रेतोरूप होतो व स्त्रियांच्या रजाचा आश्रय करून यथाकालीं जन्मास येतो. यमदूतांकडून त्याला क्लेश प्राप्त होतात व त्यांच्याकडूनच तो वधहि पावतो. असें हें सुखदुःखरूप संचारचक्र या लोकीं जन्मापासून मनुष्याच्या मागें लागतें. त्याच्या हातून धर्म घडला असेल तर त्याला चांगलें फल मिळतें. धर्माच्या मधून मधून अधर्माचेंहि आचरण त्यानें केलेलें असेल, त्याला सुखानंतर दुःख भोगावें लागतें. अधर्माचेंच आचरण त्यानें विशेष केलें असेल तर यमलोकीं मोठें दुःख भोगल्यावर तो मनुष्येतर योनींत जन्मास जातो.

( २ ) आतां मोहानें केलेल्या कोणकोणत्या कर्मानें प्राणी कोणकोणत्या योनींत जातो तें मी सांगतों, ऐक. शास्त्र, इतिहास व वेद यांच्या आधारानें तें मीं तुला सांगतों. प्रथम प्राणी घोर अशा यमलोकीं जातो. तेथें देवलोकासारखीं पवित्र स्थानें आहेत, तशींच नीचयोनीहून वाईट स्थिति असणारींहि दुसरीं स्थानें आहेत. दिव्य अशा यमलोकीं ठरींव कर्मांनीं बांधून गेलेला प्राणी दुःख भोगतो. आतां कोणत्या कर्मानें कोणती वाईट गति मिळते तें सांगतों. चारी वेदांचें अध्ययन करूनहि जो ब्राह्मण मोहानें पतित माणसाकडून दान घेतो, तो गर्दभयोनींत जन्मतो. त्या योनींत पंधरा वर्षें घालविल्यावर तो मरून बैल होतो व सात वर्षांनीं मरून पुनः ब्रह्मराक्षस होतो. तीन महिने त्या स्थितींत राहून तो ब्राह्मणाच्या जन्मास जातो व तेथें पतिताकडून यज्ञ करविल्यामुळें कृमीच्या जन्मास जातो. त्यांत पंधरा वर्षें राहिल्यावर त्या योनींतून सुटून तो पुनः गाढव होतो व पांच वर्षें त्यांत काढल्यावर डुकर होऊन पांच वर्षें रहातो. त्यानंतर तो पांच वर्षें कोंबडा, पांच वर्षें कोल्हा, व एक वर्ष कुत्रा होऊन पुनः मनुष्यजन्मास येतो. जो शिष्य निर्बुद्धपणामुळें आचार्यांच्या बाबतींत पाप करतो तो निःसंशय तीन जन्मांतून जातो. प्रथम तो कुत्रा होऊन मग मांसाहारी पशु व त्यानंतर गाढव होतो. तेथें कष्ट सोसून मेल्यावर पुनः तो ब्राह्मणजन्मास येतो.

जो शिष्य मनानेंहि गुरुपत्नीगमनाचें पाप करतो, तो त्या अधर्मामुळें उग्र योनींत जन्मतो. प्रथम तो कुत्र्याच्या योनीस जाऊन तींत तीन वर्षें रहातो, तेथें मेल्यावर त्याला कृमियोनि प्राप्त होते व तींत वर्षभर राहिल्यावर मरून तो पुनः ब्राह्मणजन्मास जातो. गुरू आपल्या पुत्रासारख्या शिष्याचा जर निष्कारण वध करील तर त्या पापामुळें तो हिंस्र पशूच्या जन्मास जाईल. जो

पुत्र मातापित्यांचा अपमान करील, तोहि मरणोत्तर गर्दभयोनींत जन्मून तेथून दहा वर्षांनंतर नक्राच्या जन्मास जाईल व नंतर एका वर्षानें पुनः ब्राह्मण जन्मास येईल. आईबापांच्या रोषास पात्र झालेला मुलगा मरणोत्तर दहा महिने गाढव होऊन पुढें चवदा महिने कुत्रा होतो. नंतर सात महिने मांजराच्या योनींत राहून पुनः तो मनुष्यजन्मास येतो. मातापित्यांना कष्ट देऊन आक्रोश करावयास लावणारा सारिकेच्या जन्मास जातो, व त्यांना ताडन करणारा कांसव होतो. दहा वर्षें कासवाच्या जन्मांत राहून पुढें तीन वर्षें तो साळ होतो; तेथून सहा महिने सर्पयोनींत राहिल्यावर तो पुनः मनुष्याच्या जन्मास येतो. स्वामीचें अन्न खाऊन जो त्याच्या शत्रूंची सेवा करतो तो मूढ मनुष्य मेल्यावर वानर होतो. दहा वर्षें वानर झाल्यावर पुढें पांच वर्षें तो उंदीर होऊन सहा महिने कुत्र्याच्या जन्मास जाऊन नंतर मनुष्य होतो. दुसऱ्याची ठेव गिळंकृत करणारा मनुष्य यमलोकीं गेल्यावर शंभर जन्म घेऊन नंतर कृमि होतो व पंधरा वर्षें त्या जन्मांत राहून पापक्षय झाल्यावर पुनः मनुष्य होतो. दुसऱ्याचा मत्सर करणारा सारंगनामक हरिणाच्या जन्मास जातो. विश्वासघात करणाऱ्या दुष्टाला माशाचा जन्म मिळतो, व आठ वर्षांनीं हरिणाच्या जन्मास जाऊन एक वर्ष बकरा झाल्यावर तो किडा होतो व नंतर पुनः मनुष्यजन्मास येतो.

यव, तीळ, उडीद, कुळीथ, मोहरी, हरभरे, वाटाणे, मूग, गहूं, जवस इत्यादि धान्यें मोहानें चोरणारा पुढील जन्मीं निर्लज्ज उंदीर होतो, व तेथेंहि मेल्यावर डुकराच्या जन्मास जाऊन जन्मतांच रोगानें मरतो. मग तो मूढ पुढें कुत्रा होऊन पांच वर्षांनीं पुनः मनुष्यजन्मास येतो. परदारागमन बलात्कारानें करणारा लांडगा होतो व क्रमानें कुत्रा, कोल्हा, गिधाड, सर्प, कंक, बगळा, अशा जन्मास जातो. भावजयीवर बलात्कार करणारा पापी व मूर्ख मनुष्य एक वर्षभर कोकीळ होतो. मित्रपत्नी, गुरुपत्नी, राजपत्नी यांच्यावर कामेच्छेनें बलात्कार करणारा मरणोत्तर डुकर होतो व तेथें पांच वर्षांनीं मेल्यावर दहा वर्षें कुत्रा होतो. त्यानंतर तो पांच वर्षें मांजर, दहा वर्षें कोंबडा, तीन महिने मुंगी व एक महिना कीटक, असे जन्म भोगून चवदा महिने किडा होतो व त्या जन्मांत पापक्षय झाल्यावर पुनः मनुष्यजन्मास येतो. विवाह, यज्ञ, किंवा दान या बाबतींत जो मोहानें विघ्न आणतो तो मरणोत्तर पंधरा वर्षें किडा होऊन पापक्षयानंतर मनुष्य होतो. एकदां कन्या देऊन पुनः तिचें दान करूं इच्छिणाराहि मेल्यावर तेरा वर्षें पापक्षयार्थ किड्याचा जन्म भोगून पुनः मनुष्यजन्मास येतो.

देवकार्य व पितृकार्य न करतां जो भोजन करतो तो मेल्यावर शंभर वर्षे कावळ्याच्या योनींत राहून मग कोंबडा व सर्प होतो. आणि नंतर पुनः मनुष्य होतो ज्येष्ठ बंधु पित्यासारखा असतां जो त्याचा अपमान करतो तो मेल्यावर क्रौंच होतो व एका वर्षानंतर चीरक होऊन मेल्यावर पुनः मनुष्ययोनींत जन्मतो. शूद्र ब्राह्मणस्त्रीशी गमन करील तर कृमियोनींत जाईल व नंतर डुकराच्या जन्मास जाऊन तेथें लगेच रोगानें मेल्यावर कुत्रा होईल व अशा रीतीनें पापक्षय झाल्यावर पुनः मनुष्य होईल. पण तेथें त्याला एक मूल होतांच तो मरून उंदराच्या जन्मास जाईल. कृतघ्न मनुष्य मेल्यावर यमलोकीं जातो व यमदूतांकडून दंड, सोटे, शूळ, अग्निकुंभ, तरवारी, तापलेली वाळू, इत्यादिकांच्या अनेक यातना सोसल्यावर तेथें वध पावतो. नंतर तो अनेक जन्म घेत पंधरा वर्षें किडा होतो व मग मनुष्यजन्मास येऊन लहानपणींच मरतो. त्यानंतर तो शेंकडों नीच योनींत जन्मून अनेक वर्षे दुःख भोगतो व मग कांसवाच्या जन्मास जातो. दहीं चोरणारा बगळा होतो. न शिजविलेले मासे चोरणारा पाणकोंबडा होतो. मध चोरणारा गांधिल होतो. फळें, मुळें, किंवा घारगे चोरणारा मुंगी होतो, व निष्पाव म्हणजे जाडे उडीद चोरणारा हलगोलक होतो. खीर चोरल्यास तित्तिराचा व पिठाचे वडे चोरल्यानें घुबडाचा जन्म मिळतो. लोखंडाची चोरी करणारा कावळा होतो, तर कासें चोरल्यास हारीत होतो. रुप्याचें भांडें चोरणारा कबूतर होतो व सोन्याचें चोरणारा किडा होतो. रेशमी वस्त्र चोरणारा सरडा होतो, तांबडें वस्त्र चोरणारा वर्तक होतो, मलमल चोरणारा पोपट होतो व उंची रेशमी वस्त्र चोरणारा मरगोत्तर हंस होतो. कापसाचें वस्त्र चोरल्यास क्रौंच होतो व तागाचें कापड चोरल्यास मेंढा होतो. अंबाडीचें वस्त्र चोरल्यास मनुष्य ससा होतो, रंगाचे पदार्थ चोरल्यास मोर, तांबडीं वस्त्रें चोरल्यानें चकोर, व लोभानें सुगंधी पदार्थ चोरल्यास चिचुंद्री होतो. तेथें पंधरा वर्षांनीं पापक्षय झाल्यावर पुनः तो मनुष्य होतो. दूध चोरल्यानें बगळ्याचा, व तेल चोरल्यानें तेलडुब्याचा जन्म मिळतो. शस्त्रानें अधमपणें द्रव्यासाठीं किंवा शत्रु म्हणून निःशस्त्राचा वध केल्यास मनुष्याला पुढील जन्म गाढवाचा येतो व दोन वर्षें तशीं काढल्यावर त्याचा शस्त्रानें वध होऊन तो हरिण होऊन नित्य भीतिग्रस्त असा रहातो. एक वर्ष हरिण झाल्यावर त्याचा शस्त्रानें वध होतो व पुढील जन्मीं मासा होऊन तो जाळ्यांत सांपडतो. पुढें चार महिने गेल्यावर तो श्वापदयोनींत दहा वर्षें काढतो व नंतर पांच वर्षें चित्ता होतो. तेथें कालक्रमानुसार मरण पावल्यावर पापक्षय झाल्यामुळें पुनः मनुष्य-

योनींत तो जन्मतो. स्त्रीहरण करणारा दुष्ट मनुष्य यमलोकीं अनेक क्लेश भोगल्यावर वीस प्रकारच्या योनींत क्रमानें जन्मून नंतर किडा होतो व त्या जन्मांत वीस वर्षें काढल्यावर पुनः मनुष्य होतो. भोजन चोरल्यानें मनुष्य माशी होऊन बराच काळ रहातो व पायक्षय झाल्यावर पुनः मनुष्यजन्मास येतो. धान्य चोरणारा कोल्हा होतो व पेंडीमिश्रित खाणें चोरल्यानें मुंगुस होऊन माणसांना नित्य चावत रहातो. तूप चोरणारा काकमद्गु नामक पक्षी होतो व मासे व मांस चोरणारा कावळा होतो. मीठ चोरणारा पोपट होतो, व ठेव गिळंकृत करणारा विश्वासघातकी अल्पायु होऊन पुढील जन्मीं मासा होतो व तेथून पुनः मनुष्यजन्मास येतो. पण तेथेंहि तो अल्पायु होतो. मनुष्यें याप्रमाणें पापें करून नीच योनींत जन्मतात. स्वतःप्रमाण असा धर्म ते मुळींच जाणत नाहींत. जे पापें करून व्रतांनीं त्याचें निराकरण करतात ते सुखदुःखांनीं नित्य व्याप्त होतात. पापी आचाराचे लोभी व मोहान्ध लोक घरदाराविरहित फिरणारे म्लेच्छ होतात. पण जे जन्मापासून पापकर्म वर्ज्य करतात, ते निरोगी, सुस्वरूप व धनवान् होतात. स्त्रियाहि असलीं पापें केल्यानें तत्समान प्राण्यांच्या पत्न्या होतात. दुसऱ्याचें धन चोरण्यांत काय दोष आहेत ते विस्तारानें सांगितले आहेत, त्यांतून अंशमात्र मीं तुला आतां सांगितला. दुसऱ्या कथाप्रसंगीं पुनः तो भाग तुला ऐकावयास मिळेल. युधिष्ठिरा, पूर्वीं ब्रह्मदेवानें देवर्षींना हें सांगितलें तें मीं ऐकिलें व तूं विचारल्यावरून मीं तुला तें सर्व यथास्थित वर्णिलें. हें ऐकल्यावर तूं आतां धर्मावर नित्य मन ठेव. १३. १. १११.

---

## अध्याय ११२ वा.

[ १. धर्माचरणानें प्राप्त होणारी गति. ]

( १ ) **युधिष्ठिर** :—भगवन्, अधर्मानें कोणत्या योनि प्राप्त होतात तें तुम्हीं सांगितलें. आतां धर्मानें कोणती मिळते तें ऐकण्याची माझी इच्छा आहे. पापकर्में करून शुभ गति कशी मिळते किंवा कोणतीं कर्में केलीं असतां शुभगति मिळते तें सांगा.

**बृहस्पति** :—पापकर्में केल्यावर अधर्माच्या तावडींत सांपडलेला मनुष्य आपल्या उलट्या मनःस्थितीमुळें नरकास जातो. मोहामुळें अधर्म घडला असतां मनुष्याला जर पश्चात्ताप होईल, तर त्याच्या मनाला समाधान होऊन तो पुनः

वाईट कर्म करणार नाहीं. त्याचें मन जशी जशी आपल्या दुष्कर्माची निंदा करील, तसतसा तो अधर्मापासून सुटेल. राजा, जर तो धर्मज्ञ पुरुषाशीं संभाषण करील तर तो अधर्मानें उत्पन्न झालेल्या दुष्कीर्तीपासून लगेच मुक्त होईल. आपण केलेला अधर्म मनुष्य जसजसा मनःपूर्वक बोलून दाखवील, तसतसा तो दोषमुक्त होत जाईल. वृद्धपणाची कांत टाकून सर्प जसा हलका होतो, तसेंच त्याचें होतें. शांत मनानें ब्राह्मणाला निरनिराळीं दानें दिल्यानें उत्तम गति मिळते. वाईट कर्मे करूनहि कोणतीं दानें दिल्यानें मनुष्य धर्मयुक्त होतो तें आतां सांगतों. सर्व दानांत अन्नदान श्रेष्ठ मानिलें आहे, म्हणून सरळपणें धर्म करूं इच्छिणाऱ्यानें प्रथम अन्न द्यावें. अन्न म्हणजेच मनुष्याचा प्राण असून अन्नापासूनच मनुष्याची उत्पत्ति होते. जगाचा आधारच अन्न असल्यामुळें अन्नाची थोरवी गातात. देव, ऋषि, पितर आणि माणसें अन्नालाच वाखाणतात. रन्तिदेव अन्नदानानेंच स्वर्गास गेला. न्यायानें मिळविलेलें अन्न वेदाध्ययन करणाऱ्या ब्राह्मणांना आनंदित अन्तःकरणानें द्यावें. सहस्र ब्राह्मण ज्यानें दिलेलें अन्न हर्षयुक्त मनानें भक्षितात, त्याला कधीं नीच योनींत जावें लागत नाहीं. दहा सहस्र ब्राह्मणांना भोजन दिल्यानें योगरत मनुष्य अधर्मापासून मुक्त होतो. भिक्षा मागून आणलेलें अन्न वेदाध्ययन करणारा ब्राह्मण जर तशाच दुसऱ्या ब्राह्मणाला देईल, तर त्याला इहलोकींच सुख मिळेल. ब्राह्मणांना पीडा न देतां त्याचें न्यायानें परिपालन करणारा क्षत्रिय जर आपल्याला मिळालेलें अन्न स्वस्थ चित्तानें वेदवेत्त्या ब्राह्मणांना देईल, तर त्यामुळें त्याचें पाप नष्ट होईल. शेतीच्या उत्पन्नांतील सहावा भाग राजाला देऊन उरलेल्यांतून जो वैश्य ब्राह्मणांना देतो, तो पापांपासून सुटतो. काबाडकष्टानें व प्रसंगीं जीव संकटांत घालून मिळविलेलें अन्न ब्राह्मणांना दिल्यानें शूद्र पापमुक्त होतो. कोणाला पीडा न देतां स्वतःच्या बळावर मिळविलेलें अन्न जो ब्राह्मणांना देतो, त्यावर संकटें कधीं येत नाहींत. न्यायप्राप्त अन्न वेदज्ञ ब्राह्मणांना देणारा पापापासून सुटून जातो. बलवर्धक अन्नाच्या दानानें मनुष्य बलिष्ठ होतो व सज्जनांना मिळणाऱ्या गतीला जाऊन पापांपासून मुक्त होतो. दान देणाऱ्यांनीं घालून दिलेल्या मार्गानें सुज्ञ लोक जातात. त्यांना प्राणदानाचें पुण्य लागतें व त्यांचाच धर्म शाश्वत होय. कोणत्याहि परिस्थितींत न्यायानें मिळविलेलें अन्न सत्पात्रीं दान करावें. अन्न हीच गति होय. अन्नदानानें मनुष्यावर घोर संकट येण्याचें टळतें, म्हणून अन्यायाचा अवलंब न करतां मिळविलेलें अन्न देत

असावें. प्रथम ब्राह्मणाला अन्न देऊन मग आपण खाणारा गृहस्थ त्या अन्न-दानानें तो दिवस सफळ करतो. वेदवेत्ते, न्यायवेत्ते, धर्मवेत्ते व इतिहासवेत्ते अशा सहस्र ब्राह्मणांना भोजन दिल्यानें मनुष्याला नरकांत जाण्याची व नीच-योनींत फिरण्याची पाळी येत नाहीं व त्याच्या सर्व इच्छा परिपूर्ण होऊन तो परलोकीं सुख भोगतो. याप्रमाणें निश्चिंत होत्साता तो स्वस्थ मनानें आनंद भोगतो व रूपवान्, कीर्तिमान् व धनवान् होतो. अन्नदानाचें मोठें फळ तुला मीं हें सविस्तर सांगितलें; कारण हेंच साऱ्या धर्माचें व दानाचें मूळ होय. १३. १. ११२

---

## अध्याय ११३ वा.

[ १. संसारचक्राची कहाणी. ]

( १ ) **युधिष्ठिर** :—महाराज, अहिंसा, वैदिक कर्म, ध्यान, इंद्रियदमन, तप, गुरुसेवा यांत पुरुषाला अधिक श्रेयस्कर काय बरें असतें ?

**बृहस्पति** :—युधिष्ठिरा, या सगळ्याच गोष्टी आपआपल्या परीनें धर्मावह होत. या सहाचेंहि वर्णन मीं सांगतों तें ऐक. अहिंसारूप धर्म जो मनुष्य सदा आचरतो त्याचें परम कल्याण होतें. काम, क्रोध व लोभ हे तीन दोष सर्व प्राण्यांत असतात; पण ज्यांना जो आवरतो त्याला सिद्धि मिळते. शांत स्वभावाच्या प्राण्यांना आपल्या सुखासाठीं जो काठीनें मारतो, तो परलोकीं कधीं सुखी होत नाहीं. स्वतःवरून जो प्राणिमात्राच्या सुखदुःखाची जाणीव करून घेतो व दंड टाकून क्रोध जिंकतो, त्याला परलोकीं सुख भोगावयास मिळतें. प्राणिमात्राचें अंतःकरण जाणून जो त्यांच्याकडे समदृष्टीनें पहातो, त्याचा मार्ग शोधूं पहाणारे देवहि तो न मिळाल्यामुळें बुचकळ्यांत पडतात. आपल्याला जें अनिष्ट वाटतें, तें दुसऱ्या संबंधानेंहि कधीं मनांत आणूं नये, हाच खरा धर्म होय. पण वास-नांच्या मागें लागून मनुष्य भलत्याच मार्गानें जातो. कोणाला नाहीं म्हणून सांगणें किंवा देणें, सुख किंवा दुःख प्रिय किंवा अप्रिय या विषयींचें रहस्य मनु-ष्याला स्वतःच्या उदाहरणावरून चांगलें समजतें. मनुष्य जसा इतरांशीं वागतो तसे तेहि त्याच्याशीं वागतात. जगांत हा नियम लक्षांत ठेवून तूं वागत जा. याप्रमाणें धर्माचें स्वरूप चांगल्या रीतीनें सांगितलें आहे.

वैशंपायन म्हणतो, जनमेजय राजा, धर्मराज युधिष्ठिराला असा उपदेश करून देवगुरु बृहस्पति स्वर्गीं निघून गेला. १३. १. ११३.

---

## अध्याय ११४ वा.

[ १. अहिंसेचें महत्त्व; मांसवर्जनाचें फळ. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—ऋषि, ब्राह्मण व देव वेदांत सांगितल्यावरून अहिंसात्मक धर्माची प्रशंसा करतात. तेव्हां मनुष्य कर्मानें, वाचेनें व मनानें जी हिंसा करतो, तिच्या दुःखकारक परिणामांतून तो कसा बरें मुक्त होईल ?

**भीष्म**:—युधिष्ठिरा, ब्रह्मवाद्यांनीं अहिंसा चार प्रकारची सांगितली आहे. मनानें, वाचेनें, कर्मानें व भक्षणानें यांपैकीं कोणत्याहि एका प्रकारानें जरी ती मोडली, तरी मोडलीच. ज्याप्रमाणें एखादा चतुष्पाद पशु तीनच पायांनीं चालूं शकत नाहीं, तशीच अहिंसासुद्धां केवळ तीन पायांवर उभी राहूं शकत नाहीं. निरनिराळया चालणारांच्या अनेक पावलांना जसें हत्तीचें एकच पाऊल झांकून टाकतें, त्याप्रमाणें जगांत अहिंसेमध्यें सर्व धर्म झांकून जातात. मनुष्य दोषी होतो, तो कर्माप्रमाणेंच वाचेनें व मनानेंहि होतो. म्हणून प्रथम हिंसेचा त्याग मनानें, नंतर वाचेनें आणि मग कर्मानें केल्यास चवथा भक्षणाचा प्रकार आपोआपच थांबेल व मनुष्य सर्व हिंसांपासून मुक्त होईल. मन, वाचा व गोडी या तीन कारणांमुळें हिंसादोष उत्पन्न होतो, म्हणून तपस्वी लोक मांस भक्षीत नाहींत. राजा, आतां मांसभक्षणांत दोष काय आहेत तें सांगतों, ऐक. मांसभक्षणाचे दोष जाणूनहि जो तें मोहानें खातो तो पुरुष अधम होय. मातापित्यांच्या संयोगानें जशी पुत्राची उत्पत्ति होते, त्याप्रमाणें हिंसेशीं संबंध घडल्यास पापाची उत्पत्ति झालीच म्हणून समजावें व त्याचें फळ पापयोनींत जन्म मिळणें हें होय. जिभेला मांसाची चव माहीत झाली म्हणजे तिचा परिणाम मांसाची आवड उत्पन्न होण्यांत होतो. मग तें मांस असंस्कृत असो कीं सुसंस्कृत असो, शिजविलेलें असो वा नसो, त्यांत मीठ असो किंवा नसो, त्यावर मन बसतें. मांस खाणाऱ्या मूर्खांना स्वर्गांतील भेरी, मृदंग, वीणा, इत्यादिकांचे मधुर ध्वनि कसे ऐकावयास सांपडतील बरें? मांसाची चटक लागलेले लोक त्याची वाखाणणी करून त्याची गोडी सांगतां न येण्यासारखी कल्पनातीत अशी आहे असें म्हणतात. पण मांसाची प्रशंसा सुद्धां दोषयुक्तच आहे. अनेक सज्जनांनीं आपलें मांस देऊन इतरांचे प्राण वांचविले आहेत व तेणेंकरून स्वर्गप्राप्ति करून घेतली आहे. राजा, या प्रमाणें चार लक्षणांनीं युक्त अशी अहिंसा तुला सांगितली. तींत सर्व धर्मांचा अंतर्भाव होतो. १३.१.११४.

---

## अध्याय ११५ वा.

[ १. मांसभक्षणनिषेध. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—आजोबा, अहिंसा हा श्रेष्ठ धर्म होय असें तुम्हीं अने
वेळां सांगितलें. पण श्राद्धवर्णनांत तर पितरांना मांस पाहिजे असेंहि सांगित
आहे. अनेक प्रकारच्या मांसांनीं श्राद्धविधि करावा असें तुम्हीं सांगितलें; परंतु हत्
केल्यावांचून मांस मिळणार तरी कसें ? तेव्हां तुमचें म्हणणें परस्परविरोधी दिसत
मांस वर्ज्य करणाऱ्या धर्माविषयीं मला संशय उत्पन्न झाला आहे. तरी,
भक्षिल्यानें दोष काय, न भक्षिल्यानें पुण्य काय, स्वतः प्राणिहत्या करून मां
खाल्ल्यानें काय होतें व दुसऱ्याकडून घेऊन खाल्ल्यानें काय होतें, जो दुसऱ्य
साठीं हत्या करतो त्याला दोष कोणता व मांस विकत घेऊन खाईल त्या
कोणता हें सर्व मला यथायुक्त समजून घेण्याची इच्छा आहे. मनुष्य दीर्घा
बलवान् आणि सर्व अवयव व सुलक्षणें यांनीं परिपूर्ण कशानें होतो ?

**भीष्म**:—युधिष्ठिरा, मांसभक्षण न केल्यानें काय पुण्य लागतें तें मीं तु
यथास्थित सांगतों, ऐकून घे. ज्यांना सुस्वरूप, अव्यंगपणा, दीर्घायुष्य, सामर्थ्
स्मरणशक्ति, हीं पाहिजे असत, त्या महात्म्या पुरुषांनीं हिंसा वर्जिली होती
राजा, याविषयीं ऋषींमध्यें बहुतांशीं एकमत आहे. त्यांचीं मतें ऐक. दीक्ष
घेऊन प्रति महिन्यांत अश्वमेध करणें आणि मद्य व मांस सोडणें हीं सारख्या
योग्यतेचीं आहेत. सप्तर्षि आणि बालखिल्य या ज्ञात्यांनीं मांसवर्जनच प्रशंसि
आहे. स्वायंभुव मनु म्हणतो कीं, जो कोणी प्राणिवध करीत नाहीं, करवीत
नाहीं आणि मांस खात नाहीं तो प्राणिमात्राचा मित्र होय. मांस वर्जिणार
कोणालाहि हार जात नाहीं, सर्व प्राणी त्याला विश्वसतात आणि तो सज्जनांन
मान्य होतो. आपलें शरीर इतरांच्या मांसानें पुष्ट करूं इच्छिणारा कष्ट पावत
असें धर्मज्ञ नारदाचें म्हणणें आहे. मधु व मांस यांपासून निवृत्त होणाराल
दान, यजन व तपश्चर्या यांचें श्रेय मिळतें असें बृहस्पति म्हणतो. मांसभक्षणापासू
निवृत्त होणाराला जें फळ मिळतें तें फळ सर्व वेदांचें अध्ययन किंवा अने
यज्ञ यांनींहि मिळत नाहीं. मांसाची एकदां चटक लागल्यास तें सोडणें फार कठि
असतें, म्हणून सर्व प्राण्यांना अभय देणारें मांसवर्जन हें व्रत श्रेष्ठ होय. प्राण्यांन
अभय देणारा त्यांना खरोखर प्राणदानच करतो. म्हणून सुज्ञांनीं अभयदानाला
श्रेष्ठ धर्म म्हटलें आहे. प्राण हे आपल्याला जसे प्रिय आहेत, तसे ते इतर प्राण्या

नाहि आहेत. यास्तव बुद्धिमान माणसांनीं स्वतःवरूनच विचार करावा. कल्याणेच्छु ज्ञान्यांनाहि मृत्यूचें भय वाटतें, मग जीव हवासा वाटणाऱ्या प्राण्यांना मांसाहाऱ्यांकडून मारिलें जात असतां तें कां वाटणार नाहीं? ते प्राणी तर निरोगी व निष्पाप असतात. म्हणून, महाराज, मांसवर्जन हें धर्म, स्वर्ग व सुख यांचें खरें माहेरघर होय. अहिंसाच श्रेष्ठ धर्म असून तप व सत्य तीच होय. तिच्यापासूनच धर्माचा आरंभ होतो. मांस हें कांहीं गवत, लांकडें, दगड यांपासून मिळत नाहीं. प्राणी मारल्यानेंच तें मिळणार. म्हणूनच तें खाण्यांत दोष घडतो. स्वाहा, स्वधा आणि अमृत हीं भक्षिणाऱ्या देवांना सत्य व सरळपण आवडतात, पण मांसभक्षक राक्षसांना कपट व सत्य हींच प्रिय असतात. भयंकर अरण्यांत किंवा बिकट ठिकाणीं, रात्रीं, दिवसा, संधिकालीं चव्हाट्यावर, सभांमध्यें, कोणीं शस्त्र उपसलें असतां, व दुष्ट अशा सर्पादि प्राण्यांपासूनहि मांसभक्षण वर्ज्य केलेल्या मनुष्याला भीति नसते. तो सर्व प्राण्यांचा आधार असून सर्व त्याच्यावर विश्वास टाकतात, तसाच तो कोणाला उद्वेग देत नाहीं व कोणापासून उद्वेग पावतहि नाहीं. मांस खाणाराच जर कोणी नसेल, तर प्राणिवध तरी कोण करील? वधिक तरी मांस खाणारासाठींच प्राणिवध करतो. मांस हें अभक्ष्य आहे असें एकदां ठरविलें म्हणजे हिंसा नाहींशी झालीच; कारण हरिणादिकांची हिंसा होते, ती मांसभक्षकांसाठींच होते. राजा, वधिकांचें आयुष्य नित्य क्षीण होत असतें, म्हणून उत्कर्षेच्छूनें मांस वर्ज्यच केलें पाहिजे. दुष्ट अशा प्राणिहिंसकास तारणारे कोणी भेटत नाहींत. ते सर्वांना सर्पादि दुष्टप्राण्यांप्रमाणें भीतिच उत्पन्न करतात. माणसाला अधर्माची चटक लागते ती लोभानें, मोहानें, बल दाखविण्याच्या इच्छेनें, किंवा पापीलोकांच्या संगतीनें लागते. परमांसावर पुष्ट होणारा ज्या ज्या योनींत जन्मेल तेथें तेथें भीतीनेंच काळ काढील. यासाठीं ऋषिश्रेष्ठांनीं मांसवर्जनाला कल्याणप्रद, यशस्कर, आयुष्यवर्धक, स्वर्गदायक, हितकारी म्हटलें आहे.

युधिष्ठिरा, मांसभक्षणांत काय पाप आहे तें मीं मार्कंडेयाच्या तोंडूनहि पूर्वीं ऐकिलें आहे. जगूं इच्छिणाऱ्या प्राण्यांचें मांस त्यांना मारून किंवा विकत घेऊन जो खातो, तो मारणाऱ्या इतकाच दोषी होय. मांस घेणारा द्रव्यानें प्राणिवध करतो, मांसभक्षक तो उपभोगानें करतो, तर वधिक प्रत्यक्ष प्राण्याला बांधून शस्त्रानें करतो. असा वध त्रिविध आहे. मांस स्वतः न खातांहि जो त्यास अनुमोदन देतो, तोहि वधाच्या दोषाचा वांटेकरी होतो. मांसवर्जन कर-

णारा दीर्घायुषी व निरोगी होतो. सुवर्णदान, भूमिदान, गोदान या सर्वांच्या फळांहून मांसवर्जनाचें फळ अधिक आहे असें आम्हीं ऐकिलें आहे. प्रोक्षण न केलेलें व अयज्ञिय असें मांस खाणारा मनुष्य निःसंशय नरकास जातो. यज्ञप्रसंगीं प्रोक्षण केलेलें किंवा ब्राह्मणासाठीं विधियुक्त सिद्ध केलेलें मांस खाणें फारसें दोषावह नाहीं, पण स्वैर मांसभक्षण हें फार पापदायक होय. खाणाऱ्यासाठीं प्राण्यांना मारणारा हा फारच दोषी आहे, तितका खाणाराहि नाहीं. श्रुतींत सांगितलेले यज्ञादि मार्ग माहीत नसतां जो हावरेपणानें मांसासाठीं पशुवध करतो तो मनुष्य नरकाचा वाटेकरी होतो. एकदां मांस भक्षण केल्यावर पश्चात्तापानें जो तें सोडून देतो, त्याच्या हातून त्या पापनिवृत्तीमुळें धर्मच घडतो. मांस आणणारा, खाणारा, पशूला मारणारा, मारण्यास अनुमोदन देणारा, मांस विकणारा, व शिजविणारा हे सारे सारखेच दोषी होत. या विषयीं ऋषींनीं पूर्वी सांगितलेलें व श्रुतींत आढळणारें असें दुसरेंहि प्रमाण तुला आतां सांगतों.

मांसभक्षणविधिरूप प्रवृत्तिलक्षण धर्म संततीची इच्छा करणारांसाठीं यज्ञादिकांतच सांगितला असून मोक्षेच्छूसाठीं नव्हे. त्यांत वेदमंत्रांनीं सुसंस्कृत, केलेलें जें मांस तेंच शुद्ध मानिलें आहे. इतर सर्व प्रकारचें मांस अभक्ष्य होय, असें मनु म्हणतो. मांसभक्षण राक्षसी व अकीर्तिकर असल्यामुळें यज्ञावांचून इतरत्र कोठें करूं नये. आपल्याला उपद्रव न व्हावा असें ज्याला वाटतें त्यानें मांसभक्षण सर्वथा वर्ज्य करावें.

पूर्वयुगांत पुण्यलोकांची इच्छा करणारे यजमान भाताचा पशु करून यज्ञ करीत, असें म्हणतात. याविषयीं ऋषींना संशय आल्यामुळें त्यांनीं चेदिराज वसूला प्रश्न केला, तेव्हां मांस अभक्ष्य असतांहि तें भक्ष्य होय असें त्यानें उत्तर दिल्यामुळें त्याला स्वर्गांतून पुनः पृथ्वीवर यावें लागलें व पुनः त्यानें तसेंच म्हटल्यामुळें त्याला आणखी पृथ्वींत प्रवेश करावा लागला. प्रजाहिताच्या बुद्धीनें महात्म्या अगस्त्यानें ज्यांत सर्व देव आहेत अशा वनपशूंना तपानें प्रोक्षून ठेविलें; त्यामुळें पितृ व देव यांसंबंधाचीं कर्में मांसानें केल्यास दोषयुक्त होत नाहींत. योग्य विधीनें मांस अर्पण केल्यास पितर संतुष्ट होतात. राजा, आतां आणखी सांगतों तें ऐक. मांस मुळींच न खाणें हेंच सर्वस्वी सुखाचें आहे. शंभर वर्षें घोर तप केल्यानें जें कार्य होतें तेंच मांसवर्जनानें होतें, असें माझें मत आहे. कार्तिकाच्या शुक्लपक्षांत धर्म करावयाचा असल्यामुळें त्यावेळीं विशेषतः मद्य आणि मांस वर्जावीं. पावसाचे चार महिने मांस वर्जिल्यास चार

प्रकारचें हित होतें; म्हणजे मनुष्याला कीर्ति, आयुष्य, जय व सामर्थ्य हीं मिळतात. फार काय पण एक महिना जरी मांस सर्वस्वीं सोडिलें, तरी सर्व दुःखांतून मुक्त होऊन आरोग्यवान बनेल. जे महिना महिना किंवा एकेक पक्षहि मांस सोडतात, त्या हिंसानिवृत्त मनुष्यांना ब्रह्मलोक मिळतो. युधिष्ठिरा, कार्तिकाच्या शुद्धपक्षांत अनेक राजांनीं सर्व प्राण्यांशीं तादात्म्य पावल्यामुळें व अत्यंत श्रेयस्कर काय याचें ज्ञान झाल्यामुळें मांस वर्जिलेलें आढळतें. नाभाग, अंबरीष, महात्मा गय, आयु, अनरण्य, दिलीप, रघु, पूरु, कार्तवीर्य, अनिरुद्ध, नहुष, ययाति, नृग, विष्वगश्व, शशबिन्दु, युवनाश्व, शिबि, औशीनर, मुचकुंद, मान्धाता, हरिश्चंद्र इत्यादि राजे त्यांपैकीं होत. खरें बोलावें, खोटें बोलूं नये. सत्य हा सनातनी धर्म होय. हरिश्चंद्र आकाशांत चंद्राप्रमाणें झळकतो आहे, तो सत्यामुळेंच. युधिष्ठिरा, श्वेतचित्र, सोमक, वृक, रैवत, रंतिदेव, वसु, संजय, तसेच दुसरे कृप, भरत, दुष्यन्त, करूष, राम, अलर्क, विरूपाश्व, निमि, जनक, पुरूरवा, पृथु, वीरसेन, इक्ष्वाकु, शम्भु, श्वेत, सगर, अज, धुन्धु, सुबाहु, हर्यश्व, क्षुप, इत्यादि राजांनींहि कार्तिक शुक्लपक्षांत मांस खाल्लें नाहीं व त्यामुळें ते स्वर्गास गेले व तेथें ब्रह्मलोकीं सहस्रावधि गंधर्व आणि अप्सरा तेजानें झळकणाऱ्या त्यांची सेवा करीत आहेत. म्हणून अत्यंत श्रेष्ठ असा हा अहिंसाधर्म जे आचरतात, ते स्वर्गांत जातात. जे धर्मशील पुरुष जन्मापासून मध, मांस व मद्य वर्ज्य करतात, त्यांना मुनिच म्हटलें आहे. मांसनिषेधक असा धर्म जो जो ऐकेल व दुसऱ्याला सांगेल, तो दुराचारी असला तरी खचित नरकांत जाणार नाहीं. हा मांसनिषेध पवित्र असून ऋषींना मान्य आहे. जो कोणी तो वारंवार वाचील किंवा ऐकेल तो सर्व पापांतून सुटेल, त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतील व त्याला ज्ञातींत वर्चस्व मिळेल. संकटग्रस्त असेल तो याच्या पठनानें मुक्त होईल, बंधांत सांपडलेला त्यांतून सुटेल, रोगी रोगविमुक्त होईल, व दुःखिताचें दुःख नाहींसें होईल. या धर्माचें वाचन करणारा सुस्वरूपी होऊन त्याला नीचयोनींत जावें लागणार नाहीं. तो विपुल संपत्तिमान् व जयशाली होईल. राजा, याप्रमाणें मांसभक्षणाचे दोष व मांसवर्जनाचे गुण ऋषींनीं सांगितल्याप्रमाणें तुला मीं सांगितले. १३. १. ११५.

## अध्याय ११६ वा.

[ १ अहिंसेच्या फलाचें वर्णन. ]

( १ ) **युधिष्ठिर** :—आजोबा, मांसाला हपापलेले दुष्ट मनुष्य वडे, घारगे, निरनिराळ्या भाज्या, खांडवी, रस, इत्यादि भक्ष्यपदार्थ सोडून मोठ्या राक्षसांप्रमाणें मांसावर तुटून पडतात; तेव्हां माझ्या बुद्धीला असा घोंटाळा पडतो कीं, चवीच्या दृष्टीनें मांसाहून चांगला पदार्थ आहे कीं नाहीं. म्हणून मांस न खाण्यांत विशेष काय आहे, व खाल्ल्यानेंहि वाईट काय होतें हें मला नीट समजावयास पाहिजे. तेव्हां भक्ष्य काय आणि अभक्ष्य काय हें सारें मला यथायोग्य रीतीनें सांगा.

**भीष्म** :—युधिष्ठिरा, तूं म्हणतोस तें खरें आहे. मांसाहून चवीनें अधिक चांगलें कांहीं नाहीं. क्षत झालेल्या, क्षीण किंवा संतप्त अशा माणसांना, अतिस्त्रीसंग करणारांना व पुष्कळ चालून थकलेल्यांना मांसापेक्षां चांगलें खाणेंच नाहीं. मांसानें तत्काळ शक्ति वाढते व मनुष्य पुष्ट होतो. यास्तव मांसाहून अधिक पुष्टिकारक खाद्य कांहीं नाहीं. तथापि मांसवर्जनांतहि अनेक गुण आहेत, ते मीं तुला सांगतों, ऐक. दुसऱ्यांच्या मांसानें स्वतःला पुष्ट करूं पहाणाऱ्या क्षुद्र माणसाला अत्यंत दुष्ट मानतात. प्राणाहून प्रिय असें जगांत दुसरें कांहीं नाहीं; म्हणून मनुष्यानें स्वतःवर प्रेम करतों तसेंच दुसऱ्यांवरहि प्रेम करावें. मांसाची उत्पत्ति मूळ शुक्रधातूपासूनच असल्यामुळें मांसभक्षणांत मोठा दोष असून तें वर्जिल्यास पुण्य घडतें. वेदविहित मार्गानें मांस खाल्ल्यास दोष नाहीं; कारण यज्ञासाठीं पशूंना उत्पन्न केल्याचें वेदांत सांगितलें आहे. पण त्याहून निराळ्या पद्धतीनें वागणें म्हणजे मात्र राक्षसी वर्तन होय. आतां क्षत्रियांना जो विधि सांगितला आहे, तो ऐक. त्यानें आपल्या पराक्रमावर मिळविलेलें मांस खाल्ल्यानें त्याला दोष लागत नाहीं. सर्व देवतात्मक अशा वन्य पशूंना अगस्त्यानें प्रोक्षून पूर्वीं पवित्र केलें, त्यामुळें मृगया ही धर्ममान्य झालेली आहे. स्वतःचा जीव धोक्यांत घातल्यावांचून मृगया शक्यच नाहीं. पशूंशीं समता करावी तेव्हांच ती शक्य होते; म्हणजे ती करतांना स्वतः मरावें लागेल किंवा पशूला मारण्यांत येईल. असें असल्यामुळें राजे लोक मृगयेसाठीं वनांत जातात, त्यांत त्यांना पाप घडत नाहीं व मृगयेला पाप म्हणतहि नाहींत. तथापि सर्व भूतांविषयीं दयाबुद्धि ठेवणें यासारखी दुसरी चांगली गोष्ट नाहीं.

दयाळु मनुष्याचें कोणाला भयच नसतें. दयाळु लोकांना इहलोक व परलोक अशा दोघांची प्राप्ति होते. धर्म म्हणजे अहिंसा असें धर्मवेत्ते म्हणतात. म्हणून आत्मज्ञानी पुरुषानें जें कर्म अहिंसात्मक असेल तेंच करावें. पितृकर्म, देवकर्म व यज्ञ यांत प्रोक्षित मांसाला हविर्द्रव्य म्हणतात. जो सर्व प्राण्यांना अभय देतो, त्याला ते सर्व प्राणीहि अभय देतात, असें आम्हीं ऐकिलें आहे. अशा मनुष्याला क्षत पडलें, तो अडखळून पडला, त्याला कोणी ओढलें किंवा मारलें, तर त्या संकटांत सर्व प्राणी त्याला राखतात. त्याला राक्षस, सर्प, पशु, पिशाच इत्यादि कोणी मारीत नाहींत. जो इतरांना भयांतून सोडवितो, त्याला तेहि भयापासून सोडवितात. प्राणदानाहून मोठें दान पूर्वी झालें नाहीं व पुढें होणार नाहीं. स्वतःहून प्रिय दुसरें कांहीं नाहीं, म्हणून प्राणिमात्राला मरण हें अनिष्ट वाटतें व मृत्युसमयीं त्याचा थरकांप उडतो. या संसारसागरांत गर्भवास, जन्म, वृद्धपणा, दुःखें यांच्या फेऱ्यांत सांपडून प्राणी उद्विग्न होतात. गर्भवासांत त्यांना मूत्र, पुरीष, घाम यांच्या भयंकर व कठोर अशा खारट, आंबट व तिखट रसांत खितपत पडावें लागतें. नंतर जन्मल्यावर अगतिक होऊन ते कापले जातात. मांसाला हपापलेल्या मनुष्यांची अशीच स्थिति होते. निरनिराळ्या योनींत त्यांना जावें लागतें व कुंभीपाक नरकांत उकडून निघावें लागतें. त्यांच्यावर घाला घालून त्यांना मारण्यांत येऊं लागलें म्हणजे ते पुनः पुनः इकडे तिकडे भ्रमण करतात. सारी पृथ्वी धुंडाळली तरी आपल्या स्वतःइतकें प्रिय कांहीं आढळणार नाहीं. यास्तव सर्व प्राण्यांवर दया करावी. राजा, जो कोणी यावज्जीव केव्हांहि मांस खाणार नाहीं, त्याला स्वर्गांत उत्तम स्थान मिळतें. जे प्राण्यांचें मांस खातात त्यांचें मांसहि ते प्राणी खातात. मां म्हणजे मला सः म्हणजे तो ज्या अर्थी खातो, त्याअर्थी मींहि त्याला खाईन असें प्राणी म्हणतात. मांस शब्दाची अशी व्युत्पत्ति आहे. अशा रीतीनें मारणारा व खाणारा असे दोघेहि वध पावतात. ज्या शरीरानें जें कर्म करावें त्याचें फल त्या शरीरानें भोगावें लागतें. एवंच अहिंसा हा श्रेष्ठ धर्म असून अहिंसा हेंच उत्तम इंद्रियदमन होय. अहिंसा हेंच मोठें दान व तेंच मोठें तपहि होय. श्रेष्ठ यज्ञ, उत्तम पुण्य, मोठा मित्र, उत्तम सुख हीं अहिंसेचींच स्वरूपें होत. सर्व यज्ञांत दान केलें, सर्व तीर्थांत स्नान केलें, तरी त्याला अहिंसेची सर येणार नाहीं. अहिंसक नित्य तपच करतो, त्याच्या हातून नित्य यज्ञ घडतो व तो सर्वांना आईबापासारखा असतो.

युधिष्ठिरा, या प्रमाणें अहिंसेचें फळ आणखीहि तुला सांगितलें. त्याचें साग्रगुण-वर्णन करावयाचें तर शंभर वर्षेंहि पुरणार नाहींत. १३.१.११६.

---

## अध्याय ११७ वा.

[ १. प्राणिमात्राला जगण्याची इच्छा कां असते; व्यास व कीटक यांमधील संवाद. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—हे पितामहा, इच्छा असतां किंवा नसतां जे महायुद्धांत मरण पावतात, त्यांना कोणती गति मिळते, ती मला सांगा. महायुद्धांतहि प्राणत्याग करणें मनुष्याला कष्टाचें असतें. प्राणत्याग फार कठीण आहे हें तुम्हीं जाणतांच. मनुष्य ऐश्वर्यांत असो वा दारिद्र्यांत असो, चांगल्या किंवा वाईट स्थितींत असो, त्याला प्राणत्याग कष्टावह वाटतो, त्याचें कारण काय तें मला सांगा.

**भीष्म**:—राजा, या जगांत आलेले प्राणी ऐश्वर्यांत असोत कीं दारिद्र्यांत असोत, चांगल्या स्थितींत असोत कीं वाइट स्थितींत असोत, जगण्याची इच्छा त्यांना बलवत्तर असते, याचें कारण ऐक. हा प्रश्न तूं फार मार्मिक विचारलास. याविषयीं पूर्वी झालेला व्यास व किडा यांमधील संवाद तुला सांगतों. कृष्णद्वैपायन व्यास ब्रह्मस्वरूप होऊन फिरत असतां गाडीच्या वाटेवरून भरभर धांवत जाणारा एक किडा त्यानें पाहिला. व्यासाला सर्वांची गति व भाषा अवगत असल्यामुळें किड्याला पाहून त्याला तो म्हणाला, 'कायरे कीटा, तूं अगदीं घाबरून भरभर पळत आहेस, तूं पळणार कोठें आणि तुला भय तरी कसलें वाटतें?' किड्यानें उत्तर दिलें, 'या गाडीचा मोठा शब्द ऐकून मला भय वाटतें. हा शब्द खरोखर भयंकर आहे. मला तो ऐकवत नाहीं. मला तो मारील असें वाटतें, म्हणून मीं दूर पळत आहें. चाबकाचे फटके बसत असल्यामुळें लांब सुस्कारे टाकणाऱ्या ह्या ओझ्याच्या बैलांचा शब्द मीं ऐकत आहें, तसा गाडी नेणाऱ्या माणसांचाहि शब्द मला ऐकूं येत आहे. आमच्यासारख्या कीटकाला तो ऐकणेंहि शक्य नाहीं. म्हणून त्या भयंकर शब्दापासून मीं दूर जात आहें. मरण हें प्राण्यांना कष्टावह असून जगणेंहि फार कठीण आहे. म्हणून भीतीनें मी पळत आहें. मी सुखांतून दुःखांत जात नाहीं.' हें भाषण ऐकून व्यास म्हणाला, 'बा किड्या, कसलें रे तुला दुःख वाटतें? या नीच योनींत तूं असल्यामुळें तुला मरण आलें तर सुखाचें होईल असें मला वाटतें. शब्द, स्पर्श, रस, गन्ध, इत्यादि अनेक

लहान मोठे भोग तुला समजणें शक्य नसल्यामुळें मरणच तुला सुखाचें आहे.' किड्यानें उत्तर केलें, 'जीवाला कोणत्याहि स्थितींत आनंदाचें स्थान असतेंच; मलाहि या स्थितींत सुख वाटतें, म्हणून मला जगण्याची इच्छा आहे. माझ्या देहाला अनुरूप असे उपभोगाचे विषय या योनींतहि आहेतच. मनुष्यें व स्थावर भूतें यांचे उपभोगविषय अगदीं पृथक् आहेत. महाराज, मीं मागील जन्मीं मनुष्ययोनींत धनवान् शूद्र होतों. मीं दुष्ट, कद्रु, व्याज उकळून जगणारा असून ब्राह्मणांना कधींच आदर दाखविला नाहीं. दुसऱ्यांना कठोर शब्द बोलावे, उपद्रव द्यावा, व सर्वांचा द्वेष करावा अशी माझी वृत्ति होती व खऱ्याखोट्या कोणत्याहि मार्गानें मीं दुसऱ्यांचें द्रव्य उकळण्यांत गढलेला असें. सेवक, अतिथि, इत्यादिकांना न देतां मींच आधीं खात असें. गोडगोड खाण्याच्या इच्छेनें मीं दुष्टपणें त्यांचा मत्सर करीं. देव, पितर, यांच्या प्रीत्यर्थ द्यावयाचें अन्न मीं श्रद्धापूर्वक कधीं दिलें नाहीं. द्रव्य सांठविण्याची मला हांव असे. भयानें आश्रयास येऊन गुप्त राहूं इच्छिणाऱ्यांना मीं थारा न देतां घालवून देईं. इतरांचीं धन–धान्य, स्त्रिया, वाहनें, वस्त्रें व संपत्ति पाहून मीं निष्कारण त्यांचा द्वेष करीं. दुसऱ्याच्या सुखानें मला राग येई व त्यांचा उत्कर्ष मला सहन होत नसे. माझ्या इच्छापूर्तीसाठीं इतरांच्या धर्मादि पुरुषार्थांचाहि मीं नाश करीं. असें अत्यंत दुष्टपणाचें कर्म मीं पूर्वी केलें. तें आठवलें म्हणजे प्रिय पुत्राच्या वियोगाइतकें दुःख मला होतें. शुभकर्म केल्याचें फळच मला समजत नाहींसें झालें आहे. पण वृद्ध मातेला मीं मान देईं आणि एकदां घरीं आलेल्या गुणवान् व कुलीन ब्राह्मणाचा मीं सत्कार केला, त्यामुळें माझी स्मृति मात्र मला सोडून गेली नाहीं. शुभ कर्मानें पुनः सुखाचे दिवस येतील असें मला दिसतें. तरी, हे तपोधना, माझें तें कल्याण कसें होणार आहे हें मीं तुझ्या तोंडून ऐकूं इच्छितों. १३.१. ११७.

---

## अध्याय ११८ वा.

[ १. व्यास व कीट यांमधील संवाद पुढें चालू ]

( १ ) **व्यास**:—'किड्या, नीचयोनींत असतांहि पूर्वीच्या शुभ कर्मांमुळें तूं मूढ झाला नाहींस, हा माझ्याच खटपटीचा परिणाम होय. मीं तुला आतां आपल्या तपाच्या बळावर केवळ दर्शनानेंच उद्धरतों पहा. कारण तपोबलाहून

अधिक बलवान् दुसरें नाहीं. तूं आपल्या पापकर्मांमुळेंच कीटयोनींत गेलास हें मला माहीत आहे. अजून तूं धर्माला मानशील तर पुनः धर्म तुला प्राप्त होईल. या कर्मभूमींत केलेल्या कर्मांचें फल देवरूपानें तसेंच नीच प्राण्यांच्या रूपानें भोगावें लागतें. कारण मनुष्यें धर्म करतात तो कांहीं इच्छेनेंच करतात व तदनुसार त्यांना फळहि मिळतें. ज्याची वाचा, बुद्धि, हात, पाय इत्यादि नष्ट झालीं, तो मनुष्य जगला तरी त्याजवळ उरलें तें काय? ब्राह्मण जगला तर तो तोंडानें बोलून तरी चंद्रसूर्यांची पूजा करील. किड्या, तसल्या ब्राह्मणाच्या योनींत तूं जन्मशील व तेथें महाभूतांनीं बनलेल्या वस्तूंचा उपभोग घेशील. तुला मीं तेथें नेईन, अथवा दुसऱ्या कोठें म्हणशील तेथें नेईन.'

व्यासाचें बोलणें ऐकून कीडा 'ठीक आहे' असें म्हणाला व गाडीच्या वाटेंतच राहिला. मग ती मोठी गाडी तेथें आली असतां तिच्या चाकाखालीं सांपडून तो चुरडून मरून गेला. नंतर तो व्यासाच्या कृपेनें क्षत्रियकुलांत जन्मास आला व नंतर साळ, गोधा, डुकर, हरिण, पक्षी, चंडाळ, शूद्र, वैश्य या क्रमानें जाऊन पुनः क्षत्रिय म्हणून जन्मला. त्या सर्व योनींत व्यासाला तो भेटावयास येई. शेवटीं पूर्वींची आठवण राहिल्यामुळें तो व्यासाला हात जोडून म्हणाला, 'मुने, दहा गुणामुळें सर्वांना हवेसें वाटणाऱ्या या अतुल क्षत्रियकुलांत मुळांत किडा असतांहि मी जन्मास आलों; सुवर्णालंकारांनीं मढलेले बलिष्ठ हत्ती मला पाठीवर बसवून सांगेन तिकडे नेत आहेत; माझ्या रथांना कांबोज देशांतील सुंदर घोडे जुंपलेले असतात. उंटें, खेचरें, इत्यादि जोडलेल्या रथांतूनहि मीं फिरतों. मीं आपले बांधव व अमात्य यांसह चमचमीत मांसाचें भोजन करतों. स्वतःच्या घरांत मूल्यवान् सुखकर पलंगावर आनंदानें शयन करतों. महेन्द्राची स्वर्गांत जशी देव स्तुति गातात, तशी पहाटेच्या प्रहरीं सूत, मागध बंदी हे माझी स्तुति गातात. मुने, अतुल तेजस्वी व सत्यप्रतिज्ञ अशा तुझ्या कृपेनें मीं किड्याच्या जातींतून राजपुत्रापर्यंत चढलों. हे महाज्ञानी मुने, तुला माझा नमस्कार असो. मीं आतां काय करावें त्याचा मला उपदेश कर. मला जें कांहीं प्राप्त झालें तें तुझ्या तपाच्या बलानेंच होय.'

**व्यास**:—राजा, तूं माझी शब्दांनीं पूजा केलीस. तुला किड्याची योनि आल्यामुळें तुझी स्मृति निन्द्य झाली होती. तूं प्रथम शुद्र असतांना द्रव्यलोभानें दुष्टपणें बेफाम होऊन जें पाप केलें, त्याचा नाश होणें शक्य नव्हतें. पण माझें दर्शन तुला घडलें, हें त्या नीचयोनींत तुझ्या हिताचें झालें. त्यानंतर तूं माझा

सत्कार करीत गेल्यामुळें यापुढेंहि गोब्राह्मणासाठीं रणांगणांत प्राण अर्पण केल्यावर तूं क्षत्रियत्वापासून सुटून ब्राह्मणत्वाला पोंचशील. राजा, तूं सुखी होऊन भरपूर दक्षिणायुक्त यज्ञ करशील व स्वर्गलोकीं ब्रह्मस्वरूप होऊन अक्षय आनंद पावशील. उत्तम प्रकारचें वर्तन ठेवल्यास नीचयोनींतून प्राणी शूद्रत्वास पोंचतो. शूद्राचा वैश्य होतो. वैश्याचा क्षत्रिय होतो, तसाच सद्वर्तनी क्षत्रिय ब्राह्मणत्व पावतो व सदाचारी ब्राह्मणाला पुण्यकारक असा स्वर्ग मिळतो. १३.१. ११८.

---

## अध्याय ११९ वा.

[ १. कीटाची कथा पुढें चालू ]

( १ ) भीष्म—युधिष्ठिरा, याप्रमाणें क्षत्रियजन्माला आलेल्या पण पूर्वी किडा असलेल्या त्यानें मागील स्मरणामुळें सारा व्यवहार सोडला व पुष्कळ तपश्चर्या केली. धर्म आणि अर्थ यांचें ज्ञान झालेल्या त्याचें तें मोठें तप पाहून तो निश्रेष्ठ कृष्णद्वैपायन व्यास त्याच्याकडे आला आणि त्याला म्हणाला, 'हे किड्या, क्षत्रियव्रत, देवव्रत आणि प्रजांचें पालन यांचें ध्यान करीत असतां मग तुला ब्राह्मणत्व मिळेल. बरें काय, वाईट काय, हें लक्षांत घेऊन शुद्ध मनानें प्रजेचें पालन कर. शुभ इच्छा धर, अशुभ सोडून दे आणि स्वधर्माचरणांत आनंद मानून शुद्ध चित्त हो, म्हणजे ही क्षत्रिय तनु सोडल्यावर, तूं विप्र होशील. असें बोलून व्यास अरण्यांत निघून गेला. त्याचें वचन ऐकून त्या क्षत्रियानें प्रजापालन केलें. त्या धर्माच्या बळावर तो लवकरच मरून पुनः ब्राह्मण जन्मास आला. तेव्हां त्या ब्राह्मणाला पाहून महाज्ञानी व्यास तेथें आला आणि म्हणाला, 'हे ब्राह्मणश्रेष्ठा, तूं शुभयोनींत शुभकर्में केलीं व पापयोनींत पापकर्में केलीं; तदनुसार तुला यथोचित फळेंहि मिळालीं, तेव्हां आतां तूं मृत्युभयानें कष्टी होऊं नको. दुःख करीत बसल्यानें व्यर्थ धर्मलोप मात्र होईल. तर आतां उत्तम धर्म आचर.' किड्यानें उत्तर केलें, 'हे भाग्यशालि मुने, तुझ्या कृपेनेंच मीं एका सुखांतून त्याच्या वरच्या सुखांत आलों. आतां धर्ममूलक संपत्ति प्राप्त झाल्यामुळें माझें पाप नष्ट झालें.'

युधिष्ठिरा, या प्रमाणें व्यासाच्या वचनानुसार त्या किड्याला दुर्लभ असें ब्राह्मण्य मिळाल्यामुळें त्यानें शेकडों यज्ञ करून पृथ्वीला यज्ञस्तंभांनीं सजवून सोडिलें आणि त्यामुळें ब्रह्मवेत्ता होऊन तो ब्रह्मदेवाच्या लोकीं गेला. त्याला

सनातन ब्रह्मपद प्राप्त झालें व सर्व कर्मांच्या फलापासून तो मुक्त झाला. युधिष्ठिरा, तुमच्या महायुद्धांत जे क्षत्रिय शौर्य दाखवून मारिले गेले, त्यांनाहि पवित्र लोकांची प्राप्ति झाली आहे. तरी तूं आतां खेद करूं नये. १३.१.११९.

---

## अध्याय १२० वा.

[ १. विद्या, तप आणि दान यांत श्रेष्ठ काय; व्यास-मैत्रेय संवाद.]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, विद्या, तप आणि दान यांत विशेष महत्त्व कशाला आहे, हें मीं आपल्याला विचारतों, तरी तें मला सांगा.

**भीष्मः**—युधिष्ठिरा, या विषयांवर कृष्णद्वैपायन व्यास आणि मैत्रेय यांचा प्राचीन संवाद आहे. एकदां व्यास गुप्त रूपानें फिरत असतां वाराणसी क्षेत्रांत मैत्रेय मुनीच्या घरीं गेला. त्याला आलेला पहातांच मैत्रेयानें त्याची पूजा करून त्याला उत्तम भोजन वाढिलें. तें उत्कृष्ट व तृप्तिदायक अन्न भक्षण केल्यानंतर व्यास परत जाऊं लागला, तेव्हां त्याला हंसूं आलें व आनंद झाला. त्याला आनंदानें हंसूं आलेलें पाहून मैत्रेय म्हणाला, ' व्यास मुने, तुम्हांला हंसूं कांहो आलें? तुम्हीं धैर्यशाली तपस्वी असतां तुम्हांला हर्ष कसला झाला हें मीं नम्रपणें विचारतों. माझें तपोभाग्य व तुमचें महाभाग्य असा पृथक् व्यवहार दिसत असला व मीं साधक तपस्वी आणि तुम्हीं सुखमय आत्मस्वरूपी असे असलों तथापि तुमचें आमचें कुळ एकच असल्यामुळें दोघांत तसें सांगण्यासारखें अंतर नाहींच.' मैत्रेयाचा प्रश्न ऐकून व्यास म्हणाला, ' वेदांत जो अतिच्छेद म्हणजे बारीक गोष्टींचाहि कीस काढलेला दिसून येतो व तदनुसार लोकांना गोष्टी सांगण्यांत येतात, त्याचें स्मरण होऊन मला हंसूं आलें. तो कीस काढलेला पाहून वेदांत कांहीं तरी असत्य सांगितलें आहे असें वाटतें, तर पुनः वाटतें कीं वेद असत्य काय म्हणून सांगेल? मनुष्याला वेदांत उत्तम व्रत म्हणून या तीनच गोष्टी सांगितल्या आहेत. कोणाचा द्वेष करूं नये, दान करावें आणि सत्य बोलावें. ऋषींना सांगितलेल्या या वेदवचनाप्रमाणें आपण आज वागणें इष्ट आहे. वेदविहित असें अगदीं अल्पहि दान महाफल देतें. प्रत्यक्षच पहा कीं, तूं स्वतः तहानेलेला असतांहि निर्मत्सरमनानें मला तहानेलेल्याला पाणी दिलेंस व त्यामुळें महायज्ञांनीं जे लोक प्राप्त व्हावयाचे ते तुला या जलदानानेंच झाले. या तुझ्या पवित्र दानानें व तपानें मीं संतुष्ट झालों आहें. तुझें शरीर

पुण्यवान झालें असून, तुझें दर्शन पुण्यकारक आहे व तुझ्या भोंवतीं तुझ्या सत्कर्मांला अनुसरून पुण्यसुगंधच पसरला आहे. हें फळ मोठें स्नान किंवा भस्मलेपन करण्यानें मिळणाऱ्या फळाहून किती मोठें आहे पहा. म्हणून, मैत्रेया, सर्व पवित्र कर्मांत दानच श्रेष्ठ व उत्तम होय. वेदांत सांगितलेलीं उत्तम कर्मे म्हणून जीं तूं प्रशंसितोस, त्यांत दानच सर्वश्रेष्ठ होय याविषयीं मला मुळींच संशय नाहीं. दान करणाऱ्यांनीं जो मार्ग घालून दिला, त्यानेंच सुज्ञ लोक जातात. ते दानशूर पुरुषच प्राणदाते असून त्यांच्यावरच धर्माची उभारणी झालेली आहे. सर्व वेदांचें यथोचित अध्ययन, इंद्रियदमन, आणि सर्व संगांचा त्याग, यांच्याप्रमाणेंच दानाचीहि योग्यता आहे. मैत्रेया, दानानें तुला उत्तम सुख मिळणार आहे, तसेंच इतर सुज्ञांनाहि त्यामुळें अधिकाधिक सुख मिळत जाईल. आपल्याला तर हें प्रत्यक्षच दिसतें आहे कीं श्रीमंत लोक द्रव्य प्राप्त झालें म्हणजे दान व यज्ञ करून पुढें पुनः सुखच भोगितात. पण सामान्य व्यवहारांत सुखानंतर दुःख व दुःखानंतर सुख अशीं स्वाभाविकपणें येत असतात. मनुष्याचें वर्तन तीन प्रकारचें असतें असें सुज्ञ म्हणतात–पुण्य, पाप, आणि या दोघांहून निराळें असें. त्यांत ब्रह्मनिष्ठाच्या वर्तनाला पुण्य किंवा पाप हे शब्दच लागत नाहींत; कारण तो स्वतःसाठीं कांहीं करीतच नाहीं. पण जे स्वर्गेच्छेनें यज्ञ, दान, तप इत्यादि करतात त्यांचीं कर्में पुण्य होत. जे प्राण्यांचा द्वेष करतात, त्यांचीं कर्में पापी होत. तसले ते लोक इतरांचें द्रव्य लुबाडून दुःख भोगतात व भ्रष्ट होतात. या दोन्ही प्रकारच्या कर्मांहून जें भिन्न तें ना पुण्य ना पाप अशा प्रकारचें होय. तूं मात्र आनंद करीत रहा, दान दे व यज्ञ कर, विद्वान किंवा तपस्वी यांतील कोणालाहि तुझ्यापुढें जातां येणार नाहीं.' १३. १. १२०.

---

## अध्याय १२१ वा.

[ १. मैत्रेयाची कथा पुढें चालू. ]

( १ ) भीष्मः—युधिष्ठिरा, याप्रमाणें सांगून व्यास निघून गेला असतां, सत्कर्मे करून ज्ञानी व विद्वान् झालेला आणि फार श्रीमंत कुळांत जन्मलेला तो मैत्रेय व्यासाला पुनः म्हणाला, 'मुने, तुम्ही सांगितल्याप्रमाणें सर्व खरें आहे. आतां तुमच्या अनुज्ञेनें मीं आणखी कांहीं विचारणार आहें.' हें ऐकून व्यास

म्हणाला, ‘ मैत्रेया, जें जें ज्या ज्या प्रमाणांत व ज्या ज्या रीतीनें तुला विचारावें असें वाटेल, तें तें तसें तसें तूं विचार, मी तुझें म्हणणें ऐकतों. ’ मैत्रेय म्हणाला, ‘ व्यास महर्षे, दानासंबंधानें तुम्हीं जें सांगितलें, तें निर्दोष व शुद्ध आहे. विद्या व तप यांच्यायोगानें तुमची मनःशुद्धि झालेली आहे यांत संशय नाहीं. तुम्हीं शुद्धान्तःकरणाचे असल्यामुळें मला आज मोठा लाभ झाला. तुमचें तप अत्यंत मोठें आहे हें मला माझ्या बुद्धीनें दिसतें आहे. आपल्या दर्शनानेंच आमचें मोठें कार्य होतें. आपलें दर्शन मला घडलें ही आपली कृपा होय, पण ही कृपा सुद्धां तुमच्याकडून स्वाभाविकपणेंच घडते. तप, विद्या व कुल हीं ब्राह्मण्याचीं तीन कारणें होत. हीं तीन एकत्र जमलीं म्हणजे मनुष्य द्विज नांवाला पात्र होतो. ब्राह्मण तृप्त झाला म्हणजे पितर व दैवतें तृप्त होतात. विद्वानांना ब्राह्मणाहून कांहीं दुसरें श्रेष्ठ आहे असें वाटत नाहीं. ब्राह्मणांच्या अभावीं, सर्वत्र अंधकार पसरून कांहीं कळेनासें होईल. चातुर्वर्ण्य दिसणार नाहीं, तसाच धर्म अधर्म व खरें खोटें यांचा थांगहि लागणार नाहीं. ज्याप्रमाणें सुपीक क्षेत्रांत बीज पेरल्यानें मनुष्याला फळ मिळतें, त्याप्रमाणें विद्वान् ब्राह्मणालाच काय द्यावयाचें तें दिल्यानें दात्याला चांगलें फळ मिळतें. विद्या व आचार यांनीं युक्त असा ब्राह्मण जर दान घ्यावयास मिळणार नाहीं, तर धनवन्तांचें धन व्यर्थ जाईल. अविद्वान् मनुष्यानें खाल्लेल्या अन्नाचा नाश होतो व खाणारालाहि तें घातक होतें. उलट ज्ञान्याला अन्न तारतें व ज्ञानीच अन्नाचा सदुपयोग करतो. ज्ञानी मनुष्याचें अन्नदान उत्पादक होतें व तें घेणारा दात्याच्या अन्नापासूनच होतो, असा सूक्ष्म विचाराअन्तीं दिसणारा दोष आहे. सत्पात्रीं दिलेलें दान जसें दात्याला तसेंच घेणाऱ्यालाहि पुण्यप्रद असतें. दान केव्हांहि एकपक्षीं असत नाहीं असें ऋषीचें म्हणणें आहे. ज्या ठिकाणीं विद्या व आचार यांनीं संपन्न असे ब्राह्मण असतात, त्या ठिकाणीं दात्यांनीं केलेलें दान इहपरलोकीं पुण्यप्रद होतें. जे शुद्ध बीजापासून जन्मून नित्य तपांत दंग व दान आणि अध्ययन यांनीं संपन्न असतात, तेच अत्यंत पूज्य होत. ते सज्जन सन्मार्गप्रवर्तक होत. त्यांनीं घालून दिलेल्या मार्गानें गेल्यास मोहाची भीति रहात नाहीं. ते स्वर्गाची वाट दाखविणारे व शाश्वत असा यज्ञाचा भार वहाणारे आहेत. १३. १. १२१.

## अध्याय १२२ वा.

[ १. मैत्रेयाची कथा पुढें चालू ]

( १ ) **भीष्म :**—युधिष्ठिरा, मैत्रेयानें याप्रमाणें प्रश्न केला असतां भगवान् व्यास मैत्रेयाला म्हणाला, 'मैत्रेया, तुला हें ज्ञान आहे व तुझी बुद्धीहि या प्रकारची आहे, हें फार चांगलें आहे. लोकांत श्रेष्ठ गुणांचीच कांहीं झालें तरी प्रशंसा होते; रूप, वय किंवा संपत्ति यांचा पगडा, तुझ्यावर बसला नाहीं, ही देवाची तुझ्यावर कृपाच होय. आतां दानाहूनहि वरचढ काय आहे हें मीं तुला सांगतों ऐक. हें पहा, जीं कांहीं आगमशास्त्रें आहेत व त्यांना अनुसरून जे व्यवहार चालू आहेत, तीं सर्व वेदांना अनुसरूनच चाललीं आहेत. मी दानाला विशेष मानतों, तर तूं तप आणि विद्या यांना मानतोस. तप वेदांत पवित्रच ठरविलें असून तें स्वर्गप्राप्तीचें साधन आहे. तपानें महासिद्धि मिळते तशीच विद्येनेंहि मिळते, असेंहि वेदांत सांगितलें आहे. पापाची निष्कृति तपानेंच होत असते. जी जी गोष्ट मनांत धरून मनुष्य तप करतो, ती ती विद्येनेंहि मिळते. फार दूरचें, हातीं येण्यास कठीण, दुष्प्राप्य, किंवा टाळण्यास कठीण असें कांहीं असलें तरी तें तपाच्या बलानें मिळतेंच; तपाहून दुसरें अधिक बलवान् कांहीं नाहीं. मद्य पिणारा, दुसऱ्याची वस्तु त्याच्या अनुमतीवांचून घेणारा, गर्भहत्या करणारा, गुरुपत्नीगमन करणारा, असे सर्व तपानें तरून जातात व सर्व पापांतून सुटतात. सर्व विद्यासंपन्न व द्रष्टा असा मनुष्य जितका श्रेष्ठ तितकाच तपस्वी श्रेष्ठ होय. त्या उभयतांनाहि आपण नमून वागणेंच उचित. विद्याधन ज्यांजवळ आहे, असे तपस्वी व दान देणारे, असे सर्वजण पूज्य असून त्यांना इहलोकीं तसेंच परलोकीं वैभव मिळतें. सामान्य लोकहि अन्नदानाचें पुण्यकर्म करून इहलोक, ब्रह्मलोक व त्याच्याहि पेक्षां श्रेष्ठ लोक यांची प्राप्ति करून घेतात. सर्वजण ज्यांना मान देतात, आणि सर्व ज्यांचा सत्कार करतात, तेहि दात्याला मान देतात व त्याचा सत्कार करतात. दाता जेथें जाईल तेथें त्याची स्तुतिच होते. मनुष्य कर्म सोडो वा करो, त्याचें त्याला यथोचित फळ मिळतें. तो वर, खालीं कोठेंहि असला तरी त्याच्या कर्मानुसार मिळालेल्या लोकींच तो जाईल. मैत्रेया, अन्न, पेयें, इत्यादि तुझ्या इच्छेप्रमाणें तुला प्राप्त होतील, कारण तूं बुद्धिमान्, कुलीन, विद्वान व दयाळू आहेस. अजून तुझें वय लहान आहे, म्हणून तूं व्रतनिष्ठ रहा. आतां गृहस्थांना

कोणतें वर्तन प्रशस्त मानिलें आहे, तें ऐकून घे. ज्या घरांत पति पत्नीवर व पत्नी पतीवर संतुष्ट असतात, त्यांत सर्वत्र कल्याणाचें राज्य असतें. पाण्यानें जसा अंगावरील मल धुवून काढावा, किंवा अग्नीच्या प्रभेनें जसा अंधकार नाहींसा व्हावा, त्याप्रमाणें मनुष्याला दान व तप यांच्या योगानें पाप धुवून काढतां येतें. मैत्रेया, तुझें कल्याण असो. तुला गृहसौख्य मिळो. मी आतां जातों. मीं सांगितलें हें लक्षांत ठेव, म्हणजे तुझें हित होईल. व्यासानें त्याला असें सांगितल्यावर मैत्रेयानें त्याला नमस्कार करून प्रदक्षिणा घातली आणि 'भगवन् तुमचेंहि कल्याण असो' असें हात जोडून त्याला सांगितलें. १३.१.१२२.

---

## अध्याय १२३ वा.

[ १. स्त्रियांचे उचित आचार. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—हे धर्मवेत्त्या पितामहा, सद्वर्तनी स्त्रियांना कोणते आचार उचित आहेत, ते ऐकिण्याची माझी इच्छा आहे, तरी कृपाकरून ते मला सांगावे.

**भीष्म**:—युधिष्ठिरा, एकदां केकय कुलांतील सुमनानामक स्त्रीनें शांडिली नांवाच्या ज्ञात्या, धर्मवेत्त्या व मनोनिग्रही स्त्रीला देवलोकीं प्रश्न केला कीं, 'हे कल्याणि, कोणत्या वर्तनानें व कोणत्या आचरणानें तूं सर्व पापांतून मुक्त होऊन देवलोकीं आलीस बरें ? अग्नीच्या ज्वाळेप्रमाणें तूं आपल्या तेजानें झळकत असून चंद्रकन्येप्रमाणें आपल्या प्रभेनें स्वर्गीं आली आहेस. तुझीं वस्त्रें निर्मळ असून तुला श्रम होत नाहींत. विमानांत बसलेल्या तुझें तेज सहस्रपट वाढलेलें दिसतें. हा लोक तुला एवढ्या तेवढ्याशा तपानें, दानानें किंवा नियमानें कांहीं प्राप्त झालेला नाहीं. तरी खरें काय असेल तें मला सांग.' सुमनेच्या या प्रश्नावर शांडिली मधुर हास्य करून मोकळेपणानें उत्तर देऊं लागली. ती म्हणाली, 'मीं कांहीं भगवीं वस्त्रें धारण केल्यानें, वल्कलें नेसल्यानें, किंवा मस्तकाचें मुंडन केल्यानें किंवा जटा राखल्यानें देवपणाला आलेली नाहीं. मीं आपल्या पतीला कोणत्याहि प्रकारें खेदकारक व कठोर शब्द बोललें नाहीं, व नित्य दक्षतेनें वागत असें. देव, पितर आणि ब्राह्मण यांच्या पूजेची हेळसांड मीं कधीं केली नाहीं व सासूसासऱ्यांच्या सेवेला सदा तत्पर असें. दुष्टपणा माझ्या मनालाहि कधीं शिवला नाहीं. मी दारांत कधीं उभी रहात नसें, व कोणाशीं

फार वेळ बोलत रहात नसें. मीं खोटें कर्म कधीं केलें नाहीं, खदखदां हंसलें नाहीं, व कोणाचें अहित केलें नाहीं. कोणाची गुप्त किंवा उघडी गोष्टहि मीं इकडे तिकडे पसरविली नाहीं. कामासाठीं बाहेर गेलेला पति घरीं आला असतां त्याला आसन देऊन मी शांत मनानें त्याची सेवा करीं. त्याला जें ठाऊक नाहीं, किंवा जें त्याला आवडत नसे, असें सर्व अन्न मीं वर्जिलें होतें. कुटुंबाचें जें कांहीं काम करावयाचें असे, तें सर्व मीं सकाळीं उठून करीं व करून घेईं. माझा पति कार्यानिमित्त बाहेर गेला असतां, मीं त्याच्या प्रीत्यर्थ कांहीं तरी मंगलकृत्य करण्यांत गढलेली असें व तो बाहेर असेपर्यंत डोळ्यांत काजळ घालणें, नट्टापट्टा करणें, केसांत फुलें घालणें, अंगाला उटी लावणें, इत्यादि गोष्टि मला आवडत नसत. पतीला झोंप लागलेली असतां महत्त्वाच्या कामासाठींहि मी त्याला जागा करीत नसें व त्यामुळें माझें मन संतुष्ट असे. कुटुंबासाठीं मीं पतीला कधीं त्रास दिला नाहीं, त्याच्या गुप्त गोष्टी कधीं प्रकट केल्या नाहींत, व घर झाडून स्वच्छ ठेवण्यांत कधीं आळस केला नाहीं. जी पत्नी हा धर्माचा मार्ग लक्षपूर्वक आचरील ती अरुन्धतीप्रमाणें स्वर्गांत मोठ्या मानाला चढेल.'

युधिष्ठिरा, सुमनेला पतिपाशीं कसें वागावें हें याप्रमाणें सांगून ती भाग्यशाली तपस्विनी शांडिली गुप्त झाली. जो कोणी हें पांडवांचें आख्यान प्रतिपर्वदिवशीं वाचील, तो देवलोकास जाऊन नन्दनवनांत सुख भोगील. १३. १. १२३.

---

## अध्याय १२४ वा.

[ १. गोड बोलणें व दान यांत चांगलें काय ? कृश हरिणाची कथा. ]

( १ ) **युधिष्ठिर** :—हे भरतकुलश्रेष्ठ पितामहा, गोड भाषण आणि दान यांतील विशेष चांगलें असें तुम्हांला काय वाटतें ? त्यांतून अधिक चांगलें काय तें मला सांगा.

**भीष्म**—युधिष्ठिरा, कोणी एखादा गोड शब्दानें प्रसन्न होतो, तर दुसरा दानानें होतो. यास्तव मनुष्याचा स्वभाव ओळखून काय करावयाचें तें ठरवावें. तथापि तुला मी गोड शब्दांचा परिणाम सांगतों, तो ऐक. भयंकर प्राणीहि गोड शब्दांनीं वश होतात.

याविषयीं जुना इतिहासहि सांगण्यांत येतो; त्यांत राक्षसानें धरलेला ब्राह्मण गोड शब्दांनीं मुक्त झाल्याची कथा आहे. वाचेचा रसाळ व बुद्धिमान् असा

एक ब्राह्मण होता. त्याला निर्जन अरण्यांत एका राक्षसानें धरिलें व तो त्याला खाऊं लागला. ब्राह्मणावर मोठें संकट गुदरलें. राक्षस मोठा भयंकर होता. पण ब्राह्मण विद्या व बुद्धि यांनीं संपन्न असल्यामुळें गांगरून न जातां राक्षसाशीं गोड शब्द बोलूं लागला. तेव्हां त्याच्या शब्दांना मान देऊन राक्षस त्याला म्हणाला, 'ब्राह्मणा, मी तुला सोडतों. पण मी कृश हरिण कशानें झालों तें मला सांग.' तेव्हां ब्राह्मणानें क्षणभर विचार करून शांत मनानें त्याच्या प्रश्नाचें उत्तर गाथारूपानें दिलें. तो म्हणाला, "राक्षसा, तूं दूर देशीं निर्जन ठिकाणीं इष्टमित्रांवांचूनच अतुल विषयांचा उपभोग घेतोस, म्हणून तूं कृश व फिक्कट झाला आहेस. तुझे मित्र सदाचरणी असतांहि तुझ्या दोषामुळें त्यांना उद्वेग येतो, म्हणून तूं कृश व फिक्कट झाला आहेस. तुझ्यापेक्षां गुणांनीं फारच हलके असे पुष्कळ धन व ऐश्वर्य असलेले लोक तुझी अवज्ञा करतात, म्हणून तूं कृश व फिक्कट झाला आहेस. तूं गुणवान् असतां दुसऱ्या गुणहितांचा सत्कार झालेला पहातोस, तसेंच तूं नम्र व सुज्ञ असतांहि मूर्खांचा सत्कार झालेला पहातोस, म्हणून तूं कृश व फिक्कट झाला आहेस. पोटाचें साधन नसल्यामुळें क्लेश होत असतांहि तशा साधनांचा तिरस्कार करून खोट्या मोठे-पणानें तूं झुरत आहेस, म्हणून कृश व फिक्कट झालास. आपल्या श्रेष्ठपणामुळें तूं स्वतःला पीडा देऊनहि ज्यावर उपकार केलेस, तोच तुला जिंकलें म्हणतो, त्यामुळें तूं कृश व फिक्कट झालास. काम व क्रोध यांनीं मन व्यापून गेल्यामुळें जे भलत्याच मार्गानें जाऊन कष्ट सोशीत आहेत, त्या लोकांचें तूं मनांत चिंतन करीत असल्यामुळें कृश व फिक्कट झाला आहेस, असें मला वाटतें. तूं बुद्धिसंपन्न असतां बुद्धिहीनांच्या वेढ्यांत सांपडून दुर्वर्तनी लोकांकडून निंदिला जात असल्या-मुळें कृश व फिक्कट झाला आहेस. वरून मित्रासारखा दिसणारा तुझा कोणी शत्रु तुझ्याशीं वरकरणीं चांगलें वागून शेवटीं तुला फसवून गेल्यामुळें तूं फिक्कट व कृश झाला आहेस. उघड्या किंवा गुप्त गोष्टी तुला कळत असतांहि तज्ज्ञां-कडून तुला मान मिळत नाहीं, दुष्टांच्या संगतींत तूं मोकळेपणाणें बोलत असल्यामुळें तुझ्या गुणांचा प्रकाश पडत नाहीं, किंवा धन, बुद्धि व विद्या हीं जवळ नसतांना मोठ्या पदाच्या तूं मार्गे लागला आहेस, म्हणून तूं असा फिक्कट व कृश झालास. कदाचित् असें असेल कीं, तपावर तुझें चित्त लागून तूं अरण्यवास स्वीकारल्यामुळें तुझ्या भाऊबंदांना तुझें वर्तन आवडत नाहीं, कदाचित् तुझी पत्नी सुंदर असून कोणा धनवान् तरुण कामी

पुरुषाचें लक्ष तिच्यावर गेलें आहे, बहुधा श्रीमान् लोकांमध्यें तूं योग्य वेळीं उच्चारलेले उत्तम शब्दहि परिणामकारक झाले नाहींत, किंवा आग्रही, मूर्ख, रागीट अशा एकाद्या आवडत्या नातेवाईकाचें मन तुला वळवतां आलें नाहीं, त्यामुळें तूं कृश व फिक्कट झाला असावास. तुला इष्ट वाटणाऱ्या कार्यांत तुला गुंतवून कोणी त्यावर तुझ्याकडून द्रव्य उपटीत आहे, कदाचित् तूं गुणवान् व लोकांना मान्य असतां तुझी ही कीर्ति केवळ आपल्यामुळें होत आहे असें तुझा कोणी मित्र म्हणत आहे, कदाचित् तुझ्या मनांतील इष्ट गोष्ट लाजेमुळें तूं उघड करूं इच्छित नाहींस, त्यामुळें तूं फिक्कट व कृश झाला आहेस. बहुधा अनेक प्रकारच्या आवडी असलेल्या निरनिराळ्या लोकांना आपल्या गुणांनीं आपलेंसें करण्याचा प्रयत्न करून त्यांत तुला यश मिळालें नाहीं, किंवा तूं विद्या-हीन व भित्रा असून विद्या, पराक्रम व दानें यांनीं प्राप्त होणारें यश अगदीं अल्पदानानें तूं मिळवूं पहात आहेस, कदाचित् फार दिवस हवी असलेली वस्तु तुझ्या हातीं येते न येते तोंच ती दुसऱ्यांनीं उपटली असेल, नाहींतर तुझा दोष कांहीं दिसत नसतां कोणी तुला निष्कारण कठोर बोललें असेल, म्हणून तूं फिक्कट व कृश झाला आहेस. कदाचित् साधु म्हणविणारे लोक गृहस्थाश्रमांत, असाधु लोक वनवासांत, व मुक्त म्हणविणारे विषयसंगांत दंग झालेले तुला आढळले असतील, अथवा दुःखी मित्रांचें दुःख द्रव्याच्या अभावीं तुला निवारतां आलें नसेल, नाहींतर धर्मानुसारी, अर्थानुसारी, तसेंच कामानुसारी असें तुझें भाषण योग्य वेळीं केलेलें असतांहि लोकांना तें पटलें नसेल, म्हणून तूं असा फिक्कट व कृश झालास. स्वाभिमानी असतां केवळ जीव जगविण्यासाठीं नीचांनीं दिलेल्या द्रव्यावर रहाण्याचा तुला प्रसंग आला असेल, नाहींतर पाप्यांचा उत्कर्ष व सदाचारी लोकांची दुर्दशा पाहून तुला उद्वेग वाटला असेल, व त्यामुळें तूं असा फिक्कट व कृश झालास. एकमेकांशीं भांडणाऱ्या तुझ्या दोन मित्रांना संतुष्ट करण्याचा तुझा प्रयत्न असेल, अथवा वेदवेत्त्या ब्राह्मणांना भलतींच कर्में करतांना पाहून ज्ञात्या पुरुषांना इंद्रियदमन करतां आलें नाहीं असें पाहून, तुला चमत्कारिक वाटलें असेल, त्यामुळें तूं कृश व फिक्कट झाला आहेस." याप्रमाणें ब्राह्मणानें बहुमानपूर्वक उत्तर दिलें असतां राक्षसाला आनंद झाला व त्यानेंहि उलट ब्राह्मणाचा बहुमान करून त्याला स्वतःचा मित्र केलें व द्रव्य देऊन त्याची पाठवणी केली. १३.१.१२४.

---

## अध्याय १२५ वा.

[ १. कल्याणेच्छु दरिद्री मनुष्यानें काय करावें. २ श्राद्धधर्मासंबंधानें देवदूत व पितर यांमधील संवाद. ३ पितरांच्या तृप्तीसाठीं निळ्या रंगाचा बैल सोडण्याचा विधि. ]

( १ ) **युधिष्ठिरः**—हे पितामहा कर्मक्षेत्र मानलेला अत्यंत दुर्लभ असा मनुष्यजन्म मिळाला असतां उत्कर्षाची इच्छा करणाऱ्या दरिद्री मनुष्यानें काय करावें? तसेंच दान करावयाच्या वस्तूंत उत्तम कोणती, ती द्यावयाची पद्धत काय, आणि मान्य व पूज्य कोण या विषयींचें रहस्य मला सांगावें.

**भीष्मः**—राजा, लक्ष देऊन ऐक. तूं विचारलेलीं धर्मरहस्यें भगवान् व्यासानें मला पूर्वी सांगितलीं होतीं तींच मीं तुला सांगतों. हीं रहस्यें देवांना देखील कळलेलीं नसून यमानें मात्र नियम व ध्यान यांच्या योगानें निर्दोष कर्म करून तपाचें मोठें फळ म्हणून त्यांचें ज्ञान मिळविलें. कोणत्या कारणानें कोणता देव संतुष्ट होतो, पितर कसे संतुष्ट होतात, तसेंच ऋषि, प्रथमगण, लक्ष्मी, चित्रगुप्त, दिशांचे संरक्षक गज, यांची तृप्ति कशी होते, रहस्यमय व महाफलदायक असा ऋषींचा धर्म कोणता, महादानाचें फल काय, सर्व यज्ञांचें फल काय, या सगळ्या गोष्टींचें ज्ञान करून घेऊन जो त्याप्रमाणें वागतो तो दोषी असला, तरी निर्दोषी होतो. दहा पशूंच्या वधासमान तेल्याची एक घाणी असते, दहा घाण्यांसमान एक मद्यपी राजा असतो, व अशा दहा मद्यपी राजांसमान एक वेश्या समजावी. दश वेश्यांची बरोबरी एक राजा करतो. हीं सगळीं अर्धवट असून त्या सर्वांहून राजा अधिक होय. धर्म, अर्थ व काम यांचें ज्ञान देणारें पवित्र व पुण्यदायक शास्त्र, धर्माचें स्पष्टीकरण व त्यांतील मोठें रहस्य हीं ऐकून घ्यावीं. त्या शास्त्रांत श्राद्धकर्मांतील पितरांचीं गुह्यें सांगितलेलीं असतात, तसेंच सर्व देवतांचें रहस्य, ऋषींचा रहस्ययुक्त व महाफलदायी धर्म, यज्ञाचें फळ, दान फळ, हींहि त्यांत सांगितलेलीं असतात. जे हें शास्त्र पढतात व ज्यांचीं कर्में त्याला अनुसरून होतात, तसेंच जे त्याचें फळ लोकांना समजावून सांगतात, तो प्रत्यक्ष नारायणस्वरूपीच होत. अतिथिपूजन करणाराला गोदानाचें, तीर्थस्नानाचें, यज्ञाचें अशीं सर्व फळें मिळतात. हें शास्त्र श्रद्धापूर्वक शुद्धमनानें ऐकणारे उत्तम लोक जिंकतात व पापांपासून मुक्त होतात. त्यांना मरणोत्तर मिळालेल्या त्या उत्तम लोकीं नित्य धर्मच मिळतो.

( २ ) एकदां एक देवदूत सहजगत्या आड बसून इन्द्राला म्हणाला, ‘ इच्छा-गुणी अशा वैद्यश्रेष्ठ अश्विनी कुमारांच्या आज्ञेनें पितर, देव व ऋषि यांजकडे जाऊन मीं त्यांना विचारिलें कीं, श्राद्धदिवशीं देणारा व घेणारा अशा दोघांना स्त्रीसंग वर्ज्य मानिला आहे तो कां ? तीन पिंड वेगवेगळे काय म्हणून ठेवा-वयाचे ? त्यांतील पहिला कोणाला द्यावयाचा, मधला कोणाकडे जावयाचा, व तिसरा कोणाचा हें मला समजून घ्यावयाचें आहे.’ देवदूताचा धर्मविषयक प्रश्न ऐकून त्या ठिकाणीं बसलेले देव व पितर यांनीं त्याचा सत्कार केला व पितरांनीं त्याच्या प्रश्नाचीं उत्तरें दिलीं. ते म्हणाले, ‘ हे देवश्रेष्ठा, तुझें स्वागत असो, अत्यंत खोल अर्थाचा प्रश्न तूं आम्हांला केलास. श्राद्ध करून किंवा त्यांत जेवल्यावर जो पुरुष स्त्रीगमन करतो, त्याच्या त्या रेतामध्यें पितर एक महिनाभर लोळत असतात, म्हणून त्याप्रसंगीं स्त्रीसंग करूं नये. आतां पिंडांची वांटणी क्रमानें सांगतों. अगदीं खालचा पिंड पाण्यांत सोडून अर्पावा, मधला पिंड स्त्रीनें भक्षावा, व तिसरा जो पिंड तो ज्यांचा त्यांना देण्यासाठीं अग्नींत टाकावा. असा हा धर्मानुसार श्राद्धविधि असून त्या योगें पितर संतुष्ट व आनंदित होतात, तो करणाराची प्रजा वाढते व त्याला अक्षय फळ मिळतें.”

देवदूत म्हणाला, ‘ पितर हो, पिंडाची वांटणी साऱ्या पितरांत तीन भागांनीं करावी असें तुम्हीं सांगितलें. त्यांतील खालचा पाण्यांत अर्पिलेला एक पिंड कोणाकडे जातो ? कोणत्या देवाला तो संतोषवितो व पितरांना कसा तारतो ? मधला पिंड पत्नी भक्षिते हें ठीकच आहे. पितरांना श्राद्धान्नच कां म्हणून भक्षावयास मिळतें ? शेवटचा जो अग्नींत दिलेला पिंड त्याची काय अवस्था होते ? तो कोणाला पोंचतो ? याविषयीं सारें मला ऐकावयास पाहिजे आहे.” पितरांनीं उत्तर केलें, ‘ हे देवदूता, तूं विचारिलेला प्रश्न फार महत्त्वाचा असून यांत मोठें रहस्य आहे. देव व ऋषि यांना त्या विषयीं मोठी जिज्ञासा आहे, पण त्यांना पितृकार्याविषयींचा हा निर्णय कळलेला नाहीं. चिरंजीव मार्कंडेयाला मात्र एकाला तो समजला, कारण तो पितृभक्त व महाकीर्तिमान् असून त्याला भगवंतापासून वर मिळाला व तिन्ही पिंडांची योजनाहि समजली. ती मी तुला सांगतों, ऐक. जो पिंड पाण्यांत सोडण्यांत येतो, तो चंद्राला संतोषवितो, व मग चंद्र त्यानें देवांना आणि पितरांना संतोषवितो. मधला पिंड जो यजमामाची पत्नी भक्षिते, त्याच्या योगानें पितर पुत्रेच्छु अशा त्याला पुत्र देतात. आतां अग्नींत दिलेल्या पिंडाचें काय होतें तें समजून घे.

त्याच्या योगें पितर तृप्त होऊन सर्व इच्छा पूर्ण करतात. अशी ही तीन पिंडांची योजना आहे. जो उपाध्याय असतो तो यजमानाच्या पितृस्थानीं बसतो, म्हणून त्या दिवसापुरतें त्याला परकीपण आल्यामुळें त्यानें त्या दिवशीं स्त्रीसंग करूं नये, तर शुद्धचित्त राहून श्राद्धाचें भोजन करावें. आम्ही जे दोष सांगितले ते खरोखर तसेच आहेत, त्यांत खोटें कांहीं नाहीं. म्हणून स्नान करून शुद्ध होऊन निष्क्रिय वृत्तीनें श्राद्धान्न भक्षावें. तसें केल्यानें श्राद्धदान करणारा व तें घेणारा या दोहोंची प्रजा वाढते.

( ३ ) पितरांनीं याप्रमाणें श्राद्धधर्माचें रहस्य निवेदिलें असतां, श्रोतृगणांत विद्युत्प्रभ नांवाचा सूर्यासारखा तेजस्वी महातपस्वी ऋषी होता, तो तें ऐकून इन्द्राला म्हणाला, ' मनुष्यें नीच योनींतील किडे, मुंग्या, सर्प, मेंढे, हरिण, पक्षी, इत्यादि प्राण्यांना मोहानें मारतात व त्यामुळें त्यांना मोठें पाप लागतें, तर त्याच्या निवारणाचा उपाय काय ? ' हा विद्युत्प्रभाचा प्रश्न ऐकून सारे देव, तपस्वी ऋषि व भाग्यशाली पितर त्या उत्तम प्रश्नाबद्दल त्याची वाहवा करूं लागले. तेव्हां इन्द्र म्हणाला, ' कुरुक्षेत्र, गया, गंगा, प्रभास व पुष्कर यांचें मनांत ध्यान करून जलांत स्नान करावें म्हणजे चंद्र जसा राहूपासून तसा मनुष्य पापांपासून मुक्त होतो. जो गाईच्या पाठीला हात लावून तिच्या शेपटीला नमस्कार करतो त्याला तीन दिवस स्नानपूर्वक निराहार राहिल्याचें श्रेय मिळतें. ' इन्द्राच्या भाषणावर विद्युत्प्रभ म्हणाला, ' बा इन्द्रा, मीं आतां अत्यंत सूक्ष्म धर्म सांगतों तो ऐक. वडाच्या जटांच्या काड्यानें अंग चोळून त्याला राजमोहरीच्या तेलाचा लेप करावा आणि मग षष्टीक तांदुळाचा भात दुधाशीं जबावा म्हणजे सर्व पापांतून मनुष्य निसटतो. ऋषींनीं सांगितलेलें आणखी एक धर्मगुह्यहि ऐक. बृहस्पतीच्या घरीं तें शंकर सांगत असतांना मी ऐकिलें. पर्वतावर चढून एका पायावर उभें रहावें व हात वर जोडून सूर्याकडे टक लावून पहावें, म्हणजे त्या मोठ्या तपानें उपवासाचें फळ मिळतें. सूर्याच्या किरणांनीं अंग तापलें, म्हणजे सर्व पापें दूर जातात. उन्हाळ्यांत किंवा हिंवाळ्यांतहि अशा रीतीनें पाप दूर होतें. पापयुक्त झालेल्याला शाश्वत तेज मिळून तो सूर्यासमान तेजस्वी होतो व चंद्रासारखा प्रकाशतो.' हें ऐकून त्या देवसमाजांत इन्द्र बृहस्पतीला गोड शब्दांनीं म्हणाला, ' मनुष्यांना सुखावह होणारे गुह्यधर्म तसेच रहस्ययुक्त असे जे गुप्त दोष ते यथावत् मला सांग.' तेव्हां बृहस्पति म्हणाला, ' जो सूर्यासन्मुख मूत्रोत्सर्ग करतो व अग्नीचा द्वेष करतो, तसेंच अग्नि पेटवून

त्यांत समिधा होमीत नाहीं, दुधासाठीं जो वासरूं लहान असलेल्या गाईचें दूध काढितो, त्याला काय दोष लागतात तें सांगतों, ऐक. सूर्य, वायु, अग्नि, व लोकमाता गाई यांना ब्रह्मदेवानें लोकांना तारण्यासाठीं निर्माण केलें. त्या मनुष्य-लोकींच्या देवता होत. तुम्हीं सर्वांनीं एकेक निश्चित धर्म क्रमानें ऐका. जे स्त्रीपुरुष सूर्यापुढें उभें राहून मूत्र सोडितात ते दुराचरणी व कुलदूषक होऊन श्यायशीं वर्षें रहातात. इन्द्रा, अग्नीला तिरस्कारणाऱ्याची संतति गर्भा-तूनच गळते. अग्निकार्यांत प्रदीप्त अग्नींत जे सामिधा अर्पीत नाहींत त्यांचें हव्य अग्नि खात नाहीं. बाल वासरांचें दूध जीं माणसें आपणच पितात, त्यांना कुल-वर्धक संतति होत नाहीं व प्रजाक्षयामुळें त्यांचा कुलक्षय होतो. या गोष्टी वृद्ध व कुलीन ब्राह्मणांनीं पूर्वी प्रत्यक्ष पाहिल्या आहेत. म्हणून कल्याणेच्छु मनुष्यानें वर्ज्य गोष्टी वर्ज्य कराव्या व विहित असतील त्याच नित्य कराव्या, हें मी खरें सांगतों.'

बृहस्पतीचें भाषण झाल्यावर मरुद्गणांसह सर्व देवता व ऋषि पितरांना म्हणाले, 'अल्पबुद्धि अशा मनुष्यांवर पितर कशानें संतुष्ट होतात? और्ध्वदेहि-कांतील दान अक्षय कसें होतें, मनुष्यें पितरांच्या ऋणांतून काय केल्यानें मुक्त होतात, हें ऐकण्याची आम्हांला फार इच्छा आहे.' तेव्हां पितरांनीं उत्तर केलें, 'देव हो, तुम्हीं आपला संशय फार योग्य रीतीनें मांडिला आहे; तरी सदाचारी माणसांनीं काय केल्यानें आम्ही तृप्त होतों, तें ऐका. अमावास्येला तिलोद-कासह निळ्या वर्णाचा बैल सोडून दिल्यानें व पावसाळ्याचे चार महिने दिवे लाविल्यानें मनुष्य पितरांच्या ऋणांतून सुटतो. हें दान अक्षय फल देणारें व निर्दोष होय. त्यानें आमचें अक्षय समाधान होतें. जे मनुष्य श्रद्धेनें संतति उत्पन्न करतात, ते आपल्या पंणजोबाचा भयंकर नरकांतून उद्धार करतात.' हें पितरांचें उत्तर ऐकून गार्ग्य नांवाचा वृद्ध व तेजस्वी तपस्वी हर्षभरित झाला व त्यांना म्हणाला, 'हे पितर हो, निळा बैल सोडल्याचा काय गुण आहे, तसेंच पावसाळ्यांत दीपदान केल्याचा व तिलोदकाचा काय गुण आहे बरें?' हें ऐकून पितरांनीं उत्तर दिलें, 'निळया रंगाच्या बैलाची शेपटी जर पाणी वर उडवील, तर त्यामुळें साठ सहस्र वर्षें पितरांची तृप्ति होते. जर तो नदीकांठचा चिखल शिंगानें उचलून घेईल, तर पितरांना त्यामुळें चंद्रलोकाची प्राप्ति होईल. पावसाळ्यांत दीपदान केल्यानें मनुष्य चंद्राप्रमाणें प्रकाशतो. दीपदान करणारामध्यें तमोगुण रहात नाहीं. अमावास्येला जे मनुष्य तांब्याच्या भांड्यां-

तून मधुमिश्रित तिलोदक देतात, त्यांनीं यथासांग श्राद्ध केल्यासारखें होतें व त्यांची संतति आनंदित व पुष्ट होते. जो श्रद्धेनें पितरांना पिंड अर्पील त्याचें कुळ वाढून तो पितरांच्या ऋणांतून मुक्त होईल. याप्रमाणें श्राद्धासंबंधीचे काल, विधि, पात्र, फल यांचा विचार यथासांग सांगितला आहे.' १३.१.१२५.

---

## अध्याय १२६ वा.

[ १. परमेश्वराचा संतोष कशानें होतो ? ]

( १ ) **भीष्म :**—एकदां इन्द्रानें विष्णूला विचारिलें, 'तुला संतोष व आनंद कशानें होतो ?' तेव्हां विष्णु म्हणाला, "ब्राह्मणांच्या निंदेचा मला मोठा तिरस्कार वाटतो. ब्राह्मणांची पूजा केल्यानें माझीच पूजा केल्यासारखें खरोखर होतें. ब्राह्मणांना नित्य वंदन करावें व आपल्या पायांनाहि जेवल्यावर तसेंच करावें. माझ्या चक्राला जो बलिदान करील त्या मनुष्यावर मीं संतुष्ट होईन. ब्राह्मण बटु आणि पाण्यांतून वर येऊन माती डोक्यावर घेणारा वराह यांचें ज्याला दर्शन घडतें, त्याचें पाप कांहीं रहात नाहीं. पिंपळ, गोरोचन व गाय यांना जो नित्य पूजील, त्यानें देव, असुर व मनुष्यें यांनीं युक्त असलेलें सारें जगच पूजिल्यासारखें होतें. त्या त्या रूपानें मी त्यांची पूजा स्वीकारतों. या लोकीं माझी दुसऱ्या प्रकारची पूजाच नाहीं. अल्पबुद्धि माणसें इतर रीतीनें व्यर्थच माझी पूजा करतात. तिच्यामुळें माझा संतोष होत नाहीं व मीं ती स्वीकारीतहि नाहीं." हें ऐकून इंद्र म्हणाला, 'चक्र, पाय, वराह, ब्राह्मण बटु व उचललेली माती यांना तूं काय म्हणून प्रशंसितोस ? तूं सर्वांना उत्पन्न करतोस व तूंच संहारितोस. मनुष्यांसह सर्व प्राण्यांचें शाश्वत मूळस्वरूप तूंच आहेस."

इंद्राचें म्हणणें ऐकून घेऊन विष्णु हंसून म्हणाला, 'चक्रानें मीं दैत्यांना वधिलें, पायांनीं पृथ्वीचें आक्रमण केलें, वराहरूप धरून हिरण्याक्षाचा पाडाव केला, वामनरूपानें बळीला जिंकलें, या कारणास्तव मी त्या त्या रूपाची पूजा करणाऱ्या थोर पुरुषांवर संतुष्ट होतों. जे मला पूजितात, त्यांचा पराभव कधीं होत नाहीं. ब्रह्मचारी ब्राह्मण आलेला पहातांच त्याला आधीं भोजन घालून मग आपण खाणारा अमृतपानच जणूं करतो. सूर्याकडे तोंड करून प्रातःसंध्येची उपासना केल्यानें सर्व तीर्थांचें स्नान घडल्यासारखें होऊन मनुष्य सर्व दोषांतून मुक्त होतो. हे तपोधनहो, तुम्हीं विचारलेलें धर्मरहस्य याप्रमाणें मीं तुम्हांला सविस्तर सांगितलें. आतां आणखी तुम्हांस काय सांगावयास पाहिजे ?"

विष्णूच्या भाषणानंतर बलदेव म्हणाला, 'मनुष्यांना सुखावह होणारें धर्मरहस्य ऐका. अडाणी माणसांना तें न समजल्यामुळें प्राणिमात्रांपासून पीडा पावून त्यांना क्लेश होतात. सकाळीं लवकर उठून जो मनुष्य गाय, तूप, दहीं, मोहरी व शिरस यांना स्पर्श करील, त्याची पापांतून सुटका होईल. श्राद्धाच्या प्रसंगीं तपस्वी लोक मागें किंवा पुढें कोणा प्राण्याला राहूं देत नाहींत व उच्छिष्ट ठेवीत नाहींत.' नंतर देव म्हणाले, 'पाण्यानें भरलेलें तांब्याचें भांडें हातांत घेऊन जो कोणी पूर्वाभिमुख होत्साता उपवासाचें किंवा दुसरें कसलेंहि व्रत धरील, त्याच्यावर देवता संतुष्ट होतात व त्याच्या इच्छा पूर्ण होतात. उपवासांत किंवा बलिदानांत तांब्याचें भांडेंच सांगितलें असून अडाणी लोक भलतेंच कांहीं घेतात. बलिदान, भिक्षादान, अर्घ्यदान व पितरांसाठीं तिलोदकदान हीं तांब्याच्या भांड्यांतून द्यावीं, दुसऱ्या कसल्या भांड्यानें दिल्यास फळ थोडें मिळतें. ज्याच्या योगानें देवता संतुष्ट होतात, तें धर्मगुह्य असें सांगितलें आहे.'

मग धर्म म्हणाला, 'देवकार्य व पितृकार्य यांतील दान, राजाचा सेवक, देवळांतील घंटा वाजविणारा, परिचारक, गाई राखणारा, व्यापारी, कलाकौशल्याचा धंदा करणारा, मित्रद्रोही, अनभ्यासी व वृपलीशीं विवाह केलेला, अशा ब्राह्मणाला केव्हांहि देऊं नये. असल्या ब्राह्मणाला तें दान दिल्यास देणाराची संतति नष्ट होते व त्याचे पितर तर तृप्त होत नाहींतच. ज्याच्या घराहून अतिथि निराश होऊन परत जातो त्याच्या त्या अतिथीला कांहीं न देण्यामुळें पितर, देव व अग्नि हेहि निराश होऊन परत जातात. अतिथीला न सत्कारणाराला स्त्रीहत्या, गोहत्या, कृतघ्नता, ब्रह्महत्या व गुरुपत्नीगमन इतकीं केल्याचे दोष लागतात.'

अग्नि म्हणाला, 'जो दुष्टबुद्धीचा मनुष्य पाय उचलून गाईला किंवा थोर ब्राह्मण व पेटता अग्नि यांना लावील, त्याला कोणते दोष लागतात ते सांगतों, लक्ष देऊन ऐका. त्याची दुष्कीर्ति स्वर्गापर्यंत जाऊन भिडते, त्याचे पितर घाबरून जातात व देवांचें मोठें वैमनस्य केल्याचें पातक त्याला लागतें. त्यानें अर्पिलेलें हविर्द्रव्य अग्नि स्वीकारीत नाहीं व शंभर जन्म तो नरकांत खितपत पडतो. त्याला कसलेंच प्रायश्चित्त उपयोगी पडत नाहीं. गाय, ब्राह्मण व अग्नि यांना पायानें स्पर्श कधीं करूं नये. पायानें स्पर्श करण्याचे हे जे दोष मीं सांगितले ते श्रद्धाळु व आपलें हित इच्छिणाऱ्या माणसानें टाळावे.

विश्वामित्र म्हणाला, 'पितरांना उत्तम प्रकारचें अन्न दिल्यानें कोणता मोठा धर्म साधतो तें ऐका. भाद्रपदाच्या कृष्णपक्षांत मघानक्षत्रीं दुपारीं हत्तीच्या छायेखालीं जो तसें दान करील त्याला तेरा वर्षे प्रतिवर्षी महाश्राद्ध केल्याचें पुण्य मिळतें.'

गाई म्हणाल्या, 'बहुले समंगे ह्यकुतोभये च' इत्यादि मंत्र म्हणून जो गाईला वंदन करतो तो पापकर्मापासून मुक्त होऊन त्याला इन्द्रलोक, गोलोक व चंद्राचें तेज हीं प्राप्त होतात. देवांना आवडणारा हा मंत्र पर्वणीच्या दिवशीं जो कोणी गोठ्यांत बसून म्हणेल त्याचें पाप, भय व शोक हीं नष्ट होऊन तो इन्द्रलोकीं जाईल.'

युधिष्ठिरा, याप्रमाणें त्यांचीं भाषणें झाल्यावर ते वसिष्ठप्रभृति लोकप्रसिद्ध ऋषि ब्रह्मदेवाला प्रदक्षिणा करून त्याच्या पुढें हात जोडून उभे राहिले. मग ब्रह्मवेत्त्यांत श्रेष्ठ अशा वसिष्ठानें सर्व प्राणिमात्राला व विशेषतः ब्राह्मण क्षत्रियांना हितावह होईल असा प्रश्न विचारिला. तो म्हणाला, 'द्रव्यहीन पण सद्वर्तनी अशा दरिद्री मनुष्यांना यज्ञाचें फल कोणतें कर्म केल्यानें मिळतें?' हा त्याचा प्रश्न ऐकून ब्रह्मदेवानें उत्तर केलें, 'हे भाग्यशाली ऋषिहो, किती हो हा उत्तम प्रश्न तुम्हीं विचारिला! याचें फार मोठें रहस्य असून तो मनुष्यांना कल्याणकारक आहे. ऐका, मनुष्याला यज्ञाचें श्रेय कशानें मिळतें तें सारें सांगतों. पौष महिन्याच्या शुक्लपक्षांत रोहिणी नक्षत्रीं स्नानानें शुद्ध होऊन एका वस्त्रानें श्रद्धा ठेवून शांत मनानें जो उघड्यावर शयन करील व चंद्रकिरण पिईल त्याला मोठ्या यज्ञाचें फल मिळेल. सूक्ष्म धर्माचा अर्थ जाणणाऱ्या तुम्हीं जें मोठें रहस्य मला विचारिलें तें हें मीं तुम्हांला सांगितलें.' १३. १. १२६.

---

## अध्याय १२७ वा.

[ १. देव व ऋषि यांनीं सांगितलेले सूक्ष्म धर्म. ]

( १ ) **विभावसुः**—पौर्णिमेच्या दिवशीं तूप लावलेल्या अक्षता व ओंजळभर पाणी जो उगवत्या चंद्राला समोर उभा राहून अर्पील त्यानें अग्निकार्य केलेंसें होऊन तिन्ही अग्नींना हवन केल्याचें पुण्य त्याला मिळेल. पण जो अडाणी मनुष्य अमावास्येला झाड तोडूं पाहील, त्याला एक पान तोडतांच ब्रह्महत्येचें पाप लागेल. अमावास्येच्या दिवशीं जो दांत घासण्याची काडी

चावतो त्याला चंद्रालाच चावल्याचें पातक लागतें, त्याचे पितर खिन्न होतात, त्यानें पर्वणीच्या दिवशीं दिलेलें हविर्द्रव्य देव स्वीकारीत नाहींत व त्याचे पितर रागावल्यामुळें त्याचा वंश क्षीण होतो.

**लक्ष्मी**:—जेथें भांडींकुंडीं कशीं तरी पसरलेलीं असतात, भांडीं फुटकीं असून आसनेंहि नीट ठेवलेलीं नसतात, स्त्रियांना मार मिळतो, त्या पापानें दूषित झालेल्या घरांतून देव व पितर उत्सव पर्वे इत्यादि दिवशीं निराश होऊन परत जातात.

**अंगिरा**:—जो कोणी सुवर्चला वेलीचें मूळ हातांत घेऊन वर्षभर करंजीच्या झाडाखालीं दिवा लावील, त्याची प्रजा वाढेल.

**गार्ग्य**:—नित्य अतिथीचें स्वागत करावें, दीप द्यावा, दिवसा झोंप घेऊं नये व मांस भक्षूं नये. गाई आणि ब्राह्मण यांना मारूं नये. पुष्करादि तीर्थाचें नांव घ्यावें. असें करणें हा श्रेष्ठ धर्म असून त्याचें फळ मोठें आहे. शेंकडों यज्ञ केल्यावर त्यांत अर्पण केलेलें हविर्द्रव्य शेवटीं नष्टच होतें. पण या धर्माचें श्रद्धापूर्वक आचरण कधींच व्यर्थ जात नाहीं. आणखी असेंहि धर्मरहस्य आहे कीं, श्राद्धविधि, देवकार्य, तीर्थविधि, पर्व या ठिकाणीं रजस्वला, अंगावर कोड असलेली किंवा निपुत्रिक अशा स्त्रीनें पाहिलेलें अन्न देवता खात नाहींत व त्यानें पितर तेरा वर्षांतहि संतुष्ट होत नाहींत. यास्तव शुद्ध होऊन शुक्ल वस्त्र नेसावें, ब्राह्मणांकडून स्वतिवाचन करवावें व भारत पठन करावें म्हणजे हविर्द्रव्य अर्पिल्याचें फळ अक्षय मिळतें.

**धौम्य**:—फुटकें भांडें, मोडकी खाट, कोंबडा, कुत्रा, व घरांत उगवलेला वृक्ष हीं सर्व अप्रशस्त होत. फुटकें भांडें म्हणजे प्रत्यक्ष कलिच असून मोडक्या खाटेनें धनक्षय होतो. तसेंच घरांत कोंबडे व कुत्रे बाळगिल्यास देवता हविर्द्रव्य भक्षीत नाहींत. झाडाच्या आश्रयानें सर्पादि प्राणी असतात, म्हणून घरांत झाड लावूं नये.

**जमदग्नि**:—अश्वमेध करा कीं शेकडों वाजपेय याग करा, खालीं मान व वर पाय करून लोंबकळत रहा किंवा मोठें सत्र मांडा, हृदय शुद्ध नसेल तर सारें व्यर्थ जाऊन मनुष्य नरकांतच जातो. यज्ञ, सत्यभाषण व शुद्ध हृदय यांची योग्यता सारखी आहे. शुद्ध मनानें मापटेंभर सातू ब्राह्मणाला दिले असतां ब्रह्म-

लोक मिळतो, एवढें उदाहरण शुद्ध मनाचें महत्त्व दाखविण्यास पुरे आहे. १३. १. १२७

---

## अध्याय १२८ वा.

[ १. देवांनीं सांगितलेलें धर्मरहस्य पुढें चालू ].

( १ ) **वायु**:—मनुष्यांना सुखावह होईल असा धर्म व दोषावह होणारा अधर्म यांचें रहस्य मी थोडक्यांत सांगतों, तें लक्षणपूर्वक ऐकून घ्या. अग्निकार्य अवश्य करावें, तसेंच पितरांना उद्देशून श्रेष्ठप्रकारचें अन्न, दीप व तिलोदक यांचें दान करावें. याप्रमाणें श्रद्धापूर्वक स्थिर चित्तानें जो पावसाचे चार महिने तिलोदक देईल, तसेंच वेदनिष्णात ब्राह्मणांना यथाशक्ति भोजन घालील, त्याला शंभर सपशुयज्ञ केल्याचें श्रेय लाभेल. आतां दोषांचें रहस्य ऐका. शूद्रानें यज्ञाग्नि पेटविल्यावर स्त्रिया मूर्खपणें त्यांत हविर्द्रव्य टाकतील आणि या कृत्याला कोणी धर्म म्हणेल तर तो अधर्माचा दोषी होतो. त्यावर अग्नि क्रुद्ध होतात, तो शूद्रयोनीस जातो आणि देव व पितर त्यावर संतुष्ट होत नाहींत. पण याला प्रायश्चित्तहि आहे, तें सांगतों, ऐका. तें योग्यरीतीनें केलें असतां मनुष्य चिंतामुक्त आणि सुखी होईल. गाईच्या शेणानें व मुतानें जागा सारवून तिच्या दुधानें व तुपानें अग्नीला आहुति द्यावी. असें तीन दिवस उपास करून केल्यास त्यानंतर वर्षाच्या अंतीं देवता हवि घेऊं लागतात आणि श्राद्धसमय आला असतां पितरांनाहि आनंद होतो. असें हें धर्माचें व अधर्माचें रहस्य सांगितलें आहे. तें लक्षांत ठेवून वर्तन केल्यास मनुष्यांना मरणोत्तर स्वर्ग व तेथील सुख हीं मिळतात. १३.१.१२८.

---

## अध्याय १२९ वा.

[ १ लोमश ऋषीनें सांगितलेलें धर्मरहस्य. ]

( १ ) **लोमश**:—स्वतः विवाह न करतां जे परस्त्रियांवर आसक्त होतात, त्यांचे पितर श्राद्धाच्यावेळीं निराश होतात. जो दुसऱ्यांच्या स्त्रियांवर आसक्त होतो, जो वंध्या स्त्रीची संगति करतो व जो ब्राह्मणाचें द्रव्य चोरतो, त्या सर्वांना सारखाच दोष आहे. पितर त्यांना संभाषण करण्यास अपात्र समजतात. त्यांनीं

दिलेलें हवि देवता व पितर यांना आवडत नाहीं. यासाठीं त्या तिन्ही गोष्टी हितेच्छूनें वर्ज्य कराव्या. दुसरें ऐकण्यासारखें धर्मरहस्य आहे. गुरूची आज्ञा नित्य श्रद्धापूर्वक पाळावी. द्वादशी व पौर्णिमा या दोन दिवशीं प्रत्येक महिन्यांत तांदूळ व तूप ब्राह्मणाला दिल्यास काय पुण्य लागतें तें ऐका. त्यामुळें सोम व समुद्र यांची वृद्धि होऊन अश्वमेधाच्या चवथ्या भागाइतकें फळ इंद्र देतो. त्या दानानें मनुष्य तेजस्वी व वीर्यशाली होतो आणि सोम त्यावर संतुष्ट होऊन त्याचे मनोरथ पुरवितो. या कलियुगांत मनुष्यांना सुख देणारा आणि मोठें पुण्य देणारा आणखी एक रहस्यमय धर्म आहे, तोहि ऐका. पहाटेस लवकर उठून व स्नान करून शुभ्रवस्त्र नेसल्यावर मनुष्यानें स्थिर चित्तानें ब्राह्मणांना तिळांनीं भरलेलीं भांडीं द्यावीं, पितरांना मधासह तिलोदक अर्पावें, दीप व कृसर यांचें दान करावें. या धर्मविधीचें फल ऐका. तिळांचीं भांडीं देण्याचें फळ इन्द्रानेंच सांगितलें आहे. गोप्रदान, भूमिदान, पुष्कळ दक्षिणेसह केलेला अग्निष्टोम यज्ञ यांचें जें फल आहे, तेंच फल तिलपात्रदानाचें आहे असें देवता मानतात. श्राद्धप्रसंगीं तिलोदक देणें हें अक्षय फल देणारें आहे असें पितरांनीं मानिलें असून दीप व कृसर यांच्या दानानें पितामहांचा संतोष होतो. स्वर्ग व पितृलोक या ठिकाणीं पितर व देव यांनीं मान्य केलेलें व ऋषींनीं सांगितलेलें असें हें पुरातन धर्मरहस्य मीं तुम्हांला सांगितलें. १३. १. १२९.

---

## अध्याय १३० वा.

[ १. अरुन्धती व चित्रगुप्त यांनीं सांगितलेलें धर्मरहस्य. ]

( १ ) **भीष्म** :—युधिष्ठिरा, या प्रमाणें कांहींचीं भाषणें झाल्यावर वयोवृद्ध व महात्म्या वसिष्ठाशीं समानशील अशा अरुन्धतीला देवता व ऋषि यांनीं म्हटलें, 'हे कल्याणि, तुझ्याकडून धर्मांचीं रहस्यें ऐकण्याची आमची इच्छा आहे, तर तुला जें अत्यंत गुह्य वाटत असेल, तें आम्हांला सांगण्याची कृपा कर.' हें ऐकून अरुन्धती म्हणाली, 'महाराज, तुमच्या स्मरणानें माझें तप वाढलें असून आतां तुमच्या कृपेनेंच मी शाश्वत धर्म सांगतें. हे धर्म अत्यंत गुह्य व रहस्यमय असून श्रद्धाळु व शुद्धमनाच्या अशा माणसालाच ते सांगण्यासारखे असतात. श्रद्धाहीन, अभिमानी, ब्रह्मघातक, व गुरुपत्नीगमन करणारा हे धर्म ऐकण्यास अपात्र असून त्यांना तो कधीं सांगूं नये. बारा वर्षेंपर्यंत

प्रतिदिवशीं जो कपिला गाय दान देतो, प्रतिमहिन्याला यज्ञसत्र करतो, श्रेष्ठ अशा पुष्कर क्षेत्रांत जो एक लक्ष गाई दान देतो, त्याला मिळणारें जें पुण्य त्याला अतिथीला संतुष्ट करण्याच्या पुण्याची सर कधीं येणार नाहीं. मनुष्यांना सुखावह असा आणखीहि एक रहस्यमय व महाफलदायी धर्म आतां ऐका. पहाटे उठून उदक व दर्भ घेऊन गाईच्या कळपांत जावें व तें पाणी गाईच्या शिंगांवर शिंपून आपल्या मस्तकावर घ्यावें व नंतर उपास करावा. या धर्माचें फळ असें आहे कीं त्यानें त्रैलोक्यांत सिद्धचारणांच्या निवासानें व मोठ्या ऋषींच्या सान्निध्यानें पवित्र झालेलीं जीं कांहीं तीर्थें आहेत त्यांत स्नान केल्यानें श्रेय मिळतें. गाईच्या शिंगांवरून आलेल्या पाण्याचें व या तीर्थांचें स्नान सारखींच होत.' अरुंधतीनें सांगितलेलें धर्मरहस्य ऐकून देव, पितर व इतर मंडळी यांनीं तिची आनंदानें वाहवा केली. ब्रह्मदेव तर म्हणाला, 'हे भाग्यशाली अरुन्धति, तूं फारच रहस्यमय धर्म सांगितला. तूं खरोखर धन्य आहेस. मी तुला वर देतों. तुझ्या तपाची वृद्धि होवो.' यम म्हणाला, 'जी दिव्यकथा मीं तुजकडून ऐकिली ती मोठी रमणीय आहे. आतां मला प्रिय असलेलें चित्रगुप्ताचें मत ऐकून घ्या. आपलें कल्याण इच्छिणाऱ्या मनुष्यानें तसेंच मोठ्या ऋषींनींसुद्धां तें धर्मरहस्य ऐकण्यासारखें आहे. मनुष्य जें कांहीं चांगलें किंवा वाईट कृत्य करतो, त्याचा नाश कधीं होत नाहीं. तें सारें पर्वकालीं सूर्याकडे जातें व तेथें पुण्यात्मा सूर्य तें जाणून त्याचा योग्य वेळीं उपयोग करतो. यासाठीं चित्रगुप्ताच्या मतें शुभ असा धर्म मी थोडासा सांगतों. 'पाणी व दीप यांचें नित्य दान करावें. तसेंच जोडे, छत्री व कपिला गाय हींहि विधिपूर्वक द्यावीं. पुष्कर तीर्थीं वेदवेत्त्या ब्राह्मणाला कपिला गाय द्यावी आणि नित्य प्रयत्नपूर्वक अग्निहोत्र पाळावें. चित्रगुप्तानें सांगितलेला आणखी एक धर्म ऐका. त्याचें फळसुद्धां स्वतंत्रपणें ऐकण्यासारखें आहे. कालक्रमानें सर्वच प्राण्यांना नष्ट झालें पाहिजे. त्यांत अडचणींत सांपडून व भूक, तहान यांनीं पीडित होऊन ते जळून पिचत असतात व त्यांतून त्यांना पळून जाणेंहि शक्य नसतें. त्यांतील मंदबुद्धीचे असतात ते घोर अशा तमोरूप अंधकारांत शिरतात. अशा संकटांत सांपडलेल्या प्राण्यांनीं काय करावें म्हणजे ते त्यांतून सुटतील तें सांगतों. थोडक्यांत होणारें पण फार मोलाचें आणि मरणोत्तर सुखदायक असें पाणी हें एक दिव्य दान आहे. तें देणाराला परलोकीं पुण्योदका नांवाची नदी मिळते; तिचें पाणी अक्षय थंड व अमृतासारखें असतें. दीप देणाराला परलोकीं तमोरूप अंधकार दिसतहि

नाहीं; त्याला सूर्य, चंद्र व अग्नि यांच्यासारखें तेजच मिळतें. त्याला देव मान देतात व साऱ्या दिशा त्याला स्वच्छ होतात. परलोकीं गेल्यावर तो सूर्यासमान प्रकाशतो. म्हणून दीप व पाणी हीं या लोकीं अवश्य द्यावीं. पुष्करक्षेत्रीं कपिला गाय दिल्याचें फळ असें आहे कीं ती देणाराला शंभर गाई बैलांसह दिल्याचें श्रेय मिळतें व त्यानें ब्रह्महत्येसारखें मोठेंहि पाप जरी केलें असलें तरी ती कपिला गाय त्याला त्यांतून सोडविते. यासाठीं कार्तिकांत पुष्करतीर्थीं कपिला गाय द्यावी. सत्पात्र ब्राह्मणाला जोडे दान दिल्यानें कोणतेंहि संकट व दुःख नाहींसें होऊन अडचणी दूर होतात. छत्रदान केल्यास परलोकीं गेल्यावर सुखाची छाया मिळते. तात्पर्य दिलेल्या दानाचा नाश कधीं होत नाहीं.' चित्रगुप्ताचें हें धर्मविषयक मत ऐकून विश्वावसूच्या अंगावर आनंदाचे रोमांच उभे राहिले व तो महातेजस्वी विभावसु सर्व देवता व पितर यांना म्हणाला, 'महात्म्या चित्र-गुप्ताचें हें धर्मरहस्य आतां सर्वांनीं ऐकिलेंच आहे. जे कोणी थोर ब्राह्मणांना श्रद्धेनें अशीं दानें करतील त्यांना कसलेंहि भय रहाणार नाहीं. ज्यांचें निराकरण करतांच येत नाहीं असे धर्मविषयक दोष पांच आहेत. ब्राह्मणघातक, गोघातक, परस्त्रीगमनी, श्रद्धाहीन व स्त्रीच्या जिवावर जगणारा हे पांच दोषी असून त्यांशीं बोलूं नये व सर्वत्र त्यांना वर्ज्य करावें. ते पापी यमलोकीं पू व रक्त खात माशांप्रमाणें नरकांत पिचत रहातात. पितर व देव यांच्या कार्यांत तसेंच स्नातक, ब्राह्मण व तपस्वी यांनीं त्या पांच प्रकारच्या पाप्यांशीं भाषणादि संबंध ठेवूं नये.' १३. १. १२०.

---

## अध्याय १३१ वा.

[ १. प्रमथांनीं सांगितलेलें धर्मरहस्य ]

( १ ) **भीष्मः**—मग ते देव, पितर, ऋषि इत्यादि सर्वजण प्रमथांना म्हणाले, 'तुम्ही मोठे भाग्यशाली असून अदृश्य रूपानें रात्रीं भ्रमण करतां. तुम्ही उष्टयानें वावरणाऱ्या, घाणेरड्या, अशा नीच माणसांनाच पीडितां, तें कां? जेणेंकरून तुम्ही त्यांना पीडणार नाहीं असे उपाय काय बरें सांगितले आहेत? ज्यांच्या योगानें राक्षस मरतील व तुम्हीहि घरांतून नष्ट व्हाल, असे उपाय काय आहेत, ते सर्व तुमच्याकडून ऐकावे असें वाटतें.' प्रमथ म्हणाले, 'मनुष्यें स्त्रीसंगानें अशुद्ध होतात. म्हणून त्यानंतर स्नान न करणारे, वडील

माणसांना अवमानणारे, मोहानें मांस खाणारे, वृक्षाच्या मुळाशीं निजणारे, उशाखालीं मांस घेणारे, उशाकडे पाय करून निजणारे, अशा अशुद्ध माणसांना आम्हीं पीडा देतों व खाऊन टाकतों. आतां जेणेंकरून आम्ही त्यांना मारूं शकणार नाहीं असे उपाय ऐका. अंगाला जे गोरोचन लावतात, जे वेखंड हातांत घेतात व तुपांत उगाळून मस्तकावर लावतात आणि जे मांस खात नाहींत, अशांना आम्हीं पीडूं शकत नाहीं. ज्याच्या घरीं रात्रंदिवस नित्य अग्नि पेटत असतो, तसेंच वाघाचें चम व दाढा आणि डोंगरी कासव हीं ठेविलेलीं असतात, तसेंच तुपाचा धूर, मांजर, व काळा किंवा पिंगट बकरा हे असतात, तीं घरें भयंकर राक्षसांनाहि पीडतां येणें शक्य नाहीं. म्हणून हीं राक्षसनाशक द्रव्यें घरांत बाळगावीं. ज्याविषयीं तुम्हांला शंका होती तो हा विषय मीं तुम्हांला सर्व सांगितला." १३. १. १३१.

---

## अध्याय १३२ वा.

[ १. दिग्गजांनीं सांगितलेलें धर्मरहस्य. ]

( १ ) भीष्म:—मग कमलापासून उत्पन्न झालेला ब्रह्मदेव इंद्रासह सर्व देवांना उद्देशून म्हणाला, 'हा रसातलांत हिंडणारा महाबलवान् तेजस्वी रेणुक हत्ती, तसेंच दुसरेहि वीर्यशाली तेजस्वी महागज सर्व पृथ्वीला पर्वत व अरण्यांसह उचलून धरितात. तुम्हीं सांगाल तर हा रेणुक त्या दिग्गजांकडे जाऊन धर्मांचीं रहस्यें त्यांना विचारून येईल व आपल्याला तीं मग सांगेल.' ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून देवांनीं रेणुकाला त्या पृथ्वीधर दिग्गजांकडे पाठविलें. तेथें जाऊन रेणुक दिग्गजांना म्हणाला, 'हे बलशाली हत्तीहो, पितर व देव यांनीं मला तुमच्याकडे धर्मांचीं रहस्यें ऐकण्याकरितां पाठविलें आहे. तर तुम्हांला जें धर्मतत्त्व मनांतून इष्ट वाटत असेल, तें कृपा करून सांगा.' तेव्हां दिग्गज म्हणाले, 'कार्तिक महिन्यांत वद्य अष्टमीला आश्लेषा नक्षत्र असतां जो गूळ व तांदूळ दान देईल आणि श्राद्धप्रसंगीं मिताहार करून शांतचित्तानें "बलदेव—प्रभृतयो ये नागा बलवत्तराः।" इत्यादि मंत्र म्हणून मुंग्यांच्या वारुळाजवळ बलि देईल व सूर्यास्तसमयीं त्या वारुळावर करंजाचीं फुलें वाहून त्याला निळें वस्त्र लपेटील, त्यावर आम्ही संतुष्ट होऊं. पृथ्वीखालीं तिचा भार घेऊन जरी आम्ही उभे आहों, तरी त्यामुळें आम्हांला तिचा भार वाटणार नाहीं. आम्ही

जरी भारावलेले आहों, तरी हें आम्ही अगदीं निरपेक्षपणें सांगतों. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र जो कोणी उपास करून एक वर्षभर हें दानव्रत करील, त्याला मोठें फळ मिळेल. वारुळापाशीं गुळभाताचा बळी देणें याचें आम्हांला फार महत्त्व वाटतें. त्यामुळें, त्रैलोक्यांत जे महावीर्यशाली हत्ती आहेत, त्या सर्वांचें शंभर वर्षें आतिथ्य केल्याचें श्रेय मिळतें.' दिग्गजांनीं सांगितलेलें हें धर्मरहस्य रेणुकाच्या तोंडून ऐकिलें असतां, देव, पितर व भाग्यशाली ऋषि यांनीं त्याचा बहुमान केला. १. ३. १३२

## अध्याय १३३ वा.

[ १. महादेवानें सांगितलेलें धर्मरहस्य. ]

( १ ) **महादेव**:—तुम्ही सगळ्याचें सार काढून हा उत्तम प्रकारचा धर्म सांगितला. आतां सवानीं मी जें धर्मरहस्य सांगतों तें ऐका. ज्यांची बुद्धि धर्मावर आहे व जे श्रद्धाळु आहेत त्यांनाच रहस्यासह धर्माचा उपदेश केला असतां तो उत्तम फलदायी होतो. प्रसन्न चित्तानें प्रति दिवशीं स्वतः एकदांच जेऊन गाईला अन्न द्यावयाचें असें व्रत महिनाभर करावें. या गाई महाभाग्यशाली असून अत्यंत पवित्र मानिल्या आहेत. त्या देव, असुर व मनुष्यें यांसह त्रैलोक्याला धारण करतात. त्यांची सेवा करण्यांत मोठें पुण्य आहे. गाईला प्रति दिवशीं चारा घालण्यानें मनुष्याला धर्माची जोड होत असते. पूर्वी कृतयुगामध्यें मींच यांना अनुज्ञा दिली व त्यामुळें ब्रह्मदेवानें मला विनंति केल्यावरून मीं त्यांच्या गोठ्यांत गेलों. माझ्या केतूवर बैलाचें चिह्न मीं तेव्हांच लाविलें. मीं गाईशीं खेळ खेळतों म्हणून त्या सदा सर्वांना पूज्य झालेल्या आहेत. त्यांचा प्रभाव मोठा असून त्यांची उपासना केल्यास त्या वर देण्यासहि समर्थ आहेत. सर्व प्रकारचीं पुण्यकर्में केल्यानें जें फळ मिळतें, त्याचा चवथा भाग, त्यांना एक दिवस चारा घातल्यानेंच मिळतो. १३. १. १३३.

## अध्याय १३४ वा.

[ १. स्कंदानें सांगितलेलें धर्मरहस्य. २. विष्णूनें सांगितलेलें धर्मरहस्यश्रवणाचें फल. ]

( १ ) **स्कंद**:—अहो, आतां मला जो धर्म संमत आहे तो लक्ष्यपूर्वक ऐका. निळ्या रंगाच्या बैलाच्या शिंगांवरील माती घेऊन, तीन दिवस स्नान करावें. असें केल्यानें सर्व पाप नाहींसें होऊन परलोकींचें राज्य मिळतें आणि मनुष्य प्रत्येक जन्मीं शूर होतो. आणखी एक रहस्यमय धर्म आहे, तो ऐका. तांब्याचें भांडें पक्वान्नानें भरून मधासह पौर्णिमेला त्याचा उगवत्या चंद्राला बलि द्यावा. असा बली श्रद्धापूर्वक दिल्यास साध्य, रुद्र, आदित्य, विश्वेदेव, अश्विन, मरुत् व वसु हे त्याचा स्वीकार करतात व सोम आणि समुद्र यांची वृद्धि होते. मीं सांगितलेला हा धर्म रहस्ययुक्त व सुख देणारा आहे.

( २ ) **विष्णु**:—हीं जीं धर्मांतील सर्व गुह्यें देव महात्मे ऋषि यांनीं सांगितलीं तीं जो प्रति दिवशीं वाचील किंवा निर्मत्सर बुद्धीनें, श्रद्धेनें व स्थिर चित्तानें ऐकेल, त्याला विघ्न बाधणार नाहीं व भय रहाणार नाहीं. जे पुण्य धर्म रहस्यासह आतांपर्यंत सांगण्यांत आले, ते जो जितेंद्रिय होऊन वाचील त्याला त्यांचें फल मिळेल व त्याला पाप लागणार नाहीं. ते वाचावे, ऐकावे व ऐकवावे, म्हणजे देव व पितर हें त्यांना अर्पिलेलें हव्यकव्य अक्षय खातील. पर्वदिवशीं मनुष्यानें आत्मसंयमन करून ब्राह्मण, देव, ऋषि व पितर यांना ते ऐकवावे म्हणजे तो सर्वांना प्रिय, श्रीमान व धर्मनिष्ठ होऊन महापातका-वांचून इतर कोणत्याहि पापांतून मुक्त होईल. हा रहस्यमय धर्म ऐकल्यास सगळ्या पापांतून सुटका होते.

**भीष्म**:—युधिष्ठिरा, देवादिकांनीं सांगितलेलें धर्मरहस्य व्यासाकडून मीं जसें ऐकिलें तसें तुला सांगितलें. रत्नपूर्ण पृथ्वी व हें उत्तम ज्ञान पाहिजे असेल, तर हें धर्मरहस्य ऐकावें. तें श्रद्धाहीन, नास्तिक, दुष्ट, गुरुद्वेषी अशाला कधीं सांगूं नये. १३. १.१३४.

---

## अध्याय १३५ वा.

[ १. भोज्य व अभोज्य अन्न कोणतें. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांच्यापैकीं कोणाकडे कोणी जेवावें बरें ?

**भीष्म**—ब्राह्मणाकडे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांनीं जेवावें. शूद्रांना ब्राह्मणांनीं जेवावयास घालूं नये. क्षत्रियाकडेहि ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांनीं जेवावें. शूद्र सर्वभक्षक व वाईट कर्म करणारा असल्यामुळें त्याला क्षत्रियानें बोलावूं नये. वैश्य जर नित्य अग्नि बाळगणारे व चातुर्मास्य व्रत पाळणारे असले, तर त्यांना ब्राह्मण व क्षत्रिय यांनीं जेवावयास बोलवावें. शूद्रांकडे जो अन्न घेतो तो सर्व पृथ्वीचा मळ खातो, फार काय पण माणसांचा मळ खातो व पितो असें समजावें. शूद्राकडे सेवा करणारा क्षत्रिय ब्राह्मण किंवा वैश्य स्वतः कर्मनिष्ठ असला तरी तो नरकांत जातो. वेदाध्ययन व राजांचें कल्याणचिंतन यांसाठीं ब्राह्मणांची योजना आहे. लोकांच्या रक्षणासाठीं क्षत्रियांची व पोषणासाठीं वैश्यांची आहे. शेती, गोरक्षण, व्यापार हीं कामें वैश्यांना उक्त असून तीं करून त्यांवर वैश्यांनीं उपजीविका करावी. पण आपलें काम टाकून जो शूद्राचें काम करील, तो कोणी असला तरी शूद्रच समजावा व त्याला जेवावयास बोलावूं नये. वैद्य, हत्यारें करणारा, ग्रामाधिकारी, ग्रामोपाध्याय, व वर्षभर कांहीं तरी वाचीत रहाणारा हे सर्व शूद्रसमानच होत. हीं शूद्रकर्में करणाऱ्यांकडे जो निर्लज्जपणें जेवतो, त्याला त्या अभक्ष्यभक्षणामुळें मोठें भय उत्पन्न होतें. त्याचें कुलीनपण, वीर्य व तेज नष्ट होऊन क्रियाहीनत्वामुळें तो कुत्र्यासारख्या नीच योनींत जातो. वैद्याकडचें अन्न खाणें म्हणजे विष्ठा खाणें होय. व्यभिचारी स्त्रीकडे जेवणें हें मूत्र पिणें असून कारागिराकडील अन्न म्हणजे रक्तासमान होय. आपल्या विद्येवर उपजीविका करणाराचें अन्नहि शूद्रान्नाप्रमाणें समजून सज्जनांनीं वर्ज्य करावें. ज्याची दुष्कीर्ति झाली आहे, त्याचें अन्न रक्तासमान असून दुष्टाच्या हातचें अन्न खाणें हें ब्रह्महत्येसारखें होय. अपमानपूर्वक मिळालेलें अन्न कधीं खाऊं नये. तसें केल्यास ब्राह्मणाला रोग होऊन कुलक्षय होतो. नगररक्षकाकडे अन्न खाणें म्हणजे चांडाळ होणें होय. गोहत्यारी, ब्रह्मघातक, मद्यपी व गुरुपत्नीगमनी, यांच्याकडील अन्न खाल्यास ब्राह्मण राक्षसकुळांत जन्मतो. दुसऱ्यांनीं ठेव म्हणून ठेविलेलें द्रव्य लाटणाऱ्याकडे, कृतघ्न माणसाकडे, व

नपुंसकाकडे भोजन केल्यास, मध्यदेशाच्या पलीकडे असलेल्या शबरांच्या प्रांतांत जन्म मिळतो. युधिष्ठिरा, कोणाकडे जेवावें व कोणाकडे जेऊं नये हें मीं तुला सविस्तर सांगितलें; आतां आणखी तुला माझ्याकडून काय ऐकावयाचें आहे? १३. १. १३५

---

## अध्याय १३६ वा.

[ १. प्रायश्चित्तविधि. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—पितामहा, कोणाला जेवावयास बोलवावें व कोणाला बोलावूं नये, हें तुम्हीं सांगितलें. आतां एक संशय आहे. ब्राह्मणांनीं नाना प्रकारच्या हव्यकव्य द्रव्यांचा स्वीकार केला असतां, त्या दोषाचें निराकरण कोणत्या प्रायश्चित्तांनीं होतें बरें ?

**भीष्म**:—राजा, भलत्याच माणसांकडून दान घेतल्यानें घडणाऱ्या दोषांची निष्कृति कशी होईल तें आतां सांगतों. तुपाचें किंवा तिळाचें दान घेतल्यास सावित्री मंत्र जपून अग्नीला आहुति द्यावी. मांस, मध व मीठ घेतल्यास सूर्योदयापर्यंत उभें रहावें म्हणजे ब्राह्मण दोषमुक्त होतो. सोन्याचें दान स्वीकारल्यास, तसेंच इतर द्रव्य, वस्त्र किंवा स्त्रीचें दान घेतल्यास लोकांसमक्ष लोखंड हातांत घेऊन श्रुतिमंत्र जपल्यास ब्राह्मण दोषांतून सुटतो. अन्न, दूध, उसाचा रस, ऊंस, तेल, हीं घेतल्यास तिन्ही संध्यांच्या वेळीं पाण्यांत बुडी मारल्यानें त्यांचा दोष नाहींसा होतो. तांदूळ, फुलें, फळें, पिठाचें पाणी, कच्चे यव, दहीं, दूध यांचें दान घेतलें असल्यास शंभर वेळां सावित्री जप करावा. उत्तरक्रियेंत जोडे व छत्री हीं घेतल्यासहि शंभर सावित्री जपानें त्या पापापासून सुटका होते. कारागृहवास किंवा सुतक यांसंबंधानें शेताचें दान घेतल्यास तीन रात्री उपास केल्यानें तो दोष जातो. जो ब्राह्मण कृष्णपक्षांत केलेल्या पितृश्राद्धांत भोजन करतो, तो एक अहोरात्र उपास केल्यानें शुद्ध होतो. त्यानें त्या वेळांत संध्या करूं नये, जप करूं नये व त्या अन्नाचें मिश्रण दुसऱ्या अन्नाशीं न होईल असें करावें, यासाठीं पितृश्राद्ध अपराह्णीं सांगितलें आहे. त्यावेळीं अगोदर सांगून ठेविलेल्या ब्राह्मणांना विधियुक्त जेवण घालावें. एखाद्या घरांत मृत्यु झाला असतांना त्याच्या तिसऱ्या दिवशीं जो ब्राह्मण त्यांत भोजन करील त्यानें प्रतिदिवशीं स्नान केल्यास बाराव्या दिवसानंतर तो दोषमुक्त होतो. मात्र बारा दिवस गेल्यावर शुद्ध होऊन

त्यानें ब्राह्मणांना अन्न द्यावें. मृताच्या दहा दिवसांच्या अवधींत त्या घरीं जेवणारास तेंच प्रायश्चित्त देऊन सावित्री मंत्र जपण्यास सांगावा. रैवत साम पठन करवावें व कूष्मांड ( वेदांतील पांच अनुवाक ) म्हणून अघमर्षण करावें, म्हणजे तो शुद्ध होतो. मृताच्या घरीं तीन दिवस जेवल्यास प्रतिदिवशीं तीन वेळां स्नान केल्यानें सात दिवसांनीं शुद्धि होते व सिद्धि प्राप्त होऊन संकटें येत नाहींत. शूद्रासह भोजन केल्यास ब्राह्मण विधियुक्त प्रायश्चित्तानें शुद्ध होतो. वैश्यासह जेवणारा तीन दिवसांच्या दीक्षेनें दोषमुक्त होतो. क्षत्रियासह जेवणारा ब्राह्मण वस्त्रासह स्नान केल्यानें पापमुक्त होतो. एका भांड्यांत जेवल्यास शूद्राच्या कुळाचा नाश होतो, व वैश्याचे पशु व बांधव यांचा होतो; क्षत्रियाचें वैभव नष्ट होतें व ब्राह्मण आपल्या वरिष्ठ तेजाला मुकतो. म्हणून तसें झाल्यास प्रायश्चित्तासाठीं म्हणून शांतिपूर्वक होम करावा व सावित्रीजप, रैवती इष्टि, कूष्मांड व अघमर्षण यांचें अनुष्ठान करावें. कोणी एकमेकांचें उष्टें खाऊं नये. खाल्ल्यास त्या दोषाच्या निरसनार्थ अंगाला गोरोचन, दर्भ व हळकुंड हीं लावावीं. १३.१.१३६

---

## अध्याय १३७ वा.

[ १. दानप्रशंसा ]

( १ ) **युधिष्ठिर**:—पितामहा, दानानें स्वर्ग मिळतो, तसाच तपानेंहि मिळतो, असें आपण सांगितलें. पण त्यांतल्या त्यांत या पृथ्वीवर अधिक हितावह काय तें मला सांगावें.

**भीष्म**:—युधिष्ठिरा, ऐक. अनेक धर्मप्रेमी व शुद्धान्तःकरणाच्या राजांनीं दानानें मिळालेल्या पुण्याच्या बळावर उत्तम लोक प्राप्त करून घेतले. आत्रेयानें शिष्यांना निर्गुण ब्रह्मोपदेश करून श्रेष्ठ लोक मिळविले. उशीनरपुत्र शिबि हा आपले व आपल्या लाडक्या पुत्राचे प्राण ब्राह्मणाच्या कामीं वेचून स्वर्गीं गेला. काशीचा राजा प्रतर्दन आपला पुत्र ब्राह्मणाला दान करून इहपरलोकीं अतुल कीर्ति उपभोगीत आहे. सांकृतिपुत्र रंतिदेव महात्म्या वसिष्ठाची विधियुक्त पूजा करूनच उत्तम लोकाला गेला. देवावृधानें यज्ञासाठीं सोन्याची उत्तम प्रकारची शंभर काड्यांची छत्री ब्राह्मणाला देऊनच स्वर्ग मिळविला. अत्यंत तेजस्वी अशा ब्राह्मणाला सब राज्य दिल्यामुळें अंबरीषाला देवलोक मिळाला. कर्णानें आपलीं दिव्य कुंडलें दिलीं, जनमेजयानें आपलें वाहन व गाई ब्राह्मणाला

दिल्या व वृषादर्भी राजानें विविध रत्नें व रमणीय घरें ब्राह्मणांना दिलीं आणि त्यामुळें ते स्वर्गास गेले. विदर्भराज निमीनें अगस्त्य मुनीला आपली कन्या दिली व त्यामुळें तो पुत्र, पशु, बांधव यांसह स्वर्गास गेला. जमदग्निपुत्र परशुरामानें ब्राह्मणास पृथ्वीदान करून श्रेष्ठ व अक्षय लोक मिळविले. पाऊस पडला नाहीं अशा प्रसंगीं भूदेव वसिष्ठानें सर्व प्राण्यांचा जीव वांचविला व अक्षय उत्तम गति मिळविली. दाशरथी रामानें यज्ञांत द्रव्यदान केलें, त्यामुळें त्याला या लोकीं मोठी कीर्ति मिळाली व अक्षय लोक प्राप्त झाले. राजश्रेष्ठ कक्षसेनानें आपली जमविलेली ठेव महात्म्या वसिष्ठाला देऊन मोठें यश व स्वर्ग-लोक हीं मिळविलीं. करंधमाचा नातू व अविक्षिताचा पुत्र मरुत्त अंगिराऋषीला कन्यादान करून स्वर्गीं गेला. पांचाल देशाचा धर्मनिष्ठ राजा ब्रह्मदत्त शंख मुनीला निधि अर्पून उत्तम गतीला गेला. मित्रसह राजा आपल्या प्रिय भार्येचें दान वसिष्ठाला करून स्वर्गीं गेला. मनुपुत्र सुद्युम्न लिखित मुनीला दान केल्या-मुळें उत्तमलोकीं गेला. सहस्रचित्य राजा ब्राह्मणासाठीं प्राण अर्पिल्यामुळें उत्तम लोकास गेला. शतद्युम्न राजानें सर्व वस्तूंनीं भरलेलें असें सोन्याचें घर मौद्गल्याला देऊन स्वर्ग मिळविला. सुमन्यु राजानें खाद्यपदार्थांच्या पर्वताकार राशी शांडिल्याला दिल्या व स्वर्गप्राप्ति करून घेतली. शाल्वराजा द्युतिमान् नांवाप्रमाणेंच तेजस्वी होता. ऋचीक मुनीला राज्य दिल्यानें त्याला स्वर्गप्राप्ति झाली. मदिराश्व राजानें आपली सुंदर कन्या हिरण्यहस्ताला दिली व देवलोक मिळविला. लोमपाद राजानें आपली शांतानामक कन्या ऋष्यशृंगाला देऊन सर्व इच्छा तृप्त करून घेतल्या. भगीरथ राजानें आपली कन्या हंसी कौत्साला दिली व अक्षय लोक मिळविले. भगीरथानें एक लक्ष सवत्स गाई कोहलाला दिल्या व उत्तमलोकप्राप्ति करून घेतली. हे आणि दुसरे अनेक राजे दान व तप यांच्या योगें स्वर्गाला गेले असून ते पुन: पुन: पृथ्वीवर येतात. पृथ्वी आहे तोंवर त्यांची कीर्ति अचल राहील. युधिष्ठिरा, शिष्ट गृहस्थांनीं दान व तप यांच्या बलावर कोणते उत्तम लोक मिळविले ते त्यांच्या चरित्रासह मीं तुला सांगितले. दान, यज्ञ व प्रजोत्पत्ति यांच्या योगानें त्यांना स्वर्ग मिळाला. यास्तव तूंहि दान व यज्ञ यांवर चित्त ठेवून धर्मसंग्रहाची बुद्धि धारण कर. आतां याविषयीं तुला कांहीं शंका राहिली असेल, तर उद्यां सकाळीं मीं तिचें निरसन करीन. आतां संध्येची वेळ झाली आहे. १३. १. १३७.

---

## अध्याय १३८ वा.

[ १. दानाचे प्रकार व त्यांचीं फळें. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—आजोबा, दानधर्मानें कोणकोण राजे स्वर्गास गेले तें मीं ऐकिलें. आतां दान किती प्रकारचें द्यावें, त्याचें फल काय मिळतें, तें कसें व कोणाला द्यावें म्हणजे धर्माला अनुसरून होतें, तसेंच कोणत्या कारणास्तव कोणत्या प्रकारचें दान द्यावें हें सर्व मला ऐकावयाचें आहे.

**भीष्म**:—युधिष्ठिरा, तुझ्या प्रश्नांचीं उत्तरें ऐक. दान पंचविध समजलें असून तें धर्मबुद्धि, अर्थप्राप्तीची इच्छा, भय, भोगेच्छा, व दयाबुद्धि यांच्यामुळें देण्यांत येतें. तें कसें तें पहा. या लोकीं कीर्ति व परलोकीं उत्तम सुख हीं मिळतात म्हणून निर्मत्सर बुद्धीनें ब्राह्मणाला दान द्यावें, हा पहिला प्रकार. मला हा देतो, मला तो देईल, किंवा अमक्यानें मला दिलें असे याचकांचे शब्द ऐकूनच त्यांना दान द्यावें, हा दुसरा प्रकार. मीं त्याचा नाहीं व तो माझा नाहीं, पण अवमान होऊन परत गेल्यास तो कांहीं दुष्ट कृत्य करील या भीतीनें सुज्ञ मनुष्यानें मूर्खाला दान करावें, हा तिसरा प्रकार. हा माझा आवडता व मी त्याचा आवडता, असा विचार करून याचकाला मित्र समजून समाधानानें दान देणें, हा चवथा प्रकार. हा दीन कांहींतरी मागतो आहे, थोडक्यांत याची तृप्ति आहे, असें म्हणून दरिद्र्याला दयाबुद्धीनें कांहीं देणें हा पांचवा प्रकार. असें हें पंचविध दान पुण्य व कीर्ति यांना वाढविणारें असून यथाशक्ति मनुष्यानें तें करीत असावें असें ब्रह्मदेवानें सांगितलें आहे. १३. १. १३८.

---

## अध्याय १३९ वा.

[ १. विष्णुप्रभाववर्णन. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—आजोबा, आपण सर्व शास्त्रांत निष्णात आहां. आमच्या कुळांत तुम्हींच ज्ञानानें श्रेष्ठ झालां आहांत. कोणत्या गोष्टी धर्माला अनुसरून आहेत व पुढें सुख कशानें मिळेल हें ऐकण्याची माझी इच्छा आहे. सांप्रत काळ कठीण आला आहे. आपल्याशिवाय आम्हांला उपदेशक कोणी उरला नाहीं. बंधूसह माझ्यावर जर आपल्याला कृपा करणें असेल तर मी जे प्रश्न विचारीन त्यांचीं उत्तरें आपण यथास्थित द्यावीं. सर्व राजांना मान्य असा नारा-

यणावतार श्रीकृष्ण आपल्याला बहुमान देऊन आपली सेवा करण्यास आलेला आहे. त्याच्या व या सर्व राजांच्या समक्षच आपण आम्हां बंधूंना प्रेमानें उपदेश करावा.

भीष्मः—युधिष्ठिरा, या कृष्णस्वरूपी विष्णूचा जो प्रभाव मीं पूर्वी ऐकिला आहे, त्याची अत्यंत मनोहर अशी कथा मीं तुला सांगतों. तसाच शंकराचाहि प्रभाव मीं सांगेन, तो ऐक. शंकर व उमा यांचा मध्यें उमेच्या प्रश्नावरून जो संवाद झाला तोहि ऐकण्यासारखा आहे. एकदां धर्मात्म्या कृष्णानें बारा वर्षांचें व्रत केलें. त्याची दीक्षा त्यानें घेतली असतां एकदां नारद व पर्वत हे ऋषि त्याला भेटण्यासाठीं त्याजकडे आले. त्यांच्या समागमें व्यास, धौम्य, देवल, काश्यप, हस्तिकाश्यप हेहि ऋषि आपल्या शिष्यांसह आले होते. कृष्णानें त्यांचा योग्य तो सत्कार आनंदानें केला आणि त्यांना सुंदर रंगाचीं, गवताचीं व दर्भाचीं आसनें बसावयास दिलीं. मग त्यांच्या एकमेकांत राजांविषयींच्या व देवादिकांच्या गोष्टी झाल्या. त्यावेळीं त्या व्रतासाठीं आणिलेल्या इन्धनांतून निघालेलें तेज कृष्णाच्या मुखांतून बाहेर पडून त्यानें समोरचा डोंगर, त्यावरील झाडेंझुडपें, वेली यांसह जाळून टाकिला. त्यांत पक्षी व पशु यांचे थवे जळून गेले. इतर प्राणी, सर्प हेहि जळाले आणि हाहाकार उडून सर्व सामसूम झालें. त्या डोंगराचें शिखर अगदीं उघडें पडून भिकार दिसूं लागलें. तें सर्व जाळल्यावर अग्नि कृष्णाच्या अगदीं पायाशीं आला व जणूं शिष्याच्या नात्यानें त्यानें कृष्णाला वंदनच केलें. डोंगर साफ जळून गेलेला पाहून कृष्णानें आपल्या सौम्य दृष्टीनें त्याकडे पाहून त्याला पूर्ववत् केलें व त्याप्रमाणें त्यावर पूर्वीसारखीं फुलें फुलून, प्राणिमात्रांचा वावर चालू झाला. हा अद्भुत प्रकार पाहून त्या ऋषींना आश्चर्य वाटलें व त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहून नेत्रांतून आनंदाचे अश्रु वाहूं लागले. तें त्याचें आश्चर्य पाहून कृष्ण त्यांना म्हणाला, 'ऋषिहो, तुम्हीं सर्व संगपरित्याग करून निरहंकार झालेले असतांना तुम्हांला असें आश्चर्यचकित होण्याचें कारण काय, तें कृपा करून मला जसें असेल तसें सांगा.' तेव्हां ऋषि म्हणाले, 'कृष्णा, तूं हें त्रिभुवन उत्पन्न करतोस व तूंच त्याचा संहार करतोस. थंडी, उष्णता, पाऊस हीं तूंच असून पृथ्वीवर जे कांहीं स्थावर वा जंगम पदार्थ आहेत, त्यांना तूंच उत्पन्न करणारा आहेस, तूंच त्याचा स्वामी आहेस व त्यांचा मातापिताहि तूंच. यास्तव आम्हाला जें आश्चर्य वाटलें, त्याचें कारण तूंच सांग, म्हणजे आमचें भय नाहींसें होईल व मग

आम्हीं जें पाहिलें किंवा ऐकिलें तें सांगूं.' हें ऐकून कृष्ण म्हणाला, 'ऋषिहो, हें जें माझ्या मुखांतून तेज निघालें व ज्यानें हा डोंगर जाळून टाकिला, तें विष्णूचें तेज असून युगान्तींच्या अग्नीचेंच तें स्वरूप होय. त्यानें तुम्हीं घाबरून गेलांत, पण तसें घाबरण्याचें कारण नाहीं. मीं व्रताचरण करीत असल्यामुळें त्याच्या योगानें तो अग्नि उत्पन्न झाला. माझ्यासारखाच वीर्यशाली पुत्र व्हावा या हेतूनें मीं या पर्वतावर तप करण्यास आलों आहें. या माझ्या देहांत जो आत्मा आहे, तोच अग्निरूपानें बाहेर पडला व वरदात्या ब्रह्मदेवाला भेटण्यासाठीं वर गेला. त्या तेजाच्या अर्ध भागानें तुला पुत्रलाभ होईल असें महादेवानें मला सांगितलें आहे. तो हा अग्नि माझ्या पायांशीं शिष्याप्रमाणें माझी सेवा करण्यासाठीं आला व शांत होऊन मूळस्वरूपांत लीन झाला. असें हें विष्णूच्या प्रभावाचें रहस्य असून तें मीं तुम्हाला थोडक्यांत सांगितलें. तुम्ही तपस्विव्रतानें तेजस्वी झालां असून ज्ञान व विज्ञान यांनीं अलंकृत आहांत, तुम्हांला दूरदृष्टि आलेली असून तुमची गति सर्वत्र अकुंठित अशी आहे. तरी स्वर्गांत किंवा पृथ्वीतलावर फिरतांना जें कांहीं आश्चर्य तुम्हीं पाहिलें किंवा ऐकिलें असेल तें मला सांगा. तुमच्या अमृतमय वाणींतून निघालेल्या मधुर शब्दांची मला मोठी आवड वाटत आहे. या जगांत मला जरी कांहीं अद्भुत दिसलें तरी तें माझेंच स्वरूप असल्यामुळें मला त्यांत कांहीं अद्भुतपणा वाटत नाहीं. श्रद्धेला योग्य असा कांहीं प्रकार कोणी सांगितला किंवा सज्जनांच्या कानीं पडला म्हणजे दगडावरील लेखाप्रमाणें तो पृथ्वीवर शाश्वत रहातो. म्हणून मीं सज्जन भेटले असतां त्यांच्या तोंडून जें ऐकिलें तें मनुष्यांना बुद्धिवर्धक असल्यामुळें आतां सांगणार आहें.' कृष्णाचें बोलणें ऐकून सर्व ऋषि चकित झाले व आपल्या कमलपत्रासारख्या सुंदर नेत्रांनीं कृष्णाकडे पाहूं लागले. कांहीं त्याचें स्तोत्र गाऊं लागले, कांहींनीं त्याची पूजा केली व कांहींनीं ऋग्मंत्रांनीं त्याची स्तुति केली. नंतर त्यांनीं आपला प्रतिनिधि म्हणून वक्तृत्वशाली नारदाला बोलावयास सांगितलें. ते म्हणाले, 'नारदा, हिमालय पर्वतावर जी अचिंत्य व अद्भुत अशी गोष्ट यात्राप्रसंगानें आपल्या अनुभवाला आली ती तूं या ऋषींच्या मेळ्याच्या हितास्तव आरंभापासून जशी दिसली तशी या कृष्णाला सविस्तर सांग.' याप्रमाणें ऋषींनीं विनंति केली असतां देवर्षि नारदानें पूर्वीं घडलेली गोष्ट सांगितली, ती अशी. १३. १. १३९.

---

## अध्याय १४० वा.

[ १. नारदानें सांगितलेला उमामहेश्वर–संवाद. ]

( १ ) भीष्मः—भगवान् नारदमुनीनें शंकराचा उमादेवीशीं जो संवाद झाला तो ऋषींना सांगितला. तो म्हणाला, 'वृषभवाहन महादेवानें पुण्यप्रद हिमालय पर्वतावर तपश्चर्या केली. सिद्ध व चारण यांचा निवास असलेल्या तेथील रम्य तपोवनांत अनेक औषधि व फुलें असून अप्सरांचे थवे व भूतगण यांनीं तें गजबजलेलें असे. तेथें महादेव आनंदानें तप करीत असतां त्याच्या भोंवतीं अनेक रूपें धारण केलेले दिव्य व अद्भुत भूतगण गराडा घालून असत. त्यांतील कांहीं सिंह, वाघ, हत्ती यांचीं रूपें घेत; कोणाचीं तोंडें कोल्हा, चित्ता, अस्वल, बैल, घुबड, लांडगा, ससाणा, यांच्यासारखीं असत व त्यांचे रंगहि चित्रविचित्र असत. किन्नर, यक्ष, गंधर्व, राक्षस इत्यादिहि त्यांत असून तें दिव्य पुष्पें व दिव्य तेज यांनीं भरलेलें असे. दिव्य चंदन व दिव्य धूप यांचा तेथें घमघमाट सुटला असून दिव्य वाद्यांचा गजर चाललेला असे. मृदंग, पडघम, शंख, भेरी यांच्या नादावर भूतगणांचा व मोरांचा नाच तेथें चाललेला असे. असें तें महादेवाचें ठिकाण अत्यंत सुंदर व अवर्णनीय होतें. कृष्णा, तो पर्वत महादेवाच्या तपाच्या योगानें तळपत असून वेदाभ्यासी ब्राह्मणांच्या वेदघोषानें गर्जून जात असे. त्याचें तें रूप अप्रतिमच होतें. भ्रमरांच्या गुंजारवानें दुमदुमलेला, महोत्सवसमारंभासारखा व प्रचंड स्वरूपाचा तो पर्वत पाहून ऋषिगणांना मोठा आनंद वाटे. तेथें थोर थोर मुनि, सिद्ध, मरुत्, वसु, साध्य, इन्द्रासह सर्व देव, यक्ष, नाग, पिशाच, लोकपाल, अग्नि, वायु, महाभूतें, अशीं सर्व येऊन राहिलीं होतीं. ऋतु सर्व प्रकारचीं फुलें तेथें उधळीत. चकचकणाऱ्या वनस्पति त्या वनाला प्रकाशित करीत. त्या पर्वताच्या पठारावर अनेक दिव्य धातु असून तेथें माणसाळलेले अनेक पक्षी आनंदानें नाचत, बागडत व गात असत. व्याघ्रचर्म नेसलेला व सिंहाचें चर्म अंगावर घेतलेला तो महादेव त्या गिरितटावर पलंगावर जणूं बसल्यासारखा दिसत असे. त्याच्या गळ्यांत सर्पाचें यज्ञोपवीत व बाहूंवर लोखंडाचीं भूषणें असून त्याची दाढी व जटा वाढलेली असे. राक्षसांना त्याचें मोठें भय वाटे, पण सर्व भक्तांना तो अभय देणारा होता. त्याला पाहून ऋषि त्याच्यापुढें शिर वांकवीत व सर्व पापांतून मुक्त होऊन जात. त्याचें तें स्थान मोठें अद्भुत होतें. भूतांच्या स्त्रियांनीं वेष्टि-

लेली पार्वती त्याच्याचसारखीं वस्त्रें घेऊन व त्याच्यासारखेंच व्रत धारण करून सर्व तीर्थांतील पाण्यानें भरलेला सोन्याचा कलश हातीं धरून त्याच्यापाशीं आली. मग थोडी थट्टा करण्याच्या बुद्धीनें तिनें हंसत हंसत जवळ जाऊन आपल्या हातांनीं शंकराचे डोळे झांकले. त्यावेळीं डोळे झांकल्याबरोबर सर्व जगत् अंधकारमय व निश्चेष्ट होऊन गेलें व सर्व होम बंद होऊन वषट्काराचा ध्वनि कोठेंहि ऐकूं येईनासा झाला. सर्व लोक विमनस्क होऊन त्रासून गेले व शंकराचे डोळे झांकल्यामुळें त्यांना सूर्यच जगांतून नाहींसा झाल्यासारखें वाटलें. पण एका क्षणानें पुनः सारें जग अंधकारमुक्त झालें. कारण महादेवाच्या ललाटांतून पेटणारी ज्वाळा बाहेर आली व त्याला सूर्यासारखा तिसरा डोळाच उत्पन्न झाला. तो युगान्तीच्या अग्नीप्रमाणें असून त्यानेंच हा पर्वत जाळून टाकिला. त्याचा तो तिसरा डोळा पाहून पार्वतीनें त्याला मस्तक वांकवून नमस्कार केला आणि डोळे भरून त्याच्याकडे पाहिलें. इकडे त्या पर्वतावरील वन आंतील शाल, सरल, चंदन इत्यादि झाडांत जळून जात असतां हरिणादि प्राणी भिऊन तेथून पळूं लागले व आश्रयासाठीं महादेवाजवळ आले. ते जवळ येतांना तें स्थान अगदीं गजबजून गेलें. अग्नीच्या ज्वाळा विजेप्रमाणें चमकत आकाशाला भिडल्या. बाराहि सूर्य उगवले कीं काय असें वाटून कल्पान्त जवळ आल्यासारखें दिसूं लागलें. क्षणांत सारा हिमालय धातुमय शिखरांसह जळून गेला व त्यावरील लता व वनस्पति यांची राखरांगोळी होऊन गेली. पर्वताचा असा नाश झालेला पाहून पार्वती महादेवाला शरण गेली व त्याच्या पुढें हात जोडून उभी राहिली. स्त्रीस्वभावानुरूप करुणेनें उमेला घेरलेलें महादेवानें पाहिलें. आपल्या पित्याचें दैन्य तिच्यानें पहावेना. म्हणून त्यानें त्या पर्वताकडे प्रेमाच्या दृष्टीनें पाहिलें व त्याबरोबर क्षणांत तो पूर्वीसारखा वृक्षलतांनीं व फलपुष्पांनीं टवटवलेला व आनंदानें भराऱ्या मारणाऱ्या पक्ष्यांनीं गजबजलेला दिसूं लागला. त्या स्थितींत त्याला पुनः पहातांच पार्वतीला आनंद झाला व सर्वलोकनाथ अशा महादेवाला ती म्हणाली, 'हे भगवन् शूलपाणे, मला मोठा चमत्कार वाटतो कीं आपल्या ललाटांत तिसरा डोळा कसा उत्पन्न झाला, हा पर्वत वृक्षलतांसह व पक्षिगणांसह जळून कां गेला व त्याला पुनः मूळचें वृक्षाच्छादित रूप कसें मिळालें ? मला याविषयीं कांहींच उलगडा होत नाहीं, तरी कृपा करून तो करा.' हें ऐकून महेश्वर म्हणाला, 'देवि, तूं माझे नेत्र झांकल्यामुळें जगांत क्षणभर प्रकाश नाहींसा झाला. सूर्यच नष्ट झाल्याप्रमाणें सर्व जग अंधकारानें व्याप्त झाल्यामुळें

प्रजेच्या रक्षणासाठीं म्हणून मीं प्रदीप्त असा तिसरा डोळा उत्पन्न केला. त्याच्या प्रचंड तेजामुळें पर्वत जळून गेला, पण तुझें प्रिय करण्यासाठीं मीं त्याला पुनः पूर्वस्वरूपास आणिलें! उमा म्हणाली, 'भगवन्, आपलें पूर्वेकडील मुख चंद्रासारखें रमणीय कशामुळें आहे, तसेंच उत्तरेकडील व पश्चिमेकडीलहि तेजोमय कां आहे, तसेंच दक्षिणेकडील व ऊर्ध्व दिशेकडील आपलीं मुखें रौद्रस्वरूपी कां आहेत, आपल्या जटा पिंगट कां झाल्या आहेत, आपला कंठ मोराच्या पिसाऱ्याप्रमाणें काळा कसा झाला, आपल्या हातांत नित्य पिनाक धनुष्य असतें तें कां, आपला नित्य जटाधारी व ब्रह्मचारी असे कां असतां, या विषयीं माझें शंकानिरसन करावें. मीं आपली सहधर्मचारिणी व भक्त आहें.' युधिष्ठिरा, पार्वतीचें हें बोलणें ऐकून तिच्या बुद्धीचें महादेवाला कौतुक वाटलें व त्यानें तिला आपलीं विविध रूपें कशामुळें झालीं तें सांगितलें. १३. १. १४०.

---

## अध्याय १४१ वा.

### [ १. उमामहेश्वरसंवाद ]

( १ ) **महादेव :**—हे देवि, पूर्वी सर्व सुंदर वस्तूंतून तिळ तिळ भाग घेऊन ब्रह्मदेवानें तिलोत्तमा नांवाची सुंदर स्त्री निर्माण केली. रूपानें अप्रतिम अशी ती सुंदर तिलोत्तमा मला लोभ उत्पन्न करण्यासाठीं मजजवळ आली व मला उजवा घालून फिरूं लागली. ती माझ्या भोंवतीं जशी जशी फिरे तसें तसें तिला पहाण्याच्या इच्छेनें मला एक एक मुख फुटत गेलें व अशा रीतीनें मीं आपलें योगसामर्थ्य प्रकट करीत चतुर्मुख बनलों. त्यांतील पूर्वेकडील मुखानें मीं इन्द्रपद भोगतों, उत्तरेकडील मुखानें, हे देवि, तुझ्याशीं क्रीडा करतों, पश्चिमेकडील माझें मुख सर्व प्राण्यांना सुख देण्याकरितां आहे व दक्षिण मुख रौद्र असून त्यानें मीं प्रजेचा संहार करतों. मीं जटाधारी व ब्रह्मचारी जो आहें तो लोकांच्या हितासाठीं असून देवांचें कार्य तडीस नेण्यासाठीं हातांत पिनाक धनुष्य घेतलें आहे. माझी संपत्ति आपल्याला मिळावी म्हणून इन्द्रानें पूर्वीं माझ्यावर आपलें वज्र फेंकलें असतां तें माझा कंठ भाजून निघून गेलें व तेव्हांपासून मी श्रीकंठ झालों.

**उमा :**—महाराज, येथें सर्व प्रकारचीं दुसरीं वाहनें असतांना आपण बैलच आपलें वाहन म्हणून कां निवडला?

**महेश्वर**:—ब्रह्मदेवानें देवांना दूध देण्यासाठीं सुरभि नांवाची धेनु उत्पन्न केली. तिच्यापासून पुढें अमृतासारखें दूध स्रवणाऱ्या अनेक धेनु झाल्या. त्यांच्या वांसरांच्या तोंडांतून उडणारा दुधाचा फेंस माझ्या अंगावर पडला, तेव्हां रागानें मीं त्यांना भाजून टाकूं लागलों असतां त्यांचे रंग विविध झाले. तेव्हां व्यवहारज्ञ अशा ब्रह्मदेवानें माझी समजूत घातली व मला शांत करून माझें ध्वजचिन्ह आणि वाहन म्हणून मला बैल देऊन टाकला.

**उमा**:—भगवन्, स्वर्गांत आपल्याला सर्व सोईनीं युक्त अशीं रहाण्याचीं अनेक प्रकारचीं स्थानें असतांना तीं टाकून आपण स्मशानांत काय म्हणून रहातां? स्मशान म्हटलें म्हणजे केश, हाडें यांनीं भरलेलें, भयंकर, नरकपालें व मडकीं यांची गर्दी असलेलें, गिधाडें कोल्हे इत्यादि प्राण्यांनीं गजबजलेलें, शेंकडों चिता आंत पेटत असलेलें, मांस, चरबी, रक्त यांच्या चिखलानें माखलेलें व घाणेरडें दिसणारें, इकडे तिकडे आंतडीं व हाडें यांनीं बजबजलेलें असून त्यांत भालूंच्या आरोळ्या सदा ऐकूं यावयाच्या!

**महेश्वर**:—हे देवि, यज्ञाला योग्य अशी पवित्र भूमि मीं पृथ्वीवर सदा शोधीत फिरत असतां स्मशानाहून अधिक पवित्र असें कोठें स्थानच मला मिळालें नाहीं. म्हणून स्मशानांतच माझें मन रमतें. त्यांत वडाच्या झाडांची छाया असते व तुटक्या माळांची शोभाहि असते व त्यामुळें माझे भूतगणहि त्यांतच क्रीडा करतात. मला तर भूतगणांवांचून चैन पडत नाहीं. या ठिकाणीं माझें रहाणें पवित्र व स्वर्गांतल्यासारखेंच असून यज्ञफलेच्छु लोक त्याची पुण्यप्रद व श्रेष्ठ समजून उपासना करतात.

**उमा**:—भगवन्, आपण सर्व धर्म जाणतां; तरी माझ्या मोठ्या संशयाचें निरसन करा. हे सारे ऋषि तप करण्यासाठीं तपस्व्याचा वेष घेऊन अनेक रूपांनीं जगांत भ्रमण करीत असतात. त्यांच्या कल्याणासाठीं व माझी आवड भागविण्यासाठीं धर्मांचें लक्षण काय व तो ज्यांना कळत नाहीं त्यांना तो कसा आचरतां येईल हें मला सांगा.

नारद म्हणतो, 'श्रीकृष्णा, पार्वतीचा हा प्रश्न ऐकून सर्व ऋषींनीं तिची ऋग्मंत्रयुक्त शब्दांनीं स्तुति केली आणि मग महेश्वरानें उत्तर दिलें.'

**महेश्वर**:—अहिंसा, सत्यभाषण, प्राणिमात्राविषयीं दया, शांति व यथाशक्ति दान हा गृहस्थांना उत्तम धर्म होय. परस्त्रियांपासून दूर रहाणें, आपल्याकडे

आश्रयासाठीं ठेविलेल्या स्त्रीचें रक्षण करणें, कोणी दिलें नसतां कांहीं न घेणें, मद्य आणि मांस वर्ज्य करणें, हा पांच प्रकारचा धर्म सुखपरिणामी असून धर्मेच्छु मनुष्यांनीं पाळणें योग्य आहे. त्यापासून इतर धर्मांची उत्पत्ति आहे.

उमा:—भगवन्, चारी वर्णांच्या मनुष्यांना आपापल्या वर्णांत हितावह होईल असा धर्म कोणता? ब्राह्मणांचा कोणता, क्षत्रियांचा कोणता, वैश्यांचा कशा प्रकारचा असावा व शूद्राचा कोणत्या स्वरूपाचा असावा? याविषयीं मला कांहीं सांगा.

महेश्वर:—महाभाग्यशाली ब्राह्मण हे भूमीवरील देवच असून उपवास हा त्यांचा नित्याचा धर्म होय. ब्राह्मण धर्म व अर्थ यांनीं संपन्न असला म्हणजे ब्रह्मत्वाला पोंचण्यास योग्य होतो. त्याचीं धर्मकृत्यें म्हणजे वेदाध्ययन व त्या प्रीत्यर्थ उपनयन संस्कार, व्रताचरण, व गुरु आणि देव यांचें पूजन हीं होत. धर्माचें रहस्य श्रवण करणें, वेदोक्त व्रतांचें अनुष्ठान, अग्निसेवा, गुरुसेवा, भिक्षेवर निर्वाह, नित्य यज्ञोपवीताचें धारण, वेदाभ्यासाची संवय, व ब्रह्मचर्यपालन हे ब्राह्मणाचे पहिले धर्म होत. त्यानंतर त्यानें गुरूची अनुज्ञा घेऊन गृहस्थाश्रम स्वीकारावा व त्यासाठीं अनुरूप स्त्री पाहून तिच्याशीं विधियुक्त लग्न करावें. ब्राह्मणानें शूद्रान्न घेऊं नये, सन्मार्गानें जावें, अग्निहोत्र स्वीकारावें व इंद्रियांचें नियमन करावें; आहार नियमित ठेवून सत्य बोलावें व शुद्ध रहावें. अतिथिपूजन, तीन अग्नींचा स्वीकार, इष्टि, पशुयाग, हेहि धर्म असून ते विधियुक्त आचारावे. यज्ञ जसा मोठा धर्म आहे तशी अहिंसाहि आहे. दिवसांतून एकवार जेवणें व तेंहि सेवक जेवल्यावर जेवणें हाहि ब्राह्मणाचा व विशेषतः विद्वान ब्राह्मणाचा धर्म होय. गृहस्थाश्रमांत पतिपत्नींचें समशीलत्व हाहि धर्मच होय. घरांतील देवतांची पूजा करून त्यांना बलिदान करावें व गंधाचें लेपन करावें. घर झाडून-सारवून स्वच्छ ठेवावें व त्यांत तुपाचा धूर असावा. गृहस्थाश्रमी ब्राह्मणाचा हा धर्म असून तो लोकधारणाचें कार्य करतो. आतां क्षत्रियांचे धर्म सांगतों ते ऐक. क्षत्रियाचा पहिला धर्म म्हणजे प्रजापालन. नेमून दिलेल्या तेवढ्याच फळाचा उपभोग घेणाऱ्या राजाच्या हातूनच धर्म घडतो. प्रजापालनानें राजाला उत्तम लोक मिळतात. राजाचा दुसरा मोठा धर्म म्हणजे इंद्रियदमन व शास्त्राभ्यास. अग्निहोत्रस्वीकार, दान व अध्ययन, तसेंच यज्ञोपवीतधारण, सेवकांचें पोषण, हातीं घेतलेलें कार्य तडीस नेणें, अपराध्याला योग्य तोच दंड करणें, वेदोक्त यज्ञ व कर्में करणें, प्रजेच्या तंटेभांडणाची नीट व्यवस्था लावणें, सत्य भाषणाची

आवड धरणें, दुःखिताला आधार देणें, इत्यादि धर्मांचें पालन केल्यानें राजाला इहपरलोकीं मोठेपणा मिळतो. गाई व ब्राह्मण यांच्यासाठीं पराक्रम गाजवून जो राजा रणांगणावर देह ठेवितो, त्याला अश्वमेघाच्या योगानें मिळणारें स्थानच स्वर्गांत मिळतें.

पशुपालन, शेती, अग्निहोत्रस्वीकार, दान, शास्त्राभ्यास, व्यापार, सन्मार्गानें चालणें, अतिथिपूजन, शांति, इंद्रियनिग्रह, ब्राह्मणांचें स्वागत, हे वैश्यांचे शाश्वत धर्म होत. त्यानें तीळ, सुगंधि द्रव्यें व रस हे मात्र विकूं नयेत. अशा रीतीनें चालून व्यापार करणारा वैश्य सन्मार्गी होय. यथाशक्ति व यथोचित असें तिन्ही वर्गांचें आतिथ्य व ब्राह्मणांची सेवा हा शूद्रांचा नित्य धर्म होय. दारीं आलेल्या अतिथीची सेवा करणारा सत्यभाषणी व इंदियनिग्रही शूद्र मोठें तप सांठवितो. देवता व ब्राह्मण यांची पूजा करणारा सदाचारी शूद्र धर्माचें इष्ट तेंच फळ मिळवितो. हे देवि, या चारी वर्णांचे धर्म तुला पृथक् पृथक् सांगितलें. आतां आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे बरें ?

**उमाः**—हे भगवान्, चारी वर्णांना हितकारक असे वेगवेगळे धर्म आपण सांगितले. आतां सर्वांना सारखे लागू पडणारे धर्म सांगावे.

**महेश्वरः**—हे देवि, ब्रह्मदेवानें लोकरक्षणासाठीं पृथ्वीवरील देवच असे ब्राह्मण उत्पन्न केले; त्यांच्या धर्मांचें व कर्मांचें फल काय असतें तें सांगतों. ब्राह्मणामध्यें जो धर्म असतो तोच श्रेष्ठ धर्म होय. स्वयंभू ब्रह्मदेवानें जगाच्या धारणासाठीं तीन प्रकारचे धर्म पृथ्वी उत्पन्न करतांनाच निर्माण केले. ते कोणते तें ऐक. वेदांत सांगितलेला तो पहिला धर्म; स्मृतिशास्त्रांत सांगितलेला तो दुसरा; व शिष्टांनीं आचरलेला तो तिसरा. हे तिन्ही सनातन धर्म होत. ब्राह्मणानें तिन्ही वेदांचें पठन करावें. पण त्यावर उपजीविका चालवूं नये. दान, अध्ययन व यजन हीं करून जो ब्राह्मण काम, क्रोध व लोभ यांचा त्याग करतो, त्याला मैत्र म्हणतात. ब्राह्मणाला जगत्पतीनें सहा कर्मे सांगितलीं आहेत. यजन, याजन, दान, प्रतिग्रह, अध्ययन व अध्यापन. हीं सहा कर्मे करणारा ब्राह्मण धर्मिष्ठ होय. त्यांतील याजन, प्रतिग्रह व अध्यापन हीं त्याच्या उपजीविकेसाठीं सांगितलीं आहेत. उरलेलीं अधिक प्रशस्त असून तीं प्रत्येकानें यथाविधि व यथाशक्ति करीत असावीं. शांति हा गृहस्थांचा धर्माचा मोठा सांठा होय. जो पंच यज्ञ करून शुद्धचित्त झाला आहे व सत्यवक्ता असून निर्मत्सर आहे, जो

दान देतो व ब्राह्मणांचा आदर करतो, जो घर नीटनेटकें ठेवतो, अहंकार दाखवीत नाहीं, निष्कपट व गोड बोलणारा आहे, आलेल्या पाहुण्याचा सत्कार करतो व त्याला भोजन घालून मग स्वतः जेवतो, जो पाहुण्याला पाय धुवावयास पाणी, अर्घ्य, आसन, शयन, दीप, आश्रय इत्यादि देतो तो खरा धार्मिक होय. सकाळीं लवकर उठून आचमन करून व ब्राह्मणांना जेऊं घालून जो त्यांची पाठवणी करतो त्याचाच धर्म सनातन होय.

आतां गृहस्थाश्रमांतील प्रवृत्तिधर्म म्हणून जे सांगितले आहेत ते मीं सांगतों. त्यामुळें प्राणिमात्राचें हित होतें. ते धर्म म्हणजे नित्य दान करावें, वारंवार यज्ञ करावा व वैभवाच्या इच्छेनें धार्मिक कर्मे करावीं हे होत. धर्ममार्गानें द्रव्य संपादावें व त्याचे तीन भाग करून एक धर्म करावा, दुसऱ्याचा स्वतः उपभोग घ्यावा व तिसरा वाढीस लावावा. याशिवाय दुसरा धर्म म्हणजे निवृत्तिस्वरूपाचा. मोक्षप्राप्ति हा त्याचा उपयोग. त्याचें स्वरूप आतां मी सांगतों. सर्व प्राण्यांवर दया करावी, एकाच गांवांत नित्य राहूं नये व आशापाश तोडून टाकावे. मोक्षेच्छूला हा धर्म प्रशस्त होय. झोंपडी, पाणवठा, वस्त्र, आसन, दंड, शयन, अग्नि, आसऱ्याचें स्थान, यांपैकीं कशावरहि आसक्ति ठेवूं नये. नित्य आत्मचिंतन करावें व योगांत मग्न असावें. झाडाच्या बुंधाशीं किंवा रिकाम्या घरांत रहावें. नदीच्या वाळवंटावर निजावें व नदीतीराची आवड धरावी. सर्व वस्तूंवरील आसक्ति व स्नेहाचीं बंधनें सोडून मोक्षार्थी ब्राह्मणानें स्वतःशीं आत्मभावाचाच विचार करीत असावें. खांबाची वृत्ति स्वीकारून निराहार रहावें व मोक्षप्रद कर्मानें घरांतून बाहेर पडावें हा मोक्षेच्छूचा सनातन धर्म होय. एका ठिकाणीं राहूं नये व एका गांवांतहि फार वेळ वास करूं नये. मोकळेपणानें आज एका वाळवंटावर तर उद्यां दुसऱ्यावर असें भटकावें, असा मोक्षेच्छूंचा सन्मार्ग वेदांत सांगितला आहे. जो या मार्गानें जातो, त्याची गति कोणालाहि कळत नाहीं.

असे मोक्षार्थी भिक्षु चार प्रकारचे असतात. एकाच झोंपडींत रहाणारा कुटीचक, अनेक ठिकाणीं फिरून निरनिराळें पाणी पिणारा बहूदक, हंस आणि परमहंस असे ते होत. यांत कुटीचकापासून उत्तरोत्तर श्रेष्ठ समजावे. परमहंस सर्वश्रेष्ठ होय. त्याची स्थिति सुखदुःखांच्या पलीकडची, स्वास्थ्याची, शाश्वत व टिकाऊ असते.

**उमा** :—भगवन्, गृहस्थधर्म व मोक्षधर्म सांगून झाले. हा मार्ग सर्वांना कल्याणकारक आहे. आतां पुढें ऋषींचे धर्म ऐकावे अशी इच्छा आहे. तपोवनांत

रहाणाऱ्या ऋषींची मला मोठी आवड आहे. तुपाच्या धुराचा सुगंध तपोवनाला भरून टाकतो; तें पाहून माझें मन आनंदित होतें. तरी मुनिधर्मांविषयींचा माझा संशय दूर करा.

**महेश्वर :**—हे देवि, ज्या धर्माच्या आचरणानें मुनींना तपानें सिद्धि मिळाली ते धर्म आतां सांगतों. धर्मवेत्त्या फेनप (फेंस पिणाऱ्या) ऋषींचा धर्म प्रथम ऐक. यज्ञामध्यें ब्रह्मदेव अमृत पीत असतां, त्याच्या फेसाचे कण वर उडत, ते जे प्याले त्यांना फेनप म्हणतात. असा त्यांचा धर्ममार्ग होता. तपानें सिद्धि मिळविलेले जे वालखिल्य ते सूर्यमंडळांत रहातात व पक्ष्यांची वृत्ति स्वीकारून शेत कापून नेल्यावर खालीं पडलेले दाणे टिपून त्यांवर उपजीविका करतात. हरिणाचें कातडें व वल्कलें हींच त्यांचीं वस्त्रें. सुखदुःख, उष्ण, शीत यांच्या पलीकडे ते गेलेले असतात. त्यांचें शरीर अंगठ्याच्या पेराइतकें असून ते आपल्या धर्मामध्यें गढलेले असतात. त्याशिवाय त्यांना दुसरें कांहीं नको असतें व त्यांना त्या तपाचें फलहि मोठें मिळतें. देवकार्यासाठीं ते देवांच्या बरोबरीला जातात आणि तपानें पाप जाळून टाकून सर्व दिशा उजळून सोडतात. शुद्ध मनाचे दयाधर्मांत रंगून गेलेले दुसरे चक्रचर (एका ठिकाणीं न रहाणारे) नांवाचे पवित्र तपस्वी असतात, ते पितृलोकाजवळच्या सोमलोकांत राहून सोमकिरणांवरच निर्वाह करतात. ते प्रतिदिवशीं अन्नपात्रें धुवून पुसून साफ ठेवितात, दगडांनीं आपलें अन्न कुटतात आणि उखळाचें काम दांतांनींच करतात. सोमप आणि उष्मप या तपस्व्यांच्या व देवांच्या सन्निध असून ते आपल्या स्त्रियांसह उंच्छवृत्तीनें म्हणजे शेतांत उरलेले दाणे टिपूनच निर्वाह करतात व अग्नीला आहुति देणें, पितृपूजा करणें, पंच यज्ञ करणें हाच ते आपला धर्म समजतात. देवलोकीं फिरणाऱ्या या चक्रचर मुनींनीं आचरिलेला दुसराहि ऋषिधर्म आतां सांगतों, तो ऐका. सगळ्या ऋषिधर्मांत इंद्रियसंयमनपूर्वक आत्मज्ञान करून घेणें मुख्य असतें. काम व क्रोध, यांनाहि मग जिंकिलें पाहिजे. उंच्छवृत्तीनें मिळविलेल्या अन्नानें अग्नीला आहुति देणें, धर्मसत्राला बसणें, सोमयाग करून यज्ञदक्षिणा देणें, नित्याचीं यज्ञकर्में, धर्मकृत्यें, पितृपूजन, देवपूजन व अतिथिपूजन या गोष्टी करणें त्यांना अवश्य आहे. गोरसाच्या पदार्थांपासून निवृत्ति, शांतवृत्तीची आवड, स्थंडिलावर शयन, योगसाधन आणि शाकाहार, वायु पाणी व शेवाळ खाऊन रहाणें, हे ऋषींचे नियम असून त्यांच्या पालनानें ते कोणी न जिंकलेले लोक जिंकतात. घरांतील विस्तव विझवून धूर नाहींसा

झाला, मुसळें कोपऱ्यांत जाऊन बसलीं, भांडीकुंडीं घासून विसळून जाग्यावर बसलीं, कोणाचेंहि जेवण व्हावयाचें राहिलें नाहीं, भिक्षेकरी येऊन गेले, अशा वेळीं अतिथीची वाट पाहून उरलेल्या अन्नावर रहाणारा जो सत्यव्रती शांत मनुष्य त्यालाच मुनिधर्माचें फळ मिळतें. मुनीनें अहंकारानें फुगलेला, गर्विष्ट, कष्टी, किंवा असंतुष्ट असें असूं नये, मित्र व शत्रु यांना समान लेखावें आणि सर्वांशीं स्नेहानें वागावें. असें करील तोच श्रेष्ठ धर्मवेत्ता होय. १३. १. १४१

---

## अध्याय १४२ वा.

[ १. उमामहेश्वरसंवाद–पुढें चालू ]

(१) उमाः—हे भगवन्, रमणीय प्रदेश, नद्यांचे झरे, ओहोळाजवळचे लताकुंज, पर्वत, वनें, फलयुक्त अशीं पवित्र स्थानें, कंदमुळांनीं युक्त अशीं यज्ञोचित स्थानें, या ठिकाणीं जे वानप्रस्थ मुनि व्रतें पाळून व शरीरपोषण करून रहातात, त्यांची रीत कशी असते ती मला ऐकावयाची आहे.

महेश्वरः—हे देवि, वानप्रस्थांचे धर्म सांगतों ते एकचित्तानें ऐक आणि धर्माकडे मन लाव. वनवास पत्करलेल्या वानप्रस्थांनीं उत्तम प्रकारचे नियम पाळून आपलीं कर्में कशीं करावीं तें ऐक. त्यांनीं त्रिकाळ स्नान करून पितर व देव यांची पूजा करावी, अग्नीला आहुति देऊन इष्टि कराव्या, देवभात गोळा करावें, फळेंमुळें खावीं, अंगाला इंगुदीचें व एरंडीचें तेल लावावें. त्यांनीं योगसाधन करून सिद्धि मिळविल्यावर कामक्रोधांपासून अलिप्त होऊन वीरासन घालून वीरस्थानीं रहावें. ग्रीष्मऋतूंत पंचाग्नि भोंवतीं ठेवून योग साधावा. मंडूकासन अभ्यासावें, थंडी, पाणी व अग्नि यांच्या सन्निध उघड्यावर शयन करावें, पाणी, वारा व शेवाळ हीं खाऊन निर्वाह करावा, वस्तु फोडण्याला दगडांचा व दातांचा उपयोग करावा, अन्नपात्रें प्रतिदिवशीं रिक्त करून धुऊन ठेवावीं, फाटकीं वस्त्रें, वल्कलें किंवा मृगचर्में अंगावर घ्यावीं, नित्य वनांत रहावें व वनांत फिरावें व वनजीवी होऊन वनालाच गुरु समजावें. त्यांनीं अग्नीला आहुति द्यावी, पांची यज्ञ करावे. वेदांत सांगितल्याप्रमाणें पांची यज्ञांचा योग्य वेळ साधावा, दुसरे चातुर्मास्य, पौर्णमास्य इत्यादि यज्ञ करावे. नित्याचे यज्ञहि त्यांनीं तसेच करावे. स्त्रियांचा संबंध व इतर सर्व व्यवहार सोडून द्यावे म्हणजे ते सर्व पापांपासून मुक्त होऊन जातात. मुनींनीं लांकडी पळ्या व भांडीच

वापरावीं, तिन्ही अग्नींची सेवा करावी व चांगल्या मार्गानें वागावें म्हणजे त्यांना उत्तम गति मिळते, व अत्यंत पवित्र असे जे शाश्वत ब्रह्मलोक व सोमलोक त्यांची त्या सत्यधर्मपरायण मुनींना प्राप्ति होते. असा हा वानप्रस्थांचा धर्म असून तो मीं साधारण विस्तारानें सांगितला आहे.

**उमा**:—हे भगवन्, आपण सर्व जगाचे स्वामी असून सर्वजण आपल्याला नमस्कार करतात. ऋषिसमुदायांत ज्ञानाच्या गोष्टी चालल्या म्हणजे त्यांत कोणत्या धर्माचा खल होतो? त्या ज्ञानचर्चेंत सिद्ध व वानप्रस्थ असे असून कोणी स्वतंत्र तर कोणी सकुटुंबहि असतात. तरी त्यांचा धर्म कसा असतो तें आपण सांगा.

**महेश्वर**:—हे देवि, त्यांत जे स्वतंत्र असतात ते मुंडन करून भगवीं वस्त्रें घेतात व जे सकुटुंब असतात ते रात्रीं रहावयास घरीं येतात. सर्वांनीं तीन वेळ स्नान करावें व ऋषि करतात तसें फलमूलांचें हवन सकुटुंबीयांनीं करावें. योगसाधन व सन्मार्गाचें वर्तन हें सर्वांनाच आहे. पूर्वीं जे वानप्रस्थांचे धर्म सांगितले तेहि जर हे पाळतील तर त्यांनाहि तपाचें फळ मिळेल. कुटुंबासह असणाऱ्यांनीं स्वस्त्रीशींसुद्धां यथोचित कालींच संबंध ठेवावा व मनास वाटेल तसें वागूं नये. सर्व प्राण्यांना अभय द्यावें म्हणजे हिंसादोषापासून मुक्त होऊन त्यांना धर्माची जोड मिळते. सर्व भूतांवर दया करून त्यांशीं अगदीं सरळपणें वागणारा व आपल्याप्रमाणेंच सर्वांना मानणारा मुनिच धर्माची जोड करतो. यज्ञाचें अंगभूत असें स्नान व सरळपणा हीं दोन्ही वेदांत सारख्याच योग्यतेचीं मानिलीं आहेत. किंबहुना सरळपणाची योग्यता अधिकच भरेल. सरळपणा हा सद्धर्म असून कपट हा अधर्म होय. सरळपणें वागणाऱ्या माणसालाच धर्माची जोड होते. सरळपणाची आवड धरणाराला नित्य देवांसन्निध रहावयास मिळतें. यास्तव धर्मेच्छूनें सरळपणा धरावा. क्षमाशील, इंद्रियदमन करणारा, क्रोध सोडलेला, धर्मशील, हिंसा न करणारा, अशाच माणसाला धर्माची जोड मिळते. आळस सोडून यथाशक्ति सन्मार्गाचें अवलंबन करणारा सदाचरणी सुज्ञ धर्मात्मा ब्रह्मस्वरूप होण्यास पात्र बनतो.

**उमा**:—हे देवा, जे तपस्वी आश्रमाची आवड धरितात, त्या तेजस्वी तपोधनांची रहाणी कशी असते? राजे, राजपुत्र, दरिद्री, श्रीमंत यांना कोणत्या कर्मानें मोठें फळ मिळतें? वानप्रस्थांना कोणत्या कर्मांनीं शाश्वत स्थान मिळून

ते दिव्यचंदनानें विभूषित होतात? तपश्चर्येसंबंधानें एवढा माझा संशय पूर्णपणें दूर करावा.

**महेश्वर**:—हे देवि, इंद्रियसंयमन करून उपवास, अहिंसा, सत्य इत्यादि व्रतांच्या बलावर सिद्धि मिळविलेले पुरुष परलोकीं गंधर्वांसह खुशालपणें आनंदोपभोग घेतात. मंडूकासनानें यथाशास्त्र योगसाधन करणारा पुरुष दीक्षा घेईल तर तो धर्मात्मा नागांसह आनंद भोगील. हरिणांच्या तोंडांतून गळलेलें कोंवळें गवत जो त्या हरिणांच्या समागमें खाईल तो दीक्षाधारी अमरावतीस जाऊन आनंद भोगील. व्रतधारण करून जो शेवाळ किंवा वाळलेलीं पानें खाऊन रहातो व थंडी सहन करतो त्याला उत्तम गति प्राप्त होते. वायु, पाणी, फळें, मुळें हीं खाऊन रहाणारा व्रतनिष्ठ यक्षलोकीं ऐश्वर्य संपादून अप्सरांच्या समुदायांत आनंदानें रहातो. अग्नीचा ताप ग्रीष्मऋतूंत सहन करून जो शास्त्रविहित मार्गानें बारा वर्षें व्रत आचरतो तो सर्व पृथ्वीचा राजा होतो. बारा वर्षें आहार नियमित करून जो पाणीहि न पितां रहाण्याचा प्रयत्नानें अभ्यास करतो तोहि सार्वभौम राजा होतो. अगदीं मोकळ्या जागीं स्थंडिलावर राहून जो आनंदित मनानें बारा वर्षांची व्रतदीक्षा घेतो व उपवासानें देहत्याग करतो त्याला स्वर्गांत सुख मिळतें. स्थंडिलावर रहाण्यानें रथादि वाहनें, शयनें, चंद्रासारखीं चकाकित उंची घरें, हीं प्राप्त होतात. इंद्रियदमनपूर्वक आहार नियमित करून जो रहातो, किंवा कांहीं न खातां देहत्याग करतो त्याला स्वर्ग मिळतो. बारा वर्षांची दीक्षा घेऊन रहाणारा व शेवटीं समुद्रांत देहत्याग करणारा वरुणलोकाचा उपभोग घेतो. तशीच दीक्षा घेऊन शेवटीं दगडानें पाय ठेंचून घेणाराला गुह्यकलोकीं सुखोपभोग मिळतो. द्वंद्वातीत व निःसंग होऊन जो आत्मज्ञान करून घेतो, त्यानें ही मनोमय दीक्षा बारा वर्षें पाळिल्यास त्याला स्वर्ग मिळतो व तो देवांच्या संगतींत आनंद उपभोगितो. बारा वर्षांची दीक्षा पाळून अग्नींत देहसमर्पण करणाराला अग्निलोकीं मोठेपणा मिळतो. जो धर्मेच्छु मनुष्य निरहंकार होऊन यथाविधि दीक्षा पालन करतो व आत्म्याकडे चित्त लावून बारा वर्षें रहातो व मग अरणी झाडाच्या बुंधाला बांधून निघून जातो आणि वीराच्या मार्गानें वीरासन घालीत नित्य वीरासारखा उघड्या जागीं फिरतो, त्याला वीराला मिळणारी गति मिळते, त्याचे सर्व हेतु पूर्ण होऊन तो इंद्रलोकीं जातो, त्यावर दिव्य पुष्पांचा वर्षाव होऊन त्याचें अंग दिव्यचंदनाच्या उटीनें विभूषित होतें व तो स्वर्गांत देवांच्या

संगतींत सुखानें रहातो. वीरयोग स्वीकारून व सर्वसंगत्यागपूर्वक इंद्रियनिग्रह करून जो शरीर व मन शुद्ध ठेवतो, त्याला वीराची गति मिळून तो शाश्वत लोकीं जातो व कामसंचारी विमानांतून त्याला उत्तम लोकीं वाटेल तिकडे फिरावयास मिळतें. तो सर्व संकटांतून मुक्त होऊन आनंद भोगितो. १३.१.१४२.

## अध्याय १४३ वा.

[ उमामहेश्वर संवाद–पुढें चालू ]

( १ ) उमा :—हे भगवन्, माझा आणखी एक संशय दूर करावा. पूर्वी ब्रह्मदेवानें चातुर्वर्ण्य उत्पन्न केलें. मग वैश्य शूद्रत्वाला कसा जातो, तसाच क्षत्रिय वैश्य कसा होतो व ब्राह्मण क्षत्रिय कसा होतो? हा उलट क्रम कशानें टाळतां येईल? ब्राह्मण शूद्रयोनींत कशानें जन्म पावतो, क्षत्रिय शूद्र कशानें होतो, तसेंच तिन्ही वर्णांना स्वाभाविक ब्राह्मण्य कसें प्राप्त होईल, हें सर्व मला सांगा.

महेश्वर—हे देवि, ब्राह्मण्य फार दुर्लभ आहे; तें जन्मानेंच प्राप्त होतें. तसेंच क्षत्रिय, वैश्य व शूद्र हेहि जन्मानेंच होतात असें माझें मत आहे. पण उत्तम वर्ण मिळाला असतांहि वाईट कर्मानें ब्राह्मण आपल्या स्थानापासून भ्रष्ट होतो; यासाठीं ब्राह्मणानें आपल्या कर्माला जपलें पाहिजे. ब्राह्मणाच्या रीती-प्रमाणें राहून ब्राह्मणधर्मानें उदरनिर्वाह करणारा क्षत्रिय किंवा वैश्य पुढील जन्मीं ब्राह्मणजन्मास जातो. उलट जो ब्राह्मण आपलें कर्तव्य सोडून क्षात्र-मार्ग स्वीकारतो तो ब्राह्मणत्वाला मुकून पुढील जन्मीं क्षत्रिययोनींत जातो. तसाच जो अल्पबुद्धि ब्राह्मण लोभानें किंवा मोहानें दुर्लभ असें ब्राह्मण्य टाकून वैश्यकर्म करतो तो वैश्ययोनींत जन्मतो. याच क्रमानें वैश्यहि शूद्रत्वाला पोंचतो. अशा रीतीनें आपल्या कर्तव्यापासून चळलेला ब्राह्मण शेवटीं शूद्र होतो व तेथून नरकास जाऊन वर्णभ्रष्ट व बहिष्कृत होत्साता ब्रह्मलोकांतून गडगडत शूद्रयोनींत जन्मास येतो. क्षत्रिय व वैश्य हेहि जर स्वकर्तव्यभ्रष्ट होऊन शूद्र-कर्म करतील तर तेहि आपल्या वर्णापासून च्युत होऊन वर्णसंकर करतील. या प्रमाणें असले ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य शूद्रत्वाला पोंचतात. पण स्वकर्तव्याचें ज्ञान करून घेऊन जो शुद्ध व धर्मनिष्ठ रहातो, त्याला त्या धर्माचें फळहि मिळतें. याविषयीं ब्रह्मदेवानें स्वतः म्हटलें आहे कीं, 'धर्मेच्छु सज्जन निष्ठापूर्वक अध्या-त्माचा विचार करतात. दुष्ट मनुष्यानें दिलेलें, निंद्य मानलेलें, मोठ्या समाजासाठीं

शिजविलेलें, श्राद्धासाठीं सिद्ध केलेलें, तसेंच शूद्राच्या घरचें अन्न कधीं खाऊं नये.' हे देवि, शूद्रान्न मोठ्या देवांनीं देखील निन्द्य मानिलें आहे. ब्रह्मदेवाच्या तोंडूनच हें निघालेलें असल्यामुळें तें अगदीं सत्य आहे, असें माझें मत आहे. शूद्रान्नाचा अवशेष पोटांत असतांना जो ब्राह्मण मरण पावेल, तो अग्निहोत्री किंवा यज्ञदीक्षित असला तरी तो शूद्रयोनींत जाईल. शूद्रान्नानें ब्राह्मण स्वपदापासून भ्रष्ट होऊन शूद्र होतो यांत कांहीं संशय नाहीं. ज्याचें ज्याचें म्हणून अन्न ब्राह्मण खाईल व त्याचा अवशेष पोटांत असतांना मरेल त्याची त्याची योनि त्याला प्राप्त होईल. सोन्यासारखें ब्राह्मणत्व मिळालें असतां त्याचा अवमान करून जो ब्राह्मण अभक्ष्य अन्न भक्षील, तो ब्राह्मणत्वापासून च्युत होईल. मद्य पिणारा, ब्रह्मघातकी, नीच, चोर, व्रतभ्रष्ट, अशुद्ध, वेदांचा अभ्यास सोडून देणारा, पापी, लोभी, लबाड, कपटी, शूद्र स्त्रीशीं संबंध ठेवणारा, अन्न शिजविलेल्या पात्रांतच जेवणारा, सोम विकणारा, नीचाची सेवा करणारा, अशा प्रकारचा ब्राह्मण ब्राह्मणयोनींतून भ्रष्ट होतो. गुरुपत्नीगमन करणारा, गुरूचा द्रोह व निंदा करणारा असा ब्राह्मण ब्रह्मवेत्ता असला तरी ब्राह्मणयोनींतून भ्रष्ट होतोच. पण शूद्र जर शुभ कर्म करील, तर तो ब्राह्मण होईल व वैश्यहि क्षत्रियत्वाला पोचूं शकेल. उच्च वर्णांची सेवाचाकरी प्रयत्नपूर्वक करणें हें जें शूद्राचें काम तें तो यथायुक्त मनःपूर्वक सतत करीत राहील, सन्मार्गानें चालेल, देव–ब्राह्मणांचा सत्कार करील, अतिथीचें स्वागत करील, नियमित आहार करून आत्मसंयमनपूर्वक ऋतूकालींच स्वस्त्रीशीं गमन करील, स्वतः चोख राहून चोख वर्तनाच्या माणसांचेंच अनुकरण करील व दुसऱ्यांना देऊन राहिलेलें अन्न मात्र भक्षील, तसेंच भलत्याच प्रसंगीं मांस खाणार नाहीं, तर तो शूद्र वैश्यत्वाला पोंचेल. त्याचप्रमाणें जो वैश्य सत्यभाषण करील, अहंकार सोडून व समबुद्धि ठेवून शांतवृत्तीनें राहील, नित्य यज्ञ करील, शुद्ध राहून वेदाध्ययन करील, इंद्रियदमन करील, ब्राह्मणांचा सत्कार करील व सर्व वर्णांचें कल्याण चिंतील, गृहस्थधर्म पाळून दोनच वेळ प्रति दिवशीं भोजन करील, इतरांना देऊन उरलेलें अन्नच भक्षील, आहाराचें नियमन करील, निरिच्छ राहून अग्निहोत्र बाळगील व यथाविधि अग्नीला आहुति देईल, सर्वांचें योग्य आतिथ्य करील व अग्नीची तिन्ही वेळां मंत्रयुक्त पूजा करील, तो ब्राह्मण होईल. प्रथम तो मोठ्या व शुद्ध क्षत्रिय कुळांत जन्मतो व तेथें जन्मापासूनच्या संस्कारांमुळें उपनयन झाल्यावर व्रतनिष्ठ होऊन सत्कार पावतो व पुढें ब्राह्मण होतो.

क्षत्रियजन्मांत तो दान देतो व पुष्कळ व भरपूर दक्षिणा देऊन यज्ञ करतो, वेदाध्ययन करतो व स्वर्गाच्या इच्छेनें तीन अग्नींचा परिग्रह करतो. तो दुःखितांना हातभार लावितो, प्रजेचें पालन धर्मानें करतो, खरीं तींच कर्में करितो व नित्य प्रसन्नमुख असतो. तो धर्मानुसार दंड करतो, अपराध्याला शासन केल्यावांचून रहात नाहीं, व्यवहाराच्या नियमांनीं बांधलेला असतो व प्रजेपासून केवळ सहावा भागच कर म्हणून घेतो. राजानें पुरुषार्थ जाणून ग्राम्यधर्माचें आचरण करूं नये, ऋतुकालीं आपल्या पत्नीशीं गमन करावें, नित्य उपवासादि व्रत करावीं व शुद्ध राहून आवडीनें वेदाभ्यास करावा. त्यानें नित्य अग्निग्रहामध्यें दर्भाच्या आसनावर निजावें, मनःपूर्वक सर्व लोकांचें आतिथ्य करावें, शूद्र अन्न मागावयास आला असतां 'ठीक आहे, देतों' असें म्हणावें व द्रव्याच्या किंवा दुसऱ्या कशाच्याहि इच्छेनें कोणत्याहि गोष्टीकडे पाहूं नये. पितर, देव, अतिथि यांच्यासाठीं जो कांहीं तरी साधन करतो, आपल्या घरीं यथाविधि भिक्षान्नाची उपासना करतो, अग्निहोत्र पाळून अग्नीला यथाशास्त्र त्रिकाळ आहुति देतो, व गाई आणि ब्राह्मण यांच्यासाठीं प्रसंगीं रणांत मरून जातो, तो धर्मात्मा, क्षत्रिय असतांहि आपल्या सत्कर्मामुळें तीन अग्नींच्या सेवेच्या योगानें पवित्र होऊन, ज्ञानविज्ञानसंपन्न व वेदपारंगत असा ब्राह्मण होतो. नीच कुलांत जन्मलेला असा शूद्रहि अशा कर्मांनीं शास्त्रसंपन्न सुसंस्कृत ब्राह्मण बनतो. उलट, ब्राह्मण झाला तरी तो नीच वर्णांकडे भोजन करणारा व दुराचारी असेल, तर ब्राह्मण्यभ्रष्ट होऊन शूद्र बनतो. स्वतः ब्रह्मदेवानेंच सांगितलें आहे कीं, शुद्ध कर्मांनीं शुद्धमनाचा झालेला जितेंद्रिय शूद्रहि ब्राह्मणाप्रमाणेंच सेवा करण्यास योग्य आहे. गोड स्वभाव व शुद्ध कर्म हीं जर शूद्रामध्यें असतील तर तो ब्राह्मणापेक्षांहि श्रेष्ठ समजावा असें माझें मत आहे. जन्म, संस्कार, विद्या, संतति, हींच कांहीं ब्राह्मणत्वाला कारण नसून सद्वर्तन हेंच त्याचें मुख्य कारण होय. सद्वर्तनामुळें ब्राह्मणाला या जगांत ब्राह्मणत्व आलें असून सद्वर्तननिष्ठ शूद्रहि ब्राह्मणत्वाला पोंचतो. सर्वत्र समबुद्धि हाच ब्राह्मणाचा स्वभाव आहे, यास्तव निर्मळ व निर्गुण असें ब्रह्म जेथें असेल तोच ब्राह्मण होय. जन्मानें जे चार वर्ण केले आहेत, ते केवळ व्यवहारांतील स्थानविभाग दाखविण्यासाठींच आहेत, असें प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न करतांना म्हटलें आहे. ब्राह्मण म्हणजे या जगांतील पायानें चालणारें शेतच होय. त्यांत जसें बीं पेरावें, तसें परलोकीं फळ मिळतें. वैभवेच्छु मनुष्यानें सदा दुसऱ्यांना

देऊन उरलेलें अन्न भक्षावें, सन्मार्गानें चालावें व ब्राह्ममार्गानें आक्रमण करून वागावें. गृहस्थानें आपल्या घरीं वेदसंहितांचें अध्ययन करावें. तो अभ्यास नित्य करावा, पण त्यावर उदरनिर्वाह करूं नये. अशा प्रकारें चालणारा ब्राह्मण अग्निपूजा, वेदाध्ययन व सन्मार्गाचें अवलंबन यांच्या योगानें ब्रह्मत्वाला पात्र होतो. हे देवि, ब्राह्मण्य प्राप्त झालें असतां तें मोठ्या प्रयत्नानें राखणें अवश्य आहे. त्यासाठीं मनाचें संयमन केलें पाहिजे, भलत्याशीं संबंध करतां कामा नये, भलत्यापासून दान घेऊं नये व भलत्याला तें देऊं नये. याप्रमाणें शूद्राचा ब्राह्मण कसा होतो व धर्मभ्रष्ट ब्राह्मणाला शूद्रत्व कसें येतें हें रहस्य मीं तुला सांगितलें. १३.१.१४३.

---

## अध्याय १४४ वा.

[ १. उमामहेश्वरसंवाद—पुढें चालू ]

( १ ) **उमा:**—भगवन्, मनुष्यांच्या बाबतींत धर्म कोणते आणि अधर्म कोणते तें निश्चितपणें मला सांगा. मनुष्याला बंधन घडतें किंवा घडलेल्या बंधनापासून तो सुटतो, त्याचें कारण कर्म, मन आणि वाणी असें त्रिविध आहे. तरी कोणत्या वर्तनानें, कशा प्रकारच्या कर्मानें अथवा आचारांनीं मनुष्यें स्वर्गास जातात बरें ?

**महेश्वर:**—हे देवि, धर्म आणि अधर्म यांचें तत्त्व तुला ठाऊक असून तूं धर्मनिष्ठ व इन्द्रियदमनाची आवड असणारी आहेस; तूं विचारलेला प्रश्न बुद्धिवर्धक व प्राणिमात्राला हितावह आहे. त्याचें उत्तर ऐक. सत्यधर्मांची आवड धरणारे आश्रमधर्मांच्या पलीकडे गेलेले व धर्मानें मिळालेल्या अर्थाचाच उपभोग घेणारे पुरुष स्वर्गास जातात. ज्यांचे सर्व संशय फिटले आहेत असे पुरुष धर्म व अधर्म यांनीं बांधले जात नाहींत. त्यांना प्रलय व उत्पत्ति यांच्या सत्यस्वरूपाचें व इतर सर्व प्रकारचें ज्ञान असून पुढचें व मागचें असें त्यांच्या डोळ्यापुढें दिसत असतें व त्यांची आवडनावड गेलेली असते. असे पुरुष कर्मांच्या बंधनांतून सुटलेले असतात. जे कृतीनें, मनानें किंवा शब्दानेंहि कोणाची हिंसा करीत नाहींत, व कशावरहि आसक्ति ठेवीत नाहींत ते कर्मांनीं बांधले जात नाहींत. प्राणघातापासून दूर असलेले, सद्वर्तनी, दयाळु, शत्रुमित्र समान लेखणारे, आत्मसंयमनी, असे लोक कर्मांच्या बंधनापासून सुटतात. सर्व प्राण्यांवर दया करणारे, सर्वांनीं विश्वास टाकण्यास

पात्र, हिंसाकर्म सोडलेले, असे पुरुष स्वर्गाचे वांटेकरी होत. परद्रव्यावर आपले-पणाची दृष्टि न ठेवणारे, परदारा वर्ज्य समजणारे, धर्मानें मिळालेलें अन्नच भक्षणारे, असे लोक स्वर्गभागी होत. परस्त्रियांना नित्य आई, बहीण किंवा कन्या याप्रमाणें मानणारे लोक स्वर्गास जाणारे होत. चोरीपासून परावृत्त, स्वतःजवळ असलेल्या धनावरच संतुष्ट व आपल्या भाग्यानें मिळेल त्यावरच निर्वाह करणारे लोक स्वर्गास जाण्यास योग्य आहेत. स्वस्त्रीची आवड धरणारे, ऋतुकालींच तिच्याशीं गमन करणारे व ग्राम्य सुखांचा उपयोग न घेणारे पुरुष स्वर्गी जाण्यास पात्र होत. परस्त्रियांकडे न पहाणारे, इंद्रियें ताब्यांत ठेवणारे, व सच्छील असे पुरुष स्वर्गास जातात. देवांनीं घालून दिलेला हा मार्ग असून सुज्ञ मनुष्यांनीं त्याचेंच अवलंबन नित्य करावें, कारण मनांतील रागद्वेषादि विकार काढून टाक-ण्यास त्याचा उपयोग होतो. दानधर्म, तप, सदाचरण, शुद्धि, दया या सर्वांचा त्यांत समावेश होत असून शरीरपोषण व धर्मसाधन याहि गोष्टी त्यांत साध-तात; म्हणून नित्य त्याचा अवलंब करावा. स्वर्गवासाची इच्छा करणाऱ्यांनीं याच्या उलट मार्ग स्वीकारूं नये.

**उमा**:—हे देवा, वाणीच्या कोणत्या कर्मानें बंधन किंवा सुटका होते तें मला सांगा.

**महेश्वर**:—स्वतःसाठीं किंवा दुसऱ्यासाठीं थट्टेंत किंवा हंसें उत्पन्न करण्या-साठींसुद्धां जे पुरुष खोटें बोलत नाहींत त्यांना स्वर्ग मिळतो. पोटासाठीं, धर्मासाठीं किंवा उगाच वाटतें म्हणून जे असत्य भाषण करीत नाहींत ते स्वर्गाचे वांटेकरी होतात. सरळ, कोणाला न खुपणारे, गोड व निष्पाप असे शब्द बोलून जे कोणाचेंहि स्वागत करतात; कठोर, कडू व निष्ठूर शब्द कोणाला बोलत नाहींत, व दुष्टपणाचा वाराहि लागूं देत नाहींत ते स्वर्गगमनास पात्र होत. मित्रमित्रांत फूट पडेल असे कपटी शब्द जे कधीं बोलत नाहींत, सत्य व स्नेह-पूर्ण असेंच भाषण करतात, दुसऱ्यांचा द्रोह जे करीत नाहींत, सर्व प्राण्यांना समदृष्टीनें वागवितात, कपटी शब्द उच्चारीत नाहींत, वाईट गोष्टी वर्जितात, नित्य सौम्य भाषण करतात, रागाच्या भरांतहि जे दुसऱ्याचें हृदयविदारण कर-णारे शब्द तोंडांतून काढीत नाहींत व क्रोध आला असतांहि सांत्वनाचेच शब्द बोलतात, ते स्वर्गास जाणारे होत. वाणीच्या योगानें घडणारा हा धर्म असून त्याचें मनुष्यांनीं नेहमीं आचरण करावें. तोच हितावह व खरा मार्ग आहे; हे देवि, या विरुद्ध आचरणाचा सुज्ञांनीं त्याग करावा.

उमा :—देवा, मनाच्या कोणत्या कर्मानें मनुष्याला बंधन घडतें तें मला सांगा.

महेश्वर :—कोणत्या मानसिक कर्मानें मनुष्य स्वर्गास जातो तें सांगतों, ऐक. मनाला दुष्ट वळण असलें व कृतीहि त्याहून दुष्ट वळणाची असली म्हणजे मनुष्याला बंधन घडतें. जेथें माणसाचा वाराहि नाहीं अशा अरण्यांत पडलेल्या परद्रव्याकडे दृष्टि गेल्यास, मनानेंहि त्याला जो शिवत नाहीं, तसेंच गांवांत किंवा घरांतहि एकीकडे पडलेल्या परद्रव्याला पाहून ज्याची इच्छा त्यावर जात नाहीं, कामवासनेनें एकांतांत आलेल्या परस्त्रीला जे मनानेंहि स्पर्श करीत नाहींत, शत्रु व मित्र यांना मनापासून जे समान मानतात व कोणाशींहि गांठ पडली असतां जे स्नेहभावानें वागतात ते पुरुष स्वर्गीं जाण्यास पात्र होत. विद्वान, दयाळू, शुद्ध, सत्यवचनी, आपल्याजवळ असेल त्यांतच संतोष मानणारे, कोणाशीं वैर न करणारे, कोणाला कष्ट न देणारे, प्रेमळ मनाचे, सर्व प्राण्यांवर दया करणारे, श्रद्धाळू, स्वतः चोख वर्तनाचे राहून चोख वर्तनाचीं माणसें आवडणारे व चांगलें वाईट जाणणारे, असेच पुरुष स्वर्गीं जातात. शुभ व अशुभ कर्मांचीं फळें जाणून जे त्यांचा संचय करतात, असे न्यायी, गुणी व देव-ब्राह्मणांना मान देणारे व नित्य उद्योगांत गढलेले पुरुष स्वर्गीं जातात. हे देवि, याप्रमाणें शुभ फलांच्या योगानें जे स्वर्गाचा मार्ग चोखाळतात, त्यांचें वर्णन मीं केलें. आतां आणखी काय ऐकावयाची इच्छा आहे?

उमा :—महेश्वरा, मनुष्यांच्या बाबतींत मला मोठा संशय आहे. तो नीट दूर करा. मनुष्याला कोणत्या कर्मानें किंवा तपानें दीर्घायुष्य मिळतें, तसाच तो कशा प्रकारच्या कर्मानें अल्पायु होतो, याचें विवेचन करून कर्मविपाकाचें स्वरूप मला सांगा. या जगांत कांहीं महाभाग्यशाली तर दुसरे मंद भाग्याचे असतात, कोणी कुलीन असतात, तर कोणी हीन कुलांतले असतात; कित्येक जण जणूं लांकडाचे केल्यासारखे असून दर्शन घेण्यासहि अपात्र असतात, तर ज्यांच्याकडे पहातांच आदर उत्पन्न होतो असेहि दुसरे कांहीं असतात; कोणी मठ्ठ मेंदूचे असतात, तर कोणी महाबुद्धिमान् असतात, कोणी ज्ञानी असतात तर कोणी ज्ञानविज्ञानसंपन्न असतात; कित्येक संकटमुक्त असतात, तर कित्येक संकटांत ग्रस्त झालेले दिसतात. तर असें कां, हें मला समजावून सांगावें.

महेश्वर :—हे देवि, मृत्युलोकांत मनुष्याला जेणेंकरून आपल्या कर्मांचें फळ मिळतें असें कर्मविपाकाचें स्वरूप सांगतों. जो मनुष्य दुसऱ्याचा प्राण

घेण्यासाठीं हातांत काठी घेऊन भयंकर स्वरूप धारण करतो व प्राण्यांना शस्त्र उगारून ठार करतो, तसेंच सर्व प्राण्यांशीं निर्दयपणें वागून त्यांना उद्वेग देतो व कीडमुंगी यांनाहि आश्रय न देतां त्यांना दुष्टपणें वागवितो, असा मनुष्य नरकास जातो. पण जो याच्या उलट वागतो तो धर्मात्मा सुस्वरूपी होतो. हिंसेची आवड असणारा मनुष्य आपल्या पापकर्मानें सर्वांना अप्रिय होऊन अल्पायु बनतो. थोडक्यांत सांगावयाचें तर हिंसक नरकास जातो व अहिंसक स्वर्गास जातो. त्या नरकांत गेलेल्या हिंसक मनुष्याला भयंकर यातना सोसाव्या लागतात व त्यांतून जेव्हां तो सुटतो व पुनः मनुष्यजन्मास येतो, तेव्हांहि तो अल्पायु होतो. पण जो शुद्धमनाचा असून स्वतः कोणाचा घात करीत नाहीं, कोणाचा घात करण्याला अनुमतिहि देत नाहीं व आपल्याप्रमाणेंच सर्वांवर प्रेम करतो, तो उत्कर्ष पावून देव होतो व प्राप्त झालेले सुखाचे भोग आनंदानें भोगितो. तो जेव्हां पुनः मनुष्यजन्मास येतो, तेव्हां दीर्घायुषी होऊन सुख भोगतो. याप्रमाणें प्राणिहिंसेपासून निवृत्त होणें हा सदाचारी व सत्कर्में करणाऱ्यांचा, दीर्घायुष्य मिळविण्याचा मार्ग असून तो ब्रह्मदेवानें सांगितला आहे. १३.१.१४४.

## अध्याय १४५ वा.

[ १. उमा–महेश्वर संवाद पुढें चालू. ]

( १ ) **उमा :**—पुरुषाचें शील व आचरण कसें असावें, आणि त्यानें कोणतीं कर्में करावीं व कोणतीं दानें द्यावीं म्हणजे तो स्वर्गास जाईल बरें ?

**महेश्वर :**—दान देणारा, ब्राह्मणांचा आदर करणारा, दीन दुःखी कष्टी यांना खाणेंपिणें व वस्त्रें देणारा, धर्मशाळा सभा विहिरी टांक्या इत्यादि बांधणारा, आसन शयन वाहन किंवा घर, रत्न, द्रव्य तसेंच सर्व प्रकारचें धान्य, सर्व प्रकारचीं शेतें, स्त्रिया, हीं ज्याला हवीं असतील त्याला विचारून संतोषानें नित्य देणारा, असा मनुष्य देवलोकीं जातो व तेथें पुष्कळ काळ उत्तमप्रकारचे भोग भोगीत अप्सरांच्या संगतींत नंदनवनांत आनंदानें वास करतो. नंतर तो जेव्हां स्वर्गांतून पुनः मनुष्य लोकीं उतरतो, तेव्हां मोठ्या भाग्यशाली कुळांत धनधान्यसंपन्न असा जन्मास येतो. त्या ठिकाणीं तो सर्व इष्ट गुणांनीं युक्त, आनंदानें भरलेला, वैभवशाली, मोठ्या कोशाचा स्वामी, असा श्रीमंत होतो. हे देवि, असे हे दानशूर मनुष्य भाग्यशाली व सर्वांना प्रिय होतात असें पूर्वी ब्रह्मदेवानें

सांगितलें आहे. याच्या उलट दुसरे असतात, ते दानांत कद्रू असून ब्राह्मणांनीं कांहीं मागितल्यास जवळ असतांहि न देणारे, दीन-दुबळे अशा याचकांपासूनहि तोंड फिरविणारे, आपल्याच जिभेचें कोड पुरविणारे असतात व द्रव्य, वस्त्र, गाई, अन्न हीं कधीं कोणाला देत नाहींत. ते लोभी, नास्तिक व कद्रू असे लोक नरकास जातात. ते कालान्तरानें जेव्हां मनुष्यजन्मास येतात, तेव्हां अगदीं हीन कुलांत जन्मतात व तहान आणि भूक यांनीं व्याकुळ होत्साते सर्व लोकांकडून बहिष्कृत केले जातात व कोणत्याहि भोग्य वस्तु न मिळाल्यामुळें निराश होऊन अधर्मानें जीवनयात्रा चालवितात. दरिद्री कुळांत जन्मल्यामुळें ते अल्पसंतुष्ट व धनहीन होतात. दुसरे कांहीं जण गर्वानें ताठरलेले व पापकर्मांत आनंद मानणारे असून, आसन देण्यास योग्य अशांना तें देत नाहींत, वाट देणें ज्यांना अवश्य त्यांना ती देत नाहींत, सत्कारास पात्र अशांचा पाद्य अर्घ्य देऊन सत्कार करीत नाहींत, गुरू आला असतां त्याला प्रेमानें बहुमान देत नाहींत, नित्य अभिमान व लोभ यांत गुरफटलेले असतात, संन्याशांना अवमानितात, वृद्धांना अनादरितात, व अशा वृत्तीमुळें नरकास जातात. शेंकडों वर्षांनीं जेव्हां ते नरकांतून सुटतात, तेव्हां पुनः त्यांना चांडाळ पुल्कस इत्यादि नीच कुळांत जन्म मिळतो व त्यांच्या कुळांत गुरु व वृद्ध यांना अवमानणारीच संतति जन्मते.

पण जो फुगलेला मानी किंवा देव-ब्राह्मनांचा अवहेलणारा नसून लोकांत मान्यता पावलेला, नम्र व मधुर भाषण करणारा, सर्व लोकांना आवडणारा, प्राणिमात्राचें हित पहाणारा, द्वेष न करणारा, हंसतमुख, सर्वांचें स्वागत करून कोणालाहि टाकून न बोलणारा, मानास योग्य अशांना सत्कारपूर्वक मान देणारा, वाट देण्यास योग्य अशाला वाट देणारा, गुरूला आदरानें मानणारा, अतिथि-अभ्यागताला यथाशक्ति देणारा, असा असतो, त्याला स्वर्गांत स्थान मिळतें व कालान्तरानें तो मनुष्यलोकीं आला, तरी मोठ्या कुळांतच जन्मून तेथें सर्व भोग्यवस्तूंनीं संपन्न, सर्व उत्तम वस्तूंनीं युक्त, ज्याला त्याला योग्यतेप्रमाणें दान देणारा व माननीयांस पूज्य मानणारा असाच होतो. तेथें तो सर्वांना मान्य व पूज्य होऊन आपल्या सत्कर्माचें फळ भोगतो. असा हा ब्रह्मदेवानें स्वतः सांगितलेला धर्म मीं कथन केला.

पण ज्याचें आचरण उग्र असून जो सर्व प्राण्यांना भयंकर वाटतो, जो हातांनीं पायांनीं, दोरीनें दंडानें, मातीच्या ढेंकळांनीं, शस्त्रांनीं किंवा लांकडांनीं प्राण्यांना मारतो, आणि त्रास देऊन त्यांना उद्विग्न करतो, तो नरकास जातो. कालान्तरानें

तो मनुष्यलोकीं आला तरी पुष्कळ संकटांनीं ग्रस्त झालेल्या अधम कुलांत जन्मून लोकांचा नावडता व अधम वृत्तीचा होतो. याच्या उलट सर्व भूतांकडे दयार्द्र दृष्टीनें व स्नेहानें पहाणारा निर्वैर व इंद्रियें स्वाधीन ठेवणारा असून जो प्राण्यांना दुःख देत नाहीं व त्यांचा घात करीत नाहीं, सर्व प्राणी ज्याच्यावर विश्वास टाकतात, असा जो असतो, तो स्वर्गास जाऊन दिव्य घरांत देवासारखा आनंदानें रहातो. पुण्य संपल्यावर जरी तो मनुष्यलोकीं पुनः आला, तरी निरोगी, सुखी, त्रासरहित, दुःखरहित, असा होतो. हे देवि, असा हा सज्जनांचा मार्ग असून त्यांत दुःख असत नाहीं.

**उमा:**—देवा, कांहीं मनुष्यें ज्ञान व विज्ञान यांनीं संपन्न व बुद्धिमान् आणि व्यवहारज्ञ असून उलट सुलट वाद करण्यांत कुशल दिसतात; पण दुसरीं कांहीं ज्ञानविज्ञानशून्य अशींहि असतात. तर कोणत्या विशिष्ट कर्मानें मनुष्य बुद्धिमान् होतो व कशानें अल्पबुद्धि होतो हें मला सांगा. तसेंच कांहीं लोक जन्मापासून आंधळे, तर दुसरे कोणी रोगग्रस्त असतात, आणि कोणी दुर्बळ व निर्वीर्य असतात, तर याचेंहि कारण काय असावें बरें?

**महेश्वर:**—जे वेदवेत्त्या व धर्मवेत्त्या ब्राह्मणांची नित्य विचारपूस करून अशुभ कर्में टाळतात व शुभ तेवढीं आचरतात, त्यांना या लोकीं सुख व परलोकीं उत्तम गति मिळते. ते मनुष्यलोकीं परत आले म्हणजे बुद्धिमान् होतात व त्या बुद्धीला अनुसरून त्यांना विद्या प्राप्त होऊन त्यांचें कल्याण होतें. दुसरे जे परस्त्रियांवर दुष्ट दृष्टि ठेवतात ते त्या दुष्ट स्वभावामुळें जन्मांध होतात. जे पुरुष पापी मनानें नग्नस्त्रीकडे पहातात, ते त्या दुष्कर्मामुळें रोगग्रस्त होतात. जे दुराचारी पुरुष मूर्खपणानें भलत्याच स्त्रीशीं मैथुन करतात, ते अधम नपुंसक होतात. पशुघात करणारे, गुरुस्त्रीगमनी व वाटेल तेथें मैथुन करणारे पुरुषहि नपुंसक होतात.

**उमा:**—हे देवदेवा, कोणतें कर्म निंद्य व कोणतें स्तुत्य आणि काय केलें असतां मनुष्याला श्रेय मिळतें बरें?

**महेश्वर:**—श्रेयाचा मार्ग शोधीत असतां जो ब्राह्मणांची विचारपूस करतो, धर्म काय आहे हें समजून घेण्यास झटतो, व सद्गुणांचें जो कौतुक करतो, त्याला स्वर्ग प्राप्त होतो. तो मनुष्यलोकीं येतो तेव्हां बहुधा बुद्धिमान् व धारणाशक्तियुक्त असा जन्मास येतो. हे देवि, हा सज्जनांचा धर्म असून कल्याणकारक आहे. मनुष्यांच्या हितासाठीं मीं तुला तो सांगितला.

**उमा :**—कांहीं लोक अल्पज्ञानी असून धर्माचा द्वेष करतात व वेदवेत्त्या ब्राह्मणांच्या जवळ जाण्याचीहि त्यांची इच्छा नसते. दुसरे कांहींजण व्रतनिष्ठ असून श्रद्धाळू व धर्मिष्ठ असतात, तर इतर व्रताचरण न करणारे, नियमभ्रष्ट असे राक्षसांसमान असतात. कोणी यज्ञ करणारे तर आणखी कित्येक होमद्वेषी असतात, तर कोणत्या कर्मांचें फल म्हणून ते असे होतात हें मला सांगा.

**महेश्वर :**—देवि, सारीं शास्त्रें हीं लोकांना धर्ममर्यादा घालून देण्यासाठीं निर्मिलेलीं असल्यामुळें व्रतनिष्ठ मनुष्यें त्यांना प्रमाण मानून चालत असलेलीं दिसतात. पण जे मोहाच्या तडाख्यांत सांपडून अधर्मालाच धर्म समजतात, ते व्रतविरोधी मर्यादा सोडल्यामुळें ब्रह्मराक्षसच होत. ते जर कालाच्या कृपेनें मनुष्ययोनींत जन्मले तर ते होमहवनविहीन, वषट्काराचें नांवहि न ओळखणारे, असे अधम होतात. हे देवि, तुझे सर्व संशय नाहींसे करण्यासाठीं मनुष्यांना हितावह व अहितावह धर्म कोणते हें तुला सविस्तर सांगितलें. १३. १. १४५.

---

## अध्याय १४६ वा.

[ १. उमा–महेश्वर संवाद : उमेनें सांगितलेला स्त्रीधर्म ]

(१) **नारद :**—श्रीकृष्णा, याप्रमाणें स्वतः धर्म सांगितल्यावर महादेवाला आपणहि स्त्रीधर्म ऐकावा असें वाटलें. म्हणून आपल्या सन्निध बसलेली व आपल्याला अनुकूल रीतीनें वागणारी जी आपली भार्या देवी पार्वती तिला त्यासंबंधानें विचारूं लागला.

**महेश्वर :**—हे हिमालयकन्ये साध्वि, तूं चांगलें वाईट जाणणारी धर्मवेत्ती शमदमानीं युक्त, निरहंकार व धर्मशील आहेस. तरी मीं तुला मनांतील गोष्ट विचारणार आहें, ती मला सांग. ब्रह्मदेवाची पत्नी सावित्री, इन्द्राची शची, मार्कंडेयाची धूमोर्णा, कुबेराची ऋद्धि, वरुणाची गौरी, सूर्याची सुवर्चला, चंद्राची रोहिणी, अग्नीची स्वाहा, तशीच कश्यपाची अदिति या सर्व पतिव्रता स्त्रिया असून त्यांची नित्य उपासना करून त्यांशीं तूं बोलणें–चालणेंहि केलें आहेस. म्हणून मीं तुला विचारीत आहें. तुझ्या तोंडून अगदीं आरंभापासूनचे स्त्रीधर्म ऐकण्याची माझी इच्छा आहे. तूं माझी सहधर्मचारिणी असून शीलानें, सामर्थ्यानें, व आचरणानें माझ्यासारखीच आहेस व तीव्र तपहि तूं आचरिलें आहेस. तूं जर स्त्रीधर्म सांगितलास तर तो चांगल्या प्रकारें सांगितला जाईल व लोकांत

त्याला प्रमाण मानतील. स्त्रियांना विशेषतः स्त्रियाच चांगल्या मार्गदर्शक होतात. जगाची अशी रीतच पडलेली आहे. माझें अर्धें शरीरच तूं असून देवांचें कार्य करणारी व लोकवृद्धि करणारी आहेस. तुला स्त्रियांचे सर्व शाश्वत धर्म चांगले अवगत आहेत, तरी ते आपले धर्म मला विस्तारानें व समग्रपणें सांग.

उमा :—भगवन्, सर्वप्राण्यांचे आपणच स्वामी आहां. आपल्याच प्रसादानें माझी वाणी झाली तरी प्रकाशते आहे. देवदेवा, सर्व पवित्र जलसंपन्न अशा ह्या नद्या आपल्या स्पर्शानें पवित्र होण्यासाठींच आपल्या पायांशीं येतात. त्यांच्याशीं विचारविनिमय करून मीं आपल्या प्रश्नांचें क्रमशः उत्तर देतें. जो पराक्रमी असून अहंकारापासून अलिप्त असतो त्यालाच पुरुष हें नांव आहे. स्त्री नित्य स्त्रीलाच अनुसरणार. मीं विचारविनिमय केल्यानें या श्रेष्ठ नद्यांचा सन्मान केल्या-सारखें होणार आहे. ही नद्यांमध्यें श्रेष्ठ अशी पवित्र सरस्वती, ही विपाशा, ही वितस्ता, ही चंद्रभागा व ही इरावती पहा. तशाच या शतद्रू, देविका, सिन्धु, कौशिकी, गातमी, व ही सर्व तीर्थसंपन्न व आकाशांतून पृथ्वीवर आलेली देव-नदी श्रेष्ठ गंगा, या येथें जमल्या आहेत.

श्रीकृष्णा, याप्रमाणें भाषण केल्यावर महादेवपत्नी धार्मिष्ठ उमेनें स्मितपूर्वक त्या सर्व नद्यांना हांक मारून स्त्रीधर्माचें उत्तम ज्ञान असलेल्या त्यांना ते स्त्रीधर्म सांगण्याची विनंति केली. ती म्हणाली, 'हे श्रेष्ठ नद्यांनो, भगवान् महादेवानें मला जो स्त्रीधर्मासंबंधानें प्रश्न विचारिला, त्याचें उत्तर मीं तुमच्याशीं विचारविनिमय करून त्याला देणार आहें. या जगांत काय किंवा स्वर्गांत काय, असलीं कार्यें एकट्याच्या हातून होणें कठीण असतें. म्हणून मीं पुण्यप्रद व पवित्र अशा तुम्हाला बहुमानपूर्वक विचारीत आहें.' उमेचें भाषण ऐकून नद्यांनीं आपल्यासाठीं बोलण्याला बहुमानपुरस्सर गंगेची योजना केली. तेव्हां ती विविध बुद्धींनीं युक्त, स्त्रीधर्म जाणणारी, अनुभवी, अशी पापनाशक पवित्र गंगादेवी हंसत हंसत मोठ्या विनयानें पार्वतीला म्हणाली, 'हे देवि उमे, तूं मजवर कृपा केल्यामुळें मीं आज धन्य झालें आहें. सर्व जगाला वंद्य असलेल्या त्वां मज नदीला मान दिला हें माझें मोठें भाग्य होय. स्वतः प्रभाव-शाली असून जो दुसऱ्याला मान देतो तोच कृपाळु मनुष्य पंडित या संज्ञेला पात्र होतो. उलटसुलट बाजू जाणणाऱ्या अशा ज्ञानविज्ञानसंपन्न वक्त्यांना प्रश्न विचारून जो पाऊल टाकतो त्याला संकटाची बाधा कधीं होत नाहीं. नाहीं तर आपण मोठे बुद्धिमान् आहों अशा घमेंडीनेंच कोणी एखादा सभेंत

भलतें कांहींतरी बोलून जातो. हे देवि, तुझें ज्ञान उच्च असून स्वर्गांतहि तूं श्रेष्ठ आहेस, तर स्त्रीधर्माचें विवेचन करण्याला तूंच पात्र आहेस.' याप्रमाणें गंगेनें अनेक रीतींनीं स्तुति केली असतां महेश्वरपत्नी पार्वती सर्व स्त्रीधर्म साकल्यानें सांगूं लागली.

उमा :—माझ्या मतें स्त्रीधम जसा असावा, तसा मीं यथाविधि सांगतें, सावधानपणें ऐकून घ्या. विवाहप्रसंगीं अग्नीसमक्ष 'पतीची सहधर्मचारिणी हो' असें कन्येला सांगतांनाच बांधवांनीं स्त्रीधर्माची व्यवस्था लाविलेली असते. जी सुस्वभावी गोड बोलणारी, सहचारिणी, प्रसन्नमुख, एकनिष्ठ असते तीच पतीची सहधर्मचारिणी होते. तीच धर्मिष्ठ होऊन धर्माचरण करील, कारण ती साध्वी पतीला देवासमान नित्य समजते. पतीची सेवाशुश्रूषा जी देवाप्रमाणें करते, दुसरीकडे लक्ष जाऊं न देतां पतिमुखाकडे पुत्रमुखाप्रमाणेंच वारंवार पहाते व नियमित आहार करते, ती सहधर्मचारिणी होते. दांपत्याचे धम समजून घेऊन जी पतीचें व्रत चालवून धर्माचरण करते, ती एकनिष्ठ स्त्रीच पतीची सहधर्मचारिणी होय. पति कठोर शब्द बोलला किंवा त्यानें रागीट दृष्टीनें पाहिलें, तरी पतीकडे जी प्रसन्न मुद्रेनेंच पहाते, तीच पतिव्रता होय. चंद्रसूर्याकडे किंवा वृक्षाकडेहि जी पुरुषदृष्टीनें पहात नाहीं तीच खरी सहधर्मचारिणी होय. पति दरिद्री, रोगग्रस्त, दीन किंवा दमला-भागलेला असतां जी त्याची पुत्राप्रमाणें सेवा करते, तीच पतीची धर्मांतील वांटेकरीण होय. आत्मसंयमन करणारी, दक्ष, पुत्रवती, पतीवर प्रेम करणारी व त्याला प्राणाप्रमाणें जपणारी स्त्री पतीच्या धर्मांत वांटेकरीण होते. पतीवर जसें प्रेम करते, तसें जी उपभोगाच्या वस्तु, ऐश्वर्य, सुख, यांवरहि करीत नाहीं, तिलाच पतीच्या धर्मांत वांटा मिळतो. सकाळीं लवकर उठण्याची व गृह नीटनेटकें व स्वच्छ ठेवण्याची जिला आवड असते व त्याप्रमाणें जी तें झाडून गाईच्या शेणानें सारविते, अग्निसेवेंत दक्ष राहून जी त्याची फुलांनीं पूजा करून त्याला बलिदान देते, देव, अथिति व सेवक यांचे समाधान करून मग जी स्वतः उरलेल्या अन्नाचें पतीसह भोजन करते, तिलाच धर्माचें फळ मिळतें. सासूसासऱ्यांचे पाय चेपणारी, व मातापित्यांची सेवा करणारी गुणी स्त्री तपस्वीच होय. ब्राह्मण, दुबळे, अनाथ, दीन, आंधळे यांना जी अन्न देऊन पोसते तीच पतीची सहधर्मचारिणी होय. दुर्घटव्रतहि जी आपल्या चातुर्यानें पार पाडते, ती पतिनिष्ठ स्त्री त्याची सहधर्मचारिणी होते. पतिच सर्वस्व आहे असें

समजून जी त्याच्या सेवेचें व्रत सदा चालविते, तिचेंच वर्तन पवित्र असून तेंच तप व तोच स्वर्ग होय. स्त्रियांना पति हेंच दैवत, पति हाच बंधु, व पतिच सारा आधार होय. पतीची प्रसन्नता हीच स्त्रीला स्वर्गासारखी होय, किंबहुना स्वर्गालाहि तिची सर येत नाहीं. महेश्वरा, तूं जर माझ्यावर संतुष्ट नसशील तर मला स्वर्गहि नको. पति दरिद्री किंवा व्याधीनें पीडिलेला असतांहि त्यानें सांगितलेलें बरें वाईट—फार काय पण प्राणघातकहि—काम स्त्रीनें निःशंकपणें करावें. हे देवा, आपल्या आज्ञेवरून हा स्त्रीधर्म मीं सांगितला. या प्रमाणें जी आचरण करील तीच स्त्री पतीची खरी सहधर्मचारिणी होय.

भीष्म म्हणतो, 'युधिष्ठिरा, पार्वतीचें भाषण ऐकून शंकरानें तिची वाहवा केली व सर्व लोकांना आपआपल्या सेवकांसह घरीं जावयास सांगितलें. त्या प्रमाणें सारे भूतगण, नद्या, गंधर्व व अप्सरा शंकराला नमस्कार करून आपआपल्या ठिकाणीं निघून गेलीं.' १३.१.१४६.

---

## अध्याय १४७ वा.

[ १. श्रीकृष्णाची वंशपरंपरा व त्याचें माहात्म्य. ]

( १ ) **ऋषि**:—हे महादेवा, आम्हांला वासुदेवाचें माहात्म्य ऐकण्याची इच्छा आहे, तरी तें कृपा करून सांगा.

**महादेव**:—ऋषिहो, शाश्वत पुरुष जो विष्णु तो ब्रह्मदेवापेक्षांहि श्रेष्ठ असून, तोच, निरभ्र आकाशांत सोन्यासारखा तेजस्वी सूर्य उगवावा तसा, कृष्णरूपानें येथें अवतरला आहे. त्या महातेजस्वी हरीला दहाबाहु असून तो देवशत्रूंचा नाश करितो, श्रीवत्स चिह्न धारण करतो व सर्व देवतांकडून पूजिला जातो. त्याच्या उदरापासून ब्रह्मदेव निघाला व ब्रह्मदेवाच्या मस्तकापासून माझी उत्पत्ति झाली. त्याच्या मस्तकावरील केसांपासून नक्षत्रें व अंगावरील केसांपासून देव आणि असुर निर्माण झाले. ऋषि आणि सगळे लोक त्याच्या देहापासून झाले असून पितृलोक व देवलोक तोच होय, तो या अखिल पृथ्वीचा निर्माता असून त्रिभुवनाचा स्वामी आहे. चराचर सृष्टीचा संहारहि तोच करतो. तो सर्व देवांत श्रेष्ठ, सर्वज्ञ, सर्वव्यापी, सर्व पहाणारा, परमात्मा असून त्याच्याहून या विश्वांत मोठें कोणी नाहीं. तो अनादि व अनंत असा मधुरिपु गोविन्द या नांवानें प्रसिद्ध आहे. तो सर्वहि राजांना युद्धांत मारूं शकेल. देवकार्यासाठीं

त्यानें मनुष्यरूप धरिलें असून त्याच्या साहाय्याविना साऱ्या देवांना आपलीं कार्यें करणें शक्य नाहीं. देवकार्यांत नित्य तत्पर असलेल्या त्या देवश्रेष्ठाच्या शरीरांत ब्रह्मदेव, महादेव व इतर सर्व देवता यांना सुखाचा आश्रय मिळतो. तो लक्ष्मीसह रहात असून शार्ङ्ग धनुष्य, सुदर्शनचक्र व खड्ग हीं त्याचीं आयुधें आणि गरुड त्याच्या ध्वजाचें चिह्न आहे. उत्तमशील, शम, दम, पराक्रम, रमणीय शरीर, धैर्य, सरळपणा, कारुण्य, सुंदर स्वरूप, व प्रचंड बळ यांनीं तो संपन्न असून सर्व प्रकारच्या दिव्य अद्भुत अस्त्रांनीं तो नित्य सज्ज असतो. त्याच्यापाशीं योगमाया असून त्याला सहस्रावधि नेत्र आहेत. त्याला कसली बाधा होणें शक्य नाहीं. तो मनाचा थोर, मित्रांना अभिमान वाटावा असा, व बांधवांना प्रिय आहे. तो क्षमाशील व निरहंकार आहे; ब्राह्मण त्याला प्रिय असून त्यांचा तो पुरस्कर्ता आहे. तो भयग्रस्तांचें भय दूर करून मित्रांना आनंद देतो. प्राणिमात्रांचा तो आधार आहे व दीनांच्या रक्षणासाठीं नित्य दक्ष असतो. तो शास्त्रज्ञ, वैभवशाली, सर्व देवांना पूज्य व शत्रु जरी आश्रयाला आले तरी त्यांनाहि वर देणारा आहे. तो राजनीतिवेत्ता, ब्रह्मज्ञानी, जितेंद्रिय असून देवांच्या उत्कर्षासाठीं आपलें अचाट बुद्धिसामर्थ्य प्रकट करतो. प्रजापति ब्रह्मदेवापासून उत्पन्न झालेल्या मनूच्या धर्माचरणानें शुद्ध झालेल्या वंशांत तो गोविन्द जन्म घेणार आहे. मनूचा पुत्र अंग, अंगाचा अंतर्धामा व अंतर्धामाचा हविर्धामा. हविर्धाम्याला प्राचीन बर्हि नांवाचा पराक्रमी पुत्र होईल. त्याला प्रचेतस् आदि करून दहा पुत्र होतील. प्राचेतसाचा पुत्र दक्ष प्रजापति. त्या दक्षाच्या अदितिनामक कन्येला आदित्य ( सूर्य ) व आदित्याला मनु असे पुत्र होतील. मनूला इला व सुद्युम्न असा कांहीं काळ स्त्री व कांहीं काळ पुरुष असा पुत्र होऊन इलेला बुधापासून पुरूरवा नांवाचा पुत्र होईल. पुरूरव्याचा पुत्र आयु, आयूचा नहुष व नहुषाचा पुत्र ययाति. ययातीचा पुत्र जो यदु त्याला महापराक्रमी असा क्रोष्टा नांवाचा पुत्र होता. क्रोष्ट्याचा पुत्र वृजिनीवान् व वृजिनीवानाचा उषंगु. उषंगूला शूर असा चित्ररथ नांवाचा पुत्र झाला. चित्ररथाला शूद्रनामक पुत्र होता. हा वंश ब्राह्मणांना मान्य, यज्ञशाली, पराक्रमी, सदाचरणी, शुद्ध असा असून त्यांत शूराला वंशवर्धक असा वसुदेव नांवाचा पुत्र झाला. त्याला आनकदुंदुभि असें दुसरेंहि नांव होतें. वसुदेवाचा पुत्र वासुदेव. त्यानें मगधराज जरासंध्याच्या बंदींतून अनेक राजांना सोडविलें. तो सर्व पृथ्वींत अप्रतिहतवीर्य आहे. तो प्रथम शूरसेन देशांत होता,

पण पुढें द्वारकेस रहावयास गेला. तो तुम्हांला भेटेल तेव्हां तुम्हीं स्तुतिकुसुमांनीं त्याची पूजा करा. मला किंवा पितामह ब्रह्मदेवाला भेटण्याची तुम्हांला इच्छा झाल्यास तुम्हीं त्या महाप्रतापी भगवान् वासुदेवाला भेटा. त्याला भेटल्यास आम्हांला भेटल्यासारखेंच आहे. तो ज्याच्यावर संतुष्ट होईल त्याच्यावर सर्व देव संतुष्ट होतील. जो त्याचा आश्रय करील, त्याला कीर्ति, जय व स्वर्ग हीं मिळतील. तो सर्व धर्मांचा प्रत्यक्ष गुरु होऊन धर्मवेत्त्यांनीं नमस्कार करण्यास पात्र होईल. त्याची पूजा केल्यास मोठा धर्म केल्यासारखें होतें. प्रजेचें हित करण्याच्या इच्छेनें धर्मासाठीं त्यानें ऋषींचे वर्ग निर्मिले. त्यांतील सनत्कुमारप्रमुख ऋषि तपश्चर्या करीत गन्धमादन पर्वतावर आहेत. तो नारायण प्रभु स्वर्गांतहि श्रेष्ठ असून वक्ता, धर्मवेत्ता नमस्काराला पात्र आहे. आपण त्याला वंदन केल्यास तोहि आपल्याला करतो, आपण त्यास मान दिल्यास तोहि उलट तसाच देतो व आपण त्याला पूजिल्यास तोहि आपलें पूजन करतो. आपण त्याला भेटलों, तर तो प्रत्यहीं आपल्याला भेटतो. असें त्या स्तुत्य विष्णूचें व्रतच आहे. त्याला सर्व देवहि पूजीत असून त्याचें अनुकरण करणाराला तो अभय देतो. म्हणून कर्म, मन व वाणी यांनीं ब्राह्मणांनीं त्याला नमस्कार करावा व प्रयत्न करून त्याचें नित्य दर्शन घ्यावें. ऋषिहो, हा उत्तम मार्ग मीं तुम्हाला सांगितला असून त्याच्या दर्शनानें सर्व देवाचें दर्शन घेतल्यासारखें होतें. मीं देखील सर्व लोकांचा पितामह अशा जगत्पति देवाला नित्य नमस्कार करतों. त्याच्या दर्शनांत खरोखर आमचा तिघांचाहि अन्तर्भाव होतो. कारण आम्ही सर्वच देव त्याच्या शरीरांत असतों. त्याचा वडील बंधु श्वेतपर्वताप्रमाणें गौरवर्ण असून तो बल नांवानें प्रसिद्ध आहे. तो आयुध म्हणून नांगर हातांत घेतो. त्याच्या रथावर तीन फांद्यांचा सुवर्णाचा तालवृक्ष ध्वज म्हणून असतो व त्याचें मस्तक नागांनीं वेष्टिलेलें असतें. सर्व शस्त्रास्त्रें स्मरण करतांच त्याच्यापुढें येऊन उभीं रहातात; त्याला भगवान् अनन्त असेंहि म्हणतात. कश्यपपुत्र गरुडानें त्याचा अंत लावण्याचा प्रयत्न केला, पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. आपल्या फणांवर पृथ्वी सांवरून धरीत शेषरूपानें पाताळांत रहाणारा तो सांप्रत आनंदानें पृथ्वीवर फिरत आहे. कृष्ण हाच विष्णु असून बल हाच शेष होय. तसेंच ते दोघेहि भिन्न नसून राम तोच कृष्ण व कृष्णहि शेषच होय. एक चक्र धारण करणारा व दुसरा नांगर धारण करणारा असे ते श्रेष्ठ पुरुष दर्शन घेण्यास व मान देण्यास योग्य आहेत. हे ऋषिहो, तुमच्यावर कृपा करण्यासाठीं मीं वासुदेवाचें हें

चरित्र तुम्हांला सांगितलें. तरी तुम्हीं कांहीं झालें तरी त्या यदुश्रेष्ठाची पूजा करीत जा. १३ १. १४७.

---

## अध्याय १४८ वा.

[ १. श्रीकृष्णाचें माहात्म्य ]

( १ ) **नारद**—हे श्रीकृष्णा, शंकराचें असें भाषण झाल्यावर, आकाशांत मोठा शब्द झाला, वीज चमकली व तिचा कडकडाट उडाला व आकाश दाट मेघांनीं भरून जाऊन काळें झालें. पावसाळ्याप्रमाणें स्वच्छ पाण्याचा पाऊस पडला, सर्वत्र अगदीं दाट अंधकार पसरला व दिशा उमगत नाहींशा झाल्या. त्यामुळें त्या रमणीय, पवित्र अशा देवांच्या पर्वतावर ( हिमालयावर ) ऋषींना शंकर व त्याचे गण दिसेनातसे झाले. पण दुसऱ्याच क्षणांत सारें आकाश स्वच्छ व निरभ्र झालें आणि मग कित्येक ऋषि तीर्थयात्रेला निघून गेले व दुसरे कांहीं आल्याबाटेनें आपआपल्या ठिकाणीं गेले. तो सारा अद्भुत व अचिंत्य प्रकार पाहून व शंकर आणि उमा यांमधील संवाद ऐकून त्यांना मोठें आश्चर्य वाटलें. ते कृष्णाला म्हणाले, 'हे पुरुषश्रेष्ठा, ज्याच्याविषयीं आम्हाला या पर्वतावर शंकरानें उपदेश केला, तो सनातन ब्रह्मस्वरूपी तूंच आहेस. तुझें अद्भुत तेज आज आम्हाला पुनः दिसलें व त्या आश्चर्यानें आम्हाला पूर्वीची आठवण झाली.' त्यांचें भाषण ऐकून कृष्णानें त्या सर्व ऋषींचा सन्मान केला असतां त्यांना आनंद झाला व ते म्हणाले, 'हे मधुसूदना, तूं आम्हांला पुनः पुनः दर्शन देत जा. प्रभो, तुझ्या दर्शनांत जें प्रेम आम्हांला वाटतें, तें स्वर्गांत देखील वाटत नाहीं. शंकरानें तुझें माहात्म्य सांगितलें तें अगदीं खरें आहे. देवा, आम्हीं जें हें रहस्य सांगितलें, तें तूं सर्वज्ञ असल्यामुळें तुला ठाऊकच आहे. केवळ तुझें प्रिय करावें म्हणूनच आम्हीं तें बोललों. त्रिभुवनांत काय चाललें आहे हें तुला कांहीं अज्ञात नाहीं. पण तूं मनांत ठेवितोस आणि आम्ही फटकळपणामुळें तसें न करतां आल्यामुळें बडबडून जातों. कृष्णा, आतां आम्हीं जातों. तुला बुद्धि व संतोष हीं प्राप्त होवोत. तुला तुझ्यासारखा किंवा कांकण भर सरस असा प्रभावशाली व कीर्तिमान् पुत्र होईल.'

**भीष्म :**—युधिष्ठिरा, याप्रमाणें बोलणें झाल्यावर ते महर्षि कृष्णाला प्रदक्षिणा व नमस्कार करून निघून गेले. मग तो अत्यंत मोठ्या तेजानें युक्त असा

श्रीकृष्णहि आपलें व्रत पूर्ण करून द्वारकेस परत गेला. मग रुक्मिणीला दहा महिने पुरे झाल्यावर तिनें अद्भुत व शूर अशा वंशवर्धक पुत्राला जन्म दिला. तो कामरूपानें सर्व प्राण्यांत व देवदानवांत अन्तर्गत रहात असतो. असा तो मेघश्याम चतुर्भुज श्रीकृष्ण व तुम्हीं पांडव यांनीं एकमेकांचा प्रेमानें आश्रय केला. जेथें कीर्ति, लक्ष्मी, धैर्य, व स्वर्गमार्ग हीं असतात, तेथें त्रिविक्रम विष्णुहि असतो व इन्द्रासह तेतीस देवहि असतात, हें सांगावयास नकोच. सर्व प्राण्यांचा आधार असा आदिदेव अव्यक्त, अनादि व अनन्त असतांहि देवांचें काम साधण्यासाठीं महात्म्या मधुसूदनाच्या रूपानें अवतरला असून अत्यंत कठिण अशा तत्त्वज्ञानाचा प्रणेता झाला आहे. युधिष्ठिरा, तुला युद्धांत मिळालेला जय, अतुल कीर्ति, व हें पृथ्वीचें राज्य हीं सर्व त्या नारायणाच्या आश्रयामुळेंच होत. हा अचिन्त्य असा नारायण तुमचा आधार असल्यामुळें रणयज्ञांत तूं अध्वर्यु होऊन राजांचे बळी दिलेस. प्रळयकाळच्या अग्नीसारखा कृष्ण हा तुझ्या हातांतील पळीच होता. अज्ञानी दुर्योधनाची कींवच केली पाहिजे. त्यानें पुत्र भाऊ बांधव यांसह क्रोधाच्या भरांत अर्जुनाशीं व कृष्णाशीं युद्ध केलें व त्यांत दैत्य व दानव यांचा—दावानलांत टोळांचा व्हावा तसा—क्षय झाला. श्रीकृष्णाशीं युद्ध करणें कोणत्याहि माणसाला शक्य नाहीं; माणसें वीर्य, साधनें व बळ याबाबतींत हीनच असणार. त्या विजयी योग्यानें प्रलयकालीन अग्नीप्रमाणें युद्धाच्या अग्रभागीं दोन्हीं हातांनीं विक्रम करून आपल्या प्रभावानें दुर्योधनाचें सर्व सैन्य ठार केलें. महादेवानें हिमालयाच्या पठारावर जें प्राचीन वृत्त ऋषींना सांगितलें तें आतां ऐक. अर्जुनाच्या ठिकाणीं पुष्टपणा, तेज, पराक्रम, नम्रपणा इत्यादि जे गुण आहेत, त्याच्या तिप्पट ते कृष्णांत आहेत. त्याला मागें सारणारा कोण आहे? तें कसें तें ऐक. ज्या ठिकाणीं कृष्ण त्या ठिकाणीं उत्तम प्रकारची पुष्टि असणारच. पण आम्ही परतंत्र व अल्पबुद्धीचे असल्यामुळें दुबळे होऊन ज्ञान असतांहि मृत्यूच्या पंथाला लागलों. तूं मात्र सरळपणानें पहिल्या पासून कृष्णाचा आश्रय करून राज्यहि टाकलेंस, पण प्रतिज्ञा पाळलीस. युधिष्ठिरा, तूं स्वतःचा वधहि करून घेण्यास सिद्ध झालास, पण एकदां दिलेलें वचन मोडिलें नाहींस. सर्व लोक जे रणांगणांत पडले, ते कालाच्या योगानेंच होत. आम्हींहि कालानेंच मारले गेलों. खरोखर काल हाच परमेश्वर होय. तूं कालस्वरूप जाणत असल्यामुळें कालानें केलेल्या गोष्टींचा शोक करणें तुला योग्य नाहीं. कृष्ण हाच दंडधारी लाल नेत्रांचा सनातन काळ होय. म्हणून

आतां मृत बांधवांसंबंधानें शोक करूं नको. आतां तूं नित्य दुःख टाकून रहा. मीं जें कृष्णाचें सामर्थ्य सांगितलं तें तूं ऐकिलें आहेच. सुज्ञाला एवढें सांगितलें म्हणजे पुरे आहे. व्यास, नारद आणि स्वतः कृष्ण यांचें म्हणणें ऐकविल्यावर मीं तुला ऋषिगणांचा प्रभाव तसाच महेश्वर व पार्वती यांमधील संवादहि सांगितला. थोर पुरुषांच्या तोंडचे हे शब्द जो लक्षांत ठेवील, ऐकेल किंवा दुसऱ्यांना सांगेल, त्याचें मोठें कल्याण होईल, त्याचे सर्व इष्ट हेतु पूर्ण होतील व मरणोत्तर त्याला स्वर्ग मिळेल, यांत कांहीं संशय नाहीं. कल्याणाच्या इच्छेनें ऋषींनीं त्या अनाद्यनंत जनार्दनाचाच स्तव केला. असो. युधिष्ठिरा, महेश्वराच्या मुखांतून निघालेले हे उत्तम धर्मसंवाद तूं नित्य नीट मनांत वागवा. असें करून प्रजेला तूं चांगला न्याय दिलास व तिचें दक्षपणें पालन केलेंस म्हणजे तुला स्वर्गलोक मिळेल. राजा, प्रजेचें धर्मानें पालन करणें, राजाच्या बाबतींत यथायुक्त दंड म्हणजेच उत्तम धर्म होय. असा हा उमा-महेश्वर संवाद-रूपी धर्म या सव लोकांसमक्ष मीं तुला सांगितला. नारदाचाहि संदेश तसाच असून तूं त्याप्रमाणें वाग. कृष्णाची व शंकराचीही कथा पुण्यामुळेंच ऐकावयास मिळते. कृष्णानें अर्जुनासह बदरिकाश्रमांत दहा सहस्र वर्षें तप केलें. कृष्णार्जुनांची जोडी तीन युगांत प्रसिद्ध आहे. कृष्णानें बालपणांतच बांधवांच्या रक्षणासाठीं कंसाचें कंदन केलें. त्या शाश्वत पुराणपुरुषाच्या पराक्रमाचें वर्णन मीं काय करणार? कृष्ण तुझा सखा असल्यामुळें तुझें निःसंशय कल्याण होणार आहे. दुर्योधनामुळें सर्व पृथ्वीचा नाश झाला असल्यामुळें, त्याचें परलोकीं तरी काय होईल याची मला काळजीच वाटते. दुर्योधन, कर्ण, शकुनि व दुःशासन या चौघांमुळें कुरुकुळाचा नाश झाला!

**वैशंपायन**:—राजा, पुरुषश्रेष्ठ भीष्माचें याप्रमाणें भाषण चाललें असतां त्या श्रोत्यांत धर्मराज युधिष्ठिर तर अगदीं स्तब्ध झाला. तें भाषण ऐकून धृतराष्ट्रादिकांनाहि मोठें नवल वाटलें व त्यांनीं कृष्णाला नमस्कार करून हात जोडले. नारदप्रमुख ऋषीनींहि त्या भाषणाचा आदरानें स्वीकार केला. असा तो भीष्माचा आश्चर्यकारक उपदेश युधिष्ठिरानें बंधूंसह पूर्णपणें ऐकला. नंतर भीष्मानें विश्रांति घेतली असतां पुनःहि तो त्याला प्रश्न विचारूं लागला.
१३.१.१४८.

## अध्याय १४९ वा.

[ १. विष्णुसहस्रनाम व त्याचें माहात्म्य ].

( १ ) **वैशंपायन**:—राजा, सर्व धर्म व पवित्र गोष्टी संपूर्णपणें ऐकल्यावर युधिष्ठिर भीष्माला पुनः प्रश्न करूं लागला.

**युधिष्ठिर**:—हे पितामहा, या जगांत एकच श्रेष्ठ असें दैवत कोणतें? कोणाची स्तुति व पूजा केल्यानें मनुष्याचें कल्याण होईल? आपल्याला सर्व धर्मांत श्रेष्ठ धर्म कोणता वाटतो? कसला जप केल्यानें मनुष्य प्राणी जन्ममरण-रूप संसाराच्या बंधनांतून सुटेल बरें?

**भीष्म**:—युधिष्ठिरा, जगाचा स्वामी व देवांचा देव असा जो अनंत भगवान् विष्णु त्याची मनुष्यानें नित्य उत्साहानें सहस्रनामानें स्तुति करावी, भक्तिपूर्वक त्याची पूजा करावी, त्याचेंच ध्यान करावें, त्यालाच नमस्कार करावा व त्याप्रीत्यर्थंच यज्ञ करावा, म्हणजे मनुष्य सर्व दुःखांच्या पलीकडे जाईल. विष्णु हा ब्राह्मणांचा कैवारी, सर्व धर्म जाणणारा, लोकांची कीर्ति वाढविणारा व सर्व प्राण्यांचा उत्पत्तिकर्ता आहे. तेव्हां त्या पुंडरीक्षाची स्तुति करून त्याचीच पूजा करावी, हाच माझ्या मतें सर्व धर्मांत श्रेष्ठ धर्म होय. सर्व तेजांत श्रेष्ठ तेज, तपांत श्रेष्ठ तप, पवित्रांत अत्यंत पवित्र, मंगलांत उत्तम मंगल, दैवतांचेंहि दैवत आणि प्राणिमात्रांचा अविनाशी संरक्षक असा तो आहे. आदियुगाच्या आरंभीं त्याच्यापासूनच सर्व कांहीं उत्पन्न होतें व युगाच्या अंतीं त्या सर्वांचा त्याच्याच स्वरूपांत लय होतो. त्या लोकश्रेष्ठ जयन्नाथाचें सहस्रनाम पापाचें भय नष्ट करणारें आहे. त्यांत ऋषींनीं गाइलेलीं गौण व प्रमुख अशीं नांवें आलेलीं असून तीं मीं सांगतों, तीं ऐक.

असें म्हणून, विश्व, विष्णु, वषट्कार, भूतभव्यभवत्प्रभुः, भूतकृत्, भूतभृत्, भाव, भूतात्मा, भूतभावन इत्यादिकांपासून शंखभृत्, नंदकी, चक्री, शार्ङ्गधन्वा, गदाधर, रथांगपाणि, अक्षोभ्य, व सर्व प्रहरणायुध, येथपर्यंतचीं सहस्र नांवें भीष्मानें युधिष्ठिराला सांगितलीं. नंतर तो पुढें म्हणाला, 'युधिष्ठिरा, महात्म्या केशवाचीं दिव्य अशीं हीं सर्व सहस्र नांवें सांगितलीं. हें सहस्रनाम जो ऐकेल व दुसऱ्याला सांगेल, त्यावर इहपरलोकीं कसलेंहि संकट येणार नाहीं. तें पठन करणारा ब्राह्मण वेद-निष्णात होईल, क्षत्रिय विजयी होईल, वैश्य धनसंपन्न होईल व शूद्र सुखी होईल. हें पठन केल्यानें धर्मेच्छूला धर्म मिळेल, द्रव्यार्थीला द्रव्य प्राप्त होईल,

मनांतील हेतु पूर्ण होतील व संतति इच्छिणाऱ्याला ती मिळेल. जो नित्य भक्तिपूर्वक भगवंताकडे चित्त लावून शुद्धमनानें हें विष्णुसहस्र नाम दक्षतेनें पठन करतो, त्याला मोठें यश व ज्ञातिबांधवांवर वर्चस्व मिळून अढळ संपत्ति व महत् कल्याण हीं प्राप्त होतात. त्याला कोठूनहि भय रहात नाहीं व तेज आणि वीर्य यांची प्राप्ति होते. तो निरोगी व तेज, बल, गुण यांनीं युक्त होतो. तो रोगी असेल तर रोगमुक्त होईल, बद्ध असेल तर बंधनमुक्त होईल, घाबरलेला असेल तर भीतिमुक्त होईल, संकटग्रस्त असेल तर संकटांतून सुटेल. नित्य भक्तियुक्त अंत:करणानें पुरुषोत्तमाचें सहस्र नामांनीं स्तवन करणारा सर्व संकटें तरून जातो. मनुष्याला त्याचाच आधार असून त्यावर त्यानें सर्व चित्त ठेवावें, म्हणजे सर्व पापांपासून तो शुद्ध होऊन सनातन ब्रह्माप्रत जाईल. विष्णुभक्तांना कांहींच अशक्य रहात नाहीं व जन्म, मृत्यु, वार्धक्य, रोग यांचें भयहि त्यांना कधीं उत्पन्न होत नाहीं. हें सहस्रनाम श्रद्धेनें पढणाराला आत्मसुख, क्षमाशीलत्व, संपत्ति, धैर्य, स्मरण व कीर्ति यांची जोड मिळते व राग, मत्सर, लोभ, दुष्टबुद्धि, यांची बाधा त्या पुण्यवान् विष्णुभक्तांना कधीं होत नाहीं. आकाश, चंद्र, सूर्य, नक्षत्रें, दिशा, पृथ्वी, समुद्र, हीं सारीं त्या महात्म्या वासुदेवाच्या सामर्थ्यानेंच उभीं आहेत. देव, असुर, गंधर्व, यक्ष, सर्प, राक्षस यांसह सर्व जग कृष्णाच्या नियंत्रणांत असतें. इंद्रियें, मन, बुद्धि, सामर्थ्य, तेज, धैर्य हीं सर्व विष्णुमय असून क्षेत्र व क्षेत्रज्ञहि तोच आहे. सर्व शास्त्रांच्या मुळाशीं आचार असून आचार म्हणजेच आदिधर्म होय व विष्णु हा त्या धर्माचा स्वामी आहे. ऋषी, पितर, देव, पंचमहाभूतें, धातु, असें सारें स्थावरजंगम विश्व नारायणापासून निर्माण झालें. योग, वेदांत, सांख्य हीं दर्शनें विद्या, शिल्पादिकला, वेद, शास्त्रें व सर्व प्रकारचें विज्ञान, हीं सर्व नारायणापासूनच झालीं. विष्णु हा एकटाच सर्वश्रेष्ठ भूत असून दुसरीं सर्व निरनिराळीं दिसणारीं भूतें मूळ त्यापासूनच झालीं. त्या सर्वांचा अंतर्यामी असा तो अव्यय विष्णु त्रिभुवनाला व्यापून साऱ्या विश्वाचा उपभोग घेत असतो. हें विष्णूचें स्तोत्र भगवान् व्यासानें वर्णिलें असून ज्याला कल्याण व सुख यांची इच्छा असेल, त्यानें हें पठन करावें. विश्वाचा स्वामी व अनादि जगाची उत्पत्ति व लय करणारा अशा कमलनेत्र भगवंताला जे भजतात, त्यांचा पराभव कधीं होत नाहीं. १३. १. १४९.

---

## अध्याय १५० वा.

[ १. निरनिराळ्या प्रसंगीं करावयाचे जप व त्यांचीं फलें. ]

( १ ) **युधिष्ठिर :**—आजोबा, आपल्याला सर्व शास्त्रें पूर्णपणें अवगत आहेत. तर नित्य कसला जप केला असतां मोठें धर्मफल मिळेल आणि कोठें जावयास निघतांना, कोणत्याहि ठिकाणांत प्रवेश करतांना, कोणत्याहि कार्याला आरंभ करतांना, देवकृत्यांत किंवा श्राद्धप्रसंगीं कर्मसिद्धीचें साधन म्हणून, शांतिप्रद, पुष्टिप्रद, संरक्षक, शत्रुनाशक, भयनाशक व वेदसदृश असा, कसला जप करावा, तें आपण सांगण्याची कृपा करावी.

**भीष्म :**—व्यासानें सांगितलेला मंत्र मीं सांगतों तो स्थिरचित्तानें ऐकून घे. तो दिव्य मंत्र सावित्रीसह जपला असतां तत्काल पापापासून मुक्ति होते. त्या मंत्राचा विधिहि सांगतों. तो रात्रंदिवस जपणाराला पापाचा संसर्गहि घडत नाहीं; आयुष्याची वृद्धि होऊन मनुष्याचे हेतू सिद्ध होतात व त्याला इहपरलोकीं सुख मिळतें. क्षात्रधर्मपर व सत्यनिष्ठ अशा मोठमोठ्या राजर्षींनीं पूर्वीं त्याचें अनुष्टान केलें होतें. युधिष्ठिरा, असा हा नित्यपठनाचा मंत्र मनःसंयम करून सदा पढणाऱ्या राजांना सर्वश्रेष्ठ वैभव प्राप्त होतें. हा मंत्र 'नमो वसिष्ठाय महाव्रताय' इत्यादि 'साक्षिभूता महात्मनः पापस्य सुकृतस्य च' येथपर्यंत आहे. त्याचा अर्थ असा :—

' महाव्रत वसिष्ठाला नमस्कार असो. वेदाचा सागर अशा पराशराला मीं नमस्कार करतों. अनंत अशा शेषाला व अक्षय अशा सिद्धांना नमस्कार असो. ऋषींना नमस्कार असो. श्रेष्ठांत श्रेष्ठ अशा वरप्रद देवाला मीं नमस्कार करतों. सहस्र मस्तकें असलेल्या शिवाला व सहस्र नांवांच्या विष्णूला नमस्कार असो. अजैकपाद्, अहिर्बुध्न्य, पिनाकी, अपराजित, ऋत, त्र्यंबक, महेश्वर, वृषाकपि, शम्भु, हवन व ईश्वर हे अकरा रुद्र प्रसिद्ध असून ते त्रिभुवनाचे स्वामी आहेत. शतरुद्रीयामध्यें त्यांची संख्या शंभर सांगितली आहे. अंश, भग, मित्र, जलाधिपतिवरुण, धाता, अर्यमा, जयंत, भास्कर, त्वष्टा, पूष्टा, इन्द्र आणि विष्णु हे बारा कश्यपपुत्र आदित्य होत असें वेदांत म्हटलें आहे. धर, ध्रुव, सोम, सावित्र, अनिल, अनल, प्रत्युष व प्रभात हे आठ वसु म्हणून प्रसिद्ध आहेत. नासत्य आणि दस्त्र हे दोन अश्विनीकुमार म्हणून म्हटले आहेत. ते दोघे संज्ञानामक पत्नीपासून सूर्याला झालेले पुत्र होत. संज्ञेच्या ते नाकांतून निघाले. आतां

लोकांचीं कर्मे पहाणारे साक्षी, यज्ञ जाणणारे, तसेंच दिलेलें दान व केलेलें सत्कर्म यांची पहाणी करीत प्राणिमात्रांमध्यें अदृश्य रूपानें फिरणारे देव कोण ते सांगतों. मृत्यु, काळ, विश्वेदेव, पितृगण, तपस्वी मुनी आणि मोक्षपरायण सिद्ध हे मनुष्यांचीं शुभाशुभ कर्मे पहातात व देवांच्या नांवांचा जप करणारांचें कल्याण करतात. ते प्रजापतीनें उत्पन्न केलेल्या सर्व लोकांत आपल्या दिव्य तेजानें सर्व कर्मे नियमित करीत रहातात. प्राणाचे नियन्ते असलेल्या त्यांचें नामस्मरण करणाऱ्या मनुष्याला धर्म, अर्थ व काम यांची भरपूर प्राप्ति होते व पुण्य-लोकहि मिळतात. सर्व भूतगणांचे अधिपति असे तेतीस देव तसाच नंदीवर बसणारा महादेव, सर्वलोकनायक, गणांचे नायक असे विनायक, रुद्राचे गण, नक्षत्रें, नद्या, आकाश, पक्षिराज गरुड, पृथ्वीवर तपानें सिद्धि मिळविलेले सिद्ध, स्थावर व जंगम अशीं भूतें, हिमालय व इतर पर्वत, चारी महासागर, शंकराचे त्याच्या सारखे पराक्रमी अनुयायी, विजयशाली विष्णु, अंबिकेसह स्कंद, या सर्वांचें नामस्मरण करणारा सर्व पापांपासून मुक्त होतो. या पुढें मनुसंबंधीं श्रेष्ठ ऋषि सांगतों. यवक्रीत, रैभ्य, अर्वावसु, परावसु, औशिज, कक्षीवान्, अंगिरसाचा पुत्र बल, मेधातिथीचा पुत्र कण्व व बर्हिषद् हे सर्व ब्रह्मतेजानें युक्त असून लोककल्याण करणारे म्हणून प्रसिद्ध आहेत. रुद्र अग्नि व वसु यांच्याप्रमाणें ते तेजस्वी असून त्यांचें नामसंकीर्तन करणाऱ्या सर्वांना उत्तम फळ मिळतें व ते पृथ्वीवर सत्कर्में करून स्वर्गांत देवांसह आनंद भोगतात. महेंद्रादि सात देव पूर्व दिशेस रहात असून त्यांचें कीर्तन करणाराला इन्द्रलोकीं मोठेपणा मिळतो. उन्मुक्त, प्रमुक्त, वीर्यशाली, स्वस्त्यात्रेय, दृढव्य, ऊर्ध्वबाहु, तृणसोमा गिरा व मित्रावरुणांचा पुत्र प्रतापी अगस्त्य, हे यमाचे सात ऋत्विज दक्षिण दिशेकडे रहातात. दृढेयु, अनेयु, परिव्याध, एकत, द्वित, चित आणि अत्रीचा पुत्र सारस्वत हे वरुणाचे सात ऋत्विज पश्चिमेस रहातात. अत्रि, वसिष्ठ, कश्यप, गौतम, भरद्वाज, विश्वामित्र, व जमदग्नि हे कुबेराचे सात ऋत्विज उत्तरेस रहातात. दुसरे सात ऋषि सर्व दिशांत वास करतात. त्यांचें कीर्तन केलें असतां ते कीर्ति व कल्याण देऊन मनुष्यांचा उत्कर्ष करतात. धर्म, काम, काल, वसु, वासुकि, अनंत व कपिल हे सात पृथ्वीला धरून ठेवितात. परशुराम, व्यास, द्रोणपुत्र अश्वत्थामा, लोमेश, हे दिव्य ऋषि एकएकटेहि सातांसारखे असुन ते सर्व दिशांचे रक्षण करीत लोकांना शांति देतात. ज्या दिशेला ते असतील त्या दिशे-कडे तोंड करून त्यांना शरण जावें. ते सर्वांना पवित्र करतात. संवर्त, मेरु, सावर्ण,

मार्कंडेय, सांख्य, योग, नारद, दुर्वास हे ऋषि मोठे तपस्वी, दमनशील असे त्रिभुवनांत प्रसिद्ध आहेत. दुसरे रुद्रासारखे ब्रह्मलोक निवासी आहेत. या सर्वांचें नामसंकीर्तन केल्यानें पुत्रहीनाला पुत्र मिळतो, धनहीनाला धन मिळतें, व धर्म, अर्थ आणि काम यांमध्यें सिद्धि मिळते. वेनपुत्र राजश्रेष्ठ पृथूचें म्हणजे पृथ्वी ज्याला कन्येसारखी होती त्या सार्वभौम राजाचें नामस्मरण करावें; तसेंच सूर्यवंशांत जन्मलेल्या इन्द्राप्रमाणें पराक्रमी त्रिभुवनप्रसिद्ध व इला आणि बुध यांचा पुत्र अशा पुरूरव्याचें स्मरण करावें. त्रैलोक्य प्रसिद्ध वीर असून ज्यानें 'गवां अयन' नांवाचा यज्ञ कृतयुगांत केला होता, त्या भरताचें संकीर्तन करावें. परम तेजस्वी, विश्व जिंकणारा, तपस्वी, लोकमान्य व उत्तम लक्षणांनीं युक्त असा राजश्रेष्ठ रंतिदेव, सागराच्या पुत्रांचें ज्यानें गंगोदकानें तारण केलें तो राजर्षि श्वेत, इत्यादि जे अग्निसदृश व महासामर्थ्यवान् पुरुष होऊन गेले त्यांच्याहि नामस्मरणानें कीर्ति वाढते. देव, ऋषि, पृथ्वीपति राजे, सांख्य, योग, हव्य, कव्य, सर्व वेदांत ज्याचें वर्णन केलें आहे असें परब्रह्म, या सर्वांचें कीर्तन करणें मंगलप्रद, पवित्र, व्याधिनाशक व पुष्टिवर्धक आहे. म्हणून सकाळीं व संध्याकाळीं मनःसंयम करून मनुष्यानें त्यांच्या नांवाचा सर्व कर्मांपूर्वीं उच्चार करावा. हे श्रेष्ठ विनायक वर्षाव करतात, प्रकाशतात, वहातात, उत्पत्ति करतात व ते दक्ष, क्षमाशील आणि जितेंद्रिय आहेत. मनुष्यांच्या पापपुण्यांचें ते निरीक्षण करीत नामस्मरणानें मनुष्यांचें सर्व पाप नष्ट करितात. म्हणून सकाळीं उठतांच प्रथम त्यांचें नांव घेतल्यानें पुण्य मिळतें. त्यांच्या स्मरणानें अग्नि व चोर यांचें भय नाहींसें होऊन, मार्गांत कसलीहि अडचण येत नाहीं व मनुष्यांचीं दुष्ट स्वप्नें नाश पावतात. तीं सर्व पापांतून सुटून आपल्या घरांत सुखानें रहातात. दीक्षासमयीं प्रत्येक वेळीं जो ब्राह्मण त्यांचें नामस्मरण करील तो न्यायी, आत्मसंतुष्ट, क्षमाशील, दमनशील व निर्मत्सर होईल. कोणी रोगग्रस्त व दुःखित असेल तर तो त्या पठनानें पापमुक्त होईल. घरांत त्यांचें पठन केल्यास त्यांत सर्व सुखाचा वास होईल. शेतांत जाऊन त्यांचें पठन केल्यानें त्यांत पुष्कळ धान्य पिकेल. वाटेनें जातांना व दुसऱ्या गांवीं गेलें असतांहि यांचें पठन करावें, म्हणजे आपलीं मुलें, स्त्री, धन, बींबियाणें, ओषधि यांचें रक्षण होतें. रणांगणावर क्षत्रियांनें त्यांचा पाठ केला असतां त्याचे शत्रु नष्ट होऊन कल्याणवृद्धि होते. देवकार्यांत व पितृकार्यांत त्यांचें नामस्मरण केल्यास, पितर व देव हे त्यांना अर्पिलेल्या कव्य व हव्य द्रव्यांचा उपभोग घेतात. तसें करणाऱ्याला रोग, श्वापद

हत्ती, चोर, यांचें भय रहात नाहीं, त्याचें पाप नष्ट होत जातें व तो त्यांतून लवकरच मुक्त होतो. हा श्रेष्ठ असा सावित्री मंत्र जपणाराला नावेंत, गाडींत, पायीं प्रवास करतांना किंवा राजसभेंत मोठी सिद्धि मिळते. त्याला राजाचें, पिशाचाचें, राक्षसाचें तसेंच अग्नि, पाणी, वारा, जीवजंतु यांचेंहि भय रहात नाहीं. सावित्री मंत्र जपणारा चारी वर्ण व आश्रम यांना सदा शांति देतो. त्याचें पठन होत असेल तेथें अग्नि लांकडें जाळीत नाहीं, अल्पवयांत कोणी मृत्यु पावत नाहीं व साप तेथें राहूं शकत नाहींत. तो पढणारे दुःख पावत नाहींत व श्रेष्ठ-गतीस जातात. गाईंच्यामध्यें जाऊन हा मंत्र जपल्यास गाई अगदीं प्रेमळ होतात. प्रवासास निघतांना व वाटेंत कोणत्याहि स्थितींत हा जपावा. संयम-शील ऋषि त्याचा नित्य जप करीत अग्नीला आहुति देत असतात. तो त्यांचा रहस्यमय व श्रेष्ठ असा मंत्र आहे. योग्य रीतीनें सिद्ध झालेल्या या पराशरकृत दिव्य मंत्राचा जुना इतिहास पूर्वी इन्द्राला सांगण्यांत आला होता, तोच हा सनातन ब्रह्माचा विचार मीं सांगितला. सर्व प्राण्यांचें हृदयच हा मंत्र असून सनातन वेद म्हणजे तोच. चंद्रवंश व सूर्यवंश यांत उत्पन्न झालेले रघुकुलांतील व कुरुकुलांतील राजे शुद्ध होऊन प्राण्यांचा आधार असलेल्या या मंत्राचा नित्य जप करतात. देव सप्तर्षि व ध्रुव यांच्या नांवाचा पुनःपुनः उच्चार केल्यानें मनुष्य सर्व संकटांतून सुटून पापमुक्त होतो. काश्यप, गौतम, भृगु, अंगिरस्, शुक्र, अगस्त्य, ब्रहस्पति, इत्यादि वृद्ध ब्रह्मर्षींनीं जपलेला, भारद्वाजाला मान्य व ऋचीकाच्या पुत्रांना वसिष्ठापासून मिळालेला असा हा सावित्री मंत्र जपल्यानेंच इंद्र व वसु यांनीं सर्व दानवांना जिंकिलें. सोन्यानें शिंगें मढवून शंभर गाई वेदवेत्त्या बहु-श्रुत ब्राह्मणाला देणें व दिव्य अशी ही भारतकथा नित्य सांगणें यांचीं फलें सारखींच होत. भृगूच्या नामसंकीर्तनानें धर्मवृद्धि होते. वसिष्ठाला नमस्कार केल्यानें वीर्यवृद्धि होते; रघूला नमस्कार करणाराला युद्धांत जय मिळतो व अश्विनांच्या नामाचा उच्चार करणाराला रोग होत नाहीं. युधिष्ठिरा, ब्रह्मासारखी शाश्वत अशी ही सावित्रि तुला मीं सांगितली. आणखी दुसरें कांहीं तुला विचा-रावयाचें असेल तर विचार, तेंहि सांगतों. १३.१.१५०.

---

## अध्याय १५१ वा.

[ १. ब्राह्मणप्रशंसा ]

( १ ) **युधिष्ठिर :—**हे पितामहा, पूजा करण्यास व नमस्कार करण्यास योग्य कोण व कोणाशीं कसें वागावें म्हणजे अहित होणार नाहीं तें आतां सांगा.

**भीष्म :—**युधिष्ठिरा, ब्राह्मणांचा अनादर केल्यानें देवांनाहि कष्ट होतात; पण त्यांना नमस्कार केल्यानें पाप नष्ट होतें. म्हणून ब्राह्मणांना पूज्य समजून त्यांना नमस्कार करावा व मुलगा बापाशीं वागतो तसें त्यांच्याशीं वागावें. ते ब्राह्मणच मनाचे खंबीर असून या लोकांचें धारण करतात. सर्व लोकांना धारण करणाऱ्या धर्माचे ते मोठे संरक्षक असून द्रव्यत्यागानें त्यांना रमणीयत्व येतें व ते व्यर्थ बडबड कधीं करीत नाहींत. ते व्रतनिष्ठ व सर्व प्राण्यांना सुखाचा आधार असून लोकांचे पुढारी व शास्त्रांचे यशस्वी प्रणेते आहेत. तप हेंच त्यांचें मोठें धन असून सत्यवचन हेंच बळ आहे. धर्माचें मूळ तेच असतात व त्यांची दृष्टि सूक्ष्म असल्यामुळें धर्म त्यांना चांगला कळतो. त्यांची इच्छा नित्य धर्मावरच खिळलेली असते व धर्मानें वागूनच ते आपल्या सत्कर्मांनीं धर्माचें रक्षण करतात. चारी वर्णांच्या प्रजा त्यांच्याच आश्रयानें जगत आहेत. ते सर्वांचे मार्गदर्शक पुढारी व यज्ञ पार पाडणारे होत. परंपरागत समाजकार्याची जड धुरा ते नित्य आपल्या खांद्यावर बाळगितात व खंद्या बैलाप्रमाणें तिच्याखालीं तेहि कधीं वांकत नाहींत. पितर, देव व अतिथि यांचे ते मुख्य असल्यामुळें हव्य, कव्य व प्रथम भोजनाचा मान त्यांचा आहे. केवळ जेवणानेंच ते तिन्ही लोकांचें मोठ्या संकटांतून रक्षण करतात. सर्व लोकांना प्रकाश देणारा दीप तेच; ज्ञानी डोळसांचा डोळा तेच; सर्वांना सदुपदेश देणारे व वेदज्ञान हें धन मानणारे असे कुशल मोक्षदर्शीहि तेच. सर्व प्राण्यांची गति काय होणार हें त्यांना समजतें व अध्यात्मज्ञानाचें ते सदा चिंतन करीत असतात. मागेंपुढें काय झालें व होणार, प्रस्तुत काय चाललें आहे, यांचें त्यांना असंदिग्ध ज्ञान असतें. श्रेष्ठ काय, कनिष्ठ काय हें त्यांना नीट कळतें व उच्चगतीलाच ते जातात. त्याचें सर्व पाप धुवून गेल्यानें ते सर्वथा मुक्त असतात. सुखदुःखादि द्वंद्वाच्या पलीकडे गेलेले असल्यामुळें ते ऐहिक गोष्टींच्या मागें कधीं लागत नाहींत. त्यांना मान देणें योग्य असून ज्ञात्या महात्म्यांकडून त्यांना नित्य तो मिळत असतो. चंदन व चिखल त्यांना सारखींच वाटतात; खावयास मिळो वा न मिळो, त्याची त्यांना क्षिति

नसते; रेशमी वस्त्रें व हरणांचीं कातडीं त्यांना सारखींच होत. अनेक दिवस कांहीं न खातां ते आपलीं शरीरें शुष्क करतील, पण मनःसंयमपूर्वक करावयाचा वेदाभ्यास सोडणार नाहींत; राग आल्यास ते देवांनाहि त्यांच्या स्थानावरून ओढतील, जो देव नसेल त्याला देव करतील, फार काय पण लोकपालांसह दुसरी सृष्टिहि ते निर्माण करतील. त्यांच्या शापानेंच समुद्राचें पाणी पिण्यास अयोग्य झालें. त्यांचा क्रोधाग्नि अद्यापिहि दण्डकारण्यांत पेटत राहिला आहे. ते देवांचेहि देव व कारणांचेंहि कारण आहेत. साऱ्या प्रमाणांना आधारभूत तेच असून सुज्ञ पुरुष त्यांचा अपमान कधीं करीत नाहींत. ते वृद्ध असोत कीं बाल असोत, सर्वांनीं त्यांना मान द्यावा. पण आपसांत ते तप व विद्या यांचें प्रमाण पाहून एकमेकांना मान देतात. ब्राह्मण विद्वान नसला तरी तो देवासारखा सत्पात्र व पावन करणारा आहे. तो विद्वान् असेल तर मग विशेषच मोठा देव असून भरलेल्या सागरासारखा असतो. ब्राह्मण विद्वान वा अविद्वान कसाहि असला तरी तो मोठें दैवत होय. मंत्रपूत असो कीं साधा असो अग्नि मोठें दैवत असून त्याचें तेज जसें स्मशानांत तसेंच इतरत्रहि निर्दोष असतें, व तो जसा हविर्यज्ञांत किंवा गृहकृत्यांत सारखाच शोभतो, तसाच प्रकार ब्राह्मणाचा असून जरी तो सर्व प्रकारच्या अनिष्ट कर्मांत असला तरी तो सर्वस्वी मान्य असें दैवत होय, हें निःसंशय समज. १३.१.१५१.

---

## अध्याय १५२ वा.

[ १. ब्राह्मणमाहात्म्य: कार्तवीर्यअर्जुन व वायु यांमधील संवाद. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—आजोबा, ब्राह्मणाची पूजा करण्यांत काय हित पाहून किंवा कोणत्या प्रकारच्या उत्कर्षाचें लक्षण पाहून आपण ती करीत असतां ?

**भीष्म**:—युधिष्ठिरा, याविषयीं सहस्रार्जुन व वायु यांमधील पूर्वींचा संवाद सांगत असतात. कार्तवीर्यअर्जुन नांवाचा सहस्रबाहूंचा राजा होऊन गेला. तो महाबलवान् असून माहिष्मती नगरींत रहात असे व तेथून समुद्रवलयांकित साऱ्या पृथ्वीचें राज्य करी. तो हैहय कुळांत जन्मलेला व मोठा पराक्रमी होता. त्यानें क्षात्रधर्माला अनुसरून आपलें द्रव्य विनयपूर्वक दत्तात्रेयाला दिलें व त्याची आराधना केली; तेव्हां दत्तात्रेयानें संतुष्ट होऊन त्याला तीन वर दिले. त्या वरांनीं आनंदित होऊन सहस्रार्जुन म्हणाला, 'सैन्यामध्यें असतांना मला सहस्र-

हात असावे पण घरांत रीतीप्रमाणें दोनच असावे. सैनिकांना रणांत माझे सहस्र बाहु दिसावेत व सर्व पृथ्वी मीं पराक्रमानें जिंकावी. धर्मानें ती प्राप्त करून घेतल्यावर मी तिचें आळस टाकून रक्षण करीन. हे ब्राह्मणश्रेष्ठा, मला आणखी चवथाहि वर कृपा करून द्या. तो असा कीं, मीं जेव्हां खोट्या मार्गानें जाऊं लागेन, तेव्हां मीं आपला आश्रित असल्यामुळें मला आपण सदुपदेश करून वाटेवर आणावें. दत्तात्रेयानें 'ठीक आहे' असें म्हटलें. याप्रमाणें त्या कार्तवीर्याला वर मिळाले असतां, अग्नीप्रमाणें झळकणाऱ्या रथांत बसून तो 'आतां माझ्या सारखा कोण वीर आहे?' असें आपल्या वीर्याच्या घमेंडींत म्हणत संचार करूं लागला. त्याच्या या बोलण्यावर त्याला आकाशवाणीचें उत्तर मिळालें कीं, 'मूर्खा, ब्राह्मण कांहीं झालें तरी क्षत्रियाहून श्रेष्ठ आहे, हें तुला कसें कळत नाहीं? ब्राह्मणाच्या साह्यानेंच क्षत्रिय झाला तरी प्रजापालन करूं शकतो.' पण त्यावर अर्जुनानें प्रत्युत्तर दिलें कीं, 'मीं संतुष्ट झाल्यास नवीन सृष्टि निर्मीन, क्रुद्ध झाल्यास तिचा नाशहि करीन. कर्म, मन व वाणी यांत माझ्याहून ब्राह्मण वरचढ असणेंच शक्य नाहीं. ब्राह्मण श्रेष्ठ होय असें पूर्वीं म्हणत होते; पण त्यानंतर क्षत्रिय ब्राह्मणांहून श्रेष्ठ असें आतां म्हणावें. या दोन मतांत भेद असा आहे कीं, ब्राह्मण हेच क्षत्रियांचा आश्रय करतात. क्षत्रिय कांहीं ब्राह्मणांचा आश्रय घेत नाहींत. वेदाध्ययनाच्या मिषानें ब्राह्मण क्षत्रियांवर पोसत असतात. प्रजापलनाचा धर्म क्षत्रियांवर अवलंबून असून ब्राह्मणांचा निर्वाह जर क्षत्रियांच्या जिवावर आहे तर ब्राह्मण श्रेष्ठ कसा ठरेल? तरी मी आतां भिक्षा मागणाऱ्या पण सर्वांहून आपल्याला श्रेष्ठ मानणाऱ्या घमेंडखोर ब्राह्मणांना आपल्या ताब्यांत आणतों. आकाशांतील वाणीनें सांगितलेलें सारें खोटें आहे. कातडीं पांघरणाऱ्या साऱ्या अगतिक ब्राह्मणांना मी आंतां जिंकून टाकतों पहा! मला राज्यापासून भ्रष्ट करण्यास त्रिभुवनांतहि कोणाला सामर्थ्य नाहीं, मग तो देव असो कीं मनुष्य असो. अर्थात् मीं ब्राह्मणांहून श्रेष्ठ आहें. आजपर्यंत लोकांत ब्राह्मण श्रेष्ठ असतील, पण यापुढें मीं क्षत्रियांचें श्रेष्ठत्व स्थापणार! माझें बल युद्धांत सहन करण्यास कोण समर्थ आहे?'

सहस्रार्जुनाचें हें भाषण ऐकून आकाशांतून बोलणाऱ्या निशाचरीला भय वाटलें. पण अंतरिक्षांत असलेला वायु मात्र अर्जुनाला उत्तर देऊं लागला. तो म्हणाला, "अर्जुना, हा ब्राह्मणांविषयींचा द्वेषभाव तूं टाकून दे आणि त्यांना नमस्कार कर. यांना जर तूं त्रास देशील तर साऱ्या राष्ट्रांत तुजविषयीं क्षोभ उत्पन्न होईल. नाहीं तर, राजा, हे बलिष्ठ ब्राह्मण तुझा नायनाट करून टाकतील

व तुला राष्ट्रांतून घालवून देतील." हें ऐकून अर्जुनानें विचारलें, 'तूं कोण आहेस'? वायु त्याला म्हणाला, 'मीं देवांचा दूत वायु आहें, व तुझ्या हिताची गोष्ट मीं तुला सांगत आहें.' त्यावर अर्जुन पुनः म्हणाला, 'वायो, तूं ब्राह्मणांविषयीं मोठ्या भक्तीची आवड दाखविलीस, पण ब्राह्मण हा काय पदार्थ आहे तें मला आधीं सांग. तो काय पृथ्वीसारखा आहे, कीं वायूसारखा आहे, कीं पाण्यासारखा, कीं अग्नीसारखा कीं सूर्यासारखा अथवा आकाशासारखा आहे बरें?' १३. १. १५२

---

## अध्याय १५३ वा.

[ १. ब्राह्मणमाहात्म्यवर्णनः वायूचें अर्जुनाला उत्तर. ]

( १ ) **वायुः**—मूर्खा, थोर ब्राह्मणांचे कांहीं गुण सांगतों ते ऐक. तूं मघां सांगितलेंस त्या सर्वांहून ब्राह्मण श्रेष्ठ आहेत. पूर्वीं पृथ्वीनें आपलें पृथ्वीपण टाकून अंगराजाशीं स्पर्धा केली, व तेणेंकरून तिचा नाश झाला; पण काश्यप ब्राह्मणानें तिला पुनः उचलून आवरून धरिलें. राजा, ब्राह्मण हे इहलोकीं तसेंच परलोकींहि अजिंक्य आहेत. अंगिरा ऋषीनें आपल्या तेजानें सर्व जल जणूं दूध समजून पिऊन टाकिलें; पण त्या माहात्म्याची तृप्ति म्हणून झाली नाहीं. तेव्हां त्यानें सारी पृथ्वी महापुरानें भरून टाकिली. अशा रीतीनें तो रागावला असतां मीं जग सोडून तेथून निघून गेलों व अंगिरसाच्या भीतीनें बराच काळ ब्राह्मणांच्या अग्निहोत्रांत लपून राहिलों. दुसरें असें कीं अहिल्येचा अभिलाष केल्यामुळें गौतमऋषीनें त्याला शाप दिला, पण धर्माकडे पाहून त्यानें त्याचा समूळ नाश मात्र केला नाहीं. त्याप्रमाणेंच मूळ गोड पाण्यानें भरलेला समुद्र ब्राह्मणाच्या शापामुळें खारट झाला. अग्नि मूळचा धूमरहित, सोन्याच्या रंगाच्या व सरळ वर ज्वाला जाणारा असतांहि क्रुद्ध झालेल्या अंगिरा ऋषीच्या शापामुळें ते गुण त्याच्यांतून नष्ट झाले. सगराचे पुत्र महासागराच्या जवळ आलेले असतां कपिल ब्राह्मणानें शाप दिल्यामुळें त्यांचें भस्म होऊन गेलें हें आपण पहातोंच. राजा, म्हणून सांगतों, ब्राह्मणांच्या बरोबरीचा तूं नाहींस; ही हिताची गोष्ट तूं लक्षांत ठेव. ब्राह्मण जरी गर्भांत असला, तरीहि त्याला राजा खरोखर नमस्कार करतो. दंडकांचें एवढें मोठें राज्य! पण ब्राह्मणानें तें नष्ट करून टाकिलें; तालजंघांचें क्षत्रियकुळ केवढें मोठें होतें! पण एकट्या और्वानें त्याचा नाश केला. तुला जें एवढें मोठें दुर्लभ राज्य, बळ व ज्ञान

मिळालें, तें तरी दत्तात्रेयाच्या कृपेनेंच ना? अर्जुना, तूं नित्य अग्नीची पूजा करितोस ती कां म्हणून? तो तरी ब्राह्मणच ना? तो सर्वांचें हव्य जिकडचें तिकडे नेऊन पोचवितो हें तुला ठाऊक नाहीं काय? पण खरोखर ब्राह्मण श्रेष्ठ असून सर्व प्राण्यांचा उत्पत्तिकर्ता व पालक आहे हें ठाऊक असतांहि तूं हें वेड कां पांघरीत आहेस? अव्यक्तस्वरूपी, सर्वसमर्थ अविनाशी असा जो सर्वचराचर विश्वाचा निर्माता प्रजापति तो ब्राह्मणच आहे. कित्येक मूर्ख लोक ब्रह्मदेव अंड्यापासून झाला व तें फुटलें तेव्हां त्याच्याबरोबरच त्यांतून पर्वत, दिशा, जल, पृथ्वी, आकाश इत्यादिकांसह तो बाहेर पडला असें म्हणतात. पण हें कोणी पाहिलें आहे काय? वस्तुतः ब्रह्मदेव जर अज आहे, तर तो उत्पन्न कोणापासून होणार? आकाशालाच कोणी अंडें म्हणतात व त्यांतून ब्रह्मदेव उत्पन्न झाला असें समजतात. पण त्यावेळीं दुसरें कांहीं नसल्यामुळें तो राहिला तरी कशावर? तर त्याचें उत्तर अहंकारावर राहिला असें देतात व तो समर्थ अहंकार सर्व तेज व्यापून राहिलेला आहे असें म्हणतात. पण तें अंडें कोठें दिसत नाहीं आणि सर्वांचा उत्पत्तिकर्ता ब्रह्मदेव मात्र दिसतो. यावरून खरा प्रकार काय, तें सिद्ध होतें. असें वायूनें सांगितलें असतां अर्जुन गप्प बसला. मग वायु पुनः बोलूं लागला. १३.१.१५३.

---

## अध्याय १५४ वा.

[ १. ब्राह्मणाचें माहात्म्य : वायु अर्जुनाला त्याचीं उदाहरणें सांगतो. ]

( १ ) **वायु** :—अंग नांवाचा राजा एकदां ही पृथ्वी दक्षणा म्हणून ब्राह्मणाला देऊन टाकूं लागला असतां पृथ्वीला चिंता पडली. ती म्हणाली, 'सर्व प्राण्यांना धारण करणारी मी या श्रेष्ठ राजाच्या हातीं पडलें असतां मज ब्रह्मदेवाच्या कन्येला तो ब्राह्मणांना देऊं कां पहातो? तर मीं आतां भूमीपण सोडून ब्रह्मदेवाच्या जागीं जातें; म्हणजे हा राजा आपल्या राज्यासह नष्ट होईल'. असें म्हणून ती गली. तेव्हां कश्यपानें पृथ्वी निघून जात आहे असें पाहून स्वतःचें शरीर सोडलें व तो पृथ्वींत शिरला. त्यावेळीं ती पुनः टवटवीत व गवत, औषधी इत्यादिकांनीं भरलेली अशी झाली. तिचें भय नाहींसें झालें व धर्माचें फळहि तिला मिळालें. याप्रमाणें तो महाव्रतशाली कश्यप देवांचीं तीस सहस्र वर्षें निरलस होऊन पृथ्वीरूपानें राहिला. तेव्हां ती पुनः कश्यपापुढें येऊन हात जोडून उभी राहिली

व तेव्हांपासून ती त्याची कन्या म्हणून प्रसिद्ध झाली. अर्जुना, तो कश्यप अशा प्रकारचा ब्राह्मण होता. आतां सांग पाहूं, कोणी क्षत्रिय कश्यपाहून मोठा आहे काय ?

सहस्रार्जुन हें ऐकून स्तब्ध झाला असतां वायु पुनः म्हणाला, राजा, अंगिरसाच्या कुळांत जन्मलेल्या उतथ्य ऋषीची कथा आतां ऐक. सोमाची भद्रा नांवाची रूपानें अप्रतिम अशी कन्या होती. उतथ्य हाच तिला योग्य असा पति आहे असें सोमाला आढळून आलें. त्या भाग्यशाली यशस्वी भद्रेनेंहि उतथ्य पति मिळावा म्हणून उग्र तपश्चर्या केली. त्यावेळीं सोमाचा पिता अत्रि यानें उतथ्याला बोलावून भद्रेला भार्या म्हणून उतथ्याला दिलें आणि उतथ्यानेंहि पुष्कळ दक्षिणेसह तिचा विधिपुरस्सर स्वीकार केला. पण पूर्वीपासून वरुणाचें मन भद्रेवर जडलें होतें, म्हणून त्यानें यमुनेच्या काठीं उतथ्याच्या आश्रमाशीं येऊन तेथून तिला पळविलें आणि आपल्या नगरांत नेऊन ठेविलें. त्या नगरांत साठसहस्र डोह होते. त्याच्याहून सरस नगर दुसरें क्वचितच असेल. सुंदर अप्सरा व उपभोग्य वस्तु यांनीं संपन्न अशा त्या नगरांत तो देव तिच्यासह रममाण होऊं लागला. पुढें नारदानें तें सारें वर्तमान उतथ्याला सांगितलें असतां, तें ऐकून तो नारदाला म्हणाला, 'नारदा, तूं वरुणाकडे जा आणि त्याला माझ्यासाठीं कठोर शब्दांनीं विचार कीं तूं माझी पत्नी काय म्हणून पळविलीस ? तूं स्वतःस लोकपाल म्हणजे लोकांचा संरक्षक म्हणवितोस, लोकनाशक म्हणवीत नाहींस. सोमानें आपली कन्या मला भार्या म्हणून दिली असतां तूं तिला पळविलें आहेस.' त्याच्या म्हणण्याप्रमाणें नारदानें वरुणाला जाऊन सांगितलें कीं उतथ्याची भार्या तूं परत देऊन टाक, तूं तिला कां पळविलेंस ? नारदाचें भाषण ऐकून त्याला वरुण म्हणाला, 'नारदा, माझीच ही आवडती भार्या आहे. तिला सोडावें असें मला वाटत नाहीं.' वरुणाचें हें म्हणणें नारदानें उतथ्याला येऊन सांगितलें. तो कष्टानें म्हणाला 'मुने, वरुणानें माझा गळा दाबून मला झिडकारलें आणि तुझी भार्या परत देण्यास तो इच्छीत नाहीं; तरी आतां तुला काय कर्तव्य असेल तें तूं कर.' नारदाचें भाषण ऐकून अंगिरसकुलोत्पन्न तो उतथ्य जळूं लागला आणि त्यानें आपल्या तेजानें समुद्राचें पाणी सारें अडवून पिऊन टाकिलें. सर्व पाणी त्यानें पिऊन टाकलें व वरुणाचे मित्र त्याची विनवणी करूं लागले तरी तो वरुण भद्रेला सोडीना. तेव्हां रागावलेला तो उतथ्य पृथ्वीला म्हणाला, 'हे पृथ्वि, साठसहस्र डोहांचें ठिकाण कोठें आहे तें मला दाखव.' त्यावेळीं समुद्र

मागें सरकत असतां तो प्रदेश ओसाड वाळवंट झाला. मग तेथून वहाणाऱ्या नदीला तो ब्राह्मणश्रेष्ठ म्हणाला, 'हे भित्रे सरस्वति, तूं अदृश्य हो व मरुदेशीं जा. हा प्रदेश तूं सोडून दिल्यावर अपवित्र होवो.' याप्रमाणें तो सारा प्रदेश शुष्क होऊन गेला असतां वरुणानें भद्रा आणून उतथ्याला परत दिली व तो त्याला शरण गेला. भार्या परत मिळाली असतां उतथ्याचें मन शांत झालें, आणि त्यानें सर्व जगाला व वरुणालाहि दुःखांतून सोडविलें. अर्जुना, भार्या परत मिळाली असतां तो धर्मवेत्ता महातेजस्वी उतथ्य वरुणाला काय म्हणाला तें ऐक. तो म्हणाला, 'वरुणा, तूं आक्रोश करीत असतांहि मीं हिला आपल्या तपाच्या बळावर परत मिळविलें.' असें म्हणून तिला घेऊन तो आपल्या घरीं गेला. अर्जुना, ब्राह्मणश्रेष्ठ उतथ्य असा पराक्रमी होता. आतां मी तुला विचारतों, 'उतथ्याहून श्रेष्ठ असा कोणी क्षत्रिय आहे का, सांग.' १३. १. १५४.

---

## अध्याय १५५ वा.

[ १. ब्राह्मणांच्या माहात्म्याचें वर्णन: वायु अर्जुनाला आणखी उदाहरणें सांगतो. ]

( १ ) भीष्म:—युधिष्ठिरा, वायूनें सांगितलेली ही कथा ऐकून अर्जुन स्तब्ध झाला असतां वायु पुढें म्हणाला, 'राजा, आतां अगस्त्य मुनीचें माहात्म्य ऐक. असुरांनीं देवांना जिंकिलें असतां, देव अगदीं निराश झाले. त्यांचे यज्ञ, तशाच पितरांच्या स्वधा असुर पळवून घेऊन गेले. मनुष्यांचीं कर्में, यज्ञ, हीं असुरांनीं बंद पाडल्यावर ऐश्वर्यापासून भ्रष्ट झालेले ते देव पृथ्वीवर भटकूं लागले असें सांगतात. तेव्हां एकदां अनेक व्रत करणारा व सूर्यासारखा देदीप्यमान असा अगस्त्य मुनि त्यांच्या दृष्टीस पडला. त्याला नमस्कार करून देवांनीं त्याला कुशल-प्रश्न विचारिले व म्हटलें, 'मुने, दानवांनीं आम्हांला युद्धांत जिंकल्यामुळें आम्हीं ऐश्वर्यापासून भ्रष्ट झालों आहों. तरी आम्हांला या महासंकटांतून तूं सोडव.' देवांची ही विनवणी ऐकून अगस्त्याला दानवांचा मोठा राग आला आणि प्रलय-कालीन अग्नीप्रमाणें तो तेजस्वी मुनि जणूं भडकूं लागला. त्याच्यापासून निघा-लेल्या प्रदीप्त अग्नीच्या ज्वाळांनीं हजारों दानव जळून खाक झाले व अंतरिक्षां-तून शेंकडों पटापट खालीं पडले. अगस्त्याच्या तेजानें जळून जाणारे ते दैत्य पृथ्वी व स्वर्ग हे दोन्ही लोक सोडून दक्षिणदिशेकडे गेले. तेथें बळिराजा पाता-

ळांत अश्वमेध यज्ञ करीत होता. जे दैत्य खालीं किंवा पृथ्वीवर राहिले तेहि अगस्त्यानें जाळून टाकले. तेव्हां देव पुनः शांत होऊन आपआपल्या लोकीं गेले. मग ते अगस्त्याला पुनः म्हणाले, 'मुने, भूमीच्या आंत असलेल्या असुरांनाहि मारून टाक.' तें ऐकून अगस्त्य देवांना म्हणाला, 'पृथ्वीच्या आंत गेलेल्यांना मी मारूं शकत नाहीं. त्यांना जाळण्यांत माझें तप व्यर्थ संपून जाईल. तरी मीं तसें करीत नाहीं.' अर्जुना, याप्रमाणें भगवान् अगस्त्यानें आपल्या तेजानें व तपाच्या बळानें दानवांचा जाळून संहार केला. अशा त्या अगस्त्याची कथा मीं तुला सांगितली. आतां तुला विचारतों कीं, अगस्त्याहून कोणी क्षत्रिय अधिक आहे काय ?

युधिष्ठिरा, ही कथा ऐकून अर्जुन स्तब्ध झाला असतां वायु आणखी म्हणाला, 'राजा, आतां यशस्वी वसिष्ठाचा मुख्य पराक्रम सांगतों ऐक. एकदां मानस सरोवरावर देवांनीं सत्र आरंभिलें व वसिष्ठाचा थोरपणा जाणून त्यालाच त्यांनीं मनानें ऋत्विज केलें. यज्ञासाठीं दीक्षा घेतलेल्या व त्यामुळें क्षीण झालेल्या सर्व देवांना पाहून पर्वताकार असे खली नांवाचे दानव त्यांना मारावयास टपून बसले. तेथून जवळच ब्रह्मदेवाचा वर मिळालेलें एक सरोवर होतें. देवांवर चाल करतांना जे दानव मरत ते त्या सरोवरांत पडून पुनः जीवंत होऊन येत आणि मोठमोठे दगड, परिघ व वृक्ष घेऊन शेकडों योजनें पसरलेलें तें पाणी उसळीत ते दहासहस्र दानव देवांवर चाल करीत. अशा रीतीनें पिडून गेलेले ते देव इंद्राला शरण गेले. तेव्हां इन्द्रहि त्यांच्या दुःखानें दुःखित होऊन संरक्षणार्थ वसिष्ठाकडे गेला. भगवान् वसिष्ठानें त्यांना अभय दिलें. सर्व देव दुःखानें गांजलेले पाहून त्या कनवाळु ऋषीनें आपल्या तेजानें त्या सर्व खली दानवांना लीलेनें जाळून टाकिलें. पुढें कैलासाकडे चाललेल्या गंगेला त्या महातपस्वी मुनीनें त्या दिव्य सरोवराशीं आणिलें व तिच्यायोगानें सरोवराचे भाग पाडले. त्या नदीमुळें फोडून बाहेर काढलेल्या भागापासून शरयू नदी झाली. ज्या ठिकाणीं ते खली दानव मारले गेले त्याला खलीन असें नांव पडलें. याप्रमाणें वसिष्ठानें इंद्रासहित सव देवांचें रक्षण केलें व ब्रह्मदेवापासून वर मिळविलेल्या राक्षसांचाहि त्या महात्म्यानें वध केला. अर्जुना, असा हा वसिष्ठाचा पराक्रम तुला सांगितला. आतां तुला विचारतों कीं वसिष्ठाहून कोणी क्षत्रिय श्रेष्ठ आहे काय, सांग. १३.१.१५५.

## अध्याय १५६ वा.

[ १. ब्राह्मणांचें माहात्म्य : वायु अर्जुनाला अत्रीची कथा सांगतो. ]

( १ ) भीष्म :—युधिष्ठिरा, वसिष्ठाचा पराक्रम ऐकून सहस्रार्जुन गप्प बसला असतां वायु त्याला पुनः म्हणाला, 'हे हैहय राजा, आतां थोर अत्रीचा पराक्रम ऐक. एकदां देव व दानव यांच्यामध्यें भयंकर काळोखांत युद्ध चाललें होतें. त्यावेळीं राहूनें चंद्रसूर्यांना बाणांनीं विद्ध केलें. त्यामुळें देव अगदींच अंधकारग्रस्त होऊन त्या बलिष्ठ दानवांकडून पटापट मारले जाऊं लागले. याप्रमाणें मारले जाऊन देव क्षीण होत चालले असतां तपस्वी अत्रिमुनि तपश्चर्या करीत असलेला त्यांना दिसला. त्याचा क्रोध नष्ट झालेला असून इंद्रियें त्याच्या स्वाधीन होतीं. त्याच्याजवळ जाऊन देव त्याला म्हणाले, 'मुने, हे चंद्रसूर्य दोघेहि या आमच्या शत्रूंकडून विद्ध केले गेले आहेत आणि आम्हीं काळोखांत सांपडल्यामुळें मारले जात आहोंत. आम्हांला शांति कशी ती ठाऊक नाहींशी झाली आहे. तरी या संकटापासून आमचें रक्षण कर.'

तें ऐकून अत्रि म्हणाला, 'देवहो, तुमचें रक्षण मीं कसें करूं ?' देवांनीं उत्तर केलें, 'तूं चंद्र हो, तिमिरनाशक सूर्य हो, आणि दस्यूंचा वधहि कर.' असें त्यांनीं सांगतांच अत्रि तमोनाशक चंद्र झाला व शांत स्वभावामुळें तो चंद्रासारखाच रम्य स्वरूपाचा दिसूं लागला. याप्रमाणें चंद्रसूर्यांचा प्रकाश अगदीं मंद झालेला पाहून त्या देवदानवांच्या युद्धांत अत्रीनें आपल्या स्वतःच्या तेजानें प्रकाश पाडिला व जगाला अंधारमुक्त व प्रकाशित केलें. अशा रीतीनें त्यानें आपल्या तेजानें देवांच्या शत्रुसमुदायाचा पाडाव केला. मोठे मोठे ते असुर अत्रीच्या तेजानें जळूं लागले. ते पाहून देवांनींहि पराक्रम करून अत्रीच्या संरक्षणाच्या बळावर त्यांचा आणखी नाश केला. असें त्या महातेजस्वी, पण कातडें पांघरणाऱ्या, अग्निहोत्री ब्राह्मण अत्रीनें आपलें सामर्थ्य प्रकटविलें. अर्जुना, फळें खाऊन राहाणाऱ्या त्या अत्रीचा हा पराक्रम पहा. आतां तूंच सांग, आहे का कोणी क्षत्रिय अत्रीहून मोठा ?'

वायूनें सांगितलेली ही अत्रीची कथा ऐकून अर्जुनाला कांहीं उत्तर देतां आलें नाहीं. तेव्हां वायु पुनः म्हणाला, 'बा अर्जुना आतां माहात्मा च्यवनाचा पराक्रम ऐक. त्यानें अश्विनांना सोमपानाचा अधिकार देण्याचें वचन दिलें, तदनुसार देवांसमक्ष इन्द्राला त्यानें सांगितलें की, 'इन्द्रा, या अश्विनांना यज्ञांत सोमपानाचा अधिकार दे.'

इंद्र:—मुने, आमच्या दृष्टीनें हे दोघे कनिष्ठ जातीचे असल्यामुळें त्यांना सोमपानाचा अधिकार कसा देतां येईल? देवांना हे संमत नाहींत, यास्तव ही गोष्ट तूं आम्हाला सांगूं नको. हे व्रतनिष्ठ मुने, अश्विनांसह आम्हाला सोमपान करतां येणार नाहीं. यास्तव यावांचून दुसरें कांहीं सांग, तें आम्हीं करूं.

च्यवन—देवराजा, या अश्विनांना तुमच्यासह सोमरस पिऊं दे. कारण हे दोघेहि देवच असून सूर्याचे पुत्र आहेत. देवहो, मीं जें आतां सांगितलें तेवढें माझें म्हणणें मान्य करा. तसें कराल तर तुमचें कल्याण होईल; न केल्यास कल्याण होणार नाहीं.

इन्द्र—मुनिश्रेष्ठा, कांहीं झालें तरी अश्विनांसह मी तरी सोम पिणार नाहीं. दुसरे वाटेल तर पिवोत. मला तसा तो पिण्याची इच्छा नाहीं.

च्यवन—इन्द्रा, माझ्या सांगण्याप्रमाणें जर तूं केलें नाहीं, तर आतांच माझ्याकडून तडाखे खाऊन यज्ञांत तूं सोम पिशील पहा!

सहस्रार्जुना, मग अश्विनांच्या हितासाठीं च्यवनानें आपलें काम चालू केलें. त्याच्या मंत्रांनीं देव पराभूत झाले. च्यवनाचें तें कृत्य पाहून इन्द्र रागानें वेडा झाला आणि एक प्रचंड दगड घेऊन तो च्यवनाच्या अंगावर धांवला. रागानें डोळे लाल करून वज्र उगारीत इन्द्र आपल्यावर चाल करून येत आहे, असें पाहून तपस्वी च्यवनानें अभिमंत्रित पाणी त्याच्यावर फेंकिलें व वज्र आणि दगड यांसह इन्द्राला तेथेंच थोपवून धरिलें. मग त्यानें इन्द्राचा वध करणारा असा मद नांवाचा उघड्या जबड्याचा शत्रु यज्ञांतील आहुतीपासून उत्पन्न केला. त्याला सहस्र दांत असून ते शंभर योजनें पसरले होते. त्याच्या महा भयंकर दाढा तर दोनशें योजनें लांब रुंद होत्या. धूमानें व्याप्त असलेली त्याची हनुवटी आकाशाला लागली होती. इंद्रासह सारे देव त्याच्या जिभेच्या मुळाशीं अडकले असून महासागरांत प्रचंड तिमि माशाच्या तोंडांत सांपडलेल्या क्षुद्र माशांसारखी त्यांची स्थिति झाली होती. तो प्रकार पाहून मदाच्या जवळ उभे असलेल्या देवांनीं आपसांत विचार करून इन्द्राला म्हटलें, 'देवराजा, या ब्राह्मणाला नमस्कार कर, आपण या अश्विनांसह निश्चितपणें सोमपान करूंया. तें ऐकून इन्द्रानें च्यवनाला नमस्कार केला व त्याच्या सांगण्याप्रमाणें अश्विनांसह सर्व देव सोमरस प्याले. अर्जुना, याप्रमाणें च्यवनानें अश्विनांना सोमपानाचा अधिकार मिळवून दिला. नंतर त्यानें आपलें कर्म मागें घेतलें व मदाची

वांटणी मृगया, मद्यपान व स्त्रिया या चौघांत करून दिली. राजा, या चार दोषांनीं मनुष्य नाश पावतो यांत संशय नाहीं. म्हणून त्यांना मनुष्यानें दुरूनच टाळावें. असा हा च्यवनाचा पराक्रम होता; आतां सांग बरें, ब्राह्मणाहून क्षत्रिय श्रेष्ठ आहे कीं काय तें? १३. १. १५६.

---

## अध्याय १५७ वा.

[ १. ब्राह्मणांचें माहात्म्यः वायु व अर्जुन यांचा संवाद ]

( १ ) **भीष्म :**—युधिष्ठिरा, च्यवनाची कथा ऐकून स्वस्थ राहिलेल्या सहस्रार्जुनाला वायु पुनः म्हणाला, 'अर्जुना, ब्राह्मणाचे आणखी पराक्रम ऐक. च्यवनानें उत्पन्न केलेल्या मदाच्या तोंडांत इंद्रासह सर्व देव सांपडले असतां इकडे च्यवनानें त्यांची भूमि काढून घेतली. तेव्हां स्वर्ग गेला आणि पृथ्वीहि गेली हें पाहून देवांना दुःख झालें व त्या शोकाच्या भरांत ते ब्रह्मदेवाला शरण गेले. मदाच्या तोंडांत आपण अडकलों असतां च्यवनानें आमची भूमि घेतली व तिकडे कप दैत्यांनीं स्वर्गहि बळकावला, असें गाऱ्हाणें त्यांनीं ब्रह्मदेवाला गाईलें असतां ब्रह्मदेव म्हणाला, 'इन्द्रप्रभृति देवहो, तुम्हीं त्या ब्राह्मणाला शरण जा. त्यांना प्रसन्न करा म्हणजे पूर्वीप्रमाणेंच दोन्हीं लोक तुम्हांला परत मिळतील. त्याप्रमाणें देव ब्राह्मणांना शरण गेले असतां ब्राह्मण म्हणाले, 'आम्हीं कोणाला जिंकावें?' देव म्हणाले, 'कप दैत्यांना जिंका' ब्राह्मणांनीं त्यांना सांगितलें, 'ते दैत्य पृथ्वीवर गेले म्हणजे त्यांना आम्हीं जिंकूं'. असें म्हणून त्यांनीं कपांचा नाश होईल असें कर्म आरंभिलें. कपांनीं तें ऐकिलें तेव्हां धनी नांवाचा दूत त्यांनीं ब्राह्मणांकडे पाठविला. धनी त्यांजकडे जाऊन त्यांना कपांच्या सांगण्यावरून म्हणाला, 'हे ब्राह्मणहो, सर्व कप तुमच्यासारखेच असतां तुम्ही हें आरंभिलें तरी काय? ते सर्व वेदवेत्ते, सुज्ञ, यज्ञ करणारे, सत्यव्रत व महर्षिसमान असून लक्ष्मी त्याच्या ठिकाणीं सुखानें असते व तेहि तिला सुखानें धारण करतात. ते कधीं व्यर्थ स्त्रीगमन करीत नाहींत. मंत्रहीन मांस भक्षीत नाहींत, प्रदीप्त अग्नींतच आहुति देतात व गुरूचे वचन पाळतात. सर्वजण आत्मसंयमी असून मुलांना दिल्याशिवाय ते कांहीं खात नाहींत, कोणाच्या जवळून वेगानें जात नाहींत, रजस्वलेशीं गमन करीत नाहींत व शुभकर्में करून स्वर्गास जातात. गर्भिणी स्त्रिया, वृद्ध, मुलें, व अतिथि यांना जेवावयास घालण्यापूर्वी ते स्वतः जेवत नाहींत, सकाळीं द्यूत खेळत नाहींत व दिवसा झोंपत नाहींत. हे आणि दुसरे

अनेक गुण त्या कपांत असल्यामुळें, तुम्हीं त्यांना जिंकाल तरी कसे? तरी तुम्ही या कर्मापासून निवृत्त व्हा. निवृत्त झाल्यास तुम्हांला सुख मिळेल.

दूताचें भाषण ऐकून ब्राह्मण म्हणाले, 'हे धनी, कपांचा वंशच आम्हीं जिंकणार आहों. जे देव तेच आम्ही असें समज. देवांचा छळ करणारे कप आम्हांला वध्यच आहेत. तरी तूं आलास तसा परत जा.' त्याप्रमाणें धनी परत गेला व कपांना म्हणाला, 'अहो, ते ब्राह्मण तुमचें ऐकणारे नाहींत.' तें ऐकून सर्व कप अस्त्रें घेऊन ब्राह्मणांवर धांवून गेले. ध्वज उभारून ते आपल्यावर येत आहेत असें ब्राह्मणांना दिसतांच त्यांनीं कपांचे प्राण घेण्यासाठीं पेटते अग्नि त्यांच्यावर सोडले. तेव्हां त्या कपांचा नाश झाला व ते हव्य भक्षण करणारे देव आकाशांतील अभ्रांप्रमाणें शोभूं लागले. मग त्यांनीं एकजुटीनें दानवांचा युद्धांत वध केल्यावर त्यांना कळून आलें कीं ब्राह्मणांनीं कपांचा नाश आधींच करून ठेविला आहे. नारदानें तेथें येऊन थोर मनाच्या ब्राह्मणांनीं कपांना मारिल्याचें वृत्त त्यांना सांगितलें. नारदाच्या तोंडून तें वृत्त ऐकून सर्व देव आनंदित झाले आणि त्यांनीं त्या यशस्वी ब्राह्मणांची प्रशंसा केली. मग देवांचें तेज व वीर्य वाढलें आणि ते अमर होऊन त्रिभुवनाला पूज्य झाले.' युधिष्ठिरा, वायूचें हें भाषण ऐकल्यावर सहस्रार्जुनानें त्याची पूजा केली व त्याला उत्तर दिलें. तें काय तें ऐक. तो म्हणाला, 'प्रभो, मी सदा ब्राह्मणाच्या बलावरच जगतों आहें. ब्राह्मणांचा मी कैवारी असून त्यांना नित्य नमस्कार करतों. हें मला मिळालेलें बळ दत्तात्रेयाच्या कृपेचें फळ आहे. त्याच्याच मुळें मला या लोकांत कीर्ति मिळून धर्म करतां आला. हे वायो, ब्राह्मणांचे जे पराक्रम तूं सांगितले, ते सर्व मीं शांत चित्तानें मनापासून ऐकिले.' अर्जुन असें म्हणाला असतां वायूनें त्याला क्षात्रधर्मानें वागून ब्राह्मणांचें नीट पालन करावयास सांगितलें व 'कांहीं काळानें तुला भृगूंपासून मोठें भय उत्पन्न होणार आहे,' असेंहि म्हटलें. १३.१.१५७.

---

## अध्याय १५८ वा.

[ १. भगवान् परमेश्वराचें माहात्म्य. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—हे पितामहा, व्रताचरणी ब्राह्मणांची आपण नित्य पूजा करतां ती कोणतें फळ पाहून करतां बरें? ब्राह्मणपूजेनें असें काय वैभव मिळतें कीं ज्यासाठीं आपण त्यांचा एवढा सन्मान ठेवतां, तें सर्व मला सांगा.

**भीष्म**:—युधिष्ठिरा, हा बुद्धिमान् श्रीकृष्ण आतां तुला ब्राह्मणपूजेचें महत्त्व सांगेल. त्यानें महान् व्रतें आचरलीं असून ब्राह्मणपूजेनें प्राप्त होणारें वैभव त्यानें प्रत्यक्ष पाहिलेलें आहे. माझें कर्णेंद्रियाचें बल, वाचा, मन, डोळे, बुद्धि हीं सर्व आतां शुद्धिहीन होत चाललीं आहेत. आतां लवकरच माझा देह मला ठेवावा लागणार. सूर्यहि आज भराभर चालत नाहींसा वाटतो. पुराणांत जे मोठे धर्म ब्राह्मण क्षत्रिय वैश्य व शूद्र यांच्यासाठीं सांगितले आहेत, ते मीं तुला सांगितले. आतां उरलेलें सर्व तूं कृष्णापासून समजून घे. हा कृष्ण वस्तुतः कोण आहे, त्याचें बल काय हें मी जाणतों. युधिष्ठिरा, हा खरोखर परमात्माच अवतरला असून तो धर्माच्या बाबतींत तुझ्या संशयाचें निराकरण करील. पृथ्वी, आकाश, स्वर्ग हीं कृष्णानेंच निर्माण केलीं. अचाट बलयुक्त असा पुराण वराह तो हाच असून पर्वत व दिशा त्यानेंच उत्पन्न केल्या. अंतरिक्ष, स्वर्ग, चारी दिशा, चारी उपदिशा हीं सारीं याच्या खालींच होत. त्याच्यानंतर ही सृष्टि झाली असून हें अनादि विश्व त्यानेंच निर्मिलें ! याच्या बेंबींत कमळ उगवलें व त्यांत अनंत बलशाली ब्रह्मदेव आपणच उत्पन्न झाला व त्यानें साऱ्या महासागराला व्यापून टाकणारा अंधार नष्ट केला. हा कृत युगांत समग्र धर्मस्वरूपी होता, त्रेतायुगांत तो ज्ञानस्वरूप झाला, द्वापारांत तो बलरूप झाला व कलियुगांत अधर्मरूप घेऊन पृथ्वीवर आला. त्यानेंच पूर्वी दैत्यांना मारिलें. विश्वाचा स्वामी आदिदेव तो हाच. प्राणिमात्राचा निर्माता, आदि, अंत सर्व तोच असून सर्व विश्वाचें रक्षण तोच करतो. धर्माला ग्लानि आली म्हणजे, कृष्ण देवांच्या वंशांत किंवा मनुष्यलोकीं अवतरतो व पवित्र अंतःकरणानें धर्मांत राहून बऱ्या वाईट सर्व लोकांचें पालन करतो. मोक्षाला योग्य अशांना तो मोक्ष देतो, असुरांचा वध करतो, कार्य कोणतें व अकार्य कोणतें हें तो ठरवितो; भूत वर्तमान भविष्य तोच असून राहु सोम व इंद्रहि तोच आहे. तो विश्वाचा कर्ता व विश्वस्वरूपी असून विश्वाचा उपभोक्ता व नियामकहि आहे. तो शूल धारण करणारा, शरीर धारण करणारा, व भयंकर असून, सर्व लोक त्याच्या कर्मांवरून त्याची स्तुति करतात. शेंकडो गंधर्व, अप्सरा व देव त्याच्या सेवेला नित्य दक्ष असतात. राक्षसहि त्याच्या भोंवतीं त्याची स्तुति करीत असतात. तो धनाची वृद्धि करतो व सर्वांवर विजय मिळवूं इच्छिणारा तो एकटाच आहे. यज्ञांत स्तोते याचें स्तवन करतात, सामगायक रथन्तर सामांनीं त्याला स्तवितात. ब्राह्मण वेदमंत्रांनीं त्याची स्तुति करतात व अध्वर्यु त्याला हविर्भाग अर्पितात.

पुराण्या ब्रह्म गुहेंत प्रवेश करून त्यानें आरंभींच पृथ्वीचें आवरण पाहिलें. श्रेष्ठ कर्मे करणाऱ्या त्यानेंच दैत्य, नाग व दानव यांस ताप देऊन पृथ्वीला उद्धरिलें. गोकुळाचें रक्षण केल्यामुळें इन्द्रादि देवांनीं त्याची स्तुति केली. गाईंचा प्रतिपालक तोच होता. त्याला सर्वजण विविध भक्ष्य पदार्थ अर्पितात व युद्धांत त्यालाच वाहनें देतात. अन्तरिक्ष, पृथ्वी व स्वर्ग हीं त्याच्या नियंत्रणांत असतात. त्यानेंच मित्रा वरुणाचें रेत कुंभांत सांठविलें व तेणेंकरून वसिष्ठाची उत्पत्ति झाली. तोच वायु व तोच आदिदेव सविता होय. त्यानेंच सर्व असुरांना जिंकिलें व त्याच्या पराक्रमानें तिन्ही लोक जिंकले गेले. देव, पितर व मनुष्य यांचा यज्ञविस्तार तोच आहे.

रात्र दिवस हे कालविभाग करून तोच उदयास येतो व अस्तास जातो. दक्षिण व उत्तर हीं दोन अयनें त्याचींच होत. पृथ्वीला प्रकाशित करणारे त्याचेच किरण खालींवर व तिरके पसरलेले असतात. वेदवेत्ते ब्राह्मण त्याची सेवा करतात व त्याचें तेज घेऊन सूर्य प्रकाशतो. प्रति महिन्यांत तो यज्ञ करतो व वेदवेत्ते यज्ञांत त्याचेंच स्तवन करतात. उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा या तीन ऋतूंचें चक्र तोच असून त्याला सात अश्वांचा रथ वाहून नेतो. महातेजस्वी व सर्व-व्यापी असा हा कृष्ण सर्व लोकांना एकटाच धारण करणारा आहे. तमोनाशक सूर्य व सर्वकर्ता हा कृष्णच आहे, हें समजून त्याला शरण जा. पूर्वीं एकदां खांडववनांत गवतांत प्रकट होऊन व तेथील राक्षस, सर्प इत्यादिकांची आहुति घेऊन तृप्त झालेला अग्नि तो हाच. अर्जुनाला त्यानेंच श्वेत अश्व दिले. फार काय सर्वच अश्व त्यानें केले. संसाररूपी रथ जोडणारा तोच असून त्या रथाला तीन चाकें, तीन कळस, चार घोडे व तीन आंस आहेत. तो पंचभूतांचा आश्रय असून त्यानेंच आकाश, पृथ्वी, स्वर्ग व अंतरिक्ष हीं निर्माण केलीं. दैत्यांच्या वधासाठीं तो नद्या उलटून गेला व वज्र मारणाऱ्या इन्द्राचा त्यानें पराभव केला. महेन्द्र तोच असून ब्राह्मण अनादि ऋग्मंत्रांनीं त्याचीच स्तुति यज्ञांत करतात. महातेजस्वी दुर्वासाला तोच आपल्या घरीं राहवूं शकला, दुसऱ्याला तें शक्य नव्हतें. पुराण ऋषि नारायण तोच असून तोच आपल्या स्वतःपासून विविध सृष्टि निर्माण करतो. श्रेष्ठ देव असा हा वेदांचें ज्ञान देतो व अग्निहोत्रादि अनादि विधींचें आचरणहि करतो. काम्य, वैदिक व लौकिक कर्मांचें फळ हाच देतो. आकाशांत चमकणारे तेजोगोल, स्वर्गादि तिन्ही लोक व त्यांचे संरक्षक देव, तिन्ही अग्नि, तिन्ही व्याहृति व सर्व देव म्हणजे हा देवकीपुत्रच होय.

संवत्सर, ऋतु, पक्ष, अहोरात्र, कला, काष्टा, मात्रा, मुहूर्त, लव, क्षण हीं सर्व हा सर्वव्यापी कृष्णच आहे असें समज. चंद्र, सूर्य, ग्रह, नक्षत्रें, तारका, अमावास्या, पौर्णिमा, नक्षत्रयोग, ऋतु, हें सारें कृष्णापासूनच झालें. रुद्र, आदित्य, वसु, अश्विन, साध्य, विश्वेदेव, मरुद्गण, प्रजापति, अदिति, दिति, सप्तऋषि इत्यादि सर्व कृष्णच होय. तो वायु होऊन सारें विश्व झाडून काढतो, अग्नि होऊन जाळण्याचें काम करतो, पाणी होऊन बुडविण्याचें काम करतो व ब्रह्मदेव होऊन अनेक विश्वें निर्माण करतो. जाणण्यास योग्य असा वेदांतील ज्ञानाचा विषय, त्याचा विधि व त्या विधीचें आचरण करणारा, वेद, धर्म व बल यांतील सर्व गोष्टी तसेंच हें चराचर विश्व हें सारें कृष्णरूपच समज. हा श्रेष्ठ कृष्णच तेजोरूप होऊन विश्वांत प्रकाशतो. त्यानेंच प्रथम जल उत्पन्न करून सर्व विश्व आपल्यापासून उत्पन्न केलें. ऋतु, उत्पात, विविध अद्भुत गोष्टी, मेघ, विद्युत्, ऐरावत, इत्यादि सर्व स्थावर जंगम सृष्टि कृष्णापासून झाली. विश्वाचा अंतर्यामी जो विष्णु तोच हा कृष्ण होय यांत संशय नाहीं. विश्वांत सर्वत्र भरलेला असा जो निर्गुण परमात्मा तो वासुदेव, व जीवभूत आत्मा तो संकर्षण होय. त्यापासून पुढें प्रद्युम्न व चवथा अनिरुद्ध असे त्या स्वयंभू महात्म्यानें निर्माण केले. पांच प्रकारच्या* जनांनीं युक्त असें हें पंचविध विश्व निर्मूं इच्छिणाऱ्या त्यानें पृथ्वी, वायु, आकाश, तेज व जल हीं प्रथम केलीं. स्थावर जंगम पदार्थ, व चार प्रकारचे प्राणी ( जरायुज, अंडज, स्वेदज व उद्भिज ) उत्पन्न केल्यावर मग त्यानें पांच प्रकारच्या बीजांनीं युक्त अशी भूमि उत्पन्न केली. त्या भूमीवर आकाशांतून जलवर्षाव होतो व त्यामुळें सर्व जग जगूं शकतें. त्यानंतर त्यानें देव, असुर, मानव, लोक, ऋषि, पितर, प्रजा, थोडक्यांत सांगावयाचें तर सर्व प्राणी-कोटि उत्पन्न केल्या. शुभ, अशुभ, चालणारें, स्थिर, वर्तमान व भविष्य हें सर्व या केशवापासून झालें. प्राण्यांचा अंत करणाराहि प्रत्यक्ष कृष्णच असून शाश्वत असा धर्म चालविणारा तोच होय. चांगलें वाईट, पुण्य पाप हें सर्व अचिंत्य कृष्णाचेंच स्वरूप आहे. याहून निराळें कांहीं आहे असें म्हणणें केवळ मूर्खपणा होय. असा हा कृष्ण या कारणास्तव सर्वव्यापी अनाद्यनंत असा श्रेष्ठ नारायणच होय. आदि, अंत व मध्य ज्यांना आहेत अशा सर्व स्थावर जंगम वस्तूंचें अविनाशी आदिकारण तोच आहे. १३. १. १५८.

---

* देव, असुर, मनुष्य, श्वापद व इतर प्राणी हे पांच जन होत.

## अध्याय १५९ वा.

[ १ ब्राह्मण–माहात्म्य; दुर्वासाच्या भिक्षेची कथा. ]

( १ ) **युधिष्ठिर** :—श्रीकृष्णा, ब्राह्मण–पूजेचें काय माहात्म्य आहे तें मला सांग. या विषयाचा तूं ज्ञाता असून भीष्मपितामहालाहि तुझ्या सामर्थ्याचें ज्ञान आहे.

**कृष्ण** :—युधिष्ठिरा, ब्राह्मणांचे गुण काय आहेत, तें मीं तुला तत्त्वतः सांगतों, ऐक. मीं एकदां द्वारकेंत स्वस्थ बसलों असतां, ब्राह्मणांवर रागावलेला प्रद्युम्न मजजवळ आला आणि म्हणाला, 'ब्राह्मणांच्या पूजनांत असा काय अर्थ आहे, त्यांच्यांत इहपरलोकीं एवढा मोठेपणा कसला आला आहे, नित्य त्यांचा बहुमान करण्यापासून काय मिळणार आहे, तें मला स्पष्टपणें सांगा. मला तर त्याविषयीं मोठा संशय वाटतो.' प्रद्युम्नाचा हा प्रश्न ऐकून मीं त्याला उत्तर केलें, 'बाळा, ब्राह्मणांच्या पूजेचें काय फळ आहे तें सांगतों, ऐक. ते मोठे कल्याणकर्ते असून सुख दुःख त्यांच्या हातांत असतें. प्रद्युम्ना, या लोकांत काय व परलोकांत काय, कल्याण ब्राह्मणापासूनच होतें, यांत मला तर कांहीं शंका वाटत नाहीं. ब्राह्मणांची पूजा करण्यानें दीर्घायुष्य, कीर्ति, यश व सामर्थ्य हीं मिळतात, म्हणून तर सर्व लोक व लोकपालक ब्राह्मणांची पूजा करीत असतात. धर्म, अर्थ, काम तसाच मोक्ष यांचें साधन करतांना, कीर्ति व संपत्ति मिळविण्याच्या कामीं, रोगशांति करतांना, तसेंच देवपूजन व पितृश्राद्ध करतांना ब्राह्मणांना आधीं संतोषविलें पाहिजे. या गोष्टीचा अनादर मीं थोरपणाच्या घमेंडींत कसा बरें करूं! तूंहि ब्राह्मणांवर रागावूं नको. ब्राह्मण हे इहपरलोकींचें महाभूत असून ते रागावल्यास साऱ्या जगाचें भस्म करून टाकतील. त्यांना वाटल्यास ते दुसरे लोक व लोकपाल असे देवहि निर्माण करूं शकतील. हें जाणत असतां त्यांच्याशीं सरळपणें कां बरें वागूं नये? बाळा, आपल्या घरीं एकदां हिरवट पिंगट वर्णाचा एक ब्राह्मण रहात होता. तो अगदीं कृश असून अंगावर फाटकीं वस्त्रें, हातांत बेलाची काठी, आणि दाढी वाढलेली असा तो असे. उंचांतील उंच माणसांहूनहि तो अधिक उंच होता. तो स्वर्गलोकीं व मनुष्यलोकीं असा सर्वत्र स्वैर संचार करी व चव्हाट्यावर किंवा सभेंतहि तोंडानें गाणें म्हणत असे. तें गाणें असें–'या दुर्वासाचा सत्कार करून त्याला आपल्या घरीं कोण राहवून घेईल? कारण बारीकसारीक प्रमादानेंहि तो सर्वांवर भयंकर रागा-

वतो. माझें हें सांगणें ऐकून मला आश्रय देण्यास कोण सिद्ध आहे? जो मला रहावयास बोलावील, त्यानें मला अगदीं राग आणतां कामा नये.' प्रद्युम्ना, त्या दुर्वासाला कोणीच बोलावीत नाहीं, असें पाहून मीं त्याला आपल्या घरीं आणविलें. तो एखाद्यावेळीं सहस्र माणसांचें अन्न एकाच वेळीं खाई, तर दुसऱ्या वेळीं अगदींच अल्प खाई. एखाद्यावेळीं तो घरींच येईना. तो अकस्मात् हंसे, तर एखाद्यावेळीं तसाच अकस्मात् रडे. त्याच्याशीं समान वय असलेला त्यावेळीं जगांत दुसरा कोणी नव्हता. एकदां तो आपल्या घरीं गेला आणि पलंग, अंथरुणें व अलंकृत कन्या यांना जाळून टाकून पुनः बाहेर निघून गेला. मग तो मला म्हणाला, 'कृष्णा, मला खीर खाण्याची इच्छा झाली आहे, तरी ती लवकर घेऊन ये.' त्याचें मन ओळखून मी नित्य घरांतील माणसांकडून सर्वप्रकारचीं अन्नपानें सिद्ध ठेवीत होतों. कारण त्याची मला प्रथमपासून तशी सांगीच होती. त्याप्रमाणें त्यानें खीर मागतांच मीं कढत कढत खीर त्याच्यापुढें आणून ठेविली. तींतील थोडीशी खाऊन तो मला म्हणाला, 'या खिरीनें आपलें अंग लवकर चोपडून घे.' तें ऐकून मी विचार न करतांच ती उरलेली खीर आपल्या अंगाला चोपडूं लागलों. बाळा, इतक्यांत तुझी आई रुक्मिणी त्याच्या दृष्टीस पडली. माझें करणें पाहून तिला हंसूं आलें असतां दुर्वासानें तिचेंहि अंग खिरीनें चोपडून काढिलें. नंतर त्यानें तिला रथाला जुंपिलें आणि आपण त्यावर बसून घराबाहेर निघाला. रथाच्या घोड्याप्रमाणें फुरफुरणारा तो आगीच्या वर्णाचा ब्राह्मण माझ्या देखत रुक्मिणीला चाबकाचे फटके देऊं लागला. पण तें पाहूनहि ईर्षेस पेटल्यामुळें मीं मुळींच दुःख केलें नाहीं. तो मोठ्या राजमार्गानें रथांतून चालला असतां तो सारा आश्चर्याचा प्रकार पाहून दाशार्हांना राग आला आणि ते आपसांत कुजबुजूं लागले कीं 'ब्राह्मणाच्याच जन्मास कोणी झालें तरी जावें. दुसऱ्या वर्णांत मुळींच जाऊं नये. नाहींतर असल्या रथांत बसून कोणता मनुष्य जीवंत राहील? सर्पाचें विष तीव्र खरें, पण ब्राह्मण त्याहूनहि तीव्र विषारी होय. ब्राह्मणरूपी विषानें करपून जाणाऱ्या माणसाला उतार पाडणें कोणत्याहि वैद्याला शक्य नाहीं.' तो मुनि दांडगेश्वरासारखा चालला असतां रुक्मिणी ठेंच लागून वाटेंत पडली. पण त्याचा कांहींच विचार न करतां तो तिला पुढें जाण्यासाठीं फटके मारीतच राहिला. त्याला मोठा राग आला आणि त्या भरांत तो रथांतून उडी टाकून त्या रस्त्यानें दक्षिणेस तोंड करून पायींच धांवत चालला. तो वाटेल त्या वाटेनें पळत असतां मीहि त्याच्या मागोमाग खिरीनें माखलेला

असतांहि धांवत राहिलों आणि 'हे भगवन्, शांत व्हा' अशी त्याची विनवणी केली. तेव्हां मात्र त्यानें माझ्याकडे वळून पाहिलें आणि म्हटलें, 'कृष्णा, तूं अगदीं मुळापासून रागाला जिंकिलेंस खरें. तुझ्यामध्यें कांहींच उणेपणा दिसला नाहीं. मी तुझ्यावर अगदीं संतुष्ट झालों आहें. तरी तुला काय हवे असतील ते वर माग. मी प्रसन्न झालों असतां काय फळ मिळतें तें पहा. जोंपर्यंत मनुष्याची अन्नावर वासना आहे, तोंपर्यंत अन्नावर असेल तशीच त्यांची भावना तुझ्यावरहि राहील. तुझी पुण्यकीर्ति सर्व लोकांत पसरून त्रिभुवनांत तुझें वैशिष्ट्य दिसून येईल व तूं सर्वांना अत्यंत प्रिय होशील. माझ्याकडून तुझ्या ज्या कांहीं वस्तु फुटल्या असतील किंवा जळल्या असतील, किंवा नाहींशा झाल्या असतील, त्या जशाच्या तशा किंवा मूळच्याहून चांगल्या झालेल्या तुला दिसतील. तुझें अंग खिरीनें माखलें असल्यामुळें तुला मृत्युभय इच्छेस येईपर्यंत रहाणार नाहीं. पण, अरे, तूं आपल्या पायाचे तळवे कां नाहीं माखून घेतलेस ? हें नाहीं रे बरें केलें.' संतोषानें तो असें बोलत आहे, तों माझें शरीर कांतिमान् झालेलें मला दिसलें. मग तो रुक्मिणीला म्हणाला, 'तुला सर्व स्त्रियांत उत्तम यश मिळेल व मोठी कीर्तिहि प्राप्त होईल. वृद्धपण, रोग, फिकटपणा यांची बाधा तुला कधीं होणार नाहीं. तुझ्या अंगाला सुवास येईल व तुझ्या हातून कृष्णाची उत्तम सेवा घडून त्याच्या सोळा सहस्र स्त्रियांमध्यें तूं वरिष्ठ होशील व कृष्णाचा शाश्वत समागमहि तुला घडेल.' प्रद्युम्ना, याप्रमाणें तुझ्या मातेला सांगून तो निघून जातांना मला पुनः म्हणाला, 'कृष्णा, ब्राह्मणांविषयीं तुझी बुद्धि नित्य अशीच असूं दे.' असें म्हणून तो तेथेंच गुप्त झाला. तो निघून गेल्यावर मी ब्राह्मणांच्या बाबतींत मौन व्रत धरून ते सांगतील तसें करूं लागलों. असो; अशा प्रकारचें व्रत दुर्वासाच्या बाबतींत केल्यावर मी रुक्मिणीसह घरांत प्रवेश केला. आंत येऊन पहातों, तों त्यांतील सगळ्या वस्तु नव्यांसारख्या असून ऋषीनें मोडलेल्या, जाळलेल्या वस्तुहि सगळ्या पूर्वींसारख्या दिसून आल्या. त्या सगळ्या नव्या कोऱ्या वस्तु पाहून मी चकित झालों आणि ब्राह्मणांची मनःपूर्वक पूजा करूं लागलों. युधिष्ठिरा, प्रद्युम्नानें विचारिल्यावरून त्या ब्राह्मणश्रेष्ठ दुर्वासाचें वृत्त मीं त्याला सर्व सांगितलें. तूंहि त्या थोर ब्राह्मणांना नित्य दानें देऊन व गोड बोलून संतोषवीत जा. ब्राह्मणांच्या प्रसादानेंच हें वैभव मला मिळालें. माझ्यासंबंधानें भीष्मानें तुला जें सांगितलें, तें अगदीं सत्य आहे. १३. १. १५९.

## अध्याय १६० वा.

[ १. शंकरानें केलेला दक्षाच्या यज्ञाचा नाश. २. त्रिपुरदहनाची कथा. ]

( १ ) **युधिष्ठिर :**—श्रीकृष्णा, दुर्वासाच्या कृपेनें तुला जें विज्ञान मिळालें तें तूं मला सांग. त्या महात्म्याचें थोर भाग्य, त्याचीं नांवें, हीं सारीं तुझ्यापासून समजून घेण्याची माझी इच्छा आहे.

**कृष्ण :**—ठीक आहे. महादेवाला नमस्कार करून, माझ्या कल्याणाच्या कोणत्या गोष्टी मला ऋषीपासून मिळाल्या त्या मी सांगतों. सकाळीं लवकर उठून शुद्ध मनानें हात जोडून जें शतरुद्रीय मी पठन करतों, तें तुला सांगतों ऐक. मोठें तप केल्यानंतर प्रजापतीनें तें निर्माण केलें. शंकरानें सर्व प्रजा उत्पन्न केल्या; त्या महादेवाहून दुसरें कोणी त्रिभुवनांत मोठें नाहीं, कारण सर्वांचा उत्पत्तिकर्ताच तो आहे. त्याच्या समोर उभें रहाण्याचें धैर्य कोणालाच नाहीं. युद्धांत तो रागावला असतां त्याच्या नुसत्या वासानेंच शत्रु बेशुद्ध होऊन कांपूं लागतात, पडतात व बरेच मरूनहि जातात. त्याचें नांव ऐकून युद्धांत देवांचेंहि हृदय फुटून जातें. तो रागावला असतां आपल्या घोर मुद्रेनें ज्या कोणाकडे पाहील, ते देव असोत, असुर असोत, गंधर्व असोत कीं नाग असोत, ते गुहेंत लपले तरी त्यांना सुख होणार नाहीं. दक्ष प्रजापतीचा यज्ञ मांडला असतां शंकरानें रागावून त्या यज्ञाचा बाणानें निर्भयपणें वेध केला आणि मोठ्यानें आरोळीहि ठोकली. तो प्रकार पाहून देव अगदीं घाबरून गेले व त्यांना स्वस्थपणा कसा तो वाटेना. त्याच्या धनुष्याच्या दोरीच्या टणत्कारानें सारे लोक व्याकुळ होऊन गेले. त्यांना पुढें काय करावें हें समजेना; ते अगदीं खिन्न झाले. पाणी खळबळून गेलें व पृथ्वी कांपूं लागली. पर्वत सारे फुटून गेले आणि आकाश तर चोहोंकडून कोसळूं लागलें. सगळें जग अंधकारानें भरून कोणी कोणाला दिसेनासें झालें. नक्षत्रें व सूर्य यांचा प्रकाश नष्ट झाला. सर्वजण भिऊन गेल्यामुळें सर्वांचे हितकर्ते ऋषि शांतिपाठ म्हणूं लागले. मग रुद्रानें देवांवर चाल केली व भगाचे डोळे आपल्या शूलाच्या तडाख्यानें काढून टाकिले. पूषाला तर त्यानें लाथ मारून ढकलून दिलें व पुरोडाश भक्षण करणाऱ्याचे दांतच पाडून टाकिले. तेव्हां कांपत कांपत देवांनीं त्याला नमस्कार केला; पण त्यानें दुसरा तीक्ष्ण बाण धनुष्यावर लावलाच. त्याचा तो पराक्रम पाहून ऋषींसह देव घाबरून गेले व त्याला शांत करण्याचा प्रयत्न करूं लागले. त्यांनीं हात जोडून शतरुद्रीयाचा जप केला,

तेव्हां त्याच्या त्या स्तुतीनें रुद्र प्रसन्न झाला. देवांनीं भयामुळें रुद्राला यज्ञांतील विशिष्ट भाग काढून दिला आणि ते त्याला शरण गेले. तेव्हां रुद्रानें प्रसन्न होऊन यज्ञाची पुनः जुळणी केली व ज्याचा ज्याचा नाश केला होता ती ती वस्तु पुनः जशीच्या तशी करून ठेविली.

( २ ) पूर्वी आकाशांत वीर्यशाली असुरांचीं तीन नगरें होतीं; एक लोखंडाचें, दुसरें रुप्याचें व तिसरें सोन्याचें. इन्द्राला आपल्या साऱ्या आयुधांच्या साह्यानेंहि तीं जिंकतां आलीं नाहींत. तेव्हां सारे देव त्या असुरांनीं पीडिले असतां रुद्राला शरण गेले व त्याला म्हणाले, ' हे रुद्रा, या असुरांमुळें सर्वजण सर्व कर्मांत भयंकर व पशुसमान होतील. तरी त्यांचा या नगरांसह नाश करून, लोकांचें रक्षण कर.' देवांचें भाषण ऐकून शंकरानें ' बरें आहे ' असें म्हटलें व विष्णूला बाण, अग्नीला त्या बाणाचें टोंक, विवस्वानाचा पुत्र जो यम त्याला बाणाचा पिसारा, सर्व वेदांना धनुष्य, श्रेष्ठ अशा सावित्रीला धनुष्याची दोरी, व ब्रह्म-देवाला सारथि करून सर्व जुळणी यथास्थित केली आणि तीन पेरांच्या तीन टोंकाच्या त्या बाणानें त्यानें त्या नगरांचा वेध केला. त्या बाणाचा वर्ण सूर्या-सारखा व तेज अग्नीसारखें होतें. या प्रमाणें बाण टाकून रुद्रानें त्या असुरांना त्यांच्या नगरांसह जाळून टाकिलें. नंतर तो पांच शिरांचा लहान बाळ होऊन पार्वतीच्या मांडीवर बसला असतां पार्वतीनें कौतुकानें ' हा कोण आहे तें ओळखा ' असें देवांना म्हटलें. तेव्हां इंद्राला त्याचा हेवा वाटून त्यानें त्यावर वज्राचा प्रहार केला असतां त्या बालकानें परिघासारखा तो इन्द्राचा बाहु थोपवून धरिला. इतकें झालें तरी देवांनीं त्या बालस्वरूपी त्रिभुवनेश्वराला ओळखिलें नाहीं. प्रजापतीसह त्या सर्वांना ईश्वराच्या विषयीं मोहच पडला. मग ब्रह्मदेवानें त्या अमित पराक्रमी उमापतीचें ध्यान करून हाच तो श्रेष्ठ देव होय असें ओळखिलें व त्याला नमस्कार केला, तेव्हां देवांनीं रुद्र व उमा यांची प्रार्थना केली असतां तीं प्रसन्न झालीं व इन्द्राचा बाहु पूर्वीसारखा पुनः झाला. तो रुद्रच दुर्वास ब्राह्मण होऊन द्वारकेंत माझ्या घरीं बरेच दिवस राहिला. तेथें त्यानें अनेक खोड्या केल्या, त्या सर्व अति दुःसह असतांहि मी उदारपणें सहन केल्या. तो महादेवच रुद्र, शिव, अग्नि, इन्द्र, वायु, अश्विन, विद्युत्, चंद्र, ईशान, सूर्य, वरुण, या नांवांनीं ओळखला जातो. काल, अंतक, मृत्यु, यम, हीं त्याचींच नांवें. रात्र, दिवस, मास, पक्ष, ऋतु, संध्या, संवत्सर, हीं त्याचींच रूपें होत. तो सृष्टिकर्ता, शास्त्रकर्ता, विश्वकर्ता व सर्वज्ञ असून, नक्षत्रें, ग्रह, दिशा,

उपदिशा हीं सर्व त्याचींच स्वरूपें आहेत. त्याचें मापन करणें अशक्य असून तो विश्वरूप परम तेजस्वी असा भगवान् आहे. एकेरी, दुहेरी, अनेकप्रकारी, शंभरप्रकारी, सहस्रप्रकारी, लक्षप्रकारी असाहि तो असतो. असा तो महादेव सर्वव्यापी असल्यामुळें शंभर वर्षे बसलें तरीहि त्याच्या गुणांचें वर्णन करणें पुरें होणार नाहीं. १३. १. १६०.

## अध्याय १६१ वा.

[ १. महादेवाचें माहात्म्य. ]

कृष्ण:—हे महाबाहो युधिष्ठिरा, आतां त्या बहुरूपी अनेक नांवांच्या महादेवाचें माहात्म्य सांगतों तें ऐक. महादेवाला अग्नि, स्थाणु, महेश्वर, एकाक्ष, त्र्यंबक, विश्वरूप, शिव अशीं अनेक नांवें आहेत. वेदवेत्ते ब्राह्मण त्यांचीं मुख्य दोन स्वरूपें मानतात; एक घोर व एक सौम्य. तींहि पुनः अनेक प्रकारचीं आहेत. त्याचें जें उग्र व घोर स्वरूप तें अग्नि, वीज व सूर्य होय. त्याचें सौम्य स्वरूप म्हणजे धर्म, जल व चंद्र होत. त्याच्या शरीराचें एक अर्ध अग्नि व दुसरें अर्ध सोम म्हणतात. तो एका स्वरूपानें ब्रह्मचर्य पाळतो व दुसऱ्या स्वरूपानें सौम्य आहे. आपल्या घोर व उग्र स्वरूपानें तो जगाचा संहार करतो. तो सर्वांचा स्वामी व सर्वांत मोठा असल्यामुळें त्याला महेश्वर म्हणतात. तो दहन करतो, तीक्ष्ण, उग्र व प्रतापी आहे आणि मांस, रक्त व मज्जा खातो म्हणून त्याला रुद्र म्हणजे भयंकर म्हणतात. देवांमध्यें तो मोठा, त्याचें क्षेत्रहि अफाट व सर्व विश्वाचें तो पालन करतो, म्हणून त्याला महादेव म्हणतात. त्याचा वर्ण धुरासारखा असल्यामुळें त्याला धूर्जटी म्हणतात. तो सर्वांना सर्व कर्मांनीं साह्य करतो व मनुष्याचें शिव म्हणजे कल्याण करतो म्हणून त्याला शिव नांव पडलें आहे. तो वर राहून मनुष्यांचे प्राण दहन करतो. स्वतः स्थिर असतो व त्याचें लिंगहि स्थिर आहे, त्यामुळें तो स्थाणु या नांवानें प्रसिद्ध आहे. भूत, वर्तमान व भविष्य, स्थावर,–जंगम अशीं त्याचीं अनेक रूपें असल्यामुळें त्याला बहुरूपी म्हटलें आहे. विश्वे म्हणजे सर्व देव त्याच्यांत असतात म्हणून त्याला विश्वरूप नांव दिलें आहे. तो सहस्राक्ष, अयुताक्ष, किंबहुना सर्वत्रच त्याचे डोळे आहेत. त्याच्या डोळ्याचें तेज महासमर्थ आहे. त्याच्या नेत्रसंख्येला अंतच नाहीं. पशूंना तो रक्षितो, त्यांच्याशीं खेळतो, व त्यांचा तो स्वामी आहे म्हणून त्याला पशुपति

म्हणतात. हा नित्य ब्रह्मचर्यानें रहातो म्हणून सर्व लोक त्याच्या लिंगाला मान देतात. त्याच्या मूर्तींची किंवा लिंगाची पूजा करावी; लिंगपूजा करणाराला मोठें वैभव मिळतें. त्याचें लिंग ऊर्ध्व असल्यामुळें ऋषि, देव, गंधर्व व अप्सरा त्या लिंगाचीच पूजा करतात. लिंगपूजा केल्यानें महेश्वराला आनंद होतो व तो भक्ताला सुख देतो. तो स्मशानांत वास करतो व तेथें जे त्याची पूजा करतात त्यांना वीरांचें स्थान मिळतें. तो प्राण्यांच्या शरीरांत मृत्युरूपानें रहातो व वायु होऊन प्राण, अपान इत्यादि रूपें धारण करतो. त्याचीं रूपें घोर, प्रदीप्त अशीं अनेक असून लोकांमध्यें ज्यांची पूजा करतात तीं सुज्ञ ब्राह्मणांना ठाऊक असतात. त्याचीं नांवेंहि अनेक असून तीं त्याला त्याच्या विविध अशा कर्मांवरूनच पडलीं आहेत. वेदांतील शतरुद्रीय नांवाचें त्याचें जें स्तोत्र ब्राह्मण पठन करतात, तें व्यासानें सांगितलेलें आहे. तो सर्वांना सर्व देणारा असून ब्राह्मण व दुसरे ऋषि त्याला सर्वांत वडील म्हणतात. हा देवांतील प्रमुख असून त्यानें आपल्या मुखापासून अग्नि निर्माण केला. तो शरणांगतांना कधीं सोडीत नाहीं, मग त्यांत त्याला स्वतःचे प्राण सोडावे लागले तरी चालतात. मनुष्यांना तो दीर्घायुष्य, आरोग्य, ऐश्वर्य, इष्ट हेतु देतो व पुनः काढूनहि घेतो. इन्द्रादि देवांत त्याचेंच ऐश्वर्य थोर आहे. त्रैलोक्याचें हिताहित करण्यांत तो सदा गुंतलेला असतो. स्वतःच्या कामनांचें त्याचें ऐश्वर्य अफाट असल्यामुळें त्याला ईश्वर म्हणतात. मोठ्या लोकांचाहि तो ईश्वर असल्यामुळें महेश्वर झाला आहे. त्यानें अनेक रूपांनीं हें सारें विश्व व्यापून टाकिलें आहे. समुद्रांतील जल शोषणारा वडवानल हा त्या महादेवाचें एक मुखच होय. १३. १. १६१.

---

## अध्याय १६२ वा.

[ १. धर्मांत प्रामाण्य कशाला, प्रत्यक्षाला कीं वेदाला ? ]

( १ ) **वैशंपायनः**—हे जनमेजय राजा, याप्रमाणें कृष्णाचें भाषण झाल्यावर युधिष्ठिरानें भीष्माला पुनः प्रश्न केला कीं, 'धर्माचा निर्णय करण्याच्या कामीं प्रमाण काय, प्रत्यक्ष दिसतें तें, कीं वेदवचन ?'

**भीष्मः**—युधिष्ठिरा, या विषयासंबंधानें संशय ठेवण्याचें कांहीं कारण नाहीं, असें मला वाटतें. नुसता संशय घेणें हें मोठें सोपें कार्य आहे. पण त्यावर

निर्णय देणें मात्र दुष्कर होय. कारण प्रत्यक्ष आणि श्रुतिवचनें हीं अनेक प्रकारचीं असल्यामुळें तीं एकमेकांविषयीं संशय उत्पन्न करणारच. कार्यकारण भावावर भर देणारे व आपल्याला ज्ञाते म्हणविणारे कित्येक प्रत्यक्षालाच प्रमाण मानतात व परमेश्वर नाहीं असें म्हणतात. पण त्यांचें तें म्हणणें युक्तिहीन असून ते स्वतःला पंडित म्हणत असले, तरी वस्तुतः ते त्या विषयांत पोरच होत. आतां जगाचें एकच एक आदिकारण तें कोणतें असें जर विचारशील, तर त्याचें उत्तर असें कीं पुनर्जन्म मानून दीर्घ कालपर्यंत अनेक जन्मांत निरलसपणें योग साधन करावें तेव्हांच तें कळणें शक्य आहे. तार्किकपणा सोडून विपुलज्ञान मिळवावें, तेव्हां त्या अनन्त अशा परमेश्वराचा साक्षात्कार घडतो. हा साक्षात्कार तर्कानें कधींच होत नाहीं. कारण केवळ तर्कानें चालल्यास कांहींच निष्पन्न होत नाहीं. यासाठीं वेदांनीं जें प्रतिपादिलें नाहीं तें अग्राह्य होय; तें वर्ज्य समजावें.

युधिष्ठिर :—महाराज, प्रत्यक्ष, तर्कानें सिद्ध होणारें म्हणजे, अनुमान, आणि वेदवेत्त्या पुरुषांचा आचार म्हणजे शिष्टाचार यांनाहि धर्मनिर्णयांत प्रमाण मानतात. पण तींहि अनेकविध असल्यामुळें खरें प्रामाण्य कोणाला तें मला सांगा.

भीष्म :—बलाढ्य अशा दुष्टांकडून धर्माचा नित्य ऱ्हास होत असल्यामुळें एकदां मोठ्या प्रयत्नानेंहि घालून दिलेली धर्माची घडी कालान्तरानें मोडते. विहिरीवर काष्ठ-तृणांचें आच्छादन पडावें त्याप्रमाणें धर्मावर अधर्माचें आच्छादन पडतें व त्यामुळें आचारांत भेद उत्पन्न होतो. वेदवचनाचा त्याग करणारे दुराचारी हा भेद पाडीत जातात. ते धर्मद्वेष्टे व बुद्धिहीन असल्यामुळें त्यांच्यावर विश्वास ठेवूं नये. सज्जनांच्या वचनांवर अतृप्तपणें उड्या टाकणारे व वेदविहित ज्ञानावर सर्व भर देणारे जे असतात, तेच प्रामाणिक धर्मनिर्णय करणारे होत. त्यांचीच उपासना करावी व त्यांनाच धर्मविषयक निर्णय विचारावा. त्यांच्यांत आचारभेद होत नाहीं. यज्ञ व वेदाभ्यास हाच त्यांचा आचार. तेव्हां उत्तम शील, वेदाध्ययन व शुद्ध आचार या तिघांमिळून धर्म होतो.

युधिष्ठिर :—महाराज, या अपार धर्मसागराचें परतीर दिसत नसल्यामुळें त्यांत मार्ग काढतांना माझी बुद्धि संशयांत गटंकळ्या खाऊं लागते. वेदवचन प्रत्यक्ष गोष्टी व शिष्टांचा आचार हीं तीन जर धर्मप्रमाणें आहेत, तर धर्माचेंहि स्वरूप तीन प्रकारचें असावयास पाहिजे. मग तो एकच कसा ?

भीष्म :—युधिष्ठिरा, पूर्वी सांगितल्याप्रमाणें बलिष्ठ दुराचाऱ्यांकडून धर्माचा ऱ्हास होत असल्यामुळें तो तीन प्रकारचा वाटतो. वस्तुतः तो एकच आहे. धर्म तीन प्रकारानें दिसला, तरी ते तीन प्रकार वेगवेगळे आहेत, असें माझें मत नाहीं. पण कांहीं झालें, तरी तिन्ही प्रकारांचे जे मार्ग सांगितले आहेत, त्याप्रमाणेंच तूं आचरण कर. धर्मांची चिकित्सा तर्कानें करूं नये व त्या बाबतींत संशयहि धरूं नये. शंका न घेतां जणूं तूं अंधळा व बहिरा आहेस असें समजून मी सांगतों त्याप्रमाणें कर. अहिंसा, सत्य, शांति आणि दान यांना सनातन धर्म म्हटलें आहे, त्यांचें तूं प्रथम आचरण कर. पिता, आजोबा इत्यादिकांनीं ब्राह्मणांविषयीं जी वृत्ति ठेविली, तीच तूं ठेव. ब्राह्मण हेच धर्माचे उपदेशक होत. हें प्रमाण, तें अप्रमाण, असें जो मनुष्य करीत बसतो तो अडाणी होय; त्याच्या बडबडीपासून शुष्क वादच उत्पन्न होत असल्यामुळें त्याला प्रमाण मानूं नये. ब्राह्मणांचा सत्कार करून व त्यांना बहुमान देऊन त्यांचीच सेवा कर. सर्व लोक त्यांच्यावरच आधारलेले आहेत.

युधिष्ठिर :—महाराज, जे धर्माचा द्वेष करतात व जे त्याची उपासना करतात, त्यांना कोणती गति मिळते तें मला सांगा.

भीष्म :—ज्यांचें चित्त रजोगुण व तमोगुण यांनीं व्याप्त आहे, ते धर्म-द्वेष्टे लोक नरकास जातात. पण जे सत्यानें व सरळपणानें वागून धर्म आचरतात ते स्वर्गाचे भोक्ते होतात. आचार्यसेवेच्या योगानें धर्म हाच त्यांचा मुख्य विषय होतो व धर्मोपासनेमुळें ते सहजच देवलोकीं जातात. मनुष्य असोत कीं देव असोत, जे शरीरदंड सोसून लोभ व द्वेष यांना टाकतात व धर्मानें वागतात, त्यांना सुख मिळतें. ज्ञाते लोक धर्माला ब्रह्मदेवाचा पहिला पुत्र समजतात. मनाची ओढ जशी पिकलेल्या फळाकडे असते तशी धर्मिष्ठाची धर्माकडे असते.

युधिष्ठिर :—दुराचाऱ्यांचें स्वरूप काय व साधूंचें वर्तन कसें असतें, हें आतां मला सांगा. साधु आणि असाधु यांचीं लक्षणें तरी कोणतीं ?

भीष्म :—युधिष्ठिरा, असाधु लोकांचें आचरण वाईट असतें; ते साहसी व दुर्मुखलेले असतात. उलट साधूंचें शील उत्तम व आचार शिष्टपणाचा असतो. राजमार्गांत, गाईंच्या मध्यें किंवा धान्याच्या राशींत मूत्र व विष्ठा हीं ते कधीं

टाकीत नाहींत. देव, पितर, आणि अतिथि व कुटुंबांतील माणसें यांना दिल्या-वर उरलेलें अन्न ते भक्षितात, जेवतांना बडबड करीत नाहींत, व ओल्या पायांनीं झोंपत नाहींत. सूर्य, बैल, देव, गोठा व चव्हाठा तसेच धर्मनिष्ठ ब्राह्मण व वृद्ध यांना ते प्रदक्षिणा करून पुढें जातात. वृद्ध, गाई, राजा, डोक्यावर ओझें घेऊन जाणारे, स्त्रिया व ग्रामाधिकारी यांना ते प्रथम वाट देतात. अतिथि, सेवक, नातेवाईक, तसेच शरण आलेले लोक, यांचें स्वागत करून ते त्यांचें रक्षण करतात. मनुष्यांनीं सकाळीं व संध्याकाळीं असें दोन वेळांच जेवावें असें देवांनीं ठरविलें आहे, म्हणून मनुष्यांनीं मध्यें कांहीं खाऊं नये, म्हणजे त्यांना उपवा-साचें फळ मिळतें. अग्नि होमकालाची वाट पहात असतो, तशी स्त्री ऋतु-कालाची वाट पहात असते. म्हणून तिच्याशीं जो इतर वेळीं गमन करीत नाहीं त्याला ब्रह्मचर्यपालनाचें फळ मिळतें. अमृत, ब्राह्मण व गाय हीं तीन सारख्याच योग्यतेचीं आहेत. म्हणून गोब्राह्मणांचें नित्य पूजन करावें. यज्ञ-मंत्रांनीं संस्कारलेलें मांस खाल्यानें दोष लागत नाहीं. पाठीचें मांस किंवा यज्ञावांचून इतर प्रसंगींचें मांस खाणें म्हणजे पुत्राचें मांस खाणेंच होय. स्वतःच्या ठिकाणींच काय पण परठिकाणीं सुद्धां अतिथीला उपाशीं ठेवूं नये. गुरूनें सांगितलेलें काम पुरें करून मग त्याला तसें सांगावें. गुरूला आसन देऊन व त्याची पूजा करून नमस्कार करावा. गुरुपूजनानें आयुष्य, यश, वैभव यांची वाढ होते. वृद्धांचा अपमान कधीं करूं नये व त्यांना अमुक करा अशी आज्ञाहि करूं नये. वृद्ध माणसें उभीं असतां आपण बसूं नये. या नियमानें आयुष्य हीन होत नाहीं. नग्न स्त्री किंवा पुरुष यांच्याकडे पाहूं नये. मैथुन व आहार हीं गुप्तपणें करावीं. पवित्र वस्तूंत गुरु हे अति पवित्र होत. तसेंच शुद्धि करणाऱ्यांत हृदय हें मुख्य आहे. सर्व शास्त्रांत ज्ञान हें श्रेष्ठ तसें संतोष म्हणजे सर्वांत श्रेष्ठ सुख होय. सकाळ संध्याकाळ वृद्धांचा उपदेश ऐकावा. वृद्धांच्या नित्य सेवेनें बहुश्रुतपणा अंगीं येतो. अभ्यासाच्या व भोजनाच्या वेळीं उजव्या हाताचाच उपयोग करावा. वाणी आणि मन यांचें तसेंच इंद्रियांचेंहि नियमन करावें. अष्टकांच्या दिवशीं पितरांची व ग्रहांची पूजा करून त्यांना उत्तम शिजविलेली खीर, यवागू, कृसर व तूप हीं अर्पावीं. श्मश्रू करण्यापूर्वी मंगल शब्द उच्चारावे व कोणी शिंकल्यास त्याचें अभीष्ट चिंतावें. तसेंच कोणी दुखणाईत झाल्यास त्याचेंहि आयुष्य वाढो असें म्हणावें. संकटांतहि मोठ्या माणसाला अरे तुरे करूं नये. तसें म्हणणें म्हणजे वधच करणें होय असें ज्ञाते समजतात. पण लहान माणसें, बरोबरीचे

लोक व विद्यार्थी यांना असे म्हणणें योग्य आहे. पापकर्मी माणसाच्या दृष्टीला नित्य पापच दिसतें. वाईट लोक जाणून बुजून केलेलें कर्महि झांकून ठेवितात व तसें केल्यानें त्यांचा नाश होतो. मला कोणी मनुष्यानें किंवा देवांनीं पाप करतांना पाहिलें नाहीं असें पापी मनुष्य म्हणत असेल. पण तो शेवटीं पाप योनींतच जन्मास जातो. व्याजबट्टा करणारा मनुष्य जसा प्रतिदिवशीं आपल्या पैशाची वाढ झालेली पहातो, तसें पापावर धर्माचें दडपण घातल्यास धर्माची वृद्धि होते. मीठ जसें पाण्यांत सोडलें असतां त्यांत विरून जातें, तसें प्रायश्चित्तानें मारलेलें पापहि नाहींसें होतें. म्हणून केलेलें पाप झांकून ठेवूं नये. झांकून ठेवल्यानेंच तें वाढतें. पाप घडल्यास तें सज्जनांच्या कानावर घालावें, म्हणजे त्याची ते शांति करतील. आशेनें जमविलेलें द्रव्य योग्यकाळीं भोगिलें नाहीं, तर जमविणाराच्या पश्चात् दुसऱ्यांना तें मिळतें. ज्ञानी लोकांच्या मतें मनुष्याचें मन हेंच धर्माचें स्थान होय. म्हणून माणसें बहुधा धर्माचा आश्रय करतात. धर्म करावयाचा तो गुप्तपणें करावा, त्याचा बोभाटा करूं नये. धर्माचें फल उपभोगावयास मिळावें या इच्छेनें जो धर्म आचरितो, तो धर्माचा व्यापारच करतो म्हणावयाचा. तात्पर्य, देवाला नमस्कार करावयाचा तो दंभ सोडून करावा, गुरूंची सेवा करावयाची ती निष्कपटपणें करावी व परलोकींच्या यात्रेसाठीं म्हणून दानरूपी निधि सांठवून ठेवावा. १३.१.१६२.

---

## अध्याय १६३ वा.

[ १. धर्म प्रशंसा. ]

( १ ) युधिष्ठिरः—महाराज, मनुष्य बलवान् असून भाग्यहीन असला तर त्याला धन मिळत नाहीं, पण तो भाग्यशाली असल्यास कृश व अल्पवयी असला तरी त्याला तें मिळतें. प्रयत्न केल्यानेंहि लाभकाळ नसल्यास द्रव्य मिळत नाहीं आणि लाभकाळ आल्यास प्रयत्न न करतांहि विपुल धन मिळतें. प्रयत्न केला असतांहि त्याचें फल मिळालें नाहीं असें पुष्कळ माणसांच्या विषयीं दिसून येतें. उलट पुष्कळ अधम माणसांनाहि प्रयत्नावांचून द्रव्य मिळाल्याचें आढळतें. यत्नच जर प्रभावशाली असता तर मनुष्याला कोणतेंहि फल निश्चयानें मिळवितां आलें असतें व अलभ्य वस्तूचाहि लाभ झाला असता. पण

प्रयत्न करूनहि मनुष्यांना फळ मिळालें नाहीं असें आढळतें. पैशाच्या इच्छेनें मनुष्य अनेक वाटांनीं तो शोधीत असतो. पण तो न शोधणाराहि एखादा सुखी असतो. वाईट कृत्यें अनेकदां करूनहि मनुष्यें सधन झालेलीं दिसतात. राजे नीतिशास्त्र पढूनहि स्वतः मनुष्य राजकारणी झालेला दिसत नाहीं, आणि त्या शास्त्राचा गंधहि नसलेला एखादा राजाचा सचिव होऊन बसतो, याचें कारण काय? विद्या पढलेला मूर्ख असतो, तर श्रीमान मनुष्य दुष्ट असतो. विद्या पढल्यानें जर माणसाला सुख मिळतें, तर विद्वान पुरुष विद्याहीनाकडे द्रव्ययाचनेसाठीं जाता ना. पाण्याशीं जाऊन मनुष्य जशी आपली तहान भागवितो, तशी इष्टवस्तूची प्राप्ति जर विद्येनेंच होती, तर मनुष्यानें विद्या केव्हांहि टाकली नसती. मृत्युकाल आला नसल्यास शंभर बाण लागले तरी मनुष्य मरत नाहीं आणि काळ आला म्हणजे गवताच्या काडीच्या स्पर्शानेंहि मरण येतें. हें सर्व कसें घडतें?

भीष्म:—मोठीं कार्यें करूं इच्छिणाऱ्या मनुष्याला जर धन मिळालें नाहीं, तर त्यानें उग्र तप करावें; कारण पेरल्यावांचून कांहींच उगवत नाहीं. मनुष्याला दानानें भोगप्राप्ति होते, वृद्धांची सेवा केल्यानें बुद्धि मिळते व अहिंसेच्या योगानें दीर्घायु मिळतें असें ज्ञाते म्हणतात. म्हणून मनुष्यानें दान द्यावें, पण याचना करूं नये. धर्मशीलांची पूजा करावी, गोड बोलावें, सर्वांचें प्रिय करावें, व शांत राहून कोणाची हिंसा करूं नये. कर्म हेंच सुखदुःखाचें कारण आहे व किडेमुंग्यांनाहि तो नियम लागू आहे हें लक्षांत घेऊन, युधिष्ठिरा, तूं स्थिरचित्त हो. १३. १. १६३.

---

## अध्याय १६४ वा.

[ १. धर्मप्रशंसा—पुढें चालू. ]

( १ ) भीष्म:—युधिष्ठिरा, मनुष्यानें स्वतः बरीं वाईट कृत्यें केलीं किंवा दुसऱ्याकडून करविलीं, तर चांगल्यासंबंधानें विश्वास धरून स्वस्थ बसावें, पण वाईटासंबंधानें निश्चिंत बसूं नये. काळ हा सर्व प्रसंगीं कर्मानुसार सुखदुःख देण्यास सिद्ध असतो व मनुष्याच्या बुद्धींत शिरून धर्म व अधर्म यांना प्रवृत्त करीत असतो. धर्माचें फल दृष्टीस पडल्यानें धर्म चांगला असें जेव्हां मनुष्याच्या

मनाला वाटतें, तेव्हां तो धर्मशील होऊन त्यावर विश्वास ठेवतो, पण ज्याची बुद्धि स्थिर नाहीं असा मनुष्य तसा विश्वास ठेवीत नाहीं. धर्मावर विश्वास ठेवणें हें सुज्ञपणाचें लक्षण होय. काळाचा संबंध असला तरी कर्तव्याकर्तव्य जाणणारानें योग्य काय तें पाहूनच वागावें. वैभवास चढलेले धर्मनिष्ठ लोक जेणेंकरून पापाचा मल आपल्याला लागणार नाहीं अशा रीतीनें स्वतःला जपतात. काळ झाला तरी तो धर्माचें फल अधर्मरूपानें कधींच देणार नाहीं. म्हणून मनुष्यानें स्वतःला शुद्ध राखण्याचा यत्न करावा. जळत्या विस्तवाला जसा कोणाला हात लावतां येत नाहीं, तसा काळानें रक्षिलेल्या धर्माला अधर्म स्पर्श करूं शकत नाहीं. म्हणून धर्माचरणानें आत्मशुद्धि व अधर्मापासून दूर रहाणें या गोष्टी साधाव्या. धर्मच विजय देणारा आहे व त्याचा प्रकाश साऱ्या त्रिभुवनांत पडतो. कोणालाहि कोणाकडून हात धरून धर्माचरण करवितां येणार नाहीं. आग्रहानें सांगितल्यास केवळ लोकभीतीनें ते दंभ मात्र करतील. ‘ मीं शूद्र असल्यामुळें मला चार आश्रम धर्मांचा अधिकार नाहीं ’ असें म्हणून धार्मिक शूद्र भलत्याच धर्माच्या ढोंगांत पडत नाहीं. चारी वर्णांचे विशेष काय आहेत ते खुणेनें सांगतों. त्यांचीं पंचमहाभूतांनीं बनलेलीं शरीरें सर्वांचीं सारखींच आहेत. पण भेद जो आहे तो आचार व धर्म यांमुळें आहे. तथापि त्या सर्वांना शेवटीं एकच गति मिळेल अशी कर्माची विस्तृत योजना धर्मानें केली आहे. आतां धर्मानें मिळणारे लोक अशाश्वत असतां धर्म मात्र शाश्वत कसा असा प्रश्न येईल. त्याचें उत्तर असें कीं, फलेच्छेनें केलेला धर्म अशाश्वत असतो व निष्काम धर्म तेवढा शाश्वत आहे. शरीरदृष्टीनें सर्व लोक सारखे असले तरी धर्मयुक्त संकल्प कल्पान्तींहि टिकून रहातो व तोच पुनः उत्पत्तिकालीं धर्मामुळें प्रवृत्तीस येतो. अशी स्थिति असल्यामुळें विविध प्राण्यांमध्यें जो धर्माचें फळ भोगण्यांत भेद दिसतो तो कांहीं तरी उगाच आहे असें नाहीं. नीच प्राण्यांतहि धर्मफलभोगाचें स्वरूप लोकदृष्टान्तावरून दिसून येतें. १३. १. १६४.

---

## अध्याय १६५ वा.

[ १. देव, ऋषि इत्यादिकांचें वंशानुकीर्तन ]

( १ ) **वैशंपायन :**—जनमेजय राजा, भीष्म पितामह बाणांच्या शय्येवर पडला असतां स्वतःच्या कल्याणाची इच्छा करणाऱ्या युधिष्ठिरानें त्याला पापनाशनाचा उपाय विचारला. तो म्हणाला, ‘ मनुष्यानें काय केलें म्हणजे त्याला

सुख मिळेल, तसेंच तो पापमुक्त कशानें होईल व पापाचा नाश करणारें काय आहे ?' तेव्हां पितामहानें त्याला उद्देशून देवांचा वंश सांगितला, तो असा :—

भीष्म :—युधिष्ठिरा, मीं तुला ऋषिवंशासहित जो देववंश आतां सांगेन, तो प्रतिदिवशीं तीन वेळां पठन केला असतां पापाचा सर्वस्वी नाश होतो. इंद्रियांच्या संबंधानें पुरुष जें पाप जाणून किंवा न जाणतां रात्रीं किंवा दिवसा अथवा सकाळ–संध्याकाळ करतो, त्यापासून या वंशाचें पठण शुद्धबुद्धीनें केल्यास तो मोकळा होतो. तो अंधळा होत नाहीं, बहिरा होत नाहीं, व नित्य सुखांत असतो. त्याला नीच योनि किंवा नरक अथवा संकर योनि प्राप्त होत नाहीं. त्याला दुःखाचें भय रहात नाहीं व मृत्युसमयीं त्याला मोह पडत नाहीं. देव व असुर यांचा सर्वांचा उत्पत्तिकर्ता व सर्व प्राणी ज्याला नमस्कार करतात, असा अचिंत्य व वर्णनातीत, स्वयंभू, जगाचा स्वामी ब्रह्मदेव होय, त्याची पत्नी सावित्री. वेदांचें उत्पत्तिस्थान व सर्वकर्ता व सर्वव्यापी नारायण होय. उमापति शंकर, सेनापति स्कंद, विशाख, अग्नि, वायु, प्रकाश देणारे चंद्र सूर्य, शचीपति इन्द्र, धूमोर्णापति यम, गौरीपति वरुण, ऋद्धिपति कुबेर, सौम्य अशी देवांची गाय देवी सुरभि, महाऋषि विश्रवा, संकल्प, समुद्र, गंगा, इतर नद्या, मरुद्गण, तपस्वी वालखिल्य ऋषि, कृष्ण-द्वैपायन व्यास, नारद व पर्वत, विश्वावसु हाहा व हूहू हे गंधर्व, तुंबर, देवांचा प्रसिद्ध दूत चित्रसेन, देवस्त्रिया, भाग्यशाली अशा उर्वशी मेनका रंभा मिश्रकेशी अलंबुषा विश्वाची घृताची पञ्चचूडा तिलोत्तमा या अप्सरा, आदित्य, रुद्र, वसु, अश्विन् , पितर, धर्म, विद्या, तप, दीक्षा, रात्रि, दिवस, मरीचिपुत्र कश्यप, शुक्र, बृहस्पति, मंगळ, बुध, राहु, शनि, नक्षत्रें, ऋतु, महिने, पक्ष, संवत्सर, गरुड, समुद्र, कद्रूचे पुत्र नाग, शतद्रु, विपाशा, चंद्रभागा, सरस्वती, सिन्धु, देविका, प्रभास–पुष्करादि तीर्थें, गंगा, महानदी, वेणा, कावेरी, नर्मदा, कुलंपुना, विशल्या, सरयू , गंडकी, महानद, लोहित, ताम्रा, अरुणा, वेत्रवती, पर्णाशा, गौतमी, गोदावरी, वेण्या, कृष्णवेणा, अद्रिजा, दृषद्वती, चक्षु, मन्दाकिनी, प्रयाग, नैमिष, विश्वेश्वराचें स्थान म्हणजे वाराणशी, कुरुक्षेत्र, सिन्धु, जम्बूमार्ग, हिरण्वती, वितस्ता, प्लक्षवती, वेदस्मृति, वेदवती, मालवा, अश्ववती, गंगाद्वार, ऋषिकुल्यादि पवित्र नद्या, चर्मण्वती, कौशिकी, यमुना, भीमरथी, बाहुदा, माहेंद्रवाणी, त्रिदिवा, नलिका, सरस्वती, नन्दा, अपरनन्दा, गया, फल्गुतीर्थ, देवांनीं गजबजलेलें धर्मारण्य, देवनदी, पापनाशक असें प्रसिद्ध ब्राह्म सरोवर, दिव्य वनस्पतींनीं भरलेला हिमालय पर्वत,

विविध धातूंनीं चित्रविचित्र झालेला तीर्थयुक्त विन्ध्य, मेरू, महेन्द्र, मलय, रुप्यानें मढलेला श्वेतपर्वत, अनेक शिखरांचा नीलपर्वत, निषध, दर्दुर, चित्रकूट, अजनाग, गन्धमादन, पवित्र सोमगिरी, तसेच आणखी दुसरे पर्वत, दिशा, उपदिशा, पृथ्वी, वृक्ष, विश्वेदेव, आकाश, नक्षत्रें, ग्रह, इत्यादि सर्वदेव–त्यांचें नामसंकीर्तन मजकडून होवो वा न होवो–आमचें रक्षण करोत. त्यांची कीर्ति गाणारा मनुष्य सर्व पापांपासून सुटतो व स्तवन करणारा भयमुक्त होतो. सर्वप्रकारच्या मिश्र पातकांतूनहि हें देवतानामसंकीर्तन मनुष्याची सुटका करतें. देवतास्तवानंतर आतां ज्या महातपस्वी ब्राह्मणांचीं नांवें गायिलीं जातात, त्या पापमोचकांचें मी कीर्तन करतों. यवक्रीत, रैभ्य, कक्षीवान्, औशिज, भृगु, अंगिरा, कण्व, समर्थ मेधातिथि व गुणसंपन्न बर्हीं हे पूर्वदिशेस रहातात. दक्षिण दिशेस रहाणारे भाग्यवान् मुनि उल्मुचु, प्रमुचु, मुमुचु, पराक्रमी आत्रेय, मित्रावरुणांचा पुत्र प्रतापी अगस्त्य, व प्रसिद्ध असे दढायु व ऊर्ध्वबाहु होत. आतां पश्चिमेस रहाणारे ऋषि सांगतों ते ऐक. सख्या भावांसह उषंगु, परिव्याध, दीर्घतमा, गौतम, काश्यप, एकत, द्वित, त्रित, अत्रिपुत्र, सारस्वत हे ते होत. आतां उत्तर दिशेस रहाणारे ऋषि सांगतों ते ऐक. अत्रि, वसिष्ठ, वीर्यशाली पाराशर व्यास, विश्वामित्र, भरद्वाज, जमदग्नि, ऋचीकपुत्र परशुराम, औद्दालकि, श्वेतकेतु, कोहल, विपुल, देवल, देवशर्मा, धौम्य, हस्तिकाश्यप, लोमश, नाचिकेत, लोमहर्षण, उग्रश्रवा, भार्गव व च्यवन हे ते ऋषि होत. ऋषि व देव यांचा जो हा समुदाय पूर्वीपासून वर्णिला जातो, तो सर्व पापांपासून मुक्ति देणारा आहे. नृग, ययाति, नहुष, यदु, पराक्रमी पूरु, धुंधुमार, दिलीप, प्रतापी सागर, कृशाश्व, यौवनाश्व, चित्राश्व, सत्यवान्, दुष्यन्त, कीर्तिमान् चक्रवर्ती भरत, पवन, जनक, दृष्टरथ, नरश्रेष्ठ रघु, दशरथ, राम, शशबिन्दु, भगीरथ, हरिश्चंद्र, मरुत्त, महोदर्क, अलर्क, इलापुत्र पुरूरवा, करंधम, कध्मोर, दक्ष, अंबरीष, कुकुर, रैवत, कुरु, संवरण, मांधाता, राजर्षि मुचुकुंद, जन्हु, वेनपुत्र पृथु, मित्रभानु, त्रसदस्यु, महाभिष, निमि, अष्टक, आयु, राजर्षि क्षुप, कक्षेयु, प्रतर्दन, दिवोदास, सुदास, नल, प्रजापति मनु, हविध्र, पृषध्र, प्रतीप, शांतनु, अज, प्राचीन बर्हि, इक्ष्वाकु, अनरण्य, ज्ञानुजंघ, व राजर्षि कक्षसेन हे व ज्यांच्या नांवाचें संकीर्तन होतें असे दुसरे राजे, यांच्या नांवाचें पठन सकाळीं उठून व शुद्ध होऊन जो दोन्ही संध्यासमयीं करतो त्याला सर्व धर्माचें फल मिळतें. देव, ऋषि व राजे यांचें स्तवन केलें असतां ते पुष्टि, दीर्घायुष्य,

यश व स्वर्गसुख हीं देतात. त्यांचें स्तवन मीं करतों, तरी माझीं विघ्नें व पापें नष्ट होऊन मला कोणी अडथळा न करो, मला नित्य निश्चयानें विजय मिळो व परलोकीं उत्तम गति मिळो. १३. १. १६५.

---

## अध्याय १६६ वा.

[ १. भीष्माची अनुज्ञा घेऊन युधिष्ठिर हस्तिनापुरांत प्रवेश करतो. ]

( १ ) **जमनेजय :**—हे वैशंपायन मुने, कौरवांचा पितामह भीष्म शरशय्येवर पडला असतां माझा वडील आजोबा जो युधिष्ठिर त्यानें त्याच्याशीं जाऊन त्याच्या तोंडून धर्मशास्त्र ऐकून घेतलें व आपले तत्संबंधी सर्व संशय फेडून घेतले. त्यानें दानादिकांचे विधिहि समजावून घेतले आणि धर्मासंबंधानें तो निःसंदेह झाला. एवढें झाल्यावर पुढें त्यानें काय केलें तें आतां मला कृपा करून सांगा.

**वैशंपायन :**—राजा, भीष्माच्या तोंडून सर्व ऐकून घेतल्यावर त्याच्या भोंवतीं जमलेली सर्व मंडळी क्षणभर अगदीं स्तब्ध झाली व पटावर काढलेल्या चित्राप्रमाणें दिसूं लागली. नंतर सत्यवतीपुत्र व्यासानें क्षणभर ध्यान करून भीष्माला म्हटलें, 'महाराज, हा कुरुराज युधिष्ठिर आतां शांतचित्त झाला असून आपले बंधु व समागमें असलेले राजे व श्रीकृष्ण यांच्यासह आपल्याजवळ उभा आहे. तरी आतां आपल्या राजधानीस जावयास त्याला अनुज्ञा देण्याची कृपा करावी.' व्यासाची ही विनंति ऐकून भीष्मानें तशी अनुज्ञा देऊन युधिष्ठिराला म्हटलें 'युधिष्ठिरा, अमात्यांसह आतां तूं आपल्या नगरांत जा. मनांतील दुःख आतां काढून टाक. पुष्कळ अन्नदान करून व दक्षिणा देऊन अनेक यज्ञ कर. पूर्वी ययातिराजानें श्रद्धापूर्वक इंद्रियदमन करून तसे यज्ञ केले होतेच. क्षत्रियधर्माची आवड धरून पितर व देव यांना तृप्त कर. असें केल्यानें तुझें कल्याण होऊन तुझ्या मनांतील दुःख निघून जाईल. प्रजेचें अनुरंजन करून प्रधानमंडळाला संतुष्ट ठेव. मित्रांचा सत्कार करून त्यांच्या योग्यतेनुसार त्यांचा मान राख. देवालयाजवळील मोठ्या फलयुक्त वृक्षावर जसे पक्षी आनंदानें रहातात, तसे तुझे इष्टमित्र तुझ्यापाशीं राहोत. सूर्य परत वळून उत्तरायण चालू होतांच मात्र तूं येथें पुनः ये.' यावर युधिष्ठिरानें 'ठीक आहे' असें

म्हणून भीष्माला नमस्कार केला आणि सर्व परिवारासह तो हस्तिनापुरास निघाला. त्याच्यापुढें पतिव्रता गांधारीसह धृतराष्ट्र, ऋषि, सर्वबंधु व श्रीकृष्ण हेहि होते. ते, तसेच गांवांतील लोक व वृद्ध मंत्रि यांसह त्या कौरव-कुलावतंस युधिष्ठिरानें हस्तिनापुरांत प्रवेश केला. १३. १. १६६.

---

# भीष्मस्वर्गारोहण पर्व २.

## अध्याय १६७ वा.

[ १. युधिष्ठिर हस्तिनापुराहून उत्तरायणीं भीष्माकडे परत येतो; २. भीष्माचा धृतराष्ट्राला उपदेश; ३. भीष्माची कृष्णाला विनंति. ]

( १ ) **वैशंपायन**:—राजा जनमेजया, हस्तिनापुरीं गेल्यावर युधिष्ठिरानें सर्व नागरिक लोकांचा यथायोग्य सन्मान केला व त्यांना घरीं जावयास निरोप दिला. मग ज्यांचे पुत्र व पति युद्धांत मरण पावले होते त्या स्त्रियांचें त्यानें विपुल द्रव्यदानानें सान्त्वन केलें. नंतर युधिष्ठिराला राज्याभिषेक करण्यांत आला व त्यानें राज्य प्राप्त झाल्यावर सर्व प्रजांची नीट व्यवस्था लाविली. वेदवेत्त्या गुणी ब्राह्मणांपासून त्यानें आशीर्वाद घेतले. याप्रमाणें तो हस्तिनापुरांत पन्नास दिवस राहिल्यावर त्याला भीष्मानें केलेल्या संकेताची आठवण झाली व यज्ञकर्मवेत्त्या ब्राह्मणांना समागमें घेऊन तो तेथून रणांगणावर भीष्म पडला होता तेथें जावयास निघाला. सूर्य वळला असून उत्तरायणाला आरंभ झाला होता. युधिष्ठिरानें आपल्यापाशीं तूप, फुलें, सुगंधि द्रव्यें, वस्त्रें, चंदन, बुका रत्नें इत्यादि वस्तु भीष्माच्या अंत्यसंस्कारासाठीं घेतल्या व धृतराष्ट्र, गांधारी, कुंती, बंधु, कृष्ण, विदुर, युयुधान, व युयुत्सु यांच्यासह भीष्माच्या अग्नींना पुढें करून इंद्राच्या थाटानें तो कुरुक्षेत्रावर आला. तेथें व्यास, नारद, देवल, असित, हे मुनि आणि युद्धांतून वांचलेले अनेक देशींचे राजे हे भोंवतीं बसले असून मध्यें भीष्म पडला आहे असें त्याला दिसून आलें. वीरशय्येवर पडलेल्या त्याचें रक्षण करण्यासाठीं ठेवलेले रक्षकहि भोंवतीं उभे राहून आपलें काम करीत होते. त्याच्यापाशीं येऊन पोंचल्यावर धर्मराज बंधूंसह रथांतून उतरला व त्यानें भीष्माला व तेथें असलेल्या व्यासादि मुनींना नमस्कार केला. त्यांनींहि उलट त्याला व त्याच्या बंधूंना आशीर्वाद दिले. मग भीष्माच्या अगदीं जवळ

जाऊन युधिष्ठिर म्हणाला, हे आजोबा, मीं युधिष्ठिर बंधूंसह आपल्या आज्ञेप्रमाणें येथें आलों असून आपल्याला नमस्कार करीत आहें. आपले अग्नि मी समागमें आणिले असून आचार्य, ब्राह्मण, ऋत्विज, धृतराष्ट्र व श्रीकृष्ण हेहि आले आहेत. रणांतून बचावलेले हे राजे व हे कुरुजांगल येथें जमले आहेत, पहा. आतां पुढें काय करावयाचें, तें आपण सांगाल तसें करूं; त्यासाठीं सर्व साहित्य आपल्या आज्ञेप्रमाणें आणिलेलें आहे.

याप्रमाणें युधिष्ठिरानें सांगितलें असतां भीष्मानें आपल्या भोंवतीं बसलेल्या सर्व भारत-कुलोत्पन्न पुरुषांकडे डोळे उघडून पाहिलें आणि युधिष्ठिराचा हात धरून तो त्याला गंभीर स्वरानें म्हणाला, ' युधिष्ठिरा, आमात्यांसह तूं आलास, बरें झालें; भगवान् सूर्य उत्तरेकडे वळला. आज मला येथें शरशय्येवर पडल्याला अठ्ठावनच दिवस झाले, पण मला ते शंभर वर्षांसारखे वाटले. युधिष्ठिरा, आतां हा चांद्रमानाचा माघ महिना चालू झाला असून त्याच्या शुक्लपक्षाचे तीन भागच आतां राहिले आहेत. '

( २ ) याप्रमाणें युधिष्ठिराला उद्देशून बोलल्यावर भीष्म पितामह धृतराष्ट्राकडे वळून त्याला म्हणाला, 'धृतराष्ट्रा, तुला धर्म ठाऊक असून त्याविषयींच्या सर्व संशयांचा तूं निर्णय करून घेतला आहेस; तशीच अनेक विद्वान ब्राह्मणांची उपासना केल्यामुळें तुला वेदादि सर्व शास्त्रें व धर्म इत्यादिकांचें योग्य ज्ञान झालेलें आहे. होणार गोष्टी होऊन गेल्या, त्यांविषयीं शोक करणें व्यर्थ आहे. व्यासानें तुला देवांचें रहस्य सांगितलें आहेच. हे धर्मादिक जसे पांडूचे पुत्र आहेत तसेच तत्वतः तुझेहि आहेत व वडील माणसांची शुश्रूषा करण्याची त्यांना आवड आहे. धर्ममार्गानें राहून तूं आतां त्यांचें रक्षण कर. हा धर्मराज युधिष्ठिर तुझ्या आज्ञेंत राहील. तो दयाळू व वडिलांविषयीं प्रेमळ आहे हें मला ठाऊक आहे. तुझे पुत्र दुष्ट असून क्रोध लोभ इत्यादिकांच्या कचाट्यांत सांपडले व मत्सरानें घेरून गेल्यामुळें त्यांच्या हातून दुर्वर्तन घडलें. तरी त्यांच्याविषयीं आतां शोक करूं नको.

( ३ ) राजा जनमेजया, याप्रमाणें धृतराष्ट्राला उपदेश केल्यावर भीष्म कृष्णाला म्हणाला, ' हे देवदेवा श्रीकृष्णा, तुला मीं नमस्कार करतों. ज्याला हिरण्यगर्भ, विराट् पुरुष, सनातन परमात्मा इत्यादि म्हणतात तो तूंच आहेस. जीवरूपानेंहि तूंच प्रकट होत असतोस. हे पुरुषोत्तमा, माझें रक्षण कर व

मला जावयाला आतां अनुज्ञा दे. पांडवांचें सर्वस्व तूंच असल्यामुळें त्यांचें रक्षण करणें तुझें कर्तव्यच आहे. दुष्ट बुद्धीच्या मूर्ख दुर्योधनाला मीं सांगितलें होतें कीं, 'जेथें कृष्ण तेथें धर्म आणि जेथें धर्म तेथें जय'* यास्तव कृष्ण व पांडव यांच्याशीं साम करून सख्य जोडण्याची वारंवार आलेली संधि तूं गमावूं नको. पण त्या मन्दबुद्धि मूढानें माझ्या म्हणण्याप्रमाणें केलें नाहीं आणि शेवटीं राज्याचा व स्वतःचा घात करून घेतला. कृष्णा, नरऋषीसह बदरिकाश्रमांत चिरकाल वास करणारा प्राचीन मुनिश्रेष्ठ जो नारायण, तोच तूं, हें मला ठाऊक आहे व नारद व महातपस्वी व्यास यांनींहि मला सांगितलें कीं अर्जुन व कृष्ण हे नरनारायणच मनुष्यलोकीं अवतरले आहेत. कृष्णा, तर आतां मला अनुज्ञा दे म्हणजे मीं हा देह सोडून जातों. तुझ्या अनुज्ञेच्या योगानें मला श्रेष्ठ गति मिळेल. हें ऐकून कृष्णानें उत्तर केलें, 'भीष्मा, माझी अनुज्ञा आहे, तूं वसूंच्या लोकीं जा; या लोकीं तुझ्याकडून कांहीं पाप झालेलें नाहीं. मार्कंडेयाप्रमाणें तूंहि पितृभक्त आहेस, त्यामुळें मृत्यु नम्र सेवकाप्रमाणें तुझ्या आज्ञेंत राहिला आहे.'

राजा जनमेजया, कृष्णानें याप्रमाणें सांगितल्यावर पांडव व धृतराष्ट्रप्रभृति इतर बांधव आणि मित्र यांना उद्देशून भीष्म म्हणाला, 'आतां मीं प्राण सोडूं इच्छितों, तरी मला तुमची अनुज्ञा असावी. सत्याचा प्रयत्न करा, कारण सत्य हेंच मोठें बल आहे. सदा प्रेमळपणें वागा आणि मन ताब्यांत ठेवा. ब्राह्मणाविषयीं आदर बाळगा, धर्माचरण करा व तप केव्हांहि सोडूं नका.' असें बोलून सर्व मित्रमंडळीला त्यानें आलिंगन दिलें आणि युधिष्ठिराला पुनः म्हटलें, 'राजा,' ब्राह्मण आणि त्यांतहि ज्ञाते आचार्य आणि ऋत्विज यांचा सन्मान करीत जा.' १३.२.१६७.

---

## अध्याय १६८ वा.

[ १ भीष्माचा देहत्याग. २ गंगेचा शोक व कृष्णानें केलेलें तिचें सान्त्वन. ]

( १ ) **वैशंपायनः**—राजा, या प्रमाणें त्या सर्व कुरुकुलोत्पन्नांना सांगून तो शंतनुपुत्र भीष्म क्षणभर स्तब्ध राहिला. मग त्यानें योगविधीनें क्रमशः धारणा धरिली आणि मूलाधार चक्रापासून प्राणांचा विरोध करीत करीत वर ब्रह्मरंध्रा-

---

* यतः कृष्णस्ततो धर्मो यतो धर्मस्ततो जयः ।

पर्यंत त्यांना आणिलें. राजा त्यावेळीं व्यासादि ऋषि व महात्मे यांच्या समक्ष असें आश्चर्य घडलें कीं, भीष्म जसें जसें एकेक गात्र सोडी, तसतसे त्यांतील बाण बाहेर पडत व अशा रीतीनें थोड्या वेळानें त्याचें सर्व शरीर मंडळी पहातां पहातां बाणांपासून सर्वथा मुक्त झालें. तें पाहून कृष्णप्रभृति सर्व जण व्यासादि मुनींसह आश्चर्यचकित झाले. भीष्मानें सर्वच गात्रांतून जेव्हां प्राणांचा निरोध केला, तेव्हां ते मस्तक फोडून स्वर्गी उडून गेले. राजा, त्यावेळीं देवांनीं दुंदुभि वाजविल्या व पुष्पवर्षाव केला आणि सिद्ध ब्रह्मर्षींनीं 'उत्तम उत्तम' अशी गर्जना करून आनंद दाखविला. त्यावेळीं भीष्माच्या मस्तकांतून उल्केसारखें मोठें तेज निघून आकाशांत गेलें व तेथें दिसेनासें झालें. याप्रमाणें शंतनुपुत्र भीष्म कालाशीं समरस झाला. मग काष्ठें व विविध सुगंधि द्रव्यें यांची चिता पांडव, युयुत्सु व विदुर यांनीं रचिली. इतरजण तें पहात होते. युधिष्ठिर व विदुर यांनीं भीष्माच्या अंगावर उत्तम वस्त्रें व फुलांच्या माळा घातल्या. युयुत्सूनें त्याच्यावर उत्तम छत्र धरिलें, भीमसेन आणि अर्जुन हे दोघे शुभ्र चौरी व पंखा त्याच्या देहावर वारूं लागले व नकुळ आणि सहदेव यांनीं त्याचीं शिरोभूषणें घेतलीं. दुर्योधनाच्या स्त्रिया ताडांचे पंखे घेऊन त्याला वारा घालीत राहिल्या. सर्वांनीं त्याच्यासाठीं श्राद्ध केलें, अग्नीला आहुत्या दिल्या व सामगायकांनीं विविध सामें गायिलीं. मग चंदन, काष्ठें, दारूहळद, व कालागरु आदिकरून लहान मोठीं सुगंधि द्रव्यें यांनीं भीष्माचा देह झांकून व अग्नीला प्रज्वलित करून तो त्यांनीं त्या चितेला लाविला आणि अशा रीतीनें त्याच्या शरीराला अग्निसंस्कार केल्यावर धृतराष्ट्रप्रभृति सर्व जण त्याला डावा घालून गंगेवर गेले. त्यांच्या समागमें व्यास, नारद, असित हे मुनि, कौरवस्त्रिया, कृष्ण व हस्तिनापुरांतील नागरिक गृहस्थ हेहि होते. त्या सर्वांनीं तेथें महात्म्या भीष्माच्या नांवानें विधियुक्त उदक सोडिलें.

( ३ ) याप्रमाणें भीष्माची उदकक्रिया आटोपली, तेव्हां त्याची माता देवी गंगा शोकविह्वल होऊन रडत रडत तेथें पाण्यांतून वर आली. शोक करीतच ती सर्वांना उद्देशून म्हणाली, 'हे पांडवादि निष्पाप आसहो, घडलेल्या गोष्टींचा मीं उच्चार करतें तो ऐकून घ्या, राजाला शोभण्यासारखेंच ज्याचें वर्तन, ज्ञान व उच्च कुळ हीं होतीं, कुरुकुलांतील वृद्धांचा जो सत्कार करी, जो मोठा पितृभक्त व व्रतनिष्ठ होता, प्रत्यक्ष जमदग्निपुत्र पराक्रमी रामालाहि आपल्या दिव्य अस्त्रांनीं ज्याचा पूर्वी पराभव करतां आला नाहीं, तो हा माझा पुत्र शिखंडीच्या

हातून वध पावावा काय ? राजे हो, माझें हृदय खरोखर दगडाचें केलेलें असावें, नाहींतर प्रिय पुत्र दिसेनासा झाल्याबरोबर तें आज फुटून जावयास नको होतें काय ? काशिराजाच्या नगरांत स्वयंवरासाठीं जमलेल्या अनेक क्षत्रियांना जिंकून त्यानें एकट्यानें कन्या हरून आणिल्या. त्याच्याशीं बळानें सामना करील असा जगांत दुसरा कोणी नव्हताच. अशा त्याचा वध शिखंडीनें केला हें ऐकून कोणाचें हृदय फाटून जाणार नाहीं ? रणांगणावर जामदग्न्य रामाची ज्यानें तिरपीट उडविली त्याला शेवटीं शिखंडीनें मारिलें ना ?' याप्रमाणें गंगा अनेक प्रकारें शोक करीत असतां श्रीकृष्णानें तिचें सांत्वन केलें. तो म्हणाला, 'भद्रे, आतां तूं शोक करूं नको. तुझा तो पुत्र खरोखर उत्तम लोकाला गेला, यांत कांहीं संशय नाहीं. तो वस्तुतः महातेजस्वी वसु होता व केवळ शापाच्या योगानें मनुष्यजन्माला आला होता; यास्तव त्याविषयीं शोक करणें योग्य नाहीं. तो क्षत्रियाला उचित अशा रीतीनें युद्ध करीत असतां त्याला अर्जुनानेंच मारिलें, शिखंडीनें नव्हे. भीष्म बाण सोडीत रणावर युद्ध करीत असतां त्याचा वध करण्याला प्रत्यक्ष इंद्रहि समर्थ नव्हता. हे देवि गंगे, तुझा पुत्र स्वच्छंदानेंच स्वर्गास गेला आहे, त्याला रणांत मारणें साऱ्या देवांनाहि शक्य नव्हतें. तरी त्या कुरुकुलनंदनाविषयीं तूं मुळींच शोक करूं नको. तुझा पुत्र खरोखर वसुलोकीं गेला आहे; तूं निश्चिंत हो.

राजा जनमेजया, कृष्णानें व व्यासानें याप्रमाणें गंगेचें सांत्वन केलें असतां शोक सोडून ती आपल्या जलांत शिरली व मग युधिष्ठिरादि सर्व मंडळी कृष्णाला पुढें करून तिला नमस्कार केल्यावर तिच्या अनुज्ञेनें परत आपल्या ठिकाणीं निघून गेली. १३. २. १६८.

## अनुशासनपर्व समाप्त.

# अनुशासनपर्व—पुरवणी

## शिवसहस्रनामस्तोत्र ( अध्याय १७ )

( अनुशासनपर्वांत शिवसहस्रनाम व विष्णुसहस्रनाम हीं दोन लौकिक दृष्टया महत्त्वाचीं प्रकरणें आलीं आहेत. सरळ अर्थ वाचतांना त्यांचा उपयोग नसल्यामुळें सोईसाठीं तीं येथें स्वतंत्र दिलीं आहेत. )

स्थिरः स्थाणुः प्रभुर्भीमः प्रवरो वरदो वरः ।
सर्वात्मा सर्वविख्यातः सर्वः सर्वकरो भवः ॥ ३१ ॥

जटी चर्मी शिखंडी च सर्वांगः सर्वभावनः ।
हरश्च हरिणाक्षश्च सर्वभूतहरः प्रभुः ॥ ३२ ॥

प्रवृत्तिश्च निवृत्तिश्च नियतः शाश्वतो ध्रुवः ।
श्मशानवासी भगवान् खचरो गोचरोऽर्दनः ॥ ३३ ॥

अभिवाद्यो महाकर्मा तपस्वी भूतभावनः ।
उन्मत्तवेषप्रच्छन्नः सर्वलोकप्रजापतिः ॥ ३४ ॥

महारूपो महाकायो वृषरूपो महायशाः ।
महात्मा सर्वभूतात्मा विश्वरूपो महाहनुः ॥ ३५ ॥

लोकपालोऽन्तर्हितात्मा प्रसादो हयगर्दभिः ।
पवित्रं च महांश्चैव नियमो नियमाश्रितः ॥ ३६ ॥

सर्वकर्मा स्वयंभूत आदिरादिकरो निधिः ।
सहस्राक्षो विशालाक्षः सोमो नक्षत्रसाधकः ॥ ३७ ॥

चन्द्रः सूर्यः शनिः केतुर्ग्रहो ग्रहपतिर्नरः ।
अग्निरश्या नमस्कर्ता मृगबाणार्पणोऽनघः ॥ ३८ ॥

महातपा घोरतपा अदीनो दीनसाधकः ।
संवत्सरकरो मन्त्रः प्रमाणं परमं तपः ॥ ३९ ॥

योगी योज्यो महाबीजो महारेता महाबलः ।
सुवर्णरेताः सर्वज्ञः सुबीजो बीजवाहनः ॥ ४० ॥

दशबाहुस्त्वनिमिषो नीलकंठ उमापतिः ।
विश्वरूपः स्वयंश्रेष्ठो बलवीरो बलो गणः ॥ ४१ ॥

गणकर्ता गणपतिर्दिग्वासा काम एव च ।
मंत्रवित्परमो मन्त्रः सर्वभावकरो हरः ॥ ४२ ॥

कमण्डलुधरो धन्वी बाणहस्तः कपालवान् ।
अशनी शतघ्नी खड्गी पट्टिशी चायुधी महान् ॥ ४३ ॥

स्रुवहस्तः सुरूपश्च तेजस्तेजस्करो निधिः ।
उष्णीषी च सुवक्त्रश्च उदग्रो विनतस्तथा ॥ ४४ ॥

दीर्घश्च हरिकेशश्च सुतीर्थः कृष्ण एव च ।
शृगालरूपः सिद्धार्थो मुण्डः सर्वशुभंकरः ॥ ४५ ॥

अजश्च बहुरूपश्च गन्धधारी कपर्द्यपि ।
ऊर्ध्वरेता ऊर्ध्वलिंगा ऊर्ध्वशायी नभः स्थलः ॥ ४६ ॥

त्रिजटी चीरवासाश्च रुद्रः सेनापतिर्विभुः ।
अहश्चरो नक्तंचर स्तिग्ममन्युः सुवर्चसः ॥ ४७ ॥

गजहा दैत्यहा कालो लोकधाता गुणाकरः ।
सिंहशार्दूलरूपश्च आर्द्रचर्माबरावृतः ॥ ४८ ॥

कालयोगी महानादः सर्वकामश्चतुष्पथः ।
निशाचरः प्रेतचारी भूतचारी महेश्वरः ॥ ४९ ॥

बहूभूतो बहुधरः स्वर्भानुरमितो गतिः ।
नृत्यप्रियो नृत्यनर्तो नर्तकः सर्वलालसः ॥ ५० ॥

घोरो महातपाः पाशो नित्यो गिरिरुहो नभः ।
सहस्रहस्तो विजयो व्यवसायोऽ ह्यतन्द्रितः ॥ ५१ ॥

अधर्षणो धर्षणात्मा यज्ञहा कामनाशकः ।
दक्षयागापहारी च सुसहो मध्यमस्तथा ॥ ५२ ॥

तेजोपहारी बलहा मुदितोऽथा जितोऽवरः ।
गंभीरघोषो गंभीरो गंभीरबलवाहनः ॥ ५३ ॥

न्यग्रोधरूपो न्यग्रोधो वृक्षकर्णस्थितिर्विभुः ।
सुतीक्ष्णदशनश्चैव महाकायो महाननः ॥ ५४ ॥

विष्वक्सेनो हरिर्यज्ञः संयुगापीडवाहनः ।
तीक्ष्णतापश्च हर्यश्वः सहायः कर्मकालवित् ॥ ५५ ॥

विष्णुप्रसादितो यज्ञः समुद्रो वडवामुखः ।
हुताशनसहायश्च प्रशांतात्मा हुताशनः ॥ ५६ ॥

उग्रतेजा महातेजा जन्यो विजयकालवित् ।
ज्योतिषामयनं सिद्धिः सर्वविग्रह एव च ॥ ५७ ॥

शिखी मुंडी जटी ज्वाली मूर्तिजो मूर्द्धगो बली ।
वेणवी पणवी ताली खली कालकटंकटः ॥ ५८ ॥

नक्षत्रविग्रहमतिर्गुणबुद्धिर्लयोऽगमः ।
प्रजापतिर्विश्वबाहुर्विभागः सर्वगोऽमुखः ॥ ५९ ॥

विमोचनः सुसरणो हिरण्यकवचोद्भवः ।
मेढ्जो बलचारी च महीचारी स्रुतस्तथा ॥ ६० ॥

सर्वतूर्यनिनादी च सर्वातोद्यपरिग्रहः ।
व्यालरूपो गुहावासी गुहो माली तरंगवित् ॥ ६१ ॥

त्रिदशस्त्रिकालधृक् कर्म सर्वबंधविमोचनः ।
बंधनस्त्वसुरेन्द्राणां युधिशत्रुविनाशनः ॥ ६२ ॥

सांख्यप्रसादो दुर्वासाः सर्वसाधुनिषेवितः ।
प्रस्कन्दनो विभागज्ञो अतुल्यो यज्ञभागवित् ॥ ६३ ॥

सर्ववासः सर्वचारी दुर्वासा वासवोऽमरः ।
हैमो हेमकरोऽयज्ञः सर्वधारी धरोत्तमः ॥ ६४ ॥

लोहिताक्षो महाक्षश्च विजयाक्षो विशारदः ।
संग्रहो निग्रहः कर्ता सर्पचीरनिवासनः ॥ ६५ ॥

मुख्योऽमुख्यश्च देहश्च काहलिः सर्वकामदः ।
सर्वकालप्रसादश्च सुबलो बलरूपधृक् ॥ ६६ ॥

सर्वकामवरश्चैव सर्वदः सर्वतोमुखः ।
आकाशनिर्विरूपश्च निपाती ह्यवशः खगः ॥ ६७ ॥

रौद्ररूपोऽंशुरादित्यो बहुरश्मिः सुवर्चसी ।
वसुवेगो महावेगो मनोवेगो निशाचरः ॥ ६८ ॥

सर्ववासी श्रियावासी उपदेशकरोऽकरः ।
मुनिरात्मनिरालोकः संभग्नश्च सहस्रदः ॥ ६९ ॥

पक्षी च पक्षरूपश्च अतिदीप्तो विशांपतिः ।
उन्मादो मदनः कामो ह्यश्वत्थोऽर्थकरो यशः ॥ ७० ॥

वामदेवश्च वामश्च प्राग्दक्षिणश्च वामनः ।
सिद्धयोगी महर्षिश्च सिद्धार्थः सिद्धसाधकः ॥ ७१ ॥

भिक्षुश्च भिक्षुरूपश्च विपणो मृदुरव्ययः ।
महासेनो विशाखश्च षष्टिभागो गवांपतिः ॥ ७२ ॥

वज्रहस्तश्च विष्कम्भी चमूस्तम्भन एव च ।
वृत्तावृत्तकरस्तालो मधुर्मधुकलोचनः ॥ ७३ ॥

वाचस्पत्यो वाजसनो नित्यमाश्रमपूजितः ।
ब्रह्मचारी लोकचारी सर्वचारी विचारवित् ॥ ७४ ॥

ईशान ईश्वरःकालो निशाचारी पिनाकवान् ।
निमित्तस्थो निमित्तं च नंदिर्नंदिकरो हरिः ॥ ७५ ॥

नंदीश्वरश्च नंदी च नंदनो नंदिवर्धनः ।
भगहारी नियंता च कालो ब्रह्मा पितामहः ॥ ७६ ॥

चतुर्मुखो महालिंगश्चारुलिंगस्तथैव च ।
लिंगाध्यक्षः सुराध्यक्षो योगाध्यक्षो युगावहः ॥ ७७ ॥

बीजाध्यक्षो बीजकर्ता अध्यात्मानुगतो बलः ।
इतिहासः सकल्पश्च गौतमोऽथ निशाकरः ॥ ७८ ॥

दम्भो ह्यदम्भो वैदम्भः वश्यो वशकरः कलिः ।
लोककर्ता पशुपतिर्महाकर्ता ह्यनौषधः ॥ ७९ ॥

अक्षरं परमं ब्रह्म बलवच्छक्र एव च ।
नीति ह्यनीतिः शुद्धात्मा शुद्धो मान्यो गतागतः ॥ ८० ॥

बहुप्रसादः सुस्वप्नो दर्पणोऽथ त्वमित्रजित् ।
वेदकारो मन्त्रकारो विद्वान् समरमर्दनः ॥ ८१ ॥

महामेघनिवासी च महाघोरो वशीकरः ।
अग्निज्वालो महाज्वालो अतिधूम्रो हुतो हविः ॥ ८२ ॥

वृषणः शंकरो नित्यं वर्चस्वी धूमकेतनः ।
नीलस्तथांगलुब्धश्च शोभनो निरवग्रहः ॥ ८३ ॥

स्वस्तिदः स्वस्तिभावश्च भागी भागकरो लघुः ।
उत्संगश्च महांगश्च महागर्भपरायणः ॥ ८४ ॥

कृष्णवर्णः सुवर्णश्च इंद्रियं सर्वदेहिनाम् ।
महापादो महाहस्तो महाकायो महायशः ॥ ८५ ॥

महामूर्धा महामात्रो महानेत्रो निशालयः ।
महान्तको महाकर्णो महोष्ठश्च महाहनुः ॥ ८६ ॥

महानासो महाकम्बुर्महाग्रीवः श्मशानभाक् ।
महावक्षा महोरस्को ह्यन्तरात्मा मृगालयः ॥ ८७ ॥

लंबनो लंबितोष्ठश्च महामायः पयोनिधिः ।
महादन्तो महादंष्ट्रो महाजिह्वो महामखः ॥ ८८ ॥

महानखो महारोमा महाकेशो महाजटः ।
प्रसन्नश्च प्रसादश्च प्रत्ययो गिरिसाधनः ॥ ८९ ॥

स्नेहनोऽस्नेहनश्चैव अजितश्च महामुनिः ।
वृक्षाकारो वृक्षकेतुरनलो वायुवाहनः ॥ ९० ॥

गण्डली मेरुधामा च देवाधिपतिरेव च ।
अथर्वशीर्षः सामास्यऋक्सहस्रामितेक्षणः ॥ ९१ ॥

यजुःपादभुजो गुह्यः प्रकाशो जंगमस्तथा ।
अमोघार्थः प्रसादश्च अभिगम्यः सुदर्शनः ॥ ९२ ॥

उपकारः प्रियः सर्वः कनकः काञ्चनच्छविः ।
नाभिर्नंदिकरो भावः पुष्करस्थपतिः स्थिरः ॥ ९३ ॥

द्वादशस्त्रासनश्चाद्यो यज्ञो यज्ञसमाहितः ।
नक्तं कलिश्च कालश्च मकरः कालपूजितः ॥ ९४ ॥

सगणो गणकारश्च भूतवाहनसारथिः ।
भस्मशयो भस्मगोप्ता भस्मभूतस्तरुर्गणः ॥ ९५ ॥

लोकपालस्तथाऽलोको महात्मा सर्वपूजितः ।
शुक्लस्त्रिशुक्लः संपन्नः शुचिर्भूतनिषेवितः ॥ ९६ ॥

आश्रमस्थः क्रियावस्थो विश्वकर्ममतिर्वरः ।
विशालशाखस्ताम्रोष्ठो ह्यम्बुजालः सुनिश्चलः ॥ ९७ ॥

कपिलः कपिशः शुक्ल आयुश्चैव परोऽपरः ।
गन्धर्वोऽदितिस्तार्क्ष्यः सुविज्ञेयः सुशारदः ॥ ९८ ॥
परश्वधायुधो देव अनुकारी सुबान्धवः ।
तुम्बवीणो महाक्रोध ऊर्ध्वरेता जलेशयः ॥ ९९ ॥
उग्रो वंशकरो वंशो वंशनादो ह्यनिन्दितः ।
सर्वाङ्गरूपो मायावी सुहृदो ह्यनिलोऽनलः ॥ १०० ॥
बन्धनो बन्धकर्ता च सुबंधनविमोचनः ।
सयज्ञारिः स कामारिर्महादंष्ट्रो महायुधः ॥ १०१ ॥
बहुधा निन्दितः शर्वः शङ्करः शङ्करोऽधनः ।
अमरेशो महादेवो विश्वदेवः सुरारिहा ॥ १०२ ॥
अहिर्बुध्न्योऽनिलाभश्च चेकितानो हविस्तथा ।
अजैकपाच्च कापाली त्रिशङ्कुरजितः शिवः ॥ १०३ ॥
धन्वन्तरिर्धूमकेतुः स्कन्दो वैश्रवणस्तथा ।
धाता शक्रश्च विष्णुश्च मित्रस्त्वष्टा ध्रुवोऽधरः ॥ १०४ ॥
प्रभावः सर्वगो वायुरर्यमा सविता रविः ।
उषंगुश्च विधाता च मान्धाता भूतभावनः ॥ १०५ ॥
विभुर्वर्णविभावी च सर्वकामगुणावहः ।
पद्मनाभो महागर्भश्चंद्रवक्त्रोऽनिलोऽनलः ॥ १०६ ॥
बलवांश्चोपशांतश्च पुराणः पुण्यचञ्चुरी ।
कुरुकर्ता कुरुवासी कुरुभूतो गुणौषधः ॥ १०७ ॥
सर्वाशयो दर्भचारी सर्वेषां प्राणिनां पतिः ।
देवदेवः सुखासक्तः सदसत्सर्वरत्नवित् ॥ १०८ ॥
कैलासगिरिवासी च हिमवद्गिरिसंश्रयः ।
कूलहारी कूलकर्ता बहुविद्यो बहुप्रदः ॥ १०९ ॥
वणिजो वर्धकी वृक्षो बकुलश्चंदनश्छदः ।
सारग्रीवो महाजत्रुरलोलश्च महौषधः ॥ ११० ॥
सिद्धार्थकारी सिद्धार्थश्छंदो व्याकरणोत्तरः ।
सिंहनादः सिंहदंष्ट्रः सिंहगः सिंहवाहनः ॥ १११ ॥

प्रभावात्मा जगत्कालस्थालो लोकहितस्तरुः ।
सारङ्गो नवचक्राङ्गः केतुमाली सभावनः ॥ ११२ ॥
भूतालयो भूतपतिरहोरात्रमनिन्दितः ।
वाहिता सर्वभूतानां निलयश्च विभुर्भवः ॥ ११३ ॥
अमोघः संयतो ह्यश्वो भोजनः प्राणधारणः ।
धृतिमान्मतिमान्दक्षः सत्कृतश्च युगाधिपः ॥ ११४ ॥
गोपालिर्गोपतिर्ग्रामो गोचर्मवसनो हरिः ।
हिरण्यबाहुश्च तथा गुहापालः प्रवेशिनाम् ॥ ११५ ॥
प्रकृष्टारिर्महाहर्षो जितकामो जितेन्द्रियः ।
गान्धारश्च सुवासश्च तपःसक्तो रतिर्नरः ॥ ११६ ॥
महागीतो महानृत्यो ह्यप्सरोगणसेवितः ।
महाकेतुर्महाधातुर्नैकसानुचरश्चलः ॥ ११७ ॥
आवेदनीय आदेशः सर्वगन्धसुखावहः ।
तोरणस्तारणो वातः परिधी पतिखेचरः ॥ ११८ ॥
संयोगो वर्धनो वृद्धो अतिवृद्धो गुणाधिकः ।
नित्य आत्मसहायश्च देवासुरपतिः पतिः ॥ ११९ ॥
युक्तश्च युक्तबाहुश्च देवो दिविसुपर्वणः ।
आषाढश्च सुषाढश्च ध्रुवोऽथ हरिणो हरः ॥ १२० ॥
वपुरावर्तमानेभ्यो वसुश्रेष्ठो महापथः ।
शिरोहारी विमर्शश्च सर्वलक्षणलक्षितः ॥ १२१ ॥
अक्षश्च रथयोगी च सर्वयोगी महाबलः ।
समाम्नायोऽसमाम्नायस्तीर्थदेवो महारथः ॥ १२२ ॥
निर्जीवो जीवनो मन्त्रः शुभाक्षो बहुकर्कशः ।
रत्नप्रभूतो रत्नाङ्गो महार्णवनिपानवित् ॥ १२३ ॥
मूलं विशालो ह्यमृतो व्यक्ताव्यक्तस्तपोनिधिः ।
आरोहणोऽधिरोहश्च शीलधारी महायशाः ॥ १२४ ॥
सेनाकल्पो महाकल्पो योगो युगकरो हरिः ।
युगरूपो महारूपो महानागहनो वधः ॥ १२५ ॥

न्यायनिर्वपणः पादः पण्डितो ह्यचलोपमः ।
बहुमालो महामालः शशी हरसुलोचनः ॥ १२६ ॥
विस्तारो लवणः कूपस्त्रियुगः सफलोदयः ।
त्रिलोचनो विषण्णाङ्गो मणिविद्धो जटाधरः ॥ १२७ ॥
बिन्दुर्विसर्गः सुमुखः शरः सर्वायुधःसहः ।
निवेदनः सुखाजातः सुगन्धारो महाधनुः ॥ १२८ ॥
गन्धपाली च भगवान् उत्थानः सर्वकर्मणाम् ।
मन्थानो बहुलो वायुः सकलः सर्वलोचनः ॥ १२९ ॥
तलस्तालः करस्थाली ऊर्ध्वसंहननो महान् ।
छत्रं सुच्छत्रो विख्यातो लोकः सर्वाश्रयःक्रमः ॥ १३० ॥
मुण्डो विरूपो विकृतो दण्डी कुण्डी विकुर्वणः ।
हर्यक्षः ककुभो वज्री शतजिह्वः सहस्रपात् ॥ १३१ ॥
सहस्रमूर्धा देवेन्द्रः सर्वदेवमयो गुरुः ।
सहस्रबाहुः सर्वाङ्गः शरण्यः सर्वलोककृत् ॥ १३२ ॥
पवित्रं त्रिककुन्मन्त्रः कनिष्ठः कृष्णपिङ्गलः ।
ब्रह्मदंडविनिर्माता शतघ्नीपाशशक्तिमान् ॥ १३३ ॥
पद्मगर्भो महागर्भो ब्रह्मगर्भो जलोद्भवः ।
गर्भस्तिर्ब्रह्मकृद्ब्रह्मी ब्रह्मविद्ब्राह्मणो गतिः ॥ १३४ ॥
अनन्तरूपो नैकात्मा तिग्मतेजाः स्वयंभुवः ।
ऊर्ध्वगात्मा पशुपतिर्वातरंहा मनोजवः ॥ १३५ ॥
चन्दनीपद्मनालाग्रः सुरभ्युत्तरणो नरः ।
कर्णिकारमहास्रग्वी नीलमौलिः पिनाकधृत् ॥ १३६ ॥
उमापतिरुमाकान्तो जाह्नवीधृदुमाधवः ।
वरो वराहो वरदो वरेण्यः सुमहास्वनः ॥ १३७ ॥
महाप्रसादो दमनः शत्रुहा श्वेतपिङ्गलः ।
पीतात्मा परमात्मा च प्रयतात्मा प्रधानधृत् ॥ १३८ ॥
सर्वपार्श्वमुखस्त्र्यक्षो धर्मसाधारणो वरः ।
चराचरात्मा सूक्ष्मात्मा अमृतो गोवृषेश्वरः ॥ १३९ ॥

साध्यर्षिर्वसुरादित्यो विवस्वान्सविताऽमृतः ।
व्यासः सर्गः सुसंक्षेपो विस्तरः पर्ययो नरः ॥ १४० ॥
ऋतुः संवत्सरो मासः पक्षः संख्यासमापनः ।
कला काष्ठा लवा मात्रा मुहूर्ताहः क्षपाः क्षणाः ॥ १४१ ॥
विश्वक्षेत्रं प्रजाबीजं लिंगमाद्यस्तु निर्गमः ।
सदसद्व्यक्तमव्यक्तं पिता माता पितामहः ॥ १४२ ॥
स्वर्गद्वारं प्रजाद्वारं मोक्षद्वारं त्रिविष्टपम् ।
निर्वाणं ह्लादनश्चैव ब्रह्मलोकः परागतिः ॥ १४३ ॥
देवासुरविनिर्माता देवासुरपरायणः ।
देवासुरगुरुर्देवो देवासुरनमस्कृतः ॥ १४४ ॥
देवासुरमहामात्रो देवासुरगणाश्रयः ।
देवासुरगणाध्यक्षो देवासुर गणाग्रणीः ॥ १४५ ॥
देवातिदेवो देवर्षिर्देवासुरवरप्रदः ।
देवासुरेश्वरो विश्वो देवासुरमहेश्वरः ॥ १४६ ॥
सर्वदेवमयोऽचिन्त्यो देवतात्माऽऽत्मसंभवः ।
उद्भित्त्रिविक्रमो वैद्यो विरजो नीरजोऽमरः ॥ १४७ ॥
ईड्यो हस्तीश्वरो व्याघ्रो देवसिंहो नरर्षभः ।
विबुधोऽग्रवरः सूक्ष्मः सर्वदेवस्तपोमयः ॥ १४८ ॥
सुयुक्तःशोभनो वज्री प्रासानां प्रभवोऽव्ययः ।
गुहःकान्तो निजःस्वर्गः पवित्रं सर्वपावनः ॥ १४९ ॥
शृङ्गी शृङ्गप्रियो बभ्रू राजराजो निरामयः ।
अभिरामः सुरगणो विरामः सर्वसाधनः ॥ १५० ॥
ललाटाक्षो विश्वदेवो हरिणो ब्रह्मवर्चसः ।
स्थावराणां पतिश्चैव नियमेन्द्रियवर्धनः ॥ १५१ ॥
सिद्धार्थः सिद्धभूतार्थोऽचिन्त्यः सत्यव्रतः शुचिः ।
व्रताधिपः परंब्रह्म भक्तानां परमा गतिः ॥ १५२ ॥
विमुक्तो मुक्ततेजाश्च श्रीमान् श्रीवर्धनो जगत् ।
शिवमेभिःस्तुवन्देवं नामभिःपुष्टिवर्धनैः ।
नित्ययुक्तः शुचिर्भक्तः प्राप्नोत्यात्मानमात्मना ॥ १५३ ॥

---

# विष्णुसहस्रनाम.

ॐ विश्वं विष्णुर्वषट्कारो भूतभव्यभवत्प्रभुः ।
भूतकृद् भूतभृद् भावो भूतात्मा भूतभावनः ॥ १४ ॥
पूतात्मा परमात्मा च मुक्तानां परमा गतिः ।
अव्ययः पुरुषः साक्षी क्षेत्रज्ञोऽक्षर एव च ॥ १५ ॥
योगो योगविदां नेता प्रधानपुरुषेश्वरः ।
नरसिंहवपुः श्रीमान् केशवः पुरुषोत्तमः ॥ १६ ॥
सर्वः शर्वः शिवः स्थाणुर्भूतादिर्निधिरव्ययः ।
संभवो भावनो भर्ता प्रभवः प्रभुरीश्वरः ॥ १७ ॥
स्वयंभूःशंभुरादित्यः पुष्कराक्षो महास्वनः ।
अनादिनिधनो धाता विधाता धातुरुत्तमः ॥ १८ ॥
अप्रमेयो हृषीकेशो पद्मनाभोऽमरप्रभुः ।
विश्वकर्मा मनुस्त्वष्टा स्थविष्ठः स्थविरो ध्रुवः ॥ १९ ॥
अग्राह्यः शाश्वतः कृष्णो लोहिताक्षः प्रतर्दनः ।
प्रभूतस्त्रिककुब्धाम पवित्रं मंगलं परम् ॥ २० ॥
ईशानः प्राणदःप्राणो ज्येष्ठः श्रेष्ठः प्रजापतिः ।
हिरण्यगर्भो भूगर्भो माधवो मधुसूदनः ॥ २१ ॥
ईश्वरो विक्रमी धन्वी मेधावी विक्रमःक्रमः ।
अनुत्तमो दुराधर्षः कृतज्ञः कृतिरात्मवान् ॥ २२ ॥
सुरेशःशरणं शर्म विश्वरेताः प्रजाभवः ।
अहः संवत्सरो व्यालः प्रत्ययः सर्वदर्शनः ॥ २३ ॥
अजः सर्वेश्वरः सिद्धः सिद्धिः सर्वादिरच्युतः ।
वृषाकपिरमेयात्मा सर्वयोगविनिसृतः ॥ २४ ॥
वसुर्वसुमनाः सत्यः समात्मा संमितः समः ।
अमोघः पुंडरीक्षो वृषकर्मा वृषाकृतिः ॥ २५ ॥
रुद्रो बहुशिरा बभ्रुर्विश्वयोनिः शुचिश्रवाः ।
अमृतः शाश्वतः स्थाणुर्वरारोहो महातपाः ॥ २६ ॥
सर्वगः सर्वविद्भानुर्विष्वक्सेनो जनार्दनः ।
वेदो वेदविदव्यङ्गो वेदाङ्गो वेदवित् कविः ॥ २७ ॥

लोकाध्यक्षः सुराध्यक्षः धर्माध्यक्षः कृताकृतः ।
चतुरात्मा चतुर्व्यूहश्चतुर्दंष्ट्रश्चतुर्भुजः ॥ २८ ॥
भ्राजिष्णुर्भोजनं भोक्ता सहिष्णुर्जगदादिजः ।
अनघो विजयो जेता विश्वयोनिर्पुनर्वसुः ॥ २९ ॥
उपेन्द्रो वामनः प्रांशुरमोघः शुचिरूर्जितः ।
अतींद्रः संग्रहः सर्गो घृतात्मा नियमो यमः ॥ ३० ॥
वेद्यो वैद्यः सदा योगी वीरहा माधवो मधुः ।
अतींद्रियो महामायो महोत्साहो महाबलः ॥ ३१ ॥
महाबुद्धिर्महावीर्यो महाशक्तिर्महाद्युतिः ।
अनिर्देश्यवपुः श्रीमानमेयात्मा महाद्रिधृक् ॥ ३२ ॥
महेश्वासो महीभर्ता श्रीनिवासः सतांगतिः ।
अनिरुद्धःसुरानन्दो गोविन्दो गोविदांपतिः ॥ ३३ ॥
मरीचिर्दमनो हंसः सुपर्णो भुजगोत्तमः ।
हिरण्यनाभः सुतपाः पद्मनाभः प्रजापतिः ॥ ३४ ॥
अमृत्युः सर्वदृक् सिंहः संधाता संधिमान् स्थिरः ।
अजो दुर्मर्षणः शास्ता विश्रुतात्मा सुरारिहा ॥ ३५
गुरुर्गुरुतमो धाम सत्यः सत्यपराक्रमः ।
निमिषोऽनिमिषः स्रग्वी वाचस्पतिरुदारधीः ॥ ३६ ॥
अग्रणी ग्रामणीः श्रीमान्न्यायो नेता समीरणः ।
सहस्रमूर्धा विश्वात्मा सहस्राक्षः सहस्रपात् ॥ ३७ ॥
आवर्तनो निवृत्तात्मा संवृतः संप्रमर्दनः ।
अहः संवर्तको वह्निरनिलो धरणीधरः ॥ ३८ ॥
सुप्रसादः प्रसन्नात्मा विश्वधृग् विश्वभुग् विभुः ।
सत्कर्ता सत्कृतः साधुर्जह्नुर्नारायणो नरः ॥ ३९ ॥
असंख्येयोऽप्रमेयात्मा विशिष्टः शिष्टकृत् शुचिः ।
सिद्धार्थः सिद्धसंकल्पः सिद्धिदः सिद्धिसाधनः ॥ ४० ॥
वृषाही वृषभो विष्णुर्वृषपर्वा वृषोदरः ।
वर्धनो वर्धमानश्च विविक्तः श्रुतिसागरः ॥ ४१ ॥

सुभुजो दुर्धरो वाग्मी महेन्द्रो वसुदो वसुः ।
नैकरूपो बृहद्रूपः शिपिविष्टः प्रकाशनः ॥ ४२ ॥

ओजस्तेजो द्युतिधरः प्रकाशात्मा प्रतापनः ।
ऋद्धः स्पष्टाक्षरो मंत्रश्चन्द्रांशुर्भास्करद्युतिः ॥ ४३ ॥

अमृतांशूद्भवो भानुः शशबिन्दुः सुरेश्वरः ।
औषधं जगतः सेतुः सत्यधर्मपराक्रमः ॥ ४४ ॥

भूतभव्यभवन्नाथः पवनः पावनोऽनलः ।
कामहा कामकृत् कान्तः कामः कामप्रदः प्रभुः ॥ ४५ ॥

युगादिकृद् युगावर्तो नैकमायो महाशनः ।
अदृश्योऽव्यक्तरूपश्च सहस्रजिदनन्तजित् ॥ ४६ ॥

इष्टो विशिष्टः शिष्टेष्टः शिखंडी नहुषो वृषः ।
क्रोधहा क्रोधकृत् कर्ता विश्वबाहुर्महीधरः ॥ ४७ ॥

अच्युतः प्रथितः प्राणः प्राणदो वासवानुजः ।
अपांनिधिरधिष्ठानमप्रमत्तः प्रतिष्ठितः ॥ ४८ ॥

स्कंधः स्कंधधरो धुर्यो वरदो वायुवाहनः ।
वासुदेवो बृहद्भानुरादिदेवः पुरन्दरः ॥ ४९ ॥

अशोकस्तारणस्तारः शूरः शौरिर्जनेश्वरः ।
अनुकूलः शतावर्तः पद्मी पद्मनिभेक्षणः ॥ ५० ॥

पद्मनाभोऽरविन्दाक्षः पद्मगर्भः शरीरभृत् ।
महर्द्धिर्ऋद्धो वृद्धात्मा महाक्षो गरुडध्वजः ॥ ५१ ॥

अतुलः शरभो भीमः समयज्ञो हविर्हरिः ।
सर्वलक्षणलक्षण्यो लक्ष्मीवान्समितिंजयः ॥ ५२ ॥

विक्षरो रोहितो मार्गो हेतुर्दामोदरः सहः ।
महीधरो महाभागो वेगवानमिताशनः ॥ ५३ ॥

उद्भवः क्षोभणो देवःश्रीगर्भः परमेश्वरः ।
करणं कारणं कर्ता विकर्ता गहनो गुहः ॥ ५४ ॥

व्यवसायो व्यवस्थानः संस्थानः स्थानदोध्रुवः ।
परर्धिः परमस्पष्टः पुष्टस्तुष्टः शुभेक्षणः ॥ ५५ ॥

रामो विरामो विरजो मार्गो नेयो नयोऽनयः ।
वीरः शक्तिमतां श्रेष्ठो धर्मो धर्मविदुत्तमः ॥ ५६ ॥

वैकुण्ठः पुरुषः प्राणः प्राणदः प्रणवः पृथुः ।
हिरण्यगर्भः शत्रुघ्नो व्याप्तो वायुरधोक्षजः ॥ ५७ ॥

ऋतुः सुदर्शनः कालः परमेष्ठी परिग्रहः ।
उग्रः संवत्सरो दक्षो विश्रामो विश्वदक्षिणः ॥ ५८ ॥

विस्तारः स्थावरः स्थाणुः प्रमाणं बीजमव्ययम् ।
अर्थोऽनर्थो महाकोशो महाभोगो महाधनः ॥ ५९ ॥

अनिर्विण्णः स्थविष्ठोभूर्धर्मयूपो महामखः ।
नक्षत्रनेमिर्नक्षत्री क्षमः क्षामः समीहनः ॥ ६० ॥

यज्ञ इज्यो महेज्यश्च क्रतुःसत्रं सतां गतिः ।
सर्वदर्शी विमुक्तात्मा सर्वज्ञो ज्ञानमुत्तमम् ॥ ६१ ॥

सुव्रतः सुमुखः सूक्ष्मः सुघोषः सुखदः सुहृत ।
मनोहरो जितक्रोधो वीरबाहुर्विदारणः ॥ ६२ ॥

स्वापनः स्ववशी व्यापी नैकात्मा नैककर्मकृत् ।
वत्सरो वत्सलो वत्सी रत्नगर्भो धनेश्वरः ॥ ६३ ॥

धर्मगुब्धर्मकृद्धर्मी सदसत्क्षरमक्षरम् ।
अविज्ञाता सहस्रांशुर्विधाता कृतलक्षणः ॥ ६४ ॥

गभस्तिनेमिः सत्त्वस्थः सिंहो भूतमहेश्वरः ।
आदिदेवो महादेवो देवेशो देवभृद्गुरुः ॥ ६५ ॥

उत्तरो गोपतिर्गोप्ता ज्ञानगम्यः पुरातनः ।
शरीरभूतभृद्भोक्ता कपीन्द्रो भूरिदक्षिणः ॥ ६६ ॥

सोमपोऽमृतपः सोमः पुरुजित्पुरुसत्तमः ।
विनयो जयः सत्यसंधो दाशार्हः सात्वतां पतिः ॥ ६७ ॥

जीवो विनयिता साक्षी मुकुन्दोऽमितविक्रमः ।
अंभोनिधिरनन्तात्मा महोदधिशयोऽन्तकः ॥ ६८ ॥

अजो महार्हः स्वाभाव्यो जितामित्रः प्रमोदनः ।
आनन्दो नन्दनो नन्दः सत्यधर्मा त्रिविक्रमः ॥ ६९ ॥

महर्षिः कपिलाचार्यः कृतज्ञो मेदिनीपतिः ।
त्रिपदस्त्रिदशाध्यक्षो महाशृंगः कृतान्तकृत् ॥ ७० ॥
महावराहो गोविन्दः सुषेणः कनकाङ्गदी ।
गुह्यो गभीरो गहनो गुप्तश्चक्रगदाधरः ॥ ७१ ॥
वेधाःस्वाङ्गोऽजितः कृष्णो दृढःसंकर्षणोऽच्युतः ।
वरुणो वारुणो वृक्षः पुष्कराक्षो महामनाः ॥ ७२ ॥
भगवान्भगहा नन्दी वनमाली हलायुधः ।
आदित्यो ज्योतिरादित्यः सहिष्णुर्गतिसत्तमः ॥ ७३ ॥
सुधन्वा खण्डपरशुर्दारुणो द्रविणप्रदः ।
दिवस्पृक्सर्वदृग्व्यासो वाचस्पतिरयोनिजः ॥ ७४ ॥
त्रिसामा सामगः साम निर्वाणं भेषजं भिषक् ।
संन्यासकृच्छमः शान्तो निष्ठा शान्तिः परायणः ॥ ७५ ॥
शुभाङ्गः शान्तिदः स्रष्टा कुमुदः कुवलेशयः ।
गोहितो गोपतिर्गोप्ता वृषभाक्षो वृषप्रियः ॥ ७६ ॥
अनिवर्ती निवृत्तात्मा संक्षेप्ता क्षेमकृच्छिवः ।
श्रीवत्सवक्षाः श्रीवासः श्रीपतिः श्रीमतांवरः ॥ ७७ ॥
श्रीदः श्रीशः श्रीनिवासः श्रीनिधिः श्रीविभावनः ।
श्रीधरः श्रीकरः श्रेयः श्रीमाँल्लोकत्रयाश्रयः ॥ ७८ ॥
स्वक्षः स्वंगः शतानन्दो नन्दिर्ज्योतिर्गणेश्वरः ।
विजितात्मा विधेयात्मा सत्कीर्तिश्छिन्नसंशयः ॥ ७९ ॥
उदीर्णः सर्वतश्चक्षुरनीशः शाश्वतः स्थिरः ।
भूयशो भूषणो भूतिर्विशोकः शोकनाशनः ॥ ८० ॥
अर्चिष्मानर्चितः कुम्भो विशुद्धात्मा विशोधनः ।
अनिरुद्धोऽप्रतिरथः प्रद्युम्नोऽमितविक्रमः ॥ ८१ ॥
कालनेमिनिहा वीरः शूरः शौरिर्जनेश्वरः ।
त्रिलोकात्मा त्रिलोकेशः केशवः केशिहा हरिः ॥ ८२ ॥
कामदेवः कामपालः कामी कान्तः कृतागमः ।
अनिर्देश्यवपुर्विष्णुर्वीरोऽनन्तो धनञ्जयः ॥ ८३ ॥

ब्रह्मण्यो ब्रह्मकृद् ब्रह्मा ब्रह्म ब्रह्मविवर्धनः ।
ब्रह्मविद् ब्राह्मणो ब्रह्मी ब्रह्मज्ञो ब्राह्मणप्रियः ॥ ८४ ॥
महाक्रमो महाकर्मा महातेजा महोरगः ।
महाक्रतुर्महायज्वा महायज्ञो महाहविः ॥ ८५ ॥
स्तव्यः स्तवप्रियः स्तोत्रं स्तुतिःस्तोता रणप्रियः ।
पूर्णःपूरयिता पुण्यः पुण्यकीर्तिरनामयः ॥ ८६ ॥
मनोजवस्तीर्थकरो वसुरेता वसुप्रदः ।
वसुप्रदो वासुदेवो वसुर्वसुमना हविः ॥ ८७ ॥
सद्गतिः सत्कृतिः सत्ता सद्भूतिः सत्परायणः ।
शूरसेनो यदुश्रेष्ठः सन्निवासः सुयामुनः ॥ ८८ ॥
भूतावासो वासुदेवः सर्वासुनिलयोऽनलः ।
दर्पहा दर्पदो दृप्तो दुर्धरोऽथापराजितः ॥ ८९ ॥
विश्वमूर्तिर्महामूर्तिर्दीप्तमूर्तिरमूर्तिमान् ।
अनेकमूर्तिरव्यक्तः शतमूर्तिः शताननः ॥ ९० ॥
एको नैकः सवः कः किं यत्तत्पदमनुत्तमम् ।
लोकबन्धुर्लोकनाथो माधवो भक्तवत्सलः ॥ ९१ ॥
सुवर्णवर्णो हेमाङ्गो वराङ्गश्चन्दनाङ्गदी ।
वीरहा विषमः शून्यो घृताशीरचलश्चलः ॥ ९२ ॥
अमानी मानदो मान्यो लोकस्वामी त्रिलोकधृत् ।
सुमेधा मेधजो धन्यः सत्यमेधा धराधरः ॥ ९३ ॥
तेजो वृषो द्युतिधरः सर्वशस्त्रभृतांवरः ।
प्रग्रहो निग्रहो व्यग्रो नैकशृंगो गदाग्रजः ॥ ९४ ॥
चतुर्मूर्तिश्चतुर्बाहुश्चतुर्व्यूहश्चतुर्गतिः ।
चतुरात्मा चतुर्भावश्चतुर्वेदविदेकपात् ॥ ९५ ॥
समावर्तो निवृत्तात्मा दुर्जयो दुरतिक्रमः ।
दुर्लभो दुर्गमो दुर्गो दुरावासो दुरारिहा ॥ ९६ ॥
शुभाङ्गो लोकसारङ्गः सुतंतुस्तन्तुवर्धनः ।
इन्द्रकर्मा महाकर्मा कृतकर्मा कृतागमः ॥ ९७ ॥

उद्भवः सुन्दरः सुन्दो रत्ननाभः सुलोचनः ।
अर्को वाजसनः शृङ्गी जयन्तः सर्वविज्जयी ॥ ९८ ॥

सुवर्णबिन्दुरक्षोभ्यः सर्ववागीश्वरेश्वरः ।
महाह्रदो महागर्तो महाभूतो महानिधिः ॥ ९९ ॥

कुमुदः कुन्दरः कुन्दः पर्जन्यः पवनोऽनिलः ।
अमृताशोऽमृतवपुः सर्वज्ञः सर्वतोमुखः ॥ १०० ॥

सुलभः सुव्रतः सिद्धः शत्रुजिच्छत्रुतापनः ।
न्यग्रोधो दुम्बरोऽश्वत्थश्चाणूरान्ध्रनिषूदनः ॥ १०१ ॥

सहस्रार्चिः सप्तजिह्वः सप्तैधाः सप्तवाहनः ।
अमूर्तिरनघोऽचिन्त्यो भयकृद्भयनाशनः ॥ १०२ ॥

अणुर्बृहत्कृशः स्थूलो गुणभृन्निर्गुणो महान् ।
अधृतः स्वधृतः स्वास्यः प्राग्वंशो वंशवर्धनः ॥ १०३ ॥

भारभृत्कथितो योगी योगीशः सर्वकामदः ।
आश्रमः श्रमणः क्षामः सुपर्णो वायुवाहनः ॥ १०४ ॥

धनुर्धरो धनुर्वेदो दण्डो दमयिता दमः ।
अपराजितः सर्वसहो नियन्ता नियमो यमः ॥ १०५ ॥

सत्त्ववान् सात्त्विकः सत्यः सत्यधर्मपरायणः ।
अभिप्रायः प्रियार्होऽर्हः प्रियकृत् प्रीतिवर्धनः ॥ १०६ ॥

विहायसगतिर्ज्योतिः सुरुचिर्हुतभुग्विभुः ।
रविर्विरोचनः सूर्यः सविता रविलोचनः ॥ १०७ ॥

अनन्तोहुतभुग्भोक्ता सुखदो नैकदोग्रजः ।
अनिर्विण्णः सदामर्षी लोकाधिष्ठानमद्भुतः ॥ १०८ ॥

सनात्सनातनतमः कपिलः कपिरव्ययः ।
स्वस्तिदः स्वस्तिकृत्स्वस्ति स्वस्तिभुक् स्वस्तिदक्षिणः ॥ १०९ ॥

अरौद्रःकुण्डली चक्री विक्रम्यूर्जितशासनः ।
शब्दातिगः शब्दसहः शिशिरः शर्वरीकरः ॥ ११० ॥

अक्रूरःपेशलो दक्षो दक्षिणः क्षमिणांवरः ।
विद्वत्तमो वीतभयः पुण्यश्रवणकीर्तनः ॥ १११ ॥

उत्तारणो दुष्कृतिहा पुण्यो दुःस्वप्ननाशनः ।
वीरहा रक्षणः सन्तो जीवनः पर्यवस्थितः ॥ ११२ ॥
अनन्तरूपोऽनन्तश्रीर्जितमन्युर्भयापहः ।
चतुरस्रो गभीरात्मा विदिशो व्यादिशो दिशः ॥ ११३ ॥
अनादिर्भूर्भुवो लक्ष्मीः सुवीरो रुचिराङ्गदः ।
जननो जनजन्मादिर्भीमो भीमपराक्रमः ॥ ११४ ॥
आधारनिलयो धाता पुष्पहासः प्रजागरः ।
ऊर्ध्वगः सत्पथाचारः प्राणदः प्रणवः पणः ॥ ११५ ॥
प्रमाणं प्राणनिलयः प्राणभृत्प्राणजीवनः ।
तत्त्वं तत्त्वविदेकात्मा जन्ममृत्युजरातिगः ॥ ११६ ॥
भूर्भुवः स्वस्तरुस्तारः सविता प्रपितामहः ।
यज्ञो यज्ञपतिर्यज्वा यज्ञाङ्गो यज्ञवाहनः ॥ ११७ ॥
यज्ञभृद्यज्ञकृद्यज्ञी यज्ञभुग्यज्ञसाधनः ।
यज्ञान्तकृद्यज्ञगुह्यमन्नमन्नाद एव च ॥ ११८ ॥
आत्मयोनिः स्वयं जातो वैखानः सामगायनः ।
देवकीनन्दनः स्रष्टा क्षितीशः पापनाशनः ॥ ११९ ॥
शङ्खभृन्नन्दकी चक्री शार्ङ्गधन्वा गदाधरः ।
रथाङ्गपाणिरक्षोभ्यः सर्वप्रहरणायुधः ॥ १२० ॥

सर्वप्रहरणायुध ओं नम इति ॥

इतीदं कीर्तनीयस्य केशवस्य महात्मनः ।
नाम्नां सहस्रं दिव्यानामशेषेण प्रकीर्तितम् ॥ १२१ ॥
य इदं शृणुयान्नित्यं यश्चापि परिकीर्तयत् ।
नाशुभं प्राप्नुयात्किंचित्सोऽमुत्रेह च मानवः ॥ १२२ ॥

# आश्वमेधिक पर्व १४.



## अध्याय १ ला.

[ १. धृतराष्ट्राचा भीष्माविषयीं शोक ].

( १ ) वैशंपायन:—राजा, भीष्माची उत्तरक्रिया केल्यावर युधिष्ठिर धृतराष्ट्राला पुढें करून गंगानदी उतरून पलीकडे गेला. तिकडे गेल्यावर दुःखाश्रूंनीं त्याचे नेत्र भरून गेले आणि व्याधाचा बाण लागून हत्ती पडावा, तसा तो गंगेच्या तीरावर धाडकन् पडला. तेव्हां कृष्णाच्या सांगण्यावरून भीमानें त्याला धरिलें व कृष्णहि 'धर्मा, असें करूं नको रे' असें त्याला म्हणाला. भूमीवर पडून दुःखानें दीर्घश्वास टाकीत असलेल्या त्याच्याकडे तेथें जमलेले राजे वारंवार पाहूं लागले. दीन होऊन गलितधैर्य झालेल्या त्याला पहातांच पांडवांना पुनः अत्यंत वाईट वाटलें. तेव्हां पुत्रशोकानें तप्त झालेला अंधळा धृतराष्ट्र त्याला म्हणाला, "युधिष्ठिरा, ऊठ आणि आपलें पुढील कर्तव्य कर. हें पृथ्वीचें राज्य क्षात्रधर्माला अनुसरून तूं जिंकिलें आहेस, आतां आपल्या बंधूंसह इष्ट भोगांचा उपभोग घे. धर्मा, तुला आतां शोक करण्याचें कारण काय तें मला समजत नाहीं. अरे शोक कोणी करावयाचा असेल, तर तो मीं व गांधारीनें. स्वप्नांत मिळालेलें धन जागें झाल्यावर जसें दिसत नाहीं, तसा प्रकार होऊन आमचे शंभर पुत्र नष्ट झाले. हितोपदेश करणाऱ्या महात्म्या विदुराचें सुज्ञपणाचें म्हणणें मीं ऐकिलें नाहीं, त्यामुळें मज दुर्मतीला मोठा खेद वाटतो. दिव्य दृष्टीच्या धर्मशाली विदुरानें मला सांगितलेंच होतें कीं 'दुर्योधनाच्या अपराधामुळें आपलें कुळ नष्ट होईल. कुळाचें कल्याण व्हावें अशी इच्छा असल्यास मीं सांगतों तसें कर, म्हणजे मंदबुद्धि सुयोधनाला, तसेंच कर्ण व शकुनि यांना मारून टाक, त्यांचें तोंडहि कोणाच्या दृष्टीस पडूं देऊं नकोस; त्यांचा द्यूताचा डाव वाटेल तें करून उधळून लाव व धर्मात्म्या युधिष्ठिराला राज्यभिषेक कर, म्हणजे तो राज्याचें नीतीनें पालन करील. पण युधिष्ठिराला राज्य द्यावयाचें नसलेंच तर तूं स्वतःच तें आपल्या ताब्यांत घे आणि सर्वांशीं समभावानें वाग, तुझे सर्व कुलबांधव तुझ्या तंत्रानें वागोत.' असें त्यानें मला सांगितलें होतें, तथापि त्यानें सांगितल्याप्रमाणें न वागतां मीं व्यर्थ दुर्योधनाच्या म्हणण्याप्रमाणें केलें. विदु-

राचे गोड शब्दहि धिक्कारून व शोकसागरांत बुडून मीं हें महत् दुःख आपल्या अंगावर ओढून घेतलें. तुझा उत्कर्ष झाला असतां आम्हीं हीं तुझीं चुलता चुलती दुःखानें गांजलों आहों, त्या आमच्याकडे पहा. राजा, तुला दुःख करण्यासारखें कांहींच मला दिसत नाहीं." १४.१.

---

## अध्याय २ रा.

[ १. कृष्णाचा व व्यासाचा युधिष्ठिराला सान्त्वनपर उपदेश. ]

( १ ) **वैशंपायनः**—राजा, धृतराष्ट्राचें या प्रकारचें भाषण ऐकल्यावर युधिष्ठिर स्वस्थ राहिला असतां त्याला कृष्ण म्हणाला, ' राजा युधिष्ठिरा, मनानें अतिशय शोक केला असतां तो करणाराच्या पितरांना फार ताप होतो. तरी आतां तूं अनेक निरनिराळे यज्ञ करून भरपूर दक्षिणा दे, सोमरसानें देवांना व स्वधेनें पितरांना तृप्त कर, अतिथींना अन्नपान दे व इतर दरिद्री मनुष्यांना त्यांना हवें असेल तें दे. जें जाणण्यास योग्य आहे, तें तूं समजून घेतलें असून तुझें कर्तव्यहि तूं केलें आहेस. तसेंच राजाचे धर्म कोणते तेहि भीष्म, व्यास, नारद व विदुर यांच्याकडून तूं ऐकिलेस. मग आतां मोहानें व्याप्त कां होतोस ? पंजोबाआजोबांपासून चाललेली रीत स्वीकारून राज्यधुरेचा भार संभाळ. क्षात्रधर्मानें यश मिळविल्यानें तुला स्वर्गप्राप्तीचा संशय राहिलेला नाहीं. युद्धांत तोंड फिरवून पळून जाणाऱ्या कोणाचाहि तूं वध केलेला नाहीं. राजा, तरी आतां सारा शोक सोडून दे. जें झालें तें होणारच होतें. युद्धांत जे वध पावले, ते कांहीं झालें तरी फिरून तुझ्या दृष्टीस पडणें शक्य नाहीं !' कृष्णाचें भाषण संपून तो थांबल्यावर युधिष्ठिर त्याला म्हणाला, ' कृष्णा, माझ्यावर तुझें जें प्रेम आहे, त्याची जाणीव मला आहे. आमची तुला जी कींव येते ती स्नेह व प्रेम यांमुळेंच होय. आजवर आनंदित मनानें तूं आमचें हित करीत आला आहेस; तरी आतां जर तूं मला तपोवनांत जाण्यास अनुज्ञा देशील तर मला जें पाहिजे तें तूं केल्यासारखें होईल. भीष्म आजोबांना व शूर कर्णाला रणांगणांत मारिल्यावर मला शांति कशी बरें मिळेल ? ज्याच्या योगानें मीं या क्रूर कृत्यापासून मुक्त होईन व माझें मन शुद्ध होईल असें कांहीं कर. '

युधिष्ठिरानें असें उत्तर दिलें असतां, धर्मवेत्ता व्यास त्याचें समाधान करण्यासाठीं त्याला म्हणाला, ' युधिष्ठिरा, तुझी बुद्धि अद्यापि स्थिर होत नाहीं व

लहान मुलासारखा अजून तूं मोह पावत आहेस. आमची बडबड इतकी चालू असतां तुझ्यावर तिचा कांहींच परिणाम होत नाहीं, असे आम्हीं आहोंत तरी कसले ? युद्धावर ज्यांचें जीवित चालतें अशा क्षत्रियांचे धर्म कोणते ते तुला कळले आहेत. त्याप्रमाणें चालणाऱ्या राजाला बंधन घडत नाहीं. तूं सारे मोक्ष-धर्म यथायोग्य ऐकून घेतले आहेस आणि वेळोवेळीं मीं तुझ्या मनांतील संशयांचें निरसनहि केलें आहे. पण बुद्धिहीन व श्रद्धाहीन माणसाप्रमाणें तुझें स्मरण खरोखर नष्ट झाल्यासारखें वाटतें ! असें होऊं देऊं नको. अशा प्रकारचें वेड तुला शोभत नाहीं. सर्व प्रकारचीं प्रायश्चित्तें, राजधर्म, दानधर्म हे तूं ऐकिले आहेस व त्यांचें ज्ञान तुला झालें आहे. सर्व धर्म व सर्व शास्त्रें यांचें अशा रीतीनें ज्ञान करून घेतल्यावरहि अडाण्यासारखा तुला पुनः पुनः मोह पडावा हें आश्चर्य नव्हे काय ?' १४.१.२.

---

## अध्याय ३ रा.

[ १ युधिष्ठिराला अश्वमेध करण्याची व्यासाची सूचना. ]

( १ ) **व्यास**—युधिष्ठिरा, तुझी बुद्धि नीट चालत नाहींसें मला वाटतें. कोणताहि मनुष्य केवळ आपल्याच इच्छेनें कोणतेंहि कर्म करूं शकत नाहीं. ईश्वराच्या प्रेरणेनेंच तो चांगलेंवाईट कर्म करीत असतो, तेव्हां त्यांत दुःख कसलें करावयाचें ? तरीपण आपण पापकर्मी आहों असें जर तुला वाटत असेल तर तें पाप कसें दूर होईल तें ऐकून घे. जे लोक पापें करतात, त्यांची मुक्तता तप, यज्ञ व दान यांनीं होते. पापी पुरुषहि तप, यज्ञ व दान यांनीं शुद्ध होतो. यज्ञ हा खरोखर श्रेष्ठ साधन आहे व पुण्यप्राप्तीसाठीं महात्मे, असुर व देव हेहि यज्ञकर्मांचीच कास धरतात. देवांना जें मोठेपण आलें तें यज्ञानेंच आलें. यज्ञ केल्यानेंच देवांना दानवांवर जय मिळवितां आला. तर, युधिष्ठिरा, तूं आतां अश्वमेध, राजसूय, सर्वमेध, व नरमेध हे कर. दाशरथि रामानें जसा मोठी दक्षिणा देऊन विधियुक्त अश्वमेध केला तसाच तूंहि कर व बहुत अन्न व वित्त यांचें त्यांत दान कर. तुझा पूर्वज व दुष्यन्त-शकुन्तला यांचा पुत्र जो पराक्रमी भरत त्यानेंहि असा अश्वमेध केला होता.

**युधिष्ठिर** :—महाराज, अश्वमेधाच्या योगानें पृथ्वीसुद्धां शुद्ध होईल हें खरें. पण त्यासंबंधानें माझें म्हणणें काय आहे हें थोडें ऐकून घ्या. एवढा मोठा ज्ञातिवध केल्यावर आतां थोडेंतरी दान मीं कोठलें देऊं ? मजजवळ मुलींच

द्रव्य नाहीं. आतां या दीन झालेल्या छोट्या राजपुत्रांजवळून कररूपानें द्रव्य घेण्याचें धैर्य मला होत नाहीं. यांचे युद्धांतील व्रण अजून ओले आहेत पहा. मीं स्वतःच राज्याच्या नाशाला कारण झालों असतां, केवळ दुःखित झालों म्हणून यज्ञासाठीं कर कसा गोळा करूं बरें ? दुर्योधनाच्या अपराधामुळें हें राज्य व राजे नष्ट झाले व आम्हीं दुष्कीर्तीची जोड केली. द्रव्याच्या आशेनें दुर्योधनानें राज्याचा क्षय करविला, पण तसें करतांना त्याचा कोशहि उडून गेला. अश्वमेधांत पृथ्वीदान देणें हा विधि अवश्य सांगितला आहे. त्याच्याविरुद्ध वागणें बरें नव्हे. म्हणून पृथ्वीच्या स्थानीं दुसरें कांहीं देणें मला इष्ट वाटत नाहीं. तरी या बाबतींत योग्य तो मार्ग दाखविण्यास आपण समर्थ आहांत.

**वैशंपायन**:—धर्मानें व्यासाला याप्रमाणें सांगितलें असतां, क्षणभर विचार करून व्यासानें त्याला उत्तर दिलें कीं, ' युधिष्ठिरा, आज जरी कोश रिता असला तरी भरून येईल. हिमालय पर्वतावर पुष्कळ द्रव्य पडलेलें आहे. महात्म्या मरुत्ताच्या यज्ञांत ब्राह्मणांनीं तेथें तें टाकून दिलें. तें आणविण्याची व्यवस्था कर म्हणजे तें अगदीं पुरेसें होईल.' हें ऐकून युधिष्ठिरानें विचारिलें, ' मरुत्ताच्या यज्ञांत तें द्रव्य तेथें कसें पडून राहिलें व तो मरुत्त राजा केव्हां होऊन गेला ? ' व्यासानें उत्तर दिलें, ' धर्मा, कारंधम राजाचें वृत्त मी आतां सांगतों. तो केव्हां होऊन गेला, त्यापाशीं विपुल द्रव्य कसें होतें व त्याचा पराक्रम कसा होता हें ऐकून घे.' १४.१.३.

---

## अध्याय ४ था.

### [ १. मरुत्ताची कथा ]

( १ ) **युधिष्ठिर**:—व्यासमुने, त्या राजर्षि मरुत्ताची कथा मला ऐकावयाची आहे, तरी कृपा करून ती सांगा.

**व्यास**:—युधिष्ठिरा, कृतयुगांत मनु नांवाचा दंडधारी राजा होऊन गेला. त्याला प्रसंधि नांवाचा मुलगा होता. प्रसंधीचा पुत्र क्षुप नामक असून क्षुपाचा मुलगा इक्ष्वाकु हा पराक्रमी राजा झाला. इक्ष्वाकूला अत्यंत धार्मिक असे शंभर पुत्र होते व त्या सर्वांना त्यानें राजपद दिलें. त्यांतील वडील पुत्राचें नांव विंश असून तो अत्यंत श्रेष्ठ धनुर्धारी होता. विंशाचा पुत्र विविंश हा मोठा भाग्यवान् होता. त्या विविंशाला पंधरा मुलगे झाले व ते सर्व ब्राह्मणांविषयीं आदरशील, पराक्रमी, व सत्यभाषणी होते. त्यांना दानधर्माची आवड असून ते

शांत स्वभावाचे होते; पण त्यांतील वडील खनीनेत्र हा इतरांना त्रास देत असे. त्यानें पराक्रमानें निष्कंटक राज्य जिंकलें, पण त्यांचें रक्षण त्याला करतां येईना व प्रजाहि त्यावर अनुरक्त नसे. तेव्हां एकदां सर्व लोकांनीं त्याला राज्यावरून हुसकून त्याचा पुत्र सुवर्चस् याला अभिषेक केला व तेव्हां त्यांना बरें वाटलें. आपल्या पित्याची ही दशा पाहून सुवर्चस् प्रजाहिताविषयीं दक्ष राहूं लागला. तो ब्राह्मणांचा आदर करी, शुद्ध रीतीनें वागे, शमदमांनीं संपन्न व धर्मशील होता, त्यामुळें प्रजा त्यावर प्रेम करी. अशा रीतीनें धर्मानें वागत असतांहि एकदां त्याचा कोश व वाहनें यांचा सांठा रिता पडला व त्यामुळें चोहोंकडून बारीक सारीक मांडलिक राजेहि त्याला पीडा देऊं लागले. कोश व सैन्य क्षीण झाल्यामुळें त्याला मोठी दुःस्थिति आली व त्याचे सेवक व सारें नगरहि त्याच मार्गाला लागलें. तथापि त्याचा समूळ नाश करणें कोणाला शक्य झालें नाहीं, कारण त्याचें आचरण नित्य धार्मिक असे. पण त्याचें दुःख जेव्हां परमावधीला पोंचलें, तेव्हां त्यानें आपला हात फुंकला व त्याबरोबर मोठें सैन्य उत्पन्न होऊन त्यानें जवळच्या सर्व मांडलिकांना जिंकून टाकलें. युधिष्ठिरा, या कारणावरून त्याला करन्धम असें नांव पडलें. त्याचा पुत्र कारंधम हा त्रेतायुगाच्या आरंभीं होऊन गेला. तो इन्द्राहून उणा नव्हता व देवांनाहि अजिंक्य होता. सगळे इतर राजे त्याच्या कह्यांत असत. आपल्या बलानें व आचरणानें तो सर्वांचा सम्राट् झाला. त्याचें दुसरें नांव अविक्षित् असून तो धर्मनिष्ठ व शौर्यानें इन्द्रासारखा होता. तो तेजानें सूर्यासारखा व शांतस्वभावानें पृथ्वीसारखा होता. बुद्धींत तो बृहस्पतीशीं स्पर्धा करणारा असून सौंदर्यांत प्रति हिमालयच होता. त्यानें आपल्या आचरणानें, वाणीनें, आत्मसंयमानें व शांतीनें सर्व प्रजेचीं मनें आकर्षून टाकिलीं. त्यानें विधिपुरस्सर शंभर अश्वमेध केले. त्याचा ऋत्विज् प्रत्यक्ष अंगिरा ऋषिच होता. त्याचा पुत्र मरुत्त हा सर्व गुणांत पित्याहून वरचढ असून धर्मवेत्ता, सहस्र हत्तींच्या बलानें युक्त, व जणूं प्रतिविष्णुच असा होता. यज्ञ करण्याच्या उद्देशानें त्या धर्मात्म्यानें सहस्रावधि सोन्याचीं व रुप्याचीं भांडीं करविलीं. मेरुपर्वताच्या पायथ्याशीं जाऊन त्यानें तेथें सोनारांकडून कुंडीं, भांडीं, थाळया, आसनें इत्यादि वस्तु अगणित करविल्या. तेथें जवळच यज्ञाची भूमीहि त्यानें सिद्ध करविली व तींत इतर अनेक मांडलिकांच्या साह्यानें त्या मरुत्तानें विधियुक्त यज्ञ केला. १४.१.४.

## अध्याय ५ वा.

[ १. मरुत्ताची कथा–पुढें चालू. ]

( १ ) **युधिष्ठिर :**—व्यासमुने, तो मरुत्त राजा किती पराक्रमी होता व त्याला अगणित सोनें तरी कसें मिळालें ? तें सोनें सांप्रत कोठें आहे व तें आपल्याला कसें मिळूं शकेल ?

**व्यास :**—युधिष्ठिरा, दक्षप्रजापतीला फार मोठी संतति असून त्यांतील असुर व देव हे नित्य आपसांत भांडत असत. त्याप्रमाणें आंगिरसाचेहि सारख्याच योग्यतेचे दोन पुत्र होते; एक महातेजस्वी बृहस्पति व दुसरा तपस्वी संवर्त. तेहि परस्परांची अत्यंत स्पर्धा करीत. बृहस्पति वारंवार संवर्ताला त्रास देई. वडील भावाचा सतत त्रास होत असल्यामुळें संवर्तानें सर्वसंगपरित्याग करून वनवास स्वीकारला. इकडे इन्द्रानेंहि सर्व असुरांना जिंकून व त्यांचा निःपात करून स्वर्गराज्य हस्तगत केलें व आंगिरस पुत्र असा जो ब्राह्मणश्रेष्ठ बृहस्पति त्याला पुरोहित नेमिलें. पूर्वीं अंगिरसानें करंधम राजाकडून यज्ञ करविले होते. करंधम शौर्यानें अप्रतिम असून त्याचें आचरण व बल हीं तशींच होतीं. तो इन्द्रासारखा वीर्यशाली, धर्मनिष्ठ व व्रतनिष्ठ होता. त्याच्या केवळ तोंडाच्या श्वासापासून केवळ ध्यानानेंच त्याला वाहनें, सैनिक, मित्र, उंची शयनें इत्यादिकांची प्राप्ति झाली. आपल्या केवळ गुणांनींच त्यानें सर्व राजांना वश केलें होतें. तो त्याला वाटेल तितका काळ पृथ्वीवर राहून शरीरासह स्वर्गीं गेला. त्याला ययातीसारखा अविक्षित् नांवाचा धर्मशील व शूर पुत्र होता, त्यानेंहि आपल्या गुणांनीं व पराक्रमानें पित्याप्रमाणें सर्व राज्य आपल्या अंकित केलें होतें. अविक्षिताला इन्द्रासारखा पराक्रमी असा मरुत्त नांवाचा मुलगा होता. समुद्रवलयांकित पृथ्वी त्याचीहि अंकित होऊन राहिली. तो नित्य इन्द्राबरोबर स्पर्धा करी व उलट इन्द्रहि मरुत्ताशीं तसाच वागे. मरुत्त राजा इतका पवित्र व गुणी होता कीं कितीहि प्रयत्न केला तरी इन्द्राला त्याच्याहून वरचढ होतां येईना. तेव्हां एकदां सर्व देव एकत्र जमले असतां इन्द्र म्हणाला, ‘बृहस्पते, मरुत्ताच्या घरीं कोणतेंहि देवकर्म किंवा पितृकर्म तूं चालवूं नको. माझ्या मनाप्रमाणें वागावयाचें तर तिकडे तूं कधीं कांहीं करूं नको. मीं तिन्ही लोकांचा व देवांचा एकटा राजा असल्यामुळें, मज अमराचा यज्ञ केल्यावर त्या मर्त्य मरुत्त राजाचा यज्ञ चालविणें तुला योग्य कसें दिसेल ? तर तूं एक काय तें कर. माझा तरी स्वीकार कर, त्यांत तुझें कल्याण आहे; नाहीं तर मरुत्ताचा तरी

सर्वस्वी कर. किंवा मरुत्ताचा अगदीं नाद सोडून मन:पूर्वक मजजवळ रहा. युधिष्ठिरा, इन्द्रानें बृहस्पतीला असें खणखणित सांगितल्यावर बृहस्पति क्षणभर विचार करून इन्द्राला म्हणाला, 'इन्द्रा, सर्व प्राण्यांचा तूं अधिपति आहेस व सर्व लोकांचा भार तुझ्यावरच आहे. नमुचि, विश्वरूप, बल इत्यादि मोठ्या दैत्यांचा तूं नाश केलेला आहे. तूंच एकट्यानें देवांचें हें अपरिमित ऐश्वर्य मिळवून आणिलेंस. पृथ्वी व स्वर्ग यांचें पोषण तूंच करतोस. तेव्हां तुझें पौरोहित्य केल्यावर त्या मर्त्य मरुत्ताचा यज्ञ मीं चालवीन तरी कसा? इन्द्रा, तूं अगदीं स्वस्थ अस. मीं त्या मर्त्याच्या यज्ञांतील स्रुक्स्रुवांना स्पर्शहि करणार नाहीं. आणखी सांगतों, ऐक. अग्नि एखाद्यावेळीं थंड होईल, पृथ्वी उलटी होईल, सूर्यहि कदाचित् कांहीं महिने ऋतु करीत नाहींसा होईल, पण माझें सत्य मात्र कधींच चळणार नाहीं.' बृहस्पतीचें भाषण ऐकून इन्द्राचें मन स्थिर झालें व तो त्याची स्तुति करीत आपल्या ठिकाणीं निघून गेला. १४.१.५.

---

## अध्याय ६ वा.

[ १. मरुत्ताची कथा—पुढें चालू ]

( १ ) **व्यास**:—युधिष्ठिरा, त्यानंतर बृहस्पति आणि मरुत्त यांमध्येंहि त्या प्रश्नावर वादविवाद झाला. बृहस्पतीनें इन्द्राला वचन दिलें असें ऐकून मरुत्त राजानें मोठा यज्ञ करावयाचें ठरविलें व बृहस्पतीकडे जाऊन तो करंधमाचा नातू त्याला म्हणाला, 'भगवन्, मीं पूर्वीं विचार करून जो यज्ञ करण्याचा बेत आपल्या सांगण्यावरून केला, तो तडीस नेण्याचें ठरवून सर्व सामग्री मी जमविली आहे. आपण तेवढा यज्ञ माझ्याकडून करवावा, एवढी माझी विनंती आहे.' तेव्हां बृहस्पतीनें उत्तर केलें, 'राजा, तुझा यज्ञ चालविण्याची माझी इच्छा नाहीं. देवराज इन्द्रानें माझी पुरोहित म्हणून योजना केली आहे, व मीं त्याला वचन देऊन चुकलों आहें.' मरुत्त म्हणाला, 'बृहस्पते, तुझ्या पित्याचा मी यजमान असून तुझ्याविषयीं माझ्या मनांत फार आदर आहे. म्हणून तूं माझा यज्ञ चालवावा हें योग्य आहे. मीं तुला मानतों, तर तूंहि मला मानावें.' बृहस्पतीनें पुनः उत्तर दिलें कीं, 'एकदां अमर अशा इन्द्राचें पौरोहित्य केल्यावर तुझ्यासारख्या मनुष्याचें पौरोहित्य मीं कसें बरें करूं? मरुत्ता, तर तूं जा कीं न जा. पण मीं आतां याजनकर्म सोडलेलें आहे; यास्तव तुझा यज्ञ मीं चालविणार

नाहीं; तुला वाटेल तो दुसरा पुरोहित निवड व त्याच्याकडून आपला यज्ञ चालवून घे.'

युधिष्ठिरा, बृहस्पतीनें असें चोख सांगितलें असतां मरुत्त लज्जित झाला व तेथून परत फिरला. तो उद्विग्न होऊन घरीं येत असतां वाटेंत त्याची नारदाशीं गांठ पडली. मरुत्तानें त्याला हात जोडून नमस्कार केला. तो आपल्यापुढें उभा राहिलेला पाहून नारद त्याला म्हणाला, 'राजर्षे, तूं खिन्नसा दिसत आहेस; तरी तुझें ठीक चाललें आहेना ? तूं कोठें गेला होतास व तुला ही खिन्नता कोणत्या कारणानें उत्पन्न झाली बरें ? राजा, मला सांगण्यासारखी गोष्ट असल्यास माझ्या कानावर ती घालून ठेव. म्हणजे शक्य तेवढा प्रयत्न करून मी तुझें दुःख नाहींसें करीन.' नारदाचें हें भाषण ऐकून आपल्याला बृहस्पतीनें कसें झिटकारिलें तें सर्व वृत्त मरुत्तानें त्याला सांगितलें. तो म्हणाला, 'देवांचा उपाध्याय जो अंगिरसपुत्र बृहस्पति त्याला आपल्या यज्ञांत पुरोहित करावें ह्या हेतूनें मीं त्याच्याकडे गेलों. परंतु त्यानें माझें मुळींच स्वागत केलें नाहीं. त्यानें मला अगदींच झिटकारून टाकिलें. तरी आतां जीवंत रहाण्याची माझी इच्छा नाहीं. गुरूनें माझा त्याग केल्यामुळें मीं दूषित झालों आहें.'

मरुत्ताचें बोलणें ऐकून नारदानें त्याचें सांत्वन केलें आणि त्याला उत्तेजन देण्यासाठीं तो म्हणाला, 'राजा, त्याच अंगिरसाचा संवर्त नांवाचा दुसरा पुत्र असून तो सर्वसंगपरित्याग करून दशदिशा भटकत असतो. बृहस्पति जर तुझा यज्ञ चालवूं इच्छित नसेल, तर तूं त्या संवर्ताकडे जा. तो तेजस्वी मुनि तुजवर प्रसन्न झाल्यास तुझा यज्ञ चालवील.' नारदाच्या बोलण्यानें मरुत्ताच्या जिवांत जीव आला आणि तो नारदाला म्हणाला, 'नारदमुने, तो संवर्त मला कोठें सांपडेल तें सांगाल काय ? मी त्याच्याशीं कसें वागावें म्हणजे तो माझा त्याग करणार नाहीं ? जर त्यानेंहि मला झिटकारलें तर मात्र मीं जीव ठेवणार नाहीं.' नारदानें उत्तर केलें, 'राजा, संवर्त उन्मत्त रूपानें वाटेल तिकडे भटकत फिरत असतो. महेश्वराच्या दर्शनासाठीं तो वाराणशी क्षेत्रींहि जातो. त्या नगरीच्या द्वाराशीं जाऊन तेथें एक प्रेत ठेवून दे, त्याला पाहून जो मागें फिरेल तोच संवर्त समज. त्याच्या मागून तो जाईल तिकडे तूं जा, आणि एकान्त दिसल्यावर त्याला गांठून हात जोडून शरण जा. माझें नांव तुला कोणी सांगितलें, असें जर त्यानें तुला विचारिलें, तर नारदानें सांगितलें असें तूं सांग. पण

पुनः माझ्याकडे जावयास जर तो तुला सांगेल, तर त्याला निःशंकपणें सांग कीं नारदानें अग्नींत प्रवेश केला!'

युधिष्ठिरा, 'ठीक आहे, तसें करतों' असें म्हणून मरुत्तानें नारदाची पूजा करून अनुज्ञा घेतली व तो वाराणशीस गेला. तेथें जाऊन त्या नगरीच्या दाराशीं नारदाच्या सांगण्याप्रमाणें त्यानें एक प्रेत आणून ठेविलें. थोड्या वेळानें एक ब्राह्मण त्या दारांतून आंत शिरला आणि तें प्रेत पाहून तत्काळ मागें वळला. तो परत फिरलासें पाहून मरुत्त हात जोडून संवर्ताची विनवणी करण्यासाठीं त्याच्या मागून चालूं लागला. थोड्या वेळानें जवळ कोणी नाहींसें पाहून संवर्त्तानें त्याच्या अंगावर धूळ, चिखल, खांकरे व थुंक्या यांचा वर्षाव केला. पण संवर्तानें असा त्रास दिला असतांहि मरुत्त त्याची विनवणी करीत हात जोडून त्याच्या मागें चाललाच होता. मग कांहीं वेळानें संवर्त्त थकल्यामुळें मागें वळला व दाट छायेच्या अनेक फांद्याच्या एका वडाच्या झाडापाशीं येऊन त्याच्या छायेंत विश्रांतीसाठीं बसला. १४. १. ६.

## अध्याय ७ वा.

[ १. मरुत्ताची कथा, संवर्त व मरुत्त यांचा संवाद. ]

**संवर्त:**—अरे, तूं मला कसें ओळखिलेंस व माझें नांव तुला कोणी सांगितलें? माझ्या मनासारखें करण्याची तुझी इच्छा असेल, तर मला प्रथम हें सांग. मला खरें सांगशील तर तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील, पण खोटें सांगितल्यास मात्र तुझ्या मस्तकाचे शंभर तुकडे उडतील!

**मरुत्त:**—महाराज, मीं वाटेनें चाललों असतां नारदानें आपलें वृत्त मला सांगितलें. आपण माझ्या गुरूचे पुत्र असल्यामुळें माझ्या मनांत आपल्याविषयीं विशेषच प्रेम उत्पन्न झालें.

**संवर्त:**—राजा, हें तूं खरें सांगितलेंस. मीं यज्ञ चालवूं शकतों, हें नारदाला ठाऊक आहे. पण नारद सध्यां कोठें आहे तें सांगशील का?

**मरुत्त:**—तो देवर्षि श्रेष्ठ मला आपलें वृत्त सांगून व माझा निरोप घेऊन अग्नींत प्रविष्ट झाला.

युधिष्ठिरा, मरुत्त राजाचें हें बोलणें ऐकून संवर्ताला आनंद झाला. तथापि, एवढें तर मीहि सांगूं शकलों असतों, असें म्हणून तो वेड्यासारखा बडबडत

मरुत्ताची कठोर शब्दांनीं निर्भर्त्सना करीत त्याला पुनः म्हणाला, ' मीं असा वात झाल्यासारखा बडबडणारा व आपल्याच तंद्रींत राहून अशा विकृत रूपानें भटकणारा असूनहि तूं माझ्याकडून यज्ञ चालवून घेण्याची कां इच्छा करितोस? याकामीं माझा भाऊ समर्थ असून तो इन्द्राच्या संगतींत त्याचे यज्ञ चालवीत असतो. तर त्यालाच तूं आपलीं कर्मेंहि करावयास सांग. गृहस्थधर्म, यज्ञ, गृह-देवता पूजन हीं सर्व माझ्या त्या वडील बंधूच्या स्वाधीन आहेत, हें शरीर मात्र माझें आहे. तेव्हां मरुत्ता, त्याच्या अनुज्ञेवांचून मीं कोणाचा यज्ञ चालविणार नाहीं. तो मला अत्यंत पूज्य आहे. तथापि तुझी इच्छाच असेल, तर तूं त्याकडे जाऊन त्याची अनुज्ञा आण, म्हणजे मीं तुझा यज्ञ चालवीन.'

**मरुत्त**:—संवर्ता, सांगतों ऐक. बृहस्पतीकडे मीं आधींच गेलों होतों. पण इन्द्राच्या हितासाठींच तो यज्ञ करणार असून माझा यज्ञ चालविण्याची त्याची इच्छा नाहीं. ' देवांचे यज्ञ करण्यास मिळाल्यामुळें माणसांचे यज्ञ मीं करणार नाहीं. मरुत्ताचा यज्ञ करूं नको अशी इन्द्रानें मला बंदी केली आहे, तो म्हणतो कीं मरुत्त माझ्याशीं नित्य स्पर्धा करतो.' असें त्यानें मला स्पष्ट सांगितलें. त्यानें इंद्राला तसें वचनहि दिलें आहे. मीं प्रेमानें त्याकडे गेलों असतांहि इन्द्राचा आश्रय त्यानें केल्यामुळें माझा यज्ञ चालविण्याचें त्याच्या मनांत आलें नाहीं. म्हणून सर्वस्व वेंचूनहि यज्ञ करावा व तुझ्या सामर्थ्यानें इन्द्रालाहि मागें टाकावें अशी माझी इच्छा आहे. आतां पुनः बृहस्पतीकडे जाण्यांत मला कांहीं अर्थ दिसत नाहीं. मीं कांहीं अपकार केला नसतांहि त्यानें मला झिटकारिलें आहे.

**संवर्त**:—मरुत्ता, तूं इच्छितोस तें सर्व कांहीं खरोखर होईल, पण मीं जसें जसें सांगेन तसें तसें सर्व तूं केलें पाहिजे. मीं तुझा यज्ञ करूं लागलों कीं बृहस्पति व इन्द्र हे अगदीं रागावून तुझा द्वेष करूं लागतील, ही एक गोष्ट पुरी लक्षांत ठेव. त्यावेळीं तुझें सत्त्व कसें टिकेल व त्यामुळें माझीहि स्थिरता कशी राहील तें पहा. तसें न होतां मला राग आल्यास सर्व बांधवांसह मीं तुझें भस्म करून टाकीन.

**मरुत्त**:—महाराज, जोंपर्यंत सूर्य तळपत राहील, जोंवर हे पर्वत आपलें स्थान सोडणार नाहींत, तोंपर्यंत मीं जर तुला सोडिलें तर मला इष्टलोक मिळ-णार नाहींत. जर मीं तुझा त्याग केला तर माझी बुद्धि नष्ट होईल व मीं विष-यांतच दंग होऊन राहीन!

**संवर्त**:—मरुत्ता, तुझी बुद्धि कर्मांत अशीच अढळ राहो. माझ्याहि मनांत तसा यज्ञ करण्याचें आहेच. त्यासाठीं लागणारें अनंत द्रव्य कोठें सांपडेल हें मीं तुला सांगतों. तें मिळवून तूं यज्ञ केल्यास देवांना, गंधर्वांना व इन्द्राला तूं सहज मागें टाकशील. मला खरोखर द्रव्याची किंवा यजमानांची आवड आहे असें नाहीं. पण माझा भाऊ व इन्द्र या दोहोंची खोड मोडावयाचें मात्र माझ्या मनांत आहे. तुझा यज्ञ करून मीं तुला इन्द्राशीं समान पद निःसंशय मिळवून देईन व तुझ्या मनासारखें करीन, हें तुला मीं अगदीं खरें खरें सांगतों. १४.१.७

## अध्याय ८ वा.

[ १ मरुत्ताच्या यज्ञाची कथा; त्याला सुवर्णाची प्राप्ति ]

( १ ) **संवर्त**:—राजा, हिमालय पर्वताच्या रांगेंत मुञ्जवान् नामक एक डोंगर आहे, त्यावर उमापति नित्य तप करीत असतो. तो तेथें कधीं झाडांच्या बुंधाशीं, कधीं पर्वतांच्या अवघड शिखरांवर, कधीं त्या पर्वताच्या गुहेंत असा इच्छेस येईल त्याप्रमाणें उमेसह बसलेला असतो. विविध भूतगण त्याच्या भोंवतीं असतात. तसेच अनेक रुद्र, साध्य, सर्व वसु, यम, वरुण, आपल्या अनुयायांसह कुबेर, भूत, पिशाच, अश्विन, गन्धर्व, अप्सरा, यक्ष, देव, ऋषि, आदित्य, मरुत्त, राक्षस, हेहि त्या उमापतीची उपासना करण्यासाठीं तेथें येतात. राजा, नानाप्रकारचीं वेडींवांकडीं रूपें घेतलेले कुबेराचे अनुचर तेथें वागडत असतात व भगवान् महादेव त्यांच्याशीं गंमत करीत असतो. उगवत्या सूर्याप्रमाणें तेजःपुंज असतो; आपल्या वैभवानें तळपत असून त्याचें रूप व शरीर अमुक प्रकारचें आहे असें निश्चित ठरवितां येत नाहीं. स्थूल नेत्रांनीं प्राकृत प्राण्यांना त्याकडे पहाणेंहि शक्य नाहीं. तेथें उन्हाळा नाहीं कीं हिंवाळा नाहीं; वायु नाहीं कीं सूर्य नाहीं, भूकतहान यांची बाधा नाहीं, वृद्धत्व व मृत्यु यांचीहि भीति नाहीं. त्या डोंगराच्या पायथ्याशीं सूर्यकिरणांप्रमाणें चमकणाऱ्या सोन्याच्या राशी पडल्या आहेत; पण कुबेराचे सेवक त्याच्या हितासाठीं जागून शस्त्रें उगारून त्या सूवर्णराशींचें रक्षण करीत असतात.

राजा, तेथें जाऊन त्या भगवान् महादेवाला नमस्कार कर. त्याचीं अनेक नांवें आहेत. शर्व, वेधस्, रुद्र, शितिकंठ, कपर्दी, कराल, हर्यक्ष, वरद, पिनाकी, पशुपति, त्रिपुरघ्न, त्रिनयन, उमापति, दशभुज, उग्र, स्थाणु, विरूपाक्ष, अशा

विविध नांवानीं त्याला नमस्कार करून शरण जा, म्हणजे तें सोनें तुला मिळेल आणि तें मिळालें म्हणजे इकडे तें आणण्यासाठीं आपलीं मनुष्यें तिकडे पाठव.

युधिष्ठिरा, संवर्तानें सांगितल्याप्रमाणें यज्ञाची सामग्री मनुष्याच्या सामर्थ्यापलीकडची होती तरी मरुत्तानें ती सर्व जमविली आणि त्याच्या शिल्पी लोकांनीं सोन्याचीं भांडींहि केलीं. मरुत्ताच्या यज्ञसामग्रीची समृद्धि देवांपेक्षांहि मोठी झाली असें ऐकून बृहस्पतीला मात्र फार संताप आला; इतका कीं तो त्यामुळें अगदीं फिकट व कृश होऊन गेला. त्यानें खूणगांठ बांधली कीं आपला शत्रु संवर्त हा आतां संपत्तिमान् होणार. बृहस्पतीचा मोठा संताप पाहून देवराज इंद्र त्याच्याकडे गेला आणि त्याची चौकशी करूं लागला. १४.१.८.

---

## अध्याय ९ वा.

[ १. मरुत्ताची कथा–पुढें चालू. ]

( १ ) **इन्द्र**—बृहस्पते, तुला सुखाची झोंप लागते काय? तुझे सेवक तुझ्या मनाप्रमाणें वागतात ना? देवांचें सुख तूं पहातोस ना, तसेंच देवहि तुझें योग्य पालन करतात ना?

**बृहस्पति**:—इन्द्रा, मला शयनावर झोंप सुखानें येते. माझे सेवकहि माझ्या मनासारखे वागतात. मीं देवांचें कल्याण चिंतीत असतों व देवहि माझें यथायोग्य पालन करतात.

**इन्द्र**:—बृहस्पते, तर मग तुझ्या मनाला व देहाला जें हें दुःख होतेंसें दिसतें तें कशामुळें बरें? पहा तूं कसा निस्तेज व फिकट झाला आहेस. ब्राह्मणा, सर्व मला सांग, म्हणजे तुला दुःख देणाऱ्या सर्वांचा मीं नाश करून टाकतों.

**बृहस्पति**:—इन्द्रा, मोठमोठ्या दक्षिणांची योजना करून मरुत्त राजा प्रचंड यज्ञ करण्याच्या विचारांत आहे असें म्हणतात. त्याचा यज्ञ संवर्त चालविणार आहे असेंहि ऐकतों. माझी अशी इच्छा आहे कीं त्यानें तो चालवूं नये.

**इन्द्र**:—ब्राह्मणा, तुझे सर्व मनोरथ पूर्ण झाले आहेत, कारण वेदवेत्त्या अशा तुला देवांचें पौरोहित्य मिळालें आहे. आतां वार्धक्य आणि मृत्यु यांचीहि भीति तुला उरलेली नाहीं. मग संवर्त तुझें काय वांकडें करूं शकणार आहे?

**बृहस्पति**:—इन्द्रा, सर्व असुरांचा पराभव केल्यावर त्यांना पाळांमुळांसह नाहींसें करण्याची तूं इच्छा करतोस ना? जेथें जेथें समृद्धि दिसेल, तेथें तेथें ती

जर शत्रूजवळ असेल, तर तुला ती दुःखद होते ना? इन्द्रा, मग माझाहि शत्रु वृद्धि पावत आहे हें ऐकून मीं निस्तेज झालों तर काय आश्चर्य आहे बरें? तर कोणताहि उपाय करून संवर्ताचें नाहीं तर मरुत्त राजाचें नियमन कर.

युधिष्ठिरा, बृहस्पतीचें हें भाषण ऐकून इन्द्रानें अग्नीला हाक मारून सांगितलें, 'अग्ने, तूं मरुत्ताकडे जा आणि त्याला सांग कीं बृहस्पतिच तुझा यज्ञ चालवील व तुला अमर करील.' तेव्हां अग्नि म्हणाला, 'इन्द्रा, मीं दूत म्हणून जातों आणि तुझा निरोप मरुत्ताला सांगतों. तुझें म्हणणें खरें करावें व बृहस्पतीचें दुःख निवारावें हीच माझी इच्छा आहे.' युधिष्ठिरा, असें म्हणून अग्नि निघाला व आपल्या बलानें वाटेंतील रानावनाची व वृक्षांची राख-रांगोळी करीत मरुत्ताकडे आला. त्याला मूर्तिमंत आलेला पाहून मरुत्ताला आश्चर्य वाटलें व त्यानें त्याला पाय धुण्यास पाणी, आसन आणि गाय हीं अर्पण केलीं. नंतर मरुत्त व अग्नि यांत संवाद झाला.

**अग्नि**:—राजा, तुझें पाणी, आसन इत्यादि मला नको आहेत. मीं इन्द्राकडून संदेश घेऊन दूत म्हणून तुजकडे आलों आहें.

**मरुत्त**:—अग्ने, मग देवराज इन्द्र खुशाल आहेना? त्याची आमच्यावर कृपा आहे ना? देव त्याच्या अनुरोधानें वागत आहेत ना? सारें वृत्त मला सविस्तर सांग.

**अग्नि**:—राजा, इन्द्र सर्वथा खुशाल आहे व त्याची तुझ्यावर अखंड कृपाहि आहे. देव त्याच्या आज्ञेंत वागत आहेत. पण आतां त्याचा संदेश मीं सांगतों तो ऐक. तुझ्याकडे त्यानें मला पाठविलें तें असें सांगण्यासाठीं कीं, 'आमचा गुरु बृहस्पति हाच तुझा यज्ञ चालवील व तूं मर्त्य असतांहि तुला अमर करील.'

**मरुत्त**:—अग्ने, हा संवर्त ब्राह्मण माझा यज्ञ चालविणार आहे तरी तूं माझा हात जोडून केलेला हा नमस्कार बृहस्पतीला सांग आणि त्याला कळव कीं 'महेन्द्राचा यज्ञ चालविलेल्या पुरोहितानें आतां एखाद्या मर्त्याचा यज्ञ चालविणें शोभेसें नाहीं.'

**अग्नि**:—राजा, बृहस्पतीनें तुझा यज्ञ चालविल्यास, देवलोकीं जीं उत्तम ठिकाणें आहेत, तीं इन्द्राच्या कृपेनें तुला प्राप्त होतील, व खरोखर तूं स्वर्गच जिंकल्यासारखें होईल. बृहस्पतीनें केलेल्या यज्ञाच्या योगानें मनुष्य लोक, स्वर्ग, ब्रह्मलोक व सर्व देवराज्य तूं जिंकिशील.

**संवर्त**:—अग्ने, बृहस्पति मरुत्ताचा यज्ञ चालवील हा निरोप घेऊन तूं पुनः इकडे न येशील तर बरें होईल. मला क्रोध आल्यास आपल्या दारुण दृष्टीनें मीं तुला जाळून टाकीन; पण तसें न व्हावें.

युधिष्ठिरा, संवर्ताचा निरोप घेऊन अग्नि देवांकडे परत आला. पिंपळाच्या पानाप्रमाणें आपण जळून जाऊं अशी त्याला भीति वाटली. तो परत आलेला पाहून इन्द्र त्याला बृहस्पतीच्या समक्षच म्हणाला, 'आमच्या सांगण्याप्रमाणें तूं मजकडून निरोप घेऊन गेलास, तेव्हां यज्ञ करूं इच्छिणारा तो राजा काय म्हणाला ? त्यानें आमचें म्हणणें मान्य केलें काय ?'

**अग्नि**:—इन्द्र, मरुत्ताला तुझें बोलणें रुचलें नाहीं. उत्तर म्हणून त्यानें बृहस्पतीला हात जोडून नमस्कार सांगितले आणि तो म्हणाला, 'माझा यज्ञ संवर्त चालविणार आहे.' मीं त्याला पुनः पुनः बृहस्पति यज्ञ चालवील म्हणून सांगितलें, तरी तो ऐकेना. इतकेंच नव्हे तर वर तो निश्चयानें म्हणाला कीं, मनुष्यलोक, देवांचा लोक, किंवा त्याच्या पलीकडे जे ब्रह्मलोक आहेत, ते जरी मला बृहस्पतीकडून यज्ञ करण्यानें मिळण्यासारखे असले, तरी मीं तसें करणार नाहीं.

**इन्द्र**:—अग्ने, त्या मरुत्ताकडे पुनः जाऊन माझा हिताचा निरोप त्याला सांग. तो पुनःहि आमचें म्हणणें नाकारील तर वज्रच त्याच्यावर फेंकीन.

**अग्नि**:—देवराजा, मला तिकडे जाण्याची भीति वाटते, तरी आतां तूं मला न पाठवितां गंधर्व राजालाच दूत म्हणून पाठव. संवर्तानें तर रागावून मला सांगितलें कीं, 'जर पुनः मरुत्ताकडे बृहस्पतीनें जावें असें सांगावयास तूं इकडे येशील तर मीं तुला आपल्या दारुण दृष्टीनें जाळून टाकीन !'

**इन्द्र**:—अग्ने, तूंच जर इतर सगळ्यांना जाळणार, तर भस्म करणारा दुसरा आहे तरी कोण ? सर्व लोक तुझ्या स्पर्शाला भितात. तेव्हां तूं म्हणतोस यावर विश्वास तरी कसा ठेवावा ?

**अग्नि**:—देवेन्द्रा, ऐक. स्वर्ग व सारी पृथ्वी तूं आपल्या बलानें आक्रमिली आहेस. असा तूं असतांना तुझ्यापासून स्वर्गाचें राज्य वृत्रानें कसें बरें पूर्वी हिरावून घेतलें ?

**इन्द्र**:—अग्ने, माशीएवढ्या क्षुद्र वस्तूला मीं डोंगराएवढी करीत नसतों. तसाच शत्रूनें दिलेला सोमरसहि मीं पीत नसतों. अल्प शक्तीच्या पुरुषावर मीं

कधीं वज्र टाकीत नाहीं. तेव्हां मला दुःख देण्यासाठीं कोणता मनुष्य माझ्या-वर प्रहार करील? कालकेयांना मीं पृथ्वीवरून हांकून दिलें, दानवांना अंतरि-क्षांतून हुसकून काढिलें, व प्रल्हादालाहि स्वर्गांत येण्याची कांहीं काळ बंदी केली. असें असतां कोणता मानव मजवर शस्त्र उगारूं शकेल?

अग्निः—इन्द्रा, जेव्हां च्यवन भार्गवानें शर्यातीकडून यज्ञ करविला आणि आपल्या सामर्थ्यानें अश्विनांना सोमरस दिला, तेव्हां तूं रागानें त्या यज्ञाचा निषेध केला होतास तें तुला आठवतें काय? मग तूं वज्र घेऊन च्यवनावर मोठा प्रहार केलास, पण त्या ब्राह्मणानें आपल्या तपाच्या बळानें वज्रासह तुझा हात तसाच रोखून धरिला व मग रागानें त्यानें भयंकर स्वरूपाचा मद नांवाचा असुर तुझा शत्रु म्हणून निर्मिला. त्याचें जगड्व्याळ शरीर पाहून तूं तर डोळेच मिटलेस. त्याची हनवटी भूमीला टेकलेली तर वरचा ओंठ आकाशाला भिडला होता. शंभर योजनें लांबीचे त्याचे सहस्रावधि तीक्ष्ण दांत असून त्याचें स्वरूप अति घोर होतें. त्याच्या मोठ्या थोरल्या चार दाढा वाटोळ्या रुप्याच्या खांबा-सारख्या दिसत होत्या. आपले दांत दाखवीत शूल उगारून तो तुला मारण्यासाठीं आला, तेव्हां त्याचें तें भयंकर स्वरूप पाहून तुझी जी अवस्था झाली तींतील तुझें स्वरूप अगदीं पहाण्यासारखें होतें. शूर देवराजा, त्या असुराला भिऊन तूं हात जोडिलेस आणि त्या महर्षि च्यवनाला शरण गेलास. तात्पर्य काय तर क्षात्र सामर्थ्यापेक्षां ब्रह्मबल थोर आहे. ब्रह्मबलाहून मोठें दुसरें कांहीं नाहीं. त्या ब्रह्मबलाची यथायोग्य कल्पना मला असल्यामुळें संवर्ताला जिंकण्याची माझी इच्छा नाहीं. १४.१.९.

---

## अध्याय १० वा.

[ १ मरुत्ताची कथा पुढें चालू—त्याच्या यज्ञाचा वृत्तांत ]

( १ ) इंद्रः—अग्ने, तूं म्हणतोस त्याप्रमाणें ब्रह्मबल मोठें असून त्याहून अधिक कांहीं नाहीं हें खरें. पण मरुत्ताचें बल काय होय? तेव्हां त्याच्यावर मीं आपलें घोर वज्र फेंकणार. गंधर्वराज धृतराष्ट्रा, तूं मरुत्ताकडे जाऊन सांग कीं संवर्ताची संगति तूं करूं नको. बृहस्पतीकडून तूं आपला यज्ञ करून घे, नाहींतर तुझ्यावर माझें घोर वज्र येऊन पडलेंच म्हणून समज.

युधिष्ठिरा, हा इन्द्राचा निरोप घेऊन धृतराष्ट्र मरुत्ताकडे जाऊन त्याला म्हणाला, 'मीं धृतराष्ट्र नांवाचा गंधर्व असून तुझ्याशीं बोलणें करण्यासाठीं आलों आहें. इन्द्रानें तुला निरोप पाठविला आहे तो ऐक. 'तूं बृहस्पतीला यज्ञपुरोहित कर, नाहींतर मीं तुझ्यावर वज्र फेंकीन,' असें इंद्राचें म्हणणें आहे. हा निरोप ऐकून मरुत्तानें उत्तर केलें, 'गंधर्वराजा, तुला ठाऊक आहे, तसेंच इन्द्र, सारे दुसरे देव, वसु व अश्विन, यांनाहि आहे कीं, मित्रद्रोहाला जगांत प्रायश्चित नाहीं. मित्रद्रोहाचें पाप ब्रह्महत्येसारखेंच आहे. बृहस्पतीला देवश्रेष्ठ वज्रधारी इन्द्राचे यज्ञ चालवूं दे. माझा यज्ञ संवर्तच चालवील. तुझें तसेंच इन्द्राचें म्हणणें मला मुळींच मान्य नाहीं.' त्यावर गंधर्व म्हणाला, 'राजा, इंद्राच्या गर्जनेचा आकाशांतील हा कडकडाट ऐक. तो खरोखरच तुझ्यावर वज्र फेंकील. राजा, अजून वेळ गेली नाहीं तोंच आपल्या हिताचा विचार कर.'

युधिष्ठिरा, धृतराष्ट्रगंधर्वानें मरुत्ताला असें सांगितलें असतां, इन्द्राच्या कडकडाटाचा शब्द ऐकून मरुत्तानें तपोनिष्ठ व धर्मवेत्त्यांत श्रेष्ठ अशा संवर्ताला विचारिलें कीं आतां कसें करावें ?

**मरुत्त :**—हे मुनिश्रेष्ठा, हा मीं दूर वहात चाललों आहें असें वाटतें. इन्द्र अजून लांब असल्यामुळें दिसत नाहीं. मला तुझ्याकडून स्वास्थ्य मिळणार आहे; तरी मला अभय दे. हा पहा दाही दिशा प्रकाशित करीत इन्द्र इकडे येतो आहे. त्याच्या भयंकर स्वरूपामुळें आपले यज्ञ-सभासद गांगरून गेले आहेत.

**संवर्त :**—राजा, शक्र तुला भय उत्पन्न करीत आहे ? कांहीं अडचण नाहीं. तें दारुण भय मीं आतांच नाहींसें करतों पहा. मजजवळ स्तंभिनी विद्या आहे. इन्द्राच्या दरडावणीला तूं मुळींच भीक घालूं नको, स्वस्थ रहा. मी इन्द्राला गप्प करून टाकितों. तूं मुळीं भिऊं नको. हीं पहा देवाचीं आयुधें मीं क्षीण करून टाकिलीं. इन्द्राचें वज्र आतां दशदिशा फिरो, वायु वाहो, पाऊस पडो, पाण्याचा पूर येवो, अंतरिक्षांत वीज चमको, त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं.

**मरुत्त :**—वाऱ्याच्या सोसाट्याबरोबर वज्राचा घोर शब्द ऐकूं येत आहे. मला भीति वाटत असून माझें स्वास्थ्य नाहींसें झालें आहे.

**संवर्त** :—मरुत्ता, वज्राचें भय बाळगण्याचें कारण नाहीं. वात होऊन मी तें नष्ट करीन, भय टाकून दे व तुला दुसरें कांहीं पाहिजे काय बोल; मीं तें साध्य करून देतों.

**मरुत्त**—इन्द्रानें यज्ञांत प्रत्यक्ष येऊन आपला हविर्भाग घ्यावा अशी माझी इच्छा आहे. तसेंच इतर देवांनींहि आपआपल्या जागीं येऊन मीं दिलेल्या सोमाचा स्वीकार करावा.

**संवर्त** :—एवढेंच ना ? हा पहा देवांनीं स्तुति केलेला इन्द्र माझ्या मंत्राच्या आह्वानावरून या यज्ञाकडे येत आहे. माझ्या मंत्रामुळें त्याचें शरीर अस्ताव्यस्त झालें आहे पहा.

युधिष्ठिरा, मग आपल्या रथाला घोडे जुंपून सर्व देवांसह इन्द्र मरुत्तानें अर्पिलेला सोम पिण्यासाठीं त्या यज्ञाच्या स्थानीं आला. देवगणांसह त्याला तेथें आलेला पाहून मरुत्त राजा पुरोहितासह त्याला सामोरा गेला आणि संतुष्ट होऊन त्यानें त्याची यथाविधि पूजाहि केली. नंतर संवर्त त्याला म्हणाला, ‘हे ज्ञानवान् इंद्रा, तुझें स्वागत असो. तुझ्या सान्निध्यामुळें या यज्ञाला फारच शोभा आली आहे. तरी आतां, हे बलनिषूदना, मीं पुढें केलेला हा सोमरस पी.’ मरुत्त म्हणाला, ‘हे सुरेन्द्रा, मजकडे कृपादृष्टीनें पहा, मीं तुला नमस्कार करतों. माझा यज्ञ सफल झाला, त्यामुळें माझ्या जीविताचेंहि साफल्य झालें. बृहस्पतीच्या या धाकट्या बंधूनें हा माझा यज्ञ पार पाडिला.

**इन्द्र** :—राजा, हा तुझा तपस्वी गुरु बृहस्पतीचा धाकटा भाऊ आहे हें मला ठाऊक आहे. त्याच्या आह्वानामुळेंच मीं येथें आलों असून तुझ्याविषयींचा माझा राग गेला व त्याचें स्थान प्रेमानें घेतलें आहे.

**संवर्त** :—देवराजा, जर तूं माझ्यावर प्रसन्न झाला असशील, तर तूंच आतां मला पुढील यज्ञक्रिया सांग व सर्वांचे भाग कसे ते स्वतः करून दे आणि सर्वांना त्यांची माहिती सांग.

युधिष्ठिरा, संवर्तानें इन्द्राला असें सांगितलें, तेव्हां इन्द्रानें स्वतःच देवांना आज्ञा केली कीं, ‘सभागृहें व रहाण्याचीं ठिकाणें हजारों सिद्ध करा व त्यांत सर्व साहित्य ठेवून तीं शोभिवंत करा. त्यांवर चढण्यासाठीं चांगले खांब घालून सोपान करा. गंधर्व व अप्सरा यांना तेथें नाचतां येईल अशीं तीं असूं द्या व हें सर्व यज्ञाचें आवार स्वर्गासमान होऊं द्या.’ देवांना आज्ञा होतांच त्यांनीं लगेच

तशी व्यवस्था केली आणि ती झाल्यावर संतुष्ट होऊन इन्द्र मरुत्ताला म्हणाला, 'राजा, आतां मीं आणि तुझे हे पूर्वज तसेच सारे देव येथें आलों असून तुझ्यावर संतुष्ट झालों आहों आणि तूं दिलेले हविर्भाव घेण्यास सिद्ध आहों. तरी आतां एक तांबडा बैल अग्नीला बळी दे, दुसरा अनेक रंगांचा बैल विश्वेदेवांना दे व निळ्या वर्णाचा पवित्र बैल आणखी एक दे.' अशा रीतीनें प्रत्यक्ष देव जेथें आपलें अन्न घेण्यासाठीं आले, असा तो मरुत्ताचा यज्ञ मोठ्या समारंभानें यशस्वी झाला व ब्राह्मण ज्याची नित्य पूजा करतात तो देवराज इन्द्रच त्याचा सभासद झाला. मग दुसरा अग्निच असा तो संवर्त स्थंडिलाशीं जाऊन एकेका देवाचें नांव समंत्र उच्चारीत मोठ्या आनंदानें अग्नींत हविर्भाग देऊं लागला. मग इन्द्रानें सर्व देवांसह तो उत्तम प्रकारचा सोमरस पिऊन तृप्त झाल्यावर मरुत्ताच्या आज्ञेनें आपल्या स्थानीं प्रयाण केलें. तेव्हां मरुत्तानेंहि आनंदित होऊन ठायीं ठायीं सोन्याच्या राशी घालून ठेविल्या आणि ब्राह्मणांना त्या देऊन कुबेराप्रमाणें तो शोभूं लागला. नंतर त्यानें आपला कोश यथाविधि पूर्ण करून गुरूच्या अनुज्ञेनें आसमुद्र पृथ्वीचें राज्य चालविलें. अशा प्रकारचा जो हा मरुत्त राजा होऊन गेला, त्याच्या त्या यज्ञांतील विपुल सुवर्ण तेथेंच पडलें आहे. युधिष्ठिरा, तें सर्व द्रव्य येथें आणवून तूं यज्ञानें देवांना तृप्त कर.

वैशंपायन म्हणतो, राजा जनमेजया, ही व्यासानें सांगितलेली कथा ऐकून युधिष्ठिराला बरें वाटलें आणि मरुत्ताच्या यज्ञांतील द्रव्य आणून यज्ञ करण्याचा विचार ठरविल्यावर त्यासंबंधानें व्यवस्था करण्यासाठीं त्यानें अमात्यांची सभा बोलाविली. १४. १. १०.

## अध्याय ११ वा.

[ १. अश्वमेधासंबंधानें युधिष्ठिर व कृष्ण यांचें संभाषण. ]

( १ ) **वैशंपायन**:—व्यासानें युधिष्ठिराला अश्वमेध करण्याविषयीं सांगितल्यावर कृष्णानेंहि त्याच्या मनाचा दीनपणा पाहून ज्ञातिबांधवांच्या वधामुळें तो तमोग्रस्त सूर्यासारखा किंवा धुरानें व्याप्त झालेल्या अग्नीसारखा भासत आहे असें जाणिलें आणि त्याचा खेद घालवून त्याला उत्साहयुक्त करावें म्हणून उपदेश केला. तो म्हणाला, 'युधिष्ठिरा, कपटाचा मार्ग म्हणजे

त्यूचा मार्ग असून सरळपणा हा मोक्षाचा मार्ग होय. ज्ञान म्हणतात हेंच. नुसत्या बडबडीचा काय उपयोग? मला वाटतें तूं कर्मनिष्ठ ाहींस व तुला शत्रूहि जिंकतां आले नाहींत. नाहींतर आपल्या शरीरांतच त्रु आहेत हें तुला ओळखलें असतें. आतां तुला मीं याविषयीं कथा ांगतों. इन्द्राचें वृत्राशीं युद्ध झालें, तें कसें तें पहा. राजा, पूर्वीं एकदां वृत्रानें ारी पृथ्वी व्यापून टाकिली. त्यानें प्रथम पृथ्वींतील गन्ध काढून घेतला. तेव्हां ृथ्वीला घाण येऊं लागली, तें पाहून इन्द्राला राग आला आणि त्यानें वृत्रा-र आपलें वज्र फेंकलें. तें वज्र मारूं लागलें असतां वृत्र पाण्यांत शिरला आणि यानें त्यांतील रस शोषून घेतला. तेव्हां जल रसहीन झालेलें पाहून इन्द्राला ुनः संताप आला आणि पुनः त्यानें वृत्रावर वज्र फेकिलें. त्या अनंत शक्तीच्या ज्रानें आपण मारिले जाणार हें पाहून वृत्र तेजांत शिरला आणि त्यांतील रूप-वेषय त्यानें काढून घेतला. याप्रमाणें रूपविषय तेजांतून नाहींसा झाला तेव्हां इन्द्राला फारच राग आला आणि त्यानें पुनः वृत्रावर वज्र फेकलें. तेव्हां वज्राच्या तडाख्यानें आपण मरणार असें पाहून वृत्र वायूंत शिरला व त्यांतून त्यानें स्पर्श-गुण काढून घेतला. वायु स्पर्शरहित झाला हें पाहून इन्द्रानें आणखी एकदां वृत्रावर वज्र फेकिलें; तेव्हां वृत्रानें आकाशांत शिरून त्याचा शब्दविषय काढून घेतला. आकाश वृत्रमय झालेलें पाहून इन्द्रानें वृत्रावर पुनः एकदां वज्र फेकलें. पण तेव्हां वृत्रानें त्याच्या भीतीनें स्वतः इन्द्राच्या शरीरांतच प्रवेश करून त्याची बुद्धि हरण केली. अशा रीतीनें इन्द्राची बुद्धि वृत्रानें व्यापिल्यामुळें तो अगदीं मोहग्रस्त झाला. त्यावेळीं वसिष्ठानें रथंतर साम गाऊन त्याला सावध केलें आणि मग त्या शरीरस्थ वृत्राला इन्द्रानें नष्ट केलें. या वेळीं इन्द्रानें हें कार्य अदृश्य वज्रानें केलं, असें सांगतात. राजा, हें धर्मरहस्य* इन्द्रानें महर्षींना सांगितलें व ऋषींनीं तें मला सांगितलें. तें तूं लक्षांत ठेव. १४.१.११.

---

* या इन्द्रवृत्रयुद्धाचा अर्थ अध्यात्मपर लावितात. वृत्र म्हणजे अज्ञान, इन्द्र म्हणजे चिदात्मा, पृथ्वी म्हणजे स्थूल शरीर, वज्र म्हणजे विवेक किंवा सारासार विचार, जल म्हणजे दिव्य शरीर, वायु व तेज म्हणजे दोन प्रकारचीं सूक्ष्म शरीरें, रथंतर साम म्हणजे आत्मोपदेश. इन्द्रानें म्हणजे जीवात्म्यानें सर्व उपाधि सोडीत सोडीत शेवटीं परमानंदमय असें परमात्मैक्य संपादिलें असा अर्थ.

## अध्याय १२ वा.

[ १. कृष्णाचा युधिष्ठिराला उपदेश. ]

( १ ) **श्रीकृष्ण :**—युधिष्ठिरा, व्याधि दोन प्रकारचे असतात, शारीर आणि मानसिक. पण हे दोन प्रकार परस्परसापेक्ष असून एकमेकांपासून स्वतंत्र असे कधीं नसतात. जो व्याधि शरीरांत उत्पन्न होतो, तो शारीर व जो मनांत होतो, तो मानसिक. राजा, शरीरांत शीत, उष्ण आणि वायु हे तीन गुण असतात; ते समप्रमाणांत असले, म्हणजे तें शरीराच्या स्वस्थपणाचें लक्षण होय. त्यांत उष्णाचा प्रभाव शीताहून अधिक झाला, किंवा शीताचा उष्णाहून झाला म्हणजे त्याला व्याधीचें स्वरूप येतें. आतां मनासंबंधानें पहातां सत्त्व, रज आणि तम हे त्याचे तीन गुण होत; ते समप्रमाणांत असले म्हणजे मनाचा स्वस्थपणा असतो. पण त्यांत जर कोणत्याहि एकाचें आधिक्य झालें, तर मनाचा व्याधि उत्पन्न होतो, व त्यासाठीं उपाय करावा लागतो. शोकाचा मोड आनंदानें होतो व आनंदाचा शोकामुळें होतो. कोणी एखादा दुःखांत असला तर तो मागील सुखाची आठवण काढून अधिक दुःखी होतो व कोणी सुखांत असेल तर तो पूर्वींच्या दुःखाची आठवण करून अधिक सुखी होतो. पण, युधिष्ठिरा, तूं दुःखी असतांना सुखाची किंवा सुखी असतांना दुःखाची आठवण मुळींच करीत नाहींस. दुःखाच्या व्यामोहानें तिसऱ्या वैराग्याच्याच गोष्टी बोलत सुटतोस. खरोखर, युधिष्ठिरा, हा तुझा स्वभावच झाला असून त्यामुळेंच तूं दुःखानें आकर्षिला जात आहेस. द्रौपदी रजस्वला व म्हणून एकवस्त्रा असतांना तुम्हां पांडवांच्या देखत तिला सभेंत ओढून आणिलें त्याची आठवण तुला येत नाहीं. हरणाचीं कांतडीं अंगावर देऊन तुम्हांला नगरांतून वनांत रहावयास पाठविलें, त्याची आठवण करण्याची तुला इच्छा होत नाहीं. जटासुरापासून झालेला त्रास, चित्रसेनाशीं करावें लागलेलें युद्ध, जयद्रथानें दिलेले क्लेश, यांची आठवण काढण्याची आवश्यकता तुला वाटत नाहीं; त्यानंतर अज्ञातवासांत असतांना द्रौपदीला कीचकानें लाथ मारिली तीहि आठवण बुजवून टाकावीशी तुला वाटते. द्रोण व भीष्म यांच्या सारख्यांशीं तुला युद्ध करण्याची पाळी आली, पण त्याहून निराळ्या प्रकारचें युद्ध तुला आतां एकट्यानें मनाशींच करावें लागत आहे! या चमत्कारिक युद्धांत तुला मोठ्या युक्तीनें लढून पार पडलें पाहिजे. या युद्धांत बाणांचें काम नाहीं; नोकरांचाकरांचें नाहीं व बांधवांचेंहि नाहीं.

एकट्यानेंच हें युद्ध तुला आपल्या मनाशीं करावयाचें आहे. जर या युद्धांत तूं विजय मिळविलास तर ठीक आहे, नाहींतर तुझी अवस्था कशी होणार? पण मीं सांगितलेल्या गोष्टी लक्षांत ठेविल्यास मात्र तूं कृतकृत्य होशील. या गोष्टी निश्चितपणें लक्षांत ठेवून व प्राणिमात्रांच्या जन्ममृत्यूचा विचार करून परंपरागत मार्गानें जा व राज्याचें यथोचित रक्षण कर. १४.१.१२.

---

## अध्याय १३ वा.

[ १. कृष्णाचा युधिष्ठिराला उपदेश–पुढें चालू. ]

( १ ) **श्रीकृष्ण :—**युधिष्ठिरा, केवळ बाह्य वस्तूंचा त्याग केला म्हणजे सिद्धि मिळते असें नाहीं. पण शरीरोद्भव अशा वासनादिकांच्या त्यागानेंहि ती मिळतेच असेंहि नाहीं. बाह्य वस्तूंचा त्याग करून आंतर विषयांचा अभिलाष धरल्यानें जो धर्म घडेल किंवा जें सुख मिळेल, तो धर्म शत्रूला घडो व तें सुखहि त्यालाच मिळो मम म्हणजे माझें हीं दोन अक्षरें मृत्युरूप असून न मम म्हणजे माझें नव्हे हीं तीन अक्षरें शाश्वत ब्रह्म म्हणजे मोक्षरूप होत. अशा रीतीनें शाश्वत ब्रह्म व मृत्यु हीं दोन्ही आपल्या जवळच असतात व अदृश्य रूपानें प्राणिमात्राच्या अंतःकरणांत युद्ध करतात. या जगाच्या आदिकारणाचा नाश होणें शक्य नसल्यामुळें प्राण्याच्या शरीराचा नाश केल्यानेंहि अहिंसाच निष्पन्न होते. युधिष्ठिरा, स्थावरजंगम पदार्थांसह ही सारी पृथ्वी कोणाला मिळाली आणि तिच्याविषयीं त्याला ममत्व मात्र नाहीं, तर तिचा त्याला काय उपयोग? उलट एखादा कोणी रानांत राहून फळांमुळांवरच जगत असला, तरी जर त्याच्या मनांत वस्तूंविषयीं ममता म्हणजे माझेपणा वागत असेल, तर तो मृत्यूच्या जबड्यांत आहे असेंच समजावें. म्हणून, युधिष्ठिरा, बाह्य आणि आंतर शत्रूंचें हें स्वरूप ओळखून ठेव. जो मनुष्य शाश्वत आदिकारणाचें स्वरूप ओळखतो व त्यावरील विकार ज्याला दिसत नाहींत तो महाभयाच्या म्हणजे मृत्यूच्या पलीकडे जातो. जो वासनांच्या अधीन असतो त्याला जगांत कोणी चांगला म्हणत नाहीं आणि वासनांवांचून कसली प्रवृत्तिहि होत नाहीं. सर्व वासना मनापासून उत्पन्न होतात, म्हणून ज्ञाता मनुष्य त्याला आवरून धरतो. वारंवार प्राप्त झालेल्या जन्मांत योगी पुरुष अभ्यासयोगाच्या साह्यानें आदितत्त्वाचा मार्ग शोधून काढितो आणि दान, वेदाध्ययन, तप, वेदांत सांगितलेलीं काम्य कर्में, व्रतें, यज्ञ,

नियम, ध्यानयोग, यांचें आचरण ज्ञानपूर्वक व निष्काम बुद्धीनें करतो. जें जें कांहीं सकाम असतें, तें धर्म नव्हे व जो धर्म म्हणतात त्याचें मूळ वासनांचें नियमन हेंच होय असें तो जाणतो. याविषयीं पूर्वीं कामानें स्वतः गाईलेल्या गाथा पुराणवेत्ते सांगत असतात, त्या मीं तुला सांगतों ऐक. काम म्हणतो, ' योग्य उपाय केल्याशिवाय कोणालाहि माझें नियंत्रण करतां येणार नाहीं. केवळ जपजाप्यांच्या बळावर माझ्यावर कोणी प्रहार करूं पाहील, तर त्या साधनांतच मीं अहंकाररूपानें प्रकट होईन. नाना यज्ञ करून व त्यांत पुष्कळ दक्षणा देऊन जो मला जिंकूं पहातो, त्याच्या मनांत मीं दंभरूपानें प्रादुर्भूत होतों, म्हणजे सर्वांमध्यें माझ्यासारखा धर्मात्मा कोणी नाहीं असें त्याला वाटतें व तो फसतो. वेद व त्यांतील ज्ञान यांनीं जो मला जखडूं पहातो, त्याला सर्व स्थावर वस्तूंमध्यें मींच अंतर्यामीरूपानें भरून राहिलों आहें असा अहंभाव वाटूं लागतो. जो कोणी धैर्य व सत्य यांच्या साह्यानें मला नष्ट करूं पहातो त्याला आपण धैर्यशाली व सत्यनिष्ठ आहों असा अभिमान वाटूं लागतो व त्यामुळें आपण अधिक बांधले जात आहों हें त्याला कळत नाहीं. तपाच्या बळावर जो व्रतनिष्ठ राहून मला वश करूं पहातो, त्याला त्या तपाचाच गर्व होतो व अशा रीतीनें पुनः तो माझ्या कह्यांत येतो. मोक्षमार्ग स्वीकारून जो ज्ञानाच्या बळावर मला जिंकूं पहातो, त्या मोक्षेच्छूच्या आवडीलाहि मीं नाचत नाचत हंसतों. तात्पर्य मीं एकटा असतांहि सर्व प्राण्यांना अवध्य आहें.'

युधिष्ठिरा, असा जो हा काम त्याची तूं धर्माकडे योजना करून विधिपूर्वक अश्वमेध कर व त्यांत विपुल दक्षिणा दे; तसेंच पुरेशी दक्षिणा देऊन इतरहि यज्ञ कर. मरण पावलेल्या बंधूंचा पुनः पुनः विचार करून व्यर्थ व्यथित होऊं नको. रणांत जे एकदां मृत्यु पावले, ते कांहींहि केलेंस तरी पुनः तुझ्या दृष्टीस पडणार नाहींत. तर आतां बहुत द्रव्य वेंचून व विपुल दक्षिणा देऊन तूं मोठे यज्ञ कर म्हणजे या लोकीं तुझी मोठी कीर्ति होईल व अंतीं तुला उत्तम गति प्राप्त होईल. १४. १. १३.

## अध्याय १४ वा.

[ १ युधिष्ठिराचा शोक नष्ट होऊन तो हस्तिनापुरांत येतो व राज्य करूं लागतो. ]

**वैशंपायन:**—राजा, याप्रमाणें त्या तपस्वी ऋषींनीं अनेक रीतीनें भाषणें करून बांधवांच्या वधामुळें खिन्न झालेल्या युधिष्ठिराचें सान्त्वन केलें. व्यास, कृष्ण, नारद, भीम, नकुल, सहदेव, अर्जुन, द्रौपदी, तसेच दुसरेहि श्रेष्ठ व शास्त्रज्ञ ब्राह्मण यांच्या उपदेशानें युधिष्ठिराची खिन्न वृत्ति व मनःसंताप नष्ट झाली. त्यानें देव ब्राह्मणांची पूजा केली व मृत बांधवांची उत्तरक्रिया केल्यावर तो धर्मात्मा प्राप्त झालेल्या राज्याचा शांत चित्तानें कारभार पाहूं लागला. तो एकदां व्यास, नारद आणि दुसरे ऋषि यांना म्हणाला, 'महाराज, आपल्या-सारख्या वृद्ध मुनिश्रेष्ठांनीं मला सदुपदेश केल्यामुळें माझ्या मनांत आतां अगदीं मुळींच शोकाचा अंश राहिला नाहीं, आणि द्रव्यहि भरपूर मिळालें आहे. तेव्हां आतां मीं यज्ञांनीं देवतांना संतुष्ट करणार आहें. तुम्हाला पुढें करूनच मी यज्ञ करतों. व्यासमुने, आपल्या संरक्षणाखालीं आम्हीं हिमालयावर जाऊं. तो प्रदेश फार आश्चर्यमय आहे असें सांगतात. नारदानें व भगवान् कृष्णानें त्याविषयींच्या पुष्कळ विचित्र गोष्टी आम्हाला सांगितल्या आहेत. खरोखर भाग्यवंतावांचून असले गुरु व सज्जन मित्र कोणालाहि संकटकालीं प्राप्त होणें दुर्घटच आहे.' युधिष्ठिरानें त्यांना असें म्हटलें असतां ते सर्व ऋषि त्याचा तसाच कृष्ण व अर्जुन यांचा निरोप घेऊन तेथून निघून गेले. धर्मराज मात्र तेथेंच बसला. याप्रमाणें भीष्माच्या मृत्यूनंतर शुद्धिकार्य करण्यांत कांहीं काळ गेल्यावर युधिष्ठिरानें भीष्म, कर्ण, इत्यादि मृत कौरववीरांना उद्देशून ब्राह्मणांना महादानें दिलीं व धृतराष्ट्राला समागमें घेऊन इतरांसाठींहि पुष्कळ धन दिलें. नंतर तो धृतराष्ट्राला पुढें करून हस्तिनापुरांत प्रविष्ट झाला व तेथें त्या अंधळ्या चुलत्याला सांत्वनपर फार गोष्टी सांगितल्यावर तो बंधूंसह राज्याचा कारभार पाहूं लागला. १४. १. १४.

---

## अध्याय १५ वा.

[ १ श्रीकृष्ण द्वारकेस जाण्यासाठीं अर्जुनाची अनुज्ञा मागतो. ]

( १ ) जनमेजय :—मुने, पांडवांना विजय मिळून राज्यांत सर्वत्र शांतता झाल्यावर कृष्ण आणि अर्जुन यांनीं काय केलें बरें ?

वैशंपायन :—राजा, पांडवांना जय मिळाल्यावर आणि राष्ट्रांत सर्वत्र शांतता प्रस्थापित झाल्यावर कृष्ण आणि अर्जुन यांना स्वाभाविकच आनंद झाला, आणि स्वर्गांत जसे देवांचे राजे आनंदानें विहार करतात तसे तेहि चित्रविचित्र वृक्षांनीं भरलेल्या वनांत व सुंदर शिखरांच्या पर्वतांवर विहार करूं लागले. पवित्र जलस्थानें, तळीं, नद्या, यांच्या कांठीं ते फिरत व तसें करतांना नंदनवनांत जसे अश्विन तसे ते उल्लासयुक्त दिसत; ते महात्मे इन्द्रप्रस्थांतील रमणीय सभागृहांत जाऊन क्रीडा करीत आणि पूर्वी सहन केलेले क्लेश आणि होऊन गेलेल्या युद्धांच्या अद्भुत गोष्टी नित्य एकमेकांना सांगत. ते दोघे पुराण ऋषि व देवता यांचीं चरित्रेंहि हर्षानें गात आणि गोड गोड व चमत्काराच्या गोष्टी बोलत. ज्ञानी कृष्ण तर अर्जुनाला शेकडों गोष्टी सांगून त्याचा पुत्रशोक व ज्ञातिवधाचें दुःख शांत करण्यास झटे. तो योग्य मार्गानें त्याचें सान्त्वन करून व आपल्या शिरावरील भार हलका करून विश्रांति घेई. एक दिवस अशा गोष्टी झाल्यावर कृष्णानें गोड शब्दांनीं अर्जुनाचें समाधान केलें आणि मोठ्या खुबीनें त्याच्यापाशीं द्वारकेस जाण्याची गोष्ट काढिली. तो म्हणाला, ‘अर्जुना, तुझ्या बाहुबलावर अवलंबून धर्मराजानें पृथ्वीचें राज्य मिळविलें व आतां तो भीम, नकुल व सहदेव यांच्या अनुमतीनें त्या निष्कंटक राज्याचा उपभोग घेत आहे. हें राज्य त्यानें योग्य मार्गानें मिळविलें असून त्याच मार्गानें दुर्योधनाचा रणांत वधहि झाला. अधर्माची आवड असलेले, लोभी, अप्रिय भाषणी असे धृतराष्ट्राचे दुष्ट पुत्र सपरिवार नष्ट झाले. त्यामुळें आणि तूं संरक्षक असल्यामुळें धर्मराज युधिष्ठिर कुरुराज्याचा शांतपणें उपभोग घेत आहे. तसाच मींहि तुझ्यासह अरण्यांतसुद्धां आनंदानें विहार करीत आहें; मग जेथें धर्म, भीम, नकुल सहदेव, पृथा व तूं इतकीं जणें आहां तेथें माझ्या आनंदाला किती भरती येत असेल बरें ? पण आतां स्वर्गासारख्या रमणीय उद्यानांत तुझ्यासह विहार करीत माझा बराच काळ गेला. इतक्या काळांत वसुदेव, बलराम आणि दुसरी मोठमोठी यादव मंडळी यांचें मला दर्शन घडलें नाहीं. म्हणून द्वारकेला जाऊन

ांना भेटावें असें मला वाटूं लागलें आहे. अर्जुना, तरी ही माझी कल्पना तुला
चेलच असें मला वाटतें. आपण व भीष्म यांनीं धर्मराज युधिष्ठिराला अनेक
कारें उपदेश करून त्याचें दुःख हलकें केलें आहे. तो स्वतः शास्ता असतांहि
ाला शास्त्र सांगणें आपल्याला अवश्य झालें, व त्या महात्म्यानें तें आपलें म्हणणें
ोकळेपणें स्वीकारलेंहि. कृतज्ञ, सत्यवादी व धर्मज्ञ असा धर्मराज आतां
ारभार करीत असल्यामुळें राज्यांत सत्य, धर्म, सद्बुद्धि व उत्कर्ष यांना स्थैर्य
मळालें आहे. तरी तुला योग्य वाटल्यास माझ्या द्वारकेस जाण्यासंबंधानें तूं आतां
ाच्याशीं गोष्ट काढ. मीं स्वतः प्राण गेला तरी त्याला न आवडणारी गोष्ट करणार
ाहीं, मग द्वारकेस जाण्याच्या प्रश्नाचें तें काय ? पण तुला मीं हें सारें सांगितलें
तुझ्यावरील प्रेमामुळेंच होय. अर्जुना, मीं तुला खरोखर सांगतों, आतां मला येथें
ाण्याचें कारण उरलेलें नाहीं. धृतराष्ट्राच्या पुत्रांचा सर्व सैन्यासह व अनुयायांसह
:पात झाला, सर्व राज्य निष्कंटक होऊन तुमच्या हातीं आलें, व नाना उत्तमोत्तम
स्तूंनीं तें समृद्धहि झालें. आतां त्यानें सुखानें व धर्मानें राज्य चालवावें आणि
ारणांच्या स्तुतिगानाचा स्वीकार करीत महात्म्या सिद्धांचे अशीर्वाद घ्यावे.
ा, अर्जुना, तूं आज माझ्यासह युधिष्ठिराकडे चल व मला द्वारकेला जाण्यासाठीं
ाची अनुज्ञा मिळव. अर्जुना, हें माझें शरीर, आणि माझ्या घरांत जें कांहीं
्य आहे तें सारें युधिष्ठिराला अर्पण केलेलें आहे. मला तो अत्यंत आवडता
सन्मान्य आहे. आतां माझ्या येथें रहाण्याचें तसें विशेष कांहीं कारण राहिलें
ाहीं. सारें राज्य तुमच्या आज्ञेंत सुरळीतपणें वागत आहे.' कृष्णानें या प्रमाणें
र्जुनाला समजावून सांगितलें, तेव्हां अर्जुनाला त्याच्या विरहाचें फार दुःख वाटूं
ागलें, तथापि त्याचा मान राखण्यासाठीं त्यानें मोठ्या कष्टानें 'ठीक आहे'
सें कृष्णाला उत्तर दिलें. १४. १. १५.

---

# अनुगीतापर्व

## अध्याय १६ वा

[ १. पूर्वी गीतारूपानें केलेला उपदेश पुनः करण्याची अर्जुनाची कृष्णाला
ांति ]

(१) **जनमेजयः**—मुने, सर्व शत्रूंचा निःपात झाल्यावर कृष्ण अर्जुना-
ह हस्तिनापुरीं रहात असतां दोघांनीं कोणकोणत्या विषयांवर संभाषण केलें ?

**वैशंपायन**:—राजा, राज्यप्राप्ति होऊन सुस्थिर झाल्यावर अर्जुन कृष्णासह हस्तिनापुरांतील दिव्य सभागृहांत आनंदानें विहार करी हें मीं पूर्वीं सांगितलेंच. एकदां असें झालें कीं, स्वर्गासमान असलेल्या त्या राजवाड्यांत कृष्ण व अर्जुन हे आपल्या सेवकांसह एका ठिकाणीं आनंदानें बसले असतां, तें रम्य ठिकाण पाहून अर्जुनाला मागील स्मरण झालें आणि तो कृष्णाला म्हणाला, 'कृष्णा, युद्धाला आरंभ होण्यापूर्वीं तूं जें आपलें ईश्वरस्वरूप मला दाखविलें, त्यामुळें तुझें माहात्म्य माझ्या लक्षांत आलेंच आहे. पण जें कांहीं तूं मला त्यावेळीं मित्रत्वानें सांगितलें, तें सगळेंच कांहीं माझ्या लक्षांत राहिलेलें दिसत नाहीं. तें सारें निघून गेलें. मला तर तो विषय पुनः पुनः ऐकण्याची मोठी इच्छा आहे, आणि तूं म्हणतोस लवकरच द्वारकेस जावयाचें म्हणून.' अर्जुनाचें हें बोलणें ऐकून कृष्णानें अर्जुनाला मिठी मारिली आणि त्याला सांगितलें, 'अर्जुना' तुला मीं सारें रहस्य ऐकविलें आणि सनातन धर्माचें स्वरूपहि सांगून शाश्वत अशा सर्व लोकांचेंहि ज्ञान दिलें. बुद्धिदौर्बल्यामुळें तूं त्याचें योग्य ग्रहण केलें नाहींस याचें मला फार वाईट वाटतें, पण माझीहि ती स्मृति आज पुनः तशी जागृत होत नाहीं. अर्जुना, तूं एकतर श्रद्धाहीन असावास नाहींतर अल्पबुद्धि तरी असावास. पण कांहीं असलें तरी पूर्वीं मीं जें तुला सांगितलें तें संपूर्ण पुनः सांगणें मला शक्य नाहीं. ब्रह्मपदाचें ज्ञान करून देण्यास धर्म पुरेसा नाहीं, तसें मला पुनः तें सर्व सांगतां येणार नाहीं. त्यावेळीं मीं योग-युक्त होतों, म्हणून मीं ब्रह्मस्वरूप सांगितलें; तथापि आतां त्याच आशयाचा प्राचीन इतिहास सांगतों, म्हणजे तें ध्यानांत धरून तुला उत्तम गति मिळवितां येईल. तरी मीं आतां सांगतों तें सर्व लक्ष्यपूर्वक ऐक. एकदां असें झालें कीं स्वर्गांतून व ब्रह्मलोकाहून एक मोठा तेजस्वी ब्राह्मण आमच्याकडे आला. आम्हीं त्याची पूजा केली. नंतर आम्हीं त्याला कांहीं प्रश्न केले, त्यांचीं जीं उत्तरें त्यानें दिलीं, तीं, हे अर्जुना, तूं दुसरा कसलाहि विचार न करतां दिव्य रीतीनें ऐक.

**ब्राह्मण**—कृष्णा, मोक्षधर्मासंबंधानें तूं जो प्रश्न विचारिला, तो प्राणिमात्रां-वरील तुझ्या कृपेला योग्य असून सर्व मोहाचें निरसन करणारा आहे. त्याचें उत्तर मीं आतां यथास्थित देतों, तें सावधानपणें ऐकून घे. एक काश्यपगोत्री ब्राह्मण तपस्वी व मोठा धर्मवेत्ता होता. त्याची दुसऱ्या एका शास्त्ररहस्य जाण-णाऱ्या ब्राह्मणाशीं गांठ पडली. त्याला जन्ममृत्यूविषयीं ग्रंथोक्त तसेंच योग-

मार्गानें झालेलें प्रत्यक्ष ज्ञान होतें. त्याला लोकव्यवहाराचा अर्थ उत्तम कळत असून सुखदुःखांचें रहस्य समजलें होतें. तसेंच जन्ममृत्यूचें तत्त्व तो जाणत असून पापपुण्य पहाणारा व बऱ्या वाईट कर्मांमुळें मनुष्यांना कशी गति मिळते हेंहि समजणारा तो होता. तो जितेंद्रिय सिद्ध पुरुष शांतपणें सर्वत्र फिरत असून ब्राह्मीलक्ष्मीनें झळकत होता. त्याला गुप्त होण्याची विद्या माहीत असून तो इतर गुप्त रूपानें फिरणाऱ्या चक्रधरांसह जात असे. तो केव्हां एकान्तीं त्या चक्रधरांशीं बोलत बसे, तर केव्हां स्वेच्छेनें वाऱ्यासारखा एकटाच फिरत असे. त्याची गांठ पडतांच त्याचा तो विलक्षण प्रकार पाहून त्या बुद्धिमान् काश्यपानें त्याचें पाय धरिले आणि त्याला गुरु समजून त्याची सेवा करीत तो त्याला संतुष्ट करूं लागला. त्याच्या सेवेनें तो सिद्ध कांहीं काळानें संतुष्ट होऊन काश्यपाला म्हणाला, 'काश्यपा, अनेक प्रकारच्या शुभ कर्मांनीं व पुण्यांच्या योगानें मनुष्यांना उत्तम गति व देवलोकीं वास हीं प्राप्त होतात. पण त्यांनीं आत्यंतिक सुख व शाश्वतस्थिति कधीं मिळत नाहीं. मोठ्या कष्टानें मिळालेल्या उच्चस्थानापासून प्राणी पुनः भ्रष्ट होतोच. मला पापामुळें वाईट व कष्टदायक गति मला मिळाली होती. काम, क्रोध, लोभ व मोह यांना बळी पडल्यामुळें मला वारंवार मरण व जन्म प्राप्त झालीं, नानाप्रकारचे आहार करावे लागले, व अनेक जातीच्या मातांचें स्तनपानहि मीं केलें. अनेक प्रकारचीं मातापितरें अद्भुत सुखें व भयंकर दुःखेंहि मीं सोसलीं. आवडत्यापासून ताटातूट व नावडत्यांशीं संगति मला सोसावी लागली; अतिशय कष्टानें मिळविलेल्या द्रव्याचा नाश झालेला मीं पाहिला, राजे व आप्त यांनीं केलेले अपमान साहिले; अत्यंत भयंकर अशा शारीरिक व मानसिक यातना मला झाल्या; मानहानि, बंधन, नरकवास, यमलोकींच्या यातना याहि मीं अनुभविल्या आणि वृद्धावस्था, रोग व अनेक संकटें भोगिलीं. मग एकदां वैराग्य उत्पन्न होऊन मीं निराकार परब्रह्माचा आश्रय केला व लोकव्यवहार सोडून दुःखानें गांजल्यामुळें सारे अनुभव घेतल्यावर शेवटीं या मार्गाचा अवलंब केला. त्यामुळें परमात्म्याच्या कृपेनें ही सिद्धि मला प्राप्त झाली. या जगांत मीं आतां पुनः येणार नाहीं. मोक्षसिद्धि मिळेपर्यंत मी स्वतःला पुष्कळ शुभ गति मिळवीत मी या लोकांच्या घडामोडी केवळ पहात रहाणार व एकापुढें एक गति चढत शेवटीं अव्यक्त अशा ब्रह्मपदाला जाऊन पोंचणार, यांत शंका नाहीं. मी येथें परत येणार नाहीं. ब्राह्मणा, तूं फार बुद्धिमान् आहेस, व मीं तुझ्यावर संतुष्ट झालों आहें, तरी तुला प्रिय

वाटणारी कोणती गोष्ट मीं करूं तें सांग. ज्या कसली इच्छा करून तूं मजकडे आलास त्याच्या प्राप्तीची वेळ आतां आली आहे. तुला काय पाहिजे हें मीं जाणतों. पण मीं लवकरच जाणार असल्यामुळें तुला सुचवीत आहें. तुझ्या उत्तम वर्तनानें मीं संतुष्ट झालों आहें. काय विचारावयाचें तें खुशाल विचार, तें मी तुला सांगतों. तुझ्या बुद्धीविषयीं मला फार आदर वाटत आहे. तूं मला ओळखिलेंस, यावरून, काश्यपा, तूं मोठा बुद्धिमान् आहेस, यांत शंका नाहीं. १४.१.१६.

---

## अध्याय १७ वा.

[ १. काश्यप ब्राह्मणाला सिद्धाचा उपदेश ]

( १ ) श्रीकृष्ण :—अर्जुना, सिद्धाचें भाषण ऐकून त्या धर्मिष्ठ काश्यपानें त्याचे पाय धरून त्याला सर्व धर्मांविषयीं प्रश्न केले व सिद्धानें त्यांचीं उत्तरें दिलीं.

काश्यप :—शरीराचा नाश कसा होतो व तें उत्पन्न कसें होतें ? या कष्टमय संसारापासून सुटका कशी होते ? आत्मा प्रकृतीला सोडून शरीराचा त्याग करतो. पण मग तो शरीरमुक्त झाल्यावर दुसऱ्या शरीरांत कसा जातो. मनुष्याला शुभाशुभ कर्मांचें फल कसें भोगावयास मिळतें व तो विदेही झाला असतां त्याचें कर्म कोठें रहातें ?

ब्राह्मण श्रीकृष्णाला सांगतो, कृष्णा, याप्रमाणें काश्यपानें सिद्धाला प्रश्न विचारिले असतां सिद्धानें जें सांगितलें तें मीं तुला क्रमानें सांगतों ऐक.

सिद्ध म्हणाला, 'आयुष्यवर्धक व कीर्तिप्रद अशीं जीं कर्में प्राणी एखादें शरीर धारण करून करतो, त्या कर्मांचें फळ क्षीण झालें म्हणजे तो आयुष्याचा क्षय करणारीं उलटीं कर्में करूं लागतो. त्याच्या विनाशाची वेळ आली असतां त्याची बुद्धि उलट होते. तो आपलें मानसिक सामर्थ्य, शारीरिक बल व काळ जाणत असतांहि केवळ देहाच्या नादीं लागून फार खातो व कष्टदायक आणि अयोग्य अशीं कर्में करतो. तेव्हां तो एखाद्यावेळीं अति खातो किंवा एखाद्यावेळीं अगदींच खात नाहीं. दुष्ट अन्न, मांस, घाणेरडें पेय, एकमेकांना घातक असे पदार्थ तो खातो, आणि खाल्लेलें अन्न पचलें नसतांहि त्यावर आणखी खातो. केव्हां तो अति श्रम करतो तर कधीं विषयोपभोगाचा अतिरेक करतो, आणि

केव्हां केव्हां कांहीं कार्याच्या नादांत गढून मूत्रपुरीषादि वेग आवरून धरितो. रसयुक्त अन्न तो प्रमाणाबाहेर खातो व दिवसा झोंप घेतो. तसेंच तो अपक्व असलेल्या दोषांचा भलत्याच वेळीं प्रकोप करतो. अशा अपक्व दोषादिकांचा भलत्याच वेळीं प्रकोप केल्यानें रोग होऊन शरीराचा अंत होतो, किंवा मनुष्य स्वतःच कंटाळून फांस लावून किंवा दुसऱ्या कांहीं विपरीत साधनानें शरीरपात करून घेतो. अशा रीतीनें मनुष्याच्या शरीराचा नाश होतो.

आतां जीवित ज्याला म्हणतात तें काय आहे तें सांगतों. शरीरांत ऊष्म्याचा प्रकोप होऊन तीव्र वायूच्या योगानें त्याला प्रेरणा मिळाली कीं तो सर्व शरीरभर फिरून ऐकेका अवयवाला रोखून धरतो. तो बलवान् होऊन अतिशय प्रकुप्त झाला म्हणजे ज्यांच्या योगानें शरीराची योग्य हालचाल होते तीं मर्मस्थानें तो फोडून टाकितो. त्यामुळें तात्काळ जीवाला वेदना होऊन तो शरीरापासून च्युत होतो. मर्मस्थानें तुटूं लागलीं म्हणजे वेदनांनीं विव्हळ होऊन जीव शरीर सोडून जातो. अशा रीतीनें जन्म आणि मरण यांमुळें सर्व जीव उद्विग्न होऊन जातात व शरीराचा त्याग करतांना आढळतात. नवीन गर्भांत प्रवेश करतांनाहि मर्मस्थानांचा विस्तार होत असल्यामुळें जीवाला पुनः तशाच वेदना सहन कराव्या लागतात. तेथें सांधे मोडल्यामुळें पाण्यापासून त्याला फार क्लेश होतात. पंचमहाभूतांचा संघ मोडून टाकतांना थंडीनें प्रकुप्त झालेला शरीरांतील वायु, प्राण व अपान यांत भरून वर चढत शेवटीं वेदनामय झालेल्या शरीराला सोडून जातो. अशा रीतीनें वायु शरीर सोडून गेल्यावर त्याचा श्वास बंद होतो व उष्णता, श्वास, तेज, चेतना व ब्रह्माचा अंश असा जीव, हीं शरीरांतून निघून गेलीं म्हणजे मनुष्य मृत झाला असें म्हणतात. शरीरधारण करणारा जीव ज्या इंद्रियांच्या योगानें विषयांचें ज्ञान करून घेतो, तीं इंद्रियें आतां त्या कामीं निरोपयोगी होतात. आहारापासून प्राप्त होणारी प्राणशक्ति शरीरांत जो निर्माण करतो, त्यालाच जीव म्हणतात. तो अविनाशी आहे. त्या प्राणशक्तीशीं ज्याचा संयोग घडतो त्याला शास्त्रांत मर्म म्हणतात. तीं मर्मस्थानें फुटलीं म्हणजे ती प्राणशक्ति वर वर जात प्राण्याच्या हृदयांत शिरते आणि त्याचें बल रोखून धरिते. त्यावेळीं शरीर सचेतन असलें तरी त्यांतील जीवाला कांहीं कळत नाहींसें होतें. तमानें ज्ञान झाकून जातें व मर्मस्थानेंहि झांकलीं गेल्यामुळें जीवाला कांहीं आधार नाहींसा होतो व त्यामुळें तो वायूबरोबर हेलकावे खातो. शेवटीं एक मोठा थोरला श्वास टाकून बाहेर पडतांना तें अचेतन होत असलेलें

शरीर एकदां तो कांपवितो. असा शरीरांतून निघून गेलेला जीव आपल्या बऱ्यावाईट कर्मफलांनीं युक्त होतो. हा सारा प्रकार म्हणजे त्या जीवाचीं कर्मफलें चांगलीं आहेत कीं वाईट आहेत ही गोष्ट त्याच्या लक्षणांवरून ज्ञानसंपन्न व वेदार्थ निश्चितपणें जाणणाऱ्या ब्राह्मणांना दिसत असते. अंधकारांत लुकलुकणारा काजवा जसा डोळसांना दिसतो, तसा सिद्ध ज्ञानी पुरुषांना दिव्य दृष्टीच्या योगानें शरीरांतून बाहेर पडणारा जीव कर्मफलांनीं युक्त होऊन दुसऱ्या योनींत कसा जातो व तेथें जन्म कसा घेतो हें दिसतें. अशा शरीरांतून गेलेल्या जीवाचीं शास्त्रांत सांगितलेलीं तीन ठिकाणें असतात. पहिलें ठिकाण म्हणजे जिला कर्मभूमी म्हणतात ती ही पृथ्वी. प्राणी येथें रहातात व बरीं वाईट कर्मं करून तदनुसार इतर नाना योनि प्राप्त करून घेतात. येथें अशुभ कर्मं केल्यानें ते नरकास जातात. ती अधोगति असून कष्टप्रद असते, तेथें मनुष्यांना पीडा होते व तेथून सुटणें फार कठीण जातें. यासाठीं त्यापासून जीवाचें नेटानें रक्षण करणें अवश्य आहे. तिसरें स्थान म्हणजे वरचें. तिकडे गेल्यावर मनुष्याला कोणकोणतीं ठिकाणें मिळतात, तीं नीट ऐकून लक्षांत ठेव; म्हणजे बुद्धि स्थिर होऊन काय करावें हें तुला निश्चयानें समजेल. सर्व तारका, तसेंच चंद्रमंडळ, तसेंच स्वयंप्रकाशित सूर्यमंडळ हीं ज्या ठिकाणीं झळकत आहेत तें पुण्यकर्म करणारांचें ठिकाण होय. तेथें गेल्यावर पुण्यकर्माचें फल भोगून संपलें म्हणजे मनुष्य पुनः खालीं मर्त्यलोकीं येतो. त्या स्वर्गांतहि उच्च, मध्यम व कनिष्ठ असा भेद आहेच. एकाहून एक तेजस्वी वैभव पाहून तेथेंहि खालच्या खालच्या जीवांना असंतोष वाटतोच. अशा या जीवाला मिळणाऱ्या गति असून त्या पृथक्पणें मीं तुला सांगितल्या. हे ब्राह्मणा, आतां जीवाची गर्भांत असतांना काय स्थिति असते ती सांगतों, ती लक्ष देऊन ऐकून घे. १४. १. १७.

---

## अध्याय १८ वा.

[ १. सिद्धाचा काश्यपाला उपदेश. ]

( १ ) सिद्ध—ब्राह्मणा, कर्मं शुभ असोत वा अशुभ असोत, त्यांचा नाश कधीं होत नाहीं. प्राणी निरनिराळ्या देहांत गेला तरी तेथें तीं फल देतातच. ज्याप्रमाणें वृक्षाला मोहोर आला कीं तो पुष्कळ फळें देतो, त्याप्रमाणें शुद्धमनानें केलेल्या कर्माचें फळ विपुल मिळतें. उलट पापी मनानें केलेल्या

कर्माचें वाईट फळहि मोठें मिळतें, कारण मनाला पुढें करूनच आत्मा कर्मास प्रवृत्त होतो. आतां, आपल्या कर्माची फळें व कामक्रोधादि वासना घेऊन जीव दुसऱ्या योनींत जाण्यासाठीं गर्भांत कसा प्रवेश करतो तें ऐक. स्त्रीच्या गर्भाशयांत जाऊन शुक्रधातु शोणितांत मिसळला म्हणजे शुभ वा अशुभ कर्मानुसार जीवाचें क्षेत्र सिद्ध होतें. जीव वस्तुतः अत्यंत सूक्ष्म व अव्यक्त असल्यामुळें वस्तुतः तो कधीं दूषित होत नाहीं, म्हणूनच तो शाश्वत ब्रह्मस्वरूपी आहे असें म्हणतात. तथापि बीजभूत अशा त्या गर्भांतील क्षेत्रांत तो शिरतो. ब्रह्म हेंच सर्व प्राण्यांचें बीज होय. त्यामुळेंच प्राणी जगतात. जीव गर्भस्थ बीजशरीराच्या सर्व भागांत शिरून त्याला मनानें धारण करतो व इंद्रियांच्या ठिकाणींहि रहातो. त्यामुळें गर्भांत चैतन्य खेळूं लागून त्यांत हालचाल उत्पन्न होते. जसा सोन्याचा थोडासा रस तांब्याच्या सगळ्या गोळ्याला मुलामा करावयास पुरतो, तसा अल्पप्रमाण जीवहि साऱ्या शरीरांत चैतन्य उत्पन्न करतो. अग्नि जसा लोखंडाच्या गोळ्यांत शिरून त्याला तापवितो, तसाच गर्भाला जीव चेतवितो. दिवा लावला असतां जसा त्याचा प्रकाश सर्व घरांत पडतो, त्याप्रमाणें जीवाचें चैतन्य साऱ्या शरीराला चेतना देतें. मग पूर्वीच्या जन्मीं जें कांहीं बरें अथवा वाईट कर्म केलें असेल, तें जीवाच्या उपभोगास येऊं लागतें. तें कर्मफल संपून गेलें म्हणजे पुनः दुसरें फळ जमून येतें व असा प्रकार जीवाला मोक्षधर्माचें ज्ञान होईपर्यंत चालतो. आतां या कर्मांत ज्याच्या योगानें प्राणी सुखी होतो, तें कोणतें, तसेंच ज्याच्या योगानें अनेक प्रकारचे जन्म प्राप्त होतात ते कोणतें, तें सांगतों. दान, व्रत, विधियुक्त ब्रह्मचर्य, वेदाध्ययन, इंद्रियदमन, शांति, भूतदया, मनाचें एकाग्र्य, मऊपणा, परद्रव्यवर्जन, प्राण्यांना मनानेंहि दुःख न देणें, मातापित्यांची सेवा, देव व अतिथि यांचें पूजन, गुरुपूजा, दया, शुद्धि, इंद्रियसंयमन, व चांगली वर्तणूक या गोष्टींना सज्जनांचा आचार म्हणतात. या आचारापासून धर्म उत्पन्न होतो व तोच नित्य प्रजांचें रक्षण करतो. असा आचार सज्जनांत नित्य आढळून येतो व त्यांच्यांतच त्याचें स्थैर्य असतें. शांत वृत्तीचे लोक ज्या आचारांत स्थिरपणें असतात त्याला धर्म असें नांव आहे. ते जें कर्म करितात तोच सनातन धर्म होय. त्याला अनुसरून वागणाऱ्याला दुर्गति कधीं मिळत नाहीं. म्हणून मनुष्य धर्ममार्गापासून भ्रष्ट होऊं लागल्यास त्याचें निवारण करावें लागतें. पण जो योगी असतो तो या सर्वांपासून मुक्त असल्यामुळें सर्वांहून तो श्रेष्ठ होय. जे या धर्मानें वागतात, ते ज्या प्रमाणांत शुभ कर्में

करितील, त्या प्रमाणांत कमीअधिक काळानें ते संसार तरून जातात. याप्रमाणें पूर्वजन्मीं केलेलें कर्म प्राण्याला या जन्मीं फळास येतेंच. शुद्ध असलेला आत्मा जीवरूपानें विकृत होऊन उपाधियुक्त होण्याचेंहि हेंच कारण; पण त्या जीवाला प्रथम शरीर कसें प्राप्त झालें असा कोणाला प्रश्न पडेल, तर त्याचें उत्तर आतां सांगतों.

सर्वांचा निर्माता जो ब्रह्मदेव त्यानें प्रथम आपलें शरीर करून मग स्थावर-जंगमात्मक सारें त्रिभुवन उत्पन्न केलें. आधीं त्यानें सर्व प्राण्यांचें मूळ स्वरूप जी प्रकृति ती प्रधानरूपानें उत्पन्न केली. तिनें सर्व व्यापिलें असून तिला जगांत सर्वश्रेष्ठ समजतात. तिला क्षर असेंहि म्हणत असून तिच्या पलीकडचें जें अमृत तत्त्व तें अक्षर होय. प्रत्येक जीवाला अक्षर व क्षर ही जोडी पृथक्पणें देऊन प्रजापतीनें प्राणी व स्थावर पदार्थ निर्माण केले, अशी परंपरागत श्रुति आहे. प्रजापतीनें त्या जीवांचा कालहि प्रमाणबद्ध करून त्यांना अनेक योनींत फिरण्याचा क्रमहि लावून दिला. त्यामुळें या जगांत एखादा बुद्धिवान् पुरुष मागील जन्मांत पाहिलेल्या गोष्टी सांगतो. ब्राह्मणा, मींहि मागील जन्म स्मरत असल्यामुळें सर्व यथास्थित सांगूं शकतों. सुखदुःख हीं टिकाऊ नाहींत; शरीर हें अपवित्र वस्तूंचा गोळा असून त्याचा नाश कर्माबरोबर होतो; जें सुख म्हणून वाटतें तें दुःखच खरोखर होय असें ज्याला समजतें तो हा संसाररूपी अफाट सागर तरून जातो. जन्ममरण व रोग यांनीं व्यापिलें असतांहि जो प्रकृतीचें स्वरूप ओळखून सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं एकच चैतन्य खेळत आहे असें जाणतो, तो वैराग्ययुक्त होऊन मोक्षमार्ग धुंडूं लागतो. तो मोक्षमार्ग काय आहे, त्या शाश्वत अक्षय्य अशा ज्ञानाचें स्वरूप काय आहे हें आतां सांगतों. १४. १. १८.

---

## अध्याय १९ वा.

[ १ सिद्धाचा काश्यपाला ज्ञान व योग यांचा उपदेश ]

( १ ) **सिद्ध :**—ब्राह्मणा, सर्वांचें आदिकारण जें ब्रह्म त्यांत लीन होऊन जो दुसरा कांहीं विकार न करतां त्याचेंच ध्यान करीत रहातो, तो स्थूल सूक्ष्मादि शरीरांतील एक एक क्रमानें सोडीत शेवटीं शरीरबंधांतून पूर्णपणें मुक्त होतो. सर्वांशीं मित्रत्वानें वागणारा, सर्व सहन करणारा, शांतिमग्न, जितेंद्रिय असा आत्मज्ञानी पुरुष भय व दैन्य हीं टाकून मोकळा होतो, जो शुद्ध अंतःकरणानें

सर्व भूतांशीं आत्मीय भावनेनें वागतो, तो निरभिमानी व निरहंकारी पुरुष सर्वथा मुक्त समजावा. जगणें किंवा मरणें, सुख किंवा दुःख, लाभ किंवा हानि, प्रिय किंवा अप्रिय या द्वंद्वांवर जो समदृष्टि ठेवतो, तो मुक्तच होय. जो कोणाशीं स्पर्धा करीत नाहीं, कोणाची अवहेलना करीत नाहीं, कशावर आसक्ति ठेवीत नाहीं व द्वंद्वाचा अभिमान धरीत नाहीं, तो सर्वस्वी मुक्तच आहे. जो कोणाचा मित्र नाहीं व शत्रुहि नाहीं, जो कोणाला बंधु म्हणत नाहीं किंवा अपत्य म्हणत नाहीं, धर्म, अर्थ व काम हे ज्यानें सोडले आहेत असा निरिच्छ पुरुष मुक्तच आहे. धर्म व अधर्म यांच्या पलीकडे गेलेला असून ज्यानें प्रारब्धकर्मांचा क्षय केला आहे व शरीरघटना करणाऱ्या पंचमहाभूतांचाच विनाश केल्यामुळें ज्याचें चित्त शांत झालें आहे असा द्वंद्वातीत पुरुष मुक्त झालेला असतो. कर्मत्यागी, निरिच्छ मनुष्य जन्ममृत्युवार्धक्य यांनीं युक्त जग हें आज आहे तर उद्यां नाहीं असें अशाश्वत मानतो. तो वैराग्यशील व आपले दोष काढून टाकण्याच्या प्रयत्नांत असल्यामुळें आत्म्याचें बंधन तो लवकरच तोडून टाकितो व आत्मा हा गंध, रस, स्पर्श, शब्द, रूप यांपासून अलिप्त, निरुपाधिक असून जाणण्यास अत्यंत कठीण आहे असें समजून आल्यामुळें मुक्त होतो. आत्म्याला पंचभूतांच्या गुणांचा संपर्क नसतो; तो अव्यक्त, स्वतःसिद्ध निर्गुण, पण गुणांचा भोक्ता, असा असतो हें ज्याला उमजलें तो पुरुष मुक्त होतो. बुद्धीच्या बलावर शारीरिक व मानसिक सर्व संकल्प सोडून तो जळण संपलेल्या अग्नीप्रमाणें हळुहळू विझून जातो. सर्व वासनांपासून मोकळा होऊन निर्द्वंद्व व उपाधिरहित असा जो इंद्रियसमूहांत अनासक्तीनें फिरत असतो, तो मुक्तच होय. सर्व वासनांपासून सुटका झाल्यामुळें त्याला शांतिमय, अचल, नित्य, अक्षर अशा सनातन ब्रह्माची प्राप्ति होते.

ब्राह्मणा, आतां तुला मीं अतिश्रेष्ठ अशा योगाची माहिती सांगतों. त्याच्या अभ्यासानें योगी स्वतः सिद्ध अशा आत्म्याचा साक्षात्कार करून घेतात. योगांतील चित्तवृत्तिनिग्रहादि द्वारांनीं चित्ताला नित्य आत्म्याकडे वळविलें म्हणजे आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो. ते चित्तनिग्रहाचे उपाय सांगतों तें नीट लक्षांत घे. प्रथम इंद्रियांना विषयांपासून परावृत्त करून मनाला स्वतःकडे खेंचावें व हें कडक तप कांहीं काळ आचरिलें म्हणजे मग मोक्षदायक योगाकडे वळावें. योग्यानें तपश्चर्यापूर्वक योगशास्त्राचा अभ्यास करून मनःसंयमनानें स्वतःमध्येंच आत्मस्वरूप पहाण्यास शिकावें. मनाचा आत्म्याशीं संयोग कर-

ण्याचें काम ज्याला चांगलें साधलें तो एकान्तप्रिय मनुष्य स्वतःमध्यें आत्मस्वरूप पाहूं शकतो. नित्य मनाचा आवर करून व इन्द्रियें स्वाधीन ठेवून योगाभ्यास केल्यास मनुष्याला स्वतःच्या बलानेंच आत्मस्वरूप पहातां येऊं लागतें. ज्याप्रमाणें मनुष्य स्वप्नांत पाहिलेला एखादा पदार्थ जागेपणीं दृष्टीस पडल्यास, हाच तो, म्हणून ओळखतो; त्याप्रमाणें योगी योग्य अभ्यासानें विश्वरूपी आत्म्याला ओळखूं शकतो. गवताच्या काडींतून जसा आंतील मगज काढून दाखवितात तसा योगी देहांतून आत्म्याला काढून पाहूं शकतो. शरीर म्हणजे गवताची काडी व मगज म्हणजे आत्मा समजावा. योगवेत्त्यांनीं हाच दृष्टान्त उत्तम म्हटला आहे. जेव्हां मनुष्य आत्मस्वरूप यथायुक्त पाहूं शकतो, तेव्हां त्रैलोक्याचा स्वामी म्हटलेला असा परमेश्वरहि त्याला कोणी नाहींसा होतो. त्याला नाना शरीरें इच्छेप्रमाणें धारण करतां येतात व वार्द्धक्य, मृत्यु यांपासून मुक्त झाल्यामुळें तो आनंद व शोक यांच्या पलीकडे जातो. स्वतःच्या अधीन रहाणारा योगीच देवांना देवपण देतो व अशाश्वत शरीर सोडून अव्यय असें ब्रह्मपद मिळवितो. सर्व प्राण्यांचा नाश होत असला तरी तो निर्भय असतो व सर्वांना क्लेश होत असले तरी त्याला कसलाहि क्लेश होत नाहीं. निरिच्छ व शांतचित्त योगी आसक्ति व प्रेम यांपासून होणाऱ्या भयंकर दुखःमय भावनांनीं कधीं मोह पावत नाहीं. त्याला शस्त्रें कापूं शकत नाहींत, मृत्यूची त्याला भीति नाहीं व त्याच्याहून सुखी जगांत कोणीच नसतें. तो योग्यप्रकारें योगसाधन करून आपल्याला स्वतःमध्येंच स्थिर करतो आणि वृद्धपणादि दुःखांपासून निवृत्त होऊन सुखानें योगनिद्रा अनुभवितो. मनुष्यशरीर सोडून तो देवादिकांचीं शरीरें इच्छेनुसार धारण करतो. सर्व योगवैभवाचा भोग घेत असतां योगानें केव्हांहि त्याचा कंटाळा करूं नये. योग्य योगसाधन करून जेव्हां तो आपल्या स्वतःला स्वतःमध्येंच पाहूं लागतो, तेव्हां इंद्राच्या वैभवाचाहि त्याला हेवा वाटेनासा होतो, असो.

एकान्तवासांत ध्यानयोग कसा साधावयाचा तें आतां ऐक. पूर्वीं ऐकिलेल्या वेदांतशास्त्राच्या उपदेशाचें मनन करून ज्या देहांत आपण आहों त्याच्याबाहेर मन जाऊं देऊं नये. नंतर मनाचें इतकें नियमन करतां येऊं लागल्यावर मूलाधारादि चक्रांपैकीं ज्यावर तें बसेल, तेथून त्याला चळूं देऊं नये. अशा चक्रावर मन स्थिर झालेलें दिसूं लागलें म्हणजे मग त्याला बाह्य विषय नाहींसारखाच होतो. मग सर्व इंद्रियांचें नियंत्रण करून निर्जन वनांत बसून शांतपणें ब्रह्मच

सर्वत्र भरलें आहे, असें चिंतन करावें. दांत, टाळू, जिव्हा, गळा, मान आणि हृदय यांवर क्रमानें मन स्थिर करीत शेवटीं हृदयाला बांधणाऱ्या नाड्यांचें चिंतन करावें.*

ब्राह्मण म्हणतो, कृष्णा, त्या बुद्धिमान् शिष्याला मीं एवढें सांगितलें असतां त्यानें तें समजून घेतलें आणि नंतर सांगण्यास अत्यंत कठीण अशा मोक्षधर्माविषयीं त्यानें प्रश्न केला. तो म्हणाला, 'गुरो, खाऊन खाऊन कोठ्यांत गेलेलें अन्न तेथें कसें पचतें, त्याचें रसांत व त्यांतून नंतर रक्तांत रूपान्तर कसें होतें, तसेंच पुढें त्याचें मांस, मेद, स्नायु, हाडें हीं कशीं बनतात, स्त्रीच्या गर्भांत प्राण्यांचीं शरीरें कशीं वाढतात, शरीर वाढत असतांना त्याचें बल कसें वाढतें, मूत्रपुरीषादि मल वेगवगळे कसे बाहेर पडतात, प्राणी श्वास आंत कसा घेतो व बाहेर कसा सोडतो, शरीरांत आत्मा कोणत्या ठिकाणीं रहातो, हालचाली करीत असतां जीव सूक्ष्म शरीराला कसें धरून ठेवितो, कोणत्या वर्णाच्या व कशा प्रकारच्या शरीरांत जीव नंतर प्रवेश करतो, या सर्व गोष्टी मला यथास्थित समजावून द्या.'

कृष्णा, शिष्यानें असे प्रश्न विचारिले असतां, मीं त्याला पूर्वीं ऐकिल्याप्रमाणें यथोचित उत्तरें दिलीं. मीं म्हटलें, 'आपल्या कोठारांत आपली भांडीं ठेविल्यावर जसें आपलें मन त्यांकडे लागून रहातें, तसें मन एकदां आपल्या शरीरांत खेंचून ठेविल्यानें व इंद्रियरूपी द्वारें घट्ट लावून ठेविल्यानें आत्म्याचा शोध आंतल्या आंत करतां येतो. या साधनांत मात्र चूक होऊं देऊं नये. याप्रमाणें संतुष्ट चित्तानें नित्य योग आचरीत गेल्यास लवकरच ब्रह्मप्राप्ति होते व तेणेंकरून प्रकृति व तिचे विकार यांचें सांगोपांग ज्ञान होतें. आत्मा हा डोळ्यांनीं दिसण्यासारखा किंवा दुसऱ्या इंन्द्रियांना ग्रहण करतां येण्यासारखा नाहीं, मनोरूपी दिव्याच्या साह्यानेंच तो पहातां येतो. त्याला सर्व बाजूंनीं हात पाय, सर्व बाजूंनीं

*दातांचें चिंतन आहारशुद्धीसाठीं. आहारशुद्धीनें अंतःकरण शुद्धि होऊन क्रमानें हृदयाचीं बंधनें सुटणें सोपें होतें. जीभ वर उचलून टाळूला लावून स्थिर केल्यानें व भुवयांच्या मध्यें दृष्टि स्थिर केल्यानें खेचरी मुद्रा सिद्ध होते. जिभेचा बुंधा व त्या खालील कंठाचा भाग यांवर मनाची धारणा केल्यानें भूक व तहान यांची बाधा नष्ट होते. या प्रमाणें या साधनांचा प्रत्यक्ष उपयोग दिसूं लागल्यामुळें योगावरील श्रद्धा स्थिर होऊन त्याचा मार्ग सुकर होत जातो.

डोळे, मस्तकें व मुखें व सर्व बाजूंनीं कान असून तो सारें विश्व व्यापून राहिला आहे. आत्म्याला शरीरापासून भिन्न असा जेव्हां जीव पहातो, तेव्हां तो त्या ब्रह्माच्या सगुण स्वरूपालाहि दूर सारून धारणेच्या जोरावर केवळ ब्रह्मस्वरूपच पहातो. याप्रमाणें प्रसन्न अंतःकरणानें तो आत्मदर्शन करूं लागला म्हणजे त्याच्या आश्रयानें तो मोक्षपदास जातो. ब्राह्मणा, असें हें योगाचें सारें रहस्य मीं तुला सांगितलें. आतां मला निरोप दे, मीं जातों; तूंहि आपल्या ठिकाणीं सुखानें जा.' कृष्णा, असें मीं त्या शिष्य ब्राह्मणाला सांगितलें व त्याप्रमाणें तो आपल्या इच्छेनुसार वाटलें तिकडे गेला.

कृष्णः—अर्जुना, मोक्षधर्माचा आश्रय केलेला तो ब्राह्मण मला असा वृत्तांत सांगून तेथेंच अदृश्य झाला. हा वृत्तांत तरी, अर्जुना, तूं एकाग्रमनानें ऐकिलास काय? पूर्वी तूं रथांत बसलेला असतांहि मीं तुला हेंच सांगितलें होतें. अर्जुना, हा विषय व्यग्र मनाला आकलतां येणें कठीण आहे. शुद्ध अंतःकरणानें व सांप्रदायिक पद्धतीनेंच त्याचें ज्ञान होणें शक्य आहे. हें उत्तम रहस्य देवांनाच सांगण्यांत आलें होतें; या लोकीं तें कोणा माणसाला ऐकावयास मिळालें नव्हतें. तुझ्या शिवाय अन्य माणसाला तें ऐकण्याची पात्रताहि नाहीं. व्यग्र अंतःकरणानें हें नीट समजणें शक्य नाहीं. देवलोक जो भरला आहे तो निष्क्रियांनीं नसून कर्मनिष्ठांनींच आहे व मर्त्यस्वरूपांत पुनः येणें हें देवांना तर आवडत नाहीं. म्हणजे मृत्युलोकीं येऊन कर्मत्याग केल्यावांचून मोक्ष मिळणें शक्य नसल्यामुळें देवांनाहि तो मिळत नाहीं, म्हणून ब्रह्मप्राप्ति ही सर्वांत श्रेष्ठ गति होय; तेथें देहापासून सुटका होऊन प्राणी सुखी होतो व अमृतत्वाला पोंचतो. या आत्मदर्शनरूप धर्माचें अनुष्ठान केल्यानें पापी योनींतील माणसें म्हणजे स्त्रिया, वैश्य आणि शूद्र यांनाहि उत्तम गति मिळते. मग स्वधर्माची आवड धरून ब्रह्मलोकाच्या नादीं लागलेल्या विद्वान ब्राह्मणांची व क्षत्रियांची गोष्ट काय विचारावी-हें ध्येय अगदीं निश्चितपणें ठरलेलें असून त्याच्या सिद्धीचे उपायहि ठरलेले आहेत. त्याची सिद्धि, फल, मोक्ष व दुःखाचा शेवट याहि गोष्टींचा विचार पूर्ण झालेला आहे. आत्मदर्शनाहून मोठें सुख दुसरें नाहीं. बुद्धिमान्, श्रद्धालु व पराक्रमी असे जे पुरुष लौकिक गोष्टींना निःसार समजून त्यांचा योग्य मार्गानें त्याग करतात, त्यांना सत्वर श्रेष्ठ गति मिळते. अर्जुना, अधिक सांगण्याचें कारणच नाहीं, पण एवढें सांगतों कीं, सहा महिने नित्यनियमानें योगाभ्यास केल्यास योग सिद्ध होतो. १९.२.१९

## अध्याय २० वा.

[ ब्राह्मण व त्याची पत्नी यांमधील योगविषयक संवाद ]

( १ ) कृष्ण :—अर्जुना, या विषयावर कोणीएक ब्राह्मण व त्याची स्त्री यांमध्यें प्राचीनकाळीं झालेला संवाद सांगण्यांत येत असतो. तो ब्राह्मण ज्ञान व विज्ञान यांत पारंगत असून नित्य एकान्तांत बसलेला असे. त्याला तसा पाहून त्याची पत्नी त्याला म्हणाली, 'आपण सर्व कर्मं सोडून माझ्याशीं निष्ठुरपणें वागतां आणि माझें काय होणार याची मुळीं क्षिति बाळगीत नाहीं; अशा आपली पति म्हणून गांठ पडल्यामुळें माझी गति तरी काय होणार? पतीनें मिळविलेले लोकच पत्नीला मिळतात असें म्हणतात, तेव्हां आपण माझे पति असल्यामुळें माझी गति काय असा मला मोठा प्रश्न पडला आहे!' पत्नीचें भाषण ऐकून शांतमनाचा तो ब्राह्मण हंसत हंसत तिला म्हणाला, 'हे भाग्यशाली स्त्रिये, तुझ्या या बोलण्याचा मला मुळींच राग आला नाहीं. कर्मठ लोक जे आहेत ते व्रतवैकल्यादि बाह्य म्हणूनच उठावानें दिसणाऱ्या कर्मालाच खरें कर्म म्हणतात. पण अशा ज्ञानविरहित बाह्य कर्मानें ते केवळ मोहून गेलेले असतात, एवढेंच. वस्तुतः कोणी झालें तरी एक क्षणभरहि निष्कर्मी राहूं शकत नाहीं. जन्मापासून देह पडेपर्यंत इंद्रियें, मन, वाणी यांचें कांहीं ना कांहीं बरें वाईट कर्म प्राणी करीतच असतो. आज्य, समिधा इत्यादि दृश्य द्रव्यें ज्यांत लागतात अशीं यज्ञादिकर्में करण्यांत त्यांना आडकाठी आणणाऱ्या राक्षसादिकांचा नाश करावा लागतो, म्हणून तें पाप टाळण्यासाठीं मीं त्या कर्माचें स्वरूप स्वतःच्या योगानें आणि स्वतःमध्येंच सिद्ध होईल असें पाहून ठेविलें. त्या कर्मात द्वंद्वांतील ब्रह्माची उपासना असून इडा व पिंगला याच सोम व अग्नि असतात आणि सर्वभूतांचा आधार असा वायु सर्वत्र संचार करीत असतो. त्यांत ज्ञानी, शांत, व्रतनिष्ठ व जितेंद्रिय असे ब्रह्मादि देवच तत्परतेनें अक्षर ब्रह्माची उपासना करतात. त्या कर्माचा नाकानें वास येत नाहीं, जिभेला स्वाद घेतां येत नाहीं, स्पर्शेन्द्रियाला त्याचा स्पर्श होत नाहीं, मनानें त्याचें आकलन होत नाहीं, नेत्राला तें सहन होण्यासारखें नसतें, व कानाच्या तें आटोक्या बाहेर आहे. त्याला गंध, रस, रूप, स्पर्श, शब्द व इतर खाणाखुणा कांहींच नाहींत. सृष्टीचे सर्व व्यापार त्यांतूनच उद्भवतात व त्यांतच लय पावतात. प्राणादि वायूंचा उद्भव त्यांपासून असून त्यामुळेंच त्यांची प्रवृत्ति होते व त्यांतच ते शेवटीं लय पावतात. समान व व्यान

यांमध्यें प्राण व अपान फिरतात; प्राण व अपान लीन झाले कीं समान व व्यान हे त्यांत लय पावतात. अपान व प्राण यांमध्यें उदान व्यापून रहातो, म्हणून निजलेल्या पुरुषाला प्राण व अपान हे सोडून जात नाहींत. प्राणांना नियमित करण्याच्या कार्यामुळेंच उदानाला उदान म्हणतात. त्या उदानामुळेंच ब्रह्मवादी पुरुषांनीं प्राणजयरूपी तपाचा शेवट म्हणजे वैश्वानरप्राप्ति होय असें ठरविलें आहे. सर्व वायूंत वैश्वानर अग्नि सात रूपांनीं संचार करीत असून घ्राण, जिह्वा, चक्षु, त्वक्, कर्ण, मन आणि बुद्धि या त्याच्या ज्वाळा होत. वासाच्या वस्तु, पहाण्याच्या वस्तु, पेयें, स्पर्शयोग्य पदार्थ, ऐकण्यास योग्य अशा गोष्टी, मननीय विचार व जाणण्यास योग्य असा विषय, या त्या वैश्वानराच्या सात समिधा होत. वास घेणारा, पहाणारा, पिणारा, स्पर्शभोक्ता, श्रोता, विचारी व ज्ञानी हे सात ऋत्विज् आहेत. ते त्या घ्राणादि सात अग्नींत घ्रेयादि सात हविर्द्रव्यांचें योग्यरीतीनें हवन करून त्यांची पुनरुत्पत्ति त्या त्या योनींतून करण्याची योजना करतात. पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश, तसेंच मन आणि बुद्धि या सातांना योनि असेंच नांव आहे. हविर्द्रव्य झालेले असे गंधादि गुण गंधादिकांचें ज्ञान होण्याचा जो अग्नीचा गुण त्यांत शिरून व त्यांत राहून पुढें त्या त्या आपल्या उत्पत्तिस्थानांतून प्रकट होतात, व प्रलयकालीं ब्रह्मस्वरूपांतच पुनः गडप होतात. त्या ब्रह्मांतूनच उत्पत्तिकाळीं गंध, रस, रूप, स्पर्श, शब्द, संशयात्मक मन व निश्चयात्मिका बुद्धि अशी सात प्रकारची सृष्टि होते. या प्रकारें पूर्व ऋषींनीं प्राणादिकांचें स्वरूप वेदापासून जाणिलें आणि मान, मेय व माता या त्रिपुटीच्या पूर्णाहुतीनें भरून जाऊन ते स्वतः तेजःसंपन्न झाले. १४. २. २०

---

## अध्याय २१ वा.

[ १. ब्राह्मण—ब्राह्मणीसंवाद पुढें चालू ]

( १ ) ब्राह्मणः—भार्ये, याविषयीं प्राचीन इतिहासांतील एक उदाहरण सांगतात. दहा होत्यांची कथा त्यांत असून, ती समजून घे. कर्ण, नासिका, नेत्र, जीभ, त्वचा, वाणी, दोन पाय व दोन हात, उपस्थ व पायु हे दहा होते म्हणजे हवन करणारे असून, शब्द, स्पर्श, रूप, रस, गन्ध, वाक्य, कर्म, चालणें, रेत, मूत्रविसर्जन व पुरीषत्याग हीं दहा त्यांचीं हविर्द्रव्यें होत. दिशा, वायु,

वि, चंद्र, पृथ्वी, अग्नि, विष्णु, इन्द्र, प्रजापति आणि मित्र हे दहा अग्नि होत. ॆ दहा इन्द्रियरूपी होते. आपल्या दहा हविर्द्रव्यांचें त्या दहा अग्नींत विषयरूपी तमिधांसह हवन करतात. हवि देण्याची त्यांची स्रुवा ( पळी ) म्हणजे चित्त व यज्ञाला लागणारें वित्त म्हणजे उत्तम प्रकारचें पवित्र ज्ञान. याप्रमाणें सर्व जगाची योग्य वांटणी झालेली आहे. सर्व ज्ञेय वस्तु म्हणजे चित्त. त्याकडे ज्ञान केवळ ाहात असतें. रेतापासून उत्पन्न झालेल्या स्थूल शरीरांत ज्ञाता असा जीव लिंग-ारीर धारण करून असतो. शरीराला धारण करणारा गार्हपत्य अग्नि असून यापासून इतर अग्नि होतात. मन म्हणजे त्यांतील आहवनीय अग्नि होय. त्यांत ़वन केलें म्हणजे वाचस्पति अथवा वाणीचा स्वामी उत्पन्न होतो व त्याचें ाक्षी मन असतें. तेव्हां वर्णहीन असें रूप प्रादुर्भूत होऊन तें मनाकडे धांव ेतें.

एवढें ऐकून ब्राह्मणी म्हणाली, 'वाणी प्रथम उत्पन्न होऊन मन तिच्या-ागूनच झालें असें कसें म्हणावयाचें? कारण प्रथम मनांत आलेला विचार ाणीच्या द्वारा नंतर प्रकट होतो. मति ही चित्ताच्या आश्रयानें रहाते, याला ्माण काय? तसेंच झोपेंत जेव्हां ती चित्तापासून वेगळी होते, तेव्हां तिला वेषयांचें ज्ञान कां होत नाहीं, त्यावेळीं त्या ज्ञानाच्या आड काय येतें?'

ब्राह्मणानें उत्तर केलें, 'ऐक, त्या गतीला अपान वायु रक्षक होऊन आप-्यांत विलीन करून घेतो. त्या गतीलाच मनाची गति म्हणतात. वस्तुतः मन ाणावर अवलंबून असतें, प्राण कांहीं मनावर अवलंबून नसतो. म्हणून झोपेंत मन वेलीन झालें तरी प्राणाचें कार्य चालूच रहातें. आतां मन आणि वाणी यांसंबंधीं तूं ो प्रश्न विचारिला, त्याचें उत्तर म्हणून त्यांचाच संवाद तुला सांगतों, ऐक. ्कदां वाणी व मन हीं दोन्हीं जीवाकडे गेलीं व त्याला म्हणालीं, 'हे प्रभो, ाम्हां दोघांमध्यें श्रेष्ठ कोण तें सांग आणि त्या विषयींचा आमचा संशय दूर र. त्यावेळीं जीवानें उत्तर दिलें 'मन श्रेष्ठ होय.' हें ऐकून वाणी म्हणाली कामधेनूप्रमाणें मी तुला पाहिजे तें देतें, मग मी श्रेष्ठ नव्हे का?' तेव्हां मनानें उत्तर केलें, 'स्थावर आणि जंगम असे दोन विषय मनाचे असून त्यांतील ्थावर माझ्या आधीन आहे व जंगम विषय तुझ्या अधीन आहे.' हें ऐकून ीव म्हणाला, जो 'मंत्र वर्ण किंवा स्वर जंगम विषयाकडे जाईल, तो मनाचा भाग असून, हे वाणि, तूं त्याहून मोठी आहेस. पण ज्या अर्थीं तूं ्वतःच आपली थोरवी गाऊं लागलीस, त्या अर्थीं उसासा टाकूनच मीं मनाला

श्रेष्ठ म्हटलें. हे वाणि, खरोखर प्राण व अपान यांच्यामध्यें तूं नित्य रहातेस. पण प्राणाकडून तुला प्रेरणा न मिळाली तर तूं अगदीं दुर्बळ असतेस.' जीवानें असें सांगितलें असतां, 'भगवन् कृपा करा,' असें म्हणून वाणी प्रजापतीकडे धांवली. त्यावेळीं वाणीला पुष्ट करण्यासाठीं प्राण प्रादुर्भूत झाला. त्यामुळें श्वास बाहेर टाकीत असतां वाणी कांहीं बोलूं शकत नाहीं. ती घोषिणी व निर्घोषा अशी दोन प्रकारची असून त्यांतहि निर्घोषाच अधिक चांगली होय. ती गाई-प्रमाणें गोड अर्थ प्रसवते व ब्रह्मघोष करणाऱ्या तिच्यांतून नित्य शाश्वत ब्रह्माचाच स्राव होत असतो. हे स्त्रिये, गाईसारखी ही वाणी दिव्य आणि पार्थिव अशी दोन प्रकारची असून तिचीं हीं सूक्ष्मरूपें आणि मन यांतील भेद समजून घे. ब्राह्मण-पत्नीनें त्यावर विचारिलें, 'बोलण्याच्या इच्छेनें वाणी प्रयत्न करीत असतां जेव्हां शब्द उमटत ना, तेव्हां त्या देवीनें काय म्हटलें बरें ?' ब्राह्मण म्हणाला, 'प्राणाच्या साह्यानें वाणी शरीरांत उत्पन्न होते व नंतर प्राणांतून अपानांत जाते आणि उदान रूपानें देहांतून बाहेर जाऊन ती व्यानाच्या साह्यानें सारें आकाश भरून टाकते व मग समानांत स्थिर होते.' वाणी असें बोलली. तात्पर्य स्थावर म्हणून मन श्रेष्ठ आणि जंगम म्हणून वाणी श्रेष्ठ, असें समजावें. १४.२.२१

---

## अध्याय २२ वा.

[ १. ब्राह्मण–ब्राह्मणी संवादः सात होत्यांची कथा ]

( १ ) **ब्राह्मण :**—हे भार्ये, सात होत्यांची कथाहि याविषयीं प्राचीन काळचें ऐतिहासिक उदाहरण म्हणून सांगतात, ती आतां ऐक. घ्राण, चक्षु, जिव्हा, त्वचा, श्रोत्र, मन आणि बुद्धि यांना सात होते असें म्हणतात. ते सूक्ष्म आकाश तत्त्वांत असतांना एकमेकांना दिसत नाहींत. ह्या सात होत्यांचे स्वभाव कसकसे आहेत, ते तूं समजून घे.

**ब्राह्मणी :**—सूक्ष्म आकाशांत असतांना ते एकमेकांना कां दिसत नाहींत व त्यांचे स्वभाव कसे आहेत ते मला सांगा.

**ब्राह्मण**—हें पहा, एखाद्या पदार्थाच्या गुणाचें अज्ञान म्हणजेच त्याविषयींचें अज्ञान होय तसेंच त्याचें ज्ञान म्हणजे त्याच्या गुणांचें ज्ञान होय. हे होते एक-मेकांचे गुण जाणत नाहींत असा माझ्या म्हणण्याचा भावार्थ आहे. गंध हा पृथ्वीचा गुण घेऊं. तो घ्राण या होत्यालाच समजतो; जीभ, नेत्र, कान,

ाणी, मन व बुद्धि यांना तो कळत नाहीं. रस जिभेलाच कळतो; तो नाक, ेत्र, कान, वाणी, मन व बुद्धि यांना समजत नाहीं. डोळ्यांनाच रूप हा गुण मजतो; नाक, जीभ, कान, वाणी इत्यादिकांच्या टापूंत तो येत नाहीं. पर्शाची तीच स्थिति; त्वचेलाच तो कळतो, इतरांना तो कळणें शक्य नाहीं. ाब्द जाणण्याची शक्ती कानांनाच आहे, घ्राणादि इतरांना नाहीं. घ्राणादिकांना ंशय घेण्याची शक्ति नाहीं, ती केवळ मनालाच आहे. कोणत्याहि गोष्टीचा ेश्चय करणें हें बुद्धीवांचून दुसऱ्या कोणाला शक्य नाहीं.

याविषयीं इंद्रियें व मन यांचा प्राचीन संवाद उदाहरण म्हणून सांगतात, ो असा:—एकदां मन म्हणूं लागलें कीं, 'माझ्या साह्यावांचून घ्राणाला गंध ुंगतां येत नाहीं, जिव्हेला रस चाखतां येत नाहीं, डोळ्याला रूप पहातां येत ाहीं, त्वचेला स्पर्श जाणतां येत नाहीं, कानांना शब्द ऐकतां येत नाहीं. ास्तव सर्व भूतांमध्यें मी श्रेष्ठ आहें. मीं नसेन तर, माणसांशिवाय रिकामीं डलेलीं जशीं घरें, किंवा ज्वाळा नसलेला जसा अग्नि, तशी इन्द्रियांची स्थिति ोते. माझ्या साह्यावांचून प्राण्यांनीं कितीहि प्रयत्न केला, तरी ओलीं लांकडें शीं पेटत नाहींत त्या प्रमाणें प्राण्यांनाहि विषयांचा उपभोग मिळत नाहीं.' ं ऐकून इंद्रियें म्हणालीं, 'मना, तूं म्हणतोस, तें सत्य होईल, पण केव्हां? ामच्यावांचून जर तुला भोग भोगतां येतील, म्हणजे आम्ही विलीन झालों सतां, तुझी तृप्ति व प्राणाचें धारण होऊन तुला जर भोग भोगतां येतील तर. ाम्हीं लय पावल्यावर विषय जाग्यावर असतां तूं जर केवळ संकल्पानें यथास्थित यांचा उपभोग घेऊं शकशील, तरच तुझें म्हणणें खरें म्हणतां येईल. आतां ामच्या विषयांवर तुझें नियमन आहे असें जर वाटत असेल, तर नाकानें रूप ाहा पाहूं; नाहींतर डोळ्यानें रस तरी चाख, अथवा कानानें वास घे, जिभेनें पर्श ओळख, त्वचेनें शब्द ऐक, बुद्धीनें स्पर्शसुख घे. अरे बाबा, नियम हे लवंताकरतां नाहींत, ते असतात दुर्बळांसाठीं! तुला सामर्थ्य असेल, तर तूं वे भोग भोग, उष्टे भोग कशाला भोगतेस? ज्याप्रमाणें शिष्य वेदाध्ययनासाठीं ुरूकडे जातो, आणि त्यानें सांगितलेलें ऐकून घेऊन वेदार्थाच्या ज्ञानाचा अभिमान रतो त्याप्रमाणें आम्हीं दाखवूं तेवढेच मागचे व पुढचे विषय तूं जाणतोस. ल्पज्ञानी प्राण्यांत विमनस्कता आली, तरी आमच्यासाठीं केलेल्या कार्यामुळें यांची प्राणधारणा होऊं शकते, असें दिसून येतें. पण नुसते संकल्प पुष्कळ केले ाणि अनेक स्वप्नें भोगिलीं, तरी प्रत्यक्ष भुकेची पीडा होऊं लागली कीं प्राणी

आमच्या द्वारा विषयाकडेच धांवतो. विषयांशीं प्रत्यक्ष संबंध न ठेवतां केवळ संकल्पानेंच जो त्यांत शिरतो, तो दार नसलेल्या घरांतच जणूं शिरतो, व पेटलेला अग्नि ज्याप्रमाणें लांकडें संपलीं कीं विझून जातो, त्याप्रमाणें प्राणवायु संपून गेल्यावर तोहि शांत होतो. आम्हीं खरोखर आपआपल्या विषयांवरच आसक्त असतों, आम्हांला एकमेकांचे विषय कळत नाहींत, हें खरें; तथापि आमच्यावांचून तुला विषयांचें ज्ञान मिळणार नाहीं, तसा हर्षहि होणार नाहीं.' १४. २. २२.

## अध्याय २३ वा.

[ १. ब्राह्मण-ब्राह्मणी संवाद—पुढें चालू. पांच होत्यांची कथा. ]

( १ ) ब्राह्मण—हे भाग्यशालि भार्ये, या विषयावर पांच होत्यांची कथा ज्यांत आहे असा एक प्राचीन इतिहास उदाहरण म्हणून सांगतात. प्राण, अपान, उदान, व्यान व समान हे ते पांच होते होत. त्यांचा विषय फार उच्च आहे.

ब्राह्मणी:—महाराज, स्वभावतः सात होते आहेत अशी माझी पूर्वी कल्पना होती. तर आतां हे पांच होते कसे व त्यांचें विधान श्रेष्ठ कसें तें कृपा करून सांगा.

ब्राह्मण:—प्राणानें पुष्ट झालेला वायु अपानरूप होतो, अपानांत भरून राहिलेला वायु व्यान बनतो, व्यानानें पुष्टि दिलेला वायु पुढें उदान होऊन जातो. आदि उदानांत भरलेला वायु समान नांवाचा होतो. असें असतां त्या वायूंनीं एकदां ब्रह्मदेवाला विचारिलें, 'हे पितामहा, आमच्यामध्यें श्रेष्ठ कोण तो सांग, त्यालाच आम्हीं श्रेष्ठ म्हणूं.'

ब्रह्मदेव:—प्राण्यांच्या शरीरांतून ज्याचा लय झाला असतां इतर सर्वहि प्राण लय पावतात, तसेंच जो पुनः आला असतां, तेहि पुनः चालूं लागतात, तोच श्रेष्ठ. असा कोण तो तुम्हीं पहा.

प्राण:—प्राण्यांच्या शरीरांतून मीं लय पावलों, म्हणजे इतरहि त्यांच्या शक्ति नष्ट होतात, व मीं हालचाल केल्यास त्याहि पुनः चालूं लागतात, म्हणून मीं श्रेष्ठ आहें. मीं विलीन झालों कीं काय होतें पहा.

**ब्राह्मण:**—भार्ये, असें म्हणून प्राण लय पावला व पुनः चालूं लागला. तेव्हां समान आणि उदान त्याला म्हणाले, 'प्राणा, आम्हीं जसें सगळें हें शरीर व्यापून आहों, तसा तूं नाहींस, यास्तव तूं श्रेष्ठ नाहींस, अपान मात्र तुझ्या आज्ञेंत आहे.' तेव्हां प्राण पुनः हालचाल करूं लागला असतां अपान म्हणाला, 'मीं लय पावलों कीं प्राणिशरीरांतून सर्व शक्ति लय पावतात व मीं हालचाल करूं लागल्यास त्याहि पुनः हालचाल करतात; यास्तव मीं श्रेष्ठ आहें. मीं लीन झालों कीं काय होतें पहा.' अपानाच्या भाषणावर व्यान व उदान म्हणाले, 'अपाना, तूं कांहीं सर्वश्रेष्ठ नाहींस, केवळ प्राणच तुझ्या आज्ञेंत आहे.' नंतर अपान हालचाल करूं लागला असतां व्यान त्याला पुनः म्हणाला, 'मींच सर्वांत श्रेष्ठ आहें; कोणत्या कारणास्तव म्हणून विचाराल, तर ऐका.' असें म्हणून त्यानेंहि प्राण व अपान यांनीं सांगितलेलें कारणच सांगितलें व कांहीं वेळ लय पावून पुनः तो हालचाल करूं लागला. तेव्हां प्राण, अपान, उदान व समान त्याला म्हणाले, 'व्याना, तूं कांहीं सर्वश्रेष्ठ नव्हेस, केवळ व्यानच काय तो तुझ्या आज्ञेंत वागतो.' नंतर व्यान हालचाल करूं लागला असतां, समान पुढें होऊन आपण श्रेष्ठ आहों असें म्हणाला व प्राणादिकांनीं दिलेलें कारणच त्यानेंहि सांगितलें. मग तो कांहीं वेळ लय पावून पुनः हालचाल करूं लागला असतां उदान पुढें आला आणि त्याला म्हणाला, 'मींच सर्वश्रेष्ठ आहें, कारण मीं लय पावतों कीं इतरहि प्राण लीन होतात व माझ्या हालचालीबरोबर तेहि हालचाल करूं लागतात.' असें म्हणून तोहि थोडा वेळ लीन झाला व पुनः हालचाल करूं लागला. तेव्हां प्राण, अपान, समान व व्यान त्याला म्हणाले, 'उदाना, तूं कांहीं सर्वांत श्रेष्ठ नाहींस, एकटा व्यानच तुझ्या आज्ञेंत वागतो.' असें त्यांचें आपसांत बोलणें झाल्यावर, त्या सर्वांना उद्देशून ब्रह्मदेव म्हणाला, 'तुम्हीं सर्वच श्रेष्ठ आहां, अथवा म्हटलें तर कोणीच श्रेष्ठ नाहीं. खरें पाहिल्यास सर्वच तुम्हीं एकमेकांवर अवलंबून आहां, व प्रत्येक जण आपआपल्या विशिष्ट कार्यांत श्रेष्ठच आहे. स्थिर व अस्थिर मिळून खरोखर वायु एकच असून कार्यपरत्वें त्याला पांच नांवें मिळालीं आहेत. माझा आत्मा जसा एकच असून तो अनंतरूप झालेला आहे, तसेच तुम्ही एकमेकांचे मित्रच आहां, तरी एकमेकांना साह्य करा; जा, सुखानें असा; तुमचें कल्याण होवो; एकमेकांना तुम्हीं आधार द्या.' १४.२.२३.

---

## अध्याय २४ वा.

[ ब्राह्मणाचा पत्नीला उपदेश; देवमत आणि नारद यांमधील संवाद ]

( १ ) **ब्राह्मण**:—हे भार्ये, पंचप्राणांच्या परस्पर संबंधाविषयीं देवमत आणि नारद यांमधील प्राचीन संवाद उदाहरण म्हणून घेण्यासारखा आहे. एकदां देवमतानें नारदाला विचारिलें, 'नारदा, प्राणी जन्मास येतांना पंचप्राणांपैकीं कोणता प्रथम उत्पन्न होतो बरें? प्राण, अपान, समान, व्यान कीं उदान?' नारदानें सांगितलें, 'जो प्राण्याला निर्माण करतो, त्याहून निराळा वायु प्रथम येतो. प्राणवायूंच्या जोड्या असून एक तिरकी, एक वर आणि एक खालीं अशा त्या आहेत.' त्यावर देवमतानें पुनः विचारिलें, 'प्राण्याला कोणता वायु जन्म देतो, दुसरा कोणता प्राणवायु प्रथम उत्पन्न होतो, तशाच तिरके, वर व खालीं असलेल्या प्राणवायूंच्या जोड्या कोणत्या?'

**नारद**:—संकल्प, शब्द, रस आणि रूप यांपासून प्रथम हर्ष उत्पन्न होतो, नंतर शुक्र आणि शोणित यांच्या मिश्रणानें प्राणाची उत्पत्ति होते व शुक्राच्या योगानें प्राणांत विकार होऊन अपान निर्माण होतो. शुक्रधातु व रस यांच्यापासून त्यांच्या संबंधाच्या योगानें हर्ष उत्पन्न होतो व तो उदानाचें रूप होय. कामापासून शुक्र व शुक्रापासून रज अशीं उत्पन्न होतात आणि सामान्य शुक्र व शोणित हीं अनुक्रमानें समान व व्यान यांपासून होतात. प्राण व अपान ही जोडी बाजूला व वर फिरते आणि व्यान व समान ही जोडी तिर्कस फिरते. अग्नि हाच सर्व देवता होय असें परमेश्वरानें सांगितलें असून त्याचा धूम म्हणजे तमोगुण आणि भस्मांतील तेजाचें रूप म्हणजे रजोगुण होय. त्यांत ज्या ठिकाणीं हवि टाकण्यांत येतें तेथून सत्व निर्माण होतें व त्या सत्वापासून समान व व्यान हे होतात असें यज्ञवेत्ते म्हणतात. प्राण व अपान हे आज्याचे भाग होत; त्यांच्यामध्यें अग्नि असतो. तेंच उदानाचें श्रेष्ठ रूप आहे असें ब्रह्मवेत्ते म्हणतात. आतां द्वंद्वातीत म्हणजे काय तें सांगतों ऐक. दिवस रात्रीची जोडी म्हणजे द्वंद्व व त्यांच्यामध्यें अग्नि असतो, तेंच उदानाचें श्रेष्ठ रूप असें ब्राह्मण म्हणतात. तसेंच सत् व असत् हें द्वंद्व असून त्यांच्यामध्यें अग्नि असतो, त्याला ब्राह्मण उदानाचें परमरूप म्हणतात. समान प्रथम असून व्यान त्यानंतर येतो व तो कर्मांचा विस्तार करतो. व्यानाची व्यवस्था समानाकडून निश्चित केली जाते. शांतीसाठीं

एक व्यानच असून शांति म्हणजे सनातन ब्रह्म होय. हें जें उदानाचें श्रेष्ठ रूप सांगितलें तें ब्रह्मवेत्तेच जाणतात. १४.२.२४.

---

## अध्याय २५ वा.

[ १ ब्राह्मणाचा पत्नीला उपदेश; चार होत्यांची कथा. ]

( १ ) **ब्राह्मण**:—या प्राणादिकांच्या परस्पर संबंधाच्या विषयावर चार होत्यांची कथा उदाहरण म्हणून सांगतात. त्याचें विधान यथास्थितपणें सांगितलेलें असून, हे कल्याणि, तें रहस्य मीं तुला आतां सांगतों, ऐक. कारण, कर्म, कर्ता व मोक्ष असे ते होते असून त्यांनीं हें जगत् झांकून टाकिलें आहे. त्यांत कोण कशापासून झालें याविषयीं सविस्तर विवेचन ऐक. घ्राण, जिव्हा, चक्षु, त्वचा, कर्ण, मन आणि बुद्धि हीं सात अविद्यारूप गुणाचे परिणाम होत. गंध, रस, रूप, स्पर्श, शब्द, विचार आणि ज्ञान, हीं सात कर्मांपासून उत्पन्न होतात. वास घेणारा, भक्षण करणारा, पहाणारा, बोलणारा, ऐकणारा, विचार करणारा व जाणणारा हे सात कर्तृत्वामुळें उत्पन्न होतात. ते गुणयुक्त होऊन आपल्या बऱ्यावाईट गुणांचा उपभोग घेतात. आत्मा निर्गुण व अनन्त असून ते सात मोक्षाला साधन होतात, म्हणजे आपण वास घेणारा, पहाणारा इत्यादि आहों असा अभिमान जीवानें सोडला व गंधादि गुणांचा उपभोग घ्राणादि देवता आपआपल्या ठिकाणीं राहून घेतात असें जाणिलें कीं तो मुक्त होतो. अन्नादिकांचा उपभोग घेतांना अज्ञानी मनुष्यास ममत्व चिकटतें व ते विषय आपल्यासाठींच सिद्ध करणारा तर त्या ममत्वामुळें नाश पावतो. तो अभक्ष्यभक्षण व मद्यादि अपेयपान करतो व त्यामुळें त्याचा घात होतो. तो अन्नाचा नाश करतो व अन्नाचा नाश करून तो स्वतःहि नष्ट होतो. पण जो ज्ञाता आहे तो अन्नादिकांचा उपभोग घेतल्यानंतर ते पुनः उत्पन्न करण्यासहि समर्थ असतो. त्या विषयांच्या उपभोगामुळें त्याच्यांत यत्किंचित्‌हि अभिमान उत्पन्न होत नाहीं. तो जें मनानें विचारितो, तोंडानें बोलतो, कानानें ऐकतो, डोळ्यानें पहातो, त्वचेनें स्पर्शितो, व नाकानें हुंगतो, तीं सर्व हविर्द्रव्यें समजून मन आदि इंद्रियांच्या नियमनानें तीं तो शरीरांत प्रज्वलित झालेल्या अग्नींत हवन करतो. माझा योगरूप यज्ञ चालू असून त्यांत ज्ञानरूप अग्नि पेटविण्यांत येत आहे, त्यांतील स्तोत्र हा प्राण असून अपान वायु हा शस्त्र आहे आणि सर्व भोगांविषयीं वैराग्य ही त्यांतील दक्षिणा

होय. तसेंच यज्ञकर्ता होता त्याला अनुमति देणारा अध्वर्यु व स्तुति गाणारा उद्गाता हे अनुक्रमें अहंकार, मन व बुद्धि हे होत, असें तो जाणतो. सत्य हें त्यांतील प्रशास्त्याचें शस्त्र असून मोक्ष दक्षिणा होय. पूर्वी नारायण देवाला पशु अर्पण करीत असल्यामुळें त्याला जाणणारे लोक आतां त्याचीच ऋग्मंत्रांनीं स्तुति करतात. योगयज्ञ समाप्त होऊन आत्मलाभाचा आनंद झाला म्हणजे योगी सामगायन करतो व त्याचें प्रत्यंतर तैत्तिरीय संहितेंत सांपडतें.* हे भार्ये, सर्वांचा आत्मा तो नारायण देवच आहे, हें समजून घे. १४. २. २५.

---

## अध्याय २६ वा.

[ १. ब्राह्मणाचा पत्नीला उपदेश: प्रजापति आणि नाग व देवर्षि यांच्या संवाद-रूपानें नारायणस्वरूपाचें वर्णन ]

( १ ) **ब्राह्मण**:—हे भाग्यशालि भार्ये, जो आपल्या अंतःकरणांत वास करतो, तो परमात्मा हाच एक सर्व विश्वाचा नियंता आहे; दुसरा कोणी त्याचा नियंता नाहीं. त्याच्याच प्रेरणेमुळें पाणी उताराकडे वहातें तसा मी वहात जातों. हृदयांतील गुरुच एक गुरु, दुसरा कोणी गुरु नाहीं; त्याच गुरूच्या शिकवणी-वरून जगांत सर्पांचा द्वेष होतो. अंतःकरणांतील आत्मा हाच एक बंधु होय त्यांवाचून दुसरा बंधु नाहीं. त्याच्याच उपदेशावरून बांधवांना बंधु प्राप्त होतात व सप्तर्षि आकाशांत प्रकाशतात. अंतर्यामी आत्माच एक श्रोता असून त्यावांचून अन्य श्रोता नाहीं. त्याच गुरूशीं गुरूच्या नात्यानें राहून इंद्रानें सर्वलोकांमध्यें अमरत्व मिळविलें. अंतःकरणांतील आत्म्याहून दुसरा द्वेष्टा कोणी नाहीं, तोच एक द्वेष्टा होय. त्याच्या गुरुपदेशावरूनच सर्व सर्प द्वेषाला पात्र झाले आहेत.

या विषयावर उदाहरण देण्यासारखा एक प्राचीन इतिहास आहे. प्रजापति आणि सर्प व देव यांमध्यें एकदां संवाद झाला. सर्व मोठे देव, नाग व असुर एकदां प्रजापतीजवळ गेले आणि त्याला म्हणाले, 'महाराज, आमचें कल्याण कशांत आहे, तें सांगा.' असा त्यांचा प्रश्न ऐकून प्रजापति म्हणाला, 'ॐ, हें एकाक्षररूप ब्रह्म कल्याणप्रद आहे.' हें ऐकून ते सर्व दशदिशांना निघून गेले. ते जात असतां प्रजापतीच्या उपदेशाचा त्यांनीं निरनिराळा अर्थ आपआपल्या

---

* 'एतत्साम गायन्नास्ते हा ३ वुहा ३ वु' इत्यादि.

मताप्रमाणें केला. सर्पांनीं त्याचा अर्थ 'दंश करणें' असा केला. असुरांना त्याचा अर्थ 'दंभ' असा स्वाभाविकपणें वाटला. देवांनीं त्याचा अर्थ 'दान' असा घेतला व ऋषि तो अर्थ 'दम' असा समजले. याप्रमाणें एकच उपदेशक मिळाला असतां व त्यानें एकाच शब्दानें त्यांना सर्वांना उपदेश दिला असतांहि सर्प, ऋषि, देव व दानव यांनीं आपल्या मतानुसार त्याचा अर्थ वेगवेगळा निश्चित केला. प्रजापति तो उपदेशाचा शब्द उच्चारीत असतां त्याच्या तोंडाकडे पाहून त्यांनीं जसा वाटला तसा अर्थ घेतला* म्हणजे विचारणाराला स्वतः-वांचून गुरु नाहीं हेंच खरें. त्याच्या मनांतील अर्थाप्रमाणें नंतर त्याच्या हातून कर्म घडतें. हृदयांत ज्या प्रकारचा गुरु, जाणणारा, श्रवण करणारा, द्वेष करणारा इत्यादि असेल त्याप्रमाणें तें कर्म असतें. पापाच्या संसर्गानें तो पापकर्मी होतो, तर पुण्याच्या संसर्गानें पुण्यकर्मी होतो. कामाच्या संसर्गानें तो कामातुर होऊन इंद्रियसुखांत मग्न होतो, तर इन्द्रियदमनांत दंग झाल्यास ब्रह्मचारी होतो. व्रतादिकर्मांचा त्याग केल्यानें तो ब्रह्मनिष्ठ होतो व ब्रह्मस्वरूपी होऊन फिरत राहिल्यानें ब्रह्मचारीच बनतो. मग ब्रह्म हेंच त्याच्या समिधा व ब्रह्म हेंच अग्नि होऊन ब्रह्मापासूनच तो उत्पन्न झालेला असतो व ब्रह्म हेंच त्याचें उदक, गुरु, होऊन ब्रह्मांतच तो स्थिर होतो. अशा प्रकारचें सूक्ष्म ब्रह्मचर्य ज्ञानी लोक जाणतात व ज्ञान्याकडून त्याचें ज्ञान मिळाल्यावर त्याप्रमाणें वर्तन करतात. १४. २. २६.

---

## अध्याय २७ वा.

[ १. ब्राह्मणाचा पत्नीला उपदेश. ]

( १ ) **ब्राह्मणः**—भार्ये, एक भयंकर अरण्य ओलांडून मीं आतां एका सुंदर उद्यानांत आलों आहें. त्या अरण्यांत संकल्परूपी डांस व माशा होत्या. शोकरूपी शीत व हर्षरूपी ऊन त्यांत असून तें मोहरूपी अंधारानें व्यापलेलें

---

* ॐ शब्द उच्चारतांना प्रजापतीचे ओठ चावतांना हालावे तसे हालले, म्हणून सर्प त्याचा अर्थ 'चावणें' असा समजले, जप करतांना कोणी पुटपुटतो तसा भास दानवांना झाला व ते दंभ असें समजले; ॐ म्हणजे ठीक असा लौकिक अर्थ घेऊन देवांनीं त्यावरून दानाचा बोध घेतला व ऋषींनीं ओंठ मिटावे लागतात असें पाहून 'दमन' असा अर्थ घेतला.

होतें. लोभ व रोग हे त्यांत सर्प असून त्यांतील रस्त्यांवर विषयांचे अंधारे व कामक्रोधादि वाटमारे होते.

ब्राह्मणी:—महाराज, तें सुंदर उद्यान कोणतें बरें? तें येथून कितीशा वाटेवर आहे व त्यांतील वृक्ष, नद्या, पर्वत हे कसे काय आहेत?

ब्राह्मण:—पृथग्भाव नाहींसा होणें याहून अधिक सुखाचें जसें कांहीं नाहीं, तसें ऐक्यभाव नसणें याहून अधिक दुःखाचेंहि कांहीं नाहीं. त्या उद्यानाहून लहान कांहीं नाहीं, तसें त्याहून मोठेंहि कांहीं नाहीं. त्याहून सूक्ष्म कांहीं नाहीं तसें त्यापेक्षां सुखमयहि कांहीं नाहीं. त्यांत प्रवेश केलेल्यांना कधीं शोक होत नाहीं तसा हर्षहि होत नाहीं. ते कोणाला भीत नाहींत, तसे त्यांनाहि कोणी भीत नाहींत. त्या उद्यानांत सात मोठे वृक्ष, त्यांवर सात फळें, व सात अतिथि, तसेंच सात आश्रम, सात समाधि व सात दीक्षा असतात; असें त्याचें रूप आहे. त्यांत पांच रंगांचीं दिव्य फुलें व फळें ज्यांवर आहेत, असे वृक्ष सर्वत्र भरून राहिले आहेत. तसेंच दोन रंगांचीं सुवर्णाचीं फुलें व फळें धरणारेहि वृक्ष भरपूर आहेत. तीं दोन रंगीं फुलें अत्यंत सुवासिक असतात. त्यांतील कांहीं एकवर्णी असून सुवासिक असतात. दोन मोठे वृक्ष तर त्यांत असे आहेत कीं त्यांवर न उमगणाऱ्या रंगांचीं अनेक फुलें येतात. त्यांत आत्मस्वरूपी एकच अग्नि असून मंत्र हाच ब्राह्मण व पांच इंद्रियें याच समिधा होत. सात दीक्षा-वृक्ष त्यांत मोक्षरूपी फळें देतात. त्यांचे गुण हींच फळें व फळांची आशा म्हणजे अतिथि होत. इंद्रियरूपी महर्षींना त्यांत आतिथ्य मिळतें. त्यांची पूजा होऊन ते विलीन झाले म्हणजे त्यांना दुसरें देदीप्यमान उद्यान दिसूं लागतें. त्यांत प्रज्ञारूप वृक्षाला शांतिरूप छाया असते व तो मोक्षरूप फल देतो. त्यांत ज्ञान हें आश्रयाचें ठिकाण, समाधान हें पाणी व अंतर्यामी क्षेत्रज्ञ म्हणजे जीव हाच सूर्य असतो. जे सज्जन त्या उद्यानांत जातात, त्यांना तेथून परत येण्याचें भय नसतें. त्या उद्यानाला वरून, खालून किंवा बाजूनें कोठेंहि अंत नाहीं. तेथें नित्य सात तेजस्वी स्त्रिया म्हणजे चैतन्यवृत्ति रहात असून त्या खालीं मान घालून सर्व संकल्प पुरे करीत असतात. त्या प्रजांपासून रस वर काढून घेतात. सप्तर्षि तेथेंच राहून पुन: तेथें परत येतात. तेथें आत्मस्वरूपी सूर्यामागून यश, वर्चस्, ऐश्वर्य, विजय हीं तेजानें संपन्न होऊन फिरत असतात. तेथें डोंगर, पर्वत हेहि असतात आणि, नद्या, व नद ब्रह्मापासून स्रवणारे जलप्रवाह सोडीत असतात. तेथें नद्यांचा संगम अतिगूढ अशा यज्ञिय स्थानीं म्हणजे हृदयाकाशांत

होऊन त्याच्यामुळें अत्यंत तृप्त झालेले जीव प्रत्यक्ष ब्रह्मलोकासच जातात. वासना नष्ट करून व्रताचरणानें शुद्धान्तःकरण झालेले व तपानें पाप जळून गेलेले जीव आत्मस्वरूपांत शिरून ब्रह्माला पोंचतात. ज्ञानरूपी या उद्यानाचें ज्यांना ज्ञान आहे ते त्यांत शमाचीच प्रशंसा करतात. असें हें पवित्र उद्यान ब्रह्मज्ञानी पुरुषांना ठाऊक असतें व तें जाणल्यावर क्षेत्रज्ञानें दाखविल्याप्रमाणें ते शमयुक्त होतात. १४.२.२७.

## अध्याय २८ वा.

[ १. ब्राह्मणाचा पत्नीला उपदेश; अध्वर्यु आणि यति यांचा संवाद ]

( १ ) ब्राह्मण—मीं आत्मरूपानें वास हुंगीत नाहीं, रस म्हणजे चव जाणत नाहीं, रूप पहात नाहीं, स्पर्श ओळखीत नाहीं, विविध शब्द ऐकत नाहीं व कोणता संकल्पहि करीत नाहीं. इष्ट वस्तूंची इच्छा करणें अथवा अनिष्ट वस्तूंचा द्वेष करणें हें प्रकृतिच करते. इच्छा व द्वेष प्रकृतीपासूनच संभवतात. प्राण व अपान हे प्राण्याच्या शरीरांत शिरून जसे आपणच त्यांच्या पचन-- श्वसनादि क्रिया चालवितात तसाच प्रकार घ्राणादि इंद्रियांचाहि आहे. योगी लोक अन्तर्यामी जीवाला इंद्रियांहून किंवा त्यांच्या सूक्ष्म स्वरूपाहून वेगळा असाच पहातात. त्या अन्तर्यामींत असणारा मीं काम, क्रोध, जरा, मृत्यु इत्यादि कशा-वरच आसक्त असत नाहीं. कोणत्याहि इष्ट वस्तूची इच्छा न करणारा व कोणत्याहि दोषयुक्त वस्तूचा द्वेष न करणारा मीं असल्यामुळें कमलपत्रावर जसा जलबिन्दु चिकटत नाहीं तसें माझ्या मूळ स्वरूपावर कसलेंच पुट चढत नाहीं. नित्य व अव्यक्त अशा आत्म्याचे वरवर दिसणारे भोग हे वस्तुतः त्याचे नसून घ्राणादि इद्रियांचे असल्यामुळें त्या इंद्रियांच्या कर्मामुळें ज्ञाता जीव लिप्त होत नाहीं. सूर्याचे किरण आकाशाला चिकटून बसतात काय ?

हे भार्ये, या विषयावर अध्वर्यु व यति यांचा प्राचीन संवाद उदाहरण म्हणून सांगण्यासारखा आहे, तो ऐकून ठेव. एकदां एक अध्वर्यु यज्ञ आरंभून त्यासाठीं पशूचें प्रोक्षण करीत होता. तेथें जवळच एक यति बसला होता. त्यानें तें पाहिलें, तेव्हां हिंसा चालली आहे असें त्याला वाटून तो त्याची निंदा करूं लागला. तेव्हां अध्वर्यूनें उत्तर केलें, ‘ हा बोकड नाश पावणारा नाहीं, वेदांत सांगितलें आहे त्याप्रमाणें हा प्राणी मोक्षाला जाईल. याचा जो भाग पृथ्वीरूप

आहे तो पृथ्वीकडे जाईल, जलात्मक आहे तो जलतत्त्वांत जाईल, याचें नेत्रेंद्रिय सूर्यांत मिळेल, कर्णेंद्रिय आकाशांत समाविष्ट होईल व प्राण अंतरिक्षांत मिळून जातील. हा सर्व प्रकार श्रुतींत सांगितला असून या पशुहत्येनें मला कसलाहि दोष लागणार नाहीं.' हें ऐकून यति म्हणाला, 'या बोकडाचा प्राणांशीं वियोग झाल्यानें जर त्याला मोक्ष मिळतो असें तुला दिसतें, तर हा यज्ञच बोकडासाठीं आहे म्हणावयाचा! मग त्यांत तुझी लुडबुड कशाला? तूं आपला भाऊ, पिता, माता, मित्र यांचें मत याविषयीं घ्यावें. याला त्यांच्याकडे ने व तसें मत घे. हा आतां स्वतः कांहीं जाऊं शकत नाहींच. त्यांनीं जर तुला अनुमति दिली तर पुढील विचार करणें योग्य होईल. या बोकडाचे प्राण तर आपल्या प्रकृतींत लीन होऊन गेलेच. केवळ शरीर तेवढें येथें निश्चेष्ट होऊन पडलें आहे. ज्यांना हिंसेचें प्रेम वाटतें ते निश्चेष्ट पशूंच्या शरीराला केवळ इन्धनासमानच मानतात. पण सर्व धर्मांत अहिंसा धर्म श्रेष्ठ होय असा वृद्धांचा उपदेश आहे व तदनुसार जें कर्म हिंसारहित असेल तेंच करावें असें आम्हीं जाणतों. अहिंसा हेंच आमचें व्रत आहे. याहून अधिक काय सांगूं? तसेंच म्हटलें तर तुझ्या या कृत्यांत आणखी किती तरी दोष निघतील! आम्हांला सर्व प्राण्यांसंबंधानें अहिंसाच आवडते. आम्हीं प्रत्यक्ष ती आचरतों, अप्रत्यक्ष फलाची आम्हीं अपेक्षाच करीत नाहीं.'

अध्वर्यु—यते, भूमीचा गंध गुण तूं घेतोस, पाण्यांत असलेली चव तूं भोगतोस, तेजाचें रूप तूं पहातोस, व वायूचा स्पर्शहि अनुभवतोस. तसेंच आकाशोत्पन्न शब्द तूं ऐकतोस, व मनानें विचार करतोस. या सर्वांना तूं प्राण म्हणतोस. तेव्हां प्राण घेण्यापासून निवृत्त झालों असें म्हणत असतां तूं हिंसेला प्रवृत्त होतोसच. अरे हिंसेवांचून प्राणिमात्राची हालचाल तरी शक्य आहे काय? यते, कसें काय तुला वाटतें?

यतिः—क्षर आणि अक्षर असे आत्म्याचे दोन भाव आहेत. त्यांत अक्षर हा त्याचा सद्भाव असून प्रकृति हा क्षर भाव आहे. प्राण, जिव्हा, मन, सत्त्व, रज, तम हे व्यक्तरूप गुण होत. या गुणांनीं विरहित अशा द्वंद्वातीत, निष्काम सर्वभूतीं समदृष्टीनें पहाणाऱ्या, निरहंकारी, जितेंद्रिय व चोहोंकडून मोकळा झालेल्या मनुष्याला कोठूनच भय नसतें.

अध्वर्युः—हे बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ असलेल्या यते, खरोखर संगत करावी, तर ती सज्जनाचीच. आपलें म्हणणें ऐकून माझ्या बुद्धीवर चांगलाच प्रकाश पडला

आहे. तथापि, हे भगवन्, आपल्या बुद्धिप्रभावानें प्रकाशित होऊनच मी आपल्याला सांगतों कीं, वेदमंत्रांत सांगितलेलें व्रत आचरणारा मीं कांहींच अपराध करीत नाहीं.

ब्राह्मण म्हणतो, 'हे भार्ये, अध्वर्यूचें भाषण ऐकून यति स्तब्ध राहिला, व अध्वर्युहि मोहापासून मोकळा होऊन आपला महायज्ञ पुढें चालवूं लागला. अशा प्रकारचें मोक्षाचें सूक्ष्म स्वरूप ब्रह्मज्ञानी जाणतात व अर्थदर्शी क्षेत्रज्ञापासून तें जाणून घेतल्यावर त्याप्रमाणें आचरण ठेवतात.' १४.२.२८.

---

## अध्याय २९ वा.

[ १. ब्राह्मणाचा पत्नीला उपदेश. कार्तवीर्य व समुद्र यांचा संवाद ].

( १ ) **ब्राह्मण**:—हे विचारशालिनि भार्ये, या विषयावर कार्तवीर्य व समुद्र यांमधील संवाद उदाहरण म्हणून सांगण्यांत येतो. कार्तवीर्य अर्जुन नांवाचा सहस्र बाहु असलेला एक राजा होऊन गेला. त्यानें आपल्या धनुष्याच्या बलानें सागरापर्यंत पृथ्वी जिंकिली होती. एकदां आपल्या सामर्थ्याच्या गर्वानें भरून समुद्राच्या कांठीं फिरत असतां त्यानें शेंकडों बाण समुद्रावर सोडले असें आम्हीं ऐकिलें आहे. तेव्हां समुद्र त्याला नमस्कार करून व हात जोडून म्हणाला, 'हे वीरा, मजवर बाण सोडूं नको; मीं काय करूं तें सांग. तूं सोडलेल्या या तीक्ष्ण बाणांनीं माझ्या आश्रयास राहिलेले प्राणी मरून जात आहेत. तरी, हे राजश्रेष्ठा, तूं त्यांना अभय दे.

**अर्जुन**:—युद्धांत माझ्यासारखा कोणी धनुर्धर जर असेल व जर तो माझ्यापुढें युद्धासाठीं उभा राहूं शकेल तर मला सांग.

**समुद्र**:—राजा, महर्षि जमदग्नीचें नांव तुझ्या कांनीं आलें असेलच. त्याचा पुत्र राम तुझें स्वागत यथास्थितपणें करूं शकेल.

हे सुंदरि, समुद्राचें भाषण ऐकून सहस्रार्जुनाला राग आला व तसाच तो फणफणत तेथून निघाला तो सरळ परशुरामाच्या आश्रमांतच आला. तेथें गेल्यावर त्यानें आपल्या बंधूसह रामाला वाईट वाटतील अशा अनेक गोष्टी केल्या व त्या महात्म्याला कष्ट दिले. तेव्हां त्या अतुल तेजाच्या रामाचें तेज तळपूं

लागून त्यामुळें अर्जुनाचें सैन्य जळून जाऊं लागलें. मग रामानें हातांत परशु घेऊन अर्जुनाचे ते सहस्र हात झाडाच्या अनेक फांद्या छाटाव्या तसे छाटून टाकिले. अर्जुन पडला व मेला असें पाहून त्याचे बांधव तरवारी व इतर शस्त्रास्त्रें घेऊन भार्गवावर चालून गेले. तेव्हां रामहि धनुष्य बाण घेऊन रथावर चढला व बाणांचा वर्षाव करून त्यानें अर्जुनाच्या सैन्याला फुंकून टाकलें. त्याच्या त्या पराक्रमानें क्षत्रिय घाबरून जाऊन सिंहाच्या भयानें हरिण पळतात तसे पळून गिरिगव्हरांत लपून बसले. क्षत्रियांचें लोकरक्षणाचें काम त्यामुळें बंद पडलें व त्या-योगें ब्राह्मणांचाहि लोप होऊन प्रजा सारी शूद्र होऊं लागली. द्रविड, आभीर, पुंड्र, व शबर हे ब्राह्मणांच्या साह्याच्या अभावीं क्षत्रियत्वापासून सुटून सारे शूद्र झाले. तेव्हां ज्यांचे वीरपति वध पावले होते, अशा क्षत्रिय स्त्रियांपासून ब्राह्म-णांनीं जे क्षत्रिय निर्माण केले त्यांनाहि रामानें मारून टाकण्याचा सपाटा लाविला. त्यानें एकवीस वेळां त्यांचा संहार केला असतां आकाशवाणी झाली व सर्व-लोकांना ऐकूं जाईल अशा रीतीनें गोड शब्दांनीं त्याला म्हणाली, 'रामा, आतां हात आटोप, या क्षत्रियांना वारंवार मारून तूं काय फळ मिळवूं पहात आहेस बरें?' नंतर ऋचीकादि महर्षींनीं सुद्धां रामाला माघार घ्यावयास सांगितलें. पण पित्याच्या वधामुळें त्याला असह्य राग आलेला असल्यामुळें तो त्यांना म्हणाला, 'महाराज, तुम्हीं यावेळीं मला आवरणें उचित नाहीं.' पितरहि रामाला म्हणाले, 'हे अजिंक्य वीरा, क्षत्रियांचा असा वध करणें युक्त नाहीं. तूं ब्राह्मण असतां प्रजारक्षक राजांचा वध तूं कसा बरें करतोस?' १४. २. २९.

---

## अध्याय ३० वा.

[ १. अलर्क आणि इन्द्रियें यांचा संवाद ].

**पितर**:—भार्गवा, याविषयीं एक प्राचीन इतिहास उदाहरण म्हणून सांग-ण्यांत येतो, तो ऐकून मग तुला वाटेल तसें कर. अलर्क नांवाचा एक मोठा तपस्वी श्रेष्ठ राजा होऊन गेला. तो महात्मा धर्मवेत्ता, सत्यवक्ता व व्रतनिष्ठ असे. प्रथम त्यानें धनुष्याच्या बलानें सागरापर्यंतची सर्व पृथ्वी जिंकण्याचें कठीण कार्य केल्यावर मग ब्रह्माकडे मन लाविलें. एकदां वृक्षाच्या बुंधाशीं तो ब्रह्मचिंतन करीत बसला असतां त्याच्या मनांत विचार आला. त्यावेळीं त्याचा आणि मन व घ्राणादि इंद्रियें यांचा संवाद झाला तो असा:—

**अलर्क** :—माझ्या मनाचें बल फार मोठें झालें आहे; तर त्याला जिंकावें म्हणजे सर्वत्र निश्चित जय मला मिळेल. इन्द्रियादि अंतःशत्रूंनीं मला घेऊन टाकिलें असतांहि मीं बाह्य शत्रूंवरच अजून बाण सोडीत राहिलों. हें मन आपल्या चापल्यामुळें सर्व माणसांकडून कर्म करवून घेतें, तर त्यावरच मीं आतां तीक्ष्ण बाण सोडतों.

**मन** :—अलर्का, तुझे हे बाण माझा कधींच वेध करूं शकणार नाहींत. ते तुझ्याच मर्मावर लागतील व मर्मभेद झाला असतां तूं मरून जाशील. तरी माझ्यावर सोडावयाचे दुसऱ्या कांहीं प्रकारचे बाण पहा.

**अलर्क** :—( थोडा विचार करून ) पुष्कळ फुलांचा वास घेतल्यावर या घ्राणेंद्रियाला त्यांचा लोभ सुटतो, तर माझे तीक्ष्ण बाण मीं या घ्राणावरच सोडतों.

**घ्राण** :—अलर्का, तुझे हे बाण मला वेधूं शकणार नाहींत. तुझाच वेध करून ते तुला मारून टाकतील. तरी माझ्यावर सोडण्यासाठीं तूं दुसरे कसले तरी बाण पहा.

**अलर्क** :—( आणखी विचार केल्यावर ) ही जीभ अनेक गोड रसांचा उपभोग घेतल्यावर त्यांच्यावरच लुब्ध होते, तरी मीं आतां हिच्यावरच तीक्ष्ण बाण सोडावे हें बरें.

**जीभ** :—अलर्का, हे बाण माझा वेध न करतां तुझाच करतील व मर्मभेद होऊन तूं मरशील. तरी माझ्यावर सोडतां येतील असे दुसरे कसले तरी बाण पहा.

**अलर्क** :—( पुनः विचार करीत ) नानाप्रकारचे सुखस्पर्श उपभोगिल्यावर ही त्वचा त्यांचाच लोभ धरते, तर अनेक प्रकारचे अणकुचीदार बाण तिच्यावर सोडून मी तिला फाडून टाकितों.

**त्वचा** :—अलर्का, हे तुझे बाण माझें कांहींच वांकडें करणार नाहींत. तुझा मात्र मर्मभेद त्यामुळें होऊन तूं मरशील. तर मला मारण्यासाठीं कांहीं वेगळ्या प्रकारचे बाण मिळाले तर पहा.

**अलर्क** :—( पुनः विचार केल्यावर ) विविध मधुर शब्द ऐकून त्यांवरच मोहून जाणाऱ्या या श्रोत्रेंद्रियावरच मीं आपले कडक बाण सोडतों म्हणजे झालें.

**श्रोत्र** :—अलर्का, या बाणांची बाधा मला कोणत्याहि प्रकारें न होतां तुझे मर्म ते फोडतील व तेणेंकरून तूं मरून जाशील. तर माझा नाश करण्यासाठ तूं कांहीं अन्य जातीचे बाण पहा.

**अलर्क** :—( चिंतन करून ) अनेक सुंदर रूपें पाहून त्यांवरच हा चक्षु लुब्ध होत असतो. तर तीक्ष्ण बाण सोडून आतां त्या चक्षूचा मीं नाश करतों

**चक्षु** :—अलर्का, या बाणांकडून माझा वेध न होतां तुझाच होईल व तुझेंच मर्म फुटून तूं मरशील. तरी माझा वध करतां येईल असे अन्य जातीचे बाण पहा.

**अलर्क** :—( पुष्कळ विचार केल्यावर ) ही माझी बुद्धि आपल्या सामर्थ्याने अनेक निश्चय करते, तर हिच्यावर तीक्ष्ण बाण मीं आतां सोडतों.

**बुद्धि** :—अलर्का, हे बाण मला विद्ध करूं शकणार नाहींत, त्यांनीं तुझेंच मर्म फुटेल व तूं मृत होशील. माझ्या नाशासाठीं अन्य कसले तरी बाण पहा.

हे सुंदरि, घ्राणादि इंद्रियांचीं बोलणीं ऐकल्यावर अलर्कानें तेथेंच मोठे कडक तप केलें व त्यांच्यावर बाण सोडिले नाहींत. त्यानें शांत चित्तानें दीर्घ कालपर्यंत विचार केला, तरी त्याला परम कल्याणाचें स्थान त्या योगानें मिळाले नाहीं. मग त्यानें मन एकाग्र करून व निश्चल राहून योगसाधन केलें आणि एकाच बाणानें इन्द्रियांचा नाश करून योगानें आत्मस्वरूपांत प्रवेश केला व परम सिद्धि मिळविली. तेव्हां त्याचा त्यालाच विस्मय वाटला व तो एक गाथा म्हणूं लागला. 'अहो, काय सांगावें ? आम्ही सर्व बाह्य गोष्टी केल्या, भोगेच्छेने राज्यें केलीं, पण एवढें झाल्यावर शेवटीं योगाहून अधिक सुखकारक कांहीं नाहीं असेंच मला आढळून आलें.' असो, भार्गवा, आतां आम्हाला जावयास अनुज्ञा दे क्षत्रियांचा वध या उपर करूं नको. कडक तपश्चर्या कर म्हणजे तुला मोक्षप्राप्ति होईल.

पितरांनीं असें सांगितलें असतां भाग्यशाली जामदग्न्य रामानें मोठें घोर तप केलें आणि दुर्लभ अशी सिद्धि मिळविली. १४. २. ३३.

## अध्याय ३१ वा.

[ १. ब्राह्मणाचा पत्नीला उपदेश : तीन गुणांचे दोष ]

( १ ) **ब्राह्मण :**—सत्व, रजस् व तमस् हे तीन गुण म्हणजेच शत्रू असून वृत्तिभेदानें प्रत्येकीं तीन मिळून त्यांचें एकंदर नऊ भेद होतात. उल्हास, प्रेम व आनंद हे सात्विक गुण असून हांव, क्रोध व आवेश हे राजस गुण होत व थकवा, आळस आणि मोह हे तीन गुण तामस होत. धैर्यशील मनुष्यानें या गुणरूपी शत्रूंचा बाणांनीं पाडाव करून इंद्रियें जिंकावीं व शांतचित्तानें इतरांना जिंकण्याचा उपक्रम करावा. याविषयीं पुराणवेत्यांनीं गाथा गाईलेल्या आहेत. पूर्वी शांतपणाचा अभ्यास करीत असतांना अंबरीष राजानें त्या गायिलेल्या होत्या. क्रोधादि दोषांचा प्रादुर्भाव होऊन शमादिकांना बाधा होऊं लागली असतां अंबरीषानें बलानें राज्य स्वाधीन करून घेतलें व आपल्या दोषांचा निग्रह करून व शमादि गुणांचा सन्मान करून त्यानें सिद्धि मिळविली आणि पुढील गाथा म्हटल्या. तो म्हणाला, "बहुत दोष जिंकिले व सर्व शत्रूंचा निःपात केला, पण एक मोठा थोरला दोष राहिला, तो कांहीं मला नष्ट करतां आला नाहीं. त्याच्या योगानें मनुष्याला निरिच्छ होतां येत नाहीं; हांवेच्या मागें लागून तो पाणी उताराकडे धांवतें तसा धांवतो व त्याला कांहीं कळेनासें होतें. त्याच्यामुळें तो करूं नये तें करतो. तो दोष म्हणजे लोभ होय. तीक्ष्ण शस्त्रांनीं त्याचा नाश करा. लोभापासून हांव उत्पन्न होते, तीपासून चिंतेचा प्रादुर्भाव होतो. मनुष्य लोभी झाला म्हणजे त्याला पुष्कळसे राजस गुण लागतात व लोभाची वस्तु मिळाली नाहीं, म्हणजे तामस गुणांची जोड होते. अशा त्या विविध गुणांनीं नित्य देह बद्ध होत गेला म्हणजे मनुष्य पुनःपुनः जन्मास येऊन पुनःपुनः कर्म करतो. एका जन्मांत मागील जन्मांतील कर्मांचा क्षय झाला, तरी त्यांत केलेल्या कर्मांमुळें पुनः जन्म घेण्यासाठीं तो मरण पावतो. म्हणून आपल्या त्या लोभाचें स्वरूप नीट समजून घ्यावें व त्याचा निग्रह करून धैर्यानें आपल्या स्वतःवर राज्य मिळवावें. तेंच खरें राज्य. दुसरें राज्यच नाहीं; आणि आत्मा हाच खरोखर राजा होय." अशा अर्थाच्या गाथा त्या यशस्वी अंबरीषानें गाइल्या; कारण त्याला लोभाचा नाश करून स्वतःवर अधिराज्य

## अध्याय ३२ वा.

[ १. ब्राह्मणाचा पत्नीला उपदेश—जनकराजा व एक ब्राह्मण यांमधील संवाद )

( १ ) **ब्राह्मण:**—हे विचारी भार्ये, 'माझें, माझें' असें म्हणण्यांतच मृत आहे असें जें मीं पूर्वी म्हटलें त्याविषयीं जनक राजा व ब्राह्मण यांमधील पुरातन संवाद प्रसिद्ध आहे. एकदां एका ब्राह्मणानें कांहीं अपराध केल्यावरून जनक राजानें 'माझ्या राज्यांत तूं राहूं नको' असें त्याला सांगितलें. तें ऐकून ब्राह्मणानें उत्तर केलें, 'राजा, तुझ्या खास आज्ञेंत कितीसा देश आहे, तें मला सांग म्हणजे त्याच्या बाहेर जाऊन रहाण्याची माझी इच्छा आहे. राजा, तुझ्या आज्ञेप्रमाणें वागावें असेंच मला वाटतें.' ब्राह्मणाचें बोलणें ऐकून राजा कांहीं वेळ उष्णश्वास टाकीत स्तब्ध राहिला, त्याला कांहीं उत्तर सुचेना; तो ध्यानस्थासारखा बसला व सूर्याला केतूनें ग्रासावें त्याप्रमाणें त्याच्या मनाला चिंतेनें ग्रासिलें. थोड्या वेळानें तें चिंतापटल दूर झालें, तेव्हां धीर येऊन तो त्या ब्राह्मणाशीं बोलूं लागला. तो म्हणाला, 'वाडवडिलांपासून राज्य मिळालें व सर्व देश माझ्या आज्ञेंत आहे असें दिसत असतां, सारी पृथ्वी शोधिली तरी माझ्या सर्वस्वी अधीन असा प्रदेश मला सांपडत नाहीं. प्रथम सारी पृथ्वी धुंडाळली तींत असा प्रदेश मिळाला नाहीं, म्हणून मग मिथिला नगरींत शोध केला. तेथेंहि तसा प्रदेश न मिळाल्यामुळें मीं आपलें कुटुंब तपासलें. पण तेथेंहि माझी निराशा झाल्यामुळें माझ्या मनावर चिंतापटल आलें. आतां तें गेलें व योग्य विचार मला सुचला. आतां मला स्वत:चा असा प्रदेश उरला नाहीं, किंवा तसें म्हटलें तर आहे हा सर्वच प्रदेश माझा आहे; माझा देहहि एकीकडे माझा नाहीं, पण दुसरीकडे सर्व पृथ्वीच माझी आहे; ब्राह्मणा, हीं जशीं माझीं आहेत, तशींच सर्वांचींहि आहेत. आतां तुला वाटेल तितका काळ येथें रहा व येथें रहावेंसें वाटेल तेथपर्यंत सर्वांचा यथेष्ट उपभोग घे.''

**ब्राह्मण:**—राजा, वाडवडिलांचें राज्य मिळून सर्व देश स्वाधीन झालेला असतां, तूं त्यावरील स्वत:चें ममत्व काय वाटून सोडलेंस ? सर्व देश आहे तो माझाच असें तूं कोणत्या अर्थानें म्हणतोस व तसें म्हणतांना आपला असा प्रदेश मुळींच आढळत नाहीं असें तुला वाटतें तें तरी कोणत्या अर्थानें ?

**जनक:**—ब्राह्मणा, इहलोकींच्या सर्वच गोष्टी नष्ट होणाऱ्या असल्यामुळे खास माझी असलेली अशी वस्तूच मला दिसत नाहीं. 'हें कोणाचें ? तूंहि

कोणाचा?' असे प्रश्न वेदांत विचारिले आहेत; त्यांचा विचार करतां, माझें म्हणतां येईल असें माझ्या बुद्धीला कांहीं सांपडत नाहीं. या बुद्धीमुळें मला ममत्व सोडावें लागलें. आतां 'सर्वच माझें आहे' असें मी कोणत्या अर्थानें म्हणतों तें ऐक. नाकांत शिरलेला वासहि मी स्वतःकरतां उपभोगीत नाहीं, म्हणून त्या दृष्टीनें जिंकलेली सारी पृथ्वी नित्य माझ्या आज्ञेंत आहे. तोच प्रकार चविष्ट पदार्थांचा. तोंडांत गेलेले पदार्थहि मी स्वतःसाठीं खात नाहीं. अशा रीतीनें जलतत्त्वावर विजय मिळवून मीं त्याला आज्ञेंत आणिलें. रूपाचाहि भोग मी स्वतःसाठीं घेत नाहीं, त्यामुळें जिंकलेलें तेज नित्य माझ्या ताब्यांत असतें. त्वचेनें भोगावयाचे स्पर्शभोग मी स्वतःसाठीं घेत नसल्यामुळें वायूवर मला जय मिळून तो नित्य माझ्या आज्ञेंत रहातो. कर्णावर पडणारा शब्दहि मी स्वतःसाठीं ऐकत नाहीं, म्हणून शब्दांना जिंकून त्यांना मीं आपल्या आज्ञेंत नित्य ठेविलें आहे. मनानें करावयाचें मनन स्वतःसाठीं मी करीत नाहीं, म्हणून मी मनहि जिंकिलें असून तें माझ्या अधीन रहातें. माझ्या हातून जें जें घडतें, तें तें सर्व देव, पितर, भूतें, अतिथि यांच्या प्रीत्यर्थच घडतें.'

असें सांगून जनक राजा हंसला असतां ब्राह्मण पुनः म्हणाला, 'राजा, मी प्रत्यक्ष धर्म असून तुझी परीक्षा पहाण्याकरतांच आज येथें आलों. जेथून कधीं परत फिरावें लागत नाहीं, अशा दुर्लभ ब्रह्मलाभरूपी सत्वगुणाच्या धावेनें बांधिलेल्या चक्राचा तूं एकटाच प्रवर्तक आहेस.' १४. २. ३२.

## अध्याय ३३ वा.

[ १. ब्राह्मणाचें पत्नीला अभिवचन. ]

(१) ब्राह्मण :—हे भार्ये, तुला ज्याची भीति वाटते, व ज्यामुळें तूं माझ्यावर रागावत आहेस, तशा प्रकारानें मी जगांत वावरत नाहीं. मी जसा ब्राह्मण व मुक्त असून वनांत भटकतों, तसा गृहस्थ धर्मानें वागत असून व्रताचरणीहि आहें. बऱ्यावाईट कामांत जसा मी तुला दिसतों, तसा मी खरोखर नाहीं. या जगांत जें कांहीं अस्तित्वांत आहे, तें सर्व मी व्यापून राहिलों आहें. जगांत जे कांहीं स्थावर जंगम पदार्थ आहेत, त्या सर्वांचा नाश लांकडांचा नाश अग्नि करतो त्याप्रमाणें, मीच करतों. सर्व पृथ्वीचें अथवा स्वर्गाचें राज्य सारखेंच आहे असें ही माझी बुद्धि जाणते. बुद्धि हेंच माझें धन आहे. घर, वन, गुरुगृह

किंवा भिक्षावास, या सर्व ठिकाणीं ब्रह्मवेत्त्यांना एकच मार्ग दिसत असतो व त्याच मार्गानें ज्ञानी पुरुष जात असतात. एकाच ध्येयाकडे नेणाऱ्या अनेक खुणांनीं एका बुद्धीचीच उपासना केली जाते. अनेक लिंगें धारण करून विविध आश्रमांत वास करीत असतांहि ज्यांची बुद्धि शमस्वरूपी असते, ते अनेक नद्या जशा एकाच समुद्रांत वहातात तसे एकाच ध्येयाला सर्व पोंचतात. पण हा मार्ग एका बुद्धीनेंच कळूं शकतो, शरीरानें तो कळून येण्यासारखा नाहीं. कर्मांना आदि व अंत असून तीं शरीराला बांधून टाकतात. यास्तव, हे भाग्यशाली स्त्रिये, तुला परलोकीं कसलेंहि भय रहाणार नाहीं. ब्रह्मभावांत रममाण होऊन तूं माझ्याच स्वरूपांत येऊन मिळशील. १४. २. ३३.

---

## अध्याय ३४ वा.

[ १. ब्राह्मणाचा पत्नीला उपदेश; ज्ञानप्राप्तीचा उपाय. ]

( १ ) **ब्राह्मणी :**—महाराज, आपण सांगितलेल्या या साऱ्या गोष्टी अल्पबुद्धीच्या व अशुद्ध अंतःकरणाच्या मनुष्याला आकलितां येणें शक्य नाहीं. ह्या एका दृष्टीनें लांबलचक तर दुसऱ्या दृष्टीनें छोट्या व संक्षिप्त असून त्यामुळें माझें मन घोटाळ्यांत पडलें आहे. तर जेणेंकरून आपण सांगितलेलें ज्ञान मनांत ठसेल असा कांहीं उपाय मला सांगा. तो आपल्यापासून जाणण्याची माझी इच्छा आहे.

**ब्राह्मण :**—ब्रह्माकडे लाविलेली बुद्धि ही जर खालची अरणी समजलें, तर तिची वरची अरणी म्हणजे गुरु होय. तपश्चर्या व वेदज्ञान यांच्या साह्यानें त्यांच्या मन्थनापासून ज्ञानरूपी अग्नि उत्पन्न होतो.

**ब्राह्मणी :**—क्षेत्रज्ञ संज्ञा असलेलें जें ब्रह्माचें ज्ञापक चिह्न आपण सांगितलें त्याचें ग्रहण कोणत्या उपायानें करतां येईल ? त्याचें तरी लक्षण काय ?

**ब्राह्मण :**—भार्ये, क्षेत्रज्ञाला कांहीं बाह्यचिह्न किंवा गुण नाहीं. त्याचें उत्पत्तिकारणहि अन्य कांहीं दिसत नाहीं. पण मीं एक मार्ग सांगतों, त्यानें कदाचित् त्याचें ग्रहण होऊं शकेल; पण निश्चित काय सांगावें ? त्याला जाणण्याचा योग्य उपाय सांगितला आहे तो म्हणजे श्रवण मनन निदिध्यास हा. भ्रमर जसा फुलाला ओळखतो, तसा या उपायानें तो ओळखून येतो. बुद्ध्यादिकांनीं युक्त असा तो क्षेत्रज्ञ आहे असें कर्मठबुद्धीचे लोक मानतात, कारण

त्यांची बुद्धि म्हणजे या कामीं अवश्य असलेल्या प्रकारची बुद्धिच नसते. या मोक्षमार्गांत अमुक करावें किंवा अमुक करूं नये असा विधि किंवा निषेध सांगण्यांतच येत नाहीं. अनेक गोष्टी पाहून व ऐकून त्यांतून ज्यांपासून आत्म-विषयक बुद्धि उत्पन्न होते, तेवढ्या सर्व व्यक्त किंवा अव्यक्त गोष्टी आपल्याला अनेक रीतींनीं हितकर होतील व प्रत्यक्ष ज्ञान देऊं शकतील अशा पाहून घ्याव्या; म्हणजे त्यांच्या दीर्घ अभ्यासानें, ज्याच्या पलीकडे कांहीं नाहीं अशा उच्च पदाला मनुष्य जाऊन पोंचतो.

श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणतो, 'ब्राह्मणाचें हें भाषण ऐकून क्षेत्रज्ञाच्या ज्ञानाच्या योगानें त्याच्या पत्नीची बुद्धि क्षेत्रज्ञाच्या पलीकडे गेली, व क्षेत्रज्ञ जीवाचा लय परमात्मस्वरूपांत होऊन गेला.'

**अर्जुन**:—कृष्णा, ज्यांनीं अशी सिद्धि मिळविली ती ब्राह्मणस्त्री व तो ब्राह्मण हीं दोघें कोठें आहेत?

**श्रीकृष्ण**:—अर्जुना, माझें मन हाच तो ब्राह्मण व बुद्धि हीच त्याची स्त्री होय; आणि क्षेत्रज्ञ म्हणून जो सांगितला तो तर प्रत्यक्ष मींच! १४. २. ३४.

## ब्राह्मणगीता समाप्त

---

### अध्याय ३५ वा.

[ १. परब्रह्माचें व्याख्यान—गुरु-शिष्यसंवाद ]

( १ ) **अर्जुन**:—कृष्णा, जाणण्यास योग्य असें अत्यंत श्रेष्ठ जें ब्रह्म त्याचें स्पष्टीकरण करून मला सांग. तुझ्या कृपेनें या सूक्ष्म विचारांची माझ्या मनाला आवड उत्पन्न झाली आहे.

**श्रीकृष्ण**:—अर्जुना, याविषयीं मोक्षविषयक गुरुशिष्यसंवादरूप प्राचीन इतिहास सांगतों तो ऐक. संपूर्ण व्रतांचें आचरण करून आचार्यपदवीला पोंच-लेल्या एका ब्राह्मणाला त्याच्या बुद्धिमान शिष्यानें विचारिलें, 'महाराज, मोक्षाच्या उत्कट आकांक्षेनें मी आपल्याला शरण आलों आहें, तरी अत्यंत कल्याणकारक असें काय तें मला सांगा. मी आपल्या पायांवर मस्तक ठेवून मागणें मागतों कीं मी जें विचारितों तें कृपा करून मला सांगा.' शिष्य असें बोलला असतां, गुरु त्याला म्हणाला, 'मुला, तुला ज्याविषयीं संशय आला आहे, तें

सर्व मीं आतां स्पष्ट करून सांगतों.' अर्जुना, गुरूनें असें सांगितलें असतां, त्या गुरुप्रेमी शिष्यानें हात जोडले आणि प्रश्न विचारण्यास आरंभ केला.

शिष्य:—महाराज, मी कोठून आलों? आपण कोठून आलां? सर्वांहून श्रेष्ठ काय आहे? हीं स्थावर जंगम सर्व भूतें कशापासून उत्पन्न झालीं? तीं कशाच्या बळावर जगतात? त्यांचें आयुष्य कोठपर्यंत असतें? सत्य म्हणजे काय? तप म्हणजे काय? सज्जनांनीं कोणते गुण वाखाणिले आहेत? कोणते मार्ग शुभ आहेत व सुख म्हणजे काय आणि दुःख म्हणजे काय? हे भगवन्, या माझ्या प्रश्नाचीं उत्तरें आपण याथातथ्यानें द्यावीं. आपल्यावांचून या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास कोणी योग्य नाहीं. महाराज, आपण धर्मवेत्त्यांत श्रेष्ठ असून मला या ज्ञानाविषयीं मोठी जिज्ञासा उत्पन्न झाली आहे. आपण मोक्षधर्मवेत्ते म्हणून सर्व जगांत प्रख्यात आहां. तेव्हां माझ्या संशयाचें निराकरण करणारा आपल्यावांचून कोण मिळणार आहे? आम्हीं संसाराला भिऊन मोक्षाची इच्छा करीत आहों.

अर्जुना, याप्रमाणें शिष्यानें रीतसर शरण येऊन गुरूला प्रश्न विचारिले असतां गुरूनें त्या सर्वांचीं योग्य उत्तरें त्याला दिलीं; कारण शिष्य गुणी, शांत, आवडता, छायेप्रमाणें गुरूला अनुसरणारा, इन्द्रियांचें दमन केलेला, ब्रह्मचारी व प्रयत्नवादी होता. गुरु म्हणाला, 'अरे, मी जें आतां तुला सांगणार आहें, तें सर्व वेदांना अनुसरून असून प्रत्यक्ष वस्तुस्थिति वर्णन करणारें आहे व मोठमोठ्या ऋषींनीं त्याचें अनुष्ठान केलें आहे. ब्रह्मविषयक ज्ञान हेंच आम्हीं श्रेष्ठ समजतों व संन्यास म्हणजेच उत्तम तप होय. असें हें केव्हांहि असत्य न ठरणारें निश्चित आत्मतत्त्व सर्व प्राणिमात्राच्या अंतर्यामीं आहे असें जो जाणतो, तो पूर्णकाम होतो. जड व चैतन्य हीं व्यवहारांत एकत्र असलीं तरी वस्तुतः भिन्न आहेत, तसेंच जीवात्मा व परमात्मा हे तत्त्वतः एक असूनहि व्यवहारांत भिन्न भासतात. हें ज्याच्या ज्ञानी दृष्टीला दिसतें, तो सर्व दुःखापासून मुक्त होतो. ज्याला कसलीहि अपेक्षा वाटत नाहीं किंवा कशामुळेंहि ज्याला अहंकार येत नाहीं, तो या मृत्युलोकीं असला तरी ब्रह्मपदाला पोंचलेला असतो. ज्याला प्रकृतीच्या गुणांचें ज्ञान झालें व जीवाचें कारणहि समजलें तो ममत्व व अहंकार यांपासून निःसंशय अलिप्त होतो. हा जो संसाररूप मोठा वृक्ष आहे, तो अव्यक्त बीजापासून झालेला असून त्याला बुद्धिरूपी बुंधा आहे; अहंकार हा त्याच्या खांद्या, इंद्रियें हीं अंकुर व ढोल्या, पंचमहाभूतें हीं त्याच्या कळ्या, व स्थूल कार्यें हीं

त्याच्या बारीक फांद्या होत. तो नित्य पानें व फुलें यांनीं भरलेला असून उत्तम फलांनीं सुशोभित झालेला असतो. ब्रह्म हें त्याचें बीज असून त्यावर सर्व प्राण्यांना आश्रय मिळतो. अशा या सनातन संसारवृक्षाला ज्ञानरूपी तरवारीनें छाटून टाकिल्यास जन्ममृत्यूपासून सुटून मनुष्य अमर होतो. भूत, भविष्य व वर्तमान तसेच धर्म, अर्थ व काम याविषयींचें सिद्धांना ठाऊक असलेलें निश्चित ज्ञान पुरातन कालापासून अक्षय असें चालत आलें आहे. हे बुद्धिमान् शिष्या, तें सर्वश्रेष्ठ पदार्चे ज्ञान मी आतां तुला सांगतों. तें जाणिलें असतां सुज्ञांना सिद्धि मिळते. पूर्वी प्रजापति, बृहस्पति, भरद्वाज, गौतम, भार्गव, वसिष्ठ, कश्यप, विश्वामित्र, अत्रि, इत्यादि ऋषि ज्ञानप्राप्तीसाठीं एकत्र जमले व आपआपलीं कर्मे करून तो मार्ग चालल्यावर थकून गेले. शेवटीं ते अंगिरा ऋषीला पुढें करून ब्रह्मलोकीं निष्पाप अशा ब्रह्मदेवाला भेटावयास गेले. तो स्वस्थ बसला होता. त्याला नमस्कार करून मोठ्या विनयानें त्यांनीं त्याला परमकल्याणविषयक हा प्रश्न विचारिला. ते म्हणाले, ‘ कर्म चांगल्या रीतीनें कसें करावें ? पापापासून मुक्ति कशी मिळते ? आम्हांला सुखकर मार्ग कोणते होतील ? सत्य कोणतें व दुष्कृत्य कोणतें ? कोणत्या कर्मांनीं दक्षिण व उत्तर मार्गांची प्राप्ति होते ? प्रलय व मोक्ष म्हणजे काय ? प्राण्यांची उत्पत्ति व नाश हीं कशीं होतात ? ’ शिष्या, त्या ऋषींनीं हे प्रश्न विचारिले असतां ब्रह्मदेवानें जें त्यांना सांगितलें, तेंच वेदानुसारि ज्ञान मीं तुला सांगतों, ऐक.

ब्रह्मदेव म्हणाला, ‘ऋषिहो, सत्यापासून स्थावर जंगम भूतांची उत्पत्ति होते व तपानें त्यांचें जीवन चालतें. आपल्या कर्मांच्या योगानें तीं ब्रह्मापासून सुटून दूर जातात. सत्याचा गुणांशीं संयोग झाला म्हणजे तें पंचविध होतें. ब्रह्म, तप, प्रजापति हीं सारीं सत्यरूपच होत. सत्यापासून भूतांची उत्पत्ति असून भूतमय जग सत्यस्वरूपीच आहे. म्हणून ब्राह्मण सत्यस्वरूपी असून नित्य योगांत दंग असतात व क्रोध व संताप यांचा त्याग करून नियमितपणें धर्मांचें आचरण करतात. ते एकमेकांवर नियंत्रण ठेवतात, विद्यार्जन करतात, धर्मांच्या मर्यादा घालून देतात. लोकांचें नित्य कल्याण करणाऱ्या त्यांना मी उपदेश करतों, त्यांत चार विद्या, चार वर्ण व त्यांचे वेगवेगळे आश्रम यांचें ज्ञान असतें. एकच नित्य असा धर्म असून त्याला चार पाय असतात असें सुज्ञ म्हणतात. ऋषिहो, आतां हितकर मार्ग तुम्हांला सांगतों. पूर्वी ज्ञात्यांनीं ब्रह्मप्राप्तीसाठीं त्याचा अवलंब केला होता. जाणण्यास कठीण असा त्या श्रेष्ठ पदाचा मार्ग समजावून घ्या.

ब्रह्मचाऱ्याचा आश्रम हा पहिला, गृहस्थाश्रम हा दुसरा व वानप्रस्थ हा त्यानंतरचा. त्यापुढील आश्रम अध्यात्म-ज्ञानाच्या प्राप्तीचा म्हणजे संन्यास समजावा. अध्यात्मज्ञान प्राप्त झालें नाहीं तेथपर्यंत तेज, आकाश, आदित्य, वायु, इन्द्र, प्रजापति यांजकडे पहातां येत नाहीं. तें प्राप्त होण्याचा उपाय मीं आतां सांगतों तो समजून घे. फलें, मूलें व वायु यांवर निर्वाह करणाऱ्या वनवासी मुनींचा आश्रम तीन द्विजवर्णीयांना सांगितला असून गृहस्थाश्रम हा सर्व वर्णांना सारखाच सांगितला आहे. श्रद्धा हेंच धर्माचें लक्षण, सुज्ञांनीं सांगितलें आहे. असे हे देवमार्गप्राप्तीचे उपाय विहित असून धर्ममर्यादा म्हणून ज्ञान्यांनीं ते निश्चित केले आहेत. त्यांतील एखादा धर्म स्वतंत्रपणें जो आचरतो, तो कालान्तरानें भूतांची उत्पत्ति व लय यांचें स्वरूप जाणतो. म्हणून आतां विषयांत भागशः असणाऱ्या तत्त्वांचें यथास्थित विवेचन करतों. महत्तत्त्व, अव्यक्त, अहंकार, दहा इंद्रियें, पंच महाभूतें, व त्या पंचभूतांचे विशिष्ट गुण यांना सनातन सृष्टि म्हणतात. त्यांत एक आत्मा मिळविला कीं चोवीस तत्त्वें झालीं. सर्व तत्त्वांची उत्पत्ति व लय हीं ज्याला समजलीं, त्या ज्ञानी पुरुषाला कोठेंहि मोह पडत नाहीं. या तत्त्वांचें ज्ञान याथातथ्यानें झालें व त्यांचे गुण व देवता हीं समजलीं म्हणजे सर्व पाप नष्ट होऊन मनुष्य बंधनांतून सुटतो व त्याला सर्व निष्पाप लोक मिळतात.' १४. २.३५.

---

## अध्याय ३६ वा

[ १. गुरुशिष्य संवादांतील ब्रह्मदेवाचा ऋषींना उपदेश. तमोगुणाचा वृत्तान्त.]

( १ ) **ब्रम्हदेव**:—तें सर्वव्यापि, नित्य व अचल असें अव्यक्त स्थितींतील आत्मतत्त्व तीन गुण व पंचभूतें यांनीं युक्त झाल्यावर नऊ द्वारांचें नगर बनतें. दशेंद्रियें व सर्व भाव व्यक्त करणारें मन अशा अकरांनीं वेढिलेल्या त्या नगरावर बुद्धीचें स्वामित्व असतें. त्या नगरांत शुक्ल, कृष्ण व शुक्लकृष्ण असे तीन प्रवाह असून त्रिगुणात्मक तीन नाड्यांनीं ते वारंवार भरून जातात. तमस् रजस् व सत्त्व यांना तीन गुण म्हणतात. ते एकमेकांशीं जोडी करून एकमेकांच्या आधारानें रहातात. ते एकमेक एकमेकांपासून बीजांकुरांप्रमाणें उत्पन्न होतात व पंचमहाभूतेंहि त्यांच्यापासूनच होतात. तमाचें जोडीदार सत्त्व, सत्त्वाचें रजस् व रजाचें सत्त्व. जेथें तमाचें प्रमाण नियमित होतें तेथें रजाची

प्रवृत्ति होते, व रजाचें नियंत्रण होतें तेथें सत्त्वाचा प्रादुर्भाव होतो. तमोगुण अंधकार रूप, मोहात्मक, अधर्मस्वरूपी, व पापकर्मरत असतो व त्यांत इतरांचाहि थोडा अंश असतो. रजोगुण हा प्रकृतिमय व तमाच्या उलट स्वरूपाचा असून प्राणीमात्रांतील प्रवृत्तीचें व उत्पत्तीचें कारण असतो. प्राणिमात्रांत असणारें ज्ञान, कौशल्य व श्रद्धाळूपणा हें सत्त्वाचें स्वरूप आहे. आतां या गुणांचीं सविस्तर स्वरूपें कारणांसह सांगतों, तीं तत्त्वतः समजून घे. मोह, अज्ञान, कृपणपणा, कर्माविषयीं धरसोड, झोंपाळूपणा, ताठा, भय, हावरेपणा, सत्कृत्याची निंदा, विसराळूपणा, अपक्वबुद्धि, नास्तिकपणा, दुराचार, सारासारविचारशून्यता, हलक्या गुणांची आवड, कांहीं न करतां घमेंड मारण्याची संवय, अज्ञानी असतां स्वतःला ज्ञानी समजणें, वैरभाव, निरनिराळया कर्मांची नावड, अविश्वास, मूर्खपणाच्या कल्पना, वांकडेपणा, अडाणीपणा, पापकर्म, अज्ञान, शरीराचा बोजडपणा, देवादिकांविषयीं अनादर, उच्छृंखळपणा, नीचकर्माविषयीं प्रवृत्ति ह्या सर्व तमोगुणाच्या वृत्ति होत. या लोकीं तामसभाव म्हणून ज्यांना म्हणतात त्या सर्वांचा त्यांत समावेश होतो. म्हणजे देव, ब्राह्मण व वेद यांची निंदा, कृपणपणा, गर्व, मोह, राग, निष्ठुरपणा, मत्सर, खोटीं कर्में, खोटीं दानें, वाईट अन्न खाणें, व्यर्थ बडबड करणें, सहनशीलपणाचा अभाव, इत्यादिकांना तामस वृत्ति म्हणतात. अशाप्रकारचे जे पापकर्मी लोक आहेत, व जे सदाचार पाळीत नाहींत, ते तामसवृत्तीचे होत. ते लोक कोणत्या योनींत जातात तें सांगतों. वृक्षादि स्थावर भूतें, पशु, घोडे, मांसभक्षक प्राणी, सर्प, किडे, कीटक, पक्षी, वेडे, बहिरे, मुके, रोगी हे सारे दुष्ट आचरणाचे, तमोगुणांत बुडून गेलेले, आपल्या कर्मांनीं त्या दशेला पोंचलेले प्राणी होत. त्यांचा चित्तप्रवाह खालीं खालीं जाणारा असतो. ते सर्व तामस जाणावे. त्या स्थितींतून त्यांचा उत्कर्ष कसा होतो, व ते सत्कर्में करावयास लागून पुण्य लोकास कसे जातात तें आतां सांगतों. ते प्राणी असल्या नीच योनींत गेलेले असतां जर शुभेच्छु व आपल्या कर्मांत दंग असलेल्या ब्राह्मणांच्या कर्माला पोषक झाले म्हणजे यज्ञासाठीं त्यांची हिंसा झाली, तर त्या संस्कारगुणामुळें त्यांची गति ऊर्ध्व होऊं लागते व ते देवांच्या स्वर्गास जाऊन सलोकता मिळवितात, असें वेदांत सांगितलें आहे. दुसरा मार्ग असा आहे कीं, ते त्या नीच योनींत असतां आपआपल्या कर्माला जागले तर पुनर्जन्माच्या फेऱ्यांत ते मनुष्यजन्मास जातात. ते प्रथम मनुष्यांतील चांडालादि नीच योनींत जाऊन मुके, बोबडे

असे होतात व त्या स्थितींत आपलीं कर्में नीटपणें करीत राहिल्यानें उत्तरोत्तर उच्च वर्णांत जातात. या क्रमानें शूद्रादि योनी उलटून गेल्यावर, क्रोधादि तामस गुण त्यांच्या चित्तप्रवाहांत येतात, व उपभोगाविषयीं त्याच्या मनांत आसक्ति उत्पन्न होते. अशा प्रसंगीं त्यांनीं जपलें पाहिजे. नाहींतर असल्या सुखांना लाचावल्यामुळें ऋषि, मुनि, देव यांनाहि मोह पडलेला आहे. तम, मोह, महामोह, क्रोध नांवाचा तामस गुण, अंधकारमय मरण, इत्यादि गोष्टी मोठ्या क्लेशकारक आहेत. ब्राह्मणहो, याप्रमाणें तमोगुणाचें स्वरूप तुम्हांला सांगितलें. पण तें योग्य रीतीनें पहाण्याची व जाणून घेण्याची इच्छा फार थोड्यांना असते. जें तत्त्व नव्हे त्याला तत्त्व म्हणणें हें तर तमोगुणाचें मुख्य लक्षण होय. हें जें तमोगुणाचें विविध स्वरूप मीं सांगितलें, तें योग्य प्रकारें जो मनुष्य जाणतो, तो तमोगुणाच्या सर्व प्रकारांपासून मुक्त होतो. १४.२.३६.

---

## अध्याय ३७ वा.

[ १. ब्रह्मदेवाचा ऋषींना उपदेश—रजोगुणाचा वृत्तांत. ]

( १ ) **ब्रह्मदेवः**—ऋषिहो, आतां रजोगुणाचें वर्णन मीं सविस्तर करतों, तें ऐकून त्याचें स्वरूप समजून घ्या. संताप, कटकट, सुखदुःख, थंडीऊन, ऐश्वर्य, भांडणें, वादविवाद, सलोखा, आवडनावड, क्षमा, बळ, शौर्य, अभिमान, क्रोध हेवा, लोभ, लबाडी, माझेपणा, मारामारी, बंधन, क्लेश, विक्रीची देवघेव, फोड, तोड मोड, मर्मभेदक भाषण, कठोर भाषण, आरडाओरड, दुसऱ्याचा उणेपणा काढणें, लोक काय म्हणतात याची काळजी, असत्य भाषण, खोटें दान, दुसऱ्याला टाकून बोलणें, निन्दा, स्तुति, तोंडपुजेपणा, प्रताप, सेवा, शुश्रूषा, आकांक्षा, आश्रय, व्यवहारकुशलता, न्याय, चुकणें, इत्यादि ज्या गोष्टी लोकांमध्यें वेगवेगळ्या प्रकारें दिसून येतात, त्या रजोगुणात्मक होत. पुरुष, स्त्रिया, प्राणी, द्रव्य, आधार यांत दिसणारा संताप, अविश्वास, व्रतें, नियम, काम्य-कर्में, निरनिराळीं लोकोपयोगी कार्यें, स्वाहाकार, नमस्कार, स्वधाकार, वषट्कार, यज्ञ, अध्यापन, दान, प्रतिग्रह, प्रायश्चित्तें, मंगलकार्यें, हें मला हवें तें मला हवें अशी असोशी, गुणानुसारी प्रेम, द्वेष, खोटेपणा, अपमान, मान, चोरी, हिंसा, निंदा, जागरण, संतापणें, दांभिकपणा, अभिमान, आसक्ति, भक्ति, प्रीति, आनंद, द्यूत, जनापवाद, स्त्रीसंबंध, नाचणें, वाजविणें, गाणें इत्यादि प्रसंग, या सर्व प्रकारांना

राजस म्हटलें आहे. भूतवर्तमानभविष्य गोष्टींचा जे नित्य विचार करीत असतात, धमार्थकामांत जे गढून गेलेले असातात, कांहीं इच्छेनें कार्यप्रवृत्त होऊन इच्छापूर्ण झाल्यावर जे आनंदित होतात, ते पुरुष रजोगुणीच असून त्यांचीहि गति खालींच होत असते. यालोकीं पुनः पुनः जन्म घेण्यांतच त्यांना आनंद वाटतो, मरणोत्तरहि ऐहिक लाभच त्यांना पाहिजे असतो व त्याच हेतूनें देणें, घेणें, लोकांना तृप्त करणें, अग्नीला होम देणें इत्यादि कृत्यें ते करतात. असा हा रजोगुणाचा विविध विस्तार असून तो मीं तुम्हांस सविस्तर सांगितला. हे रजोगुणाचे विकार जो मनुष्य चांगले समजून घेतो, तो सर्व प्रकारच्या राजसगुणाच्या परिणामापासून मुक्त होतो. १४. २. ३७.

---

## अध्याय ३८ वा.

[ १ ब्रह्मदेवाचा ऋषींना उपदेश—सत्त्वगुणाचा वृत्तान्त ]

( १ ) ब्रह्मदेव :—ऋषिहो, आतां यापुढें तिसरा जो सत्त्वगुण त्याचा वृत्तान्त तुम्हांला मी सांगतों. सत्त्वगुण सर्व प्राण्यांना हितकर व सज्जनांना अभिप्रेत असा धर्म आहे. आनंद, प्रेम, उत्कर्ष, मोकळेपणा, सुख, औदार्य, निर्भयता, सन्तोष, श्रद्धा, क्षमा, धैर्य, अहिंसा, समताबुद्धि, सत्य, सरळपणा, शांत स्वभाव, निर्मत्सरपणा, शुद्धमन, दक्षपणा, पराक्रम ह्या गोष्टी सत्त्वगुणोत्पन्न होत. वरवरचें ज्ञान, मिथ्याचार, वरकरणी सेवा, व दिखाऊ श्रम यांचें लक्षण पाहून त्यांपासून जो दूर रहातो व धर्माचरणांतच दंग होतो तो इहपरलोकीं अत्यंत सुख भोगतो. ममत्व सोडणें, निरहंकार वृत्ति, निष्कामपणा, सर्वत्र साम्यबुद्धि, निरिच्छपणा, हाच सज्जनांचा सनातन धर्म होय. विश्वास, लाज, सहनशीलपणा, औदार्य, शुद्धि, उद्योगशीलता, दयाळूपणा, सावधानता, प्राण्यांवर दया, निष्कपटपणा, आनंदी वृत्ति, संतोष, नम्रपणा, सदाचरण, सुबुद्धि, शांतिप्रद कर्माची आवड, उदासीन वृत्ति, ब्रह्मचर्य, दानशीलता, ममत्वहीनता, निरिच्छपणा, धर्मत्याग होऊं न देण्यावर कटाक्ष, दान, यज्ञ, अध्ययन, व्रतें, प्रतिग्रह, धर्म, तप, या साऱ्या गोष्टी यथार्थ समजून जे सत्त्वगुणाचा आश्रय करून ब्रह्मचिंतन करतात, ते ब्राह्मण ज्ञानी व दूरदर्शी होत. ते सर्व पापांपासून मुक्त व शोकरहित असे होऊन स्वर्गास जातात व तेथें अनेक शरीरें उत्पन्न करतात. त्यांना अणिमा, लघिमा, स्वामित्व, इत्यादि सिद्धि स्वर्गस्थ देवांप्रमाणें प्राप्त होतात. त्यांना

ऊर्ध्वगतीचे वैकारिक देव असें म्हणतात. त्यांना सर्व इष्ट वस्तु प्राप्त होतात व त्या ते दुसऱ्यांना देतात. ऋषिहो, सत्वगुणाचा असा वृत्तान्त असून तो मीं तुम्हांला सांगितला. याचें योग्य ज्ञान करून घेतल्यानें जें जें इच्छावें तें तें प्राप्त होतें. हें जें सत्वगुणाचें सविस्तर वृत्त मीं सांगितलें, तें जो पुरुष समजून घेतो, तो विषयांचा उपभोग घेऊनहि त्यांत गुंतून पडत नाहीं. १४. २. ३८.

---

## अध्याय ३९ वा.

[ १. ब्रह्मदेवाचा ऋषींना उपदेश–सत्व, रजस् आणि तमस् यांचें वर्णन ]

**ब्रह्मदेवः**—ऋषिहो, सत्त्वादि तीन गुणांचें यथार्थ वर्णन वेगवेगळें करणें शक्य नाहीं. ते तीन्ही तसे पृथक् न दिसतां नित्य एकत्र मिसळलेलेच आढळतात. ते एकमेकांवर अनुरक्त असून एकमेकांपासून उत्पन्न होतात. जेथें सत्त्व आहे, तेथें रजस् थोडें तरी असतेंच व जेथें तमस् आहे तेथें सत्त्व व रजस् हेहि थोडेसे असतातच. ते सारे संघशक्तीनें वागत असूनहि आपआपल्या परीनें वाढत असतात. त्याचें प्रमाण या कारणास्तव अधिक किंवा न्यून कसें होतें तें सांगतों. जेथें नीच योनींत प्राणी असून त्यांत तमाचें प्राबल्य असतें तेथें रजस् अल्पप्रमाणांत व सत्त्व तर त्याहूनहि अल्पप्रमाणांत असतें. मध्यम प्रतीच्या प्राण्यांत जेथें रजोगुणाचें आधिक्य असतें, तेथें तमोगुण बेताचाच असून तत्त्व गुण त्याहूनहि थोडा असतो. ऊर्ध्वगतिचित्ताच्या श्रेष्ठ प्राण्यांत जेथें सत्त्वाचें प्राधान्य असतें, तेथें तमोगुण अल्प व राजस् त्याहूनहि फार अल्प असतो. सत्त्वगुण इंद्रियांमध्यें विकार उत्पन्न करून त्यांच्या विषयांचें त्यांना ज्ञान देणारा आहे. सत्त्वाहून श्रेष्ठ धर्म दुसरा नाहीं. सत्त्वनिष्ठ जे असतात, ते उच्च गतीला जातात, राजस मध्यम गतीस जातात, व अगदीं नीच गुणांनीं युक्त असलेले तामसी अधोगतीस जातात. सामान्यतः शूद्रांत तमोगुण, क्षत्रियांत रजोगुण व ब्राह्मणांत सत्त्वगुण उत्कटतेनें असतो. तीन गुणांची वांटणी तीन वर्णांत अशी असते. एकत्र मिसळून हे तिन्ही गुण चालत असले, तरी लांबूनहि ते वेगवेगळे ओळखूं येतात. सूर्याला उगवलेला पाहिल्याबरोबर चोरांना भय वाटतें व मार्गस्थ प्रवाशांना उन्हाचा त्रास होऊं लागतो. या उदाहरणांत सूर्यप्रकाश हा सत्त्वगुणाचा उत्कर्ष असून चोरांचें भय हें तमोगुण व प्रवासी लोकांना होणारा त्रास हा रजोगुण होय. अमावास्येच्या पर्वणीला सूर्याला लागणारें ग्रहण हा तमोगुणाचा

रिणाम होय. याप्रमाणें इतरहि तेजोगोलांत तिन्ही गुण वागत असून ते आप-
ापल्या पाळीनें क्रमानें येत असतात. वृक्षादि स्थावर वस्तूंमध्यें तमाचें प्राधान्य
ंसून येतें; त्यांत चटकदारस्वरूपी राजस गुण अल्पप्रमाणांत असून तो कारणपरत्वें
ष्टोत्पत्तीस येऊं शकतो; त्यांतील तेलाचा भाग हा सत्त्वगुणाचा अंश होय.
ंवस व रात्र यांतहि त्रिगुणानुसारी तीन प्रकार असतात. तीच स्थिति महिने,
क्ष, वर्षें, ऋतु व संधिकाल यांची आहे. दानें तीन प्रकारचीं म्हणजे सात्त्विक,
ाजस, व तामस अशीं असून यज्ञहि तसेच आहेत. लोक तीन प्रकारचे, देव
ीन प्रकारचे, विद्या तीन प्रकारच्या व गतीहि गुणभेदानें तीन प्रकारच्या आहेत.
ूत, भविष्य, वर्तमान, धर्म, अर्थ, काम, प्राण, अपान, उदान, हेहि सर्व
ेगुणात्मकच होत. ते गुण यथाक्रम त्यांत दिसून येतात. या जगांत जें जें
हणून आहे तें सर्व तीन गुणांचें स्वरूप आहे. ते सत्त्वादि तीन गुण सनातन
ासून अव्यक्तरूपानें त्याचें कार्य नित्य चालू असतें. या अव्यक्ताला तमस्,
यक्त, शिव, रजस्, योनि, सनातन, प्रकृति, विकार, प्रलय, प्रधान, प्रभव,
ाव्यय, अनुद्रिक्त, अनून, अकंप, अचल, ध्रुव, सत्, असत्, अव्यक्त व त्रिगुण
ाशीं नांवें असून अध्यात्मचिंतन करणाऱ्या माणसांनीं तीं समजून घेतलीं पाहि-
ेत. अव्यक्ताचीं नांवें, गुण तशाच गति जो यथार्थपणें समजून घेतो, तो त्यांच्या
वेभागांचें तत्त्व जाणिल्यामुळें देहबंधनांतून सुटून सर्व गुणांपासून अलिप्त
ोत्साता स्वास्थ्य भोगितो. १४. २. ३९.

## अध्याय ४० वा.

[ १. ब्रह्मदेवाचा ऋषींना उपदेश—अव्यक्तापासून महत्तत्त्वाच्या उत्पत्तीचा प्रकार. ]

( १ ) **ब्रह्मदेव:**—अव्यक्तापासून महत्तत्त्वरूपी आत्मा प्रथम उत्पन्न झाला.
ुणांच्या सर्व कार्यांचें मूळ तोच असून त्याला पहिली सृष्टि म्हणतात. या
ात्म्याला महान्, आत्मा, मति, विष्णु, जिष्णु, शंभु, बुद्धि, प्रज्ञोपलब्धि,
्याति, धृति, स्मृति, अशीं पर्यायनांवें आहेत. त्याचें स्वरूप समजून घेणारा
ानी मोहांत पडत नाहीं. त्या महान् आत्म्याला चोहोंकडून हात पाय, डोळे,
ास्तकें व मुखें, तसेंच कर्णहि असून तो सर्व व्यापून राहिला आहे. तो महा-
ाभावी आत्मा सर्वांच्या हृदयांत ठाम रहातो. अणिमा, लघिमा, प्राप्ति या
सेद्धि त्याजपाशीं असून तो सर्वांचा स्वामी व अव्यय ज्योतिरूप आहे. बुद्धिमान्

सद्भावयुक्त, ध्याननिष्ठ, नित्य योगसाधन करणारे, सत्यभाषणी, जितेंद्रिय, ज्ञानी, निर्लोभी, क्रोधाला जिंकिलेले, प्रसन्न मनाचे, धैर्यशाली, माझेंपण टाकिलेले, निरहंकार, असे लोक सर्वमुक्त असून ते महान् आत्म्याच्या पदाला जातात. या महान् आत्म्याला जाणणाराला उत्तम गति मिळते. त्या महान् आत्मस्वरूपी अहंकारापासून पृथ्वी, जल, वायु, तेज व आकाश हीं पंच महाभूतें निर्माण झालीं. त्या पंचमहाभूतांशीं व त्यांच्या गंध, रस, स्पर्श, रूप व शब्द या गुणांशीं संयोग होऊन प्राणी उत्पन्न होतात. त्या महाभूतांचा विनाशकाल आला असतां सर्व प्राण्यांना मोठें भय उत्पन्न होतें. पण महान् आत्म्याचें स्वरूप जाणणारा मोहांत सांपडत नाहीं. हा महान् आत्मा म्हणजे विष्णु आदिसृष्टींत आपणच स्वतः उत्पन्न झालेला सर्वांचा स्वामी आहे. अशा त्या हृदयस्थ पुराणपुरुष, विश्वव्यापी, हिरण्मय, श्रेष्ठ प्रभूला जो जाणतो तो बुद्धिमान् पुरुष बुद्धीच्या पलीकडे जातो. १४. २. ४०.

---

## अध्याय ४१ वा.

[ १. ब्रह्मदेवाचा ऋषींना उपदेश—महतापासून अहंकाराची उत्पत्ति. ]

( १ ) **ब्रह्मदेव** :—ऋषिहो, जो प्रथम उत्पन्न झाला त्या महान् आत्म्याला अहंकार म्हणतात. पण ‘ अहम् ’ म्हणजे मी असें म्हणून तो पुढें आल्यामुळें त्याला दुसरी सृष्टि असें म्हटलें आहे. गुणविकारांतील रजोगुणापासून झालेला हा अहंकार पंचमहाभूतांचें उत्पत्तिस्थान होय. तो तेजोमय, चैतन्यमय, सृष्टि उत्पन्न करणारा, देवांचा स्त्रष्टा, मन व तिन्ही लोक यांना निर्माण करणारा व मीच सर्व आहें असें अभिमानानें म्हणणारा आहे. अध्यात्मज्ञानानें तृप्त झालेल्या व शुद्ध अंतःकरणाच्या मुनींना वेदाभ्यास व यज्ञक्रिया करून हाच लोक मिळवावयाचा असतो. तो अहंकाराच्या योगानें हे सर्व गुणविकार उत्पन्न करून भूतादिकांना निर्माण करतो व गुणविकारांचें आदिकारण असा तो सर्वांची हालचाल घडवून आणून सर्व जग रंगवून सोडतो. १४.२.४१.

---

## अध्याय ४२ वा.

[ १. ब्रह्मदेवाचा ऋषींना उपदेश—अहंकारापासून पंचभूतें, इंद्रियें इत्यादिकांची उत्पत्ति. ]

( १ ) **ब्रह्मदेव**:—अहंकारापासून पृथिव्यादि पंचमहाभूतांची उत्पत्ति झाली. त्या पंचमहाभूतांविषयीं प्राण्यांना मोह होतो. तीं भूतें प्रलय पावूं लागलीं कीं सर्व प्राण्यांना मोठें भय उत्पन्न होतें. जो जेथून उत्पन्न झाला तो त्यांत विलीन होतो. म्हणजे उत्पत्तीच्या क्रमाच्या उलट लयाचा क्रम आहे. या प्रमाणें सर्व स्थावर जंगम सृष्टि विलय पावली, तरी जे ज्ञानी आहेत ते विलीन न होतां त्यांची स्मृति जागृत रहाते. गंध, रस, स्पर्श, रूप व शब्द हे विषय सूक्ष्म अशा मनोरूपानें नित्य आहेत, पण स्थूल रूपानें अनित्य आहेत. फलाच्या लोभानें केलेल्या कर्मांनीं उत्पन्न झालेले पण पंचभूतांपासून तत्त्वतः भिन्न नसलेले, अशाश्वत स्वरूपाचे, मांस, रक्त, इत्यादिकांचे गोळे व परस्परांवर जीवनासाठीं अवलंबून असलेले असे शरीररूपी बहिरात्मे दीन व परावलंबी असतात. प्राण, अपान, उदान, समान व व्यान हे पांच वायु अंतरात्म्याशीं निगडित असून ते व वाचा, मन आणि बुद्धि यांनीं मिळून आठांचें हें जग बनलेलें आहे. त्वचा, घ्राण, श्रोत्र, चक्षु, रसना, नियंत्रित वाणी, विशुद्ध मन, व एकनिष्ठ बुद्धि हे आठ अग्नि ज्याच्या मनाला जाळीत नाहींत तो शुभ ब्रह्माला पोंचतो व तेथून पुनः भवचक्रांत येऊन पडत नाहीं. आतां अहंकारापासून झालेलीं जीं अकरा इंद्रियें त्यांविषयीं विवेचन करतों.

कान, त्वचा, डोळे, जीभ, नाक, दोन पाय, दोन हात, शिश्न, गुद, वाणी व मन अशीं एकंदर अकरा इन्द्रियें असून त्यांच्या समुदायाला प्रथम जिंकावें म्हणजे ब्रह्माचें ज्ञान होऊं लागतें. कर्णादि पांचांना ज्ञानेंद्रियें, व हस्तादिक पांचांना कर्मेंद्रियें म्हणतात. त्या दोन्हींशीं मिळून कार्य करणारें मन आणि बुद्धि ही बारावी. असें हें अकरा इंद्रियांचें वृत्त असून तें ज्यांना समजलें ते कृतकृत्य होतात. आतां या इंद्रियांचा निरनिराळ्या दिशेचा विस्तार सांगतों.

आकाश हें पहिलें महाभूत. तत्संबद्ध इंद्रिय म्हणजे कान, त्याचा विषय शब्द व देवता दिशा होत. दुसरें महाभूत जो वायु, त्याशीं संबंध असलेलें इंद्रिय त्वचा, त्याचा विषय स्पर्श व विद्युत् ही त्याची देवता आहे. तिसरें भूत तेज. त्याशीं संबद्ध असलेलें इंद्रिय म्हणजे चक्षु, त्याचा विषय रूप व

देवता सूर्य होय. चवथें महाभूत जल असून त्याचें इंद्रिय जीभ, विषय रस आणि देवता चंद्र. पृथ्वी हें पांचवें महाभूत असून त्याचें इंद्रिय नाक, विषय गंध व देवता वायु होय. असे या पांच महाभूतांचे तीन प्रकार असतात. आतां कर्मेंद्रियांचा विस्तार कसा आहे तें ऐक.

तत्त्वद्रष्टे ब्राह्मण म्हणतात, पाय हें इंद्रिय, त्याचा विषय चालणें व देवता विष्णु होय. खालीं गति असलेला वायु जो अपान त्याचें इंद्रिय गुद, मलोत्सर्ग हा त्याचा विषय व मित्र त्याची देवता आहे. सर्व प्राण्यांचें उत्पत्तिस्थान जें शिस्न तें इंद्रिय, त्याचा विषय शुक्रधातु व दैवत प्रजापति. अध्यात्मवादी म्हणतात कीं हात हें इंद्रिय, कर्मे हे त्याचे विषय व त्याची देवता इंद्र आहे. सर्वांच्या आधीं उत्पन्न झालेली अशी जी सर्व देवतास्वरूपी वाणी ती इन्द्रिय असून तिचा विषय म्हणजे जें बोलावयाचें तें आणि देवता अग्नि होय. पांचहि महाभूतांत संचार करणारें मन हें इंद्रिय असून त्याचा विषय संकल्प आणि देवता चंद्र आहे. इंद्रिय हें आत्मसंबद्ध म्हणजे अध्यात्म त्याचे विषय हे भूतसंबद्ध म्हणजे अधिभूत आणि त्यांचे प्रेरक देव म्हणजे अधिदैवत असें समजावें. अहंकार हा अध्यात्म असून त्याच्या योगानेंच सर्व संसाराचें अस्तित्व आहे. अभिमान हा त्याचा अधिभूत विषय व रुद्र त्याची देवता आहे. सहाहि इंद्रियांत संचार करणारी बुद्धि ही अध्यात्म, तर विचार हा तिचा अधिभूत विषय व ब्रह्मा तिची देवता होय. प्राणिमात्रांचीं रहाण्याचीं स्थानें भूमि, जल व आकाश हीं तीनच आहेत. चवथें कांहीं नाहीं. त्यांच्या उत्पत्तीचे प्रकारहि जरायुज, अंडज, उद्भिज्ज व स्वेदज असे चारच आहेत. क्षुद्रप्राणी, पक्षी व सर्व प्रकारचे सरपटत जाणारे प्राणी हे अंडज होत. किडे, जन्तु हे स्वेदज समजावे. ऋतुमानानुसार जे भूमींतून बाहेर निघतात ते प्राणी उद्भिज्ज होत. वेडेवांकडे चालणारे दोन पायांचे व चार पायांचे प्राणी हे जरायुज म्हणजे गर्भांतून जन्मास येणारे होत. ब्राह्मण जन्मास येण्याचीं दोन कारणें पूर्वींपासून विद्वान लोक सांगत आले असून, तपश्चर्या व पुण्यकर्मे हीं तीं होत. यज्ञ, दान, वेदाध्ययन अशीं निरनिराळीं कर्मे जन्मलेल्या माणसांसाठीं वृद्धांनीं सांगितलीं असून, तीं जो जाणतो, तो योगी होतो व सर्व पापांतून सुटून जातो हेंहि लक्षांत ठेवा.

हे धर्मज्ञ ऋषिहो, पंचमहाभूतें, त्यांचीं इंद्रियें, विषय व देवता हें जें अध्यात्मज्ञान मीं सांगितलें तें मनानें नीट आकळून ठेवावें. त्या सर्वांचा मनांत

लय झाला म्हणजे जन्ममरणादि संसारांत जीवाला सुख वाटत नाहींसें होतें, ज्यांची बुद्धि ज्ञानसंपन्न झाली आहे त्यांनाच सुख मिळतें.

आतां त्या मनाला क्रमशः सूक्ष्म करून शेवटीं त्याचा लय करणारी जी कल्याणप्रद निवृत्ति ती प्राणिमात्रांत सोप्या किंवा योगासारख्या कडक उपायानें कशी होते तें सांगतों. ज्या वृत्तींत गुण गुणासारखे भासत नाहींत, कशावरहि आसक्ति रहात नाहीं, एकान्ताची आवड वाटते, कसलाहि अडथळा उरत नाहीं, त्या ब्रह्ममय वृत्तीलाच परिपूर्ण सुखावस्था म्हणतात. कांसव आपले अवयव आवरून घेतो त्याप्रमाणें ज्ञानी मनुष्य सर्व वासना आवरून घेतो व रजोगुणांतून सुटून नित्याचा सुखी होतो. वासनांना स्वतःमध्यें विलीन करून निरिच्छ व समदृष्टि होत्साता जो सर्व प्राण्यांशीं मित्रत्वानें वागतो, तो ब्रह्मस्वरूपच होतो. विषयगामी इंद्रियांचा निरोध करून लोकसमूहापासून दूर रहाणाऱ्या मुनींचा अध्यात्मरूप अग्नि प्रज्वलित होतो. इन्धन घालून पेटविलेला अग्नि जसा मोठ्या ज्वाळांनीं प्रकाशतो, त्याप्रमाणें इंद्रियांच्या निरोधानें आत्मा देदीप्यमान होतो. आत्मा प्रसन्न होऊन स्वस्वरूपांतच जेव्हां सर्व भूतें पाहूं लागतो, तेव्हां तो स्वयंप्रकाश होत्साता सूक्ष्माहून सूक्ष्म अशा उत्तम स्थितीला पोंचतो. या नवद्वारांच्या पुरांत म्हणजे शरीरांत अग्नि, रूप, जल, रस, वायु, स्पर्श, पृथ्वी, चिखल, आकाश, शब्द हीं सर्व असून तें रोग व दुःख यांनीं युक्त असतें. त्यांतून पंचेंद्रियांचा प्रवाह वहात असून त्यांत जीव व ईश्वर या दोन देवता आहेत. तें धुळीनें भरलेलें व किळसवाणें असून सत्वादि त्रिगुणात्मक आणि कफवात, पित्त या तीन धातूंचें बनलेलें आहे, व विषयांच्या संसर्गानें तें त्यांत रमून मोहून जातें. भलतीकडेच जाणाऱ्या त्याला प्रसंगीं ताळ्यावर आणणें कठीण असून तें सत्वाच्या म्हणजे बुद्धीच्या आश्रयानें असतें. जगांत फिरणारें कालचक्र तें हेंच. शरीर म्हणजे भयंकर खोल व मोहमय असा सागर असून तें देवांसह सर्व जगाचा पसारा मांडण्यास व तो आवरण्यास समर्थ आहे. काम, क्रोध, भय, लोभ, द्वेष, असत्य हे टाकण्यास कठीण असून इन्द्रियांच्या निरोधानेंच ते टाकतां येतात. ज्यानें हे तीन गुण व पंच धातु जिंकले त्याला स्वर्गांत अंतरहित असें स्थान मिळतें. पांच इंद्रियें हींच जिचीं तीरें, मन हेंच वेगानें धांवणारें जिचें पाणी, मोह हा जिच्यांतील डोह अशी शरीररूपी नदी ओलांडून कामक्रोधांवर जय मिळवावा, म्हणजे सर्व पापांतून सुटका होऊन श्रेष्ठ असें ब्रह्म दिसूं लागतें. मनाशीं मन जुळवून व आत्म्यांत आत्म्याला पाहून जो सर्वांचें ज्ञान करून

घेतो, त्याला स्वतःमध्येंच आत्मस्वरूप दिसूं लागतें. एका दिव्याचीं अनेक रूपें दिसावीं तशीं एका आत्म्याचीं अनेक रूपें आहेत असें तो पहातो. मग तोच विष्णु, मित्र, वरुण, अग्नि, प्रजापति, धाता, विधाता, सर्वांचा स्वामी, सर्वांचें हृदय होऊन महान् अशा आत्मरूपानें प्रकाशतो. ब्राह्मणसमुदाय, देव, असुर, यक्ष, पिशाच, पितर, पक्षी, राक्षस, भूतगण, महर्षि असें सर्व जण त्याची नित्य स्तुति करतात. १४. २. ४२.

---

## अध्याय ४३ वा.

[ १. ब्रह्मदेवकृत विभूतिकथन. २ धर्मलक्षण. ३ इन्द्रियें विषयांचें ग्रहण कसें करतात. ४ क्षेत्रज्ञाचें लक्षण. ]

( १ ) **ब्रह्मदेव**—ऋषिहो, मनुष्यांमध्यें त्या ईश्वराची विभूति म्हणजे रजोगुणप्रधान क्षत्रियकुलोत्पन्न राजा होय. वाहनांत हत्ती, अरण्यवासी क्रूर पशूंत सिंह, ग्रामपशूंत मेंढा, आणि बिळांत रहाणाऱ्या प्राण्यांत सर्प, अशा त्याच्या विभूति आहेत. गोजातींत बैल, मनुष्यांत पुरुष, वृक्षादिकांत वड, जांभूळ, पिंपळ, सावर, शिंशप ( शिसवा किंवा अशोक ), मेषशृंग ( मेढशिंगी ), बांबू (कळक) हे श्रेष्ठ होत. पर्वतांमधील राजे हिमालय, पारियात्र, सह्य, विन्ध्य, श्वेत, नील, भास, कोष्ठवान्, गुरुस्कंध, महेन्द्र व माल्यवान् हे होत. गणांत मरुत् श्रेष्ठ असून ग्रहांत सूर्य, नक्षत्रांत चंद्र, व पितरांमध्यें यम श्रेष्ठ आहे. नद्यांचा राजा समुद्र, जलांचा वरुण, मरुतांचा इंद्र, उष्णपदार्थांचा अर्क, ज्योतींचा चंद्र व भूतांचा राजा अग्नि होय. ब्राह्मणांत बृहस्पति श्रेष्ठ असून औषधींचा राजा सोम व बलवानांत श्रेष्ठ विष्णु आहे. रूपांचा स्वामी त्वष्टा असून पशूंचा स्वामी शिव होय. दीक्षितांचा यज्ञ, देवांचा इंद्र, दिशांमध्यें उत्तर दिशा, विप्रांमध्यें सोम, सर्व रत्नांचा स्वामी कुबेर, आणि प्रजांचा प्रजापति असे स्वामी आहेत. सर्वांचा स्वामी ब्रह्ममय असा मीच मोठा आहें. माझ्याहून किंवा विष्णूहून थोर असें कांहीं नाहीं. ब्रह्ममय विष्णु हाच सर्व राजांचाहि राजा आहे. मनुष्यें, किन्नर, यक्ष, गंधर्व, सर्प, राक्षस, देव, दानव, नाग, या सर्वांचा स्वामी विष्णु हाच एक असून तो सर्वांचा उत्पत्तिकर्ता आहे, त्याला कोणीच उत्पन्न केलेलें नाहीं. मग देवाच्या उपासक ज्या स्त्रिया त्या सर्वांत श्रेष्ठ म्हणजे

महादेवी पार्वती होत. स्त्रियांमध्यें शुभ व उत्तम जशी देवी उमा, तशी आवडी-मध्यें धनाची आवड व स्त्रियांमध्यें अप्सरा श्रेष्ठ होत. राजे धर्म व काम यांचे भोक्ते असून ब्राह्मण धर्ममर्यादा घालून देणारे होत. यास्तव राजानें ब्राह्मणांच्या रक्षणासाठीं शक्य तेवढें झटावें. ज्या राजांच्या राज्यांत साधु-ब्राह्मणांची अवहेलना होते, ते सर्व गुणहीन होऊन त्यांना मरणोत्तर वाईट गति मिळते. उलट ज्या राजांच्या राज्यांत साधूंचें रक्षण होतें, ते या लोकीं आनंद भोगून परलोकीं सुखी होतात. हें जो जाणतो त्याला विश्वाचें ऐश्वर्य मिळतें.

( २ ) ऋषिहो, आतां या पुढें धर्मांचें निश्चित लक्षण सांगतों. अहिंसा हा श्रेष्ठ धर्म असून हिंसा हें अधर्माचें लक्षण होय. प्रकाश म्हणजे ज्ञान हें देवांचें लक्षण असून मनुष्याचें लक्षण कर्म हें आहे. आकाशाचें लक्षण शब्द व वायूचें स्पर्श. त्याचप्रमाणें तेजाचें लक्षण रूप व पाण्याचें लक्षण रस म्हणजे चव हें होय. सर्व भूतमात्रांचें धारणपोषण करणारी जी पृथ्वी तिचें लक्षण गंध म्हणजे वास हें असून स्वरव्यंजनव्यवस्थेनें सुसंस्कृत झालेल्या वाणीचें लक्षण शब्द होय. मनाचें लक्षण विचार व विचाराचें लक्षण बुद्धि. मनानें ज्या गोष्टींचें चिंतन करण्यांत येतें, त्या बुद्धीनें निश्चित होतात. बुद्धि निश्चयाच्या योगानेंच समजून येते. मनाचें लक्षण ध्यान आहे, पण साधूचें लक्षण मात्र अव्यक्त असतें. योगाचें लक्षण कर्मप्रवृत्ति व ज्ञानाचें लक्षण कर्मसंन्यास. यास्तव ज्ञानप्राप्तीच्या उद्देशानें बुद्धिमान् पुरुष यालोकीं कर्माचा संन्यास करतो. ज्ञानयुक्त होऊन कर्मसंन्यास करणाराला उत्तम गति प्राप्त होते व तो द्वंद्वांच्या पलीकडे जाऊन तम, जरा, मृत्यु यांतून सुटतो. याप्रमाणें धर्माचें लक्षण मीं तुम्हाला रीतसर सांगितलें.

( ३ ) आतां यापुढें इंद्रियें विषयांचें ग्रहण कसें करतात तें सांगतों. पृथ्वीचा गुण जो गंध तो घ्राणाकडून घेतला जातो व तें गंध जाणण्याचें काम घ्राणेंद्रियांतील वायूकडे सोपविलेलें असतें. जलांतील तत्त्व जो रस तो जिभेकडून घेण्यांत येतो व तो जाणण्याचें कार्य जिभेंत असलेल्या सोमाकडे दिलेलें आहे. तेजाचा गुण रूप; तें चक्षुरिंद्रियाकडून पाहिलें जातें व चक्षुरिंद्रियांत असलेला आदित्य तें रूप जाणण्यास लाविलेला आहे. वायूंतील स्पर्शगुण त्वचा घेते व तिच्यांतील तो गुण जाणण्याचें कार्य स्पर्श करीत असतो. आकाशाचा गुण शब्द असून त्याचें ग्रहण कानाकडून होतें, व कानांतील सर्व दिशांकडे शब्द ओळखण्याचें काम दिलेलें आहे. मनाचा गुण विचार करणें हा असून बुद्धीकडून तो विचार केला जातो व हृदयांत जें चैतन्य आहे त्याकडे तें काम सोंपविण्यांत

आलें आहे. निश्चयाच्या योगानें बुद्धि व ज्ञानाच्या योगानें महान् आत्मा यांच्या अस्तित्वाचें ज्ञान होतें; पण वस्तुतः तीं दोन्ही अव्यक्त आहेत, यांत संशय नाहीं. निर्गुण व नित्य असा जो क्षेत्रज्ञ आत्मा त्याचें ज्ञान कोणत्याहि व्यक्तलक्षणावरून होत नाहीं. तो केवळ ज्ञानलक्षण आहे, म्हणजे ज्ञान होतें या गोष्टीवरून आत्म्याचें अस्तित्व समजून येतें. गुणांचें उगमस्थान व लयस्थान अव्यक्तच असतें. आत्मस्वरूप नित्य अव्यक्त स्थितींतच राहून पहाण्याचें, जाणण्याचें व ऐकण्याचें काम करतें. पुरुषाला तें समजतें म्हणून त्याला क्षेत्रज्ञ म्हणतात. त्या क्षेत्रज्ञाला गुणाचीं कार्यें दिसतात. जिला आदि, मध्य व अंत आहेत, अशा अचेतन सृष्टीला वारंवार उत्पन्न होणारे गुण जाणत नाहींत. दुसऱ्या कोणाला सत्य अशा आत्म्याची कल्पना येत नाहीं, ती क्षेत्रज्ञालाच येते. विषयांशीं तद्रूप झालेल्या इंद्रियांना आपल्या पलीकडे असलेल्या त्या महत्तत्त्वाचें ज्ञान होणें शक्य नाहीं. या कारणास्तव दृश्य विषय व बुद्धि यांचा त्याग करून धर्मवेत्ता दोष नाहींसे करतो व गुणाच्या पलीकडे जाऊन क्षेत्रज्ञांत प्रविष्ट होतो. मग त्याला द्वंद्वांची बाधा होत नाहीं, देवपूजन व यज्ञयाग करण्याची आवश्यकता रहात नाहीं व असा तो स्थिर व सर्वव्यापी क्षेत्रज्ञ सर्वश्रेष्ठ समजला जातो. १४. २. ४३

---

## अध्याय ४४ वा.

[ १. विषयांच्या उत्पत्तीचीं कारणें. २ भूतमात्राचें आदिकारण. ]

( १ ) **ब्रह्मदेव**:—ऋषिहो, ज्याला आदि, मध्य व अंत आहेत व जें कर्मानें साध्य होण्याजोगें आहे तें सर्व त्याचीं नांवें व लक्षणें यांसह मी आतां सांगतों. प्रथम दिवस, मग रात्र येते; महिन्यांचा आरंभ शुक्लपक्षापासून होतो. श्रावणापासून नक्षत्रांना आरंभ होतो. शिशिरापासून ऋतुचक्र चालू होतें; पृथ्वीपासून गंध उत्पन्न होतात; जलापासून रस म्हणजे चवी उत्पन्न होतात; रूपें म्हणजे रंग यांची उत्पत्ति सूर्य या ज्योतीपासून आहे. वायूपासून स्पर्शाचा उगम होतो व आकाशापासून शब्दाची उत्पत्ति होते. असे हे गुण पंचमहाभूतांपासून उत्पन्न होतात.

( २ ) आतां पंचमहाभूतें कशापासून होतात तें सांगतों. तेजांचें उत्पत्तिस्थान सूर्य होय. भूतांचें कारण अग्नि आहे. सर्व विद्यांचें मूळ सावित्री व देवतांचें

मूळ प्रजापति ब्रह्मदेव. सर्व वेदांचें मूळ ओंकार व वाणीचें मूळ प्राण होय. या लोकीं जें कांहीं उपासनासाधन ठरलेलें आहे, तें सर्व सावित्रीरूप आहे. गायत्री ही छंदांचें मूळ असून प्रजांचें मूळ सृष्टि होय. चतुष्पाद प्राण्यांत पहिली गाय असून मनुष्यांत ब्राह्मण पहिला होय. पक्ष्यांतील पहिला ससाणा असून यज्ञांचें मूळ उत्तम दान होय. सरपटणाऱ्या सर्व प्राण्यांत वासुकि नाग पहिला आहे. साऱ्या युगांत कृतयुग पहिलें असून रत्नांत पहिलें स्थान सोन्याचें व औषधींमध्यें तें यवांचें आहे. सर्व प्रकारच्या खाद्यवस्तूंत अन्न श्रेष्ठ आहे, तसें पातळ पेयवस्तूंत जल श्रेष्ठ होय. सर्व स्थावरवस्तूंत पवित्र व ब्रह्माचें स्थान असा पिंपरीचा वृक्ष श्रेष्ठ आहे. सर्व प्रजापतींत मी निःसंशय श्रेष्ठ असून माझें उत्पत्तिस्थान अचिंत्य व स्वयंभू असा विष्णु होय. सगळ्या पर्वतांत आधीं उत्पन्न झालेला महामेरु आहे, तशी सर्व दिशा व उपदिशा यांत पहिली पूर्वदिशा होय. नद्यांत पहिली उत्पन्न झालेली जशी गंगा, तसा सर्व जलाशयांत पहिला समुद्र आहे. देव, दानव, भूत, पिशाच, सर्प, राक्षस, मनुष्य, किन्नर व यक्ष या सर्वांचा स्वामी ईश्वर म्हणजे रुद्र होय. साऱ्या विश्वाचें मूळ कारण ब्रह्मस्वरूपी महाविष्णु असून त्याच्या पलीकडे असें त्रैलोक्यांत कांहीं अस्तित्वच नाहीं. सर्व आश्रमांत गृहस्थाश्रम निःसंशय उत्तम होय. लोकांचें मूळ कारण अव्यक्त असून सर्वांचा लय त्यांतच होतो. दिवसाचा शेवट रात्रींत होतो, तसा रात्रीचा शेवट सूर्योदयांत होतो. सुखाच्या अन्तीं नित्य दुःख असतें, तसें दुःखाच्या अन्तीं सुख असतें. सर्व प्रकारचे सांठे संपेपर्यंतच टिकतात तसे सर्व प्रकारचे उत्कर्ष पतनापर्यंतच टिकले म्हणावयाचे. संयोगाच्या अंतीं वियोग ठेवलेला आहे, तसें जीविताच्या अंतीं मरणहि उभें आहे. जें जें म्हणून कृत्रिम आहे त्याला नाश आहे व जन्मलेल्याला मरण आहे. स्थावर असो कीं जंगम असो या लोकींची प्रत्येक वस्तु क्षणिक आहे. देवपूजन, दान, तप, वेदाभ्यास, व्रतें व नियम हीं सर्व नाश पावणारीं असून एका ज्ञानाला मात्र अंत नाहीं! म्हणून शुद्ध ज्ञानाची प्राप्ति झाल्यानें मन शांत होऊन इंद्रियांवर जय मिळतो व मनुष्य ममत्व आणि अहंकार यांतून सुटून सर्व पापांपासून मुक्त होतो. १४.२.४४.

---

## अध्याय ४५ वा.

[ १. कालचक्राचें वर्णन. २ गृहस्थाचे धर्म. ]

( १ ) **ब्रह्मदेवः**—ऋषिहो, शरीररूपी हें कालचक्र सारखें फिरत असून त्यांतील सार बुद्धि आहे. त्याचा तुंबा मन असून इंद्रियसमूह हा त्याच्या आरा होय. पंचमहाभूतांचें तें बनलें असून घर ही त्याची धाव आहे. वृद्धपणा, दुःख, रोग, संकटें यांना तें उत्पन्न करीत असून देशकालाप्रमाणें भ्रमण करतें व श्रम आणि व्यायाम हे त्याचे शब्द आहेत. अहोरात्र हें त्याला गति देणारें असून त्याच्या भोवतीं शीत व उष्ण यांचा गराडा आहे. सुखदुःखांचे सांधे त्यांत जुळविलेले असून भूक व तहान हे खिळे त्यांत ठोकलेले आहेत. छाया व प्रकाश हे त्याचे चाकोरे उमटलेले असून डोळ्यांच्या उघडझापीमुळें तें विह्वल झालेलें असतें. भयंकर मोहाचें जाळें त्याच्याभोंवतीं पसरलें असून तें सतत फिरतें आहे. महिने व पक्ष यांनीं त्याचें माप होत असून मनुष्य, पशु इत्यादि विविध रूपांनीं तें जगांत वावरतें. तमोगुणयुक्त नियमांचा चिखल त्याला लागलेला असून रजोगुण त्याला गति देत असतो. महा अहंकाराच्या योगानें तें प्रकाशित होतें व सत्त्वादि गुणांमुळें त्याची व्यवस्था रहाते. तें खेदाच्या बंधनांनीं आंवळलेलें असून शोक व नाश यांमधून फिरत आहे. कारणकार्यभावानें जें जखडलेलें असून आसक्तीच्या विस्ताराइतकें तें लांब होतें. लोभ व हांव यांच्या खांच-खळग्यांतून चालल्यामुळें त्याला हिसके बसतात व विचित्र अज्ञान म्हणजे जी माया तीपासून याची उत्पत्ति आहे. भय आणि मोह यांनीं तें घेरलेलें असून प्राण्यांना तें भ्रम पाडीत असतें. बाह्य विषयांच्या आनंदानें तें चालत असून काम व क्रोध ही त्याची द्रव्यप्राप्ति आहे. महत्तत्त्व व त्याचे विकार यांनीं तें बनलेलें असून अनिर्बंधपणें तें उत्पत्ति व नाश करीत असतें. त्याचा वेग मना-सारखा व कान्तिहि तशीच असते. हें द्वंद्वांनीं युक्त असलेलें अचेतन कालचक्र देवांसह सर्व जगाला उत्पन्न करतें, त्याचा लय करतें व त्याला ज्ञानहि देऊं शकतें. त्याची प्रवृत्ति व निवृत्ति हीं जो जाणतो त्याला या जगांत कधीं मोह पडत नाहीं. तो सर्व संस्कारांपासून सुटून द्वंद्वांतून व पापांतून मोकळा होतो आणि उत्तम गतीस जातो.

( २ ) ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व भिक्षावृत्तीचा संन्यास हे चार आश्रम सांगितले असून त्यांना सर्वांना गृहस्थाश्रमाचा आधार असतो. जें कांहीं विधिनि-

षेधात्मक शास्त्र जगांत सांगितलेलें आहे, त्याचा शेवटपर्यंत पाठपुरावा करणें हितावें असून तशी सनातन धर्माची आज्ञा आहे. संस्कारांनीं नीटनेटका होऊन व्रतांचें यथाशास्त्र आचरण केल्यावर तत्त्वज्ञ पुरुषानें ब्रह्मचर्याश्रम पुरा करून आपल्या जातींतील गुणयुक्त कन्येशीं विवाह करावा व नित्य स्वस्त्रीरत राहून इंद्रियें स्वाधीन राखावीं व शिष्टाचार पाळून श्रद्धापूर्वक पंचमहायज्ञांचें सतत अनुष्ठान करावें. देवता व अतिथी यांना अर्पण केल्यावर उरलेलें अन्न आपण भक्षावें व वेदाभ्यास आणि वेदविहित कर्मे यांत गढून राहून यथाशक्ति यज्ञ, दान, हीं करीत रहावें. हात, पाय, डोळे, बोलणें-चालणें या बाबतींत चंचलपणा सोडून देणें हें शिष्टाचें लक्षण होय. यज्ञोपवीत नित्य धारण करून शुभ्र वस्त्रें अंगावर घ्यावीं, आचरण शुद्ध ठेवावें, नियम व दान यांनीं स्वतःचें नियंत्रण करावें, व नित्य शिष्टांचीच संगति करावी. इंद्रियें जिंकून सर्वांशीं मित्रत्वानें वागावें व शिष्टाचार पाळून कळकाची काठी व पाण्याचा कमण्डलु हीं जवळ बाळगावीं. स्वतः अध्ययन, यजन व दान करून तीं इतरांकडूनहि करवावीं व अशा रीतीनें ब्राह्मणाला सांगितलेले सहा धर्म पाळावे. या सहांतून यजन, अध्यापन व शुद्ध वर्तनाच्या माणसांकडून मिळणाऱ्या दानाचा स्वीकार हीं तीन कर्में ब्राह्मणाच्या उपजीविकेसाठीं सांगितलीं आहेत. इतर तीन म्हणजे यजन, अध्ययन व दान हींच खरीं धर्मोत्पादक होत. त्यांत धर्मवेत्त्यानें कधीं चूक करूं नये. सर्व प्राण्यांशीं मित्रत्वानें व समत्वानें वागून क्षमाशील असावें. अशा प्रकारें जो ब्राह्मण शुद्ध भावानें यथाशक्ति आचरण करील तो गृहस्थाश्रमांतहि या व्रताच्या आचरणानें स्वर्ग जिंकील. १४. २. ४५.

---

## अध्याय ४६ वा.

[ १. ब्रह्मचाऱ्याचे धर्म. २ वानप्रस्थाचे धर्म. ३ संन्याशाचे धर्म. ]

( १ ) ब्रह्मदेव—याप्रमाणें पूर्वीं सांगितलेल्या मार्गानें अध्ययन करीत ब्रह्मचर्य पाळावें. गुरूला आवडेल व हितकारी असेल तें नित्य करावें, सत्य बोलावें व शुद्ध रहावें. गुरूनें अनुज्ञा दिल्यावर समाधानानें अन्न ग्रहण करावें व बसणें उठणें खेळणें हे सर्व व्यवहार नीटपणें चालवावे. शुद्ध होऊन प्रतिदिवशीं अग्नीला दोन वेळां आहुती द्यावी. बेलाचा किंवा पळसाचा दंड घ्यावा, कापसाचें वस्त्र किंवा मृगाचें कातडें पांघरावें व तें भगवें असावें. मुंज गवताची मेखला

बांधावी, जटा राखाव्या व त्रिकाळ स्नान करावें. नित्य वेदाभ्यास करावा, यज्ञोपवीत घालावें, लोभ धरूं नये, व शुद्ध पवित्र जलानें देवतर्पण करावें. असें आचरण मन:पूर्वक करणारा ब्रह्मचारी प्रशंसेस पात्र होतो.

( २ ) त्याप्रमाणें योग्य आचरणानें वानप्रस्थानेंहि जितेंद्रिय राहून उत्तम गति मिळवावी म्हणजे त्याला उच्च स्थान प्राप्त होऊन तो जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त होतो. सर्व संस्कारांनीं पवित्र होऊन ब्रह्मचर्याचें पालन करणाऱ्या वानप्रस्थानें गांवांतून बाहेर पडून अरण्यांत एकीकडे रहावें. त्यानें मृगचर्म किंवा वल्कलें पांघरावीं, सकाळ-संध्याकाळ स्नान करावें व गांवांत न येतां अरण्यांतच फिरावें. योग्य काळीं अतिथींचा सत्कार करावा, व आश्रय मागणाराला तो द्यावा. त्यानें फळें, पाला, मुळें व देवभात यांवर निर्वाह करावा. आळस न करतां दीक्षेला अनुसरून क्रमानें, वहाणारें पाणी, वायु इत्यादि केवळ वनांतील पदार्थांवरच निर्वाह करावा. मुळें फळें यांचीच भिक्षा घालून अतिथींचा सत्कार करावा. आपण जें खातों त्यांतीलच भिक्षा घालावी, त्यांत आळस करूं नये. देवता व अतिथि यांना प्रथम अन्नदान करून मग आपण मौन धरून जेवण करावें. कोणाशीं स्पर्धा करण्याचा विचार करूं नये, बेतानें खावें. देवतांचा आश्रय करावा. सर्वांशीं क्षमाशील राहून मित्रत्वानें वागावें, स्वतःचें दमन करावें, जटा व दाढी वाढवावी आणि वेदाभ्यास करीत व अग्नीला आहुति देत सत्य व धर्म यांत गढून जावें. देह स्वच्छ ठेवावा, वनांत दक्षपणें व समाधानानें रहावें. अशा रीतीनें वानप्रस्थ इंद्रियजय करून योग्यमार्गाचें आचरण करील तर तो स्वर्ग जिंकील.

( ३ ) मनुष्य ब्रह्मचारी असो, गृहस्थ असो वा वानप्रस्थ असो, त्याला मोक्षप्राप्तीची इच्छा असल्यास त्यानें उत्तम प्रकारचें आचरण ठेविलें पाहिजे. त्यानें सर्व प्राणिमात्राला अभय देऊन त्यांना सुखी करण्यास झटावें व सर्व इंद्रियें ताब्यांत ठेवून निष्कर्मी म्हणजे निष्कामकर्मी व्हावें; कांहीं संकल्प न करतां अयाचितपणें जें सहज भिक्षेनें मिळेल तेवढेंच घ्यावें. भिक्षा मागावयाची ती दुपारानंतर गृहस्थांच्या घरीं सर्वांचीं जेवणें होऊन विस्तव विझविल्यावर व भांडीं घासून धुवून उपडीं घालून ठेवल्यावरच मोक्षेच्छूनें मागावी. ती मिळाली असतां हर्ष मानूं नये व न मिळाल्यास कष्टी होऊं नये. केवळ जीव जगण्यापुरती भिक्षा मागावी, अधिक मागूं नये. भिक्षा मागतांना ठराविक वेळ वाट पहावी व समाधानानें ती मागावी. भागीदारीनें भिक्षा मागूं नये व जेथें विशेष सत्कार होतो, तेथें भोजन करूं नये. भिक्षा मागणारानें अतिसत्काराचा कंटाळा करावा; उष्टें

तिखट, तुरट व कडु अन्न खाऊं नये व गोड चव घेतघेत जेऊं नये; जीव जगून प्राणधारण होईल एवढेंच खावें व कोणाशींहि विरोध येणार नाहीं अशा रीतीनें निर्वाह चालवावा. दुसऱ्या कोणाचें तरी ठरलेलें अशा अन्नाची केव्हांहि इच्छा त्यानें करूं नये व धर्माचें प्रदर्शन न करतां रजोगुणाचा त्याग करून एकान्तींच त्याचें आचरण करावें. रिकाम्या घरांत, अरण्यांत, वृक्षाखालीं किंवा नदीतीरीं धर्म करावा. नाहींतर पर्वताच्या गुहेंतच रहावें. ग्रीष्मऋतूंत एका गावीं एकच रात्र रहावें व पावसाळ्यांत मात्र एका ठिकाणींच नित्य रहावें. सूर्यप्रकाश जो मार्ग दाखवील, त्या मार्गानें किड्यांप्रमाणें पृथ्वीवर फिरावें आणि प्राणिमात्रावर दया करण्याकरितां विचार करीत हिंडावें. जवळ द्रव्यसंचय करूं नये, स्नेह्याच्या घरीं राहूं नये. मोक्षवेत्त्यानें शुद्ध व पवित्र जलानें आपलीं सर्व कार्यें करावीं. जलाशयाच्या बाहेर पाणी काढून स्नान करावें. अक्रोध, ब्रह्मचर्य, सत्य, सरळपणा, शांति, निर्मत्सरपणा, दम, निष्कपटपणा, या आठ व्रतांत इन्द्रियनियमनपूर्वक दंग असावें. निष्पाप, निष्कपट, सरळ असेंच वर्तन नित्य ठेवावें. घरीं आलेल्याला संतोषानें घांसभर अन्न द्यावें. धर्मानें मिळालेलें अन्नच भक्षावें जिभेचे चोचले चालवूं नयेत. पोटाला अन्न व पांघरावयास वस्त्र यांहून अधिकाचा स्वीकार करूं नये. पोटाला लागेल त्याहून अधिक घेऊं नये व कोणाला दान देऊंहि नये. लोकांच्या दैन्याचा विचार करून आपल्या जवळ असलेल्यांत त्यांना वांटेकरी करावें, त्यांच्यापासून कांहीं घेऊन बळकावूं नये. एखाद्या विषयांचा उपभोग घेतल्यावर त्याची पुनः इच्छा करूं नये. काम लागलें असतां माती, पाणी, अन्न, पानें, फुलें, फळें हीं उघड्यावर असून कोणाच्या स्वामित्वाचीं नसतील तर घ्यावीं. कलाकौशल्यावर पोट भरूं नये व सोन्याची हाव धरूं नये; कोणाचा द्वेष करूं नये; कोणाचाहि उपदेशक न होतां निःसंग बनावें. अन्न श्रद्धेनें पवित्र करून भक्षावें व वादाचे प्रसंग टाळावे. आसक्ति सोडून सर्वांशीं गोड वागावें. फलेच्छायुक्त व हिंसात्मक असें कोणतेंहि कर्म व लोकसंग्रहाचा धर्म स्वतः आचरूं नये व कोणाला आचरावयास सांगूं नये. सर्व गोष्टींचा त्याग करून लीन होऊन फिरावें व सर्व प्राण्यांशीं समभाव ठेवावा. कोणाला उद्वेग देऊं नये व कोणामुळें उद्विग्न होऊं नये. असें वागल्यास मनुष्य सर्वांच्या विश्वासास पात्र होऊन मोक्षज्ञानी बनतो. पुढें होणाऱ्याची चिन्ता व होऊन गेलेल्याची काळजी कधीं करूं नये. समाधानानें वागून काळाची वाट पहावी व दिसणाऱ्या गोष्टींसंबंधानें उदासीन रहावें. दृष्टीनें, मनानें वा वाणीनें कोणाला दूषण देऊं नये व कोणाच्या

समक्ष वा परोक्ष कांहीं दुष्टपणाहि करूं नये. कांसव आपले अवयव आवरून घेतो त्याप्रमाणें तत्त्ववेत्त्यानें आपलीं इन्द्रियें आवरून व मन आणि बुद्धि यांच्यासह त्यांना दुर्बळ करून निरिच्छ व्हावें. अशा रीतीनें द्वंद्वातीत, कर्मातीत, निरहंकार व आत्मसंतुष्ट झालेला तत्त्वज्ञ निःसंशय मुक्त होतो. ज्याला हातपायादि इन्द्रियें नाहींत, जो गुणधर्मादिकांपासून अलग आहे, ज्याला कसली उपाधि नाहीं, गन्धादि विषयांशीं ज्याचा संबंध नाहीं, जो हाडामांसाचा बनलेला नाहीं, जो चिन्तारहित दिव्य अव्यय आहे त्या सर्व प्राण्यांच्या अंतरात्म्याला जे पहातात ते जन्मरणापासून मुक्त झाले म्हणून समजावें. त्या ठिकाणीं बुद्धीला, इंद्रियांना व देवतांना जातां येत नाहीं, तसाच वेद, यज्ञ, स्वर्गादि लोक, तप, व्रतें यांचाहि प्रवेश होत नाहीं. ज्ञानवंतांना त्याचें ज्ञान कोणत्याहि अनुमानानें न होतां प्रत्यक्षच होतें. म्हणून त्याचा साक्षात्कार करून देणाऱ्या धर्माचें मोक्षेच्छूनें आचरण करावें. गृहस्थ-धर्मानें ज्ञानी वागत असला तरी ज्ञानाशीं विरोधी असें त्याचें आचरण अस-ण्याचें कारण नाहीं. मूर्खपणा न करतां व धर्माला दोष न देतां त्याचें आचरण करावें. सज्जनांच्या धर्माची निंदा न करतां दुसरे मात्र आपला अपमान करतील असें वर्तन शांत मनुष्यानें ठेवावें. असें वागणारा मुनिच श्रेष्ठ समजला जातो. इंद्रियें, त्यांचे विषय, पंचमहाभूतें, मन, बुद्धि, अहंकार व अव्यक्त आत्मा यांचें यथार्थपणें ज्ञान करून घेतलेला मनुष्य सर्व बंधनांतून सुटून स्वर्गास जातो. हें सर्व समजून आल्यावर अंतकाळीं तत्त्वज्ञ पुरुषानें एकान्तीं आत्मचिंतन करावें, म्हणजे तो उपाधिरहित होऊन मुक्त होतो. आकाशांत फिरणाऱ्या वायूप्रमाणें तो सर्वसंगांपासून मोकळा झाल्यावर त्याचें संचित कर्म नष्ट होतें व शोकरहित होत्साता तो परमपदाला जाऊन पोंचतो. १४.२.४६.

---

## अध्याय ४७ वा.

[ १ संन्यासधर्माचा अनुवाद. २ संसारावर वृक्षाचें रूपक. ]

( १ ) ब्रह्मदेव—ऋषिहो, ज्ञानाचा निश्चय करून बोलणारे वृद्ध पुरुष संन्यासालाच तप म्हणतात व ज्ञाननिष्ठ ब्राह्मण ज्ञानालाच ब्रह्म म्हणतात. ब्रह्म हें फार दूर असून तें वेदज्ञानानेंच समजण्यासारखें आहे. तें द्वंद्वातीत, निर्गुण, नित्य, अचिन्त्य व सर्वश्रेष्ठ आहे. ज्ञानी पुरुष तें ज्ञान व तप यांच्या योगानें पाहूं शकतात. मनाचा मळ धुवून गेल्यामुळें जे पवित्र होऊन रजोगुणाच्या पलीकडे

गेले आहेत ते तपाच्या योगानें सुखाच्या मार्गाला लागून परमेश्वराकडे पोंचतात व संन्यासांत मग्न होऊन ब्रह्मवेत्ते होतात. तप हा ब्रह्म दाखविणारा दीपच असून सदाचार धर्माचें साधन आहे. ज्ञान हें सर्वश्रेष्ठ असून संन्यास म्हणजेच उत्तम तप होय. ज्याला स्वतंत्र अशा सर्व प्राण्यांच्या अंतरांत असलेल्या परमात्म्याचें तत्वनिश्चयाच्या योगानें ज्ञान झालें, त्याची गति सर्वत्र अकुंठित होते. जो ज्ञानी पुरुष संयोग व वियोग तसेंच एकत्व व अनेकत्व जाणतो तो दुःखांतून मोकळा होतो. जो कसली इच्छा करीत नाहीं व कशालाहि अवमानीत नाहीं तो इह-लोकींच ब्रह्मस्वरूपी होतो. प्रकृति व तिचे विकार जे गुण यांचें खरें स्वरूप समजून ज्यानें सर्व भूतांच्या आदिकरणाचें ज्ञान करून घेतलें तो निरहंकार पुरुष निःसंशय मुक्त होतो. तो निर्द्वंद्व होऊन शांतीच्या योगानेंच निर्गुणब्रह्माला पोंचतो. जो इंद्रियाचीं सर्व बरींवाईट कर्मे सोडून सत्य व असत्य यांच्या पलीकडे जातो तो निःसंशय मुक्त होतो.

( २ ) महान् अहंकार हा सनातन अशा ब्रह्मापासून निघालेला जो सनातन संसारवृक्ष त्याच्या खांद्या असून त्याचें उगमस्थान अव्यक्त आहे. बुद्धि हा त्याचा बुंधा व इंद्रियें त्याची पालवी व त्यांतील ढोल्या होत. तो मोठा विशाल असून त्याला अनेक डहाळ्या आहेत व पानें आणि फुलें यांनीं तो सदा भरलेला असून बरींवाईट फळेंहि देतो व तो सर्व प्राण्यांचा आधार आहे. तत्त्वज्ञानरूपी तर-वारीनें त्याला कापून व फोडून ज्ञानी पुरुष विषयासक्तिरूप पाश तोडतो व त्यामुळें जन्म, मृत्यु व जरा यांचींहि बंधनें तुटून तो निरहंकार होत्साता निःसंशय मुक्त होतो. जीव व ईश्वर हे दोन अचेतन पक्षी नित्य एकमेकांशीं संबद्ध असे त्यावर असतात. पण चैतन्य जें आहे तें या दोघांच्याहि पलीकडे असतें. अचेतन दिसणारा जीवात्मा जेव्हां शरीरादि उपाधींतून निसटून बुद्धीच्या पलीकडे असलेल्या परमात्म्याला जाणतो, तेव्हां तो क्षेत्रज्ञ होऊन गुणांच्या पलीकडे जातो व सर्व पापांपासून मुक्त होतो. १४. २. ४७.

## अध्याय ४८ वा.

[ १. संसारवृक्षासंबंधानें विविध मतें. ]

( १ ) ब्रह्मदेव :—ऋषिहो, कोणी संसारवृक्षाला ब्रह्ममय म्हणतात, कोणी ब्रह्मवन म्हणतात, कोणी त्याला अव्यक्त मानतात, तर कोणी निर्विकार मानतात. कोणी तो अव्यय व अव्यक्तापासून निर्माण झालेला मानतात. जो कोणी अंतकालीं समदृष्टि ठेवील त्याच्या दृष्टीनें तो केवळ क्षणिक होय. असा समदृष्टि पुरुष आत्म्याशीं संयोग पावून अमृतत्वास पोंचतो. डोळ्याचें पातें लवण्यास लागणाऱ्या काळाइतका वेळ जो आत्म्याचें आत्म्यांत संयमन करील तो आत्म्याच्या कृपेनें ज्ञान्याला मिळणाऱ्या अव्यय अशा ब्रह्मपदास जाईल. यमनियमादि प्राणायामानें इंद्रियांचें जो वारंवार संयमन करतो तो चोवीस तत्त्वांच्या पलीकडे असलेल्या परमपुरुषाला जाऊन पोंचतो. याप्रमाणें प्रथम आत्मा प्रसन्न झाला असतां जें जें इष्ट असेल तें प्राप्त होतें व अव्यक्ताच्या प्राप्तीनें सत्त्वगुणाचा उत्कर्ष होऊन अमृतत्वाचा लाभ होतो. ज्ञाते पुरुष सत्त्वाहून श्रेष्ठ कांहीं आहे असें मानीत नाहींत. सत्त्वाच्या आश्रयानें असणारा पुरुष अनुमानानें जाणतां येतो. नाहींतर त्याचें ज्ञान होणेंच शक्य नाहीं. क्षमा, धैर्य, अहिंसा, समता, सत्य, सरळपणा, ज्ञान, दान व संन्यास यांना सात्त्विक आचरण म्हणतात. यावरूनच अनुमानानें सत्त्वगुण व आत्मा हे निःसंशय निकटसंबद्ध आहेत असें ज्ञानी म्हणतात. ज्ञानांत मुरलेले असे कांहीं विद्वान् क्षेत्रज्ञ व सत्त्वगुण हे एकच आहेत असें म्हणतात; पण तें जुळण्यासारखें नाहीं. उलट सत्त्वगुण क्षेत्रज्ञापासून अगदीं विलग आहे असें म्हणणेंहि अविचाराचेंच होईल. ते जसे वेगळे आहेत, तसे एकही आहेत. त्याला उदाहरण म्हटलें तर उंबराचें फळ व त्यांतील किडा यांचें होय; किंवा दुसरें उदाहरण पाणी व त्यांतील मासा यांचें किंवा कमळाच्या पानावरील जलबिन्दूचें होय.

ब्रह्मदेव व ऋषि यांमधील संवाद येथवर सांगितल्यावर गुरु म्हणाला, 'हे शिष्या, ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून ऋषींना पुनः शंका आली व तिच्या निरसनार्थ ते त्याला पुनः प्रश्न विचारूं लागले.' १४. २. ४८.

---

## अध्याय ४९ वा.

[ १ धर्मांच्या विविध प्रकारांत श्रेष्ठ कोणता. ]

( १ ) ऋषि—हे प्रजापते, अनेक धर्मांतून आचरण्यास अत्यंत योग्य कोणता बरें? धर्मांची गति अनेक प्रकारें सांगितली असल्यामुळें त्याविषयीं मोठा संशय उत्पन्न होतो. देहपातानंतर आत्मा रहातो असें कोणी म्हणतात तर तो नसतो असें दुसरे म्हणतात. कोणाला त्याविषयीं संशय वाटतो, तर कोणी अगदीं निःसंदेह असतात. आत्मा अनित्य आहे असें कांहींचें म्हणणें असून, तो नित्य आहे असें दुसरे म्हणतात. तर तिसरे त्याविषयीं संशय प्रदर्शित करतात. कोणी त्याला एक समजतात, तर कोणी भिन्न भिन्न समजतात. कोणी त्याला अंशतः भिन्न व अंशतः अभिन्न असा मानतात. तत्त्वदर्शी ब्रह्मज्ञ ब्राह्मण त्याला एकच मानतात व दुसरे कोणी भिन्न व अनेकहि मानितात. देश व काल यांचें अस्तित्व कोणी मानतात तर दुसरे मानीत नाहींत. कोणी जटाधारी व हरणाचें कातडें पांघरणारे असतात, तर कोणी मस्तकाचें मुंडण करून नग्न रहातात. कोणी स्नान करूं नये म्हणतात व कोणी करावें म्हणतात. कोणी अन्न खावें म्हणतात, कोणी खाऊं नये म्हणतात. कोणी कर्म करावें असें प्रतिपादितात तर दुसरे स्वस्थ बसावें असें म्हणतात. कोणी मोक्षाची प्रशंसा करतात, तर कोणी निरनिराळे भोग भोगणें चांगलें असें म्हणतात. कोणाला द्रव्याची इच्छा असते तर कोणाला निर्धनत्व आवडतें. कोणी उपासना करूनहि आत्मा म्हणून कांहीं नाहीं असें म्हणतात. कोणी अहिंसेंत आनंद मानतात तर कोणी हिंसेची आवड धरतात. कोणाला पुण्य पाहिजे असतें, तर कोणाला कीर्ति पाहिजे असते. कोणी पुण्य म्हणून कांहीं नाहीं असें म्हणतात. कोणी सदाचरणांत मग्न असतात, कोणी त्याविषयीं संशयित असतात, कोणी दुःख नष्ट होऊन सुख मिळावें म्हणून ध्यानाच्या मार्गे लागतात. कोणी यज्ञ करावा म्हणतात, कोणी दानाची प्रशंसा करतात, कोणी तपाची थोरवी गातात, तर दुसरे कांहीं वेदाभ्यासाला महत्त्व देतात. कर्मसंन्यासानें प्राप्त होणारें ज्ञान कोण श्रेष्ठ समजतात, तर वस्तुतत्त्वाचा विचार करणारे म्हणतात कीं ज्ञान हें स्वभावावर अवलंबून असून कोणत्याहि आश्रमांत तें मिळूं शकतें. कोणी सर्वच चांगलें मानतात, तर कोणी कशालाच मानीत नाहींत. हे देवाधिदेवा, याप्रमाणें धर्माची ओढाताण होऊन त्याविषयीं वेगवेगळ्या कल्पना चालत असल्यामुळें आम्हीं घोटाळ्यांत पडून कसलाच निश्चय आम्हांला करतां येत नाहींसा होतो. हें चांगलें, तें चांगलें, असें निरनिराळे लोक

निरनिराळें सांगतात. जो ज्यांत दंग असतो त्याला तोच चांगला धर्म वाटतो. पण आमची बुद्धि त्यामुळें कुंठित होऊन मन व्यग्र होतें. तर देवा, त्यांत खरें कल्याणकारक काय तें आपण सांगावें अशी आमची इच्छा आहे. तसेंच याहूनहि जें कांहीं धर्माचें रहस्य असेल तेंहि कृपा करून सांगा. सत्त्वगुण व क्षेत्रज्ञ यांचा संबंध कोणत्या उद्देशानें होतो ?

याप्रमाणें ऋषींनीं ब्रह्मदेवाला प्रश्न विचारिला असतां त्यानें त्यांना यथार्थपणें त्याचीं उत्तरें दिलीं. १४. २. ४९.

## अध्याय ५० वा.

[ १. ज्ञानमार्गाचें श्रेष्ठत्व. २ सत्वगुण व क्षेत्रज्ञ यांचा संयोग व वियोग. ३ संसार-सागर तरण्यास गुरुरूप नौकेची आवश्यकता. ४ आत्म्याचें सर्वश्रेष्ठत्व. ]

( १ ) **ब्रह्मदेव**—ऋषिहो, तुम्हीं जें मला विचारिलें, त्याचें उत्तर मी तुम्हांला सांगतों. पूर्वी शिष्यानें गुरूला विचारिलें असतां गुरूनें जें त्याला सांगितलें तेंच ऐका. सर्व ऐकून घेतल्यावर तें नीट लक्षांत ठेवा. कोणत्याहि प्राण्याची हिंसा न करणें हें अत्यंत श्रेष्ठ कर्तव्य मानिलें आहे. तें मनःशांतीचें परम स्थान असून धर्माचें श्रेष्ठ लक्षण आहे. ज्यांना निश्चित ज्ञान झालें आहे, असे वृद्ध पुरुष ज्ञान हेंच कल्याण आहे असें म्हणतात; यास्तव शुद्ध ज्ञानाच्या योगानें मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. ज्यांचें आचरण हिंसाप्रधान आहे किंवा जे नास्तिकवृत्तीचे व लोभ आणि मोह यांनीं भारलेले आहेत ते नरकास जाणारे होत. आशेला गुंतून जे निरलसपणें कर्में करीत असतात ते पुनः पुनः जन्मास येऊन त्यांतच या लोकीं आनंद मानतात. पण जे ज्ञानी पुरुष श्रद्धापूर्वक फलाशा न धरतां साम्यबुद्धीनें कर्में करतात तेच सुज्ञ व त्यांनाच खरें ज्ञान झालें म्हणावयाचें.

( २ ) ऋषिहो, आतां पुढें सत्त्वगुण व क्षेत्रज्ञ यांचा संयोग व वियोग यांविषयीं सांगतों तें ऐका. क्षेत्रज्ञ व सत्त्वगुण यांचा संयोग म्हणजे विषयी व विषय यांचा संबंध होय. सत्त्वगुण हा विषय व क्षेत्रज्ञ हा विषयी समजावा. उंबराचें फळ व त्यांतील जीव यांच्या उदाहरणानें हा संबंध पूर्वी स्पष्ट केला आहेच. सत्त्वाचा नित्य उपभोग घेण्यांत येत असतांहि तें अचेतन असल्यामुळें उपभोग कोण घेतें, कसला घेतें, व हें सर्व जाणतें कोण हें त्याला कांहींच कळत नाहीं. सत्त्व हें नित्य द्वंद्वपूर्ण असून क्षेत्रज्ञ हा द्वंद्वातीत, निर्विकार व

निर्गुण आहे. तो सर्वत्र समदृष्टीनें पहात असून त्याला जी संज्ञा किंवा नांव मिळतें तदनुसार तो वागतोसा भासतो. पण त्यानें घेतलेला सत्त्वाचा उपभोग हा कमळाच्या पानानें घेतलेल्या पाण्याच्या उपभोगासारखाच असतो. त्याच्या-भोंवतीं सगळया विषयांनीं गराडा घातला तरी तो त्यानें लिप्त होत नाहीं. कमलपत्र पाण्याच्या बिन्दूनें जसें लिप्त होत नाहीं, तसाच पुरुषहि विषयांपासून निःसंशय अलग असतो. सत्त्व किंवा बुद्धि म्हणजे पुरुषाचें केवळ साधन होय, साधन व कर्ता यांचा जो संबंध तोच बुद्धि व क्षेत्रज्ञ पुरुष यांचा होय. जसा एखादा मनुष्य दिवा घेऊन काळोखांतून पलीकडे जातो, तसा सत्त्वरूपी दिवा घेऊन मोक्षेच्छु परब्रह्माकडे जातात. दिव्यांत जोंवर तेल व वात आहे तोंवर तो प्रकाश देतो, पण तीं संपल्यावर ज्योत अन्तर्धान पावते. त्याप्रमाणें व्यक्त असा सत्त्वगुण आहे, तोंवर पुरुषहि व्यक्त भासतो, पण त्याच्या अभावीं तो अव्यक्तच आहे.

( ३ ) ऋषिहो, मंदबुद्धि पुरुषाला सहस्रावधि उपायांनींहि उमज पडत नाहीं; पण त्याच्या चवथ्या हिश्शानेंहि बुद्धिमान् पुरुष सुख मिळवितो. अशाच उपायानें धर्माचेंहि साधन करतां येतें व तें जो करतो त्या बुद्धिमंताला मोठें सुख मिळतें. फराळाचें घेतल्यावांचूनच जो मनुष्य प्रवासाला निघतो, त्याचा प्रवास झाला तर कष्टानेंच पुरा होतो, नाहीं तर मध्येंच तो अडकूनहि पडतो. त्याप्रमाणें उपाय न जाणतां कर्म चालू केल्यास त्याचें फळ मिळण्यांत संशय उत्पन्न होतो. आपल्या हिताचें काय व अहिताचें काय हें पहाणें मनुष्याच्या कल्याणाला अवश्य आहे. एखादा अविचारी मनुष्य असतो, तो पूर्वीं न पाहिलेल्या लांब रस्त्यानें पायींच जावयास निघतो. पण विचारी असतो, तो त्या रस्त्यानें घोडे जोडलेल्या वेगवान रथांतून जातो. बुद्धिमानाचा प्रकार असा असतो. उंच पर्वतावर चढ-ल्यावर खालीं भूमीकडे पाहूं नये; त्याप्रमाणें ज्ञानप्राप्तीनंतर कर्माकडे पहाण्याचें कारण नाहीं. नाहींतर रथांतून जात असतांहि जसा मूर्ख मनुष्य कष्टी होतो, तसें होईल. पण सुज्ञ पुरुष जोंपर्यंत रथाची वाट आहे तोंपर्यंत रथांतून जातो, व ती वाट संपल्यावर रथ सोडून पायींच चालतो, त्याप्रमाणें बुद्धिमान् साधक तत्त्व-योगाचें मर्म जाणून मार्ग आक्रमितो व ज्ञानाच्या साह्यानें उत्तरोत्तर पुढें जातो. भयंकर समुद्रांत होडीवांचून बाहूंच्याच साह्यानें जाणारा निःसंशय मरणच इच्छितो; पण सुज्ञ मनुष्य होडी, वल्हें इत्यादि साहित्य घेऊन पाण्यांत शिरतो व न दमतां लवकरच डोह उलटून पलीकडे गेल्यावर नाव व वल्हें गरज न

उतरल्यामुळें सोडून देतो. हीच गोष्ट रथांतून जाणाऱ्या व पायीं जाणाऱ्या मनुष्यांच्या उदाहरणानें पूर्वीं स्पष्ट केली आहे. नावाड्याचें प्रेम नावेवर बसल्यास जसा तो पाण्यांतच घोटाळत रहातो, तसा साधकहि एखाद्या वस्तूवर महत्वानें अडकून पडल्यास तेथेंच फिरत रहातो. भूमीवर फिरावयाचें असतांना नावेंत बसून चालणार नाहीं, तसें जलांत फिरावयाचें असल्यास रथांत बसूनहि उपयोगी नाहीं. त्याप्रमाणें विषयांच्या ओढीनें जीं जीं विचित्र कर्मे करावीं तशीं तशीं त्याचीं फळेंहि प्राप्त होतात.

( ४ ) ज्याला गंध रूप रस स्पर्श व शब्द नाहींत, त्याला मुनि बुद्धीनें जाणतात व त्याला प्रधान किंवा प्रकृति म्हणतात. तें प्रधान किंवा मूल प्रकृति अव्यक्त असून त्या अव्यक्ताचा विकार महान् हा होय. महत्स्वरूपी प्रधानाचा पुढचा विकार अहंकार हा होय. अहंकाराचा पुढील विकार पंचमहाभूतें होय. त्या पंचमहाभूतांचे निरनिराळे विकार म्हणजे गंधादि गुण असून तेच इंद्रियाचे विषय होत. अव्यक्त प्रकृतींत जसा बीजधर्म व प्रसवधर्म आहे, तसाच तो महान् आत्म्यांतहि आहे. अहंकारांत ते गुण आहेत, तसेच पुढें पंचमहाभूतांतहि आहेत. पंचमहाभूतांचे विकार जे विषय त्यांतहि बीजाचा व प्रसवाचा गुण असून त्यांचा विकार चित्त हा होय. पंचमहाभूतांपैकीं आकाशाला शब्द हाच एक गुण आहे, वायूला शब्द व स्पर्श असे दोन आहेत, तेजाला रूप हा तिसरा गुण आहे, जलाला, आणखी स्पर्श हा चवथा गुण आहे व सर्व प्राण्यांची निर्मात्री जी देवी पृथ्वी तिच्यांत पूर्वींचे चार व आणखी गंध हा पांचवा गुण आहे. पृथ्वीचा गुण गंध हा अनेक प्रकारचा असून त्याचा विस्तार मी आतां सांगतों. प्रथम तो इष्ट व अनिष्ट असा दोन प्रकारचा असून मधुर, आंबट, तिखट, उग्र, मिश्र, तेलट, रुक्ष, व प्रसन्न असा तो दहा प्रकारचा आहे. जलाचे गुण शब्द, स्पर्श, रूप, द्रव व रस असे असून रसाचे प्रकार अनेक आहेत. मधुर, आंबट, तिखट, कडु, तुरट, खारट, असे ते सहा असून रस म्हणजे एकंदरींत जलस्वरूपी आहे. तेजाच्या तीन गुणांपैकीं विशिष्ट जें रूप म्हणजे रंग व आकार त्याचेहि अनेक प्रकार आहेत. पांढरा, काळा, तांबडा, निळा, पिवळट, तांबूस इत्यादि रंगाचे प्रकार व लांब, आंखूड, कृश, स्थूल, चौरस, वाटोळा इत्यादि आकाराचे प्रकार मिळून तेजाचें बारा प्रकारचें रूप होतें. वायूचे दोन गुण असून त्यांतील स्पर्श अनेक प्रकारचा असतो. कोरडा, थंड, उष्ण, मऊ, कठीण, चिकट, गुळगुळीत, बुळबुळीत, कडक व प्रसन्न असे वायूच्या स्पर्शगुणाचे

बारा प्रकार आहेत. आकाशाचा एकच गुण जो शब्द त्याचे षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत व निषाद, गोड व कर्कश, तसाच मिश्र असे दहा प्रकार दिसतात. आकाश हें सूक्ष्मतम महाभूत असून त्याच्यापलीकडे अहंकार आहे. अहंकाराच्या पलीकडे बुद्धि व बुद्धीहून श्रेष्ठ आत्मा होय. आत्म्याच्या पलीकडे अव्यक्त हें श्रेष्ठ असून त्या अव्यक्ताहूनहि पुरुष श्रेष्ठ आहे. याप्रमाणें भूतांचें श्रेष्ठाश्रेष्ठत्व व सर्व कर्मांचा योग्य विधि जो जाणतो, तो सर्व प्राण्यांचा अंतर्यामी असा आत्माच होऊन अव्यय अशा आत्मस्वरूपांत जाऊन मिळतो. १४. २. ५०.

---

## अध्याय ५१ वा.

[ १. ब्रह्ममय रथ. २ ब्रह्मवनांतील क्षेत्रज्ञाचा संचार. ३ प्रजापतिकृत देवांची उत्पत्ति. ४ प्रसन्न मनाच्या मनुष्यास मिळणारें सुख. ५ गुरुशिष्य-संवादाचा उपसंहार. ६ गुरुशिष्यांच्या रूपकाचा उलगडा. ७ कृष्णाला द्वारकेस जाण्यास अर्जुनाची संमति. ]

(१) **ब्रह्मदेव**:—ऋषिहो, पंचमहाभूतांचीं सूक्ष्म स्वरूपें जीं इंद्रियें त्यांचें मन हें जसें स्वामी आहे, तसेंच तें त्या इंद्रियांचें नियमन म्हणजे लय व विसर्ग म्हणजे उत्पत्ति करणारेंहि आहे. महाभूतांना मनाचाच आधार नित्य असून बुद्धि हेंच त्याचें ऐश्वर्य आहे व क्षेत्रज्ञहि त्यालाच म्हणतात. सारथि रथाला घोडे जुंपतो तसें मन इंद्रियांना जुंपतें व इंद्रियें, मन, बुद्धि हीं नित्य क्षेत्रज्ञाला जुंपलीं जातात. इंद्रियरूप घोडे ज्याला जुंपले आहेत, व बुद्धि ज्यावर सारथ्याचें काम करीत आहे, अशा शरीररूपी रथावर बसून अंतरात्मा सर्वत्र संचार करीत असतो. ब्रह्ममय रथ मोठा असून इंद्रियसमूह हा त्याला जुंपलेले घोडे, मन हा त्याचा सारथि, व बुद्धि म्हणजे त्या घोड्यांचे लगाम होय. या ब्रह्ममय रथाचें जो ज्ञान करून घेतो तो सर्व प्राण्यांत सुज्ञ होय, त्याला कधीं मोह पडणार नाहीं.

( २ ) अव्यक्तापासून गंधादि विषयांपर्यंत जें स्थावरजंगमात्मक ब्रह्मवन त्यांत क्षेत्रज्ञ नित्य फिरत असतो. त्यांत सूर्य व चंद्र हे प्रकाश देत असून ग्रह-नक्षत्रादिकांनीं त्याला शोभा आलेली आहे व नद्या-पर्वतांच्या रांगा यांनीं तें चोहोंकडून भूषविलेलें आहे. त्यावर जिकडे तिकडे जलसंचयाचे अलंकार चढविले असून तें सर्व प्राण्यांचा जीवनाधार व विश्रांतिस्थान आहे. या लोकांत जीं

स्थावरजंगम भूतें आहेत तीं आधीं प्रलय पावतात व मग महाभूतांपासून निघालेले गंधादि विषय लयास जातात. सत्त्वादि तीन गुणांपासून पंचमहाभूतें, देव, मनुष्य, गंधर्व, पिशाच, असुर, राक्षस हे सर्व स्वभावतःच उत्पन्न झाले, यज्ञादि कर्मांपासून नव्हत. विश्व उत्पन्न करणारे हे सर्व महाभूतांपासून झाले व समुद्रांत लाटा विलीन होतात तसे ते त्या महाभूतांतच योग्य कालीं लीन होऊन जातात. सृष्टिकर्त्या भूतांपासून महाभूतें होतात. पंच महाभूतांपासून मनुष्य मुक्त झाला म्हणजे त्याला श्रेष्ठ गति मिळते.

( ३ ) प्रजापति ब्रह्मदेवानें हें सर्व जगत् मनानें उत्पन्न केलें व देव आणि ऋषि यांना तपानें निर्माण केलें. फलमूलांवर निर्वाह करणारे सिद्ध समदृष्टि होत्साते तपाच्या योगानेंच त्रैलोक्य पाहूं शकतात. औषधिद्रव्यें, वनस्पति, नानाविद्या हीं तपानेंच सिद्ध होतात. सर्व गोष्टी तपानेंच साधतात. जें कांहीं दुर्लभ, जाणण्यास कठीण, सहन करण्यास कठीण, व दुस्तर असेल, तें सारें तपानें साध्य होतें. तपाचें उल्लंघन करणें कोणाला शक्य नाहीं. मद्य पिणारा, ब्राह्मणवध करणारा, चोर, गर्भघातक, गुरुपत्नीगमन करणारा हेहि त्या त्या पापापासून दारुण तपाच्या योगानें मुक्त होतात. मनुष्य, पितर, देव, पशु, जनावरें, पक्षी किंवा जे दुसरे स्थावर किंवा जंगम जीव आहेत ते नित्य तप करीत असून तपानेंच त्यांना सिद्धि मिळते. मायेचें सामर्थ्य जवळ असलेले देव तपानेंच स्वर्गास गेले.

( ४ ) पण जे फलाच्या आशेनें अहंकारयुक्त होऊन नित्य निरलसपणें कर्में करतात, ते शुद्ध ध्यानयोगानें ममत्व व अहंकार यांपासून सुटून थोरपणाला जातात व ब्रह्मदेवाच्या सन्निध उत्तम व श्रेष्ठ लोकांची त्यांना प्राप्ति होते. ध्यान-योगाचा आश्रय केल्यानें बुद्धि स्वच्छ होऊन आत्मवेत्ते पुरुष सुखाचा ठेवाच अशा अव्यक्त आत्मस्वरूपांत प्रवेश करतात. अव्यक्तापासून उत्पन्न झालेला व स्वतः अव्यक्तच बनलेला, तमोगुण व रजोगुण यांपासून मुक्त, असा जो कोणी केवळ सत्त्वाचा अवलंब करून, सर्व पापांतून सुटून, सर्व टाकून देतो, त्याला क्षेत्रज्ञ म्हणतात. त्याला जो जाणतो तो वेदवेत्ताच होय. चिंतनानें ज्ञानप्राप्ति करून घेऊन मुनीनें आत्मसंयमन करावें. चित्तांत जें असतें तन्मय मनुष्य बनतो, हें अगदीं फार जुनें रहस्य आहे. अव्यक्तापासून विषयांपर्यंतचें सर्व मायेचें स्वरूप होय, म्हणून त्याच्या पलीकडील आत्मतत्त्वाकडे चित्त लावावें. 'माझें' या दोन अक्षरांत जन्ममरणाचें मूळ असून 'माझें न' हीं तीन अक्षरें शाश्वत ब्रह्म-स्वरूपीच होत. मन्द बुद्धि असतात तेच कर्मांची प्रशंसा करतात, पण थोर महात्मे

कर्माला मान देत नाहींत. षोडशविकारात्मक असा जो देहधारी जीव तो कर्मजन्य आहे. ज्ञानाला तें जीवस्वरूप गिळून टाकितां येतें म्हणून अमृतभक्षण करणारे देव तें ज्ञानच ग्राह्य समजतात. संसारसागराचें पैलतीर ज्यांनीं पाहिलें, त्यांचें प्रेम कर्मावर रहातच नाहीं, कारण आत्मा हा ज्ञानमय आहे, कर्ममय नाहीं. असें ते ग्रहण करण्यास कठीण असलेलें निर्विकार आत्मस्वरूप जो जाणतो तो मरणातीत होतो. अमृतत्वाचा उपभोग घेण्याऱ्या आत्म्याला जाणणें म्हणजे अमर होणें होय. सर्व संस्कार दृढ करून व आत्मस्वरूपानें स्वतःचें संयमन करून जो तें ब्रह्मस्वरूप जाणून घेतो तो पुनः जन्मास येत नाहीं. चित्त प्रसन्न झालें म्हणजे त्याला शांति प्राप्त होते व त्याची खूण म्हणजे तो स्वप्नांत जणूं आहे असा स्थिर दिसतो. ज्ञाननिष्ठ मुक्तांची स्थिति अशी असते कीं, त्यांना सर्व प्रकारची प्रवृत्ति पूर्वकारणांचा परिणाम आहे असें स्पष्टपणें दिसूं लागतें. विरक्तांचें तें ध्येय आहे, तो सनातन धर्म आहे, ज्ञानवंतांना हेंच प्राप्त करून घ्यावयाचें असतें व निर्दोष असें वर्तन तेंच होय. सर्वांभूतीं समदृष्टि ठेवून निरिच्छ व निष्काम होणाऱ्यास ही स्थिति प्राप्त करून घेणें सर्वथा शक्य आहे. हे ऋषिहो, मीं जें सर्व आतांपर्यंत तुम्हांला सांगितलें, त्याप्रमाणें तुम्हीं आचरण ठेवा, म्हणजे तुम्हांला सिद्धि मिळेल.

( ५ ) **गुरु**—हे शिष्या, ब्रह्मदेवानें असा उपदेश त्या मुनींना केल्यावर ते महात्मे कृतकृत्य होत्साते आपल्या ठिकाणीं निघून गेले. तूंहि महाभाग्यवान् आहेस. ब्रह्मदेवाचा हा उपदेश मीं तुला सांगितला, त्याप्रमाणें शुद्धान्तःकरणानें आचरण ठेव, म्हणजे तुलाहि सिद्धि मिळेल.

**श्रीकृष्ण**:—अर्जुना, गुरूनें उपदेशिलेला हा धर्म ऐकून शिष्यानें तो आचरिला व मोक्षप्राप्ति करून घेतली. तो कृतकृत्य झाला व जेथें गेलें असतां शोकाचें कारणच उरत नाहीं त्या स्थानीं गेला.

( ६ ) **अर्जुन**—कृष्णा, तो गुरुरूपी ब्राह्मण कोण व त्याचा तो शिष्य तरी कोण हें जर मला ऐकण्यासारखें असेल, तर कृपाकरून तें मला सांग.

**श्रीकृष्ण**—अर्जुना, अरे मींच तो गुरु आणि माझें मनच तो शिष्य! तुझ्यावर माझें जें प्रेम आहे त्यामुळेंच हें गूढ रहस्य मीं तुला सांगितलें. धनंजया, तुझेंहि माझ्यावर जर अक्षय प्रेम असेल तर हें अध्यात्म ऐकून त्याप्रमाणें तूं नीट आचरण ठेव. या अध्यात्मधर्माचें योग्य आचरण तुझ्याकडून

झालें म्हणजे सर्व पापांपासून मुक्त होऊन तूं मोक्षास जाशील. मीं तुला हें सर्व पूर्वीं युद्धाला आरंभ होतांना सांगितलेंच होतें. म्हणून आतां तरी तें नीटपणें ध्यानांत ठेव.

( ७ ) अर्जुना, पित्याला पाहून आतां बराच काळ झाला, त्याला भेटण्याची मला इच्छा झाली आहे, तरी त्यासाठीं तिकडे जाण्यास मला तुझी संमति पाहिजे.

**वैशंपायन:**—राजा जनमेजया, कृष्णाचें हें बोलणें ऐकून अर्जुन म्हणाला, 'कृष्णा, आतां आपण हस्तिनापुरांत जाऊं. तेथें गेल्यावर समागमेंच आपण धर्मराज युधिष्ठिराची गांठ घेऊं व त्याची अनुज्ञा मिळाल्यावर तूं खुशाल द्वारकेस जा.' १४.२.५१.

---

## अध्याय ५२ वा.

[ १. अर्जुनानें केलेली कृष्णाची स्तुति; २ त्यांचें हस्तिनापुरांत आगमन; ३ श्रीकृष्णाचें द्वारकेस गमन. ]

( १ ) **वैशंपायन:**—राजा, मग श्रीकृष्णानें दारुकाला रथ जोडण्यास सांगितलें व थोडक्याच वेळांत दारुकानें 'रथ जोडला आहे' असें त्याला येऊन सांगितलें. मग अर्जुनानेंहि बरोबर असलेल्या सर्व मंडळीला 'हस्तिनापुरास जावयास सिद्ध व्हा' अशी आज्ञा केली असतां सैनिकादि सर्व सज्ज झाले व तसें त्यांनीं अर्जुनाला सांगितलें. त्याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर कृष्ण व अर्जुन आपल्या रथांत बसून निघाले. वाटेंत त्यांच्या आनंदानें विविध गोष्टी चालल्या होत्या. त्यांत अर्जुनानें कृष्णाला म्हटलें, "कृष्णा, धर्मराज युधिष्ठिराला जय मिळाला व शत्रूंचा पाडाव होऊन राज्य निष्कंटक झालें, हें तुझ्याच कृपेचें फळ होय. कृष्णा, तूं असल्यामुळें आम्हां पांडवांना मोठाच आधार झाला. तूंच आम्हांला कौरवसमुद्रांतून पलीकडे जाण्याच्या कामीं नावेप्रमाणें उपयोगीं पडलास. हे विश्वाच्या उत्पत्तिकर्त्या, तूंच विश्वाचा आत्मा आहेस, तुला मी प्रणाम करतों. तुझें माझ्यावर किती प्रेम आहे तें मी जाणतों. भूतमात्राचा अंतर्यामी आत्मा तुझ्याच तेजांतून उत्पन्न झाला आहे. तुझी क्रीडा करणारी माया, पृथ्वी व स्वर्ग व्यापून राहिली असून, हें सर्व स्थावरजंगम विश्व तुझ्यांतच आहे व चतुर्विध प्राणिकोटी विविधरूपानें तूंच निर्माण केल्या आहेस. पृथ्वी,

अंतरिक्ष, स्वर्ग, ही तुझीच निर्मिति होय. निर्मल चंद्रप्रकाश म्हणजे तुझें हास्य असून ऋतु हीं तुझीं इन्द्रियें आहेत. सतत वहाणारा वायु म्हणजे तुझा प्राण व सनातन मृत्यु म्हणजे तुझा क्रोध असून लक्ष्मी ही तुझी प्रसन्नवृत्ति होय. प्रेम, संतोष, धैर्य, क्षमा, विचारीपणा, तेजस्वीपणा हीं सर्व तुझींच स्वरूपें असून युगांतींचा प्रळय तोहि तूंच आहेस. तुझें गुणवर्णन कितीहि दीर्घकाळ करीत बसलों तरी माझ्यानें तें पुरें होणार नाहीं. हे कमलेक्षणा, जीवात्मा तूंच आणि परमात्माहि तूंच. तुझें स्वरूप असह्य असून नारदादि मुनींनीं मला त्याविषयीं सांगितलें होतें. सर्व जग तुझ्यांत समाविष्ट असून तूंच एक सर्वांचा स्वामी आहेस. तूं आतांपर्यंत कृपाकरून मला जें सांगितलें, त्याप्रमाणें मीं योग्य आचरण करीन. युद्धांत दुष्ट दुर्योधनाचा वध करविलास, हीच गोष्ट तुझ्या आमच्याविषयींच्या प्रेमाची उत्कृष्ट द्योतक आहे. तूंच त्याचें सैन्य जाळून टाकिलें, म्हणून युद्धांत मला जय मिळाला. मला जय मिळण्याला लागणारें सारें कर्म तूंच आपल्या बुद्धीच्या पराक्रमानें केलेंस. कर्णाच्या वधाचा योग्य उपाय तूंच दाखविलास. दुष्ट जयद्रथ व भूरिश्रवा यांच्या वधाची युक्ति तूंच केलीस. यास्तव मोठ्या संतोषानें तूं मला जें सांगितलें त्याप्रमाणें मी निःसंशय वागेन. आतां धर्मराज युधिष्ठिराला गांठून तुझ्या द्वारकेस जाण्यासाठीं मी अनुज्ञा मिळवितों. तुझें आतां द्वारकेस जाणें मलाहि संमत आहे. मामांना तूं लवकरच जाऊन भेटशील. बलदेव व दुसरे श्रेष्ठ यादवहि तुझ्या लवकरच दृष्टीस पडतील."

याप्रमाणें बोलतां बोलतां ते सर्वजण हस्तिनापुरीं येऊन पोंचले. त्यांना पाहून सर्व नागरिक हर्षभरित झाले. नगरांत शिरल्यावर प्रथम ते धृतराष्ट्राच्या इंद्रसभातुल्य घरीं गेले. तेथें विदुर, राजा युधिष्ठिर, भीम, नकुळ–सहदेव, युयुत्सु यांसह धृतराष्ट्राला भेटून त्यांनीं गांधारी, कुंती, द्रौपदी, सुभद्रा इत्यादि स्त्रियांचें दर्शन घेतलें. धृतराष्ट्राजवळ गेल्यावर त्यांनीं आपलीं नांवें सांगून त्याचे पाय धरिले व नंतर गांधारी, कुंती, व युधिष्ठिर यांच्याहि पायांना हात लावून त्यांना नमस्कार केला. भीम व विदुर यांचेहि पाय धरून त्यांनीं त्यांना कुशल प्रश्न विचारिले. नंतर त्यांच्यासह धृतराष्ट्राकडे जाऊन त्याचीहि चौकशी त्यांनीं केली व धृतराष्ट्रानेंहि कृष्णाला घरीं जाण्यास अनुज्ञा दिली. त्याची आज्ञा घेऊन सर्व आपआपल्या ठिकाणीं गेल्यावर कृष्ण मात्र अर्जुनाच्याच मंदिरांत गेला. तेथें त्याचें योग्य स्वागत करण्यांत आलें व नंतर कृष्णानें सुखानें झोंप घेतली. रात्र संपून पहाट झाली, तेव्हां प्रातःकर्मे आटोपून ते दोघे धर्मराजाच्या मंदिरांत गेले.

युधिष्ठिर तेथें अमात्यांसह बसला होता. त्या सुंदर मंदिरांत गेल्यावर, अश्विनांनीं इन्द्राची भेट घ्यावी तशी, त्यांनी धर्मराजाची भेट घेतली व त्याच्या सांगण्यावरून ते आसनांवर बसले. मग धर्मानें त्यांच्याकडे पाहून त्यांना कांहीं विचारावयाचें आहे असें ताडिलें व त्यांना प्रश्न केला. तो म्हणाला, "कृष्णा, अर्जुना, तुमच्या मनांतून मला कांहीं विचारावयाचें आहेसें दिसतें. बोला; तुम्हीं सांगाल तें मी सारें करीन. त्यांत विचार कसला?" तें ऐकून अर्जुनानें नम्रपणें जवळ जाऊन उत्तर केलें, "राजा, या प्रतापी श्रीकृष्णाला येथें येऊन फार दिवस झाले. तरी आतां तुझी अनुज्ञा घेऊन पित्याला जाऊन भेटावें असें त्याच्या मनांत आलें आहे. संमति देशील तर तो द्वारकेस जाईल. तरी त्याला अनुज्ञा द्यावी असें मला वाटतें."

**युधिष्ठिर** :—कृष्णा, तुझें कल्याण असो. वसुदेव मामांना भेटावयास तूं द्वारकेस खुशाल जा. तुझें तिकडे जाणें मला संमत आहे. मामांना व देवकीमामीला भेटून तुला खरोखरच पुष्कळ दिवस झाले. तिकडे गेल्यावर मामांना व बलदेवाला माझे नमस्कार सांग. माझी व भीम, अर्जुन, नकुल व सहदेव यांची नित्य आठवण ठेव आणि तिकडील सर्वांना भेटून झाल्यावर माझ्या अश्वमेधासाठीं इकडे परत ये. रत्नें व तुझ्या आवडीच्या ज्या इतर वस्तु असतील त्या घेऊन तूं जा. कृष्णा, ही सारी पृथ्वी तुझ्याच कृपेनें आमच्या हातीं आली व तुझ्याच कृपेनें शत्रूंचा निःपात झाला.

धर्मराजाचें हें म्हणणें ऐकल्यावर कृष्ण म्हणाला, 'युधिष्ठिरा, सारीं रत्नें, धन व सारी पृथ्वी हीं खरोखर तुझींच आहेत. माझ्या घरींहि जें कांहीं धन आहे त्याचाहि तूंच स्वामी आहेस.' नंतर युधिष्ठिरानें, 'बरें आहे' असें म्हणून कृष्णाची पूजा केली. तिचा स्वीकार करून कृष्णानें कुंतीकडे जाऊन व तिला प्रदक्षिणा करून तिचा निरोप घेतला. तिनें त्याचें योग्य तें अभिनंदन केलें व विदुरादिकांनींहि त्याला निरोप दिला.

( ३ ) याप्रमाणें सर्वांचा निरोप घेतल्यावर श्रीकृष्णानें युधिष्ठिराच्या व कुंतीच्या संमतीनें सुभद्रेला समागमें घेतलें आणि तिला रथांत बसवून त्या दिव्य रथांतून तीं हस्तिनापुराहून निघालीं. त्याला निरोप देण्यासाठीं नागरिक लोकांचा त्यांच्या भोवतीं मोठा गराडा पडला. अर्जुन, सात्यकि, नकुल, सहदेव, बुद्धिमान् विदुर, व हत्तीसारखा बलवान् भीम हेहि कृष्णाला पोचविण्यास

त्याच्या रथामागून चालूं लागले. तेव्हां कृष्णानें त्या सर्वांना मागें फिरावयास सांगून दारुकाला व सात्यकीला घोड्यांना हाकावयाची आज्ञा केली व सात्यकी-सह तो वेगानें जाऊं लागला. अशा रीतीनें दैत्यसमूहाचा वध करून विजयी इन्द्र जसा अमरावतीस जातो, त्याप्रमाणें त्या पराक्रमी श्रीकृष्णानें द्वारकेस प्रयाण केलें. १४. २. ५२.

---

## अध्याय ५३ वा.

[ १. श्रीकृष्णाची उत्तंकाशीं भेट—उत्तंक त्याला शाप देण्यास प्रवृत्त होतो. ]

( १ ) **वैशंपायन:**—राजा, कृष्ण द्वारकेस जावयाला निघाला, तेव्हां पांडव त्याला आलिंगन देऊन नागरिकांसह परत फिरले. अर्जुनानें तर त्याला वारंवार मिठी मारली आणि कृष्ण दिसेनासा होईपर्यंत तो त्याच्याकडे सारखा पहात राहिला व शेवटींहि त्यानें मोठ्या कष्टानेंच आपली दृष्टि मागें वळविली. कृष्णाचेंहि तसेंच झालें. राजा, कृष्णाला वाटेंत काय काय अद्भुत शकुन झाले ते आतां सांगतों ऐक. रथापुढून वायु वेगानें वाहूं लागला, त्यामुळें त्या रस्त्यावरील खडे, धूळ व कांटे दूर झाले. इन्द्रानें शुद्ध व सुवासिक जलाचा, दिव्यपुष्पांचा त्याच्या-पुढें वर्षाव केला. अशा रीतीनें कृष्ण रथांतून चालला असतां वाटेंत त्याला एक ओसाड मैदान लागलें व तेथें उत्तंक नांवाचा मोठा तेजस्वी ऋषि त्याला दिसला. कृष्णानें त्या मुनीची योग्यप्रकारें पूजा केली व मुनीनेंहि त्याला कुशल प्रश्न केले. उत्तंकानेंहि उलट कृष्णाचें स्वागत करून त्याला म्हटलें, "कायरे कृष्णा, तूं कौरवपांडवांच्या घरीं जाऊन त्यांचें बंधुप्रेम अढळ करून आलास ना? तें कसें काय झालें मला सांग ना. त्या वीरांमध्यें तूं सख्य घडवून आणिलें अस-शीलच. ते तुझे प्रिय संबंधीच आहेत. पांडुराजाचे पांच पुत्र व धृतराष्ट्राचे पुत्र हे सर्व तुझ्यासह लोकांत आनंदानें विहार करीत असतीलच. ते सारे आपा-पल्या राज्यांत सुखानें रहातात ना? कौरवांचा राग शांत करणें तुला शक्य होतेंच; तसा तूं केला असशीलच. या बाबतींत तुझ्याविषयीं माझी जी अपेक्षा होती ती तूं सफळ केली असशील."

हें ऐकून श्रीकृष्णानें उत्तर केलें 'मुने, कौरवांचा क्रोध शांत करण्याचा मीं प्रथम प्रयत्न केला. पण कोणत्याहि उपायानें त्यांना मला शांत करतां आलें नाहीं व त्यामुळें बंधु व पुत्र यांसह त्या सर्वांचा नाश झाला. दैवापुढें जाणें बुद्धीनें

किंवा बळानें शक्य नाहीं. मुने, तुला हें ठाऊकच आहे कीं कौरवांनीं माझा, तसाच भीष्माचाहि उपदेश मानिला नाहीं. अर्थात् पांडव व कौरवांचें परस्पर युद्ध होऊन कौरव यमसदनास गेले. पांडवांचेहि शत्रु जसे वध पावले तसेच पुत्रहि नष्ट झाले, केवळ पांच पांडव मात्र जीवंत राहिले. पण धृतराष्ट्राचे सर्वच पुत्र आपल्या पुत्रांसह व बांधवांसह मरण पावले."

( २ ) कृष्णाचें भाषण ऐकून उत्तंकाला मोठा क्रोध आला व डोळे वटारून तो कृष्णाला म्हणाला, "कौरवांचें रक्षण करणें शक्य असतांहि व ते तुझे प्रिय आप्त असतांहि तूं त्याचें रक्षण केलें नाहीं, यास्तव मी आतां तुला शाप देतों. युद्धापासून तूं त्यांचें निवारण केलें नाहीं, म्हणून मला तुझा फार राग आला आहे. तुला सामर्थ्य असतांहि तूं ढोंग करून त्या कुरुश्रेष्ठांचा नाश होत असतां त्यांची उपेक्षा केलीस." कृष्णानें उत्तर केलें, 'मुने, सर्व वृत्त विस्तारानें मी तुला सांगतों. तरी शांत हो; तूं तपस्वी आहेस. मी तुला थोडें अध्यात्म सांगतों, तें ऐक आणि मग वाटल्यास शाप दे. बारीकसारीक तपानें कोणी माझें वांकडें करूं शकणार नाहीं. तुझ्या तपाचा क्षय न व्हावा अशी माझी इच्छा आहे. तूं मोठें तप केलें असून गुरूलाहि संतुष्ट केलें आहेस. कुमारावस्थेंतील तुझें कडक ब्रह्मचर्यहि मला अवगत आहे. तेव्हां एवढ्या कष्टानें केलेल्या तुझ्या तपःसंचयाचा व्यर्थ क्षय न व्हावा अशी माझी इच्छा आहे.' १४. २. ५३.

---

## अध्याय ५४ वा.

[ १. कृष्ण उत्तंकाला अध्यात्मज्ञान सांगतो ]

( १ ) **उत्तंक :**—श्रीकृष्णा, निर्दोष असें अध्यात्मज्ञान तूं मला सांग, म्हणजे तें ऐकिल्यावर तुला आशीर्वाद द्यावयाचा कीं शापावयाचें तें पाहीन.

**श्रीकृष्ण :**—सत्व, रजस आणि तामस हे तीन गुण माझ्या आश्रयानें असतात. रुद्र, वसु हेहि माझ्यापासूनच उत्पन्न झालेले होत. माझ्यांत सर्व भूतें आहेत, तसा मींहि सर्व भूतांत आहे, हें लक्षांत ठेव. दैत्य, यक्ष, गन्धर्व, राक्षस, नाग, अप्सरा, हीं सर्वहि माझ्यापासून झालेलीं आहेत. सत्-असत्, अव्यक्त-व्यक्त, अक्षर-क्षर असें ज्यांना म्हणतात, तीं सारीं मत्स्वरूपीच होत. चार आश्रमांत जे चार धर्म प्रसिद्ध आहेत ते, तशींच सर्व वैदिक कर्में हीं माझींच स्वरूपें आहेत. मी देवाचाहि देव व सनातन असून सत् असत् असें

सारें विश्वहि माझ्याहून अधिक नाहीं. ओंकारप्रमुख वेद, तसेंच यूप, सोम, चरु, होम व यज्ञांतील देवांचें समाधानहि मीच आहें. मुने, होता व हविर्द्रव्य, अध्वर्यु, कल्पक, पवित्र हवि, हीं मीच असून महायज्ञांत गीताच्या घोषानें उद्गाता माझेंच स्तवन करतो. प्रायश्चित्तकर्मांत शांतिपाठ व मंगलपाठ करणारे ब्राह्मण मज विश्वनिर्मात्यालाच स्तवितात. ब्राह्मणा, धर्म हा माझा सर्वभूतांवर दया करणारा व प्रिय असा ज्येष्ठ मानस पुत्र आहे. प्रवृत्तिमार्गी किंवा निवृत्तिमार्गी मनुष्यांसह मी त्या धर्माच्या संरक्षणासाठीं व स्थापनेसाठीं अनेक योनींतून फिरत असतों. त्यांत मी अनेक वेश व रूपें धारण करतों व तिन्ही लोकांत संचार करतों. विष्णु मीच, ब्रह्मदेव मीच, इंद्र मीच, सर्व प्राण्यांचा उत्पत्तिकर्ता व लयकर्ताहि मीच. अधर्मानें वागणाऱ्या सर्वांचा संहार मीच करतों. मी प्रत्येक युग चालू होतांना धर्माच्या मर्यादा घालून देतों व त्यावेळीं निरनिराळ्या योनींत प्रवेशून प्राण्यांचें हित करतों. उत्तंका, जेव्हां मी देवयोनि स्वीकारतों तेव्हां माझें सर्व आचरण देवासारखें असतें, गंधर्वयोनींत जातों तेव्हां गंधर्वासारखा मी वागतों, नागयोनींत अवतरतों तेव्हां नागासारखें वर्तन ठेवतों, व यक्षराक्षसादि योनींत जन्म घेतों तेव्हां तशाच पद्धतीनें चालतों. उत्तंका, सांप्रत मी मनुष्ययोनींत असल्यामुळें दीनाप्रमाणें त्या कौरवांपुढें सामाची याचना केली, पण मोहानें घेरून गेल्यामुळें त्यांनीं माझें मागणें अमान्य केलें. एकदां तर भयंकर स्वरूप दाखवून मीं त्यांना घाबरवूनहि सोडिलें, तसेंच मीं खरोखर कोण आहे हेंहि रागानें त्यांना दाखवून दिलें. पण ते अधर्मानें पछाडलेले होते व कालधर्मानें घेरले होते. युद्धांत त्यांना मरण आल्यामुळें ते निःसंशय स्वर्गास गेले. उत्तंकमुने, पांडवांची जगांत कीर्ति झाली आहे. असो, तूं जें मला विचारिलें तें सर्व मीं तुला सांगितलें.' १४.२.५४

---

## अध्याय ५५ वा.

[ १. उत्तंकाला विश्वरूपदर्शन. २ त्याला उदकप्राप्तीचा वर. ]

( १ ) **उत्तंक**—हे जनार्दना, तूं विश्वाचा निर्माता आहेस हें मी जाणतों व हें माझें ज्ञानहि तुझ्याच कृपेचें फळ होय यांत संशय नाहीं. अच्युता, माझें चित्त आतां प्रसन्न झालें असून तुजविषयींच्या भक्तीनें भरून गेलें आहे व तुला शाप देण्याच्या इच्छेपासून तें अगदीं निवृत्त झालें आहे. आतां तुझ्या कृपेला जर

मी पात्र असेन, तर माझ्या मनांत तुझें विश्वरूप पहाण्याचें आहे, तेवढें मला दाखव.

वैशंपायनः—राजा, उत्तंकाच्या विनंतीप्रमाणें कृष्णानें संतुष्ट होऊन आपलें विश्वरूप त्याला दाखविलें व उत्तंकानें तें पाहिलें. त्याचे बाहु प्रचंड असून त्याचें तेज सहस्रावधि सूर्यांच्या एकत्रित प्रकाशासारखें व अग्नीप्रमाणें असह्य होतें. तें सारें आकाश व्यापून राहिलें असून त्याला सर्वबाजूंनीं तोंडें होतीं. तें विष्णूचें अद्भुत व सर्वव्यापी ऐश्वर्ययुक्त श्रेष्ठरूप पाहून उत्तंकाला विस्मय वाटला व तो म्हणाला, 'हे विश्वाच्या निर्मात्या, तुला नमस्कार असो. तूं विश्वाचा आत्मा व उत्पत्तिस्थान आहेस. तुझ्या पायांनीं पृथ्वी व्यापिली असून मस्तकानें आकाश झांकून टाकिलें आहे. पृथ्वी व आकाश यांतील भाग तुझ्या जठरानें भरून गेला आहे व तुझ्या बाहूंनीं सर्व दिशांना आवरण घातलें आहे. देवा, आतां हें तुझें अक्षय्य व उत्तम रूप आवरून घे. तुझ्या पूर्वीच्या रूपांतच मला तुझें पुनः दर्शन घ्यावेंसें वाटतें.' उत्तंकाच्या इच्छेप्रमाणें प्रसन्न होऊन कृष्णानें मूळ स्वरूप धरिलें व त्याला वर मागावयास सांगितलें. तेव्हां उत्तंक म्हणाला, 'पुरुषोत्तमा, तुझें वैष्णवस्वरूप मला पहावयास मिळालें, एवढ्यानें माझ्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या. आतां आणखी वर तो काय मागावयाचा?' पण कृष्ण त्याला पुनः म्हणाला, 'मुने, माझें दर्शन व्यर्थ जाणारें नाहीं. अवश्य माग; विचार करण्याचें कारण नाहीं.'

(२) त्यावर उत्तंकानें उत्तर दिलें, 'जर मीं वर मागणें अवश्य आहे असें तुला वाटत असेल, तर या मरुदेशांत अत्यंत दुर्लभ असें जें जल, तें जेथें मला हवें असेल तेथें मिळावें.' तेव्हां आपलें तेज आवरून कृष्ण म्हणाला, 'उत्तंका, तुझ्या मनांत यज्ञ करावा असें येईल, त्यावेळीं तूं माझें चिंतन कर.' असें सांगून तो द्वारकेस निघून गेला. मग एकदां उत्तंक ऋषि पाण्याच्या अभावीं तृषार्त होऊन मरुदेशांत भटकत असतां त्यानें कृष्णाचें स्मरण केलें. तेव्हां त्या ठिकाणीं एक नागवा मातंग त्याच्या दृष्टीस पडला. त्याचें अंग मलाच्या पुटांनीं भरलेलें होतें, व त्याच्यासमागमें अनेक कुत्रेहि होते. त्यानें तीक्ष्ण तरवार कमरेला बांधली असून हातांत धनुष्यबाणहि घेतले होते. त्याच्या खांद्यावर पखाल असून तींतून पाणी पुष्कळ गळत होतें. उत्तंकाला पाहून तो मातंग हंसत हंसत आठवण झाल्यासारखें करून त्याला म्हणाला, 'उत्तंका, हें पाणी माझ्यापासून तुला पाहिजे आहे ना? तुला तहानेलेला पाहून माझ्या मनांत तुजविषयीं फार

करुणा उत्पन्न झाली आहे.' मातंगाचें बोलणें ऐकूनहि ऋषीला तें पाणी घेणें रुचलें नाहीं व तो कृष्णाला कठोर शब्दांनीं दोष देऊं लागला. पुनः पुनः मातंग त्याला म्हणे, 'अरे पी,. पाणी पी'. पण उत्तंकाला राग मात्र आला व पाणी न पितां निश्चय-पूर्वक त्यानें मातंगाला झिटकारून टाकिलें. तेव्हां मातंग आपल्या कुत्र्यांसह तेथेंच अदृश्य झाला. तें पाहून मात्र उत्तंकाच्या मनांत थोडी लज्जा उत्पन्न झाली व कृष्णानें आपल्याला फसविलें असेंहि त्याला वाटलें. इतक्यांत त्या मार्गानें शंखचक्रगदाधारी कृष्णच तेथें आला, तेव्हां उत्तंक त्याला म्हणाला, 'पुरुषोत्तमा, माझ्यासारख्या ब्राह्मणाला तसलें मांगाच्या पखालींतील पाणी देणें योग्य नाहीं.' त्याचें तें दुःखाचें बोलणें ऐकून कृष्णानें गोड शब्दांनीं त्याचें सान्त्वन केलें आणि सांगितलें, "मुने, जें रूप घेऊन तुला पाणी देणें योग्य होतें, तेंच रूप घेऊन खरोखर तुला तें दिलें असतां तूं तें समजून घेतलें नाहींस. अरे, मीं इन्द्राला तुझ्यासाठीं म्हणून सांगितलें कीं 'उत्तंकाला जलरूपानें अमृत दे'. तेव्हां तो म्हणाला, 'मरणशील अशा मनुष्याला अमृत दिल्यानें तो अमर होईल, यास्तव उत्तंकाला दुसरा कांहीं वर देणेंच योग्य.' पण मीं त्याला पुनः अमृतच देण्यास सांगितलें असतां त्यानें माझी समजूत करून, म्हटलें, 'उत्तंकाला अमृत देणें जर अवश्यच असेल, तर मी मातंगाच्या रूपानें तें त्याला त्याला देईन. त्या स्वरूपांत जर उत्तंक ते घेईल तर ठीक आहे. हा पहा मी जातों त्याला अमृत द्यावयाला. पण जर त्यानें मला झिडकारिलें तर मात्र त्याच्या पाठीस लागून मी तें देणार नाहीं.' उत्तंका, असा संकेत करून इन्द्र मातंगाचें रूप घेऊन तुजजवळ आला पण तूं त्याला तो अमृत देत असतांहि झिडकारिलेंस; ही तुझी मोठी चूक झाली. पण आतां तुझ्या इच्छेनुसार मला जें करणें शक्य आहे तेवढें मी करतों. तुला पाण्याची अत्युकट इच्छा आहे ती मी पुरवतों. ज्या दिवशीं तुला पाणी पाहिजे असें वाटेल, त्या दिवशीं या मरुभूमींत जलपूर्ण मेघ येतील व चविष्ट असें पाणी तुला देतील. त्यांना तुझ्यावरून उत्तंकमेघ असें नांव मिळेल." कृष्णानें असें सांगितलें तेव्हां उत्तंकाला संतोष झाला. राजा, अजूनहि मरुदेशांत उत्तंकमेघ वर्षाव करतात. १४. २. ५५.

## अध्याय ५६ वा.

[ १. उत्तंकाचें समावर्तन व विवाह. २ गुरुपत्नी अहल्या त्याला कुंडलें आणावयास पाठविते. ]

( १ ) **जनमेजय**—वैशंपायन मुने, थोर मनाच्या उत्तंकानें असें कोणतें तप केलें होतें कीं त्याच्या बळावर तो श्रीकृष्णाला शापावयास सिद्ध झाला बरें ?

**वैशंपायनः**—उत्तंकानें मोठें तप केलें होतें. तो तेजस्वी गुरुभक्त असून गुरूवांचून तो कसलाहि विचार करीत नसे. त्याच्यासमागमें असलेल्या सर्व ऋषिपुत्रांची इच्छा अशी असे कीं, गुरूसंबंधानें उत्तंकाची वृत्ति जशी आहे, तशी आपलीहि असावी. गौतममुनीला अनेक शिष्य होते. पण त्यांत त्या सर्वांत त्याचें उत्तंकावर विशेष प्रेम होतें. उत्तंकाचें इन्द्रियदमन, त्याचें शुद्ध आचरण, त्याचीं पराक्रमाचीं कृत्यें आणि विशेषतः उत्तम प्रकारची त्याची सेवा यांच्या योगानें गौतम अगदीं संतुष्ट होई. त्यानें सहस्रावधि शिष्यांना विद्याभ्यासानंतर घरीं परत पाठविलें, पण उत्तंकावरील उत्कट प्रेमामुळें तो त्याला मात्र समावर्तनाला अनुज्ञा देईना. कालान्तरानें उत्तंक वृद्ध झाला. पण तरीहि त्याच्या लक्ष्यांत ती गोष्ट आली नाहीं, इतकी त्याचीहि गुरुप्रीति उत्कट होती. असें चाललें असतां एक दिवस तो लांकडें आणण्यासाठीं वनांत गेला. तेथें त्यानें लांकडें गोळा करून त्यांचा मोठा भारा बांधिला. तो भारा घरीं आणीत असतां त्याच्या ओझ्यानें तो दमून गेला व त्याला भूकहि लागली. तेव्हां आल्याबरोबर त्यानें तो भारा भूमीवर टाकून दिला. त्या भाऱ्याला उत्तंकाच्या डोक्यावरील एक पिकलेली जटा अडकून गेली होती, तीहि भाऱ्याबरोबर खालीं पडली. ती पहातांच आपण वृद्ध झालों ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली व आधीं थकून व भुकेनें व्याकुळ झालेला असल्यामुळें आपली वृद्धावस्था पाहून त्याला ढळढळां रडूं आलें. तेथें जवळच गौतमाची सुंदर कन्या उभी होती. उत्तंकाच्या डोळ्यांतून अश्रु येताहेत असें पाहून तिनें ते हातांत घेतले. ती नित्य पित्याच्या आज्ञेंत असून धर्मज्ञ व नम्र असे. तिचे हात त्या अश्रुबिन्दूंनीं पोळून निघाले व त्या बिन्दूंसह खालीं आले. ते अश्रु भूमीवर पडले तेव्हां भूमीलाहि ते सहन झाले नाहींत. तें पाहून गौतम उत्तंकाला प्रेमानें म्हणाला, 'बाळा, कां रे तुझें मन आज एवढें शोकानें व्याप्त झालें ? काय झालें तें सारें मला मोकळेपणें सांग; मला तें ऐकावयास पाहिजे.'

उत्तंकानें उत्तर केलें, 'गुरुजी, माझें मन आपल्याकडे लागून राहिल्यामुळें आपल्याला आवडेल तेंच करावें असें मला वाटलें व आपल्याविषयींच्या भक्ती-मुळें मी नित्य तसेंच करीत आलों; त्या कारणास्तव मी जराग्रस्त झालों तरी ती गोष्ट माझ्या ध्यानीं आली नाहीं व मला सुखहि मिळालें नाहीं. मी आपल्याजवळ शंभर वर्षें राहिलों तरी आपण मला गृहस्थ होण्याला अनुज्ञाहि दिली नाहीं. माझ्यामागून येथें आलेले शेंकडों सहस्रावधि शिष्य विद्यासंपन्न होऊन आपल्या आज्ञेनें गृहस्थ झाले.

**गौतम**—उत्तंका, खरोखरच तुझ्याविषयींच्या माझ्या प्रेमामुळें आणि तुझ्या सेवापद्धतीमुळें एवढा दीर्घ काळ निघून गेला, तरी तो माझ्या लक्षांतच आला नाहीं. पण बाळा, आतां जर तुझ्या मनांतून घर करावयास जावयाचें असेल तर माझी तुला अनुज्ञा आहे. तूं खुशाल जा; मुळींच वेळ दवडूं नको.

**उत्तंक**—गुरुजी, पण आपल्याला गुरुदक्षिणा काय देऊं ती सांगा; म्हणजे तेवढी आणून दिल्यावर आपली आज्ञा घेऊन जाईन.

**गौतम**—उत्तंका, गुरूचा संतोष हीच दक्षिणा असें ज्ञाते म्हणतात. खरो-खर, तुझ्या आचरणानें मी अगदीं संतुष्ट झालों आहें. मला किती संतोष झाला आहे, हें तुला पहावयाचें असेल, तर तूं आतां असा जराग्रस्त न रहातां सोळा वर्षांचा तरुण होशील असा वर मीं तुला दिला पहा. फार काय पण माझी मुलगीहि मी तुला पत्नी म्हणून देतों. तिच्यावांचून इतर स्त्रीला तुझें तेज सहनच होणार नाहीं.

गौतमानें म्हटल्याप्रमाणें उत्तंक तत्काळ तरुण झाला व त्यानें त्या सुंदर गौतमकन्येचें पाणिग्रहण केलें. नंतर तो गुरुगौतमाची आज्ञा घेऊन गुरु-पत्नीकडे गेला व तिला म्हणाला, 'तुम्हांला गुरुदक्षिणा म्हणून मी काय देऊं तेवढें सांगा. तुम्हांला आवडेल व तुमच्या हिताचें असेल तें करण्यासाठीं मी जिवाची किंवा धनाची क्षिति बाळगणार नाहीं. या जगांत अगदीं दुर्मिळ असें अद्भुत रत्न असलें तरीहि तें मी तपाच्या बळानें मिळवून आणीन यांत संशय नाहीं.'

उत्तंकाची ही विनंति ऐकून गुरुपत्नी अहल्येनें उत्तर केलें, 'मुला, तुझ्या नित्य भक्तीनेंच मी अगदीं संतुष्ट झालें आहें. तेवढें मला अगदीं पुरें झालें. तूं आतां आपल्या इच्छेप्रमाणें गृहस्थाश्रम कर, जा बरें.'

( २ ) राजा, उत्तंकाचें समाधान गुरुपत्नीच्या उत्तरानें झालें नाहीं. तो पुनः तिला म्हणाला, 'माते, मला कांहींतरी आज्ञा कर. तुझें कांहीं प्रिय करावें अशी माझी मनीषा आहे.' हें ऐकून अहल्येनें म्हटलें, 'उत्तंका, सौदास राजाची पत्नी जीं दिव्य रत्नकुंडलें कानांत घालीत असे, तीं तेवढीं घेऊन ये. तुझें कल्याण असो. एवढें केल्यानें गुरुदक्षिणा दिल्याचें श्रेय तुला मिळेल.' तिचें भाषण ऐकून तिच्या आवडीची ती वस्तु आणून देण्याचें उत्तंकानें ठरविलें व 'ठीक आहे, आणून देतों' असें म्हणून तो तेथून निघाला. तो गेला तो थेट सौदास राजा मनुष्यभक्षक राक्षस होऊन पडला होता त्याजवळ तीं रत्नकुंडलें मागण्यासाठीं गेला. इकडे उत्तंक कोठें दिसत नाहीं असें पाहून गौतमानें 'तो कोठें आहे?' म्हणून पत्नीला विचारिलें. तेव्हां 'तो कुंडलें आणावयास गेला आहे,' असें तिनें सांगितलें. त्यावेळीं तो तिला म्हणाला, 'तूं हें बरें केलें नाहींस. तो राजा ब्राह्मणशापामुळें राक्षस झालेला आहे, तो त्या उत्तंकाला मारून खाईल.' पतीचें भाषण ऐकून अहल्येनें उत्तर केलें, 'मीं हें न जाणतां त्याला पाठविलें खरें. पण आपल्या कृपेनें त्याला कांहीं भय उत्पन्न होणार नाहीं. 'ठीक आहे, तसेंच होवो,' असें गौतम पत्नीला म्हणाला. इकडे उत्तंक त्या निर्जन वनांत शोध करीत फिरत असतां सौदास राजा त्याच्या दृष्टीस पडला. १४. २. ५६.

---

## अध्याय ५७ वा.

[ १. सौदासाच्या सांगण्यावरून उत्तंक त्याच्या मदयन्ती राणीकडे जाऊन कुंडलें मागतो. ]

( १ ) वैशंपायन—राजा, उत्तंकाला त्या भयंकर राक्षसरूपी सौदासाला पाहिल्यावर कांहींच भीति वाटली नाहीं. सौदासाची दाढी व मिशा लांब वाढल्या असून त्याचें अंग माणसांच्या रक्तानें माखलेलें होतें. उत्तंक जवळ येतांच यमासारखा भयंकर दिसणारा तो राजा उठला आणि त्याला म्हणाला, 'बरें झालें, तूं आलास तें. मी भक्ष्य शोधीत असतां तीन दिवसांनीं तूं मजजवळ आला आहेस.' उत्तंकानें उत्तर केलें, 'राजा, गुरुदक्षिणा देण्यासाठीं पाहिजे असलेली वस्तु शोधीत मीं येथें आलों आहें. गुरुदक्षिणेसाठीं शोध करण्यास निघालेल्याला मारावें असें सुज्ञांनीं कोठें सांगितलेलें नाहीं.' सौदास म्हणाला,

'ब्राह्मणा, आज तीन दिवसांनंतर मला आहार मिळत आहे. तेव्हां भुकेलेल्या माझ्या तडाख्यांतून सुटणें तुला शक्य नाहीं.'

**उत्तंक**—राजा, तूं म्हणतोस तेंहि ठीकच आहे. पण तुझ्याशीं मीं ठराव करतों कीं गुरुदक्षिणा दिल्यानंतर मी येथें तुझ्या आहारासाठीं खचित परत येईन. मीं जी वस्तु गुरूला देण्याचें वचन दिलें आहे, ती तुझ्या स्वाधीन आहे व ती तुझ्यापाशीं मागण्यासाठीं मी येथें आलों आहें. तूं मोठमोठ्या ब्राह्मणांना नित्य रत्नें देत असतोस व या जगांत योग्य दाता म्हणून तुझी ख्यातिहि झाली आहे. मीहि प्रतिग्रहास पात्र आहें. तरी, हे राजा, गुरूला द्यावयाची तुझ्याजवळ असलेली वस्तु त्याच्या स्वाधीन केल्यावर या ठरावाप्रमाणें मी येथें परत येईन. मी हें अगदीं खरें सांगतों, यांत अन्यथा कांहीं नाहीं. थट्टेच्या भाषणांतहि मी आजवर कधीं खोटें बोललेला नाहीं, मग गंभीरपणें असत्य बोलण्याची गोष्ट कशाला ?

**सौदास**—जर तुझी गुरुदक्षिणा माझ्या स्वाधीन असेल, तर ती तुला मिळालीच म्हणून समज. मी जर दान देणें यावेळीं शक्य असेल, तर सांग काय तें.

**उत्तंक**—राजश्रेष्ठा, माझ्या मतें तूं सदाच योग्य दाता आहेस आणि म्हणूनच मी रत्नकुंडलें मागण्यासाठीं तुजकडे आलों आहें.

**सौदास**—ब्राह्मणा, तीं रत्नकुंडलें माझीं नव्हत, माझ्या पत्नीचीं आहेत. तरी दुसरी कांहीं वस्तु माग, ती मी देईन.

**उत्तंक**—राजा, आतां ढोंग पुरे झालें. मी म्हणतों हें जर तुला खरें वाटत असेल, तर मला कुंडलें दे आणि आपलें वचन खरें कर.

जनमेजय राजा, याप्रमाणें उत्तंकानें सांगितलें असतां सौदास त्याला पुनः म्हणाला, 'ब्राह्मणा, जा, आणि माझ्या राणीपाशीं माझ्या सांगण्यावरून तीं कुंडलें माग. तूं माझें नांव सांगितलें आसतां ती पतिव्रता तुला तीं कुंडलें देईल, यांत संशय नाहीं.

**उत्तंक**—राजा, तुझी पत्नी मला कोठें सांपडेल ? किंवा तूंच आपल्या पत्नीजवळ जाऊन तीं कां आणीत नाहींस ?

**सौदास**—ती तुला या वनांतील एकाद्या झऱ्याशीं आढळेल. आज मला ती भेटणें शक्य नाहीं.

याप्रमाणें दोघांचा संवाद झाल्यावर सौदासानें सांगितल्याप्रमाणें उत्तंक मदयन्तीकडे गेला व आपलें तेथें जाण्याचें कारण तिला त्यानें सांगितलें सौदासाचा निरोप ऐकून ती उत्तंकाला म्हणाली, 'ब्राह्मणा, तूं म्हणतोस तें ठीक आहे, तूं कांहीं खोटें सांगत नाहींस. तरी तूं कांहीं खूण आणशील तर बरें. ही जीं माझीं दिव्य रत्नकुंडलें आहेत, तीं या नाहीं त्या उपायानें बळकावण्यासाठी देव, यक्ष व महर्षि हे सारे नित्य टपले आहेत. ते कांहीं संधि शोधीत असतात हें रत्न जर भूमीवर ठेविलें तर सर्प तें पळवून नेतील. उष्ट्यानें हें धारण केल्यास यक्ष तें बळकावूं शकतील व तें घेऊन झोंपीं गेल्यास देव तें हरून नेतील अशी कांहीं संधि सांपडली कीं त्यांचें हरण झालेंच म्हणून समज. देव, राक्षस व नाग यांना अगदीं जपत तीं घालावीं लागतात. ब्राह्मणा, रात्रंदिवस त्यांतून सोन्याचा पाझर निघत असतो. रात्रीं त्यांचें तेज नक्षत्रें व तारका यांच्या तेजाला मागें सारतें. हीं अंगावर असतां भूक व तहान यांचें भयच नसतें; तसेंच विष अग्नि, श्वापदें यांचेंहि भय रहात नाहीं. हीं आंखूड नाहींत, पण अंगावर घातलीं कीं अवश्य तेवढीं आंखूड होतात. धारण करणाराच्या मानानें तीं लहान मोठीं होतात. अशीं हीं माझीं अत्यंत श्रेष्ठ कुंडलें त्रिभुवनांत विख्यात आहेत. तरी तूं कांहीं खूण घेऊन ये म्हणजे तीं मी तुला देईन.' १४. २. ५७.

---

## अध्याय ५८ वा.

[ १. उत्तंक सौदासाची खूण म्हणून त्याचा श्लोक मदयंतीला सांगतो व ती त्याला कुंडलें देते. २ कोणी नाग तीं पळवितो. ३ उत्तंक तीं परत मिळवून गुरुपत्नीला देतो. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, उत्तंक मदयन्तीच्या सांगण्याप्रमाणें पुनः सौदासाकडे गेला व कांहीं खूण त्यानें त्यापाशीं मागितली. तेव्हां सौदासानें ती दिली. ती खूण म्हणजे 'ही माझी स्थिति हितकारक नाहीं व दुसरा कांहीं मार्ग नाहीं. हें माझें मत लक्षांत घेऊन रत्नकुंडलें देऊन टाक', या अर्थाचा श्लोक होता. उत्तंकानें मदयन्तीकडे जाऊन तिला तो म्हणून दाखविला व तो ऐकून तिनें त्याला आपलीं रत्नकुंडलें काढून दिलीं. कुंडलें हातीं आल्यावर उत्तंक सौदासाकडे पुनः आला आणि त्याला म्हणाला, 'तूं जो निरोप म्हणून श्लोक सांगितला त्याचा भावार्थ काय, तो ऐकण्याची माझी इच्छा आहे.'

**सौदास**—ब्राह्मणा, सामान्यतः क्षत्रिय ब्राह्मणांना मान देतात. पण ब्राह्मणांतहि पुष्कळ दोष असतातच. त्याप्रमाणें मीं ब्राह्मणांशीं नम्रपणें वागत असतां एका ब्राह्मणापासूनच माझ्यावर संकट आलें. तेव्हां मदयन्तीच्या साह्यावांचून मला दुसरा आधार उरला नाहीं. स्वर्गप्राप्तीचा दुसरा उपाय मला तरी कांहीं दिसत नाहीं. ब्राह्मणांशीं विरोध करून या लोकीं काय व परलोकीं काय सुखानें रहाणें शक्य नाहीं. म्हणून तुला पाहिजे असलेलीं तीं आपलीं रत्नकुंडलें मीं देऊन टाकिलीं. आतां तूं जो माझ्याशीं ठराव केलास, तो तूं आपला पुरा कर.

**उत्तंक**—राजा, ठीकच आहे, तसेंच करण्यासाठीं मी पुनः तुझ्या हातीं येतों. पण सध्यां एक प्रश्न विचारण्यासाठींच मी आलों आहें.

**सौदास**—ब्राह्मणा, काय मनांत असेल तें बोल. त्याचें उत्तर मी देतों व तुझा संशय दूर करतों. मला भिण्याचें तुला कांहींच कारण नाहीं.

**उत्तंक**—धर्मांत निपुण असलेले पुरुष सांगतात कीं ब्राह्मण हा वचनानें बांधलेला असतो. तसाच मित्राशीं जो उलट वागतो तो चोर होय असेंहि ते म्हणतात. राजा, तूं आतां माझा मित्र झाला आहेस, तर तुला मी मत विचारतों, तें तूं तुला वाटत असेल तसें दे. आतां माझी वस्तु मला मिळाली आहे, आणि तूं तर मनुष्यभक्षक झाला आहेस. तर आतां मी पुनः तुझ्यापाशीं येणें हिताचें होईल कीं अहिताचें होईल तें मला तूंच सांग.

**सौदास**—ब्राह्मणा, तुझें हित सांगावयाचें तर मी असें सांगतों कीं, तूं मजजवळ पुनः कसेंहि करून येऊं नये, यांतच तुझें हित आहे. जर तूं आलास तर तुझा मृत्यु ठेवलेलाच आहे.

राजा जनमेजया, याप्रमाणें बुद्धिमान् सौदासानें हिताची गोष्ट सांगितली असतां, उत्तंक त्याची अनुज्ञा घेऊन गुरुपत्नी अहिल्येकडे जावयास निघाला. तीं कुंडलें घेऊन गुरुपत्नीची आवड पुरविण्यासाठीं तो वेगानें गौतमाश्रमाकडे जात असतां मदयंतीनें सांगितल्याप्रमाणें त्यांचें योग्य रक्षण करण्यासाठीं त्यानें तीं आपल्या मृगचर्मांत बांधून घेतलीं होतीं. वाटेंत त्याला भूक लागली असतां एक बेलाचें झाड फळांनीं ओथंबलेलें त्याच्या दृष्टीस पडलें. तें पाहून उत्तंक त्या झाडावर चढला. आपलें मृगचर्म त्यानें एका खांदीला अडकवून ठेविलें व तो बेलफळें पाडूं लागला. तीं पाडीत असतां त्याची दृष्टि त्यांकडे वेधून गेली व त्यांतील कांहीं त्या मृगचर्मावर पडल्यामुळें त्याची गांठ सुटून तें कुंडलांसह खालीं

भूमीवर पडलें. गांठ सुटून मृगचर्म झाडाखालीं भुईवर पडलें असतां त्यांतील तीं रत्नकुंडलें एका सर्पाच्या दृष्टीस पडलीं. लगेच त्या सर्पानें तीं तोंडांत धरून बिळांत प्रवेश केला. तो सर्प कुंडलें पळवून नेत आहे असें पहातांच उत्तंक मोठ्या दुःखानें व रागानें झाडावरून खालीं उतरला आणि काठी घेऊन तें बीळ उकरूं लागला. पंचवीस दिवस तो ब्राह्मण रागानें व आवेशानें तें खणीत राहिला व पृथ्वीलाहि त्याचे आघात सहन होत नाहींसे होऊन काठीनें तिचें अंग फाटल्यामुळें ती कांपूं लागली. नागलोकांपर्यंत जाण्यासाठीं वाट करण्याच्या निश्चयानें उत्तंक बीळ खणीत असतां घोडे जोडलेल्या रथांत बसून इंद्र तेथें आला व उत्तंक त्याच्या दृष्टीस पडला. त्याचे ते कष्ट पाहून इन्द्राला दुःख झालें आणि ब्राह्मणाचें रूप घेऊन तो त्याला म्हणाला, 'अरे, तुला ही वाट करणें शक्य नाहीं. नागलोक येथून सहस्रावधि योजनें लांब असल्यामुळें तेथपर्यंत वाट करण्याचें काम या तुझ्या काठीनें साधण्यासारखें नाहीं.' उत्तंकानें उत्तर दिलें, 'नागलोकीं जाऊन कुंडलें परत मिळविणें जर मला शक्य नसेल, तर मीं येथेंच तुझ्या समक्ष प्राणत्याग करतों.' उत्तंक आपला हेका सोडीत नाहीं असें जेव्हां इन्द्रानें पाहिलें, तेव्हां त्यानें त्याच्या काठीला आपलें वज्र जोडिलें. तेव्हां त्या वज्रप्रहारांनीं भूमी सारखी फुटत चालली व नागलोकापर्यंतचा मार्ग सिद्ध झाला. मग उत्तंक त्या मार्गानें नागलोकीं गेला व तो सहस्र योजनें विस्तृत आहे असें त्याला आढळलें. त्याला भोंवतीं दिव्य रत्नें व मणि यांची बळकट तटबंदी केलेली असून सोन्याचे खांब लाविलेले होते. तेथील विहिरींना स्फटिकांच्या पायऱ्या होत्या. तेथील नद्यांतील पाणी अगदीं स्वच्छ असून त्यांतील वृक्षांवर नाना प्रकारचे पक्षी क्रीडा करीत होते. त्याचें प्रवेशद्वार पांच योजनें रुंद व शंभर योजनें उंच होतें. असा तो नागलोक पाहून उत्तंक बहुतेक निराश होऊन गेला, आणि कुंडलें परत मिळणें शक्य नाहीं असेंच त्याला वाटलें. पण इतक्यांत पांढऱ्या शेपटीचा घोडा त्याला दिसला. त्याचें तोंड व नेत्र लाल होतीं व तो फार तेजस्वी होता. तो उत्तंकाला म्हणाला, 'ब्राह्मणा, माझ्या अपानद्वारांत फुंकर घाल, म्हणजे तुझीं कुंडलें तुला परत मिळतील. तीं ऐरावताच्या मुलानें नेलीं आहेत. तूं या बाबतींत मुळींच कष्टी होऊं नकोस. गौतमाच्या आश्रमांत तूं मोठें तप केलें आहेस.'

घोड्याचें बोलणें ऐकून उत्तंक त्याला म्हणाला 'अरे, तूं गुरुगौतमाच्या आश्रमांत कधीं मला पाहिलेंस? आणि मीं पूर्वीं तप तरी काय केलें, तें

ऐकण्याची माझी इच्छा आहे.' घोड्यानें उत्तर केलें, 'ब्राह्मणा, तुझ्या गुरूचा गुरु असा जो जातवेदा अग्नि तो मीं आहें. गुरूच्यासाठीं म्हणून तूंच शुद्ध भावानें विधिपूर्वक माझी पूजा सदा करीत असस. म्हणून मीं तुझें कल्याण करणार आहें. तर मी सांगतों तें लवकर कर, वेळ लावूं नको.' घोड्याच्या रूपानें अग्नीनें सांगितल्याप्रमाणें उत्तंकानें फुंकर घालतांच अग्नि पेटूं लागला व सगळें जाळून टाकतो कीं काय असें वाटलें. उत्तंक त्याच्या अंगांत फुंकर घालीत असतां त्याच्या केसांच्या रंध्रांतून दाट धूर निघूं लागला व सारा नागलोक त्यानें घाबरून गेला. तेथें हा प्रकार काय आहे हें कोणाला कळेना. ऐरावत नागाच्या घरांत सर्वत्र हाहाकार उडाला. वासुकि आदिकरून नाग भिऊन गेले. सगळीं घरें धुरानें व्याप्त होऊन काळीं झालीं. वनें व पर्वत धुक्यानें भरल्यासारखीं दिसूं लागलीं. डोळ्यांत धूर जाऊन ते लाल झाले व ज्वाळांनीं सर्व तापून निघाले. तेव्हां उत्तंकाच्या मनांत आहे तरी काय हें जाणण्यासाठीं ते त्याच्याजवळ आले व त्याचें म्हणणें ऐकून घेतल्यावर त्यांनीं त्याची यथाविधि पूजा केली. सर्व लहानथोर नागांनीं त्याच्या पायावर मस्तकें ठेवून त्याला नमस्कार केला व त्याची करुणा भाकिली. त्याला त्यांनीं पाद्य व अर्घ्य अर्पण केलें आणि त्याचीं तीं बहुमोल कुंडलेंहि त्याला परत दिलीं. अशा रीतीनें त्या पराक्रमी उत्तंकाची नागांनीं पूजा केल्यावर तो अग्नीला प्रदक्षिणा करून तेथून त्वरेनें गुरूच्या आश्रमीं गेला व तीं दिव्य कुंडलें त्यानें गुरुपत्नीच्या हातांत नेऊन दिलीं. वासुकिप्रभृति नागांचा वृत्तान्तहि त्यानें गुरूला सांगितला. असा त्या उत्तंकाचा प्रभाव होता व तो त्याच्या उत्तम तपाचा परिणाम होता. राजा, तुझ्या प्रश्नाचें असें हें उत्तर मीं दिलें. १४. २. ५८.

---

## अध्याय ५९ वा.

[ १. श्रीकृष्णाचा द्वारकेंत प्रवेश. ]

( १ ) **जनमेजय**—मुने, उत्तंकाला वर देऊन कृष्णानें पुढें काय केलें बरें?

**वैशंपायन**—राजा, उत्तंकाला वर दिल्यावर श्रीकृष्ण सात्यकीसह घोडे वेगानें हाकीत जो त्वरेनें निघाला, तो सरोवरें, नद्या, अरण्यें, पर्वत बाजूला टाकीत रमणीय अशा द्वारकानगरीस जाऊन पोंचला. तेथें रैवतक पर्वताचा उत्सव चालला होता, तेथें तो युयुधानाच्या समागमें गेला. रैवतकाला अनेक

प्रकारच्या चित्रविचित्र वस्तूंनीं सुशोभित केलें होतें. रत्नजडित कोशांनीं तो झांकून गेला होता. सोन्याच्या फुलांच्या माळा, वस्त्रें, दिव्यवृक्ष, दिवे लावलेलीं झाडें, जिकडेतिकडे त्यावर चमकत होतीं. त्याच्या गुहांतून व झऱ्यांतूनहि सर्वत्र दिवसासारखा प्रकाश पडला होता. पताका व घंटा चोहोंकडे लाविलेल्या असून तो पुरुष व स्त्रिया यांच्या थव्यांनीं अगदीं गजबजून गेला होता. ऋषींच्या समुदायामुळें मेरु दिसावा तसा तो सुंदर दिसत होता. स्त्रीपुरुषांच्या गाण्याचा स्वर स्वर्गाला जाऊन भिडला होता. थोड्याबहुत प्रमाणांत उन्मत्त झालेल्या मनुष्यांनीं तो भरून जाऊन त्यांचा कलकलाट सर्वत्र पसरला होता. तेथें वस्त्रें, माळा यांचा खच पडला होता व वीणामृदंगादि वाद्यांचा गजर चालून खाण्या-पिण्याच्या मद्यादि पदार्थांचीहि अगदीं रेलचेल झाली होती. अगदीं दीनदुब-ळ्यांनाहि ते पदार्थ सारखे मिळत असल्यामुळें त्या उत्सवाला फारच शोभा आली होती. पुण्यवान् लोकांचें निवासस्थान असा तो पर्वत पुण्यवंतांच्या घरां-मुळें जणूं स्वर्गच झाला होता. श्रीकृष्ण तेथें गेल्यावर तर तो पर्वत इन्द्राच्या राजवाड्यासारखा दिसूं लागला. कृष्णाचें सर्वांनीं स्वागत केल्यावर तो आपल्या मंदिरांत गेला. अत्यंत कठीण असें भारतीय युद्धाचें काम पूर्ण करून दैत्यांना जिंकून अमरावतीस येणाऱ्या इन्द्राप्रमाणें तो फार दिवसांनीं परत आला होता. त्याला येतांना पाहून सर्व यादव सामोरे गेले. त्या सर्वांची त्यानें खुशाली विचारिली व मातापित्यांजवळ जाऊन त्यांना नमस्कार केला. वसुदेव-देवकीनीं त्याला आलिंगन देऊन शांत केलें आणि मग पाय धुवून विश्रांति घेतल्यावर त्यानें वसुदेवाच्या प्रश्नावरून कौरवपांडवांच्या युद्धाचें सर्व वृत्त त्यांना सांगितलें. १४. २. ५९.

---

## अध्याय ६० वा.

[ १. कृष्णानें सांगितलेलें भारतीय युद्धाचें संक्षिप्त वृत्त. ]

( १ ) **वसुदेव**—कृष्णा, कौरवपांडवांमध्यें झालेल्या अद्भुत युद्धाचें वृत्त मीं लोक सांगत असतां ऐकिलें, पण तूं तर प्रत्यक्ष तें पाहिलें आहेस. तरी त्याचें यथार्थ वर्णन आम्हांला सांग. पांडव आणि भीष्म, कर्ण, कृप, द्रोण, शल्य, इत्यादि वीर तसेच दुसरे अनेक शस्त्रास्त्रवेत्ते असे नाना देशांहून आले असतां नानाप्रका-रच्या वेषांतील क्षत्रियांमध्यें तें युद्ध कसें झालें तें सांग.

वसुदेवानें असें विचारिलें असतां कृष्णानें मातेच्या जवळ बसून कुरुवीर युद्धांत कसे मरण पावले तें वृत्त त्यांना सांगितलें. तो म्हणाला, 'त्या पराक्रमी क्षत्रियांचीं अद्भुत पराक्रमाचीं कृत्यें इतकीं आहेत कीं शंभर वर्षांनींहि तीं सांगून संपणार नाहींत. पण मी तीं थोडक्यांत स्थूलमानानें सांगतों तीं ऐका. कौरवांच्या अकरा अक्षौहिणी सैन्याचा सेनापति भीष्म होता. देवांचा जसा इंद्र तसाच तो वाटला. इकडे पांडवांच्या सात अक्षौहिणी सैन्याचा नायक शिखंडी झाला व अर्जुन त्याचें रक्षण करीत होता. अशा स्थितींत पहिले दहा दिवस युद्ध चाललें. तें अत्यंत तुंबळ व अंगावर शहारे उठविणारें असें झालें. शेवटीं अर्जुनाच्या साह्यानें शिखंडीनें अनेक बाण सोडून भीष्माला मारिलें. तेव्हां भीष्मानें शरशय्येवरच दक्षिणायन संपेपर्यंत पडून उत्तरायण चालू झाल्यावर योगमार्गानें देहत्याग केला. त्यानंतर अस्त्रवेत्त्यांत श्रेष्ठ असा द्रोण सेनापति झाला. दैत्याधिपति वृषपर्व्याचा जसा शुक्राचार्य तसा दुर्योधनाचा तो वीर होता. उरलेल्या सैन्याच्या नऊ अक्षौहिणीसह कृपाचार्यादि वीर त्याचें रक्षण करीत होते. पांडवांच्या बाजूला महा अस्त्रवेत्ता धृष्टद्युम्न हा नायक असून मित्रदेव जसा वरुणाचा, तसा भीम त्याचा पाठिराखा होता. आपल्या पित्याचा द्रोणानें केलेला अपमान आठवून त्याचा सूड घेण्यासाठीं आपल्या सैन्यासह त्यानें रणांत अलोट पराक्रम केला. द्रोण आणि धृष्टद्युम्न यांच्या त्या तुंबळ युद्धांत अनेक देशींचे राजे व वीर बहुतेक मरण पावले. त्यांचें तें दारुण युद्ध पांच दिवस झाल्यावर द्रोण थकून गेला व धृष्टद्युम्नाच्या हातून वध पावला.

त्यानंतर दुर्योधनाच्या सैन्याचा अधिपति कर्ण झाला. त्यावेळीं तें सैन्य पांचच अक्षौहिणी राहिलें होतें. पांडवांच्या उरलेल्या तीन अक्षौहिणी सैन्याचा नायक अर्जुन होता. त्यांतीलहि बहुतेक प्रमुख वीर मरून गेले होते. पतंगाची अग्नीशीं गांठ पडावी तशी कर्णाची अर्जुनाशीं गांठ पडल्यावर तो पराक्रमी वीरहि दुसऱ्या दिवशीं मृत्युमुखीं पडला. कर्ण मरण पावल्यावर कौरव वीर निरुत्साही व हतवीर्य झाले. त्यांचें सैन्य आतां तीनच अक्षौहिणी उरलें होतें. मद्राधिप शल्याला त्याचें आधिपत्य देण्यांत आलें. पांडवांच्याहि सैन्यांतील बहुतेक वाहनें नष्ट होऊन त्याची दुर्दशा झाली होती व एकच अक्षौहिणी सैन्य जीवंत राहिलें होतें. तरीहि युधिष्ठिरानें त्याचें आधिपत्य स्वीकारून शल्याचा वध केला. अर्धा दिवसच भयंकर युद्ध केल्यावर शल्याला मरण आलें. त्यानंतर शकुनि उरलेल्या कौरवसैन्याचा अधिपति झाला व सहदेवानें मोठा पराक्रम करून त्याचा वध

केला. या सर्व युद्धाचा मूळ उत्पादक शकुनीच होता. तो मरण पावला असतां बहुतेक सैन्य नष्ट झालेलें पाहून दुर्योधन राजा अत्यंत खिन्न झाला व गदा हातांत घेऊन रणांतून पळून गेला. प्रतापी भीमसेन संतापून त्याच्या मागें धांवला. दुर्योधन एका तळ्यांत जाऊन पाण्यांत लपून राहिलेला त्याला दिसला. नष्ट होऊन उरलेल्या पांडव सैन्याचा भीम आतां नायक झाला होता. दुर्योधनाला पाण्यांत बसलेला पाहून पांडवांना हर्ष झाला. त्यांनीं त्याची कठोर शब्दांनीं निर्भर्त्सना केली, तेव्हां तो गदा घेऊन बाहेर आला व युद्धाला सज्ज झाला. तेव्हां सर्वांच्या समक्ष भीमसेनानें त्याशीं गदायुद्ध करून त्याचा वध केला.

नंतर पांडवांचें उरलेलें सैन्य रात्रीं आपल्या शिबिरांत झोंप घेत असतां पित्याच्या वधाचा सूड घेण्यासाठीं द्रोणपुत्र अश्वत्थाम्यानें त्याला कापून काढिलें. अशा रीतीनें पांडवांचें सैन्य व पुत्र आणि मित्र वध पावून मीं व सात्यकि यांसह ते पांच मात्र जीवंत राहिले आहेत. कृपाचार्य व भोज यांना घेऊन अश्वत्थामा युद्धांतून निसटून गेला. पांडवांचा आश्रय केल्यामुळें युयुत्सुहि वांचला. कौरवराज दुर्योधन परिवारासह मरण पावल्यावर विदुर आणि संजय हेहि युधिष्ठिराकडे आले. याप्रमाणें तें युद्ध अठरा दिवस चालून त्यांत ते राजे वध पावून स्वर्गस्थ झाले.

**वैशंपायन**—महाराज, अंगावर रोमांच उभे करणारी ती युद्धाची कथा कृष्णाच्या तोंडून ऐकून सारे यादव दुःखाकुल झाले. १४. २. ६०.

---

## अध्याय ६१ वा.

[ १. अभिमन्यूच्या युद्धाचें वृत्त; २ सुभद्रा व उत्तरा यांचें सांत्वन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, भारतीय युद्धाचें वृत्त सांगतांना कृष्णानें अभिमन्युवधाचा प्रसंग बुद्ध्या गाळला होता. तो ऐकल्यास वसुदेवाला फार वाईट वाटेल हें त्याला ठाऊक होतें. आपल्या पुत्राच्या वधाचा वृत्तांत गाळलेला पाहून सुभद्रेनें 'कृष्णा, तोहि सांगून टाक ना,' असें म्हटलें व ती मूर्च्छित होऊन भूमीवर पडली. ती पडलेली पाहून वसुदेवाची तीच अवस्था झाली. नातवाच्या वधाचें दुःख त्यालाहि सहन झालें नाहीं. सावध झाल्यावर तो कृष्णाला म्हणाला, 'कृष्णा, सत्य बोलणारा अशी तुझी जगांत ख्याति असतांना अभि-

मन्यूच्या वधाचें वृत्त मात्र तूं कां बरें गाळलेंस ? तें तूं मला कां सांगितलें नाहींस ? आपल्या भाच्याच्या निधनाची कहाणी मला सारी सांग. कृष्णा, त्याचे नेत्र कसे तुझ्या नेत्रांसारखे होते. मग शत्रूंनीं त्याला रणांत कसें रे मारिलें ? काळ आला नसल्यामुळें इतर माणसांसह न मरणारें माझें हृदय खरोखर अमर असलें पाहिजे, कारण त्या दुःखानेंहि त्याचे शतशः तुकडे उडाले नाहींत ! युद्धप्रसंगीं तो तुला व सुभद्रेला काय रे म्हणाला ? आणि मला तरी त्यानें कांहीं सांगितलें का ? तो चपलाक्ष माझा किती रे लाडका होता ! रणाला पाठ दाखवून पळत असतां तर शत्रूंनीं त्याला मारिलें नाहींना ? कृष्णा, युद्धांत त्यानें तोंड वेडेंवांकडें केलें नाहींना ? अरे, तो तेजस्वी मुलगा माझ्यापुढें फुशारकी मारून मूलपणामुळें आपलें युद्धकौशल्य मला सांगत असे. द्रोण कर्ण कृप इत्यादिकांनीं त्याला अन्यायानें तर मारिलें नाहींना ? तो भीष्म, द्रोण, कर्ण यांच्याशीं रणांत स्पर्धा करी !' या प्रमाणें नाना प्रकारें शोक करणाऱ्या वसुदेवाला श्रीकृष्ण अत्यंत दुःखित होऊन म्हणाला, 'समरभूमीवर त्यानें वांकडें तोंड कधीं केलें नाहीं आणि तेथून पाठ फिरवून तो परतहि आला नाहीं. शेंकडों वीरांचा वध केल्यावर तो द्रोण व कर्ण यांशीं युद्ध करतांना जेव्हां थकून गेला, तेव्हां शेवटीं तो दुःशासनाच्या पुत्राच्या कचाट्यांत सांपडला. जर एकानें एका-शींच युद्ध करावयाचें अशा नियमानें सर्व वागते, तर इन्द्राला सुद्धां त्याचा वध करणें अशक्य झालें असतें. अर्जुनाला संशप्तकांनीं दुसरीकडे गुंतविलें असतां द्रोणादिकांनीं त्याला वेढा दिला, तेव्हां त्यांच्याशीं लढून पुष्कळांना यमसदनीं पाठविल्यावरच तो दुःशासनपुत्राच्या हातून वध पावला. तो खरोखर स्वर्गीं गेला असल्यामुळें त्याच्याविषयीं शोक करणें उचित नाहीं. संकट आलें असतांहि दृढबुद्धीचे पुरुष खचून जात नाहींत. द्रोणकर्णादि इन्द्रतुल्य पराक्रमी वीरांशींहि ज्यानें रणांत टक्कर दिली त्याला स्वर्ग कसा बरें मिळणार नाहीं ? तरी, बाबा, आतां हा शोक सोडून द्या. शस्त्रानें पवित्र झालेली गति त्याला मिळाली आहे.

'वीर अभिमन्यु वध पावल्यावर ही माझी सुभद्रा बहीण कुररीप्रमाणें आक्रोश करूं लागली. ती द्रौपदीकडे जाऊन 'आर्ये, तुझे पुत्र कोठें आहेत ? त्यांना सर्वांना पहाण्याची मला उत्कंठा लागली आहे,' असें म्हणाली. तिचें बोलणें ऐकून सर्व पांडवस्त्रियाहि तिला मिठी मारून आक्रोश करूं लागल्या. मग ती उत्तरेला म्हणाली, "कुठें ग तुझा पति गेला ? मी येथें आल्याचें त्याला लवकर कळव. माझा निरोप ऐकून तो तसाच घरांतून बाहेर येईल. अजून ग

तो कसा नाहीं आला ? बाळा अभिमन्यो, तुझे सारे शूर मामा खुशाल आहेत बरें. युद्धासाठीं तूं इकडे आलास तेव्हां त्यांनीं तुला आशीर्वाद सांगितला आहे. मला पूर्वीप्रमाणें युद्धाच्या कथा सांग ना रे. मी एवढा विलाप करीत आहें, तरी तूं मला उत्तर कां रे देत नाहींस ?'' अशा प्रकारचा सुभद्रेचा शोक ऐकून कुंती तिच्याजवळ गेली आणि दुःखानें विव्हळ होऊन तिला म्हणाली, "सुभद्रे, कृष्णानें व सात्यकीनें तसाच अर्जुनानें लाड करून वाढविलेला बाळ अभिमन्यु कालधर्माला अनुसरून रणांत वध पावला. असा हा मर्त्य प्राण्यांचा स्वभावच आहे. सुभद्रे, त्यांत शोक करून काय बरें होणार ? असह्य तेजाचा तुझा पुत्र उत्तम गतीस गेला आहे. मुली, तूं थोर क्षत्रिय कुळांत जन्मली आहेस. पुत्रवधाचा शोक करूं नको. आतां तूं उत्तरेकडे पहा. ती गरोदर आहे, तरी शोक सोड. ती अभिमन्यूच्या पुत्राला लवकरच जन्म देणार आहे.'' अशा रीतीनें सुभद्रेचें सान्त्वन करून कुंतीनें दुःख टाकून अभिमन्यूचें श्राद्ध केलें व धर्मराजा, भीम, नकुळ व सहदेव यांच्या अनुमतीनें त्याच्यासाठीं अनेक दानें दिलीं; नंतर ब्राह्मणांना गाई दिल्यावर ती उत्तरेकडे वळून तिच्याशीं बोलूं लागली. ती म्हणाली, "उत्तरे, आतां व्यर्थ संताप करूं नको. तुझ्या उदरांत तुझ्या भर्त्यांचा गर्भ आहे, त्याचें नीट रक्षण करणें आतां तुझें कर्तव्य आहे.'' असें म्हणून कुंती स्तब्ध झाली. असो. तिची अनुज्ञा घेऊन मीं सुभद्रेला येथें घेऊन आलों. बाबा, अभिमन्यूच्या वधाचा वृत्तान्त हा असा आहे. आतां शोक सोडून द्या व मन स्वस्थ करा. १४.२.६१.

---

## अध्याय ६२ वा.

[ १. अभिमन्यूच्या श्राद्धाचा वृत्तान्त. २. व्यासकृत कुंती, उत्तरा व अर्जुन यांच्या सान्त्वनाचें वृत्त. ३. युधिष्ठिराला अश्वमेध करण्याचा उपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—आपल्या पुत्रानें सांगितलेलें वृत्त ऐकून धर्मात्म्या वसुदेवानें शोक करावयाचें सोडून अभिमन्यूचें श्राद्ध केलें. कृष्णानेंहि तसेंच करून सहस्रावधि तेजस्वी ब्राह्मणांना उत्तम प्रकारचें सुग्रास अन्न जेऊं घातलें आणि विपुल दक्षिणा देऊन त्यांची द्रव्येच्छा पूर्ण केली. तो सारा प्रसंग रोमांचकारी झाला. सुवर्ण व गाई, बिछाने व वस्त्रें यांचीं दानें स्वीकारून ब्राह्मणांनीं वृद्धिसूचक आशीर्वाद दिले. बलराम आणि सात्यकि यांनीं सुद्धां अभिमन्यूसाठीं

श्राद्ध केलें. त्यांना अतिशय दुःख झालें असल्यामुळें कांहीं केल्या त्यांच्या मनाला शांति वाटेना.

( २ ) इकडे हस्तिनापुरीं अभिमन्यूच्या विरहामुळें पांडवांनाहि स्वस्थपणा वाटेना. राजा, पतिविरहाच्या दुःखानें होरपळून गेलेल्या विराटकन्या उत्तरेनें तर कितीतरी दिवस अन्नाला स्पर्शहि केला नाहीं. तिची अवस्था फारच करुणास्पद झाली. तिच्या उदरांतील गर्भ त्यामुळें विरून गेल्यासारखा झाला. ती गोष्ट दिव्य ज्ञानानें व्यासाला कळतांच तो तेथें गेला व त्यानें कुंतीची गांठ घेऊन व उत्तरेला भेटून त्यांना शोक सोडून द्यावयास सांगितलें व म्हणाला, ' हे उत्तरे, कृष्णाच्या कृपेनें आणि माझ्या आशीर्वादानें तुला महातेजस्वी असा पुत्र होईल आणि पांडवांच्या पश्चात् राज्याचें रक्षण तोच करील. नंतर अर्जुनाकडे वळून व धर्मराजाला ऐकूं येईल अशा रीतीनें तो म्हणाला, ' अर्जुना, तुला भाग्यवान् नातू होणार असून तो सागरान्त पृथ्वीचें राज्य धर्मानें करील, तरी आतां तूं हा शोक सोडून दे, मीं सांगितलें तें निःसंशय सत्य आहे व तें घडून येणारच. यादवश्रेष्ठ कृष्णानें पूर्वी सांगितलें तें होणारच; त्याचा आतां व्यर्थ विचार कशाला करावा ? अभिमन्यु स्वतः संपादन केलेल्या अक्षय अशा देवलोकीं गेला आहे. तरी तूं काय किंवा इतर कुरुकुलांतील माणसांनीं काय त्याच्यासाठीं शोक करूं नये.

( ३ ) याप्रमाणें व्यास आजोबांनीं सान्त्वन केल्यावर धर्मात्म्या अर्जुनाचा शोक नाहींसा झाला व त्याची वृत्ति ताळ्यावर आली व त्यानंतर, हे राजा, तुझा पिता उत्तरेच्या गर्भामध्यें पुनः शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें वाढूं लागला. तें पाहून व्यासानें पुनः धर्मराज युधिष्ठिराला अश्वमेध करावयास उत्तेजन दिलें आणि तो तेथून गुप्त झाला. युधिष्ठिरानेंहि त्याच्या सांगण्याला अनुसरून हिमालयाजवळचें द्रव्य आणण्याचा विचार केला. १४. २. ६२.

---

## अध्याय ६३ वा.

[ १ पांडव द्रव्य आणण्यासाठीं हिमालयाकडे जातात. ]

( १ ) जनमेजय—वैशंपायन मुने, व्यासाच्या सांगण्यावरून युधिष्ठिरानें अश्वमेधासंबंधानें काय व्यवस्था केली व मरुत्त राजानें जें द्रव्य ठेवून दिलें होतें तें त्यानें कसें आणिलें तें सारें वृत्त मला सांगा.

**वैशंपायन**—राजा, युधिष्ठिरानें व्यासाचें बोलणें ऐकून घेतल्यावर, सर्व बंधूंना एकत्र बोलावून घेतलें व त्यांना तें सगळें समजावून दिलें. तो म्हणाला, 'व्यास आजोबांनीं आपल्याला जें सांगितलें तें कुरुकुळाच्या हितासाठींच होय. कृष्णानें व भीष्मपितामहांनींहि तसेंच सांगितलें असून आपलें त्यांत कल्याणच आहे. त्याप्रमाणें नीटपणें करण्याचा मीं विचार ठरविला आहे. पण आपलें सारें राज्य द्रव्यहीन झालें असल्यामुळें व्यासांनीं सुचविल्याप्रमाणें मरुत्तानें जें अपार द्रव्य हिमालयाजवळ टाकिलें आहे, तें आणण्याची व्यवस्था केली पाहिजे. तर तुमचें मत याविषयीं कसें काय आहे? भीमा, तुला काय वाटतें बरें?

**भीम**—आर्या, व्यासमुनींनीं सुचविलेलें द्रव्य आणण्याविषयीं आपण जो विचार ठरविला आहे, तो मला मान्य आहे. मरुत्ताचें तें द्रव्य आपल्याला मिळाल्यास आपल्या कार्याला तें भरपूर होईल असें मला वाटतें. तर गिरीशाची प्रार्थना करून व त्याला बहुमान देऊन आपण तें आणूं या. महादेव व त्याचे अनुचर गण यांना आपण गोड शब्द, बुद्धिकौशल्य आणि सद्वर्तन यांनीं प्रसन्न करून तें द्रव्य आपण मिळवूं. भयंकर स्वरूपाचे किन्नर तें द्रव्य राखीत असतात. पण शंकर प्रसन्न झाल्यावर तें सहजच कह्यांत येईल.

राजा, भीमाचें भाषण ऐकून धर्मराजाला मोठा आनंद झाला आणि अर्जुन आदिकरून इतर बंधूंनींहि त्याला अनुमोदन दिलें. याप्रमाणें हिमालयाजवळील द्रव्य आणण्याचा सर्वांचा निश्चय झाल्यावर युधिष्ठिरानें ध्रुवनक्षत्रीं व ध्रुववारीं सैन्याला आज्ञा केली आणि ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करवून व देवश्रेष्ठ महादेवाची पूजा करून मोदक, खीर, मांसाचे वडे यांचा त्याला नैवेद्य अर्पिला व तिकडे जाण्यासाठीं आनंदानें प्रस्थान ठेविलें. ते निघाले तेव्हां ब्राह्मणांनीं मंगल व शुभ आशीर्वाद त्यांना दिले व नागरिकांनींहि त्याचें अभिष्ट चिंतिलें. नंतर ब्राह्मण व अग्नि यांना प्रदक्षिणा करून पांडव मार्ग चालूं लागले. पुत्रशोकानें व्याप्त झालेल्या धृतराष्ट्राची व गांधारीची त्यांनीं अनुज्ञा घेऊन त्यांचा पुत्र जो युयुत्सु त्याच्याकडे त्यांनीं राज्याचें रक्षण करण्याचें कार्य सोपविलें व नागरिक लोक आणि विचारी ब्राह्मण यांना तें मान्य झालें. १४. २. ६३.

## अध्याय ६४ वा.

[ १. पांडव द्रव्याच्या स्थानीं जाऊन पोंचतात. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, मग ते पांडव सैन्य व रथ यांसह वाट चालूं लागले असतां त्यांच्या रथांच्या दणदणाटानें पृथ्वी भरून गेली. सूत, मागध, व बंदि त्यांची स्तुति गात बरोबर चालले होते. अघाडीला युधिष्ठिराचा रथ असून त्याच्या मस्तकावर श्वेतछत्र धरिलेलें होतें. सूर्याबरोबर त्याचे किरण ज्याप्रमाणें चालतात, त्याप्रमाणें सैन्य युधिष्ठिराच्या समागमें चालत असून पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें तो शोभत होता. वाटेंत त्याला पाहून लोक आनंदानें त्याचा जयजयकार करीत व त्याचे सैनिक त्या जयशब्दाचा मोठ्यानें अनुवाद करीत. अशा रीतीनें जातां जातां कित्येक सरोवरें, नद्या, वनें व उपवनें त्यांनीं ओलांडिलीं आणि ते हिमालयाजवळ येऊन ठेपले. तेथें जवळच तें विपुल द्रव्य पडलें होतें. तेथें चांगली सपाट विस्तीर्ण भूमि पाहून युधिष्ठिरानें आपल्या सैन्याचा तळ दिला. प्रथम तप, विद्या, इंद्रियसंयम यांनीं युक्त असे ब्राह्मण, व धौम्य गुरु, यांच्या नेतृत्वाखालीं ब्राह्मणांकडून विधियुक्त शांति करविण्यांत आली. राजाचें शिबिर मधोमध ठेवून व त्याच्याभोंवतीं अमात्यांचीं शिबिरें लावून सहा राजमार्गांचा व नऊ भागांचा तो तळ रचण्यांत आला होता. मदोन्मत्त हत्तीसाठीं स्वतंत्र व्यवस्था करण्यांत आली. याप्रमाणें व्यवस्था झाल्यावर युधिष्ठिर ब्राह्मणांना म्हणाला, 'हे श्रेष्ठ ब्राह्मणहो, आतां पुढील कार्याला चांगलें नक्षत्र व दिवस योजून जसें तुम्हांला योग्य वाटेल तसें करा. शक्य तितका कमी विलंब लागेल व आपल्याला येथें फार काळ रहावें लागणार नाहीं एवढीच गोष्ट लक्षांत ठेवून जें योग्य दिसेल तें तुम्हीं करा.' युधिष्ठिराचें म्हणणें ऐकून घेऊन ब्राह्मण आनंदानें म्हणाले, 'राजा, आजच अत्यंत शुभ नक्षत्र असून आजचा दिवसहि पवित्र आहे. यास्तव आजच या उत्तम कार्याला आपण लागूं या. आज आपण सर्वांनीं उपास करून पाण्यावरच राहूं.' ब्राह्मणांच्या सांगण्याप्रमाणें युधिष्ठिरादिकांनीं उपवास करून ती रात्र दर्भावर पडून घालविली. यज्ञांत प्रज्वलित केलेल्या अग्नीप्रमाणें ते रात्रभर जागृत राहिले व ब्राह्मणांचीं प्रवचनें ऐकत त्यांनीं तो वेळ दवडिला. सकाळ झाल्यावर ते ब्राह्मण युधिष्ठिराला पुढील कार्याची दिशा सांगूं लागले. १४. २. ६४.

---

## अध्याय ६५ वा.

[ १. युधिष्ठिर द्रव्य घेऊन परत फिरतो. ]

( १ ) ब्राह्मण म्हणाले, "राजा, आतां महात्म्या त्र्यंबकाला नैवद्य करून आपण आपल्या कार्याला लागूं या." त्यांच्या म्हणण्याप्रमाणें युधिष्ठिरानें यथाविधि महादेवाला बळी दिला. अग्नीला मंत्रानें पवित्र केलेल्या तुपानें तृप्त करून प्रथम पुरोहितानें चरु सिद्ध केला. मग मंत्रपूत अशीं निरनिराळ्या रंगांचीं फुलें, मोदक, खीर, मांस, लाह्या यांच्यासह विधिपुरःसर महादेवाला, नंतर त्याच्या गणांना, मग यक्षराज कुबेराला, तसाच मणिभद्र व इतर यक्ष आणि भूत यांचे जे वरिष्ठ अधिकारी होते त्यांना, अशा क्रमानें तो त्यानें सर्वांना अर्पण केला. कुंभांत तीळभात, मांस, तिलोदक व शिजविलेला भात असे भरून ते त्या त्या देवतांच्या पुढें ठेवण्यांत आले. ब्राह्मणांनाहि युधिष्ठिरानें सहस्रावधि गाई दिल्या व रात्रौ भटकणाऱ्या भूतांनाहि यथायुक्त बळी देण्यांत आले. धुपाच्या वासानें भरून गेलेलें आणि फुलांनीं सुशोभित झालेलें असें तें महादेवाचें स्थान फारच मनोहर दिसूं लागलें. याप्रमाणें महादेव व त्याचे गण यांची पूजा केल्यावर युधिष्ठिर व्यासाला घेऊन द्रव्यनिधि असलेल्या ठिकाणीं गेला. तेथें त्यानें धनाध्यक्षाची पूजा करून त्याला साष्टांग नमस्कार घातला आणि शंख आदिकरून सर्व निधिरक्षकांचींहि फुलें, वडे व तीळभात अर्पून पूजा केली. मग ब्राह्मणांची पूजा करून त्यांकडून त्यानें स्वस्तिवाचन करविलें आणि अशा रीतीनें पुण्याहवाचनाच्या घोषानें तो तेजोयुक्त होऊन गेला. नंतर मोठ्या उत्साहानें त्यानें द्रव्यनिधि खणण्यास आरंभ केला. मोठमोठीं पातेलीं व तपेलीं, विविध सुंदर आकारांच्या लहान घागरी, झाऱ्या, कढया, कलश इत्यादि अनेक प्रकारचीं भांडीं खणून काढण्यांत आलीं व तीं मोठ्या पेट्यांत भरून टाकिलीं. कांहीं कावडीला बांधून मनुष्यांच्या खांद्यावर देण्यांत आलीं आणि दुसरीं हत्ती, घोडे, उंटें अशा वाहनांवर लादण्यांत आलीं. त्या एकंदर द्रव्यानें साठ सहस्र उंट, एकशेंवीस सहस्र घोडे, एक लक्ष हत्ती आणि तेवढेच रथ, गाड्या आणि उंटिणी अगदीं लादून गेलीं. गाढवें व माणसें यांची तर गणतीच नव्हती. उंटावर सोळा सहस्र भार, गाडींत आठ सहस्र, हत्तीवर चोवीस सहस्र, असें द्रव्य भरण्यांत आलें. हें सर्व द्रव्य घेऊन युधिष्ठिर पुनः एकदां महादेवाची पूजा केल्यावर व्यासाची अनुज्ञा घेऊन हस्तिनापुरास परत जावयास निघाला. वाटेंत प्रति दोन

दोन कोसांवर त्यांना विश्रांति घ्यावी लागली. द्रव्याच्या मोठ्या ओझ्यामुळें अत्यंत कष्टपूर्वक तें सैन्य हळुहळू मार्ग क्रमीत नगराच्या वेशीजवळ येऊन पोंचलें. त्याला पाहून साऱ्या कुरुकुळाला मोठा हर्ष झाला. १४. २. ६५.

---

## अध्याय ६६ वा.

[ १ कृष्णाचें हस्तिनापुरीं पुनः येणें. २ परीक्षिताचा जन्म. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, इकडे असें झालें कीं धर्मराजानें कृष्णाला तो द्वारकेस जातांना पूर्वी सांगून ठेविल्याप्रमाणें, अश्वमेधाचा समय आला असें पाहून तोहि आपली यादवचमू घेऊन हस्तिनापुरास आला. त्याच्यासमागमें प्रद्युम्न, युयुधान, चारुदेष्ण, सांब, गद, कृतवर्मा, सारण, निशठ, उल्मुख हेहि होते. बलदेवाला पुढें करून तो सुभद्रेसहित तेथें आल्यावर द्रौपदी, उत्तरा व कुंती यांची त्यानें भेट घेतली व त्यांचें सांत्वन केलें. ते आलेले समजतांच धृतराष्ट्र व विदुर यांनीं त्यांचा सत्कार केला. त्याचा स्वीकार करून युयुत्सूसह कृष्ण विदुराच्या घरीं राहिला. राजा, ते यादववीर तेथें रहात असतांनाच तुझा पिता जो परीक्षित् त्याचा जन्म झाला. पण ब्रह्मास्त्राचा त्याच्यावर गर्भांतच आघात झालेला असल्यामुळें तो जन्मास आला तो अचेतन प्रेतच होता. त्याला त्या स्थितींत पाहून पांडवांच्या घरीं सर्वांना पुत्रजन्माचा आनंद होत आहे तोंच त्यांना शोकानें व्यापिलें. उत्तरेला पुत्र झाला हें ऐकून लोक जों सिंहनादपूर्वक जयजयकार करीत आहेत, तोंच त्या सर्वांवर विरजणहि पडलें. हा प्रकार कृष्णाच्या कानीं येतांच तो तसाच अंतःपुरांत गेला. त्याच्याबरोबर सात्यकि होताच. त्याचें मन अगदीं विव्हळ होऊन गेलें. तो अंतःपुरांत जातो आहे तोंच कुंतीहि तेथें आलेली त्याला दिसली. ती कृष्णाचा धांवा करून आक्रोश करूं लागली. तिच्या पाठोपाठ द्रौपदी व सुभद्रा या आल्या व तो प्रकार पाहून त्याहि आक्रोश करूं लागल्या. इतर सर्व स्त्रियांचाहि तोच प्रकार झाला. तेव्हां कुंती सद्गद कंठानें कृष्णाला उद्देशून म्हणाली, 'हे देवकीपुत्रा, तूंच आमचा आधार असून आमचें कुल तुझ्याच हातीं आहे. तर तुझ्या भाच्याचा हा पुत्र अश्वत्थाम्याच्या अस्त्रानें जो मृत होऊन गेला आहे, त्याला जीवंत कर. अश्वत्थाम्यानें ब्रह्मास्त्रयुक्त दर्भ सोडिला त्यावेळीं "मृत बालकाला मी जीवंत करीन" असें वचन तूं दिलें होतेंस. तो तसा मृतस्थितींत

जन्मास आला आहे पहा. तरी आतां उत्तरा, सुभद्रा, द्रौपदी, धर्मराज, भीम, अर्जुन, नकुळ, व सहदेव यांचें तूं रक्षण कर. पांडवांचें व माझें जीवन आतां यावरच अवलंबून आहे. पांडुराजा, माझा सासरा विचित्रवीर्य, अभिमन्यु यांना पिंड मिळणें याच्यावरच आहे. त्यांना संतुष्ट कर. कृष्णा, उत्तरेला अभिमन्यु म्हणाला होता कीं, 'उत्तरे, तुझा पुत्र माझ्या मामांच्या घरीं जाऊन त्यांच्या-जवळ धनुर्वेद, शस्त्रास्त्रविद्या, आणि नीतिशास्त्र हीं शिकेल.' कृष्णा, खरोखरच अभिमन्यूनें प्रेमांत येऊन तिला असें सांगितलें होतें! मधुसूदना, आम्हीं त्या सर्वजणी तुझ्यापुढें पदर पसरून याचना करीत आहों. तरी आतां या कुळाचें काय कल्याण करावयाचें तें कर.'

याप्रमाणें श्रीकृष्णाची प्रार्थना केल्यावर कुंती व इतर स्त्रिया हात उभारून त्याच्या पायां पडल्या. त्यांच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह चालला असून त्यांना दिसतहि नव्हतें. 'कृष्णाच्या बहिणीचा नातू मेलेलाच जन्मास आला, असें त्या शोकानें बोलत होत्या.' तेव्हां कृष्णानें भूमीवर पडलेल्या कुंतीला वर उठविलें आणि तिचें सान्त्वन केलें. १४. २. ६६.

---

## अध्याय ६७ वा.

[ १. सुभद्रेची कृष्णाला प्रार्थना ]

( १ ) वैशंपायन—कुंतीला वर उठवून कृष्ण तिचें समाधान करीत आहे, तों सुभद्रा दुःखविव्हळ होऊन आक्रोश करीत त्याला म्हणाली, 'कृष्णा, हा पाहिलास का पराक्रमी अर्जुनाचा नातू? साऱ्या कौरवकुलाच्या नाशाबरोबर हाहि गतप्राण होऊन पडला आहे! अश्वत्थाम्यानें भीमावर म्हणून सोडलेला दर्भ उत्तरेवर, अर्जुनावर व माझ्यावर पडला. त्यानें माझें हृदय विदीर्ण केलें आहे. माझा पुत्र व हा नातू यांना मृत झालेले पाहून मीं अद्यापि जीवंत तरी कशी आहें! धर्मात्म्या धर्मराज युधिष्ठिराला हें पाहून आतां काय वाटेल? भीम-सेन, अर्जुन व नकुळ–सहदेव हे तरी काय म्हणतील? अभिमन्यूचा पुत्र मेलेलाच झाला हें ऐकून अश्वत्थाम्यानें पांडवांना सर्वस्वीं नागवलें असेंच सर्व म्हणतील. कृष्णा, अभिमन्यु माझ्या बंधूंचा किती तरी रे लाडका होता! ही वार्ता ऐकून ते म्हणतील तरी काय? अभिमन्यूच्या मृतपुत्राच्या वार्तेहून दुसरें मोठें दुःख असेल तरी काय? कृष्णा, मी तुझ्या पायांवर मस्तक ठेवून तुझी प्रार्थना करीत

आहें. ही द्रौपदी आणि ही कुंती याहि तसेंच करीत आहेत पहा. अश्वत्थाम्यानें इषिकास्त्र सोडलें त्यावेळीं तूंच ना त्याला रागावून सांगितलेंस कीं, 'नराधमा, मी तुझ्या सर्व इच्छा विफळ करीन आणि अभिमन्यूच्या पुत्राला जीवन्त करीन' म्हणून ! तुझे ते शब्द मी ऐकिले आहेत व तसें करण्याचें सामर्थ्य तुला आहे हेंहि मी जाणत्यें. म्हणूनच कृष्णा, मी तुझी प्रार्थना करीत आहें कीं अभिमन्यूचा हा पुत्र जीवंत होवो ? यादवश्रेष्ठा, पूर्वीं वचन दिलें असतांहि जर तूं माझ्या विनंतीप्रमाणें सुरळीत करणार नाहींस, तर मीं कांहीं जीव ठेवणार नाहीं. तूं जीवंत असतां अभिमन्यूचा पुत्र जर आज जीवंत झाला नाहीं, तर कृष्णा, मला तुझा उपयोग तरी काय ? मेघ जलवर्षावानें धान्याला सजीव करतो, तसा या अभिमन्युपुत्राला तूंहि आपल्या अमृतमय दृष्टीनें पाहून सजीव कर. कृष्णा, तूं पराक्रमी, धर्मवेत्ता व सत्यप्रतिज्ञ आहेस, तरी दिलेलें वचन आतां खरें कर. त्रिभुवन सारें मृत झालें, तरी त्यालाहि सजीव करण्याचें सामर्थ्य तुला आहे; मग भाच्याच्या मुलाला सजीव करणें तुला काय कठीण आहे ? कृष्णा, तुझें सामर्थ्य ठाऊक असल्यामुळेंच मी तुझ्यापुढें हात जोडून एवढें मागत आहें. पांडवांवर एवढी कृपा करच. मी तुझी बहीण म्हणून कर, कीं पुत्रमरणानें दुःखित आहें म्हणून कर, कीं तुला मी शरण आलें आहें म्हणून कर, पण एवढी दया माझ्यावर करच.' १४. २. ६७.

---

## अध्याय ६८ वा.

[ १. उत्तरेची कृष्णाला विनंति. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, सुभद्रेचा शोक व तिची ती विनवणी ऐकून कृष्णालाहि वाईट वाटलें. तेव्हां त्यानें 'ठीक आहे, तूं म्हणतेस तसें करतों,' असें म्हटलें. ते शब्द ऐकून उन्हानें तापलेला माणूस जसा पाण्याच्या वर्षावानें शांत होतो तशी सुभद्रा शांत होऊन आनंदित झाली. मग तेथून कृष्ण प्रसूतिगृहाकडे गेला. पांढऱ्या शुभ्र फुलांनीं तें सुशोभित केलेलें असून पाण्यानें भरलेले घडे त्यांत सर्वत्र ठेविलेले होते. तुपानें माखलेल्या टेंभुरणीच्या कोलत्या त्यांत पेटत असून मोहऱ्या पसरलेल्या होत्या. पाजळलेलीं शस्त्रास्त्रें तेथें नीट लावलेलीं असून अग्नीहि प्रज्वलित करून ठेविलेले होते व शुश्रूषेसाठीं वृद्ध दासीहि उभ्या होत्या. कुशल शस्त्रवैद्यहि तेथें दक्षतेनें बसले असून राक्षस-

नाशक अशीं द्रव्यें कुशल सेवकांनीं तेथें सगळीकडे योग्य रीतीनें पसरून ठेविलीं होतीं. राजा, तुझा पिता जन्मला त्या गृहांतील ही सर्व सिद्धता पाहून कृष्णाला आनंद झाला व 'फारच चांगली व्यवस्था आहे,' असें तो म्हणाला. तो आनंदित मुखानें असें बोलला असतां द्रौपदी उत्तरेकडे वळून तिच्याशीं बोलूं लागली. ती म्हणाली, 'हा पहा तुझा श्वशुर कृष्ण इकडेच येत आहे.' ते शब्द ऐकून आणि कृष्ण आपल्याकडे येत आहे असें पाहून उत्तरेनें आपला हुंदका आवरला आणि अश्रु पुसून ती त्याला म्हणाली, 'हे कमलनयना, पुत्रविरहित झालेल्या आम्हां उभयतांकडे पहा. अभिमन्यु व मी दोघेंहि सारखींच मृत झालों आहों. कृष्णा, मी तुझ्या पायांवर मस्तक ठेवून तुझी विनवणी करतें. अश्वत्थाम्याच्या अस्त्रानें दग्ध झालेल्या या माझ्या बाळाला सजीव कर. धर्मराज, भीम किंवा तूं जर त्याच वेळीं असें म्हणालां असतां कीं, 'या अजाणत्या आई-लाच इषिकास्त्रानें ठार करावें,' तर मीच तेवढी नष्ट होऊन आजचा हा प्रसंग टळला असता! पण माझ्या गर्भस्थ बालकाचा दुष्टपणें वध करून अश्वत्थाम्याला काय फळ मिळालें बरें? कृष्णा, मी तुझ्या पायां पडून तुला विनवितें, तरी त्या माझ्या शत्रूचा निःपात कर. जर हा बाळ सजीव झाला नाहीं, तर मी प्राण-त्याग करीन. देवा, याच्यावर जे माझे मनोरथ उभारलेले होते, ते अश्वत्थाम्यानें भग्न करून टाकिले असतां मी जगूं तरी कशावर? पुत्राला मांडीवर घेऊन आनंदानें तुला नमस्कार करावा अशी मला मोठी इच्छा होती; पण आज ती फोल झाली आहे! कृष्णा, अभिमन्यूचा हा पुत्र मृत झाल्यामुळें माझ्या हृद-यांतील सर्व आकांक्षा निष्फळ झाल्या. अभिमन्यु तुझा किती लाडका! पण त्याचा हा पुत्र ब्रह्मास्त्रानें ठार होऊन येथें पडला आहे पहा. खरोखर हा आपल्या पित्याप्रमाणेंच कृतघ्न व निष्ठुर आहे, नाहींतर पांडवांची राज्यलक्ष्मी सोडून हा एकटाच यमसदनाला कसा गेला असता? कृष्णा, अभिमन्यु युद्धाला निघाला तेव्हांच मीं ठरविलें होतें कीं, जर त्याला मरण आलें तर त्याच्या मागोमाग आपण जावयाचें. देवा, पण जिवाच्या आशेनें म्यां दुष्टेनें तसें केलें नाहीं. आतां मीं तिकडे गेलें तर अभिमन्यु मला म्हणेल तरी काय?' १४. २. ६८.

---

## अध्याय ६९ वा.

[ १. कृष्ण उत्तरेच्या पुत्राला सजीव करतो. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, याप्रमाणें दीन झालेली उत्तरा उन्मत्तासारखी विलाप करीत असतां मूर्च्छित होऊन भूमीवर पडली. तिला मूर्च्छित पडलेली पाहून कुंती व इतर पांडवस्त्रिया दुःखानें रडूं लागल्या आणि पांडवांचा राजवाडा दुःखाच्या आरोळ्यांनीं भरून जाऊन अभद्रासारखा क्षणभर दिसूं लागला. पुत्रशोकानें विव्हळ झालेली उत्तरा कांहीं वेळ निश्चेष्ट पडल्यावर जेव्हां सावध झाली, तेव्हां त्या मृत पुत्राला मांडीवर घेऊन ती त्याला उद्देशून म्हणाली, 'बाळा, खरोखर तूं धर्मज्ञ अभिमन्यूचा मुलगा आहेस, तरी तुझ्या हातून होत असलेला अधर्म तुला कसा समजत नाहीं? हा यादवश्रेष्ठ कृष्ण जवळ उभा असतांना तूं याला नमस्कार कसा करीत नाहींस? बाळा, जा आणि आपल्या पित्याला माझा निरोप सांग कीं, काळ आल्याशिवाय मरण येणें कठीण असल्यामुळें पतिपुत्रविरहित झालेली मी मरणास योग्य असतांहि जीवंत आहें; पण खरोखर माझें हित म्हणून या जगांत आतां कांहीं राहिलेलें नाहीं. म्हणून धर्मराज जर मला संमति देतील, तर मी घोर विष पिऊन अथवा अग्निप्रवेश करून देहत्याग करीन. पण माझें हृदयच खरोखर मरण्यास कठीण असावें; नाहींतर पति व पुत्र यांचा विरह झाला असतांहि त्याचे सहस्रावधि तुकडे कां न व्हावे? बाळा, ऊठ, या आपल्या दुःखानें वेड्या झालेल्या पंजीकडे पहा. तशाच या द्रौपदीआजीकडे व सुभद्राआजीकडे पहा. बाण लागून विव्हळत पडलेल्या हरिणीप्रमाणें मीहि दुःखार्त झालें आहें पहा. बाळा, ऊठ आणि या सर्वज्ञ अशा कमलनयन कृष्णाच्या मुखाकडे पहा. तुझ्या पित्याचे नेत्र कसे अगदीं या कृष्णाच्या सारखेच होते!'

भूमीवर पडून असा विलाप करीत असलेल्या उत्तरेला पाहून पांडवस्त्रियांनीं तिला वर उठविलें. उठून बसल्यावर तिनें पुनः हात जोडले व भूमीवर मस्तक ठेवून कृष्णाला नमस्कार केला. तेव्हां तिचा तो करुण विलाप ऐकून पुरुषश्रेष्ठ कृष्णानें डोळ्यांना पाणी लावून ब्रह्मास्त्राला उलट फिरविलें व त्याचें जीवित परत आणण्याची प्रतिज्ञा केली. तो शुद्ध मनानें सर्वांना ऐकूं जाईल अशा मोठ्या गंभीर स्वरानें म्हणाला, 'उत्तरे, माझें भाषण अन्यथा कधीं होणार नाहीं; तें सत्यच होईल. आतां तुम्हां सर्वांसमक्ष मी तुझ्या बाळाला जीवंत करतों. ऐक;

मीं आजवर थट्टेच्या बोलण्यांतहि कधीं असत्य भाषण केलें नाहीं, कधीं युद्धांत पाठ दाखविली नाहीं; तरी त्या पुण्यानें हा बालक जीवंत होवो. धर्म मला अत्यंत प्रिय असेल आणि त्यांतहि ब्राह्मणांना मी मानीत असेन, तर मृतावस्थेंत जन्मलेला हा अभिमन्यूचा पुत्र सजीव होवो. जर मी अर्जुनाशीं कधीं विरोध केला नसेल, तर त्या सत्याच्या बळानें हा बालक जीवन्त होवो. सत्य आणि धर्म हीं जर माझ्या ठायीं स्थिर असतील तर त्या पुण्यानें अभिमन्यूच्या या बालाला पुनः जीव येवो. कंस आणि केशी यांचा वध मीं न्यायानें केला असेल, तर त्या सत्यानें ह्या पुत्राला जीवन प्राप्त होवो.'

राजा, त्या बालकाला उद्देशून श्रीकृष्णानें असें भाषण केलें असतां तो सचेतन होऊन हळूहळू हातपाय हालवूं लागला. १४. २. ६९.

---

## अध्याय ७० वा.

[ १. परीक्षिताचा जन्मोत्सव व नामकरण. २ पांडवांचें हस्तिनापुरीं पुनरागमन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, कृष्णानें ब्रह्मास्त्राला उलटून लावतांच तुझा पिता सजीव झाला व त्यानें आपल्या तेजानें तें राजमंदिर देदीप्यमान करून सोडिलें. तेव्हां सारे राक्षस तें मंदिर सोडून पळून गेले, व 'श्रीकृष्णा, उत्तम झालें, उत्तम झालें' अशी आकाशवाणी झाली. जळणारें ब्रह्मास्त्र तेथून निघालें तें ब्रह्मदेवाकडे गेलें आणि, राजा, तुझ्या पित्याला पुनः प्राणलाभ झाला. मग तो रीतीप्रमाणें उत्साहानें हालचाल करूं लागला असतां त्याला पाहून पांडवस्त्रिया हर्षभरित झाल्या. श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून ब्राह्मणांनीं स्वस्तिवाचन केलें व सर्वजण आनंदित होत्साते त्याची स्तुति गाऊं लागले. समुद्रापलीकडे जाऊं इच्छिणाऱ्यांना नौका मिळावी तसें कुंती, द्रौपदी, सुभद्रा इत्यादि पांडवस्त्रियांना झालें व त्या आनंदानें भरून गेल्या. नट, मल्ल, ज्योतिषी, सूत, मागध, चारण हेहि कृष्णाची स्तुति करूं लागले व सर्वांनीं कुरुकुलाचा जयजयकार करून त्यावर आशीर्वादांचा वर्षाव केला. मग क्रमानें उत्तराहि उठली आणि तिनें पुत्रासह कृष्णाला नमस्कार केला. कृष्णानें त्यावेळीं तिला अनेक उत्कृष्ट वस्तूंचा अहेर केला व इतर यादवांनींहि तसेंच केलें. कृष्ण त्या मुलाचें नांव ठेवण्याच्या विचारास लागला. तो म्हणाला 'हा अभिमन्यूचा पुत्र पांडवाचें कुल बहुतांशीं क्षीण म्हणजे परिक्षीण झालें असतां जन्मास आला आहे, तरी याचें नांव परी-

क्षित् असें ठेवावें. राजा, याप्रमाणें सर्व व्यवस्था लागल्यावर तो तुझा पिता रीक्षित् यथाक्रम मोठा मोठा होत सर्वांना आनंद देऊं लागला.

( २ ) तो महिन्याचा झाला त्या सुमारास पांडव तें द्रव्य घेऊन हस्तिनापुराजवळ आले. त्यांच्या आगमनाची वार्ता लागतांच यादव मंडळी त्यांना सामोरी जाण्यासाठीं नगराबाहेर आली. राजसेवकांनीं सर्वत्र गुढ्यातोरणें, पताका, ध्वज व पुष्पमाला लावून सर्व नगर शृंगारिलें व नागरिकांनीं आपल्या घरांवर पताकादि उभारून तीं सुशोभित केलीं. पांडवांचें कल्याण व्हावें या हेतूनें सर्व देवालयांतून उत्तम प्रकारची पूजा चढविण्याची विदुरानें आज्ञा सोडिली व राजमार्ग विविध फुलांनीं अलंकृत केले. समुद्राच्या लाटांसारखा गंभीर ध्वनि नगरांत सर्वत्र दुमदुमून गेला. नाचणारे नट, गाणारे भाट, इत्यादिकांच्या ध्वनीनें हस्तिनापुर म्हणजे कुबेरनगरच जणूं होऊन गेलें. स्तुतिपाठक पुरुष व स्त्रिया यांनीं त्याला सर्वत्र शोभा आली असून त्याच्या कोनाकोपऱ्यांतहि लाविलेल्या पताका वाऱ्यानें फडकत होत्या व परत येणाऱ्या पांडवांना जणूं उत्तर-दक्षिण दिशाच दाखवून देत होत्या. 'पांडव आज रत्नसंचय घेऊन येत आहेत, त्याप्रीत्यर्थ सर्व राष्ट्रांत आजचा दिवस उत्सवाचा आहे,' असा राजसेवकांनीं घोष केला. १४. २. ७०.

---

## अध्याय ७१ वा.

[ १. पांडवांचा नगरप्रवेश. २ व्यास व श्रीकृष्ण यांची अश्वमेधाला अनुमति. ]

( १ ) **वैशंपायन**—पांडव नगराजवळ आलेले समजतांच कृष्ण अमात्य व मित्रपरिवार यांसह त्यांस सामोरा गेला. त्या सर्वांची भेट झाल्यावर पांडव यादवांसह हस्तिनापुरांत शिरले. त्या प्रचंड सैन्यांतील घोड्यांच्या टापांच्या ध्वनीनें सारें आकाश दणदणून गेलें. द्रव्यराशी पुढें करून पांडव मोठ्या आनंदानें अमात्य व मित्रमंडळी यांसह हस्तिनापुरांत आल्यावर प्रथम धृतराष्ट्राकडे गेले व प्रत्येकानें आपलें नांव सांगून त्याला नमस्कार केला. नंतर गांधारीकडे जाऊन तिला नमस्कार केल्यावर ते कुंती व विदुर यांच्याकडे गेले व त्यांना त्यांनीं वंदन केलें. मग त्यांचेंहि स्वागत करण्यांत आलें. त्यानंतर हे राजा, तुझ्या पित्याच्या जन्माचें अत्यंत अद्भुत आणि आश्चर्यकारक असें वृत्त त्यांना समजलें. श्रीकृष्णाचें तें मोठें कार्य पाहून त्यांनीं त्याची मनोभावानें पूजा केली.

( २ ) मग कांहीं दिवसांनीं महातेजस्वी व्यासमुनि हस्तिनापुरीं आले असतां पांडव आणि यादव या सर्वांनीं त्यांचा विधियुक्त सत्कार केला. नंतर त्यांच्या नानाप्रकारच्या गोष्टी झाल्यावर युधिष्ठिर व्यासांना म्हणाला, ' महाराज, आपल्या कृपेनें आम्हीं जें धन आणिलें, त्याचा विनियोग अश्वमेधाकडे करावा अशी इच्छा आहे. तरी आपण त्याविषयीं अनुज्ञा द्यावी. आम्हीं सर्वजण आपल्या व कृष्णाच्या स्वाधीन आहों. ' व्यासांनीं उत्तर केलें, ' राजा, मीं अनुज्ञा देतों व तदनुसार पुढें जें कार्य करावयाचें तें तूं पहा आणि योग्य दक्षिणा देऊन विधि-पुरस्सर अश्वमेध कर. अश्वमेध सर्व पापांपासून मुक्त करून पवित्र करणारा आहे, तरी तो केल्यानें तूं निष्पाप होशील यांत संशय नाहीं. ' याप्रमाणें व्यासांनीं सांगितलें असतां युधिष्ठिरानें अश्वमेध करण्याचा निश्चय केला. त्यांची अनुज्ञा मिळाल्यावर तो कृष्णाकडे गेला आणि त्याला म्हणाला, ' अच्युता, तुला जन्म देऊन देवकी धन्य झाली आहे. तूं जें करीन म्हटलेंस, तें करून दाखविलेंस व त्यामुळेंच आम्हीं हें राज्य भोगण्यास समर्थ झालों आहों. तुझ्याच पराक्रमानें व तुझ्याच बुद्धिबलानें हें राज्य तूं जिंकलेंस. तर तूंच आतां अश्वमेधासाठीं दीक्षा घे. तूंच आमचा श्रेष्ठ गुरु आहेस. तूं अश्वमेध केलास तर आम्हीं निर्दोष होऊं. कृष्णा, तूंच यज्ञस्वरूपी अक्षर पुरुष आहेस; धर्म, प्रजापति इत्यादि सर्व तूंच असून सर्व प्राण्यांचा आधार तूंच आहेस, असें माझें ठाम मत आहे.' युधिष्ठिराचें हें म्हणणें ऐकून कृष्ण म्हणाला, ' युधिष्ठिरा, सर्व प्राण्यांचा आधार मीच आहें असें म्हणणें तुझ्या दृष्टीनें ठीक आहे. पण आज सर्व कौरवकुलांत धर्मदृष्ट्या तूंच श्रेष्ठ असून, राजा, आम्ही तुझे फारतर मांडलिक शोभूं. तूंच आमचा श्रेष्ठ राजा आहेस. तरी तूंच अश्वमेध करणें योग्य आहे. माझी तुला अनुज्ञा असून तुलाच हा यज्ञ केला पाहिजे. आतां तुझ्या इच्छेप्रमाणें तूं आम्हांला कामाला लाव; तूं जसें सांगशील तसें करण्यास मी खरोखर सिद्ध आहें. युधिष्ठिरा, तूं यज्ञ केल्यानें भीम, अर्जुन, नकुळ व सहदेव यांनाहि त्याचें श्रेय मिळेल.' १४. २. ७१.

---

## अध्याय ७२ वा.

[ १. यज्ञ–सामग्रीसंपादन ].

( १ ) **वैशंपायन**—कृष्णाची अनुमति मिळाल्यावर युधिष्ठिरानें पुनः व्यासांना बोलावून सांगितलें, 'महाराज, आपल्याला अश्वमेधासाठीं जो काळ युक्त वाटत असेल, त्यावेळीं आपण मला दीक्षा द्यावी. माझा यज्ञ आपल्यावरच अवलंबून आहे.' व्यासांनीं उत्तर केलें, 'धर्मराजा, मी, पैल, आणि याज्ञवल्क्य असे जें ज्यावेळीं करावयास पाहिजे तें त्यावेळीं निःसंशय करीत जाऊं. आतां चैत्री पौर्णिमेला तुझा दीक्षाविधि होईल. तेथपर्यंत यज्ञाला लागणाऱ्या साहित्याची चांगली जुळवाजुळव केली पाहिजे. अश्वविद्या जाणणारे सूत व ब्राह्मण यांच्याकडून अश्वमेधाला योग्य असा घोडा पारखून घेतला पाहिजे. तसा घोडा मिळाल्यावर त्याला विधीप्रमाणें पृथ्वीवर सोडून दे, म्हणजे तो तुझें देदीप्यमान यश जगाला दाखवीत फिरेल.'

व्यासांच्या बोलण्याला 'ठीक आहे' असें उत्तर देऊन राजा युधिष्ठिरानें तशी सर्व व्यवस्था करविली आणि सर्व साहित्य नीट जुळविलें. सर्व सिद्धता झाल्यावर त्यानें व्यासांना तसें कळविलें असतां ते म्हणाले, 'राजा, योग्यवेळीं व अवश्य त्याप्रमाणें आम्ही तुला दीक्षा देण्यास सज्ज आहों. आतां यज्ञसामग्रीपैकीं स्फ्य म्हणजे तरवार व कूर्च म्हणजे दर्भाचा भारा, हीं सोन्याचीं व इतर वस्तु रुप्याच्या चालतील म्हणून त्या तशा करवून घे. घोडा पृथ्वीपर्यटनाला सोडून दे आणि यथाशास्त्र त्याला सुरक्षितपणें फिरूं दे.' त्यावर युधिष्ठिरानें विचारिलें, 'मुने, घोडा सोडल्यावर तो त्याला हवातसा पृथ्वीवर फिरेल अशी व्यवस्था केली पाहिजे. तसा तो स्वेच्छेनें फिरत असतां त्याचें रक्षण करण्याचें काम कोणावर सोंपवावें हें तुम्ही सांगा.'

धर्माच्या या विनंतीप्रमाणें व्यासांनीं तें काम धनुर्धर श्रेष्ठ जो अर्जुन त्यानें करावें असें सांगितलें; कारण, तो जयशाली, सहनशील व धैर्यशाली असल्यामुळें, घोड्याचें रक्षण त्यालाच चांगलें करतां येण्यासारखें होतें. त्यानें पूर्वीं निवातकवचांसारख्या दानवांचाहि पाडाव केलेला असल्यामुळें तो पृथ्वी जिंकण्यालाहि समर्थ होता. त्याजवळ दिव्य अस्त्रें व दिव्य कवच असून त्याचें धनुष्य व बाणांचा भाता हींहि दिव्य होतीं. तो धर्म व अर्थ यांत कुशल असून सर्व विद्यांत निष्णात असल्यामुळें घोड्याचा पाठिराखेपणा करण्यास तोच समर्थ होता. अश्वरक्षणा-

संबंधानें ही व्यवस्था सांगून राज्याचें रक्षण करण्याचें काम भीमसेन आणि नकुल यांवर सोपवावें असें व्यासांनीं सांगितलें. त्याचप्रमाणें गृहव्यवस्था सहदेवाकडे देण्यांत आली. व्यासांच्या या सूचनेप्रमाणें धर्मराजानें सर्वांना आज्ञा दिली व घोड्याची व्यवस्था करण्यास अर्जुनाला सांगितलें. तो म्हणाला, 'अर्जुना, घोड्याचें रक्षण तुला करावयाचें आहे. तुलाच तें साधेल, दुसऱ्या कोणाला तें जुळणार नाहीं. तरी जे राजे युद्धाला सज्ज होऊन येतील, त्यांच्याशीं प्रथम गोडीनें बोलूनच त्यांना वळविण्याचा प्रयत्न कर. हा यज्ञ माझा आहे हें सर्वांना समजून सांग आणि शक्य तर तंट्याची वेळ येणार नाहीं असें कर.'

सव्यसाची अर्जुनाला याप्रमाणें सूचना दिल्यावर भीम आणि नकुळ यांना हाक मारून युधिष्ठिरानें त्यांना नगराचें रक्षण करण्याचें काम दिलें, तसेंच धृतराष्ट्राच्या संमतीनें त्यानें सहदेवाला घरांतील व्यवस्था ठेवण्यास सांगितलें. १४. २. ७२.

## अध्याय ७३ वा.

[ १ युधिष्ठिराची अश्वमेधदीक्षा. २ घोड्याच्यामागून अर्जुनाचें गमन. ३ अर्जुनानें केलेल्या अनेक युद्धांतील कांहींचें वर्णन करण्याची वैशंपायनाची प्रतिज्ञा. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, धर्मराजाला दीक्षा देण्याची वेळ झाली तेव्हां त्या मोठमोठ्या ऋषींनीं त्याला शास्त्राप्रमाणें ती दिली. पशूंना बांधून दीक्षा घेतलेला तो धर्मराजा ऋत्विजांसह आपल्या तेजानें शोभूं लागला. नंतर व्यासांनीं अश्वमेधासाठीं विधियुक्त श्यामकर्ण घोडा स्वतः सोडिला. हरणाचें कातडें पांघरलेला व हातांत दंड धरिलेला असा युधिष्ठिर गळ्यांत सोन्याच्या माळा घातल्यावर प्रदीप्त अग्नीप्रमाणें तळपूं लागला. त्याच्या ऋत्विजांचेहि वेष त्याच्यासारखेच होते.

( २ ) शुभ्र घोडे जोडलेल्या रथांत बसून अर्जुन त्या श्यामकर्ण घोड्याच्या मागून जाऊं लागला. त्यानें चर्माचे हातमोजे घातले असून तो मधून मधून गांडीव धनुष्याचा टणत्कार करीत असे. तो सज्ज होऊन घोड्याच्या मागून जाऊं लागला असतां त्याला पहाण्यासाठीं लहानापासून थोरापर्यंत सारें हस्तिनापुर तेथें लोटलें. माणसांचा जमाव एवढा जमला होता कीं तेथें उकाडा होऊं लागला. घोडा व त्याचा संरक्षक अर्जुन यांना पहाण्यासाठीं गोळा झालेल्या

जनसमूहाच्या शब्दानें दिशा व आकाश दुमदुमून गेलीं. जो तो दुसऱ्याला म्हणे, 'हा पहा तेजस्वी अर्जुन आणि तो पहा घोडा; अर्जुन आपलें गांडीव हातीं घेऊन त्याच्या मागोमाग जात आहे.' कोणी म्हणाले, 'अर्जुना, जा बरें, तुझें कल्याण असो, अरिष्ट टळो आणि तूं लवकर परत ये.' दुसरे कांहीं म्हणाले, 'या जमावांत तो आम्हांला दिसत नाहीं, पण त्याचें धनुष्य मात्र दिसतें आहे. तेंच तें भयंकर शब्द करणारें प्रसिद्ध गांडीव. त्याचें कल्याण असो; वाटेंत त्याला कसलेंहि भय न येवो; तो लवकर परत येवो; तो आला म्हणजे आपण त्याला पाहूं.' हे व अशा प्रकारचे लोकांचे आणखी मधुर बोल अर्जुनाच्या कानीं पडले. त्याच्याबरोबर शांतिवाचनासाठीं याज्ञवल्क्याचा वेदपारंगत व यज्ञकर्मप्रवीण असा सोमश्रवानामक शिष्य चालला होता. तसेच इतर वेदज्ञाते ब्राह्मण आणि क्षत्रिय युधिष्ठिराच्या आज्ञेवरून त्याच्या समागमें निघाले. याप्रमाणें पांडवांनीं आपल्या अस्त्रप्रभावानें जिंकलेल्या पृथ्वीवर त्यांचा तो घोडा एकामागून एक देश ओलांडीत चालला.

( ३ ) राजा, त्या अश्वसंचाराच्या प्रसंगानें अर्जुनाला जीं युद्धें करावीं लागलीं तीं मोठीं तुंबळ व विचित्र झालीं. तो घोडा पृथ्वीला उजवा घालून चालला होता. तो प्रथम उत्तरेकडे जाऊन तेथून पूर्वेस वळला. अनेक राजांच्या राज्यांतून तो गेला व तीं पादाक्रान्त झालीं. महारथी अर्जुनहि त्याच्यामागून फिरतच होता. फिरतां फिरतां अपरिमित राजांशीं त्याला युद्ध करण्याचा प्रसंग आला. किरात, यवन, म्लेच्छ इत्यादि अनेक लोक व गत युद्धांत ज्यांचा पराभव झाला होता असे पुष्कळ आर्यराजे त्याशीं युद्ध करण्याच्या ईर्ष्येनें पुढें आले. त्या सर्वांशीं त्याचे युद्धप्रसंग घडले. राजा, त्यांतील जे मोठे व उभयपक्षीं दारुण झाले तेवढ्यांचेंच मी वर्णन करतों. १४.२.७३.

## अध्याय ७४ वा.

[ १. त्रिगर्त, सूर्यवर्मा आणि धृतवर्मा यांशीं अर्जुनाचें युद्ध. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, भारतीय युद्धांतच ज्यांशीं वैर जडलें होतें त्या त्रिगर्तांशीं प्रथम अर्जुनाला युद्ध करावें लागलें. हे त्रिगर्त भारतीय युद्धांत मारले गेलेल्या त्रिगर्तांचे नातू पणतू होते. अश्वमेधाचा घोडा येत आहे असें समजतांच ते कवचें घालून नगराबाहेर आले व त्यांनीं त्याला वेढा दिला. ते रथांत बसून

बाणाचे भाते पाठीवर बांधून आले होते व त्या रथांना उत्तम शृंगारलेले घोडे जुंपलेले होते. वेढा घालून घोड्याला पकडण्याचा त्यांनीं प्रयत्न चालविला. त्यांचा तो बेत पाहून अर्जुनानें त्यांना सामोपचारानें सांगून पाहिलें. पण त्यांनीं त्याचें म्हणणें न जुमानतां त्यावर बाण सोडिले. तेव्हां तमोगुण व रजोगुण यांनीं झांकून गेलेल्या त्या त्रिगर्तांचा चांगला समाचार घेऊन अर्जुन त्यांना हंसत हंसत म्हणाला, 'अरे वेड्यांनो, तुम्हांला धर्म कांहीं कळतो काय? तुम्हांला जीवाचा कंटाळा आला कीं काय? नसेल तर परत फिरा.' अर्जुन निघाला, तेव्हांच युधिष्ठिरानें त्याला सांगून ठेविलें होतें कीं त्रिगर्तांचे बांधव आधींच युद्धांत मरण पावलेले असल्यामुळें आतां आणखी त्यांना मारूं नको. त्याप्रमाणें त्यानें त्यांना समजुतीनें परत फिरावयास सांगितलें. पण तें न ऐकतां ते जेव्हां युद्ध करूं लागले, तेव्हां त्यांचा राजा जो सूर्यवर्मा त्यावर त्यानें बाणांचा वर्षाव केला. मग रथांचा घडघडाट करीत अर्जुनावर ते सारे चालून आले व सूर्यवर्म्यानें मोठ्या कुशलतेनें त्यावर शंभर बाण सटासट टाकले. त्याच्या अनुयायांनींहि अर्जुनाचा वध करावा म्हणून तसेंच केलें. पण अर्जुनानें आपल्या गांडीवावरून त्यांच्यावर अनेक बाण सोडून त्यांना छेदिलें व ते भूमीवर पडले तेव्हां सूर्यवर्म्याचा तेजस्वी असा तरुण धाकटा भाऊ केतुवर्मा भावाच्या पराभवाचा सूड घेण्यासाठीं लढूं लागला. पण लवकरच अर्जुनानें त्याचाहि वध केला. त्याच्यामागून छोटा धृतवर्मा अर्जुनावर चाल करून आला व बाण सोडूं लागला. त्याचें बाण सोडण्यांतील त्वरायुक्त कौशल्य पाहून अर्जुनाला फार संतोष वाटला. तो बाण घेई केव्हां, धनुष्यावर जोडी केव्हां हें त्याला दिसेना, केवळ सुटतांना मात्र दिसत. हें पाहून अर्जुनानें त्या बालवीराचें क्षणभर मनःपूर्वक कौतुक केलें. धृतवर्मा रागानें सर्पासारखा फुरफुरत होता, पण अर्जुनानें प्रेमामुळें त्याला मारिलें नाहीं. तेव्हां त्यानें अर्जुनावर एक प्रखर बाण सोडून त्याचा हात फोडिला व त्यामुळें घेरी येऊन अर्जुनाच्या हातांतून गांडीव गळून खालीं भूमीवर पडलें. अर्जुनाच्या हातांतून पडलेलें तें धनुष्य इंद्रधनुष्यासारखें दिसूं लागलें. तें पडलेलें पाहून धृतवर्मा मोठ्यानें हसूं लागला. तेव्हां मात्र अर्जुनाला राग आला व हातावरील रक्त पुसून त्यानें आपलें धनुष्य वर उचलून घेतलें आणि धृतवर्म्यावर बाणांचा वर्षाव केला. त्यांचें तें अद्भुत युद्ध पाहून सर्वांनीं त्यांची प्रशंसा केली व त्या शब्दांनीं सारें नभोमंडळ भरून गेलें. प्रलयकाळच्या यमाच्या स्वरूपासारखें तें अर्जुनाचें त्यावेळचें रूप पाहून सर्व त्रिगर्त वीरांनीं अर्जुनाला

वेढा दिला व ते धृतवर्म्याचें रक्षण करूं लागले, तेव्हां अर्जुन क्रुद्ध झाला व त्यानें थोड्याच वेळांत त्रिगर्तांचे अठरा वीर आपल्या वज्रसमान बाणांनीं मारून टाकिले. इतरांवरहि त्यानें आपले सर्पतुल्य बाण सोडिले व त्यांना जर्जर केलें. तेव्हां ते घाबरून दाही दिशा पळूं लागले. पण अर्जुनाचे बाण त्यांना सोडीनात. तेव्हां शेवटीं ते त्याला शरण आले व 'आम्ही तुझे आज्ञाधारक सेवक आहों; तूं सांगशील तें करावयास आम्ही नम्रपणें सिद्ध आहों, आम्हांला काय ती आज्ञा कर,' असें म्हणूं लागले. तें ऐकून अर्जुन त्यांना म्हणाला, 'वीरहो, आपले प्राण वांचवा आणि आमचें वर्चस्व मान्य करा.' १४. २. ७४.

---

## अध्याय ७५ वा.

[ प्राग्ज्योतिषपुरांत वज्रदत्ताशीं अर्जुनाचें युद्ध. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, त्रिगर्तांहून तो घोडा निघाला तो प्राग्ज्योतिष देशांत गेला, तेव्हां तेथील राजा भगदत्ताचा पुत्र वज्रदत्त युद्ध करण्यासाठीं बाहेर आला. युधिष्ठिराचा घोडा आपल्या राज्याच्या सीमेंत आला असें म्हणून त्यानें त्याला पकडिलें आणि त्याला घेऊन तो नगराकडे जाऊं लागला. तें पाहून गांडीव फिरवीत अर्जुन त्याच्या मागें धांवला व त्यावर बाण सोडून त्यानें वज्रदत्ताला मूर्च्छित केलें. तेव्हां घोड्याला सोडून वज्रदत्त अर्जुनावर चाल करून गेला. प्रथम नगरांत जाऊन त्यानें अंगावर कवच चढविलें आणि उत्तम हत्तीवर बसून तो युद्धासाठीं पुनः बाहेर आला. त्याच्या मस्तकावर श्वेत राजछत्र धरिलेलें असून बाजूला शुभ्र चवऱ्या हालत होत्या. तो अर्जुनाजवळ आला व बालपणांतील अल्लडपणामुळें अर्जुनाला युद्धाचें आव्हान देऊं लागला. त्यानें तो पर्वताकार मदोन्मत्त हत्ती रागानें अर्जुनावर सोडिला. शत्रुसैन्यांतील हत्तींना मागें सारणारा तो हत्ती सोंडेनें फवारे सोडीत होता व बेफाम होऊन युद्धांत शत्रूचा नाश करणारा होता. वज्रदत्त राजा त्याला अंकुश टोंचून पुढें चालवीत असतां जणूं तो आकाशांतच उडतो आहे कीं काय असा भासला. तो हत्ती आपल्यावर चालून येतो आहे असें पाहून अर्जुनाला राग आला व त्यानें भूमीवरूनच गजारूढ अशा वज्रदत्ताशीं लढण्यास आरंभ केला. वज्रदत्तानें संतापानें आगीसारखीं तेजस्वी व शलभासारखीं वेगवान् तोमरें अर्जुनावर सोडिलीं. पण तीं त्याच्यापर्यंत येऊन पोंचण्याच्या आधींच अर्जुनानें गांडीवावरून सोडलेल्या बाणांनीं तुटून गेलीं. तीं

तोमरें छिन्नभिन्न होऊन गेलेलीं पाहून वज्रदत्तानें अर्जुनावर त्वरेनें बाण सोडले. तेव्हां अर्जुनानें उलट वज्रदत्तावर रुपेरी मुठींचे सरळ जाणारे बाण सोडले. ते बाण लागतांच तो पराक्रमी वज्रदत्त भूमीवर पडला, पण त्याला मूर्च्छा मात्र आली नाहीं. थोड्याच वेळानें तो पुनः उठला आणि त्यानें आपला मत्त हत्ती आणखी एकदां अर्जुनावर घातला. तेव्हां अर्जुनानें नवीनच कात टाकलेल्या सापां-सारखे सळसळणारे प्रखर बाण त्यावर सोडून त्याला विद्ध केलें व त्यामुळें तो हत्ती रक्त सांडीत असतां, ज्यावरून लाल पाण्याच्या अनेक नद्या वहात आहेत अशा पर्वतासारखा दिसला. १४.२.७५.

---

## अध्याय ७६ वा.

[ १. अर्जुन वज्रदत्ताचा पाडाव करतो. ]

(१) **वैशंपायन**—राजा, याप्रमाणें अर्जुन आणि वज्रदत्त यांच्यांत तीन दिवस युद्ध चाललें होतें. चवथ्या दिवशीं वज्रदत्त मोठ्यानें हंसून अर्जुनाला म्हणाला, ‘अर्जुना, थांब, तूं माझ्या हातून जीवंत सुटणार नाहींस. तुला ठार केल्यावरच मी माझ्या पित्याला विधियुक्त तिलांजलि देणार आहें. माझा वृद्ध पिता व तुझ्या पित्याचा मित्र जो भगदत्त त्याला तूं मारिलेंस; आतां त्याचा पुत्र जो मी त्याच्याशीं लढ.’ असें म्हणून वज्रदत्तानें रागारागानें आपला हत्ती पुनः एकदां अर्जुनावर सोडिला. तो आकाशांतून उड्या मारीतच जणूं अर्जुनावर आला आणि आपल्या सोंडेंतून सोडलेल्या पाण्याच्या फवाऱ्यानें त्यानें मेघानें निळ्या पर्वताला भिजवावें, त्याप्रमाणें अर्जुनाला भिजवून टाकिलें. तोंडानें मोठा शब्द करीत व नाचत बागडत तो आपल्यावर धांवून येत आहे असें पाहून अर्जुनानें त्याची भीति न बाळगतां गांडीव धनुष्यावरून त्याच्यावर बाणांचा मारा केला. आपल्या कार्यांत हें मोठें विघ्न आलें असें वाटल्यामुळें आणि पूर्वींचें वैर लक्षांत असल्या-मुळें त्याला वज्रदत्ताचा मोठा राग आला आणि समुद्राचें तीर लाटांना मागें फिरवितें त्याप्रमाणें त्यानें हत्तीला बाणांनीं घायाळ करून मागें परतविलें. पिसांनीं भरलेल्या साळीसारखा दिसणारा तो हत्ती स्तब्ध झालेला पाहून वज्रदत्त रागानें अगदीं वेडा झाला व त्यानें अर्जुनावर तीक्ष्ण बाण सोडले. अर्जुनानें ते मध्येंच तोडून टाकिले व आपलें अद्भुत युद्धकौशल्य प्रकट केलें. तेव्हां वज्रदत्तानें त्या हत्तीला आणखी एकदां चेतवून अर्जुनावर सोडिलें. पण तो येतोसा पाहून

अर्जुनानें एक कणखर बाण त्यावर सोडिला तो त्याच्या मर्मावर लागला. त्याबरोबर हत्ती वज्रानें फोडिलेल्या शिळेप्रमाणें भूमीवर धाडकन पडला. तेव्हां असें वाटलें कीं वज्राच्या भीतीनें पर्वतच जणूं पृथ्वीच्या पोटांत दडूं पहात आहे! हत्ती पडल्यामुळें वज्रदत्ताला भूमीवरूनच युद्ध करण्याची पाळी आली, तेव्हां अर्जुन त्याला म्हणाला, 'वज्रदत्ता, भिऊं नको. मी घोड्याबरोबर निघालों तेव्हांच युधिष्ठिरानें राजांना मारावयाचें नाहीं, असें मला निक्षून सांगितलें आहे. "कोणाहि योद्ध्याचा वध करूं नये व सर्व राजांनीं युधिष्ठिराच्या अश्वमेधासाठीं मित्रांसह येऊन आनंदाचा उपभोग घ्यावा असें कर" अशी त्याची मला आज्ञा आहे. तरी मी तुझा वध करीत नाहीं. ऊठ, तुला माझ्यापासून भय नाहीं. तूं खुशाल परत घरीं जा आणि पुढील चैत्रपौर्णिमेला आमच्याकडे ये. त्यावेळीं युधिष्ठिर महाराजांचा अश्वमेध होणार आहे.' अर्जुनानें असें सांगितलें असतां पराजित झालेल्या वज्रदत्तानें त्याचें म्हणणें मान्य केलें. १४.२.७६.

## अध्याय ७७ वा.

[ १. अर्जुनाचें सिंधुदेशांतील वीरांशीं युद्ध ]

( १ ) वैशंपायन—राजा, नंतरचें अर्जुनाचें महत्त्वाचें युद्ध म्हणजे सिन्धुदेशीय वीरांशीं झालेलें होय. महायुद्धांत जे राहिले होते ते व त्यांत मेलेल्यांचे पुत्र यांनीं अर्जुनाला त्या ठिकाणीं विरोध केला. आपल्या राज्यांत अर्जुन आला असें ऐकतांच ते सारे रागानें त्यावर चालून आले. घोडा जवळ आलेला पाहून त्यांनीं त्याला धरिलें. अर्जुनाची त्यांना मुळींच भीति वाटली नाहीं. पूर्वीच्या पराभवाची त्यांना आठवण असल्यामुळें त्यांनीं अर्जुनाला आतां जिंकावें असें मनांत आणून त्याला वेढा दिला व आपलीं नांवें, गोत्रें व पराक्रम सांगत त्याच्यावर बाणांचा वर्षाव केला. अर्जुन पायीं चालत होता, व ते रथांत होते, तरी केवळ त्याला जिंकण्याच्या तीव्र इच्छेमुळेंच ते त्याच्याशीं लढून त्यावर बाण सोडूं लागले. अर्जुन संशप्तकांना मारणारा, निवातकवचांचा नाश करणारा, आणि विशेषतः जयद्रथाचा वध करणारा, म्हणून त्यांनीं त्याच्यावर बाणांचा मारा करून त्याला जिंकण्याचा निश्चय केला. एक सहस्र रथ व वीस सहस्र घोडे इतक्यांचा वेढा अर्जुनाला दिल्यामुळें त्यांना मोठा हर्ष झाला. त्यांच्या बाणांचा मारा त्याच्यावर पावसासारखा पडूं लागला असतां मेघडंबरांतील सूर्याप्रमाणें किंवा

पिंजऱ्यांतील पोपटाप्रमाणें त्याची स्थिति झाली. त्याला चोहोंकडून बाणांनीं वेष्टिलेला पाहून सारें त्रिभुवन हाय हाय करूं लागलें व सूर्यहि कष्टी होऊन निस्तेज झाला. अंगावर शहारे उठविणारा वारा वाहूं लागला, व राहूनें चंद्राला आणि सूर्याला एकदमच ग्रासिलें कीं काय असें वाटलें. सूर्यावर उल्कापाताचा मारा होऊं लागला आणि महापर्वत कैलासहि थरथरूं लागला. सप्तर्षि दुःखानें व्याप्त होऊन दीर्घ व उष्ण श्वास सोडूं लागले व देवर्षींची तीच अवस्था झाली. चंद्रमंडळांतून ससा फुटून बाहेर पडला आणि साऱ्या दिशा धुरानें भरून गेल्यासारख्या झाल्या. इंद्रधनुष्य पडून काळसर तांबूस अशा विजा चमकूं लागल्या आणि मेघांनीं आकाश भरून जाऊन मांस व रक्ताचा सडा पडूं लागला. अर्जुन याप्रमाणें बाणवर्षावांत सांपडला असतां असा चमत्कार होऊन सर्वत्र हाहाकार उडाला. त्या सिन्धुदेशीय वीरांनीं सोडलेल्या बाणांच्या आघातांनीं अर्जुनाला घेरी येऊन त्याच्या हातांतून गांडीव गळून पडलें व त्याबरोबर हातांतील मोजाहि निसटून गेला. तो मूर्च्छित होऊन पडला असतांहि त्या वीरांनीं त्याच्यावर बाणांचा मारा त्वरेनें चालू ठेविला. असा तो मूर्च्छित झालेला पाहून देवांचें मन खट्टू झालें आणि ते त्याच्यासाठीं शांतिपठन करूं लागले. देवर्षि, ब्रह्मर्षि व सप्तर्षि हेसुद्धां अर्जुनाला जय मिळावा म्हणून जप करूं लागले. अशा रीतीनें अर्जुनाचें तेज देवादिकांनीं प्रदीप्त केल्यावर तो त्या रणभूमीवर पुनः स्थिर झाला आणि आपलें दिव्य धनुष्य त्यानें जवळ ओढून घेतलें. तेव्हां त्या धनुष्याचा मोठा टणत्कार झाला आणि इंद्र जसा जलवर्षाव करतो, तसा त्यानें पुनः बाणांचा वर्षाव करण्यास आरंभ केला. राजासह ते सिन्धुदेशीय वीर त्या वर्षावांत गडप होऊन गेले. टोळधाड बसल्यावर झाडें जशीं दिसत नाहींत, तशीच त्या बाणवर्षावानें त्यांची अवस्था झाली. गांडीवाचा टणत्कार त्यांना सहन होईना. ते घाबरून सैरावैरा पळत सुटले व कांहीं दुःखित होऊन अश्रु गाळूं लागले. कोलीत फिरावें त्याप्रमाणें त्यांच्या भोवतीं अर्जुनाचे बाण फिरूं लागले. अशा रीतीनें आपल्या इंद्रजालासमान बाणजालानें त्यानें सर्व दिशा व्यापून वारा मेघांची उडवतो तशी त्या सिन्धुराजाच्या सैन्याची दाणादाण उडविली आणि शरदृतूंत सूर्य शोभतो तसा तो शोभूं लागला. १४. २. ७७.

---

## अध्याय ७८ वा.

[ १. अर्जुन सिन्धुदेशीय वीरांचा पराभव करतो ].

( १ ) वैशंपायन—शूर अर्जुन युद्धास ठाकला असतां अजिंक्य अशा हिमालयाप्रमाणें शोभत होता. सिन्धुदेशीय वीर पुनः युद्धास प्रवृत्त होऊन व्यवस्थेनें उभे राहिले व अर्जुनावर शरवर्षाव करूं लागले. तेव्हां त्यांच्याकडे पाहून हंसत तो म्हणाला, 'वीरहो, आपली पराकाष्ठा करून लढा, आणि माझ्यावर विजय मिळविण्याचा शक्य तो प्रयत्न करा. पण आतां तुमचें मरण जवळ आलें असून तुम्हीं आपलीं कामें प्रथम आटपाल तर बरें ! हा पहा मी आतां तुमच्याशीं युद्ध करून तुमचें बाणजाल तोडून टाकतों व तुमचा गर्व शमवितों.' असें म्हणून तो त्यांना मारूं लागणार इतक्यांत त्याला युधिष्ठिराच्या आज्ञेचें स्मरण झालें. 'युद्धासाठीं रणावर आलेल्या क्षत्रियांना जिंक पण मारूं नको,' हें युधिष्ठिराचें वचन सत्य करें करावें अशी त्याला पंचाईत पडली. तेव्हां तो त्या सिन्धुदेशीय वीरांना म्हणाला, 'वीरहो, मी तुमच्या कल्याणाची गोष्ट सांगतों कीं, तुम्ही युद्धाला उभे राहिले आहां तरी मी तुमचा वध करणार नाहीं. पण "आम्हांला तूं जिंकिलेंस, आतां आम्ही तुझे आहों," असें तुम्ही म्हणा. असें न कराल तर मात्र प्राणास मुकाल.' पण हें त्याचें म्हणणें न ऐकतां त्याला जिंकण्यासाठीं ते युद्धास उभे राहिले व त्यावर त्यांनीं वळविलेल्या टोकांचे लक्षावधि बाण सोडिले. पण ते सर्पासारखे तिखट बाण अर्जुनानें तोडून टाकिले आणि मग तो एकामागून एक असा त्या वीरांचीं मस्तकें छेदीत चालला. तेव्हां त्या वीरांनीं जयद्रथाच्या वधाची आठवण त्याला देऊन त्यावर प्रास व शक्ति यांचा मारा चालविला. पण अर्जुनानें त्या सर्व शस्त्रास्त्रांना वाटेंतच छेदून टाकिलें व त्यांचीं मस्तकें तो उडवूं लागला. त्यावेळीं मात्र ते वीर सैरावैरा धांवून माघारे पळूं लागले. पळतां पळतां त्यांनीं मारलेल्या आरोळ्यांचा ध्वनि भरतीच्या वेळच्या समुद्रगर्जनेसारखा झाला. त्यांतील अनेकांचा वध होत होता तरी कित्येकजण आपआपल्या शक्तीप्रमाणें अर्जुनाशीं लढत राहिले. पण बहुतेकांची त्यानें वाट लाविली. त्यांचे घोडे व सैनिक थकून गेल्यामुळें ते मूर्च्छित झाल्यासारखे स्तब्ध राहिले. अशी त्यांची स्थिति पाहून धृतराष्ट्राची कन्या दुःशला आपल्या लहान नातवाला म्हणजे सुरथाच्या मुलाला घेऊन रथांत बसून अर्जुनाला भेटावयास आली आणि 'उरलेल्या योद्ध्यांना तरी

वांचव' अशी त्याची करुणा भाकूं लागली. तिला पहातांच अर्जुनानें धनुष्य खालीं ठेविलें आणि 'मी काय करूं तें सांग' असें बहिणीला विचारिलें. ती म्हणाली 'अर्जुना, हा तुझ्या भाच्याचा मुलगा तुला नमस्कार करीत आहे, त्याकडे पहा.' हें ऐकून अर्जुनानें विचारिलें, 'याचा पिता कोठें आहे?' दुःशलेनें उत्तर केलें, 'अर्जुना, याचा पिता पित्याच्या दुःखानें निराश होऊन इहलोक सोडून गेला. त्याचा वृत्तांत्त ऐक. आपल्या पित्याचा म्हणजे जयद्रथाचा तुझ्या हातून पूर्वी वध झालेला त्यानें ऐकला होताच. तेव्हां घोड्यामागून तूंच इकडे युद्धासाठीं येत आहेस असें ऐकतांच आधींच पितृशोकानें गांजून गेलेल्या त्यानें प्राणत्याग केला. तुझें केवळ नांव ऐकतांच तो माझा पुत्र खिन्न होऊन धरणीवर पडला आणि मरण पावला. तो पडलेला पाहून त्याच्या मुलासह तुझ्याकडे मी शरणार्थ आलें आहें.' असें म्हणून ती ढळढळ रडूं लागली. तेव्हां अर्जुनानें कष्टी होऊन खालीं मान घातली. ती अगदीं दीन होऊन पुढें त्याला म्हणाली, 'अर्जुना, या तुझ्या बहिणीकडे व भाच्याच्या मुलाकडे पहा आणि दया कर. दुर्योधनाला विसर आणि त्या मन्दबुद्धि जयद्रथालाहि विसर. तुझ्या अभिमन्यूचा जसा परीक्षित् तसाच हा सुरथाचा पुत्र व माझा नातू आहे. त्याला घेऊन मी तुझ्यापाशीं आलें आहें. तरी आतां सर्व योद्धयांना वांचव; माझें म्हणणें ऐक. या बाळावर कृपा कर. हा तुझ्या पायां पडून कृपेची याचना करीत आहे, तरी आतां तूं शांत हो. हें पोरकें अडाणी मूल तुझ्याशीं मागणें मागत आहे, आणि तूं धर्म जाणणारा आहेस; तरी आतां क्रोध सोडून त्याच्यावर प्रसन्न हो. त्याच्या अनार्य व दुष्ट आजाचा तुला सर्वस्वी विसर पडूं दे; त्यानें तुमचे अगणित अपराध केले खरे, पण ते विसर व या त्याच्या नातवावर कृपा कर.'

राजा, दुःशलेचे हे दीनवाणे करुणेचे शब्द ऐकून अर्जुनाच्या मनापुढें देवी गांधारी व धृतराष्ट्र यांच्या मूर्ति उभ्या राहिल्या. तो दुःखानें विव्हळ झाला आणि 'धिक्कार असो या क्षत्रियधर्माला, त्याच्या नादानेंच मीं या सर्व बांधवांना यमसदनास पाठविलेंना?' असे उद्गार त्याच्या तोंडून बाहेर पडले. मग त्यानें दुःशलेला प्रेमानें भेटून तिचें सान्त्वन केलें आणि तिचें मन स्वस्थ करून तिला घरीं जावयास प्रेमानें निरोप दिला. दुःशलेनेंहि आपल्या सर्व योद्धयांना युद्धापासून परावृत्त केलें आणि अर्जुनाचा बहुमान करून ती घरीं आली.

याप्रमाणें सिन्धुदेशीय वीरांचा पराभव करून अर्जुन त्या स्वैर गतीनें जाणाऱ्या

घोड्यामागून पुनः जाऊं लागला. पिनाकधारी शंकर जसा आकाशांतून मृगामागून चालला, तसाच वीर अर्जुन आपल्या यज्ञाच्या घोड्याबरोबर विधीप्रमाणें चालला होता. तो घोडाहि आपल्या इच्छेप्रमाणें अनेक देशीं फिरला आणि त्यानें अर्जुनाची कीर्ति वाढविली. अशा रीतीनें चालला असतां तो श्यामकर्ण मणिपूरच्या राजाच्या देशांत अर्जुनासह येऊन ठेपला. १४. २. ७८.

## अध्याय ७९ वा.

[ १. अर्जुनाचें बभ्रुवाहनाशीं युद्ध ]

( १ ) वैशंपायनः—राजा, मणिपूरचा राजा बभ्रुवाहन हा आपला पिता अर्जुन आपल्याकडे येत आहे असें ऐकून विनयानें ब्राह्मणांना समागमें घेऊन त्याला भेटण्यासाठीं नगराबाहेर आला. पण ही गोष्ट क्षत्रियधर्माला अनुसरून झाली नाहीं असें म्हणून अर्जुनानें बभ्रुवाहनाची निर्भर्त्सना केली आणि तो त्याला म्हणाला, 'बभ्रुवाहना, हें करणें तुला शोभलें नाहीं. ही गोष्ट क्षत्रिय धर्माविरुद्ध आहे. अरे, मी युधिष्ठिराच्या यज्ञीय अश्वाचें संरक्षण करण्यासाठीं त्याच्या मागून फिरत आहें. अर्थात् तो घोडा तुझ्या राज्यांत आला असतां तूं त्याच्यासाठीं लढणेंच योग्य आहे. असें असतां क्षत्रियधर्माविरुद्ध ही दुर्बुद्धि तुला ज्या अर्थी सुचली, त्याअर्थी तुला धिक्कार असो. युद्धासाठीं आलेल्या माझें स्वागत तूं गोड बोलूनच करणार काय ? एखाद्या स्त्रीप्रमाणें सामोपचारानें माझें स्वागत करून जगण्यांत तुला काय पुरुषार्थ वाटला ? मूर्खा, मीं निःशस्त्र होऊन जर तुजकडे आलों असतों, तर तुझें हें स्वागत योग्य झालें असतें !'

आपल्या पतीचे हे रागाचे शब्द नागकन्या उलूपीला सहन झाले नाहींत. भूमि फोडून ती बाहेर आली आणि युद्धाचें आह्वान देणारा अर्जुन खालीं मान घालून विचार करीत बसलेल्या बभ्रुवाहनाची निर्भर्त्सना करतो आहे असें पाहून आपल्या पुत्राला म्हणाली, 'बभ्रुवाहना, मी नागकन्या उलूपी तुझी माता आहें. तूं पित्याच्या सांगण्याप्रमाणें कर, त्यांतच धर्म आहे. तूं त्याच्याशीं युद्ध कर, म्हणजेच त्याला संतोष होईल.' उलूपीनें याप्रमाणें उत्तेजन दिल्यामुळें बभ्रुवाहनानें अर्जुनाशीं युद्ध करण्याचा निश्चय केला. सोन्याचें कवच अंगावर चढवून आणि तेजस्वी शिरस्त्राण मस्तकावर घालून शंभर भात्यांनीं भरलेल्या रथांत तो बसला. इतर सर्व युद्धसामग्रीहि त्यानें घेतली व उत्तम वेगवान् घोडे रथाला

जुंपविले. तो रथ सुंदर चाकांचा व सोन्याच्या पत्र्यानें मढविलेला असून त्याच्यावर सिंहांकित सोनेरी ध्वज उंच फडकत होता. अर्जुनाशीं युद्ध करण्यासाठीं निघाल्यावर बभ्रुवाहनानें प्रथम अश्वविद्याप्रवीण अशा आपल्या सेवकांना तो घोडा पकडावयास सांगितलें. त्याच्या आज्ञेवरून घोडा पकडण्यांत आला हें पाहून अर्जुनाला समाधान झालें आणि तो आपल्या रथस्थपुत्राशीं पायींच लढूं लागला. तेव्हां बभ्रुवाहनानें सर्पासमान तीक्ष्ण बाणांनीं अर्जुनावर प्रहार केला. मग त्या दोघां पितापुत्रांचें जें अतुल युद्ध झालें तें देवासुरांच्या युद्धासारखेंच झालें. बभ्रुवाहन अर्जुनाच्या खांद्यावर बाणांचा प्रहार करून हंसला व तो बाण अर्जुनाच्या अंगांतून बाहेर पडून सर्प बिळांत शिरावा, त्याप्रमाणें भूमींत जाऊन रुतला. त्यामुळें अर्जुन क्षणभर स्तब्ध झाला व दिव्य तेजांत प्रविष्ट होऊन जणूं मृतच झालासें वाटलें. थोड्यावेळानें तो सावध झाला, आणि बभ्रुवाहनावर संतुष्ट होऊन त्याला म्हणाला, 'बाळा, फार उत्तम. तुझें हें युद्धकौशल्य पाहून मला संतोष झाला. आतां हा बाण मी तुझ्यावर सोडतों पहा. नीट लक्ष देऊन युद्ध कर.' असें म्हणून त्यानें बभ्रुवाहनावर उलट बाणांचा वर्षाव केला, पण ते सारे बाण बभ्रुवाहनानें भल्लांनीं तोडून त्यांचे दोन दोन तीन तीन तुकडे करून टाकिले. तेव्हां अर्जुनानें त्याच्या रथावरील सोन्याचा उंचध्वज क्षुरानें पाडून टाकिला आणि त्याच्या रथाचे ते प्रचंड व वेगवान् घोडेहि निर्जीव करून सोडले. तेव्हां बभ्रुवाहन खालीं उतरला व आपल्या पित्याशीं पायींच मोठ्या क्रोधानें लढूं लागला. अर्जुनाला पुत्राचा पराक्रम पाहून आनंद झाला आणि तो त्याला फार पीडा होणार नाहीं अशा बेतानें लढूं लगला. तेव्हां अर्जुन युद्धांतून मागें फिरला असें वाटून बभ्रुवाहनानें त्याच्यावर पुनः प्रखर बाण सोडिले व एक बाण तर त्यानें पोरबुद्धीमुळें न जाणतां अर्जुनाच्या छातीवरच रोखून मारिला. तो वेगानें आलेला तीक्ष्ण बाण अर्जुनाच्या अंगांत शिरून त्याच्या मर्मावर लागला व त्या दुःखानें अर्जुन मूर्च्छित होऊन भूमीवर पडला. पित्याला मूर्च्छा आलेली पाहून चित्रांगदापुत्र बभ्रुवाहनाचीहि तीच अवस्था झाली. कारण त्यालाहि अर्जुनाचे बाण असेच मर्मावर लागून अंगांत खोल गेले होते. त्यामुळें तोहि धाडकन् भूमीवर पडला. याप्रमाणें पति व पुत्र दोघेहि मृत होऊन पडलेले पहातांच चित्रांगदा घाबरून रणभूमीवर आली आणि हृदय शोकानें संतप्त झाल्यामुळें रडत व कांपत ती बभ्रुवाहनाची माता मृत पतीकडे पहात राहिली. १४.२.७९.

---

## अध्याय ८० वा.

[ १. चित्रांगदेचा शोक व उलूपीशीं संवाद. २ अर्जुन पुनः जीवंत होतो ]

( १ ) **वैशंपायन:**—राजा, चित्रांगदेनें फार विलाप केल्यावर ती मूर्च्छित होऊन पडली. थोड्या वेळानें ती सावध झाली व उलूपीला समोर पाहून म्हणाली, 'उलूपि, रणांत मरून पडलेल्या या आपल्या पतीकडे पहा. तुझ्या सांगण्यावरून त्याला माझ्या पुत्रानें बाणानें मारिलें! पण त्यानें जरी तुझे अनेक अपराध केले असले, तरी तूं त्याला क्षमा कर आणि पुनः सजीव कर असें तुजजवळ माझें मागणें आहे. तूं त्रैलोक्यांत प्रसिद्ध अशी धर्म जाणणारी आहेस यांत शंका नाहीं; कारण पुत्राकडून पतीचा वध करवूनहि तुला त्याचें कांहीं दुःख वाटत नाहीं! हे नागकन्ये, पुत्रवधाचेंहि मी तेवढें दुःख मानीत नाहीं, पण ज्याचें स्वागत अशा रीतीनें करण्यांत आलें त्या पतीविषयींच मला दुःख होत आहे.' उलूपीला असें म्हणून चित्रांगदा अर्जुन पडला होता तेथें आली आणि त्याला उद्देशून म्हणाली, 'हे माझ्या प्रिय पते, उठा, हा पहा तुमचा घोडा मीं सोडून दिला. धर्मराज युधिष्ठिराच्या यज्ञीय अश्वाचें रक्षण करीत त्याच्या मागून जावयाचें सोडून तुम्ही येथें भूमीवर कसे पडून राहिलां? हे कुरुनंदना, माझे प्राण केवळ तुमच्या हातीं आहेत. दुसऱ्याला प्राणदान देणाऱ्या तुम्हीं स्वतःच प्राणत्याग कसा केला बरें? उलूपि, मरून भूमीवर पडलेल्या या पतीकडे नीट पहा. या पुत्राचाहि घात करून तुला दुःख होत नाहीं! पुत्र मृत्युवश होऊन पडला तर पडो, पण या विजयी अर्जुनाला तर प्राणदान करशील कीं नाहीं! बाई ग, अनेक पत्न्या करणें हा कांहीं पुरुषांचा दोष नाहीं. पण स्त्रियांना तसें करणें दोषास्पदच आहे. यास्तव तूं तसली बुद्धि धरूं नको. विधात्यानें जी गांठ मारिली ती शाश्वत व अक्षय असते. यास्तव तीच सख्याची गांठ तूं खरी करून दाखव. पतीचा घात तूं पुत्राकडून करविलास, पण त्याला सजीव करून जर त्याचें दर्शन मला आज तूं घडविलें नाहींस, तर मी खचित प्राणत्याग करीन. पुत्र व पति यांच्या विरहानें दुःखी झालेली मीं ही येथेंच तुझ्या समक्ष उपास करीत बसतें पहा.' असें उलूपीला म्हणून चित्रांगदा प्रायोपवेशनासाठीं बैठक मारून स्तब्ध बसली.

शोक आवरून व पतीचे चरण धरून ती दीन झालेली चित्रांगदा दीर्घ निःश्वास टाकीत पुत्राकडे पहात प्रायोपवेशनाच्या निश्चयानें बसली असतां बभ्रुवाहन पुनः सावध झाला आणि मातेला रणांगणावर आलेली पाहून म्हणाला, 'अरेरे, सुखांत

वाढलेली माझी माता आपल्या रणांत पडलेल्या मृत पतीचा शोक करीत आहे, याहून दुःखाची गोष्ट ती काय असेल ? स्वतः शत्रूंचा वध करणारा व शस्त्रधाऱ्यांत श्रेष्ठ असा तो माझ्याच हातून मरण पावलेला पहाण्याचें तिच्या दैवीं आलें ना ? खरोखर या देवीचें हृदय फारच कठीण असलें पाहिजे, नाहींतर या महाबाहु वीराला मृत झालेला पाहून तें खचित फुटून गेलें असतें. काळ आला नाहीं तों मरण येणें कठीण असेंच मला वाटतें. कारण नाहींतर या प्रसंगीं मी व ही माझी माता जीवंत कशीं राहिलों असतों ? हाय हाय ! या कुरुश्रेष्ठाचें सुवर्णकवच तो वध पावल्यामुळें येथें छेदून गेलेलें मी त्याचा पुत्र येथें पहात आहें ! ब्राह्मणहो, हा पहा माझा पिता माझ्याच हातून मरण पावल्यामुळें वीरशय्येवर पडला आहे ! अश्वाच्या मागून जाणाऱ्या त्याला मींच मारिलें असल्यामुळें त्याच्या समागमें शांतिपठनासाठीं आलेले ब्राह्मण आतां शांति ती काय करणार ? ब्राह्मणहो, माझ्या या पितृघाताच्या पापाला कांहीं प्रायश्चित्त आहे काय ! रणांगणांत पित्याचा वध करणारा केवढा मी दुष्ट व पापी ! चर्म पांघरून बारा वर्षें तीर्थाटन करीत मी फिरलों तरी माझ्या या पापाची निष्कृति होईल कीं नाहीं कोण जाणे. पित्याचें मस्तक व कपाल घेऊन पृथ्वीवर हिंडण्याशिवाय दुसरें पितृवधाचें प्रायश्चित्त मला दिसत नाहीं. हे नागराजकन्ये, रणांत मीं तुझ्या पतीचा वध करून तुला प्रिय असलेलीच गोष्ट केली आहे. पण आतां मला पित्याच्या मार्गानेंच जाऊं दे. मला प्राणधारण करणें अशक्य आहे. माते, मी व गांडीवधारी अर्जुन मृत झालों असतां तूं खरोखर आतां आनंदानें रहा.'

दुःखानें व्याप्त होऊन बभ्रुवाहनानें असा शोक केल्यावर डोळ्याला पाणी लावलें आणि कष्टी अंतःकरणानें तो म्हणाला, 'सर्व चराचर वस्तूंनो व प्राण्यांनो ऐका. माते नागराजकन्ये, तूंहि ऐक. जर माझा पिता जीवंत झाला नाहीं, तर याच रणभूमीवर मी आपलें शरीर अन्नत्यागानें शुष्क करीन. पितृवधाच्या पापाची निष्कृति दुसऱ्या कशानेंहि होणार नाहीं. तसें मीं न केलें तर निसंशय मला नरक प्राप्त होईल. सामान्य वीर क्षत्रियाचा वध केल्यास शंभर गाई दिल्यानें त्या पापापासून मनुष्य मुक्त होतो. पण धर्मात्म्या पित्याचा वध केल्यास निष्कृति कशानें होणार ?' असें बोलून बभ्रुवाहनहि प्रायोपवेशनाच्या निश्चयानें स्तब्ध बसला.

याप्रमाणें चित्रांगदा व तिचा पुत्र बभ्रुवाहन अशीं दोघेंहि अन्नत्यागपूर्वक देहत्याग करण्यास सिद्ध होऊन बसलीं असतां उलूपीनें संजीवन मण्याचें स्मरण

केलें. तेव्हां नागांच्या सेवेला नित्य तत्पर असलेला तो मणि तिच्यापुढें उभा राहिला. तो हातांत घेऊन ती नागराजकन्या सैनिकांना उद्देशून मनःसंतोष उत्पन्न करणारें भाषण करूं लागली. ती म्हणाली, 'बाळा, बभ्रुवाहना, ऊठ, शोक सोडून दे. अर्जुनाला तूं खरोखर जिंकिलेलें नाहीं. तसें म्हटलें तर याला जिंकणें हें इंद्रासह सर्व देवांनाहि शक्य नाहीं. अरे, मींच ही मोहिनी नांवाची माया दाखविली आणि या नरश्रेष्ठ अशा तुझ्या पित्याच्या हितासाठींच ती दाखविली. आपल्या पुत्राचा पराक्रम पहावा म्हणूनच हा येथें युद्धासाठीं आला, आणि म्हणूनच, बाळा, मींहि तुला युद्धाचें प्रोत्साहन दिलें. तरी आपल्या हातून कांहीं पाप घडलें असें मानण्याचें तुला कारण नाहीं. अर्जुन म्हणजे प्राचीन ऋषि जो नर तोच असून त्याला रणांत जिंकण्यास इन्द्रहि समर्थ नाहीं. आतां हा संजीवन मणि मीं आणिला आहे. तो युद्धांत मरण पावलेल्या नागांना नित्य जीवंत करीत असतो. हा तूं आपल्या पित्याच्या वक्षःस्थलावर ठेव, म्हणजे तो सजीव झालेला तुला दिसून येईल.'

उलूपीच्या सांगण्याप्रमाणें बभ्रुवाहनानें करतांच अर्जुन सजीव होऊन झोपेंतून जागा झाल्यासारखा डोळे चोळीत उठला. तो उठतांच बभ्रुवाहनानें त्याला वंदन केलें. आकाशांतून त्याच्यावर इन्द्रानें पुष्पवर्षाव केला. कोणी न वाजवितां दुदुंभी गंभीर ध्वनि करून वाजूं लागल्या. अर्जुन सावध होऊन उठतांच आकाशांतून 'उत्तम उत्तम' असा मोठा शब्द झाला. मग त्यानें बभ्रुवाहनाचें मस्तक हुंगून त्याला आलिंगन दिलें. नंतर शोकव्याप्त होऊन पलीकडे उलूपीसह बसलेल्या चित्रांगदेकडे त्याचें लक्ष गेलें आणि त्यांना तो म्हणाला, 'शोक, आश्चर्य, व हर्ष यांनीं युक्त असा हा रणांगणांत काय प्रकार चालला आहे? माझ्या शूर बाळा, सांग बरें तुला ठाऊक असेल तर. तुझी माता येथें कशाला आली? तशीच ही नागकन्या उलुपी तरी येथें कशी आली? माझी अशी समजूत आहे कीं माझ्याच आग्रहावरून तूं युद्धास प्रवृत्त झालास. असें असतां स्त्रियांनीं येथें येण्याचें कारण काय, तें मला समजलें नाहीं.' अर्जुनाचें हें भाषण ऐकून तो मणिपूरचा राजा बभ्रुवाहन संतुष्ट होऊन त्याला म्हणाला, 'हें सारें उलुपीला विचारा, ती सांगेल.' १४. २. ८०.

## अध्याय ८१ वा.

[ १. उलूपी सर्व वृत्त अर्जुनाला सांगते. २ अर्जुन सर्वांना अश्वमेधाचें निमंत्रण देऊन पुढें जातो. ]

( १ ) **अर्जुन**—हे कुरुकुलनंदिनि उलूपि, तूं येथें कशासाठीं आलीस, तसेंच या चित्रांगदेचें तरी येथें रणागणांत येण्याचें कारण काय ? उलूपि, तूं बभ्रुवाहनाचें कुशल जाणण्यासाठींच आलीस काय ? माझाहि समाचार तुला काढावयाचा असेलच. याच्या किंवा माझ्या हातून न जाणतां तुझें अप्रिय तर कांहीं झालें नाहींना ? किंवा चित्रांगदेनें तुझा कांहीं अपराध केला कीं काय ?

**उलूपी**:—महाराज, आपल्या हातून किंवा बभ्रुवाहनाकडून तसाच त्याच्या मातेकडून कोणताच अपराध घडलेला नाहीं. चित्रांगदा तर माझ्याशीं दासीप्रमाणें वागते. आतां हा सारा प्रकार मीं काय केला तो सांगतें, ऐकावा. महाराज, त्याविषयीं मजवर कोप करूं नका. मी आपल्या पायां पडून प्रार्थना करतें. या साऱ्या गोष्टी मीं आपल्या हितासाठींच घडवून आणिल्या. त्या सर्व ऐकून घ्या. आपण महायुद्धामध्यें भीष्माचा जो अधर्मानें वध केला, त्याची निष्कृति या रीतीनें मीं केली. त्या वधाच्या पापाची निष्कृति न करतां जर आपण प्राणत्याग केला असता, तर त्यामुळें आपल्याला निश्चितपणें नरकांत पडावें लागलें असतें. आपल्याला पुत्राच्या हातून जें मरण आलें तें भीष्मवधाच्या निष्कृतीसाठींच होय. महाराज, पूर्वी वसु आणि गंगा यांमध्यें यासंबंधानें भाषण झालें असून तें मला वसूंकडूनच समजलें. भीष्माला आपण मारिल्यानंतर सारे वसु गंगातीरीं आले व तींत स्नान करून गंगेच्या संमतीनें म्हणाले, 'शांतनुपुत्र भीष्म शिखंडि पुढें आल्यामुळें लढत नसतां अर्जुनानें त्यांना मारिलें, तरी आतां त्या गोष्टीला अनुसरून आम्ही त्याला आतां शाप देतों.' तेव्हां गंगेनें 'ठीक आहे, द्या' असें उत्तर दिलें. तें ऐकून माझें मन खट्टू झालें आणि मीं पित्याला तें कळवून त्याला कांहीं उपाय करण्यास सांगितलें. तेव्हां माझा पिता वसूंकडे गेला आणि, महाराज, आपल्यासाठीं त्यानें त्यांची वारंवार विनवणी करून त्याला सांगितलें कीं "अर्जुनाचा पुत्र जो मणिपूरचा तरुण राजा बभ्रुवाहन तो त्याला रणांत बाण मारून पाडील व तेणेंकरून अर्जुन शापमुक्त होईल." असें म्हणून वसूंनीं माझ्या पित्याला घरीं पाठविलें व आल्यावर त्यानें सर्व वृत्तान्त मला सांगितला. त्याला अनुसरून मीं आपल्याला आज शापमुक्त केलें. वस्तुतः इंद्रा-

लाहि तुमचा पराजय करतां येणार नाहीं. पण पुत्र म्हणजे वस्तुतः आपण स्वतःच असल्यामुळें बभ्रुवाहनानें तुझा पराभव केला; त्यांत त्याचा कांहीं दोष नाहीं. आपल्याला त्याविषयीं काय वाटतें बरें ?

**अर्जुन**:—हे देवी, तूं केलेंस तें सारें योग्यच झालें व माझ्या हितासाठींच तें झालें. आतां युधिष्ठिराचा अश्वमेध पुढील चैत्री पौर्णिमेला व्हावयाचा आहे. तरी, हे बभ्रुवाहना, तेथें तूं या आपल्या दोन्ही मातांना घेऊन ये.

**बभ्रुवाहन**:—हे तात, आपल्या आज्ञेप्रमाणें मी अश्वमेधाला येईन व ब्राह्मणांना वाढण्याचें काम अवश्य करीन. पण माझ्यावर कृपाकरून थोडा वेळ आपण आपल्या उभय भार्यासह नगरांत यावें; कांहीं दुसरें मनांत आणूं नये. आपल्या या घरांत एक दिवस राहून मग अश्वामागून पुनः जावें.

**अर्जुन**:—बाळा, तुला ठाऊकच आहे कीं मीं अश्वानुसरणाची दीक्षा घेतलेली असल्यामुळें आतांच मला नगरांत येतां येणार नाहीं. कारण घोडा जिकडे स्वैरपणें जाईल तिकडेच मला गेलें पाहिजे. तुझें कल्याण असो; मी आतां जातों; मला एका ठिकाणीं सध्यां रहातां येणार नाहीं.

**वैशंपायन**:—राजा, याप्रमाणें अर्जुनानें सांगितलें असतां, बभ्रुवाहनानें तेथेंच त्याचा सत्कार केला आणि अर्जुनहि आपल्या उभय भार्यांचा निरोप घेऊन पुढें निघून गेला. १४. २. ८१.

---

## अध्याय ८२ वा.

[ १. अर्जुनाचें मगधराजाशीं युद्ध. ]

( १ ) **वैशंपायन**:—राजा, समुद्रापर्यंत पसरलेल्या पृथ्वीवर क्रमानें संचार करीत तो अश्व चालला असतां, हस्तिनापुराच्या समोरच आल्यामुळें तेथून तो माघारा वळला आणि मगधदेशाची राजधानी जें राजगृह तेथें आला. तो तेथें आलेला पहातांच जरासंधाचा नातू मेघसन्धि पुढें आला व क्षात्रधर्माला अनुसरून त्यानें अर्जुनाला युद्धाचें आव्हान दिलें. तो पराक्रमी वीर रथांत बसून धनुष्यबाण घेऊन अर्जुनावर चालून गेला आणि पोरपणामुळें त्याला म्हणाला, ' हा घोडा असा बायकांत चालावा असा काय चालला आहे ? आतां याला मी पकडतों, घ्या याला सोडवून कसा घ्यावयाचा तो ! माझ्या वडिलांनीं तुम्हांला युद्धाचें निमंत्रण दिलें नसेल तर मी तें देऊन तुमचें स्वागत करतों; चला, टाका बाण; हा मीं टाकला ?' हे त्याचे बोल ऐकून अर्जुनानें हंसत हंसत उत्तर केलें,

'अरे, मला जो विघ्न करील त्याचें निवारण करणें हें माझें व्रतच आहे. तें मला माझ्या वडील बंधूनें दिलें असून तुलाहि खचित माहीत आहेच. तरी तूं मजवर यथेष्ट प्रहार कर. मला त्याचा राग नाहीं.' असें अर्जुनानें सांगतांच इन्द्र जसा पाण्याचा पाऊस पाडतो, तसा त्या मगधराजानें अर्जुनावर सहस्त्रावधि बाणांचा पाऊस पाडिला. तेव्हां अर्जुनानेंहि आपल्या गांडीवावरून निकराचे बाण सोडून त्याचे बाण व्यर्थ केले. अर्जुनाचे सूर्यासारखे ते अग्निमुख बाण मगधराजाच्या रथावरील ध्वज, ध्वजाचा दांडा, घोडे, चाकें यांना मात्र लागले. पण अर्जुनाच्या मनांत त्याचें रक्षण करण्याचें असल्यामुळें त्याच्या किंवा सारथ्याच्या शरीराला धक्का लागला नाहीं. पण पोरवयाच्या मगधराजाला तो आपलाच पराक्रम आहे असें वाटलें व तो अर्जुनावर सारखे बाण सोडीत राहिला. त्या बाणांनीं विद्ध झालेला अर्जुन वसंत ऋतूंतील फुललेल्या पळसासारखा दिसूं लागला. तेव्हां मेघसन्धीचे बाण आपल्यावर सारखे प्रहार करीत असून तो आपल्यापुढें धीटपणें उभाच आहे असें पाहून अर्जुनाला राग आला व त्यानें त्याचे घोडे मारून सारथ्याचेंहि मस्तक उडविलें व धनुष्य तोडून त्याच्या हातांतील मोजे, पताका व ध्वज हींहि खालीं पाडिलीं. तेव्हां मेघसन्धि केवळ गदाच घेऊन अर्जुनावर धांवून आला. पण त्याची ती सोन्यानें मढविलेली गदा अर्जुनानें गृध्रबाण सोडून तोडून टाकिली. गदेचे तुकडे होऊन खालीं पडल्यावर मेघसन्धीजवळ रथ, धनुष्य, गदा इत्यादि कांहींच राहिलें नाहीं असें पाहून अर्जुन त्याची समजूत करून म्हणाला, 'बाळा, तूं आपला क्षात्रधर्म उत्तम रीतीनें दाखविलास. तुझ्या बालवयाच्या मानानें तूं खरोखर चांगलाच पराक्रम केलास. पण माझ्या वडील बंधूची मला आज्ञा आहे कीं, राजांना शक्यतों मारावयाचें नाहीं. यास्तव मीं तुला सोडून देतों.' हें ऐकून मेघसन्धीला आपला पराभव झाला हें पटलें व त्यानें हात जोडून अर्जुनाला नमस्कार केला. तो म्हणाला, 'अर्जुना, मी पराजित झालों. तुझें कल्याण असो. आतां मला आणखी लढण्याची इच्छा नाहीं. आतां मी काय करूं तें तूंच सांग, म्हणजे त्याप्रमाणें मी करतों.' अर्जुनानें त्याचें समाधान केलें आणि पुढील चैत्री पौर्णिमेला अश्वमेधासाठीं येण्याचें त्याला निमंत्रण दिलें. मेघसन्धीनें 'ठीक आहे' असें म्हणून त्या श्यामकर्णाची व अर्जुनाची पूजा केली आणि अर्जुन घोड्याबरोबर तेथून निघाला. नंतर समुद्रतीरानें जात असतां वाटेंत वंग, पुंड्र, कोसल हे देश लागले व तेथें अर्जुनानें अनेक म्लेच्छ सैन्यांवर विजय मिळविला. १४. २. ८२.

---

## अध्याय ८३ वा.

[ १ अर्जुनाचें शरभादिकांशीं युद्ध. २ सौराष्ट्रांत अर्जुनाचा सत्कार. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, मगधराज मेघसन्धीचा सत्कार स्वीकारून अर्जुन अश्वाच्या मागून दक्षिण दिशेच्या रोखानें चालूं लागला. नंतर पुनः वळून तो घोडा चेदि देशांतील शुक्तिपुराजवळ आला. तेथें प्रथम युद्ध झाल्यावर शिशुपालाचा पुत्र शरभ यानें अर्जुनाचा बहुमान केला. तेथून तो अश्व काशिदेश, अंग, कोसल, किरात, तंगण या देशीं गेला व रीतीप्रमाणें तेथेंहि मिळालेला सत्कार घेऊन तो वळून दशार्ण प्रांतांत आला. तेथें चित्रांगद नांवाचा पराक्रमी राजा होता. त्याशीं तुमुल युद्ध करून अर्जुनानें त्याला आपल्या कह्यांत आणिलें. तेथून पुढें तो एकलव्य निषादाच्या राज्यांत गेला. त्या ठिकाणींहि निषादांशीं त्याचें रोमांचकारी युद्ध झालें. अर्जुनानें यज्ञाला विघ्न करणाऱ्या त्या निषाद राजाचा रणांत पराजय करून त्यापासून सत्कार मिळविला व पुढें दक्षिण दिशा धरून समुद्रतीरानें तो जाऊं लागला. त्या बाजूला द्रविड, आन्ध्र, रौद्र, माहिषक, कोल्लगिरी, इत्यादि लोकांशीं त्याला संग्राम करावा लागला. पण त्यांना अर्जुनानें सहज जिंकिलें आणि तेथून तो अश्वाच्या मागून जातां जातां सौराष्ट्राकडे चालला.

( २ ) गोकर्ण, प्रभास इत्यादि क्षेत्रीं जाऊन शेवटीं यादवांची रमणीय राजधानी जी द्वारका तेथें तो घोडा येऊन पोंचला. त्याला तरुण यादव पकडूं लागले असतां उग्रसेन राजानें त्यांचें निवारण केलें. नंतर यादव अर्जुनाचा मामा जो अंधक त्यासह अर्जुनाला सामोरे आले आणि त्याचा त्यांनीं मोठा सन्मान केला. तो सन्मान स्वीकारून व त्यांची अनुज्ञा घेऊन अर्जुन घोड्याच्या मागोमाग पुनः चालूं लागला. तेथून पश्चिम समुद्राला धरून जात असतां तो घोडा पंचनद देशीं गेला व तेथून गांधार देशास पोंचला. तेथें गांधारराजाशीं म्हणजे शकुनिपुत्रांशीं अर्जुनाचें तुमुल युद्ध झालें. पूर्वीचें वैर आठवून शकुनीचा पुत्र त्याच्याशीं निकरानें लढला. १४.२.८३.

## अध्याय ८४ वा.

[ १. शकुनिपुत्राचा पराजय व त्याला अश्वमेधाचें आमंत्रण. ]

( १ ) शकुनीचा पुत्र पताका ध्वज यांनीं शोभणारें असें आपलें हत्ती, घोडे, रथ इत्यादि सैन्य घेऊन अर्जुनावर चालून आला. त्याचे वीर सैनिक शकुनीच्या वधाची आठवण होऊन क्रुद्ध झाले व आपआपलीं धनुष्यें घेऊन त्याच्यावर एकदम सारे तुटून पडले. तेव्हां अजिंक्य असा अर्जुन शांतपणें त्यांना युधिष्ठिराच्या आज्ञा सांगूं लागला. पण तिकडे मुळींच लक्ष न देतां अर्जुन त्यांना गोड शब्दांनीं सावध होण्यास सांगत असतांहि त्यांनीं घोड्याला वेढा दिला. तेव्हां अर्जुनानें संतप्त होऊन त्यांचीं मस्तकें तोडून टाकिलीं. त्याला तसें करण्यास कांहींच त्रास पडला नाहीं. तेव्हां त्यांतून उरलेले वीर घोड्याला सोडून देऊन पळूं लागले. पण अर्जुनानें त्यांना बजावून बजावून त्यांचीं मस्तकें छेदिलीं. अशा रीतीनें ते गांधारवीर पटापट मरून पडूं लागले असतां शकुनिपुत्र स्वतः अर्जुनाला अडवण्यास पुढें आला. तेव्हां 'युधिष्ठिराची आज्ञा असल्यामुळें राजांचा मला वध करावयाचा नाहीं, तरी आतां युद्ध बंद कर आणि परत जा,' असें अर्जुनानें त्याला सांगितलें. तरीपण त्याचा अनादर करून तो अज्ञानामुळें जेव्हां अर्जुनावर बाणांचा वर्षाव करूं लागला, तेव्हां अर्जुनानें अर्धचंद्राकार बाण मारून पूर्वी जसें जयद्रथाचें मस्तक उडविलें होतें तसें त्याचें शिरस्त्राण उडविलें. तें पाहून गांधारवीरांना आश्चर्य वाटलें व खरोखरच अर्जुनाच्या मनांतून राजाचा वध करावयाचा नाहीं ही गोष्ट त्यांना पटली. शकुनिपुत्र पळून जाण्याचा निश्चय करून माघारा वळला व त्याच्याबरोबर इतर वीरहि पळून जाऊं लागले. पण अर्जुनानें आपल्या भल्ल बाणांनीं त्यांचीं मस्तकें छेदून टाकिलीं. बाण मारण्यासाठीं त्यांनीं बाहू उभारावे व ते बाण सुटण्यापूर्वींच अर्जुनाच्या बाणांनीं ते तुटून पडावे असा प्रकार कित्येकांच्या बाबतींत झाला. अशा रीतीनें सर्व गांधारसैन्य पराभूत होऊन सैरावैरा पळूं लागलें. पण त्याचा बहुतेक नाश होऊन फारच थोडें जीवंत राहिलें. पहिल्या प्रथम आपल्या अंगावर चालून आलेल्या वीरांपैकीं आतां अर्जुनाला कोणी दिसेनात. असा प्रकार झाला असतां गांधारराज शकुनिपुत्राची माता आपल्या वृद्ध मंत्र्यांना पुढें करून व सत्कारसाहित्य घेऊन भीत भीत नगराबाहेर आली आणि सैन्याला व पुत्राला मागें फिरवून अर्जुनाचें समाधान करूं लागली. तिचा सत्कार स्वीकारून अर्जुनानें उलट तिचाहि बहुमान केला आणि शकुनिपुत्राला

समाधानाच्या गोष्टी सांगून त्याला तो म्हणाला, 'तुझी ही बुद्धि मला आवडली नाहीं. कारण कांहीं झालें तरी तूं माझा भाऊच आहेस. गांधारीमातेची व धृतराष्ट्राची आठवण करून मीं तुला वांचविलें, पण तुझ्या सैन्याचा वध केला. आतां यापुढें असें होऊं नये. आतां वैर थांबवूं या. तुझी युद्ध करण्याची बुद्धि टाकून दे. आतां घरीं जा आणि पुढील चैत्री पौर्णिमेला राजा युधिष्ठिराचा अश्वमेध पहाण्यासाठीं हस्तिनापुरास ये.' १४. २. ८४.

---

## अध्याय ८५ वा.

[ १. अश्वासह अर्जुन हस्तिनापुरास यावयास निघालेला ऐकून युधिष्ठिर यज्ञाची सर्व सिद्धता करतो. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, गांधार राजाला याप्रमाणें सांगून अर्जुन स्वैर फिरणाऱ्या यज्ञीय अश्वामागून चालूं लागला असतां तो अश्व हस्तिनापुराच्या दिशेला वळला. हें वर्तमान युधिष्ठिराला दूतांच्या तोंडून समजलें, तेव्हां अर्जुन खुशाल आहे हें पाहून त्याला आनंद झाला. जेथें जेथें तो गेला तेथील विशेषतः गांधार देशांतील युद्धांत अर्जुनाचें वर्तन पाहून तो अगदीं संतुष्ट झाला. इतक्यांत माघ महिन्यांतील द्वादशी आली; तेव्हां तें शुभ नक्षत्र घेऊन त्यानें सर्व बंधूंना एकत्र बोलाविलें आणि भीमाला हाक मारून म्हटलें, 'भीमसेना, अर्जुनाचें वर्तमान घेऊन आलेल्या दूतांनीं सांगितलें कीं तो अश्वासह लवकरच येत आहे. आतां यज्ञाची वेळ जवळ आली. आज ही माघी पौर्णिमा; एकच महिना आतां राहिला. तर वेदवेत्त्या विद्वान् ब्राह्मणांना अश्वमेधासाठीं योग्य भूमि निवडावयास सांग.' अर्जुन लवकरच परत येणार हें ऐकून भीमाला आनंद झाला आणि युधिष्ठिराच्या सांगण्याप्रमाणें त्यानें सर्व व्यवस्था करविली. तो यज्ञकर्मांत कुशल अशा ब्राह्मणांना पुढें करून स्थापत्यशास्त्रविशारद कारागिरांसह गेला आणि त्यांच्याकडून यज्ञासाठीं पटांगण मोजून घेतलें. त्या पटांगणाभोंवतीं कुंपण घालून त्यानें आंत चांगले रस्ते करविले आणि उत्तम दगडांची तेथें फरशी घालून शेंकडों वाडे बांधिले. त्यांचे खांब सोन्याचे असून जिकडे तिकडे तोरणें उभारलीं होतीं. स्वतः यज्ञाची भूमी शुद्ध मोकळी ठेवून इतर भागांत नाना देशींहून आलेल्या राजांसाठीं घरें, त्यांच्या स्त्रियांसाठीं स्वतंत्र स्थानें, इत्यादि गोष्टी त्यानें योग्य रीतीनें करविल्या. ब्राह्मणांसाठीं रहाण्याचीं स्वतंत्र

ठिकाणेंहि करविण्यांत आलीं. एवढी सिद्धता झाल्यावर युधिष्ठिराच्या सांगण्यावरून त्यानें सर्व स्नेही राजांकडे दूत पाठविले आणि त्याप्रमाणें ते राजे युधिष्ठिराला संतुष्ट करण्यासाठीं तेथें आले. त्यांनीं अहेरासाठीं विविध रत्नें, दासदासी, घोडे, शस्त्रास्त्रें इत्यादि आपल्याबरोबर आणिलीं. ते येऊन आपल्यासाठीं केलेल्या शिबिरांत प्रवेश करूं लागले, तेव्हां त्या धांदलीचा प्रचंड गंभीर ध्वनि समुद्रगर्जनेसारखा होऊन आकाशाला जाऊन भिडला. त्या पाहुणे राजांची जेवणाखाण्याची व निजण्याबसण्याची व्यवस्था योग्य प्रकारें ठेवण्याची युधिष्ठिरानें आपल्या सेवकांना आज्ञा दिली. त्यांच्या वाहनासाठीं अश्वशाला, हस्तिशाला अशा निरनिराळ्या केल्या असून त्यांत गवत, कडबा, पाणी भरपूर भरून ठेविलेलीं होतीं. युधिष्ठिराच्या त्या महायज्ञासाठीं अनेक ब्रह्मवादी ऋषि आणि मोठमोठे ब्राह्मणहि आपल्या शिष्यांसह आले आणि त्यांचें योग्य स्वागत त्यानें केलें. हें स्वागताचें काम त्यानें खोटा अभिमान न धरतां स्वतःच केलें. नंतर शिल्पशास्त्री आणि दुसरे कारागीर यांनीं यज्ञाला लागणारी भूमी, मंडप, इत्यादि सर्व साधनें सिद्ध करून त्याप्रमाणें युधिष्ठिराला सांगितलें. सर्व सिद्धता योग्य प्रकारें झाली हें ऐकून राजाला व त्या सर्व बंधूंना संतोष वाटला.

यज्ञाला आरंभ झाला तेव्हां वादपटु व उत्तम कोटिक्रम करणारे पंडित एकमेकांना जिंकण्यासाठीं नाना विषयांवर तर्कप्रधान वाद करूं लागले. भीमानें करविलेली ती यज्ञाची सिद्धता पाहून पाहुण्यांना तो इन्द्राचाच यज्ञ आहे कीं काय असें वाटलें. सोन्याचीं तोरणें, शय्यागारें, स्नानागारें, क्रीडांगणें, मोठमोठे रत्नांचे ढीग, अनेक प्रकारचीं लहान मोठीं भांडीं, कढया, कळशा, चंबू, घडे, इत्यादि सर्व सोन्याचींच त्यांना दिसून आलीं. शास्त्रानुसार बनविलेले यज्ञस्तंभ लांकडाचे असून सोन्यानें मढविलेले होते. जलचर तसेच स्थलचर सर्व पशु तेथें आणिले होते. गाई, म्हशी, वृद्ध स्त्रिया, इतर जलचर प्राणी, श्वापदें, पक्षी, रानांतील प्राणी, पर्वतावर रहाणारे प्राणी, नाना प्रकारचे जीवजन्तु इत्यादिकांचें प्रदर्शन तेथें मांडलेलें असून ती सारी यज्ञभूमि पशु, गाई, धन, धान्य इत्यादिकांनीं भरलेली पाहून सर्व राजांना आश्चर्य वाटलें. उत्तम प्रकारचें मधुर अन्न ब्राह्मण व इतर लोक या सर्वांना देण्यांत येत होतें. एक लक्ष ब्राह्मणांचें भोजन उरकलें कीं एकदां दुंदुभीचा शब्द करण्यांत येई. अशा रीतीनें दुंदुभिध्वनि दिवसानुदिवस सारखा चालला होता. भाग्यवान् युधिष्ठिराचा तो यज्ञ असा चालला असतां पर्वतप्राय अन्नाच्या कित्येक राशि उठल्या. दह्याचे पाट वहात

असून तुपाचे तर डोह भरले होते. त्या महायज्ञांत अनेक ठिकाणचे लोक आलेले असल्यामुळें तें यज्ञस्थान म्हणजे एकवटलेलें जंबुद्वीपच बनलें. तेथें सहस्रावधि जातीचे पुरुष अनेक प्रकारचीं भांडीं घेऊन ब्राह्मणांना विविध अन्नें वाढीत होते व पांडवांचे सेवक राजभोग्य असे उंची उंची पदार्थ वाढण्याचें काम करीत होते. १४.२.८५.

---

## अध्याय ८६ वा.

[ १. भीम पाहुणे राजांचा सत्कार करतो. २. कृष्ण अर्जुनाचें वृत्त सांगतो ]

( १ ) वैशंपायन—मोठमोठ्या राज्यांचे स्वामी असे वेदवेत्ते राजे आपल्याकडे आलेले पाहून युधिष्ठिर भीमसेनाला म्हणाला, 'भीमा, या सर्व राजांचा यथायोग्य सत्कार कर. कारण ते सर्व सन्मानाला पात्र आहेत.' त्याच्या आज्ञेप्रमाणें नकुलसहदेवांच्या साह्यानें भीमानें त्यांची नीट व्यवस्था ठेविली. इतक्यांत यादववीर आणि बळराम यांना पुढें करून सात्यकि, प्रद्युम्न, गद, निशठ, सांब, कृतवर्मा इत्यादिकांसह कृष्णहि तेथें आला. भीमानें त्या सर्वांचा बहुमान करून रत्नजडित शिबिरांत त्यांची स्थापना केली. नंतर कृष्णानें युधिष्ठिराशीं गोष्टी बोलून शेवटीं 'अर्जुनाला अनेक युद्धें करतांना केवढा त्रास झाला असेल बरें!' असें म्हटलें. युधिष्ठिरानें विचारल्यावरून कृष्णानें त्याला अर्जुनानें केलेल्या अनेक युद्धांचें वृत्त निवेदिलें आणि म्हटलें, 'द्वारकेहून आमचा एक आप्त आतांच आला, त्यानें अर्जुनाला अनेक युद्धांमुळें थकून गेलेला पाहिलें. आतां तो अगदीं जवळ आला असून लवकरच येथें पोंचेल. तरी आतां अश्वमेधाची सर्व सिद्धता करावयास पाहिजे.' धर्मराज म्हणाला, 'कृष्णा, आपल्या थोर दैवानें अर्जुन विजयी होत्साता निर्वेध परत येत आहे, ही आनंदाची गोष्ट आहे. त्यानें आपल्याला कांहीं निरोप पाठविला असेल तर तो मला समजावयास पाहिजे.' कृष्णानें उत्तर केलें, 'महाराज, अर्जुनानें तुम्हांला सांगून पाठविलें आहे कीं, आतां सर्व राजे यज्ञासाठीं येतील, तरी त्यांचा योग्य तो सत्कार करावा, हें आपलें कर्तव्य आहे. त्यांच्या सत्कारांत कांहीं उणेपणा राहूं नये, अशी व्यवस्था व्हावी. यापुढें राजांच्या परस्परद्वेषामुळें प्रजेचा निष्कारण संहार होऊं नये.' या आणि दुसऱ्या अनेक गोष्टी अर्जुनाचा निरोप म्हणून त्या मनुष्यानें सांगितल्या. त्यांचें तात्पर्य असें कीं, "मणिपूरचा राजा माझा प्रिय पुत्र बभ्रुवाहन हा यज्ञासाठीं येत आहे. त्याचा

माझ्यासाठीं म्हणून योग्य सत्कार व्हावा. त्याची माझ्यावर भक्ति व प्रेम आहे." हा निरोप ऐकून धर्मराज युधिष्ठिराला आनंद झाला आणि कृष्णाशीं तो पुढें बोलूं लागला. १४. २. ८६.

---

## अध्याय ८७ वा.

[ १. अर्जुन अश्वासह हस्तिनापुरास येतो. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—कृष्णा, तूं जें अमृतासमान मधुर व पवित्र भाषण केलें, त्यामुळें मला मोठा आनंद झाला. अर्जुनाला पुनः त्याठिकाणीं अनेक राजांशीं युद्धें करावीं लागलीं हें मीं आतां ऐकिलेंच; पण अशा रीतीनें नित्य त्याला एकट्यालाच सारें सुख सोडून फिरावें लागतें, हें पाहून मला फार वाईट वाटतें. कृष्णा, मी एकीकडे बसलों असतां अर्जुनाविषयीं माझ्या मनांत असा विचार येतो, व त्याला सतत किती कष्ट पडतात, हें समजून येतें. त्याच्या शरीरावर सर्व उत्तम लक्षणें आहेत. पण हे नित्याचे कष्ट त्याला कोणत्या लक्षणांमुळें होत असावेत बरें ? त्याला अतिशय कष्ट पडतात ही गोष्ट तर सत्य आहे; पण त्याच्या शरीरावर मला तरी कांहीं तसें लक्षण दिसत नाहीं. कृष्णा, मला जर तें ऐकण्याला योग्य असेल, तर तूं सांग.

कृष्ण—धर्मराजा, अर्जुनाच्या शरीरावर मलाहि कांहीं तसें लक्षण दिसत नाहीं. केवळ त्याच्या पायांच्या पोटऱ्या मात्र जरा फुगीर आहेत, त्याच्यामुळें त्याला नित्य प्रवासांत असावें लागतें. पण त्यावांचून त्याच्या कष्टाचें दुसरें कांहीं कारण मला दिसत नाहीं.

कृष्णाचें हें भाषण ऐकून 'असेल, तसेंहि असेल,' असें युधिष्ठर म्हणाला. पण द्रौपदीनें मात्र जरा रागानें डोळे वटारून कृष्णाकडे पाहिलें व तिचें अर्जुनावरील विशेष प्रेम पाहून त्यालाहि कौतुक वाटलें. अर्जुनाविषयींचें धर्मराज व श्रीकृष्ण यांमधील हें बोलणें ऐकून भीमादिकांना मौज वाटली. त्या गोष्टी त्यांच्या चालल्या आहेत, तों अर्जुनाकडून आलेला दूत तेथें येऊन पोंचला. त्यानें युधिष्ठिराला नमस्कार करून अर्जुन आल्याचें वृत्त त्याला कळविलें. तें ऐकून युधिष्ठिराचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून गेले व ती प्रिय वार्ता आणणाऱ्याला त्यानें पुष्कळ धन दिलें. मग दुसऱ्या दिवशीं अर्जुन प्रत्यक्ष तेथें येऊन ठेपला, तेव्हां त्या घोड्याच्या टापांनीं उधळलेली धूळ पाहून सर्वांनीं मोठा जयघोष

केला व त्यांचा तो आनंदाचा घोष अर्जुनाच्याहि कानीं आला. लोक म्हणाले, ‘अर्जुना, तूं सुखरूप परत आलास ही मोठ्या भाग्याची गोष्ट होय. युधिष्ठिर महाराजहि धन्य होत. सारी पृथ्वी जिंकून व राजांना पादाक्रांत करून घोड्याला पृथ्वीभर फिरवून आणण्याचें महत्कार्य अर्जुनाशिवाय कोण करूं शकता ? सगरासारखे मोठमोठे राजे पूर्वी होऊन गेले. पण त्यांनाहि असलें कार्य करतां आलेलें आम्हीं ऐकिलें नाहीं. फार काय, पण पुढेंहि असला पराक्रम राजांना करतां येणार नाहीं. अर्जुना, खरोखर अत्यंत दुष्कर असाच पराक्रम तूं केला आहेस.’ अशा आशयाचे लोकांचे स्तुतिशब्द ऐकत ऐकत अर्जुनानें यज्ञमंडपांत प्रवेश केला, त्यावेळीं युधिष्ठिर व कृष्ण हे अमात्यांसह धृतराष्ट्राला घेऊन त्याला सामोरे गेले. अर्जुनानें प्रथम धृतराष्ट्राचे पाय धरले, मग धर्मराजाला वंदन केलें, आणि भीमादिकांना नमस्कार करून कृष्णाला दृढालिंगन दिलें. मग समुद्राच्या पलीकडे जाऊं इच्छिणारा परतीर गांठल्यावर जसा स्वस्थ होऊन विश्रांति घेत पडतो, तसा अर्जुनहि सर्वांचा मान स्वीकारून व त्यांचा उलट बहुमान करून विश्रांति घेत पडला. इतक्यांत मणिपूरचा राजा बभ्रुवाहन आपल्या उभय मातांसह तेथें येऊन थडकला. त्यानें सर्व वडील माणसांना नमस्कार करून त्यांचे आशीर्वाद घेतले आणि तेथून तो कुंतीआजीला भेटण्यासाठीं तिच्या वाड्यांत गेला. १४. २. ८७.

---

## अध्याय ८८ वा.

[१. उलूपी, चित्रांगदा व बभ्रुवाहन यांचा सत्कार. २. युधिष्ठिराची यज्ञ-दीक्षा. ३. यज्ञासाठीं यूपस्थापना व पशु-बंधन ].

( १ ) **वैशंपायन**—राजा, बभ्रुवाहनानें आजोळीं आल्यावर आजीला गोड शब्द बोलून नमस्कार केला. नंतर देवी चित्रांगदा व उलूपी यांनीं मोठ्या विनयानें कुंती, द्रौपदी सुभद्रा आणि इतर पांडवस्त्रिया यांच्यापाशीं जाऊन त्यांना वंदन केलें. कुंतीनें त्यांना नानाप्रकारचीं रत्नें दिलीं व द्रौपदी, सुभद्रा आदिकरून इतर स्त्रियांनींहि तसेंच केलें. त्यांचा सर्वांनीं व विशेषतः कुंतीनें आदर केला व त्यांना उत्तम शृंगारलेल्या ठिकाणीं बसविलें. बभ्रुवाहनानें सर्वांचा सत्कार घेतल्यावर धृतराष्ट्राला तसेंच युधिष्ठिर, भीम इत्यादिकांना विनयानें नमस्कार केला. त्या सर्वांनीं त्याला प्रेमानें आलिंगन दिलें आणि आनंदित होऊन पुष्कळ

धनहि अर्पण केलें. मग कृष्णाकडे जाऊन बभ्रुवाहन नम्रतेनें त्याला नमस्कार करून जवळ उभा राहिला व कृष्णानें त्याला सोन्यानें मढविलेला दिव्य घोडे असलेला उत्तम रथ दिला व युधिष्ठिरादि बंधूंनींहि आपआपल्या परीनें त्याला अहेर केले.

( २ ) नंतर तिसऱ्या दिवशीं व्यासमुनि पुनः युधिष्ठिराकडे येऊन त्याला म्हणाले, 'राजा, आजपासून यज्ञाला आरंभ झाला. यज्ञाचा मुहूर्त येऊन ठेपला असून ऋत्विज् सूचना देऊं लागले. आतां प्रथम तुला अहीन नांवाचा सोमाच्या आहुती देऊन करावयाचा याग केला पाहिजे. त्यांत विपुल सुवर्ण द्यावयाचें असल्यामुळें त्याला काञ्चनयाग किंवा बहुसुवर्णकयाग म्हणतात. राजा, आणखी असें कर कीं तूं जी दक्षिणा द्यावयाचें ठरविलें आहेस, ती तिप्पट करून दे, म्हणजे तुला सर्व फळ तिप्पट मिळेल. तशी व्यवस्था ब्राह्मण करतील. अशा रीतीनें तुझ्या हातून मोठ्या दक्षिणेचे तीन अश्वमेध घडल्याप्रमाणें होऊन बांधववधाचें तुझ्या हातून घडलेलें पाप नष्ट होऊन जाईल. अश्वमेधानंतर करावयाचें अवभृथस्नान हें अत्यंत पवित्र व सर्वांना पवित्र करण्याचें फार उत्तम साधन आहे, त्याचाहि तुला लाभ होईल.' याप्रमाणें व्यासानें युधिष्ठिराला सुचविलें असतां, धर्मात्म्या युधिष्ठिरानें अश्वमेधाच्या सिद्धीसाठीं दीक्षा घेतली व योग्य क्रमानें सर्व इच्छा परिपूर्ण करणारा असा तो महायज्ञ अश्वमेध विपुल अन्नदान व दक्षिणादान करून पार पाडिला. वेदवेत्त्या ब्राह्मणांनीं निरनिराळीं कर्में वांटून घेऊन तीं केलीं. त्यांत त्यांच्या हातून कांहीं प्रमाद झाला नाहीं व कांहीं वगळलेंहि नाहीं. सर्व गोष्टी यथाक्रम त्यांनीं पार पाडिल्या. प्रवर्ग्य नांवाचा सोमयागाच्या आरंभींचा विधि, तसाच सोमवल्ली कुटण्याचा अभिषव विधि, हे यथाविधि केल्यावर सोमरस काढण्यांत आला व शास्त्रोक्त मार्गानें तिन्ही सवनें क्रमानें करण्यांत आलीं. त्या यज्ञांत कोणी दीन वा दरिद्री राहिलाच नाहीं. कोणी भुकेलेला, किंवा दुःखीहि राहिला नाहीं. युधिष्ठिराच्या आज्ञेवरून भीमसेन ज्याला ज्याला भोजन पाहिजे त्याला त्याला तें वाढीत होता. विटा रचून स्थंडिलें करण्याच्या कामीं कुशल असलेल्या याजक ब्राह्मणांनीं प्रतिदिवशीं लागतील तशीं स्थंडिलें नियमानुसार बनविलीं. युधिष्ठिराच्या त्या यज्ञांत वेद-वेदांगें माहीत नाहींत असा कोणीच सभासद नव्हता. तसाच स्वतः व्रताचरण न केलेला, उपाध्यायाचें काम ठाऊक नसलेला, वादविवादांत कुशल नाहीं, असाहि कोणी नव्हता.

( ३ ) यज्ञस्तंभ उभारण्याची वेळ झाली, तेव्हां सहा बेलाचे खांब, तितकेच खैराचे, तसेच पळसाचे खांब उभे करण्यांत आले. देवदार वृक्षाचे दोन यूप असून एक भोंकरीचा होता. त्याशिवाय शोभेसाठीं म्हणून दुसरे सोन्याचेहि अनेक यूप धर्माच्या सांगण्यावरून भीमानें उभारले. युधिष्ठिराचीं वस्त्रें त्यांवर फडकूं लागलीं, तेव्हां स्वर्गांत सप्तर्षींच्या सान्निध्यांत जसे इन्द्रादि देव शोभतात तसे ते यूप शोभूं लागले. स्थंडिलें रचण्यासाठीं विटा सोन्याच्या केलेल्या होत्या, त्यामुळें तीं दक्षप्रजापतीच्या यज्ञांतील स्थंडिलांप्रमाणें चमकत होतीं. तीं चौकोनी व अठरा हात लांब रुंद होतीं. सोन्याच्या बाजू असलेलें तीन कोनांचें गरुडाच्या आकाराचेंहि एक स्थंडिल केलेलें होतें. याप्रकारें स्थंडिलें व यूप सिद्ध झाल्यावर निरनिराळया देवतांना उद्देशून पशु व पक्षी यूपांना बांधण्यांत आले. शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें अज व जलचरप्राणी या सर्वांचा त्या अग्निचय कर्मांत उपयोग करण्यांत आला. युधिष्ठिराच्या त्या अश्वमेधांत तीस यूपांना तीस पशु बांधण्यांत आले. देव व ऋषि यांनींच भरून गेल्यासारखी ती यज्ञसभा शोभत होती. गवयांचें गाणें व नर्तिकांचें नृत्य हीं तींत नित्य चालू होतीं. किंपुरुष, किंनर इत्यादिकांचें प्रदर्शन तेथें मांडिलें असून सिद्ध व ब्राह्मण यांच्या रहाण्याच्या ठिकाणांनीं ती यज्ञसभा चोहोंकडून वेढिली होती. तेथें व्यासांचे शिष्य व शास्त्रें रचणारे आणि यज्ञकर्मप्रवीण असे श्रेष्ठ ब्राह्मण उपस्थित होते. नारद व तुंबरु हेहि यज्ञाला आले असून विश्वावसु, चित्रसेन, इत्यादि संगीतविद्याप्रवीण गंधर्व यज्ञकर्मे चाललीं असतां मधल्या वेळांत ब्राह्मणांचें मनोरंजन करीत असत. १४. २. ८८.

---

## अध्याय ८९ वा.

[ १. यज्ञसमाप्ति. २ ब्राह्मणांना दक्षिणादान. ३ पाहुणे राजांची आदरपूर्वक पाठवणी. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, यज्ञ चालू झाल्यावर प्रथम ब्राह्मणांनीं इतर पशू मारून त्यांना विधियुक्त शिजविल्यावर मग शास्त्रानुसार त्या घोड्याचा वध करवून विधीप्रमाणें तीन कर्मे करून द्रौपदीचा त्याच्याशीं संयोग करविला. मग त्याची वपा म्हणजे कातडी सोडवून ती ब्राह्मणांनीं नियमानुसार शिजविली, त्यावेळीं सर्व पापें नष्ट करणारा असा तिचा सुगंध हुंगण्याचा विधि युधि-

ष्ठिरानें सर्व बंधूंसह केला. घोड्याच्या शरीराचे जे इतर भाग राहिले, ते सर्व त्या ऋत्विजांनीं अग्नींत हवन केले. याप्रमाणें इन्द्रतुल्य अशा युधिष्ठिराचा यज्ञ परिसमाप्त करून भगवान् व्यासानें शिष्यांसह तेथें येऊन राजाला ऐश्वर्यवृद्धीचा आशीर्वाद दिला.

( २ ) मग युधिष्ठिरानें ब्राह्मणांना यथाविधि दक्षिणा देण्यास आरंभ केला. एक सहस्रकोटी निष्क ब्राह्मणांना देऊन त्यानें व्यासादि ऋत्विजांना पृथ्वीदान केलें. व्यासानें तिचा स्वीकार केला, पण ती धर्मराजाला परत देऊन म्हटलें, "राजा, मला हिच्या विनिमयांत द्रव्य दे म्हणजे झालें, कारण ब्राह्मणांना राज्यापेक्षां धनाचेंच महत्त्व असतें.' तें ऐकून धर्मराजानें उत्तर केलें, 'अश्वमेध महायज्ञांत पृथ्वी दक्षिणा द्यावी असें सांगितलें आहे; म्हणूनच अर्जुनानें जिंकिलेली ही पृथ्वी मीं ऋत्विजांना देऊन टाकिली आहे. आतां मी वनांत जाणार आहें, तरी हे श्रेष्ठ ब्राह्मणहो, ही तुम्ही आपसांत वांटून घ्या. चार होत्रांच्या अनुरोधानें तिचे चार भाग करून मीं ती देऊन टाकिली असतां, ती आतां मी परत कशी घेऊं ? ती आतां ब्राह्मणांची झाली आहे, असें माझें व माझ्या बंधूंचें मत आहे.' युधिष्ठिराच्या या म्हणण्याला द्रौपदीसह सर्व पांडवांनीं दुजोरा दिला आणि त्यामुळें तो प्रसंग मोठा रोमांचकारी झाला. 'उत्तम, उत्तम' असा शब्द आकाशांतून उठला; ब्राह्मण पांडवांची स्तुति करूं लागले. मग व्यास पुनः युधिष्ठिराचा बहुमान करून म्हणाला, 'युधिष्ठिरा, तूं जशी ही पृथ्वी मला दिली, तशी मी आतां तुला देत आहें. तरी तूं आतां या ब्राह्मणांना तिच्या विनिमयांत सोनें दे आणि पृथ्वी आपल्याजवळ ठेवून घे.' व्यासाच्या या म्हणण्याला पुष्टि दिल्यावर युधिष्ठिरानें संतुष्ट होऊन यज्ञाप्रीत्यर्थ तीनतीन कोटी द्रव्य त्या ऋत्विजांना दिलें ! दुसऱ्या कोणा राजाला ही गोष्ट करणें शक्य होणार नाहीं. मरुत्ताचें अनुकरण करून कुरुराज युधिष्ठिरानेंच ती केली. असो. मग व्यासानें तें द्रव्य घेऊन त्याचे चार भाग केले व ते ऋत्विजांना दिले. अशा रीतीनें पृथ्वीचें मोल देऊन युधिष्ठिर राजा निष्पाप झाला व स्वर्ग जिंकून बंधूंसह हर्षभरित झाला. ऋत्विजांना ती अमूप दक्षिणा मिळाल्यावर त्यांनींहि ती पुनः मोठ्या उत्साहानें ब्राह्मणांना वांटून दिली. यज्ञमंडपांतील जें साहित्य, भांडीं-कुंडीं, सोनेंनाणें, विटा, तोरणें इत्यादि होतें, तेंहि सर्व युधिष्ठिराच्या संमतीनें ब्राह्मणांनीं आपसांत वांटून घेतलें. त्यानंतर उरलेले पदार्थ व द्रव्य क्षत्रिय, वैश्य, शूद्र तशाच इतर म्लेच्छ जाती यांनीं घेतलें. सर्व ब्राह्मण आनंदित होऊन आप-

आपल्या घरीं गेले. अशा रीतीनें धर्मराजानें साऱ्या पृथ्वीला संतुष्ट केलें. व्यासाला मिळालेलें द्रव्य त्यानें कुंतीला बहुमानपूर्वक देऊन टाकिलें, तेव्हां श्वशुरापासून प्रेमानें मिळालेलें तें द्रव्य कुंतीनें संतोषानें घेतलें आणि पुण्यकर्मैं करण्यांत त्याचा व्यय केला. अशा रीतीनें निष्पाप होऊन युधिष्ठिर राजा बंधूंसह अवभृथ स्नानाला गेला.

( ३ ) नंतर सर्वजण त्याचें अभिनंदन करूं लागले असतां देवांमध्यें जसा इन्द्र तसा तो राजमंडळांत शोभूं लागला. तारागणांच्या परिवारांत जसे ग्रह तसे सर्व पांडवहि त्या राजांच्या परिवारांत शोभत होते. त्या सर्व राजांना मग युधिष्ठिरानें विविध रत्नें अर्पण केलीं. कोणाला अश्व, कोणाला हत्ती, कोणाला अलंकार, कोणाला दासी, तर कोणाला उंची वस्त्रें व कोणाला द्रव्य अशा रीतीनें त्यानें प्रत्येकाला कांहीं तरी देऊन कुबेराप्रमाणें आपलें वैभव प्रकट केलें. बभ्रुवाहन राजालाहि त्यानें जवळ बोलावून विपुल द्रव्य दिलें आणि त्याची त्याच्या घरीं पाठवणी केली. त्याचप्रमाणें दुःशलेचें प्रिय करण्यासाठीं त्यानें प्रेमानें तिच्या लहान नातवाला त्याच्या सिंहासनावर बसविलें. नंतर सर्व राजे लोकांचा वेगवेगळा बहुमान करून त्यांची युधिष्ठिरानें पाठवणी केली. श्रीकृष्ण, बळराम व प्रद्युम्नादि सहस्रावधि वीर यांनाहि त्यानें बहुमानपूर्वक घरीं पाठविलें. याप्रमाणें युधिष्ठिराचा अश्वमेध यज्ञ पार पडला. अन्न, धन व रत्नें यांचे त्यांत पाट वहात होते. मद्य, आसवें यांचे तर समुद्र पसरले होते. तुपाचे त्यांत डोह पडले असून अन्नाचे पर्वत उभारलेले होते. नानाप्रकारचीं पक्वान्नें करणारे व त्यांचा उपभोग घेणारे सहस्रावधि लोक तेथें जमले होते व किती पशूंचा वध त्यांत झाला, याची तर गणतीच नाहीं. जिकडे तिकडे लोक त्यांत तर्र होऊन पडलेले असत, स्त्रिया हर्षभरित होऊन जात व मृदंगादि वाद्यांचा दणदणाट सारखा चाललेला असे; त्यामुळें त्याला अत्यंत शोभा आली होती. रात्रंदिवस तेथें दान व भोजन यांचा धडाका चालू होता. अनेक देशींचे लोक तेथें आलेले असून 'फारच मोठा यज्ञसमारंभ झाला; सारेजण आनंदित व संतुष्ट होऊन गेले;' असें ते बोलत. द्रव्यराशींचा, इष्ट वस्तूंचा, रत्नांचा व खाद्यपेयांचा अशा रीतीनें वर्षाव करून निष्पाप झालेला व धन्यता मिळविलेला युधिष्ठिर राजा पुनः नगरांत परत आला. १४.२.८९.

---

## अध्याय ९० वा.

[ १. अर्धें शरीर सोन्याचें असलेल्या नकुळाची कथा. ]

( १ ) **जनमेजय**—मुने, माझे पंजोबा जे धर्मराज युधिष्ठिर त्यांच्या यज्ञांत जर कांहीं आश्चर्याची गोष्ट घडून आली असेल, तर ती मला कृपा करून सांगा.

**वैशंपायन**—राजा, अश्वमेध महायज्ञ समाप्त झाल्यावर जें एक मोठें आश्चर्य घडून आलें तें सांगतों ऐक. त्या यज्ञांत मोठे ब्राह्मण, ज्ञातिबांधव, नातेवाईक, दीनदुबळे, संकटग्रस्त अशा सर्वांना तृप्त करण्यांत आलें. त्यामुळें युधिष्ठिराच्या महादानाच्या स्तुतीचा घोष सर्वत्र चालला असून, त्याच्या मस्तकावर जिकडे तिकडे पुष्पवृष्टि होत होती. इतक्यांत काळ्या डोळ्यांचा व अर्धें शरीर सुवर्णाचें असलेला एक मुंगूस तेथें आला व विद्युत्पातासारखा मोठा शब्द करून पशुपक्ष्यांना घाबरवीत मोठ्या धिटाईनें माणसासारखें बोलूं लागला. तो म्हणाला, ' हे राजेहो, तुमचा हा यज्ञ कुरुक्षेत्रवासी उंच्छवृत्ति उदार ब्राह्मणाच्या मापटेंभर सातूच्या मोलाचाहि झालेला नाहीं. ' राजा, त्या मुंगुसाचें तें म्हणणें ऐकून युधिष्ठिराच्या राजसभेंतील सारे ते मोठमोठे ब्राह्मण आश्चर्यचकित होऊन गेले. ते सारे मुंगुसाच्या भोंवतीं जमले व त्याला विचारूं लागले, ' नकुला, सज्जनांचा मेळा जमलेल्या या पवित्र यज्ञस्थळीं तूं कोठून आलास ? तुझें बल काय आहे ? तुझें ज्ञान किती आहे ? तुला श्रेष्ठ तरी काय वाटतें ? आमच्या या यज्ञाची निंदा करणारा तूं कोण आहेस असें आम्हीं समजावें ? कोणतीहि शास्त्रविहित गोष्ट न गाळतां आम्हीं हा यज्ञ सर्व अंगांनीं विधियुक्त पार पाडला आहे. युधिष्ठिरानें सन्मान्य पुरुषांचा सन्मान केला, मंत्रयुक्त आहुति अग्नीला दिल्या, जें दान केलें तें निर्मत्सर बुद्धीनें केलें व अनेकविध दानांनीं ब्राह्मणांना संतुष्ट केलें. धर्मयुद्धें करून राजांना संतुष्ट करण्यांत आलें, श्राद्धांनीं पितरांची तृप्ति झाली, योग्य रीतीनें पालन झाल्यामुळें प्रजा संतुष्ट झाल्या व उत्तम श्रेष्ठ स्त्रियांना त्यानें त्यांच्या मनीषा पुरवून संतोषविलें. शूद्रांवर दया करून व सामान्य लोकांना हव्या त्या वस्तूंचें दान करून त्यानें संतोष दिला असून त्याच्या पवित्र आचरणानें त्याचे ज्ञातिबांधव संतुष्ट झाले आहेत. त्याच्या हविर्दानानें देव संतुष्ट झाले असून रक्षण केल्यामुळें शरणागत लोक संतुष्ट झाले आहेत. असें असतां तुला या यज्ञांत श्रुतिविरुद्ध असें काय आढळून आलें तें या ब्राह्मणांसमक्ष खरें खरें सांग. तूं मोठा सुज्ञ दिसत असून, तुझें स्वरूप दिव्य आहे व त्यामुळें तुझें म्हणणें

विश्वास ठेवण्यास पात्र वाटतें. त्या ब्राह्मणाशीं तुझी संगत झाली आहे, तरी जें खरें असेल तें सांगण्यास कांकूं करूं नको.'

ब्राह्मणांचें हें भाषण ऐकून मुंगूस हंसत हंसत म्हणाला, 'ब्राह्मणहो, मी जें बोललों तें कांहीं तरी असत्य किंवा केवळ अभिमानानें प्रेरित होऊन बोललों असें नाहीं. मापटेंभर सातूच्याहि मोलाचा हा यज्ञ झाला नाहीं असें जें मी मघाशीं बोललों तें बोलणें मला अवश्यच वाटलें. ब्राह्मणहो, स्वतः पाहून अनुभवलेला तो कुरुक्षेत्रवासी उंच्छवृत्ति उदार ब्राह्मणाचा अद्भुत वृत्तान्त मी आतां तुम्हांला यथास्थित सांगतों तो एकून घ्या. त्यामुळें तो ब्राह्मण पुत्र स्नुषा व पत्नी यांसह स्वर्गीं गेला आणि त्यामुळेंच हें माझें अर्धें शरीर सोन्याचें झालें. ब्राह्मणानें न्यायानें मिळविलेल्या अल्प द्रव्याच्या दानाचें उत्तम फल कसें असतें तें पहा. अनेक धर्मज्ञ पुरुष ज्यांत वास करतात अशा त्या धर्मभूमी बनलेल्या कुरुक्षेत्रांत कबूतराप्रमाणें एक एक कण धान्य शेतांतून वेंचून आणून त्यावर निर्वाह करणारा असा एक ब्राह्मण रहात होता. तो तपोविष्ठ असून त्याची पत्नी, पुत्र व सून इतकीं त्याच्या कुटुंबांत माणसें होतीं. त्याचें वर्तन अगदीं शुद्ध असून तो मोठा आत्मसंयमी होता. तो सामान्यतः सहा वेळांतून आपल्या कुटुंबासह एक वेळ जेवत असे, पण तेंहि त्याला केव्हां केव्हां मिळत नसे व त्यावेळीं तो ब्राह्मण आणखी सहा वेळा ढकलून पुढें जेवण करी.

'ब्राह्मणहो, एकदां असें झालें कीं, भयंकर दुष्काळामुळें त्या धर्मिष्ठ ब्राह्मणापाशीं धान्यसंग्रह मुळींच राहिला नाहीं. झाडपालाहि सारा सुकून वाळून गेला. त्याजवळ द्रव्य तर मुळींच नव्हतें. एक एक दिवस यावा व अन्न मात्र मिळूं नये असें होऊन तीं सारीं माणसें भुकेनें आगदीं व्याकुळ होऊन गेलीं. तो तपस्वी ब्राह्मण शुक्लपक्षांत मध्याह्नीचा सूर्य तळपत असतां उन्हानें तापत व पोटांतील आग सहन करीत शेतांत दाणे टिपावयास जाई, पण पुष्कळ श्रम करूनहि त्याला फारसे दाणे मिळत नसत. तरी तो आपल्या कुटुंबीयांसह तसाच काळ कंठीत राहिला. एक दिवस त्याला तिसऱ्या प्रहरानंतर एक प्रस्थभर भाताचे दाणे मिळाले असतां त्या दीन माणसांनीं त्यांचे सडून तांदूळ केले आणि जपादि आह्निक आटोपल्यावर भात शिजवून अग्नीला विधियुक्त आहुति दिली. मग त्याचे एकेकाला एकेक कुडव* असे भाग करून तीं जेवावयास बसणार, इतक्यांत तेथें एक अतिथि येऊन ठेपला. अतिथि आला

* बारा मुठी किंवा पावशेर

असें पाहून त्यांना मोठा आनंद झाला. त्यांनीं त्याला कुशल प्रश्न विचारून नमस्कार केला आणि आपलें नांव व गोत्र त्याला सांगून आणि त्याचें विचारून घेऊन त्या भुकेलेल्या अतिथीला घरांत नेलें. तीं माणसें शुद्धमनाचीं, निर्मत्सरी, श्रद्धाळू, शांत वृत्तीचीं, निगर्वी, धर्म जाणणारीं व कनवाळु स्वभावाचीं होतीं. त्यांनीं अतिथीला पाय धुण्यास पाणी, बसावयास दर्भाचें आसन व अर्घ्य दिलें आणि नित्यनियमानुसार मिळविलेल्या तांदुळांचा तो भात वाढून त्यांचें पान वाढलें. 'आतां भोजन करा' असें त्यांनीं सांगितल्यावर तो अतिथि जेवावयास लागला व एक कुडव अन्न त्यानें भक्षिलें. पण तेवढ्यानें त्याची तृप्ति झाली नाहीं असें पाहून उंच्छवृत्ति ब्राह्मणानें 'आतां याचें समाधान कसें करावें' असा विचार मनांत चालविला. तेव्हां त्याची पत्नी म्हणाली, "माझ्या वांट्याचें अन्न त्याला द्यावें. हा ब्राह्मण आपल्याकडून तृप्त होऊनच गेला पाहिजे.' ती असें म्हणाली खरी, पण ती भुकेनें व्याकुळ झालेली आहे असें त्याला ठाऊक असल्यामुळें तिचें म्हणणें त्याला मानवलें नाहीं. 'आपल्यावरून जग ओळखावें' या न्यायानें क्षुधेनें व्याकुळ झालें असतां मनुष्याची स्थिति काय होते हें त्याला माहीत होतें. तेव्हां थकून ग्लानि आलेल्या व कातडींत गुंडाळलेला अस्थिपंजरच जणूं अशा दिसणाऱ्या त्या आपल्या कांपत असलेल्या भार्येला तो म्हणाला, "हे भार्ये, कीट-पतंगादि प्राणीहि आपल्या स्त्रियांना रक्षणीय समजून त्यांचें पोषण करतात. तरी तूं असें बोलूं नकोस. स्त्रीकडून पोषिलेला व रक्षिलेला पुरुष दुष्कीर्तीचा धनी होऊन उत्तम लोकांना मुकतो. धर्म, अर्थ, काम आणि संततीची शुश्रूषा हीं कामें केवळ स्त्रियांमुळेंच साध्य होतात. भार्येला पोसण्यास असमर्थ असा पुरुष दुष्कीर्ति मिळून नरकास जातो."

'पतीचें भाषण ऐकून ब्राह्मणी म्हणाली, "अहो, आपण दोघें धर्म आणि अर्थ यांचीं सारखींच वांटेकरी नाहीं काय? तरी कृपाकरून हा माझा वाटा घ्या आणि अतिथीला तृप्त करा. रति, धर्म आणि धर्मानें मिळणारा स्वर्ग हीं स्त्रियांना पतीच्या द्वाराच मिळतात. त्यांना पतिच मोठें दैवत असून त्याच्याच कृपेनें रति व पुत्ररूपी फल हीं प्राप्त होतात. आपण माझें पालन करतां म्हणून माझे पति व भरण म्हणजे पोषण करतां म्हणून भर्ता आहां. आपण मला पुत्र देऊन वर दिला आहे. तरी हा भाताचा वांटा घ्यां. कारण आपणहि वृद्ध, भुकेलेले, दुर्बळ, उपासानें कृश झालेले व थकेलेले आहां.' स्त्रीनें असें सांगितलें असतां उंच्छवृत्तीनें तिचा वांटा घेऊन त्यानें तो अतिथीला दिला आणि तो खावयास त्याला

सांगितलें. अतिथीनें तो वांटा भक्षिला, तरी त्याची तृप्ति झाली नाहीं. तेव्हां उंञ्छवृत्तीला पुनः काळजी उत्पन्न झाली कीं, आतां या अतिथीचें समाधान कसें करावें? त्यावेळीं त्यांच्यांत आपसांत संवाद झाला तो असा:—

**पुत्र**—बाबा, हा माझा वांटा घ्या आणि अतिथीला द्या. असें करणें मोठें पुण्य आहे. तरी तसें मला करूं द्या. कसेंहि करून आम्हीं आपलें रक्षण करणेंच युक्त आहे. वृद्ध पित्याचें रक्षण करावें अशीच सर्व सज्जनांची मनीषा असते. पित्याचें वार्धक्यांत रक्षण करणें हें पुत्राचें ध्येय श्रुतीनें सांगितलें आहे व तें सर्वत्र प्रसिद्ध आहे. तुम्हीं जीवंत राहिलां तरच तप करूं शकाल. प्राणधारण करणें हा प्राण्यांचा श्रेष्ठ धर्मच आहे.

**ब्राह्मण**—बाळा, तूं सहस्र वर्षांचा मोठा झालास तरी मला लहानच आहेस. पुत्राला जन्म देऊनच पिता कृतार्थ होतो. मुलांची भूक किती प्रखर असते तें मला माहीत आहे. अरे बाळा, मी कसातरी प्राण जगवीन, पण तूं बलवान हो. अरे, आतां मी जीर्ण नाहीं का झालों? आतां मला कसली आली आहे भूक? मीं दीर्घ काळ तपश्चर्या केल्यामुळें माझें मरणाचें भय नष्ट झालें आहे.

**पुत्र**—बाबा, मी तुमचा पुत्र ना? पुरुषाचें म्हणजे पित्याचें रक्षण करतो म्हणून पुत्राला पुत्र म्हणतात. पुत्र म्हणजे आपण स्वतःच असेंहि म्हटलें आहे. तरी आतां पुत्ररूपानें तुम्हीच आपलें रक्षण करा.

**पिता**—बाळा, रूपानें, शीलानें व इंद्रियदमनानें तूं माझ्यासारखाच आहेस. तुझी अनेक प्रकारें मीं परीक्षा घेतली; आतां तुझा वांटा मी अतिथीला देतों.

असें म्हणून संतुष्ट झालेल्या उंच्छवृत्तीनें मुलाचा वांटा घेतला व हंसत हंसत त्या अतिथीला दिला. पण तो खाऊनहि त्याची तृप्ति झाली नाहीं. तेव्हां उंच्छ-वृत्तीला आतां काय करावें असें वाटून लाज उत्पन्न झाली. तेव्हां त्याची साध्वी सून आपला वांटा त्याच्यापुढें करून म्हणाली, "अहो, तुमच्या पुत्रापासून जर मला पुत्रप्राप्ति व्हावयाची आहे, तर हा माझा वांटा घेऊन अतिथीला द्या. तुमच्या कृपेनें माझी अक्षय लोकांची प्राप्ति निश्चित झाली आहे. ज्या लोकीं गेलें असतां शोक करण्याचा प्रसंग येत नाहीं, ते लोक पुत्राच्या योगानेंच मिळत असतात. जसा धर्म तीन प्रकारचा, अग्नि जसा तीन प्रकारचा, तसा

पुत्रपौत्रांमुळें मिळणारा अक्षय स्वर्गहि तीन प्रकारचा आहे. पित्याला ऋणांतून तारतो म्हणून पुत्राला पुत्र म्हणतात असें आम्हीं ऐकत आलों असून पुत्रपौत्रांच्या योगानेंच उत्तम लोकांची प्राप्ति होते. ''

ब्राह्मण—सूनबाई, वारा व ऊन यांनीं जर्जर झालेलें तुझें हें फिकट व कृश शरीर पाहून व तूं क्षुधेनें व्याकुळ झालेली असतां मीं तुझा वांटा कसा घेऊं बरें? तसें केल्यानें माझ्या हातून धर्मघात होणार नाहीं काय? तरी, बाळे, तूं असें बोलूं नको. तुझ्यासारख्या व्रतनिष्ठ व शुद्धशील मुलीला तिसऱ्या प्रहरींहि अन्नावांचून राहिलेली पहाणें माझ्याकडून कसें होईल बरें? आधींच तूं लहान, त्यांतून स्त्रीजाति. तुझें रक्षण करणें हें माझें नित्य कर्तव्य आहे. कुटुंबाला समाधान देणारी तूं उपासानें थकून गेलेली आहेस.

सून—महाराज, माझ्या गुरूचे गुरु आणि दैवताचें दैवत आपण आहां. तरी माझा हा वांटा आपण घ्यावा. गुरूच्या शुश्रूषेसाठींच ना हा देह, प्राण आणि धर्म मला मिळाला आहे? तुमच्या कृपेनें मला उत्तम शुभ लोकांची प्राप्ति होणार आहे. तरी मी रक्षण करण्यास पात्र म्हणून म्हणा, कीं आपल्याविषयींच्या माझ्या भक्तीमुळें म्हणा, अथवा माझ्या मनाची परीक्षा करण्यासाठीं आपण बोलतां म्हणून म्हणा, पण हा माझा वांटा आपण घ्याच.

ब्राह्मण—मुली, या तुझ्या शीलानें व आचरणानें तूं फारच शोभून दिसतेस. तूं धर्मशील व व्रतशील असून वडिलांचें अनुकरण करूं इच्छितेस; यास्तव तुझा वांटा मी घेतों. एकंदर विचार करतां तुझी निराशा करणें युक्त नाहीं.

नकुल म्हणतो, ' ब्राह्मण हो, मग ब्राह्मणानें तो सुनेचा वांटा घेऊन अतिथीला दिला. तेव्हां मात्र त्या महात्म्या साधु ब्राह्मणावर अतिथि संतुष्ट झाला आणि आनंदानें त्याला म्हणाला, 'अगदीं न्यायानें व धर्मानें मिळविलेल्या या शुद्ध दानानें मी संतुष्ट झालों आहें. ब्राह्मणा, तुझ्या दानाचा महिमा स्वर्गांत देव गात असून, ही आकाशांतून पुष्पवृष्टि पहा तुझ्यावर पडत आहे. तुझ्या या दानानें देव, ऋषि, गंधर्व व देवदूत चकित होऊन गेले आहेत. ब्रह्मलोकीं वावरणारे ते ब्रह्मर्षि पहा विमानांतून तुजकडे पहात आहेत. तूं आतां स्वर्गी जा. पितृलोकीं गेलेल्या आपल्या सर्व पितरांचा तूं उद्धार केला आहेस. ब्रह्मचर्य, दान, यज्ञ, तप व निर्मळ धर्म यांच्या बळानें, अनेक युगें पितृलोकीं न गेलेल्या पितरांचाहि तुझ्या हातून उद्धार झाला आहे. तूं मोठ्या श्रद्धेनें तपश्चरण केलें

असल्यामुळें तूं आतां स्वर्गास जा. तूं अगदीं निर्मळ अंतःकरणानें अतिबिकट प्रसंगीं दान केलें आहेस व त्यामुळें देव संतुष्ट झाले आहेत. तूं स्वर्गलोक आपल्या पुण्यानें जिंकिलास खरा. अरे, भूक ही खरें म्हटलें तर मति गुंग करते व धर्मबुद्धि लोपविते. भुकेनें ज्ञान नष्ट होऊन मनुष्याचें धैर्य खचून जातें. अशा भुकेला जो जिंकतो तो सहजच स्वर्ग जिंकतो. दानाची आवड उत्पन्न झाली म्हणजे धर्माचा ऱ्हास कधीं होत नाहीं. पुत्रप्रेम, स्त्रीप्रेम इत्यादिकांचा मुळींहि विचार न करतां केवळ धर्माला श्रेष्ठ मानून तूं भूक-तहान बाजूला सारिलीस. द्रव्यप्राप्ति ही मनुष्याला इष्ट आहे, पण सत्पात्रीं दान हें त्याहून श्रेष्ठ होय. योग्यकाळ हा नुसत्या दानाहून उच्च असून श्रद्धा तर सर्वांत श्रेष्ठ होय. स्वर्गाचें द्वार अत्यंत सूक्ष्म असून मोहामुळें तें माणसांना दिसत नाहीं. लोभ हा स्वर्गाच्या द्वाराचा अडसर असून आसक्तीमुळें तो जखडून गेलेला असतो व त्यामुळें तो दूर करणें कठीण असतें. ज्यांनीं इंद्रियांना व क्रोधाला जिंकिलें असे पुरुष आणि तपोनिष्ठ, यथाशक्ति दान देणारे ब्राह्मण तें सूक्ष्म स्वर्गद्वार पाहूं शकतात. सहस्र आपल्यापाशीं असतां जो त्यांतील शंभर देतो, शंभर जवळ असतां तो दहा देतो, किंवा जो आपल्या शक्तीप्रमाणें नुसतें पाणी देतो, ते सर्व सारख्याच फलाचे वाटेकरी होतात. उदाहरणार्थ, रंतिदेव राजा अगदीं निष्कांचन झाला, तेव्हां त्यानें शुद्धमनानें केवळ पाणी दिलें व तेणेंकरून तो स्वर्गलोकीं गेला. मोठमोठीं दानें दिल्यानें धर्माला संतोष होत नाहीं; तर न्यायानें मिळविलेलें धन श्रद्धेनें पवित्र करून देण्यानेंच तो संतुष्ट होतो. नृगराजानें सहस्रावधि गाई ब्राह्मणांना दिल्या. पण त्यांत एक परक्याचीच गाय दिली. म्हणून त्याला नरकांत जावें लागलें. उशीनराचा पुत्र शिबि स्वतःच्या शरीराचें मांस तोडून दिल्यामुळें पुण्यलोकीं जाऊन स्वर्गांत आनंद भोगीत आहे. नुसतें वैभव हें पवित्र नसून आपल्या स्वतःच्या सामर्थ्यानें मिळविलेल्या धनानेंच सज्जनांना बरें वाटतें. म्हणून न्यायबुद्धीनें मिळविलेल्या विविध धनाचेंच दान करावें. क्रोधानें दान केलें असतां दात्याचा तें घात करतें व उलट लोभानें तें केलें असल्यास देणाराला स्वर्ग मिळत नाहीं. न्यायानें वागून दान देणाराच आपल्या तपानें स्वर्ग भोगतो. तेव्हां, हे ब्राह्मणा, तुला जें फळ मिळालें आहे त्याची बरोबरी विपुल दक्षणा देऊन केलेले अनेक अश्वमेध किंवा राजसूय यांनाहि येणार नाहीं. मापटेंभर तांदुळांच्या दानानें तूं अक्षय असा ब्रह्म लोक मिळविला आहेस. तरी आतां निष्पाप होऊन तूं ब्रह्मलोकीं जा. तें पहा तुम्हां सर्वांसाठीं दिव्य विमान आलें आहे.

आतां तुम्ही त्यांत इच्छेप्रमाणें बसा. ब्राह्मणा, पहा, मी धर्म आहें. तूं आपल्या देहाचें सार्थक्य केलें असून तुझी कीर्ति लोकांत अक्षय स्थिर राहील. आतां तूं पत्नी, पत्र व सून यांसह स्वर्गीं जा !

अतिथिरूप धर्मानें उंच्छवृत्तीला असें सांगितलें असतां विमानावर आरूढ होऊन तो पत्नी, पुत्र व सून यांसह स्वर्गास गेला. ( मुंगूस म्हणतो ) ब्राह्मण हो, असा तो धर्मज्ञ ब्राह्मण सर्व कुटुंबासहित स्वर्गीं गेलेला पाहून मी आपल्या बिळांतून बाहेर आलों. मग तेथें त्या ब्राह्मणाच्या त्या सातूंचा वास लागलेल्या चिखलट पाण्यांत व चेंगरलेल्या दिव्य फुलांत लोळल्यामुळें माझें मस्तक सुवर्णमय झालें. त्या सत्यवचनी ब्राह्मणाच्या सातूच्या दानानें माझें अर्धें शरीरहि सोन्याचें झालें. पहा हा त्या ब्राह्मणाच्या तपाचा प्रभाव ! त्यानंतर माझें उरलेलें अर्धें अंग सोन्याचें कसें होईल याचा मी विचार करूं लागलों व त्यासाठीं मी मोठ्या आनंदानें तपोवनें व यज्ञस्थानें पहात भटकत आहें. कुरुराज युधिष्ठिराचा अश्वमेध महायज्ञ चालला आहे असें ऐकून मोठ्या आशेनें मी येथें आलों, पण माझें उरलेलें अर्धें शरीर कांहीं सोन्याचें झालें नाहीं. यास्तव मी तें वाक्य हंसत हंसत उच्चारिलें. खरोखर तुमचा हा यज्ञ त्या मापटेंभर सातूंच्या जोडीला बसण्यासारखा नाहींच. कारण त्या मापटेंभर सातूंच्या उरलेल्या अंशानें माझें अंग सोन्याचें झालें. म्हणून मला हा यज्ञ त्या सातूंच्या योग्यतेचा वाटत नाहीं.'

राजा, त्या सर्व ब्राह्मणांना असें सांगून तो मुंगूस त्यांना एकाएकीं दिसेनासा झाला व ते ब्राह्मणहि आपल्या घरीं निघून गेले. युधिष्ठिराच्या अश्वमेधप्रसंगीं घडलेल्या आश्चर्यकारक गोष्टीचा असा हा वृत्तांत आहे. पण, राजा, तुला त्या यज्ञाविषयीं तसें आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. कारण कोट्यवधि ऋषि यज्ञरूप तपानेंच स्वर्गास गेले. तात्पर्य एवढेंच कीं, सर्व प्राण्यांवर प्रेम, संतोषवृत्ति, उत्तम शील, सरळपणा, तप, इन्द्रियदमन, सत्य आणि दान हीं सारीं सारख्याच योग्यतेचीं होत. १४. २. ९०.

## अध्याय ९१ वा.

[ १. मुंगुसानें धर्मराजाच्या यज्ञाची निन्दा कां केली, याचें स्पष्टीकरण. २ हिंसेवरील आक्षेप. ३ हिंसा व अहिंसा याविषयींचा वसूचा निर्णय व त्यामुळें त्याचें रसातळीं पतन. ४ अहिंसात्मक धर्माची प्रशंसा. ]

( १ ) **जनमेजय**—मुने, राजे यज्ञांत गढलेले असतात, महर्षि तपांत दंग झालेले असतात व ब्राह्मण शांति धारण करतात; कारण शांतीच्या योगें इन्द्रियदमन होतें. तेव्हां मला तर निःसंशय असें दिसतें कीं, यज्ञासारखें फल दुसऱ्या कशानेंहि मिळत नाहीं. यज्ञ करून अनेक राजे आणि मोठेमोठे ब्राह्मण इहलोकीं मोठी कीर्ति मिळवून मरणोत्तर स्वर्गाला गेले. देवराज इन्द्राला तरी विपुल दक्षिणा देऊन केलेल्या यज्ञामुळेंच देवांचें राज्य मिळालें. असें असतां ज्यावेळीं इंन्द्रतुल्य युधिष्ठिरानें भीम आणि अर्जुन यांच्या साहाय्यानें अश्वमेध महायज्ञ केला, तेव्हां त्या महात्म्याच्या त्या यज्ञाची त्या मुंगुसानें निन्दा कां म्हणून केली बरें ?

( २ ) **वैशंपायन**—राजा, यज्ञाचा मूळविधि व त्याचें फळ हीं मी सांगतों तीं ऐक. पूर्वी इन्द्र यज्ञ करूं लागला असतां ऋत्विज् आपआपल्या कामांत दंग झाले व यज्ञाचा पसारा मांडला; अग्नीचें आव्हान चालू झालें. होत्रविधि यथास्थित झाला; देवांना निमंत्रण होऊं लागलें, मोठमोठे ऋषि आपआपल्या स्थानीं बसले, आपल्या वेदमंत्राच्या सुस्वर शब्दांनीं ब्राह्मण आनंदित झाले, निरलसपणें व कौशल्यानें श्रेष्ठ अध्वर्यु आपलीं कामें करूं लागले, पशुबंधन होऊन त्यांचा वध करण्याची वेळ आली. त्यावेळीं महर्षींच्या मनांत कृपेचा उमाळा आला आणि त्या दीनपशूंकडे पाहून ते तपोधन इन्द्राकडे जाऊन त्याला म्हणाले, ' हा यज्ञाचा प्रकार चांगला नाहीं. तुला मोठा धर्म व्हावा असें वाटतें खरें, पण हा प्रकार अज्ञानाचा आहे. इन्द्रा, यज्ञामध्यें पशुगणांचा वध शास्त्रांत सांगितलेला नाहीं. म्हणून तुझा यज्ञसमारंभ धर्माचा उच्छेद करणाराच आहे. हा यज्ञ धर्मप्रधान नाहीं, हिंसेला कोणी धर्म म्हणत नाहीं. यास्तव तुला यज्ञाची इच्छा असेल तर तो शास्त्राला अनुसरून होऊं दे. शास्त्रानुसारी यज्ञानेंच धर्माचें मोठें फल तुला प्राप्त होईल. इंद्रा, तीन वर्षें ठेविलेल्या धान्यानेंच यज्ञ करावा. हाच मोठा धर्म असून त्यापासून मोठें फल मिळतें. '

( ३ ) तत्त्वदर्शी ऋषींचें तें भाषण अभिमानानें मोहित झालेल्या इंद्राला

मानवलें नाहीं; तेव्हां त्या यज्ञप्रसंगीं त्या तपस्वी ऋषींमध्यें फार मोठा वाद झाला, आणि यज्ञ करावयाचा तो जंगम म्हणजे सजीव प्राण्यांनीं करावा की स्थावर म्हणजे धान्यांनीं करावा या प्रश्नाची मोठी चर्चा झाली. तत्त्वदर्शी ऋषि वाद करून कंटाळले व शेवटीं तो मिटवून इन्द्राशीं तडजोड करावी म्हणून त्यांनीं तो प्रश्न वसु राजाकडे निर्णयासाठीं नेला. ते वसूला म्हणाले, 'राजश्रेष्ठा आम्हांला धर्माच्या बाबतींत मोठा संशय उत्पन्न झाला आहे व तूं महाबुद्धिमान आहेस. तरी यज्ञासंबंधानें खरें शास्त्र काय आहे तें आम्हाला सांग. मुख्यत पशूंनीं यज्ञ करावा कीं धान्यादि बीजें व तूप, दूध इत्यादि रस यांनीं करावा ?' ब्राह्मणांचा हा प्रश्न ऐकून वसूनें शास्त्रवचनांच्या बलाबलाचा नीटसा विचार न करतां सांगून टाकिलें कीं 'जे पदार्थ जवळ असतील त्यांनींच यज्ञ करणें योग्य होय.' पण हें चेदिराज वसूचें उत्तर धरसोडीचें व म्हणून असत्य असल्यामुळें तें देतांच तो नरकांत जाऊन पडला. यास्तव एका स्वयंभू ब्रह्मदेवावांचून दुसऱ्या कोणीहि, मग तो कितीहि ज्ञानी असो, धर्मसंशयाच्या प्रसंगीं एकट्यानें निर्णय देऊं नये. तसा निर्णय दिल्यास अशुद्ध बुद्धीनें व पापानें दिलेलीं दानें मोठी असतांहि तीं निष्फळ होतात. अशा अधर्ममार्गानें चाललेल्या दुरात्म्या हिंसकाच्या दानानें त्याला या लोकीं आणि परलोकीं सुद्धां कीर्ति मिळत नाहीं. अन्यायानें मिळविलेलें द्रव्य घेऊनच जो अज्ञानी मनुष्य धर्म होईल या आशेनें वारंवार यज्ञ करतो, त्याला अर्थात् धर्मफल मिळत नाहीं. जो पापी नराधम लोकांत विश्वास उत्पन्न करण्यासाठीं दान देतो, तो धर्माचा घात करणारा होय. निरंकुशपणें वागून पापकर्मानें द्रव्य मिळविणारा ब्राह्मण लोभ व मोह यांच्यामुळें शेवटीं दुर्गतीस जातो. एकदां संचयाची बुद्धि झाली म्हणजे मनुष्य लोभ व मोह यांच्या तावडींत सांपडतो व पापमार्गानें आणि अशुद्ध बुद्धीनें कर्म करून प्राणिमात्राला त्रास देतो. अशा प्रकारें धन मिळवून मोहानें जो दान किंवा यज्ञ करील त्याला मरणोत्तर त्याचें फळ मिळत नाहीं.

(४) आतां, शेतांतून टिपलेले दाणे, मुळें, फळें, भाजीपाला, पाणी इत्यादि पदार्थ आपल्या सामर्थ्यानुसार दान केले असतां त्याच्यायोगानें धर्मशील आणि तपोनिष्ठ पुरुष स्वर्गास जातात. मोठें फळ देणारा धर्म म्हणजे असलें दान व भूतदया हाच होय. ब्रह्मचर्य, सत्य, दया, धैर्य, क्षमा, हींच सनातन धर्माचीं सनातन मुळें होत. याच धर्माचें आचरण केल्यामुळें पूर्वीं विश्वामित्र, असित जनक, कक्षसेन, आर्ष्टिषेण, सिन्धुद्वीप, हे व दुसरे अनेक राजे व ऋषि यांना

मोठी सिद्धि मिळाली. सत्य व न्यायानें मिळविलेल्या द्रव्याचें दान यांच्या योगानेंच जे तप करतात तेच ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र त्या दानरूप धर्माच्या अग्नीनें शुद्ध होऊन स्वर्गास जातात. १४. २. ९१.

## अध्याय ९२ वा.

[ १ अगस्त्याच्या यज्ञाची कथा. २. मुंगुसाचें पूर्ववृत्त. ]

( १ ) **जनमेजय**—मुने, धर्माला अनुसरून केलेल्या दानानें जर स्वर्गप्राप्ति होत असेल, तर तो सर्व प्रकार मला सांगा. आपण कुशल भाषण करणारे आहां. त्या उंच्छवृत्ति ब्राह्मणाला सातूंचें दान केल्यानें काय मिळालें तें आपण सांगितलें. तें सत्य आहे यांत संशय नाहीं. पण अनेकप्रकारच्या यज्ञांतून श्रेष्ठ कोणता, याचा निर्णय कसा झाला, तें सर्व मला आपण सांगा.

**वैशंपायन**—राजा, याविषयीं प्राचीन इतिहास सांगत असतात. अगस्त्य ऋषि पूर्वी एक मोठा यज्ञ करीत होता. तो बारा वर्षांचा यज्ञ असून त्यासाठीं त्यानें दीक्षा घेतली. अगस्त्यमुनि सर्व प्राण्यांचें हित व्हावें म्हणून दक्ष असे. त्याच्या त्या यज्ञांत अग्नीप्रमाणें तेजस्वी असे महात्मे होते. मुळें भक्षिणारे, फळांवर रहाणारे, धान्य दगडावर कुटून खाणारे, चंद्रकिरणपान करून रहाणारे, कोणी विचारून दिलें तरच घेणारे, जवळ कसलाहि संग्रह न करणारे, असे विविध यति व भिक्षुहि तेथें जमले होते. ते सारे जणूं साक्षात् धर्मच असून त्यांनीं क्रोध व इंद्रियें जिंकिलीं होतीं आणि दंभ व हिंसा यांपासून ते अगदीं अलिप्त होते. त्यांचें आचरण शुद्ध असून त्यांना इंद्रियें कधीं त्रास देत नसत. असे ते महर्षि यज्ञ चालविण्यासाठीं तेथें आले होते. भगवान् अगस्त्यानें अन्नहि यथाशक्ति जमविलें असून यज्ञाला जें अवश्य असतें तें सारें योग्य रीतीनें करण्यांत आलें. यज्ञाचे मोठमोठे भाग अनेक ऋषींनीं अंगावर घेऊन पार पाडिले. असा तो अगस्त्याचा यज्ञ चालला असतां इन्द्र पर्जन्यवृष्टि करीनासा झाला. तेव्हां ते पवित्र अन्तःकरणाचे मुनि त्याविषयीं आपसांत विचार करूं लागले. ते म्हणाले, 'भगवान् अगस्त्यमुनि यज्ञ करीत असून निर्मत्सरबुद्धीनें अन्न देत असतांहि पर्जन्य पडत नाहीं हें कसें काय? अगस्त्यमुनीचें हें सत्र बारा वर्षें चालणारें असल्यामुळें इतका काळ पाऊस न पडला तर कसें होणार? तेव्हां याविषयीं कांहीं तरी विचार करून मुनीवर कृपा करणें अवश्य आहे.' तें ऐकून त्या प्रतापी अगस्त्यानें ऋषींना नमस्कार करून उत्तर केलें, 'जर इन्द्र बारा वर्षें पाऊस पाडणार नाहीं, तर मी चिंतायज्ञ करीन, म्हणजे

त्यांतील सारे विधि मनानेंच उरकून घेईन. असें करणें ही सनातन रीतच आहे. त्यानंतरहि जर बारा वर्षें पाऊस न पडेल, तर मी केवळ स्पर्शयज्ञ करीन, म्हणजे जमविलेल्या यज्ञद्रव्यांना नुसता संकल्पपूर्वक स्पर्शच करीन. हाहि मार्ग सनातन आहे. तेवढ्यानें न भागून जर आणखी बारा वर्षें इन्द्र पाऊस पाडणार नाहीं तर व्रतस्थ राहून सारीं यज्ञकृत्यें केवळ ध्यानानेंच करीन. अनेक वर्षांच्या बीजसंचयानें मीं यज्ञ केला आहे, तो केव्हांहि व्यर्थ जाणार नाहीं व त्यांत कांहीं विघ्नहि येणार नाहीं. माझा यज्ञ अर्धवट पडून रहाणें शक्य नाहीं, मग पाऊस पडो व न पडो. आतां माझ्या प्रार्थनेप्रमाणें न करण्याचा विचार इन्द्र जर जाणून बुजून करील, तर मी स्वतःच इन्द्र होईन व प्रजांचें रक्षण करीन. अहो, जो ज्या आहारासाठीं निर्माण झाला आहे, तो त्यावरच जगेल अशी व्यवस्था मी करीन; इतकेंच नव्हे, तर आणखीही इच्छेस येतील त्या विशिष्ट गोष्टी मी करीन. आजच पाहिजे तर सोनें किंवा ज्या इतर वस्तु पाहिजे असतील त्या मी येथें घेऊन येतों. तिन्ही लोकांत कोठेंहि जें असेल, तें येथें येईल असें मी करतों पहा. स्वर्गांतील अप्सरा, गंधर्व, किन्नर, विश्वावसु गंधर्व इत्यादि सर्वांना माझ्या यज्ञाप्रीत्यर्थ येथें घेऊन येतों, उत्तर कुरुदेशांत जें द्रव्य आहे तें सारें येथें आणितों; स्वर्ग, स्वर्गांतील सारे देवादिक, स्वतः धर्महि येथें येईल असें मी करतों.'

अगस्त्यमुनीनें असें म्हणतांच त्याच्या तपःप्रभावानें त्याप्रमाणें सर्व घडून आलें. हें त्याचें तपोबल पाहून आनंदित झालेले ऋषि आश्चर्यचकित होऊन त्याला म्हणाले, "मुने, तुझ्या बोलण्यानेंच आम्ही संतुष्ट झालों आहों, आतां तूं तपाचा व्यर्थ व्यय करूं नये अशी आमची इच्छा आहे. आम्ही तुझ्या यज्ञावर संतुष्ट असून परिस्थितीच्या मानानें जें मिळेल तेवढेंच आम्हाला पुरे. यज्ञ, दीक्षा, होम आणि इतरहि जें कांहीं आम्ही पाहिजे म्हणून म्हणतों तें सर्व न्यायानें मिळेल तेव्हढेंच आम्हांला हवें. आम्ही न्यायानें मिळालेल्या आहारानें संतुष्ट राहून आपआपल्या कामांत गढून जाऊं. आम्हीं ब्रह्मचर्याश्रमांत वेदाभ्यास न्यायानेंच केला व गृहस्थाश्रमानंतर वानप्रस्थ झालों तेंहि न्याय्यमार्गानेंच झालों. आम्हीं तपश्चरण करतों तेंहि धर्मानें दाखविलेल्या विधीनेंच करतों. मुने, तुझी हिंसापराङ्मुख बुद्धि अगदी इष्ट अशींच असून तूं यज्ञांत नित्य अहिंसाच प्रतिपादीत आला आहेस. यास्तव आम्ही तुजवर संतुष्ट होऊन यज्ञ समाप्त झाल्यावर तूं जा म्हणशील तेव्हांच येथून जाऊं.'

राजा, ऋषींनीं अगस्त्याला असें म्हटलें, तोंच त्याचें तें तपोबल पाहून इन्द्रानें वर्षाव करण्यास आरंभ केला आणि तो यज्ञ पुरा होईपर्यंत तो तसाच वर्षाव करीत राहिला. पाऊस अगदीं हवातसा पडत राहिल्यामुळें इंद्राच्या त्या कृतीनें अगस्त्याला समाधान झालें. मग यज्ञ समाप्त झाल्यावर त्यानें त्या मुनिश्रेष्ठांना बहुमान देऊन मोठ्या आनंदानें घरीं जावयाची अनुज्ञा दिली.

( २ ) **जनमेजय**—मुने, युधिष्ठिराच्या यज्ञांत सुवर्णमय मस्तकाचा जो मुंगुस आला आणि मनुष्यवाणीनें बोलला, तो खरोखर कोण होता तें मला सांगावें.

**वैशंपायन**—राजा, ही गोष्ट तूं पूर्वीं विचारिली नाहींस आणि मीहि सांगावयास विसरलों. तो मुंगुस कोण होता व मनुष्यवाणी त्याला कां होती तें सांगतों. एकदां असें झालें कीं जमदग्नि मुनीनें श्राद्ध करण्याचा संकल्प सोडला असतां त्याची होमधेनु त्यापाशीं आली आणि त्यानें तिचें दूध काढलें. तें दूध त्यानें एका नव्या शुद्ध व भक्कम भांड्यांत भरून ठेविलें. पण त्या भांड्यांत धर्म क्रोधाचें रूप घेऊन शिरला व अप्रिय गोष्ट केल्यास जमदग्नि काय करतो, याची परीक्षा पहावी म्हणून त्यानें तें दूध बलात्कारानें पिऊन टाकिलें. तेव्हां त्याचें वास्तविक स्वरूप लक्षांत आल्यामुळें जमदग्नि त्यावर मुळींच रागवला नाहीं. तेव्हां त्या क्रोधरूपी धर्मानें ब्राह्मणाचें रूप घेतलें आणि तो जमदग्नीला म्हणाला, 'हे भृगुश्रेष्ठा, असा लोकप्रवाद आहे कीं भृगुकुलोत्पन्न पुरुष फार क्रोधिष्ठ असतात; पण तूं शांतीनें मला जिंकिलेंस; यास्तव तो प्रवाद मिथ्याच असला पाहिजे. हे महात्म्या जमदग्ने, तूं क्षमाशील असल्यामुळें मी आज तुझा दास झालों आहें व तूं सांगशील तें करण्यास सिद्ध आहें. तुझ्या तपोबलाची मला भीति वाटते, तरी मजवर प्रसन्न हो.'

क्रोधाचें भाषण ऐकून जमदग्नि म्हणाला, 'हे क्रोधा, तुझें साक्षात् दर्शन मला झालें. आतां तूं निश्चिंत होऊन जा. तूं माझा कांहींच अपराध केलेला नसून माझा तुजवर मुळींच राग नाहीं. ज्यांना उद्देशून हें दूध मीं ठेविलें होतें त्या थोर मनाच्या पितरांकडे जाऊन तूं त्यांची समजूत घाल म्हणजे झालें.' जमदग्नीनें असें सांगितलें असतां क्रोधाला भीति वाटली व तो तेथेंच अन्तर्धान पावला. पण पितरांचा त्याच्यावर कोप झाल्यामुळें त्याला मुंगुसाची योनि मिळाली. तेव्हां तो पितरांकडे जाऊन 'माझ्या शापाचा शेवट होवो' अशी

त्यांची विनवणी करूं लागला. पितरांनीं त्याला सांगितलें कीं, 'तूं जेव्हां धर्म-राजाच्या यज्ञाला नांवें ठेविशील, तेव्हां तूं शाप संपून मुक्त होशील.' त्यांनीं असें म्हटल्यानंतर तो मुंगुसस्वरूपी क्रोध जेथें यज्ञ होतील त्याठिकाणीं जाऊन त्यांना नांवें ठेवीत फिरूं लागला व त्याप्रमाणें तो युधिष्ठिराच्या यज्ञांत आला. तेथें त्यानें धर्मराजावर आक्षेप घेऊन 'मापटेंभर सातूंच्या दानाची तुझ्या यज्ञाला बरोबरी करतां येणार नाहीं' असें म्हटलें. तेणें करून तो शापमुक्त झाला. कारण युधिष्ठिर हा धर्मराजच होता. राजा, याप्रमाणें महात्म्या युधिष्ठिराच्या त्या यज्ञांत चमत्कार होऊन सर्वजण पहात असतां तो मुंगुस तेथेंच अन्तर्धान पावला. १४. २. ९२.

## आश्वमेधिकपर्व समाप्त.

# आश्रमवासिक पर्व. १५



### अध्याय १ ला.

[ १. पांडवांची धृतराष्ट्राशीं वागणूक ]

( १ ) **जनमेजय**—मुने, माझ्या पंजोबांना राज्य प्राप्त झाल्यावर त्यांनीं धृतराष्ट्र राजाला कसें वागविलें बरें?' अमात्य, पुत्र इत्यादि मरून गेल्यामुळें निराश्रित झालेला तो राजा त्या गतवैभव स्थितींत कशा रीतीनें राहिला? गान्धारीनेंहि कसें वर्तन ठेविलें होतें बरें? माझे ते प्रपितामह पांडव राज्यावर किती काळ राहिले, या सर्व गोष्टी मला सांगाव्या.

**वैशंपायन**—राजा, शत्रूंचा निःपात केल्यावर राज्यारूढ होऊन पांडवांनीं धृतराष्ट्राच्या संमतीनेंच राज्यकारभार चालविला. विदुर आणि संजय हे धृतराष्ट्राची सारी व्यवस्था पहात असत. युयुत्सुसुद्धां तेंच काम करी. कोणतेंहि कार्य करण्यापूर्वीं पांडव धृतराष्ट्राला विचारीत व त्याची अनुज्ञा घेऊनच काय तें करीत. असा प्रकार पंधरा वर्षें चालला. ते सारे युधिष्ठिराच्या वचनांत वागून धृतराष्ट्राची सेवा करीत व नित्य त्याला नमस्कार करीत. धृतराष्ट्रानें मस्तक हुंगल्यावरच ते आपल्या कार्याला प्रवृत्त होत. कुंतीहि गांधारीच्या मताला मान देऊनच वागे. द्रौपदी, सुभद्रा व इतर पांडवस्त्रिया त्या सासूसासऱ्यांना अगदीं नीटपणें

वागवीत. उंची शय्या, वस्त्रें, अलंकार, खाद्यपेयादि पदार्थ हीं सर्व राजाला योग्य अशींच युधिष्ठिर धृतराष्ट्राला देत असे व कुंतीहि गांधारीला अगदीं थोरपणेंच वागवीत असे. विदुर, संजय, युयुत्सु आणि द्रोणाचा मेहुणा व प्रेमळ ब्राह्मण असा धनुर्धर कृप हे नित्य धृतराष्ट्राजवळ असत. भगवान् व्यासहि देव, राक्षस, पितर व ऋषि यांच्या पुराणकथा सांगून त्याचें रञ्जन करीत असे. धर्मकार्यें व व्यवहारांतील कामें हीं विदुर त्याच्या अनुमतीनें करी. विदुराच्या उत्तम राजनीतीमुळें मांडलिक राजांसंबंधीं सर्व कामें अल्पद्रव्यांत व मनाजोगीं होऊन जात. कोणाला बंदींत टाकणें, बंदींतून कोणाला सोडून देणें, वधाची शिक्षा झालेल्यांना क्षमा करणें हीं सर्व कामें विदुरच करीत असून त्यांत युधिष्ठिर हात घालीत नसे. खेळ, यात्रा इत्यादि बाबतींत जें लागेल तें धृतराष्ट्राला युधिष्ठिर पुरवी. चुरचुरीत भाज्या करणारे व आलेपाकादि वड्या करणारे स्वयंपाकी पूर्वींप्रमाणेंच धृतराष्ट्राच्या सेवेंत तत्पर असत. वस्त्रेंप्रावरणें, फुलें, इत्यादि पदार्थ धृतराष्ट्राला त्याच्या इच्छेप्रमाणें पुरविण्यांत येत. मासे, मद्यमांसाचे पदार्थ, विविध पेयें, इतर सुंदर विविध पदार्थ हेहि त्याच्यासाठीं पूर्वींसारखेच करण्यांत येत. राजसभेंत जे राजे इकडून तिकडून केव्हां येत, तेहि धृतराष्ट्राला पूर्वींप्रमाणेंच भेटून व नमस्कार करून जात. कुंती, द्रौपदी, सुभद्रा, उलूपी, चित्रांगदा, इत्यादि स्त्रिया आपल्याला सेविका समजून गांधारीची व्यवस्था ठेवीत. पुत्रहीन झालेल्या त्या वृद्ध पतिपत्नींना कांहीं झालें तरी दुःख होऊं नये एवढी युधिष्ठिराच्या सांगण्यावरून सर्वांची दक्षता असे. सारे जण युधिष्ठिराच्या आज्ञेप्रमाणें मनःपूर्वक वागत, पण भीमाला तें मनांतून खपत नसे. द्यूतप्रकरणांत धृतराष्ट्राच्या दुर्बुद्धीमुळें जो प्रकार घडून आला होता, त्याचा विसर भीमाला कधीं पडला नाहीं. १५. १. १.

---

## अध्याय २ रा.

[ १. पांडव व धृतराष्ट्र यांचें परस्परांशीं सरळ व प्रेमळ वर्तन ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, पांडव बहुमान देत असल्यामुळें धृतराष्ट्र पुनः ऋषिमंडळाच्या संगतींत आनंदानें काळ घालवूं लागला. ब्राह्मणांना द्यावयाचे अग्रहार तोच देई व युधिष्ठिराचें त्याला अनुमोदन असे. दयाळु युधिष्ठिर भावांना व अमात्यांना नित्य म्हणे कीं, ‘ जसा मी तसे तुम्हीहि धृतराष्ट्रास मान

दिला पाहिजे. त्याच्या आज्ञेंत जो राहील त्यालाच मी मित्र समजेन; त्याच्या उलट वागणारा माझा शत्रु असून शिक्षेस पात्र होईल. पितृश्राद्धाच्या प्रसंगीं तसेंच त्याच्या पुत्रांच्या इष्टमित्रांच्या श्राद्धाच्या वेळीं त्याच्या मनांत असेल तसेंच करण्यांत आलें पाहिजे.' युधिष्ठिराची अशी सर्वांना आज्ञा असल्यामुळें धृतराष्ट्र सत्पात्र ब्राह्मणांना अनेक प्रकारें द्रव्यदान करी व त्याच्या मनाप्रमाणें वागण्याच्या इच्छेमुळें स्वतः धर्मराजा, भीम, अर्जुन व नकुळ सहदेव असे सर्वजण त्याच्या अनुरोधानें चालत. 'हा वृद्ध राजा पुत्रपौत्रांच्या वधानें आधींच दुःखित होऊन गेलेला असल्यामुळें आम्हीं जर त्याला आणखी त्रास दिला तर तो मरूनच नाहीं का जाणार?' असा ते विचार करीत. पुत्र जीवंत असतांना त्याला जें सुख मिळे, तेंच त्याला आतांहि मिळावें अशी ते व्यवस्था करीत व पांचीजण त्याच्या आज्ञेंत वागत. ते नम्रपणें शिष्यवृत्ति धरून आपल्या वचनाप्रमाणें नियमानें वागतात, हें पाहून धृतराष्ट्रहि त्यांच्यापाशीं तसाच मोठेपणानें वागे. गांधारीनेंहि ब्राह्मणांना हवीं तीं दानें देऊन पुत्रांचीं विविध श्राद्धें केलीं व त्या योगें त्यांच्या ऋणांतून ती मुक्त झाली. अशा रीतीनें धर्मराज युधिष्ठिर धर्मशील राहून भावांसह धृतराष्ट्राची बहुमानपुरःसर शुश्रूषा करी.

राजा, वृद्ध धृतराष्ट्राला युधिष्ठिरामध्यें कांहीं वावगें दिसून आलें नाहीं. असे ते पांडव सद्‌वृत्तीनें वागत असल्यामुळें धृतराष्ट्र त्यांच्यावर अगदीं संतुष्ट असे. गांधारीहि पुत्रशोक दूर करून त्यांच्याशीं स्वतःच्या पुत्रांसारखीच आनंदानें वागे. धृतराष्ट्राला आवडणार नाहीं अशी एकहि गोष्ट युधिष्ठिरानें कधीं केली नाहीं. धृतराष्ट्र व गांधारी जें सांगतील तें लहानमोठें कार्य युधिष्ठिर बहुमानपुरःसर करी व त्याच्या अशा वर्तनानें धृतराष्ट्र अगदीं संतुष्ट असे. तो प्रतिदिवशीं सकाळीं उठला म्हणजे आपल्या दुर्बुद्धि पुत्रांचें स्मरण होऊन पश्चात्ताप पावे व पांडवांचा युद्धांत पराभव होऊं नये म्हणून प्रार्थना करी व ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करवून अग्नीला आहुति देई. तो पांडवांना दीर्घायुष्य चिंती. पांडवांपासून त्याला जें समाधान मिळे तें त्याला पूर्वीं पुत्रांपासून कधीं मिळालें नव्हतें. त्यामुळें आतां तो ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र अशा सर्वांना प्रिय झाला. दुर्योधनादिकांनीं जीं दुष्कृत्यें केलीं तसलीं कधीं मनांतहि न आणतां युधिष्ठिर धृतराष्ट्राच्या मनाप्रमाणें वागे. जो कोणी धृतराष्ट्राला न आवडणारी गोष्ट करी, त्यावर युधिष्ठिराचा राग होई. त्याच्या भीतीमुळें धृतराष्ट्राच्या किंवा दुर्योधनाच्या पूर्वीच्या कृत्यांचा कोणी उच्चारहि करीत नसे. युधिष्ठिराच्या धिम्म्या स्वभा-

मुळें व शुद्ध अंतःकरणामुळें धृतराष्ट्र गांधारी व विदुर यांना संतोष होई, तसा
ोमाच्या स्वभावामुळें मात्र होत नसे. भीमहि युधिष्ठिराचें अनुकरण निश्चयानें
री. पण धृतराष्ट्राला पाहिल्याबरोबर त्याच्या मनाला कसेंसेंच होई व त्यामुळें
धिष्ठिर करील तसें करावयाचें जरी त्यानें ठरविलें होतें, तरी तें सारें तो शून्य-
दयानेंच करी. १५. १. २.

---

## अध्याय ३ रा.

[ १. भीमाच्या तोंडचे कठोर शब्द ऐकून धृतराष्ट्र वनांत जाऊं इच्छितो. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, अशा रीतीनें युधिष्ठिर व धृतराष्ट्र परस्परांशीं
ागत असल्यामुळें लोकांनींहि त्यांच्यांत आदर दाखवितांना केव्हांहि भेद केला
हीं. पण जेव्हां धृतराष्ट्राला आपल्या दुर्बुद्धि पुत्राची आठवण होई, तेव्हां
ाच्या मनांत भीमासंबंधानें दुष्ट विचार येई. भीम गुप्तपणें त्याला आवडणार
हीं असें कांहीं तरी करी व धृतराष्ट्रहि त्याला मनांतून दुष्टासारखा मानी. त्यांचीं
ष्ट कृत्यें व त्यानें दिलेला खोटा उपदेश भीमाला आठवला म्हणजे तो आपल्या
ित्रमंडळींत बसलेला असतां आपले दंड थोपटी आणि धृतराष्ट्र आणि गांधारी
ना ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें दुर्योधन, दुःशासन, कर्ण इत्यादिकांच्या
ाठवणी करून कठोर शब्द बोले. तो म्हणे, 'या अंधळ्या राजाचे नानाशस्त्रवेत्ते
रगे मीं या आपल्या अडसरासारख्या बाहूंनीं परलोकीं पाठविले. ज्यांमध्यें
ापडून धृतराष्ट्रपुत्र नाश पावले ते हे माझे लोखंडी कांबीसारखे बाहू पहा !
दनानें चर्चिलेले तेच हे माझे बाहु कीं ज्यांनीं दुर्योधनाचा पुत्रबांधवांसह
ःपात केला.' हे व दुसरे अनेक टोंचणारे शब्द भीम बोले व ते ऐकून धृतरा-
ला उद्वेग उत्पन्न होई. गांधारीच्याहि कानीं ते शब्द जात, पण कालचक्र
रलें आहे, हें जाणून ती बुद्धिशाली व धर्मज्ञ वृद्धा ती टोंचणी निमूटपणें
हन करी. अशा रीतीनें पंधरा वर्षें धृतराष्ट्रानें भीमाचे वाक्बाण सहन केल्या-
र त्याला शेवटीं उद्वेग होऊन वैराग्य उत्पन्न झालें. पण ही गोष्ट युधिष्ठिराच्या
त्र लक्षांत आली नाहीं. अर्जुन, नकुळ, सहदेव, द्रौपदी, कुंती हीं सर्वजणें
तराष्ट्राच्या मनाप्रमाणें वागत व केव्हांहि त्याला वाईट वाटेल असा शब्द तोंडा-
हेर काढीत नसत. पण शेवटीं धृतराष्ट्रानें मित्रमंडळी बसली असतां त्यांच्याशीं
त्रपणें बोलून व डोळ्यांत आंसवें आणून आपला उद्वेग त्यांच्यापुढें मांडला.

तो म्हणाला, 'मित्र हो, कौरवांचा क्षय कसा झाला हें तुम्हाला ठाऊकच आहे. त्यांत सारा अपराध माझाच आहे. कुलाचा नाश करण्यास प्रवृत्त झालेल्या दुष्टबुद्धीच्या दुर्योधनाला मीं कौरवांचा अधिपति नेमलें, श्रीकृष्णाचा उपदेश ऐकिला नाहीं, पुत्रप्रेमाला बळी पडून सुज्ञांनीं सांगितलेली हिताची गोष्ट झिट-कारिली, वेळोवेळीं विदुर, भीष्म, द्रोण, कृष्ण, भगवान् व्यास, संजय आणि गांधारी हीं सांगत होतीं कीं गुणी पांडवांना वाडवडिलार्जित राज्य द्या, पण मीं तें ऐकिलें नाहीं, याचा मला आतां पश्चात्ताप होत आहे. पुढें होणारा कुलाचा नाश ओळखूनच कृष्णानें अत्यंत हिताची गोष्ट सांगितली होती. हे सारे माझे सहस्रावधि अपराध माझ्यावर उलटून माझ्या हृदयांत शल्यासारखे होऊन बसले आहेत. पण आज पंधरा वर्षांनंतर मला ते फारच जाणवूं लागले आहेत व त्यांची निष्कृति व्हावी म्हणून मीं नेम करून कधीं चार दिवशीं तर कधीं आठ दिवशीं एकदां जेवीत असतों. गांधारीला हें समजल्यापासून तीहि तसेंच करते. युधिष्ठिर माझ्यासाठीं फारच त्रास घेतो. त्याच्या सांगण्यावरून सेवक माझ्या सेवेला नित्य तत्पर असतात. पण मीं जप करीत भूमीवर दर्भ पसरून व त्यावर हरणाचें कातडें अंथरून निजतों व गांधारीहि व्रताच्या मिषानें तसेंच करते. आमचे शंभर पुत्र युद्धांतून पळ न काढतां क्षात्रधर्माला अनुसरून रणांत मरण पावले, पण त्याचें मला वाईट वाटत नाहीं.' असें म्हणून त्यानें धर्मराजाला हाक मारिली आणि त्याला म्हटलें, 'युधिष्ठिरा, तुझें कल्याण असो; माझें म्हणणें ऐकून घे. आजवर तूं माझें उत्तम पालन केलेंस व त्यामुळें मीं येथें सुखानें राहिलों; मोठमोठीं दानें केलीं; श्राद्धांनीं पितरादिकांना संतुष्ट केलें; पुष्कळ पुण्यसंचय केला. ही गांधारी पुत्र मरण पावले असतांहि धैर्यानें माझ्याकडे पाहून दिवस कंठीत आहे. द्रौपदीचा अपकार करणारे व तुझें ऐश्वर्य हरण करणारे माझे दुष्ट पुत्र युद्धांत मरण पावून नष्ट झाले, त्यांच्या संबंधानें करण्याचें आतां कांहीं राहिलेलें नाहीं. ते सारे वीरोचित अशा लोकीं गेले आहेत. तेव्हां मला आतां माझ्या स्वतःच्या हिताचें पुण्यकर्मच करावयाचें आहे. गांधारीलाहि तसेंच वाटतें. तरी तूं तसें करण्यास आम्हाला अनुज्ञा दे. तूं शस्त्रधरांत श्रेष्ठ आहेस तसा धर्माविषयीं कळकळ बाळगणाराहि आहेस. राजा हाच प्राण्यांचा गुरु असल्यामुळें तुजजवळ मी ही गोष्ट काढिली आहे. तरी तुझी अनुज्ञा मिळाली कीं मीं गांधारीसह वनांत जाऊन वल्कलें पांघरून तेथें रहाणार आहें. मीं वनांत असलों तरी तुझें अभीष्ट चिंतीत राहीन. युधिष्ठिरा, आपल्या कुळांत पुत्रांवर ऐश्वर्य

सोंपवून वृद्धपणीं वनाचा आश्रय करणें हें सर्वांनींच योग्य मानिलें आहे. यास्तव मींहि वनांत राहून कांहीं भक्षण न करितां वायु भक्षण करून या पत्नीसह मोठें तप करीन. त्या तपाचें फल तुलाहि मिळेलच. कारण राज्यांत जें कांहीं बरें किंवा वाईट घडून येतें, त्याचा वांटा राजांना मिळतोच.'

हें ऐकून युधिष्ठिर म्हणाला 'महाराज, तुम्हाला जर असें दुःख होत असेल तर मलाहि राज्यापासून काय सुख होणार? तुम्ही असे दुःखित होऊन उपवासानें कृश होत्साते भूमीवर पडून रहात असतां मीं किंवा माझ्या भावांनीं तुमची दाद घेतली नाहीं, तरी मला धिक्कार असो. खरोखर मीं मूर्ख असून तुमच्या बाह्यत्कारी बोलण्यानें फसून गेलों. नाहीं तर तुम्हाला असें दुःख कां भोगावें लागतें? महाराज, तुम्हाला जर असें दुःख होत असेल, तर मला तें राज्य, ते भोग, ते यज्ञ, तें सुख यांचा काय उपयोग आहे? तुमच्या या दुःखाच्या शब्दानें मीं व माझें राज्य हीं दुःखित झालों आहों. तुम्हींच आतां आम्हाला मातापित्याच्या ठिकाणीं असून आमचे श्रेष्ठ गुरुहि तुम्हींच आहां. तुमच्यापासून विरह झाल्यास आम्हीं जाणार तरी कोठें? तरी आतां तुमचा औरस पुत्र जो युयुत्सु त्याला किंवा तुम्हाला दुसरा कोणी युक्त वाटल्यास त्याला राज्यावर बसवा. मीच वनांत जातों, आणि तुम्हीं राज्य चालवावें. दुष्कीर्तीनें आधींच जळून गेलेल्या मला आणखी पुनः कशाला जाळूं पहातां? मीं राजा नाहीं, राज्य तुमचें आहे व मी तुमचा आज्ञांकित आहें. मग मीं तुम्हांला वनांत जावयास कशी अनुज्ञा देऊं बरें? दुर्योधनाविषयीं आमच्या मनांत आतां कसलाच राग राहिलेला नाहीं. होणार गोष्ट त्याप्रमाणें घडून आम्हाला व इतरांनाहि मोह पडला. जसे दुर्योधनादिक तुमचे मुलगे होते, तसेच आतां आम्हीं आहों. मला गांधारी आणि कुंती यांमध्यें मुळींच भेद दिसत नाहीं. इतकें असूनहि जर तुम्ही मला सोडून जाणार असाल, तर मीहि तुमच्या मागून येऊन तुम्हाला धरून राहीन. तुमच्या अभावीं साऱ्या सागरान्त पृथ्वीचें राज्यहि मला आनंद देऊं शकणार नाहीं. हें सर्व तुमचें असून मीं मस्तक लववून तुमची करुणा भाकीत आहें. आम्हीं तुमच्या स्वाधीन आहों, तरी तुम्हीं कसलीहि चिंता करूं नका. झाल्या गोष्टींना उपाय नाहीं असें समजून आमची सेवा घेत आपण निश्चिंतपणें येथें रहाल अशी मला आशा आहे.'

धृतराष्ट्रानें उत्तर केलें, 'युधिष्ठिरा, मला खरोखरच तप करावेंसें मनापासून वाटूं लागलें आहे, आणि आपल्या कुळाची वहिवाटहि वनांत जाऊन रहाणें योग्य मानण्याचीच आहे. मुला, आतां येथें फार वर्षें राहून झालीं. तुम्ही

माझी सेवाहि उत्तम प्रकारें केली. तरी आतां वृद्धवयांत मला जाण्याची अनुज्ञा दे.'

वैशंपायन म्हणतो, राजा, हात जोडून कांपत कांपत पुढें उभा राहिलेल्या युधिष्ठिराला असें सांगून धृतराष्ट्र पुढें म्हणाला, 'युधिष्ठिरा, महात्मा संजय व महारथी कृप यांनाहि समागमें न्यावयाची माझी इच्छा आहे. माझ्या या उतार वयांत माझें मन म्लान होत असून फार बोलण्यानें तोंड सुकून जातें.' इतके शब्द तो बोलत आहे तोंच त्याला घेरी आली व मृतासारखा तो वृद्ध धृतराष्ट्र गांधारीच्या अंगावर पडला. तो प्रकार पाहून युधिष्ठिराला फार तीव्र दुःख झालें आणि तो म्हणाला, 'काय हो, ज्याला एक लक्ष हत्तींचें बळ, तो हा धृतराष्ट्र राजा मृतवत् होऊन स्त्रीच्या अंगावर पडला आहे. ज्या ह्याच्या कणखर देहानें भीमाच्या लोखंडी प्रतिमेचें चूर्ण केलें, तो हा गांधारीचा आश्रय घेऊन पडला आहे! मज अधर्मज्ञाला धिक्कार असो. माझी बुद्धि व माझें ज्ञान हीं काय कामाचीं? हा धृतराष्ट्र राजा अशा रीतीनें माझ्यामुळें पडला ना? धृतराष्ट्र व गांधारी जर राज्योपभोग घेण्यास येथें रहाणार नाहींत, तर मीं त्यांचें अनुकरण करून वनवासच पत्करीन.'

वैशंपायन म्हणतो, राजा, मग युधिष्ठिरानें धृतराष्ट्राच्या उरःस्थलावर आणि मुखावर हळूहळू थंडपाण्याचा हात फिरविला व त्याच्या पवित्र स्पर्शानें तो सावध झाला. सावध झाल्यावर तो युधिष्ठिराला म्हणाला, "युधिष्ठिरा, तुझ्या हाताच्या स्पर्शामुळेंच मी जीवंत आहें, तरी मला पुनः एकदां आपल्या हातानें स्पर्श कर आणि आलिंगन दे. राजा, तुझें मस्तक मला हुंगूं दे. माझ्या हातांनीं तुला कवटाळूं दे म्हणजे मला फार बरें वाटेल. जेवण केल्याला आज मला चार दिवस झाले, त्यामुळें कृश होऊन हालचालहि करतां येत नाहींशी झाली आहे. तुझी अनुज्ञा मिळविण्याच्या प्रयत्नांत मला फार श्रम झाले, त्यामुळें ही मूर्च्छा मला आली. पण तुझ्या अमृतासारख्या हस्तस्पर्शानें मला पुनः शुद्धि आली असें मला वाटतें." राजा, धृतराष्ट्राच्या सांगण्याप्रमाणें युधिष्ठिरानें चुलत्याच्या सर्व शरीरावरून प्रेमानें हात फिरविला, तेव्हां त्याला पुनः शक्ति येऊन त्यानें युधिष्ठिराला दोन्ही हातांनीं कवटाळून त्याचें मस्तक हुंगलें. हा सारा प्रकार पाहून विदुरादिकांना अतिशय दुःख झालें व कांहीं न बोलतां ते रडले मात्र. पण धर्मज्ञ गांधारी फार दुःखित झाली असतांहि धीर धरून सर्वांचें सांत्वन करूं लागली. कुंतीसह इतर स्त्रियांचीहि तशीच स्थिति होऊन त्या डोळ्यांत आंसवें आणून

वाटोळ्या उभ्या राहिल्या. मग धृतराष्ट्र पुनः युधिष्ठिराला म्हणाला, 'राजा, मला तपश्चर्येला जाण्यास अनुज्ञा देच. पुनः पुनः तीच बडबड करतांना मला थकवा येत आहे, तरी, बाळा, मला आतां अधिक कष्ट देऊं नको.' हे त्याचे शब्द ऐकून त्या सर्वच पांडव वीरांनीं दुःखाचा हुंदका सोडिला, कारण धृतराष्ट्राचा केवळ अस्थि पंजरच शेष राहिला असून उपवासानें तो अगदीं क्षीण व निस्तेज झाला होता. युधिष्ठिरानें त्याला आलिंगन दिलें आणि शोक आवरून व अश्रु पुसून त्याला पुनः म्हटलें, 'महाराज, तुमच्या मनाप्रमाणें करण्याची जेवढी मला इच्छा आहे, तेवढी जगण्याची किंवा पृथ्वीचें राज्य करण्याचीहि नाहीं. मीं जर तुम्हांला प्रिय असेन व माझ्यावर कृपा करावी असें जर तुम्हांला वाटत असेल, तर प्रथम तुम्हीं थोडा आहार घ्यावा; मग पुढच्या गोष्टी पुढें पाहूं.' त्यावर धृतराष्ट्र म्हणाला, 'युधिष्ठिरा, वनांत जावयास तुझी अनुज्ञा मिळाली म्हणजे मगच जेवावें असें माझ्या मनानें घेतलें आहे.' त्याचें असें भाषण युधिष्ठिराशीं चाललें आहे, इतक्यांत सत्यवतीपुत्र व्यासमुनि तेथें येऊन, त्यांच्याशीं बोलूं लागले. १५.१.३.

---

## अध्याय ४ था.

[ १. व्यास युधिष्ठिराला धृतराष्ट्रास अनुज्ञा द्यावयास सांगतो. ]

( १ ) **व्यास**:—युधिष्ठिरा, धृतराष्ट्र जें म्हणतो आहे, तें तूं कांहीं एक किन्तु मनांत न आणतां कर. हा राजा आतां वृद्ध झाला आहे व विशेषतः पुत्रवधामुळें आतां तो यापुढें फारसे दिवस कष्ट सहन करणें शक्य नाहीं. गांधारीहि मोठ्या धैर्यानें पुत्रवधाचें दारुण दुःख स्वतःची समजूत करून कसें बसें सोशीत आहे. यास्तव माझें तुला हेंच सांगणें आहे कीं, मीं सांगतों तें कर आणि धृतराष्ट्रास वनांत जाण्यास अनुज्ञा दे. त्यानें येथेंच व्यर्थ मरावें हें मला बरें वाटत नाहीं. राजर्षींची पुरातन रीतच त्याला अनुसरूं दे. सर्व मोठ्या राजर्षींनीं वनाचाच आश्रय शेवटीं केलेला आहे.

वैशंपायन म्हणतो, राजा, अद्भुत सामर्थ्यवान् अशा व्यासाचें भाषण ऐकून प्रतापी युधिष्ठिर त्याला म्हणाला, 'भगवन्, आपलें वचन आम्हांला प्रमाण असून आपण आमचे गुरूच आहां. फार काय, पण आपण या राज्याचे व आमच्या कुलाचें सर्वस्व आहां. मीं आपला बालक असून आपण माझे पिता,

राजा व गुरु आहां. पुत्रानें पित्याच्या आज्ञेंत असावें असा धर्मच आहे.' धर्माच्या भाषणावर वेदवेत्त्या व्यासानें उत्तर केलें 'युधिष्ठिरा, तूं म्हणतोस तसें आहे खरेंच. हा धृतराष्ट्र आतां वृद्ध झालेला असल्यामुळें त्याच्या म्हणण्याला मोठें प्रामाण्य आलेलें आहे. तरी माझ्या तशाच तुझ्याहि संमतीनें त्याला त्याच्या मनांत आलेली गोष्ट करूं दे; त्याच्यांत तूं कांहीं अडचण आणूं नको. राजा, थोर राजांचा हा धर्मच आहे कीं, एकतर रणांगणावर देह ठेवावा, नाहींतर विधियुक्त वनवास स्वीकारावा. धृतराष्ट्राची सेवा तुझ्या पित्यानें म्हणजे पांडुराजानें शिष्यानें गुरूची करावी तशी खरोखर केली. पुढें तुम्हीं वनवासांत गेल्यावर तेरा वर्षें पुत्रांच्या द्वारा राज्य भोगून धृतराष्ट्रानें पुष्कळ द्रव्य दान केलें, मोठे मोठे दक्षिणायुक्त यज्ञ करून पृथ्वीचा उपभोग घेतला व प्रजेचें पालन केलें. त्यावर त्याची तशीच गांधारीची तूंहि आपल्या परिवारासहित गुरुतुल्य सेवा केली आहेस. आतां तपश्चर्या करण्याचा याचा समयच आला आहे. तरी त्याला तूं संमति दे. युधिष्ठिरा, याच्या मनांत तुमच्या विषयीं थोडाहि किन्तु आहे असें मला वाटत नाहीं.'

या प्रमाणें युधिष्ठिराला सांगून व त्याच्याकडून त्याविषयीं मान्यता मिळवून व्यास मुनि आपल्या आश्रमीं निघून गेले. ते गेल्यावर वृद्ध धृतराष्ट्राजवळ जाऊन मोठ्या नम्रतेनें युधिष्ठिरानें त्याला हळु हळु विचारिलें, 'महाराज, व्यासमुनींनीं सांगितल्याप्रमाणें आपलें जें मत झालें आहे, तसेंच कृपाचार्य, विदुर, युयुत्सु, संजय, यांचें जसें म्हणणें असेल, त्याप्रमाणें करावयास मीं सिद्ध आहें. ते सर्व जण मला मान्य असून आपल्या कुळाचे हितचिंतक आहेत. पण माझी आतां नम्र प्रार्थना एवढीच आहे कीं, आधीं थोडें अन्न खा आणि मग वनांत जाण्याची सिद्धता करूं. १५. १. ४.

---

## अध्याय ५ वा.

[ १. धृतराष्ट्राचा युधिष्ठिराला राजनीतीचा उपदेश ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, युधिष्ठिराची संमति मिळविल्यावर प्रतापी धृतराष्ट्र आपल्या घरीं गांधारीसह गेला. त्याचे प्राण अगदीं मंद झाले असून तो कसा बसा ढकलत ढकलतच म्हाताऱ्या हत्तीसारखा पायींच गेला व त्याच्या मागोमाग ज्ञानी विदुर, संजय आणि कृपाचार्य हेहि गेले. घरीं गेल्यावर सकाळचीं

कृत्यें करून व ब्राह्मणांना तृप्त करून मग त्यानें भोजन केलें; गांधारीनेंहि कुंती व सुना यांनीं बहुमानानें आग्रह केल्यामुळें भोजन केलें. मग विदुरादिकांचें जेवण आटोपल्यावर ते व पांडव पुनः धृतराष्ट्रापाशीं येऊन बसले. तेव्हां त्यानें धर्मराजाला जवळ घेतलें आणि त्याच्या पाठीवर हात फिरवून त्याला उपदेश केला. तो म्हणाला, 'युधिष्ठिरा, राज्याचीं आठ अंगें धर्मांत सांगितलीं असून त्या सर्वांत तुझें वर्तन अगदीं प्रमादरहित असूं दे. राज्याचें नीट रक्षण होणें हें धर्मानेंच शक्य आहे. तूं जाणता आहेसच, तथापि मीं सांगतों तें ऐकून घे. विद्येनें वृद्ध अशा पुरुषांची मनधरणी करीत जा व ते जसें सांगतील तसें तूं कांहीं दुसरा विचार न करतां कर. सकाळीं उठून यथाविधि त्यांना नमस्कार करावा व कामाचा प्रसंग येईल तेव्हां त्यासंबंधानें त्याचें मत घ्यावें. कार्याकडे दृष्टि ठेवून त्यांना तूं बहुमानानें मत विचारीत गेल्यास ते तुझ्या हिताचें असेल तेंच सांगतील. धर्मा, घोड्यांना आवरावें त्याप्रमाणें सर्व इंद्रियांनाहि आवरतां आलें पाहिजे. राखून ठेवलेलें द्रव्य जसें कठीण प्रसंगीं उपयोगीं पडतें, तशीं नियंत्रित इन्द्रियें आपलें प्रसंगीं हितच करतील. अमात्य नेमावयाचे ते त्यांच्या शीलाची परीक्षा करून नेमावे. त्यांचें वर्तन शुद्ध असून त्यांनीं तें काम वंश परंपरेनें केलेलें असावें. त्यांनीं इन्द्रियदमन केलेलें असून ते पुण्य कर्में करणारे असावे. शत्रूंना कळूं न देतां त्यांच्या देशांत गुप्त हेर पाठव. पण ते स्वतःच्या राष्ट्रांत रहाणारे असून त्यांच्या प्रामाणिकपणाची चांगली परीक्षा केलेली असावी. आपली राजधानी भोंवती चांगली तटबंदी करून भक्कम करावी. किल्ल्यांच्या वरतीं फिरण्याच्या जागा असून त्यांवरून दूरवर दृष्टि टाकतां यावी. त्यांत एकावर एक सहा माळे असून त्यांना चोहोंकडून भक्कम व पुरेशीं मोठीं द्वारें असावीं. त्यांवर नगराच्या रक्षणासाठीं मोठमोठीं यंत्रें ठेवावीं. सेवक ठेवावयाचे ते कुल-शील पारखून ठेवावे व स्वतःचें रक्षण जेवणाखाण्यांतहि नीट काळजी घेऊन करावें. खेळण्याचीं स्थानें, फुलें माळा इत्यादिकांचा उपभोग, शय्या, आसनें, या सर्व गोष्टींत दक्ष राहून स्वतःचें रक्षण केलें पाहिजे. वृद्ध व विश्वासू अशा संरक्षकांकडून स्त्रियांचें नीट रक्षण करवावें. ते शीलवान् कुलीन व ज्ञाते असावे. विद्यापारंगत, नम्र, कुलीन, सरळ वर्तनाच्या व धर्मार्थवेत्त्या ब्राह्मणांना मंत्रिपदां-वर नेमावें. त्यांच्याशीं योग्य रीतीनें मंत्रयोजना करावी, पण पुष्कळांशीं एकाच वेळीं ती करूं नये. ते सर्व एकत्र असले तरी कांहीं निमित्तानें त्यांना एकीकडे करूनच त्यांच्याशीं गुप्त मंत्र करावा. जेथें दुसरें कोणी येणार नाहीं अशा माडी-

वरच्या एकान्त स्थळींच मंत्र करावा. रानांत किंवा झाडी गवत इत्यादि असेल तेथें गुप्त मंत्र केव्हांहि करूं नये. जेथें गुप्त मंत्र करावयाचा तेथें माणसांचें अनुकरण करणाऱ्या वानर, पक्षी इत्यादि प्राण्यांना येऊं देऊं नये. तसेच जे जड व पंगु असतील त्यांनाहि तेथें राहूं देऊं नये. गुप्तमंत्र फुटला असतां त्याचे जे दुष्परिणाम होतात, ते दूर करणें पुढें शक्य होत नाहीं असें माझें मत आहे. आपल्या मंत्रिमंडळाला मंत्रभेदाचे दुष्परिणाम वारंवार नीट समजावून देत जा, तसेच मंत्ररक्षणाचे सुपरिणामहि सांगत जा. नगरांतील लोकांच्या मनाची शुद्धता व अशुद्धता कळून येईल त्याप्रमाणें वर्तन ठेवावें. तुझ्या हिताविषयीं दक्ष अशांशींच तूं व्यवहार ठेवीत जा व तुझ्या हिताला जपणाऱ्या हेरांना संतुष्ट ठेव. तुझ्या सेवकांनीं दंडार्ह लोकांना योग्यप्रमाणांत व न्यायानेंच दंड करावा अशी व्यवस्था कर. लांच खावयास सवकलेले, परस्त्रीवर दृष्टि ठेवणारे, कडक शिक्षा देणारे, खोटा व्यवहार करणारे, दुसऱ्याची निंदा करणारे, लोभी, चोर, दुष्ट कृत्यें करण्यास न भिणारे, सभा मठ इत्यादिकांचा नाश करणारे, अशा लोकांना देशकाल पाहून द्रव्यदंड किंवा देहदंड करीत जा. कोशाची व्यवस्था ज्यांच्याकडे असते त्यांची सकाळींच प्रथम भेट घेऊन मग स्नान, अलंकार, भोजन इत्यादि कामें करावीं. त्या नंतर सैन्याची पहाणी करून त्याला संतोष द्यावा. दूत व हेर यांची गांठ संध्याकाळींच नित्य घ्यावी. मध्यरात्रीनंतरच कार्याची योजना करावी. दुपारची वेळ तशीच मध्यरात्रीची वेळ क्रीडेसाठीं राखून ठेवावी. कोणतेंहि कार्य करण्यासाठीं जो काळ ठरला असेल त्याकाळीं त्यासाठीं सज्ज होऊन रहा. कार्यांचें चक्र सारखें चालू असतेंच. कोश भरण्याचा उद्योग न्यायानेंच कर; अन्यायाचा मार्ग वर्ज्य कर. जे तुझे शत्रु आहेत असें हेरांकडून तुला कळून येईल, त्यांना विश्वासू माणसांकडून दुरूनच परस्पर मारवावें. सेवकांच्या कामाची पारख करून त्यांची निवड करावी आणि नेमल्यावर त्यांच्याकडून योग्य रीतीनें कार्यें करवून घ्यावीं. राजा, तुझा सेनापति दृढविश्वासाचा खंबीर असूं दे. तो शूर व क्लेश सहन करणारा, तसाच हितकर्ता व भक्त असावा. सर्व प्रकारचे व्यवहारी लोक तुझीं कामें गाढव किंवा बैल यांसारखीं केवळ जेवणावारी करूं देत. आपले दोष व शत्रूंचे दोष नित्य बारकाईनें तूं पहात जा. आपआपल्या कामांत कुशल असे जे पुरुष राज्यांत असतील व जे तुझ्या हितासाठीं झटत असतील, त्यांना योग्य ती पोटाची व्यवस्था करून संतुष्ट ठेव. ज्ञात्या राजानें गुणी माणसांच्या गुणाला उत्तेजन द्यावें म्हणजे तेहि पर्वताप्रमाणें अढळ निष्ठा त्याच्यावर ठेवतील. १५. १. ५.

## अध्याय ६ वा.

[ १. धृतराष्ट्राचा युधिष्ठिराला राजनीतीचा उपदेश. ]

( १ ) **धृतराष्ट्रः**—युधिष्ठिरा, आपले शत्रु कोण, आपले मित्र कोण, तटस्थ कोण आणि अधले मधले कोण, हें तूं लक्षांत घेऊन त्यांचीं मंडलें अथवा कंपू कोठें कसे आहेत हें समजून घे. तसेंच चार प्रकारचे शत्रु म्हणजे स्वतः शत्रु, शत्रूंचे सहायक मित्र, त्या दोघांचा जय इच्छिणारे व दोघांचाहि पराजय चिंतणारे, तसेच अविचाराचें साहस करणारे, या सर्वांचें नीट ज्ञान करून घे. अमात्य, देश, किल्ले, निरनिराळ्या प्रकारचीं सैन्यें यांमध्यें प्रसंगोपात्त कोणी फोडला जाण्याचा संभव असतो, म्हणून त्याविषयीं नित्य सावध असावें. राजा, चार प्रकारचे शत्रुपक्षीय लोक, सहा प्रकारचे अविचारी साहसी, स्वतः शत्रु आणि त्यांचे सहायक असे बारा राज्याच्या अवधानाचे विषय होत. तसेच शेती आदिकरून आठ उत्पन्नाचे विषय, अल्पवयी राजे इत्यादि वीस प्रकारचे साम करण्यास अयोग्य असे पुरुष, नास्तिकपणा आदिकरून चौदा दोष, गुप्तमंत्रादि अठरा साधनें, मिळून साठ आणि पूर्वीं सांगितलेले बारा विषय या सर्वांना मिळून राजनीतिशास्त्रकारांनीं मंडल असें नांव दिलें आहे. यांवरच सामादि सहा गोष्टी अवलंबून असतात. राजानें राज्याचा उत्कर्ष, ऱ्हास व स्थैर्य यांचा नीट विचार करावा. ज्यावेळीं स्वपक्ष बलवान् असून शत्रुपक्ष दुबळा असतो, तेव्हां शत्रूंशीं झुंज करून त्यांच्या राजाला जिंकावें. पण जेव्हां शत्रु बलिष्ठ असून आपला पक्ष दुर्बल असेल, तेव्हां परिस्थिति जाणून शत्रूशीं सन्धि करावा. द्रव्याचा मोठा संचय करून ठेवावा व शत्रूवर चालून जाण्याचें सामर्थ्य जेव्हां येईल तेव्हां विलंब न करतां तसें तत्काल करावें; त्यावेळीं इतर विचार करीत बसूं नये. आपल्यावर बाजू उलटली असतां नापीक भूमि, हिणकस सोनें, किंवा दुबळें सैन्य असें अवश्य तर शत्रूला देऊन टाकावें. परंतु आपला जय झाल्यास शत्रूपासून सुपीक भूमि, उत्तम द्रव्य, बलिष्ठ सैन्य हीं मागून घ्यावीं व संधि करावा. त्यावेळीं तहाची अट म्हणून शत्रूकडील राजपुत्र आपल्याकडे ठेवून घ्यावा. पण कोणत्याहि संकटांत याच्या उलट वागूं नये. संकटांतून सुटण्याचा प्रयत्न नीट विचार करून करावा, आणि प्रजांमधील दीन-दुबळ्यांकडे नीट लक्ष द्यावें. स्वराज्याचें रक्षण करावयाचें तर प्रयत्नपूर्वक शत्रूला पीडा देणें, त्याला अटकाव करणें, त्याचा कोश लुटणें हीं कामें क्रमानें किंवा एकदम जशीं जुळतील तशीं केलीं पाहिजेत. उत्कर्षाची इच्छा करणाऱ्या राजानें आपल्याकडे साहाय्यार्थ आलेल्या सामन्त

राजाला दुखवूं नये. जो सारी पृथ्वी जिंकूं पहातो, त्याच्या वाटेस जाऊं नये; तर त्याच्या सैन्यांत व मंत्र्यांत फूट पाडण्याचा प्रयत्न करावा. साधूंचें रक्षण करून दुष्टांना दंड करावा व दुर्बळांचा बलिष्ठाकडून उच्छेद होणार नाहीं अशी काळजी घ्यावी. विकट प्रसंगीं वेताचें धोरण धरावें. जर प्रबळ शत्रु चालून येईल, तर सामादि उपायांचा क्रमानें उपयोग करून त्याला परतविण्याचा यत्न करावा. तो नच जुळला, तर मात्र मंत्र्यांसह त्याच्यावर तुटून पडावें व त्या कामीं कोश, नागरिक लोक, सैन्य व जे दुसरे कोणी आपले हितकर्ते असतील त्यांचें साह्य घ्यावें. एवढेंहि करून न जुळलें तर एकट्यानेंहि शेवटीं युद्ध करावें. कारण या क्रमानें शरीर पडल्यास मोक्षच मिळणारा आहे. १५. १. ६.

## अध्याय ७ वा.

[ १. धृतराष्ट्राचा युधिष्ठिराला राजकारणविषयक आणखी उपदेश. ]

( १ ) धृतराष्ट्र—युधिष्ठिरा, संधि म्हणजे सख्य आणि विग्रह म्हणजे युद्ध हे प्रत्येकीं दोन प्रकारचे व अनेक उपायांनीं साधणारे असून त्यांचा राजानें अवश्य विचार केला पाहिजे. चित्त स्थिर ठेवून व दोन्ही प्रकारें स्वतःचा विचार करून शत्रूच्या बळाबळाचा विचार करावा. शत्रु जर हीनबल असेल तर त्यावर चालून जावें. उलट तो समर्थ असेल तर मागें फिरणेंच उत्तम. त्या स्थितींत शत्रुपक्षांत संकटें, भेद, इत्यादि उत्पन्न करण्याचा प्रयत्न करावा. युद्ध चालू झाल्यावर शक्ति क्षीण झाल्यास काय करावें, भय उत्पन्न झाल्यास काय करावें व सैन्य नष्ट झाल्यास काय करावें, या तीन गोष्टींचा विचार चाल करून जातांना केला पाहिजे. शास्त्रानुमतें स्वतःच्या व शत्रूच्या बलाबलाचा विचार करून उत्साहशक्ति, प्रभुशक्ति आणि मंत्रशक्ति यांनीं युक्त आपण आहों असें वाटल्यास चाल करून जावें, पण उलट प्रकार आढळल्यास तसा विचार वर्ज्य करावा. चाल करून जातांना राजानें धनबल, मित्रबल, रानवट लोकांचें बल, व सैन्यबल हीं पुरेशीं घ्यावीं. पण त्यांत मित्रबल व धनबल यांचें महत्त्व विशेष आहे. सैन्य व धन यांची योग्यता समान आहे. त्यांच्या बरोबरीचें हेरांचें बल होय. प्रसंग पडला असतां हेरांचा उपयोग फार होतो. राजावर नानाप्रकारचीं संकटें येत असतात, त्यांचा विचार आतां सांगतों.

राजा, आपत्तींचे बहुत प्रकार आहेत. त्यांचा सामादि उपायांनीं विचारपूर्वक

प्रतिकार करावा. उत्तम प्रकारचें सैन्य घेऊन शत्रूवर राजानें चाल करावी. मात्र परिस्थिति अनुकूल पहावी व स्वतःच्या सामर्थ्याचाहि विचार करावा. उत्कर्षाची इच्छा करणाऱ्या राजानें दुष्ट व पुष्ट असें सैन्य घेऊन निघावें. पुरेसें सामर्थ्य असल्यास हिवाळ्यासारख्या अवेळींहि चाल करावी. शत्रूंचा नाश करण्याच्या कामीं ज्या सैन्यरूप नदीचा प्रयोग करावयाचा तींत भातेरूप दगड, घोडे व रथ या रूपाचा जलप्रवाह, ध्वजरूपी वृक्षाचें तीरावरील आवरण व पायदळरूपी हत्तींचा चिखल हीं भरपूर असावीं. युद्धप्रसंगीं शुक्राचार्यांच्या नीतिग्रंथांत वर्णिल्याप्रमाणें योग्य प्रकारें शकटाकार, पद्माकार किंवा वज्राकार असे सैन्याचे व्यूह रचावे. शत्रुसैन्यांत हेरांनीं पहाणी करावी व आपल्या सैन्याची शक्ति अजमावून आपल्या किंवा शत्रूच्या भूमीवर योग्य दिसेल त्याप्रमाणें युद्धाला आरंभ करावा. सैन्याला संतुष्ट ठेवावें व बलिष्ठ माणसांना शत्रूवर पाठवावें. आपल्या राज्याविषयीं नीट विचार करून अवश्य त्या सामादि उपायांचा अवलंब करावा. राजा, कसेंहि करून या लोकीं शरीर नीटपणें धारण करावें आणि परलोकींचें हित साधावें. याप्रमाणें योग्य रीतीनें जो राजा आचरण करतो व धर्मानें प्रजापालन करतो, त्याला मरणोत्तर स्वर्गप्राप्ति होते. युधिष्ठिरा, इहपरलोकींच्या सुखप्राप्तीसाठीं याप्रमाणें वागून तूं प्रजाहित साध. पूर्वीं भीष्मानें तुला सर्व सांगितलेंच आहे. कृष्ण व विदुर यांनींहि तें पुनः सांगितलें. आतां तुझ्यावरील ममतेमुळें मीं तें आणखी अवश्य म्हणून सांगितलें; तरी त्याप्रमाणें न्यायानें वर्तन कर; म्हणजे प्रजांना तूं प्रिय होऊन स्वर्गांतहि सुखाचा वांटेकरी होशील. सहस्र अश्वमेध करणें आणि धर्मानें प्रजापालन करणें या दोहोंचें फळ सारखेंच आहे. १५.१.७.

---

## अध्याय ८ वा.

[ १. धृतराष्ट्राची वनांत जाण्यासाठीं पुनः प्रार्थना. ]

( १ ) **युधिष्ठिर**—महाराज, तुम्हीं जसें सांगितलें तसें मीं करीन. आणखीहि कांहीं उपदेश तुम्हीं मला करा. भीष्म स्वर्गस्थ झाला, कृष्ण द्वारकेस निघून गेला. विदुर व संजय हेहि जाणार. मग मला असला उपदेश कोण बरें करणार आहे ? माझ्या हिताकडे लक्ष्य देऊन आज जो उपदेश तुम्हीं मला केला, त्याप्रमाणें मीं वागेन, कांहीं चिंता करूं नये.

**वैशंपायन**—राजा, धर्मराज युधिष्ठिरानें धृतराष्ट्राला असें सांगितलें असतां,

त्यानें आपल्याला आतां वनांत जाण्यास अनुज्ञा द्यावी असें धृतराष्ट्राला वाटलें व 'आतां पुरे झालें, मींहि अगदीं थकून गेलों आहें' असें म्हणून तो गांधारीच्या महालांत गेला. तेथें तो आसनावर बसल्यावर त्याची सहधर्मचारिणी पत्नी गांधारी आपल्या प्रजापतितुल्य पतीला म्हणाली, 'स्वतः व्यासमहर्षींनें आपल्याला वनांत जाण्याची अनुज्ञा दिली आहेच. आतां युधिष्ठिराची संमति मिळवून अरण्यांत केव्हां जावयाचें?' हा प्रश्न ऐकून धृतराष्ट्रानें उत्तर केलें, 'हे गांधारि, स्वतः व्यासपित्यानें अनुज्ञा दिली आहे. आतां लवकरच युधिष्ठिराची अनुमति घेऊन जाऊं. पण त्यापूर्वीं दुष्ट द्यूतामुळें दुःखांत पडलेल्या त्या माझ्या सर्व मृत पुत्रांच्या परलोकहितासाठीं आपल्या घरांत सर्व प्रजामंडळासमक्ष द्रव्यदान करावयाचें माझ्या मनांत आहे.'

वैशंपायन म्हणतो, राजा, गांधारीला असें सांगून धृतराष्ट्रानें धर्मराजाला बोलावणें पाठविलें व त्याच्या आज्ञेप्रमाणें युधिष्ठिरहि सर्व साहित्य समागमें घेऊन तेथें आला. मग कुरुजांगलांतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र, हे आनंदित होऊन तेथें जमले असतां धृतराष्ट्र आपल्या अन्तःपुरांतून बाहेर आला आणि सर्व जमलेल्या नागरिक मंडळीकडे व अमात्यांकडे पाहून व नानादेशांहून आलेले ब्राह्मण, मित्रमंडळी व इतर लोक यांना उद्देशून म्हणाला, 'लोक हो, तुम्हीं व कुरुकुलांतील पुरुष आज कितीतरी काळ एकत्र राहून परस्परांचे स्नेही व हितकर्ते झालां आहां. यास्तव मीं आतां तुम्हांला जें सांगणार आहें, त्याप्रमाणें तुम्हीं निश्चितपणें करावें. गांधारीसह वनांत जावें असें मीं ठरविलें आहे व त्याला व्यासमुनि आणि धर्मराजा यांनीं संमति दिली आहे. तरी आपली त्याविषयीं मला अनुज्ञा असावी. तुमचें व आमचें जें चिरकालिक प्रेम आजवर दिसून येत आहे, तसें दुसऱ्या कोणत्याहि देशांत राजाप्रजांमध्यें नसेल असें मला वाटतें. मीं आतां वृद्ध झालों असून पुत्रविरहामुळें उपवास करून कृशहि झालों आहें. गांधारीचेंहि तसेंच झालें आहे. युधिष्ठिराच्या हातीं राज्य आल्यापासून मला मोठें सुख मिळूं लागलें. सज्जन हो, दुर्योधनाच्या ऐश्वर्यापेक्षांहि त्याची थोरवी मला अधिक वाटते. पण आतां अंध, वृद्ध व पुत्रहीन अशा मला वनांत गेल्याशिवाय काय गति आहे? तरी, हे भाग्यशाली लोक हो, मला वनांत जाण्याची अनुज्ञा कृपा करून द्या." राजा, धृतराष्ट्राचें हें करुणामय भाषण ऐकून ते कुरुजांगलवासी सर्व लोक सद्गदित होऊन रडूं लागले. ते कांहीं उत्तर न देतां केवळ रडत आहेत, असें जाणून धृतराष्ट्र त्यांच्याशीं पुनः बोलूं लागला. १५.१.८

## अध्याय ९ वा.

[ १ धृतराष्ट्राची प्रजाजनांना प्रार्थना ]

( १ ) **धृतराष्ट्र**—सज्जनहो, शांतनुराजानें या राज्याचें यथाविधि पालन केल्यावर त्याच्या मागें भीष्माच्या संरक्षणाखालीं आमच्या पित्यानें म्हणजे विचित्रवीर्यानें राज्यरक्षण केलें. हा सारा प्रकार तुम्हाला ठाऊकच आहे. त्यानंतर माझा वडील बंधु जो तुमचा मोठा आवडता होता, त्या पांडुराजानें तुमचें रक्षण केलें हेंहि प्रसिद्धच आहे. हे निष्पाप लोक हो, त्यापुढें मी जी तुमची बरी वाईट कांहीं सेवा केली, तींत जी वाईट असेल तिची तुम्हीं थोरमनानें मला क्षमा करा; कारण त्या वेळीं त्या राज्याचीं निष्कंटक सूत्रें दुर्योधनाच्या हातीं होतीं व त्याच्या मंद बुद्धीमुळें आपले अनेक अपराध त्याच्याकडून घडले. त्याच्या दुर्बुद्धीमुळें व अभिमानामुळें राजाराजांत घनघोर युद्ध झालें. त्या संबंधांत माझ्या हातून जें बरें वाईट वर्तन झालें तें तुम्हीं आतां मनांत ठेवूं नका, अशी मीं हात जोडून तुम्हांला विनंति करीत आहें. मी आतां वृद्ध व पुत्रविरहानें दुःखित असा राजा आहें, तसाच तुमच्या पूर्वराजांच्या पोटीं आलेला पुत्र आहें, एवढेंच लक्षांत घेऊन, तुम्हीं माझ्या म्हणण्याला अनुमति द्या. ही दीन व वृद्ध गांधारी पुत्रहीन होत्साती दुःखित होऊन माझ्या तोंडून तुमच्यापाशीं तेंच मागणें मागत आहे. हीं आम्हीं पुत्रहीन झालेलीं वृद्ध माणसें तुम्हांला शरण आलों आहोंत. तरी आम्हाला वनांत जाण्यास अनुज्ञा द्या. तुमचें कल्याण असो. हा कुंतीपुत्र युधिष्ठिर आपला सर्वांचा राजा असून चांगल्या वाईट सर्व प्रसंगीं आतां तुम्हीं त्याच्याकडेच पहा. त्याच्या हातून कदापि अनिष्ट गोष्ट घडणार नाहीं. त्याचे चार बलिष्ठ बंधु त्याच्या सचिवांचें काम करीत असून ते इंद्रचंद्रादि लोकपालांप्रमाणें सर्व धर्मांचें सार जाणणारे आहेत. हा युधिष्ठिर म्हणजे सर्व विश्वाचा पति जो ब्रह्मदेव त्याच्यासारखा महा तेजस्वी असून तो आतां तुमचें रक्षण करणार आहे. या प्रसंगीं सांगणें अवश्य आहे म्हणूनच मी केवळ सांगतों कीं, हा युधिष्ठिर म्हणजे माझा मूल्यवान् ठेवा असून तो मी आज तुमच्या स्वाधीन करून जाणार आहें, उलट तुम्हीं सर्वजणहि ठेवच म्हणून मी त्याच्या हातीं देत आहें. माझ्या त्या मुलांनी जें कांहीं कपट केलें व जें मीहि केलें त्याची तुम्हीं कृपा करून क्षमा करावी. तुम्हीं आमचें अप्रिय कधींच केलें नाहीं. अत्यंत राजनिष्ठ अशा तुम्हां सर्वांना मीं हात जोडून

नमस्कार करीत आहें व त्या चंचलबुद्धीच्या लोभी व स्वैराचारी मुलांसाठीं गांधारीसह तुमच्यापाशीं ही याचना करीत आहें.'

राजा, धृतराष्ट्राच्या या भाषणावर त्या जमलेल्या प्रजाजनांना कांहीं बोलवलें नाहीं. अश्रु ढाळीत ते केवळ एकमेकांकडे पहात स्तब्ध राहिले ! १५. १. ९.

---

## अध्याय १० वा.

[ १. धृतराष्ट्राची शेवटची प्रार्थना. २ प्रजेचा प्रतिनिधि म्हणून एका ब्राह्मणाचें त्याला उत्तर ].

( १ ) **वैशंपायन**—राजा, धृतराष्ट्राच्या शब्दांनीं दुःखित होऊन भ्रमिष्टासारखे झालेले ते सारे प्रजाजन जरा शांत होतांच तो त्यांना पुनः म्हणाला, 'सज्जन हो, वृद्ध व हतपुत्र अशा मला धर्मपत्नी गांधारीसह वनांत जावयास अनुज्ञा द्या. मीं दीन होऊन आपली अनेक प्रकारें मस्तक लववून पुनः पुनः प्रार्थना करीत आहें. व्यासपित्यानें स्वतः मला अनुज्ञा दिली आहे, तशीच धर्मवेत्त्या युधिष्ठिरानेंहि दिली आहे. तरी तुम्हीहि कृपाकरून मला संमति द्यावी.' त्याचे ते करुण शब्द ऐकून त्या कुरुजांगलवासी सर्व लोकांना रडें कोसळलें. आपल्या हातांनीं व वस्त्रांनीं तोंडें झांकून ते मात्यापित्यांसमान अशा त्या वृद्धांकडे पाहून दुःखानें रडूं लागले. धृतराष्ट्र वनांत जाणार या विचारानें त्यांचें हृदय शून्य झालें व तें दुःख सहन करण्याच्या प्रयत्नानें ते बहुतेक निश्चेष्ट झाले. धृतराष्ट्राच्या वियोगाचें दुःख आवरण्याचा प्रयत्न करीत ते आपसांत कुजबुजूं लागले. त्यांनीं आपले विचार एकत्र करून कसे बसे एका ब्राह्मणाला सांगितले. तो ब्राह्मण सदाचरणी व सर्वांना मान्य असून ज्ञाता होता. त्याचें नांव सांब असून तो ऋग्वेदी होता. धृतराष्ट्राची अनुमति घेऊन व सभाजनांस शांत करून तो गंभीर व बुद्धिवान् ब्राह्मण त्याला म्हणाला, 'महाराज, या प्रजाजनांनीं आपल्या प्रश्नाला काय उत्तर द्यावयाचें तें माझ्यावर सोंपविलें आहे, तरीं मी तें आपल्याला सांगतों व आपण कृपा करून त्याचा स्वीकार करावा. महाराज, आपण सांगितलें तें सर्व ठीकच आहे. त्यांत असत्य कांहींच नाहीं. आपलें परस्परांचें प्रेम आपण म्हटलें तसें आहेच. आपल्या वंशांतील कोणीहि राजे प्रजापालन करीत असतां प्रजेला अप्रिय झालेले नाहींत. आपण सर्वांनीं मातापित्यांप्रमाणें आमचें पालन केलें आहे. दुर्योधन राजानेंहि आमचें कांहीं अप्रिय केलेलें नाहीं. तरी धर्मज्ञ

व्यासमुनि म्हणतात तसें तुम्ही करावें. तेच आमचे श्रेष्ठ गुरु आहेत. पण आपण आम्हाला सोडून गेल्यानें आम्हाला दीर्घकाळपर्यंत फार दुःख होईल. आपल्या शेंकडों गुणांनीं आम्हीं मोहून गेलों आहों. शांतनू व चित्रांगद यांनीं जसें प्रजापालन केलें, किंवा भीष्माच्या छत्राखालीं आपला पिता जो विचित्रवीर्य त्यानें जसें केलें, किंवा आपल्या नजरेखालीं पांडुराजानें जसें केलें, तसेंच दुर्योधन राजानेंहि उत्तम प्रकारें प्रजापालन केलें. आपल्या पुत्राच्या हातून आमच्याविषयीं कांहीं कपटकृत्य घडलेलें नाहीं. पित्यावर असावा तसा विश्वास आम्हां सर्वांचा त्याच्यावरहि होता व आपल्यालाहि तें ठाऊक आहेच. यापुढें कुंतीपुत्र युधिष्ठिराच्या कृपाछत्राखालींहि आम्हाला हजारों वर्षें सुखाचा लाभ होईल. आपल्या कुलांतील कुरु, संवरण, भरत इत्यादि प्राचीन पुण्यशील राजांचेंच धर्मात्मा युधिष्ठिर अनुकरण करीत आहे. आतां या बाबतींत बारीक सारीकहि सांगण्यासारखें राहिलेलें नाहीं. आपल्या संरक्षणछत्राखालीं आम्हीं नित्य सुखानें राहिलों आहों. आपल्या पुत्रानें आमच्याशीं कांहीं एक कपट केलेलें नाहीं. आपण दुर्योधनाविषयीं या सभेंत जें सांगितलें, त्या संबंधानें आपल्याला कांहीं सांगावेंसें मला वाटतें.

महाराज, ज्या कांहीं बऱ्या वाईट गोष्टी घडून कुरुकुलाचा नाश झाला, त्या दुर्योधनानें केलेल्या नाहींत किंवा आपणहि केलेल्या नाहींत. कर्ण व शकुनि यांच्याकडेहि त्यांचें कर्तृत्व नाहीं. ज्याचा प्रतिकार कधींच करतां येत नाहीं, त्या दैवाचा हा सारा खेळ होय असें आम्ही म्हणतों. अठरा अक्षौहिणी सैन्य एकत्र जमलें व अठरा दिवसांत कौरव योद्धयांनीं व भीष्म, द्रोण, कर्ण, सात्यकि, धृष्टद्युम्न, पांडव यांनीं त्याचा नाश करून टाकला! महाराज, एवढा क्षय काय दैवाच्या सामर्थ्यावांचून झाला? रणांगणांत मरणें हें उक्तच आहे व विशेषतः क्षत्रियांचें तर तें अवश्य कर्तव्य आहे. अशा मोठमोठ्या विद्याशौर्ययुक्त पुरुषांनीं हत्ती घोडे रथ इत्यादिकांसह सर्व सैन्याचा जो नाश केला, त्याचें व त्यांत झालेल्या शेंकडों राजांच्या वधाचें कारण एकटा दुर्योधनच म्हणावयाचा काय? जसा तो त्याचें कारण नाहीं, तसे आपण, आपले सेवक, कर्ण, शकुनि, इत्यादिकहि त्या सहस्रावधि राजांच्या नाशाचे धनी नाहींत. हें सारें दैवाचें करणें आहे. याविषयीं आणखी कोण काय सांगेल? आपण या सर्व राज्याचे गुरु व स्वामी आहां. त्या आपल्या धर्मज्ञ पुत्राला आम्ही दोषी ठरवीत नाहीं. आपल्या साह्यकर्त्यांसह तो वीरलोकीं जाईल व श्रेष्ठ ब्राह्मणांच्या आशीर्वादानें त्याला स्वर्गांत सुखप्राप्ति होईल. महाराज, आपल्यालाहि धर्माचें उत्तम फल प्राप्त होईल; मात्र आपलें व्रत



धृतराष्ट्र वनवासास निघतो.

(पृ. ५९७)

ण, सोमदत्त, बाल्हीक यांचीं तशींच आपल्या पुत्रांचीं व जयद्रथादि बांधवांचीं
णि मित्रांचीं श्राद्धें करावीं असें त्याच्या मनांत आलें असून त्यासाठीं तो कांहीं
य मागत आहे.'

राजा, विदुराचें हें बोलणें ऐकून युधिष्ठिर व अर्जुन यांनीं त्याला आनंदानें
न्यता दिली. पण दुर्योधनाचे अपराध आठवून भीमाला मात्र मोठा राग
ला आणि त्यानें तें बोलणें झिडकारिलें. तेव्हां त्याचा अभिप्राय लक्षांत आणून
र्जुन त्याला नम्रपणें म्हणाला, 'भीमदादा, वृद्ध पिता धृतराष्ट्र वनास जाव-
स सिद्ध झाला असून भीष्मादि मृत इष्टमित्रांचें श्राद्ध करूं इच्छित आहे व
जिंकून आणलेलें द्रव्य त्या कामीं लावूं पहात आहे. तर देईनास कां अनुज्ञा? दादा,
तराष्ट्र आपल्याजवळ याचना करतो ही काय आपल्या दृष्टीनें लहान गोष्ट आहे?
ळाचा महिमा कसा आहे पहा! ज्याजवळ आपण पूर्वीं याचना करीत होतों,
' हा सर्व राज्याचा स्वामी धृतराष्ट्र अमात्यादिकांचा नाश शत्रूंकडून झाल्यामुळें
ज वनवास पत्करण्यास सिद्ध झाला आहे. यासाठीं तो मागतो तें द्रव्य देण्या-
चून दुसरा विचारच करूं नको. दुसरा कोणताहि विचार या प्रसंगीं अनुचित
अधर्माचा होईल. धर्मराजालासुद्धां तूं सांग कीं "या वेळीं द्रव्य देणेंच युक्त
सून, घेणें अनुचित होईल. अर्जुनाच्या या भाषणाला युधिष्ठिरानें मान डोल-
ली; पण भीमाला मात्र संताप येऊन तो म्हणाला, 'अर्जुना, भीष्माचें श्राद्ध
पणच करूं; तसेंच सोमदत्त, भूरिश्रवा, बाल्हीक, द्रोण, आणि इतर बांधव
चींहि करूं. कुंती कर्णाचें करील. पण धृतराष्ट्रानें तीं काय म्हणून करावयाचीं?
त्रूंनीं आम्हाला निन्दूं नये म्हणून मला असें वाटतें. नरकांत जाऊं देत दुर्यो-
नादि सारेजण! त्या कुलांगारांनीं साऱ्या राज्याची नासाडी करून टाकिली.
र्जुना, तें बारा वर्षांचें वैर विसरलास कीं काय? तो द्रौपदीचा शोकवर्धक
ज्ञातवास तुझ्या स्मरणांतून गेला वाटतें? त्यावेळी कोठें गेलें होतें हें सारें
तराष्ट्राचें आमच्यावरचें प्रेम? अर्जुना, हरणाचें कातडें पांघरून, सारे अलंकार
सारीं भूषणें टाकून द्रौपदीसह तूं जेव्हां धृतराष्ट्राचा निरोप घेण्यास गेलास,
वेळीं भीष्म, द्रोण, सोमदत्त हे कोठें गेले होते? जेव्हां तेरा वर्षें तुम्हीं
नांत कंदमुळें खाऊन काढिलींत, तेव्हां कसें नाहीं त्या वृद्धानें तुम्हांकडे प्रेमानें
हिलें? अर्जुना, हा दुष्टबुद्धीचा कुलांगार धृतराष्ट्र द्यूत चाललें असतां,
आपल्या दुर्योधनानें कायरे जिंकलें?" असें विदुराला विचारी, तें तूं विसरून
लास काय?'

म. भा. १२-३८

याप्रमाणें भीम रागावून बोलत असतां सुज्ञ युधिष्ठिरानें, 'भीमा, स्वस्थ बस कसा' असें त्याला दटावून सांगितलें. १५. १. ११.

## अध्याय १२ वा.

[ १. धृतराष्ट्राला द्रव्य देण्याला युधिष्ठिराची संमति ]

( १ ) **अर्जुन**:—भीमदादा, तूं माझा वडील बंधु आहेस, तेव्हां मी तुला काय बोलावें ? परंतु कांहीं झालें तरी धृतराष्ट्र महाराजांच्या शब्दाला आपण मान देणें अवश्य आहे. सज्जन असतात ते सदाचरणाच्या मर्यादा ओलांडीत नाहींत. ते लोकांचे अपराध विसरतात व त्यांच्या सत्कृत्यांची मात्र आठवण ठेवतात.' महात्म्या अर्जुनाचें हें बोलणें ऐकून युधिष्ठिर विदुराला म्हणाला, 'विदुरा, मी म्हणतों म्हणून धृतराष्ट्राला सांग कीं, पुत्रांचें व भीष्मादि बांधवांचें श्राद्ध करण्यासाठीं द्रव्य जितकें पाहिजे तितकें मी देतों. तें मी आपल्या स्वतःच्या कोशांतून देईन, म्हणजे भीमालाहि वाईट वाटावयास नको.'

विदुराला असें सांगून युधिष्ठिरानें अर्जुनाच्या बोलण्याचें अभिनंदन केलें. पण भीम मात्र अर्जुनाकडे रागानेंच पहात राहिला. तेव्हां धर्मराज पुनः विदुराला म्हणाला, 'धृतराष्ट्राला भीमावर रागावण्याचें कारण नाहीं. वनवासांत असतां भीमाला थंडी, पाऊस, ऊन यांपासून केवढे क्लेश झाले हें तुम्हाला ठाऊकच आहे. तेव्हां धृतराष्ट्राला माझा असा निरोप सांग कीं, तुम्हाला जेवढें द्रव्य पाहिजे असेल तेवढें माझ्याकडून घेऊन जा. भीम पूर्वीचें दुःख स्मरूनच रागावत आहे, म्हणून त्याचा विषाद मानूं नका. जें द्रव्य माझ्या किंवा अर्जुनाच्या घरांत आहे, त्यांचा स्वामी धृतराष्ट्रच आहे. ब्राह्मणांना जें कांहीं द्यावें असें त्याला वाटत असेल तें देण्यासाठीं त्यानें त्याचा व्यय खुशाल करावा. पुत्र व बांधव यांच्या ऋणांतून त्याला मुक्त होऊं दे. विदुरा, त्याला आणखी सांग कीं माझें हें शरीरहि त्याच्याच स्वाधीन आहे; मग धनाची कथा काय ? त्यांनी संशय बाळगण्याचें कारणच नाहीं. १५. १. १२.

## अध्याय १३ वा.

[ १. विदुर धृतराष्ट्राला युधिष्ठिराचा निरोप सांगतो. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, धर्मराजानें असा निरोप सांगितला असतां घेऊन विदुर धृतराष्ट्राकडे गेला व त्याला त्यानें तो नीटपणें सांगितला. तो णाला, ' धृतराष्ट्रा, तुझा निरोप मी युधिष्ठिराला सांगितला, तो ऐकून त्याला नंद झाला व त्यानें आपल्या विचाराची प्रशंसा केली. अर्जुनानेंहि तसेंच ें व ते दोघे आपल्या घरीं असलेलें द्रव्य तुला देण्यास सिद्ध असून णहि तुझ्यासाठीं वेचूं म्हणतील. युधिष्ठिर तर तुझ्या पुत्रासारखाच असून आपलें राज्य, प्राण, धन किंवा इतर जें पाहिजे तें तुला अर्पण करण्यास ाद्ध आहे. भीमानें मात्र मागचीं दुःखें आठवून मोठ्या कष्टानें कसें बसें त्याला नुमोदन दिलें; कारण धर्मशील धर्मराज व अर्जुन यांनीं त्याची विनवणी करून ाची समजूत काढिली. धर्मानें आणखी विशेष सांगितलें आहे कीं झाल्या ाराबद्दल रागावूं नये, भीम जें बोलला तें मागील वैर आठवून रागानें बोलला, ाकडे लक्ष देऊं नये. धृतराष्ट्रा, हा अशा प्रकारचा क्षत्रियांचा धर्मच हे. भीम क्षत्रियवृत्तींत तल्लीन झालेला असल्यामुळें त्याच्या बाजूनें म्हणून धिष्ठिर व अर्जुन यांनीं ही विनंति केली आहे. तेव्हां तुम्हींच सर्वांचे धनी सल्यामुळें लागेल तेवढें धन आणून त्याचा व्यय करावा. ब्राह्मणांना अग्रहार गें, पुत्रादिकांचीं श्राद्धें करणें, यांसाठीं जीं रत्नें, गाई, दासदासी तुला हवीं सतील, तीं आण आणि ब्राह्मण, दीन, दुबळे, अंधळे, यांना दे. मला त्यानें न्न, पेयें, खाद्यें इत्यादिक सामग्री भरपूर ठेवून मंडप बांधण्यास व गाईंसाठीं ाण्याच्या तेवया ठेवण्यासहि सांगितलें आहे. तरी याउपर तुम्हाला जें करावें सें वाटेल तसें करा." विदुराचें बोलणें ऐकिल्यावर धृतराष्ट्रानें समाधान प्रकट लें आणि कार्तिकी पौर्णिमेला सर्व दानें देण्याचा बेत ठरविला. १५. १. १३.

---

## अध्याय १४ वा.

[ १. धृतराष्ट्राचा श्राद्धानिमित्त दानधर्म. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, विदुरानें सांगितलेल्या निरोपानें धृतराष्ट्राला आनंद ोऊन युधिष्ठिर व अर्जुन यांच्याविषयीं प्रेम वाटलें. मग त्यानें सहस्रावधि उत्तम ऋषि व ब्राह्मण यांना निमंत्रण करून भीष्म, आपले पुत्र व इतर बांधव यांच्या-

प्रीत्यर्थ त्यांना सुग्रास भोजन घातलें, वस्त्रें दिलीं, दासदासी दिल्या, सुवर्ण, रत्नें, इत्यादि अर्पिलीं, त्याचप्रमाणें गाड्याघोडीं व बोकड व मेंढेहि दिले. प्रत्येक ब्राह्मणाचा विचार करून त्यांना कांबळीं, गांव, शेतें, द्रव्य, सालंकृत अश्व व घोडे, त्याचप्रमाणें सुंदर कन्या पाहून पाहून त्यानें दिल्या. द्रोण, भीष्म, सोमदत्त, बाल्हीक, दुर्योधन व इतर पुत्र, जयद्रथादि मित्र, इत्यादि सर्वांचीं नांवें घेऊन त्यांप्रीत्यर्थ त्यानें तीं दानें दिलीं. हा श्राद्धयज्ञ युधिष्ठिराच्या संमतीनें मोठ्याच प्रमाणावर द्रव्यदक्षिणा देऊन करण्यांत आला. त्या कामासाठीं अनेक सेवक व लेखक ठेविलेले असून युधिष्ठिराच्या सांगण्यावरून ते धृतराष्ट्राला विचारीत 'महाराज, या ब्राह्मणास काय द्यावें तें सांगा?' व त्यावर धृतराष्ट्र उत्तर देईल त्याप्रमाणें जवळच्या वस्तूंतून काढून ते देत असत. कोणाला 'शंभर दे' म्हणून त्यानें सांगितल्यास ते युधिष्ठिराच्या सांगण्याप्रमाणें सहस्र देत, 'सहस्र दे' म्हटल्यास ते दहासहस्र देत. याप्रमाणें धृतराष्ट्ररूपी मेघ द्रव्याच्या धारांचा वर्षाव करून त्या ब्राह्मणांना संतोषवीत होता. ब्राह्मणांना तृप्त केल्यावर मग त्यानें इतर वर्णांनांहि अन्नपान व रस यांच्या प्रवाहांत जणूं बुडवूनच काढिलें. राजा, त्या ठिकाणीं रत्नें व सोनें यांचा मोठा समुद्रच पसरला असून वस्त्रें, द्रव्य व रत्नें यांचे प्रवाह येऊन पडत होते, मृदंगांचा गंभीर घोष होत होता, गाई घोडे हत्ती हे त्यांत भ्रमण करीत होते, लक्षावधी रत्नें त्यांत पडलीं होतीं, गांवें व अग्रहार यांच्या बेटांनीं तो गजबजलेला होता व धृतराष्ट्ररूपी नाव त्यांत लहरी उत्पन्न करीत असून तो याचकरूपी जगाला बुचकळून काढीत होता.

याप्रमाणें पुत्रपौत्रांच्या तसेंच पितरांच्या प्रीत्यर्थ श्राद्धविधि करून धृतराष्ट्रानें स्वतःची व गांधारीचीहि और्ध्वदेहिक क्रिया करून घेतली. त्या अनेकविध दानांनीं जेव्हां तो अगदीं थकून गेला, तेव्हां त्यानें तो दानयज्ञ समाप्त केला. या दानयज्ञांत नट, नर्तक इत्यादिकांचा सत्कार करण्यांत आला व अन्नदान, रसदान व दक्षिणादान भरपूर करण्यांत आलें. या प्रमाणें दहा दिवस दानयज्ञ केल्यावर पुत्रपौत्रादिकांच्या ऋणांतून आपण मुक्त झालों असें धृतराष्ट्राला वाटलें. १५. १. १४.

---

# अध्याय १५ वा.

[ १. धृतराष्ट्र वनवासास निघतो. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, मग दुसरे दिवशीं तो अंबिकापुत्र धृतराष्ट्र राजा वनवासास जाण्याचा निर्धार करून पांडववीरांना हाक मारून गांधारीसह घराबाहेर पडला. कार्तिकांतील पूर्णमास इष्टि त्यानें वेदपारंगत ब्राह्मणांकडून करविली, वल्कलें व हरिणांचीं कातडीं पांघरलीं आणि अग्निहोत्राचें साहित्य बरोबर घेऊन तो निघाला. तो निघाला असतां कौरवपांडवांच्या स्त्रिया तशाच दुसऱ्या त्यांच्या संबंधी स्त्रिया तेथें होत्या त्याहि मोठ्यानें रडूं लागल्या. धृतराष्ट्रानें लाह्यांनीं व अनेक रंगांच्या फुलांनीं तें घर सुशोभित करविलें होतें. सेवकवर्ग आणि इतर सर्व यांना त्यानें द्रव्यदानानें संतुष्ट केलें होतें. त्या सर्वांना सोडून तो निघाला हें पाहून राजा युधिष्ठिरानें हात जोडले. त्याचें शरीर कांपूं लागलें व कंठ सद्गदित होऊन तो 'बाबा, कोठें हो चाललां ?' असें म्हणून गळा काढून रडत रडत भूमीवर पडला. तेव्हां स्वतः तीव्र दुःखानें वेडा झालेला असतांहि अर्जुन दीर्घश्वास टाकीत त्याला धरूं लागला. भीम, नकुल, सहदेव, विदुर, संजय, तसेच धौम्य व गौतम हे ब्राह्मणहि त्याच्या मागून रडत रडत चालूं लागले. डोळे बांधलेली गांधारी कुंतीच्या खांद्यावर हात ठेवून चालूं लागली व तिच्या खांद्यावर हात देऊन धृतराष्ट्र चालला. त्यांच्यामागून द्रौपदी, सुभद्रा, आपल्या लहान बाळासह उत्तरा, चित्रांगदा आणि इतर कांहीं स्त्रिया आपल्या सुनांसह चालत होत्या. दुःखानें त्या रडूं लागल्या, तेव्हां त्यांचा तो शब्द कुररींच्या शब्दाप्रमाणें अत्यंत करुणास्पद होता. त्यांच्यामागून हस्तिनापुरांतील इतर ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांच्याहि स्त्रिया घरांतून बाहेर आल्या. धृतराष्ट्रादिकांच्या या निर्याणामुळें सगळेंच प्रजाजन दुःखित होऊन गेले. पूर्वीं द्यूतप्रसंगीं कौरवसभेंतून पांडव वनवासासाठीं बाहेर पडले असतां जो प्रकार हस्तिनापुरांत दिसला, त्याचीच पुनरावृत्ति याहि प्रसंगीं झाली. ज्या स्त्रियांनीं चंद्रसूर्याचेंहि कधीं पूर्वीं दर्शन घेतलें नव्हतें, त्याहि यावेळीं म्हणजे धृतराष्ट्र गांधारीसह महावनांत जावयास निघाला असतां शोकानें व्याकुळ होऊन भराभर राजमार्गावर धांवत आल्या ! १५. १. १५.

## अध्याय १६ वा.

[ १. युधिष्ठिर परत फिरतांना कुंतीचेंहि मन वळवूं पहातो. २ भीमाची तिला विनंति व तिचा निश्चय. ]

( १ ) **वैशंपायन**:—राजा, धृतराष्ट्र हस्तिनापुरांतून बाहेर पडला, तो वर्द्धमान द्वारांतून पडला. हात जोडून तो कांपत कांपत निघाला, तेव्हां नगरांतील वाड्यांच्या गच्चयांवर आणि भूमीवरहि स्त्रीपुरुषांच्या रडण्याचा आर्त शब्दच सर्वत्र ऐकूं आला. स्त्रीपुरुषांनीं गजबजून गेलेल्या राजमार्गानें तो चालूं लागला असतां तो वारंवार लोकांना सांगे, ‘ बाबांनो, आतां मागें फिरा. ’ विदुर आणि गावल्गणिपुत्र संजय हे मात्र धृतराष्ट्राबरोबरच सज्ज होऊन निघाले. पण कृपाचार्य आणि आपला महारथी पुत्र युयुत्सु यांना धृतराष्ट्राजानें मागें परतविलें व त्यांना युधिष्ठिराच्या हातीं दिलें. याप्रमाणें प्रजांचा घोळका मागें वळल्यावर धृतराष्ट्राची संमति घेऊन युधिष्ठिर स्त्रीवर्गासह परत फिरण्याचा विचार करूं लागला. पण कुंती वनांत जाण्यास सिद्ध झालेली पाहून तो तिला म्हणाला, ‘माते, मींच महाराजांबरोबर वनास जातों, तूं आपल्या सुनांसह नगरांत परत जा. तप करण्याचा त्यांनीं निश्चय केल्यामुळें त्यांना जाऊं दे. ’ पण युधिष्ठिरानें असें सांगितलें असतां शोकानें डोळे अश्रुभरित झालेले असतांहि कुंती गांधारीला धरून पुढें चालूं लागली.

तिनें युधिष्ठिराला म्हटलें, ‘ सहदेवावर तूं केव्हांहि रागावूं नको. त्याचें माझ्यावर जसें तसेंच तुझ्यावरहि मोठें प्रेम आहे. तशीच रणांगणांतून कधींहि मागें पाऊल न घेणाऱ्या कर्णाची सतत आठवण ठेव. म्यां वेडीनें त्या वीराला समरांगणावर तसाच सोडून दिलें. त्याचें दर्शन होणें अशक्य झाल्याबरोबर माझें हतभाग्येचें हृदय फुटून ज्याअर्थी त्याचे शेंकडों तुकडे झाले नाहींत, त्याअर्थी तें खरोखर लोखंडाचेंच केलेलें असावें ! युधिष्ठिरा, अशा स्थितींत मीं यापुढें काय करूं शकणार आहें ? मी पूर्वींच तुमची व कर्णाची ओळख पटवून दिली नाहीं हा खरोखर माझाच दोष. पण, युधिष्ठिरा, त्याच्या नांवानें तूं कांहीं उत्तम दान आपल्या बंधूंसह नित्य देत अस. द्रौपदीला वाईट वाटेल असें कांहीं कधीं करूं नको. आतां कुलाचा भार तुझ्यावर येऊन पडला आहे. तरी भीम, अर्जुन, नकुळ यांच्यावर लक्ष ठेव व त्यांना संतुष्ट राख. पापानें मळलेली मी तप करीत सासूसासऱ्यांचे ( धृतराष्ट्र-गांधारींचे ) पाय चेपून त्यांची सेवा करीत वनांतच राहीन. ’

राजा, कुंतीनें युधिष्ठिरादि बंधूंना असें सांगितलें असतां ते विषण्ण झाले व त्यांच्या तोंडून शब्द निघेना. पण क्षणभर चिंतन केल्यावर चिंता व शोक यांनीं उद्विग्न झालेला युधिष्ठिर दीनवाणीनें मातेला पुनः म्हणाला, 'आई, काय तूं हा निश्चय केलास ? असें बोलणें तुला उचित नाहीं. मी तुला वनांत जाण्यास कशी संमती देऊं ? माझ्यावर कृपा कर. आई, तुझें दर्शन आम्हाला किती प्रिय वाटतें बरें ! पूर्वीं तूंच ना आम्हांत उत्साह ओतून व विदुलेची कथा सांगून कार्याला उद्युक्त केलेंस ? मग आतां आम्हाला सोडून कां बरें जातेस ? अनेक राजांचा वध करून आम्हीं हें राज्य मिळविलें तें तुझ्या उपदेशावर आणि कृष्णाच्या बळावर ! तेव्हांची तुझी ती मनःस्थिति आज कां बरें दिसत नाहीं ? क्षात्रधर्माचा उपदेश मला तूंच केलास आणि आतां तूंच त्यापासून दूर राहण्याची कशी इच्छा करतेस ? आम्हांला आणि या तुझ्या सुनांना व राज्यवैभवाला सोडून तूं कठीण अशा वनांत कशी बरें रहाशील ? तरी माझ्यावर कृपा कर.'

युधिष्ठिर डोळ्यांत आसवें आणून हे करुण शब्द बोलत असतां ते ऐकून कुंतीच्याहि डोळ्यांना पाणी आलें. तेव्हां भीम तिला म्हणाला, 'आई, आज असा प्रसंग आहे कीं तुझ्या पुत्रांनीं जिंकिलेल्या या राज्याचा उपभोग तूं आनंदानें घ्यावयाचा व राजधर्माचें आचरण करावयाचें, तें सोडून तूं हें काय मनांत आणिलेंस ? असें जर तुला करावयाचें होतें, तर आमच्याकडून एवढा पृथ्वीचा क्षय तरी कशाला करविलास ? आतांच काय हेतु मनांत धरून तूं वनांत चाललीस ? प्रथमच आम्हांला आम्ही लहान असतांना वनांतून तूं घरीं कशाकरितां आणिलें ? आई, हे पहा नकुळ व सहदेव कसे दुःखानें व्याप्त झाले आहेत. तर कृपा कर आणि आतां तूं वनांत जाऊं नको. कांहीं काळ तरी बळानें मिळविलेल्या या युधिष्ठिराच्या राज्यलक्ष्मीचा, आई, उपभोग घे." राजा, याप्रमाणें नानाप्रकारें पुत्र विनवणी करीत होते, पण एकदां कुंतीनें जो वनांत जाण्याचा निश्चय केला, त्यापासून ती ढळली नाहीं. मुलांचें बोलणें तिला पटलें नाहीं. द्रौपदी खिन्नवदन होऊन सासूच्या मागून रडत रडत हळुहळु चालत होती. सुभद्राहि तसेंच करीत होती. रडत असलेल्या आपल्या पुत्रांकडे वारंवार कुंती वळून पाही. पण वनांत जाण्याचा केलेला निश्चय लक्षांत ठेवून ती खोल बुद्धीची स्त्री पुढें पावलें टाकीतच चालली. पांडवहि मागें न वळतां सेवक व स्त्रिया यांसह तिच्यामागून चालत राहिले. शेवटीं तिनें डोळे पुसले आणि त्यांच्याशीं ती बोलूं लागली. १५. १. १६.

---

## अध्याय १७ वा.

[ १. कुंतीचें पांडवांना उत्तर. ]

( १ ) कुंती—युधिष्ठिरा, तूं म्हणालास तें ठीक आहे. अरे, पूर्वी तुमचें राज्य द्यूतांत हरून तुम्हीं सुखभ्रष्ट होऊन कष्टांत सांपडलां, म्हणून मी तुमचा उठाव केला. तुमच्या बांधवांनींच तुमचा छळ केला, म्हणून तुमचा उद्धार करणें मला भाग होतें. पांडुराजाच्या संततीचा उच्छेद होऊं नये, तुमचें यश नष्ट होऊं नये, म्हणून मी तुमच्यांत आवेश उत्पन्न केला. तुम्ही देवसारखे, इन्द्रा-सारखे पराक्रमी असतां, केवळ दुसऱ्यांच्या तोंडाकडे पहात रहाण्याचा तुमच्यावर प्रसंग यावा, हें मला पहावेना, म्हणून मी तसें केलें. युधिष्ठिरा, धर्मशीलांत श्रेष्ठ व इंद्रासमान असा राजा तूं असल्यामुळें तुला पुनः वनवासाचें दुःख होऊं नये म्हणून मी ती उठावणी केली. दहा सहस्र नागांचें बळ असलेला व सामर्थ्य आणि प्रताप यांविषयीं विख्यात झालेला हा भीम लयास जाऊं नये म्हणून मी तुम्हांमध्यें आवेश संचरविला. हा भीमानुज अर्जुन कष्टी होऊं नये म्हणून तो खटाटोप मला करावा लागला. ही श्यामा द्रौपदी कौरवसभेंत एकदां कष्ट पावली, तसा प्रसंग पुनः येऊं नये म्हणून मी तें सर्व केलें. भीमा, सर्वांसमक्ष ही द्रौपदी रजस्वलावस्थेंत असतांना द्यूतांत हरविली गेली म्हणून दुःशासनानें जेव्हां तिला दासी म्हणून ओढिलें व ती कांपूं लागली, तेव्हांच मला कळून चुकलें कीं दुःशासनाच्या मूर्खपणामुळें कौरवकुलाचा नाश जवळ आला ! माझे भीष्मादि श्वशुर व इतर कौरव तेथेंच बसले असतांना तिला दीनपणें कुवरीप्रमाणें दैवावर भरंवसा ठेवीत रडावें लागलें ! पापी दुःशासनानें तिचे केश धरून ओढिले, तेव्हां मला तर मूर्च्छा आली व तुम्हामध्यें चेतना उत्पन्न करावी म्हणून मी तुमची उठावणी केली व त्यासाठीं विदुलेनें पुत्राला केलेला उपदेश मी तुम्हाला सांगितला. हा राजवंश माझ्या पुत्रांपर्यंत आला असतां येथेंच त्याचा अंत होऊं नये, पांडुराजाच्या पुत्रांचा नाश होऊं नये म्हणून मला तुम्हांमध्यें उत्साह उत्पन्न करणें अवश्य होतें. कारण ज्या पुरुषापासून वंशाचा अंत होतो, त्याला पुण्यलोक मिळत नाहींत असें म्हणतात. मुलांनो, माझ्या पतीनें राज्यभोग भरपूर भोगिले, मोठमोठीं दानें दिलीं, सोमयज्ञ करून यथा-विधि सोमपानहि केलें. तेव्हां मला स्वतःला त्यांची आणखी इच्छा नव्हती व मला ते मिळावे म्हणून कांहीं मी कृष्णाला पुढें ढकलिलें नाहीं. विदुलेचे प्रखर

बोल मी तुम्हाला सांगितले ते तुमच्याच बऱ्यासाठीं. मुलांनीं जिंकिलेलें राज्य भोगावें अशी मला इच्छा नाहीं. मला पवित्र असा पतिलोक तपानेंच मिळणार आहे. त्यासाठीं वनवासी सासूसासऱ्यांची मी वनांत सेवा करून हें शरीर झिजविणार आहें. युधिष्ठिरा, आतां तूं भीमादिकांसह घरीं परत जा. धर्मावर निष्ठा ठेव आणि तुझें मन फार मोठें असूं दे. १५. १. १७.

---

## अध्याय १८ वा.

[ १. कुंतीच्या सांगण्यावरून पांडव परत फिरतात. २ भागीरथीच्या तीरीं धृतराष्ट्रादिकांचा पहिला निवास ]

( १ ) **वैशंपायन**:—राजा, कुंतीचें भाषण ऐकून पांडवांना लाजल्यासारखें झालें व ते द्रौपदी आदिकरून स्त्रियांसह परत फिरले. कुंती चालली हें पाहून त्या सर्व स्त्रिया मोठा गळा काढून रडूं लागल्या व त्यांना रडतांना पाहून सर्वांनाच मोठा हुंदका आला. युधिष्ठिरादि बंधु धृतराष्ट्राला उजवा घालून व त्याला वंदन करून कुंतीला परत फिरविण्यास असमर्थ होत्साते मागें वळले, तेव्हां धृतराष्ट्र गांधारी व विदुर यांची संमति घेऊन म्हणाला, ‘ कुंतीनेंहि परत फिरावें, हें चांगलें. युधिष्ठिर म्हणाला तें सर्व खरें आहे. पुत्रांचें महाफलदायी असें हें मोठें ऐश्वर्य सोडून व पुत्रांचा त्याग करून कोणती स्त्री वेड्यासारखी गहन अरण्यांत रहावयास जाईल ? तिला तप करावयाचें किंवा दानें व व्रतें आचरावयाचीं तर तीं राज्यांत राहूनहि तिला तीं करतां येतील. तर माझें म्हणणें असें कीं, हे गांधारि, कुंतीच्या सेवेनें मीं संतुष्ट झालों आहें, म्हणून तिला परत जावयास तूं संमति दे. ’ धृतराष्ट्रानें असें सांगितलें असतां गांधारीनें कुंतीला तें सर्व आणखी आपल्या पदरची भर घालूनहि सांगितलें. पण एकदां वनवासाचा निश्चय केलेल्या धर्मनिष्ठ सती कुंतीचें मन तिलाहि वळवितां आलें नाहीं. तिचा तो निश्चय पाहून आणि इतर पुरुषमंडळीहि मागें फिरूं लागलेली पाहून द्रौपदी सुभद्रा इत्यादि कुरुस्त्रियांना मोठ्यानें रडूं कोसळलें व त्याहि कष्टानें परत फिरल्या. याप्रमाणें सर्व स्त्रीपुरुष मंडळी माघारी गेल्यावर धृतराष्ट्र गांधारी कुंती इत्यादिकांसह वनांत चालता झाला. तो दिसेनासा झाल्यावर दीन होऊन गेलेली सर्व पांडवमंडळी दुःखित अंतःकरणानें आपापल्या वहानांत बसून हस्तिनापुरांत आली.

( २ ) त्यावेळीं सारें हस्तिनापुर आबालवृद्ध प्रजाजनांसह निरुत्साह, आनंद-रहित व कष्टी होऊन गेलेलें होतें. गाईच्या अभावीं वासराची स्थिति व्हावी तशी त्या सर्वांची झाली होती. असो. इकडे धृतराष्ट्रादि मंडळी जी निघाली ती त्या दिवशीं फारच अंतर चालून जाऊन शेवटीं भागीरथीच्या तीरावर तळ देऊन राहिली. तेथें वेदपारंगत ब्राह्मणांनीं रीतीप्रमाणें सिद्ध केलेले अग्नि ठिकठिकाणीं झळकत होते. धृतराष्ट्रानेंहि तेथें एका ठिकाणीं आपला अग्नि मांडिला व त्याची उपासना करून त्याला आहुति दिल्यावर तो संध्याकाळीं सूर्याचें उपस्थान करूं लागला. त्याचा हा विधि चालला असतां विदुर व संजय यांनीं त्याच्यासाठीं दर्भांची शय्या केली व जवळच दुसरी गांधारीसाठींहि केली. कुंतीनें गांधारीच्या जवळच दर्भ पसरून त्यांवर सुखानें शयन केलें. त्यांची हाक ऐकूं येईल इतक्या अंतरावर विदुर व संजय हे बसले. त्यांच्याबरोबर जे याज्ञिक ब्राह्मण आले होते तेहि आपआपल्या योग्यतेप्रमाणें त्यांच्या जवळच बसले. ती रात्र त्यांनीं वेदाध्ययन करण्यांत घालविली. जवळ अग्नि प्रज्वलित झालेले असल्यामुळें ती त्यांनीं ब्राह्मी रात्रीप्रमाणें आनंदानें घालविली. रात्र संपून उजाडलें, तेव्हां सर्वांनीं उठून प्रातःकर्में केलीं. नंतर अग्नीला विधियुक्त आहुति दिल्यावर तीं पुढें चालूं लागलीं व उपवास करीत उत्तरेस तोंड करून मार्गक्रमण करीत राहिलीं. त्यांचा तो प्रथम दिवशींचा निवास सर्व नागरिक व प्रजाजनांच्या शोककल्लोळामुळें मोठ्या कष्टाचा झाला. १५. १. १८.

---

## अध्याय १९ वा.

[ १. धृतराष्ट्राचा शतयूप राजाच्या आश्रमांत निवास. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, भागीरथीच्या तीरावर पवित्र व यज्ञाला योग्य अशी भूमि पाहून विदुराच्या संमतीनें धृतराष्ट्रानें त्या दिवशीं तेथें निवास केला. तेथें त्याच्या भोंवतीं वनांत रहाणारे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचे थवेच्या थवे गोळा झाले. ते गोळा झाले असतां त्यांना चार गोष्टी सांगून त्यानें त्यांचें समाधान केलें आणि शिष्यांसह त्यांचा बहुमान करून त्यांची पाठवणी केली. संध्याकाळ झाली तेव्हां तो गंगेवर गेला आणि त्यानें विधियुक्त स्नान करून शरीरशुद्धि केली. गांधारीनेंहि तसेंच केलें. विदुरादि इतरांनींहि आपआपल्या परीनें तीर्थस्नान करून सर्व नित्य कर्में उरकलीं. तीं झाल्यावर कुंतीनें धृतराष्ट्र

। गांधारी यांना पुनः तीरावर आणिलें. तेथें धृतराष्ट्राच्या याज्ञिकांनीं वेदी मांडून दर्भ पसरिले होते. त्यांत अग्नीची स्थापना त्यानें केली व त्याला आहुति देली. नंतर ती मंडळी तेथून निघाली ती कुरुक्षेत्रीं आली. तेथें शतयूप राजाचा आश्रम होता, तेथें जाऊन धृतराष्ट्र त्या तपस्वी राजाला भेटला. शतयूप हा केकय देशींचा मोठा पराक्रमी राजा होता. तो आपल्या राज्याचा भार पुत्रावर सोंपवून वनांत रहावयास आला होता. धृतराष्ट्र त्याला घेऊन व्यासाच्या आश्रमीं गेला. तेथें त्यानें व्यासापासून दीक्षा घेतली व शतयूपाच्या आश्रमांत तेथें आपला तळ दिला. तेथें व्यासांच्या सांगण्यावरून सर्व आरण्यक विधि शतयूपानें धृतराष्ट्राला सांगितला व तदनुसार धृतराष्ट्रानेंहि आपल्या अनुयायांसह तपाला आरंभ केला. गांधारी व कुंती याहि त्याचेंच व्रत स्वीकारून व वल्कलें आणि हरिणाजिनें घेऊन मनोभावानें इंद्रियें स्वाधीन करून कडक तप करूं लागल्या. धृतराष्ट्राच्या अंगावरील मांस सुकून तो आंतून अस्थि व बाहेरून त्वचा एवढ्याच रूपानें राहिला होता. त्याच्या जटा वाढल्या असून त्यानें कातडें पांघरावयाला व वल्कल नेसावयास ठेविलें होतें. सर्व मोह सोडून तो मोठ्या ऋषीप्रमाणें तप करीत होता. धर्मज्ञश्रेष्ठ व महाबुद्धिमान् विदुर आणि संजय हे दोघे त्या पतिपत्नींची व कुंतीची शुश्रूषा करीत ! विदुरहि मन जिंकून कृश होत्साता वल्कलें नेसून कडक तप करूं लागला. १५.१.१९.

## अध्याय २० वा.

[ १. नारदादिकांची धृतराष्ट्राला भेट. ]

( १ ) वैशंपायन—राजा, धृतराष्ट्राची तपश्चर्या अशा रीतीनें चालली असतां, एक दिवस कित्येक मुनि त्याला भेटावयास आले. त्यांत नारद, पर्वत, महातपस्वी देवल, शिष्यांसह व्यास, आणि इतर तपस्वी व सिद्ध होते. अत्यंत धार्मिक असा वृद्ध राजश्रेष्ठ शतयूपहि त्यांत होता. ते येतांच कुंतीनें त्यांची यथोचित पूजा केली व सर्व मुनि तिच्या त्या पूजेनें संतुष्ट झाले. मग त्यांनीं तेथें नाना प्रकारच्या धर्मपर गोष्टी सांगितल्या व महात्म्या धृतराष्ट्राचें मनोरंजन केलें. त्या कथाप्रसंगीं देवर्षि नारदानें एक कथा प्रत्यक्ष पाहिलेली म्हणून सांगितली ती अशी.

**नारद**—केकयदेशीं शतयूपाचा आजोबा सहस्रचित्य नांवाचा श्रीमान् व निष्कंटक राज्याचा स्वामी असा राजा होता. त्यानें आपल्या अत्यंत धर्मशील अशा वडील मुलावर राज्याचा भार सोंपवून वनांत प्रवेश केला. अत्यंत तेजस्वी तप करून तो पराक्रमी राजा इन्द्रलोकीं गेला. मीं तेथें जातों तेव्हां अनेकवार तो माझ्या दृष्टीस पडतो. त्याचें सर्व पाप तपाच्या योगानें नष्ट होऊन तो इन्द्र‑भुवनांत रहात असतो. तसाच भगदत्ताचा पिता राजा शैलालय तोहि तपाच्या बलानें इन्द्रलोकास गेला. पृषध्र राजाहि तसाच इन्द्रासमान असून त्यालाहि तपाच्या योगानें मरणोत्तर स्वर्गांत स्थान मिळालें. राजा धृतराष्ट्रा, मान्धात्याचा पुत्र जो पुरुकुत्स त्यालाहि याच तपोवनांत मोठी सिद्धि मिळाली. त्याची भार्या म्हणजे नदीश्रेष्ठ नर्मदा. या वनांत तप करून त्यानें स्वर्ग मिळविला. राजा, शशलोमा नांवाचा आणखी एक धर्मशील राजा होता, त्यालाहि या वनांत तप केल्यावर स्वर्गप्राप्ति झाली. धृतराष्ट्रा, व्यासाच्या कृपेनें तूंहि या तपोवनांत आल्यामुळें इतरांना दुष्प्राप्य अशी उत्तम गति तुला मिळेल. पूर्वींच्या महात्म्यांना जें स्थान मिळालें तेंच गांधारीसह तुला या तपश्चरणानंतर मिळणार आहे. राजा, तुझा भाऊ पांडु इन्द्राच्या जवळ बसत असतो व त्याला तुझी नित्य आठवण येत असते. तो तुझें कल्याण करील. तुझी व गांधारीची शुश्रूषा केल्यामुळें ही तुझी भावजय व युधिष्ठिराची माता कुंती भर्त्याच्या लोकीं जाईल; कारण अशी सनातन रीतच आहे. राजा, आम्हांला हें सर्व दिव्य दृष्टीनें दिसत आहे. विदुर युधिष्ठिराच्या शरीरांत प्रवेश करणार असून त्याच्या चिंतनानें संजयाला स्वर्गप्राप्ति होणार आहे.

राजा जनमेजया, नारदानें सांगितलेली ही प्रत्यक्ष पाहिलेली कथा ऐकून गांधारीसहित धृतराष्ट्राला आनंद झाला व नारदाच्या बोलण्याचा बहुमान करून त्यानें त्याची पूजा केली. मग इतर मुनींनीं सुद्धां नारदाची मोठी पूजा केली व धृतराष्ट्राला आनंद झाला हें पाहून त्यांनाहि वारंवार मोठें समाधान झालें. नारदाच्या बोलण्याची त्यांनीं वाहवा केली व शतयूप राजा त्याला म्हणाला, ' नारदा, तूं आज कुरुराज धृतराष्ट्रामध्यें आत्मविश्वास उत्पन्न केलास, तशी आम्हां सर्वांची श्रद्धाहि वाढविलीस. पण धृतराष्ट्रासंबंधानें मला थोडें विचारावयाचें तें ऐकून घे. तुला सर्व वृत्तान्त व तत्त्वें यांचें ज्ञान दिव्य दृष्टीनें प्राप्त होत असल्यामुळें कोणाला काय गति मिळणार हें तुला दिसतें हें युक्तच आहे. तूं मगाशीं अनेक राजांना इन्द्राची सलोकता मिळाल्याचें सांगितलें, पण

धृतराष्ट्र राजाला कोणते लोक मिळणार तें सांगितलें नाहीं. त्याला त्या लोकीं कोणतें स्थान मिळेल व तें केव्हां मिळेल हेंहि ऐकण्याची माझी इच्छा आहे. तरी या सर्व गोष्टी मला तत्त्वतः सांगण्याची कृपा कर.'

शतयूपानें नारदाला अशी विनंति केली असतां ती सर्वांनाच मानवली. त्यांच्या सर्वांच्या मनांत तेंच होतें. तेव्हां ती ऐकून तो महातपस्वी दिव्यदृष्टीचा नारद त्या मुनिसभेंत शतयूपाला उद्देशून म्हणाला, 'शतयूपा, मी एकदां सहजगत्या इन्द्रसभेंत गेलों असतां इन्द्राला भेटलों व तेथेंच पांडुराजाची भेट झाली. त्या वेळीं धृतराष्ट्रासंबंधानें गोष्टी निघाल्या असतां त्याच्या दुर्धर तपश्चर्येचा उल्लेख झाला व तेव्हां माझ्या समक्ष इन्द्र स्वतःच म्हणाला कीं, "धृतराष्ट्राच्या एकंदर आयुष्यांतील तीनच वर्षें शेष आहेत; त्यानंतर तो गांधारीसह कुबेरलोकीं जाईल व तेथें कुबेर त्याचा मोठा सत्कार करील. तेथें तो इच्छागामी विमानांत बसून दिव्यवस्त्रें व अलंकार घालून देव, गंधर्व व राक्षस यांच्या लोकीं विहार करील. तपानें त्याचें सर्व पाप जळून गेलेलें असून तो मोठा भाग्यवान् होऊन स्वच्छंदानें तेथें संचार करील." राजा, हें मी प्रत्यक्ष इन्द्राच्या तोंडून ऐकिलें व तूं विचारल्यावरून तुला सांगितलें. देवांची ही मोठी गुप्त गोष्ट तुमच्याविषयींच्या प्रेमामुळेंच मी तुम्हांला सांगितली. तुमचेंहि पाप तपानें जळून गेलेलें असून विद्या हेंच तुमचें धन आहे.'

राजा, नारदाचें तें गोड भाषण ऐकून सर्व मुनींना तसाच धृतराष्ट्रालाहि मोठा आनंद होऊन त्यांचें मन शांत झालें. अशा रीतीनें त्या मुनींनीं नानाकथा सांगून धृतराष्ट्राचें रंजन केल्यावर ते आपल्या इच्छेनुसार वाटेल तिकडे निघून गेले. त्यांना सिद्धांची गति प्राप्त झालेली होती. १५. १. २०.

---

## अध्याय २१ वा.

[ धृतराष्ट्रादिकांच्या अभावीं पांडवांच्या मनाची स्थिति. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, धृतराष्ट्र वनांत जाऊन राहिल्यावर इकडे पांडवांना मातृविरहामुळें फारच दुःख झालें. सर्व प्रजाहि शोक करी व ब्राह्मण युधिष्ठिराला कथा सांगून त्याचें मन रिझवूं पहात. 'त्या निर्जन वनांत तो वृद्ध राजा कसा रहात असेल, गांधारी व कुंती या तरी कशा रहात असतील? सुखांत वाढलेला धृतराष्ट्र राजा या मोठ्या वनांत जाऊन कशाला बरें दुःखांत पडला? पुत्रत्याग करून राज्य-

श्रीला लाथाडून कुंतीनें आवडीनें वनवास स्वीकारला हें तिनें मोठें दुष्कर कृत्य केलें ! आत्मज्ञानी विदुर भावाची सेवा करीत कोणत्या स्थितींत राहिला असेल? खरोखर तो संजय मोठा स्वामिनिष्ठ होय !' अशा आशयाचे उद्गार लहान थोर सर्व लोकांच्या तोंडून मोठ्या चिंतेनें व शोकानें आलेले ऐकूं येत. याच विषयाची त्यांची परस्परांशीं नित्य चर्चा चाले. पांडवांना तर मातृविरहामुळें शोक होऊन हस्तिनापुरांत फार दिवस तसेंच राहवलें नाहीं. धृतराष्ट्र, गांधारी, विदुर यांचीहि त्यांना वारंवार आठवण पडून चैन पडेनासें होई. त्यांना राज्य नकोसें झालें; वेदाध्ययनांत गोडी वाटेना; धृतराष्ट्राच्या आठवणीनें ते अगदीं खिन्न होऊन जात. युद्धांत झालेला घोर मनुष्यसंहार त्यांच्या डोळ्यांपुढें वारंवार उभा राही. अभिमन्यु कसा पडला हें आठवलें, कर्णाचा वध कसा झाला, द्रौपदीचे पुत्र कसे मारले गेले, इतर इष्टमित्र-बांधवाचा घात कोणत्या रीतीनें झाला, या गोष्टी त्यांच्या मनांत आल्या म्हणजे ते अगदीं खट्टू होत. पृथ्वींतील लक्षावधि वीरांचा नाश झाला, राज्यांतील संपत्ति नष्ट झाली, या गोष्टींचा विचार त्यांच्या मनाला शांति लाभूं देईना. द्रौपदी व सुभद्रा याहि आपल्या मृत पुत्रांची आठवण होऊन खिन्न होत. पण, राजा, अशाहि परिस्थितींत ते पांडव व त्यांची सर्व मंडळी, तुझा पिता जो परीक्षित बालक त्याच्याकडे पाहून कसें बसें प्राणधारण करीत होते ! १५. १. २१.

---

## अध्याय २२ वा.

[ १. पांडव धृतराष्ट्रादिकांना भेटण्यासाठीं वनांतील त्यांच्या आश्रमांत जातात. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, ते पुरुषश्रेष्ठ पांडव याप्रमाणें माता व इतरजण यांच्या आठवणी काढून वारंवार दुःखी होत. त्यांना पूर्वीं जशी राज्यकार्यांत गोडी वाटे तशी आतां वाटेना. त्यामुळें नगराचीं कार्यें सारीं सारखीं होत नाहींशीं झालीं. शोकग्रस्त झाल्यामुळें त्यांचें कशांतच मन रमेना. कोणी त्यांच्याशीं बोलावयास गेलें तर त्यांशीं उलट बोलण्याचा ते कंटाळा करीत. ते शूर व प्रतापशाली वीर सागराप्रमाणें गंभीर असतांहि त्यांचें मन शोकांत मग्न झाल्यामुळें ते भ्रमिष्टासारखे बनले व मातेची आठवण काढून ती वृद्ध धृतराष्ट्र-गांधारीची सेवा कशी करीत असेल, ती किती वाळून गेली असेल, श्वापदांनीं भरलेल्या अरण्यांत पुत्रहीन व निराश्रित असा धृतराष्ट्र पत्नीसह कसा रहात असेल, त्या निर्जन

वनांत गांधारीला वृद्ध व आंधळ्या पतीची सेवा कशी करतां येत असेल, अशाच त्यांच्या नित्य गोष्टी चालत व त्यामुळें त्यांना मोठी काळजी उत्पन्न होई. शेवटीं युधिष्ठिरानें धृतराष्ट्रादिकांना भेटावयास जाण्याचा निर्धार केला व तो सहदेव आणि द्रौपदी यांनाहि मानवला. सहदेव तर युधिष्ठिराच्या पायां पडून म्हणाला, 'तुमचें मन त्यांना भेटावयास जाण्याकडे लागलें आहे हें मला दिसतें. मीच ती गोष्ट तुम्हांला सुचविणार होतों. पण लहान तोंडीं मोठा घास घेतल्या-सारखें होईल, या भीतीनें मला तसें करवलें नाहीं. पण आतां तसें घडूनच आलें आहे. सुदैवानें कुंती माता आतां माझ्या दृष्टीस पडेल; तिच्या जटा वाढल्या असून दर्भ व लव्हे तिच्या पायांना बोंचत असतील; इतक्या वृद्धावस्थेंत ती बिचारी तप करते आहे! राजवाड्याच्या गच्चीवर वाढून जिनें अत्यंत सुख भोगिलें ती माझी माता थकून गेलेली आणि अत्यंत कष्ट होत असलेली अशी माझ्या दृष्टीस पडणार! युधिष्ठिरा, मनुष्याची स्थिति किती क्षणभंगुर आहे पहा. राजाची कन्या कुंती वनांत दुःखांत काळ कंठीत आहे!'

सहदेवाचें हें भाषण ऐकून देवी द्रौपदीनेंहि युधिष्ठिराच्या सूचनेविषयीं आनंद दाखविला आणि कुंतीचें दर्शन केव्हां एकदां होईल असें तिला होऊन गेलें. ती म्हणाली, 'मला त्या जीवंत भेटतील काय? महाराज, त्यांना पाहून मला केव्हढा आनंद होईल! तुमचा हा विचार निश्चित असूं दे. त्यामुळें आमचें कल्याण आपल्या हातून होईल; आपलें मन धर्मांत असेंच रमूं दे. श्वशुर धृतराष्ट्र आणि गांधारी कुंती सासूबाई यांचें दर्शन घेण्यास मी अतिशय उत्सुक झालें आहें.' देवी द्रौपदीचें भाषण ऐकून युधिष्ठिरानें सर्व सेनापतींना बोलावून त्यांना हत्ती, रथ, इत्यादि भरपूर सैन्य बाहेर काढण्यास सांगितलें. तो म्हणाला, 'मला धृतराष्ट्र महाराजांना भेटण्यासाठीं वनांत जावयाचें आहे.' मग त्यानें अंतःपुरावरील अधिकाऱ्यांना निरनिराळीं वाहनें म्हणजे पालख्या, गाड्या, इत्यादि सज्ज करण्यास व वाणी उदमी, सुतार आणि कोशाध्यक्ष यांना कुरुक्षेत्रीं जाण्यासाठीं सिद्ध रहाण्यास सांगितलें. आणखी ज्या कोणाला महाराजांना भेटावयास जावेसें वाटेल, त्यालाहि उघडपणें सुरक्षित रीतीनें जातां येईल असें करण्याची त्यानें आज्ञा दिली. स्वयंपाकी, स्वयंपाकगृहावरील अधिकारी व स्वयंपाकाचें सर्व साहित्य, नाना प्रकारचीं खाद्यें, पेयें इत्यादि गाड्यांवर घालून दुसऱ्या दिवशीं निघावयाचें अशी त्यानें दवंडी देवविली व वाटेंत ठिकठिकाणीं विश्रांतिस्थानें उभारावयासहि सांगितलें. याप्रमाणें निरनिराळ्या आज्ञा सोडून युधिष्ठिर सर्व बंधूंसह दुसऱ्या

दिवशीं स्त्रिया व वृद्ध माणसें यांना घेऊन बाहेर पडला. पहिले पांच दिवस त्यानें येणाऱ्या सर्व लोकांना घेण्यासाठीं नगरांबाहेर काढले व नंतर तो वाट चालूं लागला. १५. १. २२.

---

## अध्याय २३ वा.

[ १. युधिष्ठिराचें धृतराष्ट्राच्या आश्रमीं गमन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, युधिष्ठिरानें अर्जुनप्रमुख शूर सेनापतींच्या देखरेखीखालीं सेनेला निघावयास आज्ञा केली, त्यावेळीं, 'सिद्ध व्हा, चला; सिद्ध व्हा, चला' असा घोष सर्वत्र ऐकूं आला. 'घोडे जोडा, हत्ती जोडा' असें घोडेस्वार व हत्तीस्वार म्हणूं लागले. कांहीं माणसें गाड्यांतून, कांहीं वेगवान् घोड्यांवरून, तर कोणी सोन्याच्या तळपणाऱ्या रथांतून निघालीं. कोणी हत्तीवर बसले होते, कोणी उंटांवरहि होते. कोणी पायीं निघाले व त्यांनीं सुऱ्या व भाले हातांत घेतले होते. कांहीं नागरिक आपआपल्या निरनिराळ्या वाहनांत बसून धृतराष्ट्राला भेटण्यासाठीं युधिष्ठिरासमागमें निघाले. गौतमकुलोत्पन्न कृपाचार्य सेनापति म्हणून सेना घेऊन आश्रमाकडे चालला. युधिष्ठिर राजा निघाला तेव्हां ब्राह्मणांनीं त्याच्या भोंवतीं जमून त्याला आशीर्वाद दिले, सूत मागध बन्दि यांनीं त्याची स्तुति गाइली व त्याच्या मस्तकावर श्वेत छत्र धरण्यांत आलें. रथींचें सैन्य त्यानें मोठेंच बरोबर घेतलें होतें. भीम पर्वतासारख्या प्रचंड हत्तीवर बसला असून त्याच्या बरोबरच्या अनेक हत्तींवर सज्ज केलेलीं यंत्रें व आयुधें ठेवलेलीं होतीं. नकुल व सहदेव हेहि घोड्यावर बसून कवचें घालून सावधपणें त्याच्या बरोबर चालले. अर्जुन आपल्या सूर्यासारख्या कान्तिमान् व पांढरे घोडे जुंपलेल्या दिव्य रथांत बसून युधिष्ठिरामागून निघाला. द्रौपदी प्रमुख पांडव स्त्रिया योग्य अधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं पालख्यांत बसून जाऊं लागल्या. निघतांना त्यांनीं पुष्कळ द्रव्य वांटून टाकलें. युधिष्ठिराचें तें सैन्य उत्तम रथ, घोडे, हत्ती यांनीं युक्त असून त्यांत वेणुवीणादि वाद्यांचा मंजुळ निनाद चालत असल्यामुळें ते फारच मनोहर दिसत होतें.

वाटेंत रमणीय नदीतीरीं किंवा सरोवरांच्या कांठीं अवश्य तेथें विश्रांतीसाठीं तळ देऊन तें सैन्य क्रमक्रमानें मार्ग आक्रमीत होतें. हस्तिनापुराचें रक्षण करण्याच्या कामीं युयुत्सु आणि पुरोहित धौम्य यांची योजना युधिष्ठिराच्या आज्ञे-

वरून झाली होती. असो. वाट चालून झाल्यावर पांडव ससैन्य कुरुक्षेत्रीं येऊन ठेपले. तेथें परमपवित्र यमुना नदी उतरून गेल्यावर त्यांना शतयूप राजाचा आश्रम दुरून दिसला. तेथेंच धृतराष्ट्राचाहि आश्रम त्यांना आढळला, तेव्हां त्यांनीं मोठ्या आनंदानें त्या वनांत त्वरेनें प्रवेश केला व आपल्या आनंदाच्या आरोळ्यांनीं तें सारें दुमदुमून सोडलें. १५. १. २३.

---

## अध्याय २४ वा.

[ १. पांडवांची व धृतराष्ट्रादिकांची परस्परभेट. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, आश्रमाशीं आल्यावर पांडव व इतर मंडळी आपआपल्या वाहनांवरून खालीं उतरली व पायांनींच त्यांनीं नम्रपणें आश्रमांत प्रवेश केला. योद्धे, प्रजाजन, पांडवस्त्रिया याहि पायींच त्यांच्या-मागून गेल्या. धृतराष्ट्राचा तो आश्रम निर्जन असून हरिणांचे कळप त्यांत फिरत होते व केळींच्या वनांनीं त्यांना शोभा आलेली होती. पांडव आलेले दिसतांच त्यांना पहाण्यासाठीं तेथील तापस मंडळी कौतुकानें त्यांच्या जवळ आली. त्यांना 'धृतराष्ट्र कोठें आहे?' असें युधिष्ठिरानें डोळ्यांत पाणी आणून विचारिलें. 'यमुनेवर स्नानासाठीं व फलें आणि पाण्याची घागर आणण्यासाठीं तो गेला आहे' असें त्यांचें उत्तर येतांच, त्यांनीं दाखवि-लेल्या मार्गानें पांडव यमुनेवरच गेले व तेथें जवळच धृतराष्ट्रादि सर्व मंडळी त्यांना दिसली. तेव्हां सर्व पांडवमंडळी त्याच्याकडे धांवत गेली, पण सहदेव मात्र जिकडे कुंती होती तिकडेच धांवला. त्यानें तिचे पाय धरिले व तसें करतांना त्याला रडें कोसळलें. कुंतीच्याहि डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. तिनें आपल्या त्या प्रिय पुत्राकडे पाहिलें व त्याला बाहूंनीं कवटाळून वर उचलिलें. मग 'हा पहा आपला सहदेव आला आहे' असें तिनें गांधारीला सांगितलें. नंतर युधिष्ठिर, भीम, अर्जुन व नकुल यांजकडेहि क्रमानें तिनें पाहिलें व ती लगेच त्यांच्याकडे गेली. ती वृद्ध व अंध अशा धृतराष्ट्र आणि गांधारीला मागें घेऊन आपल्याकडे येत आहे असें पाहून पांडवच तिकडे वळले व जवळ जाऊन त्यांनीं तिला भूमीवर साष्टांग नमस्कार घातला. त्यांच्या शब्दावरून व स्पर्शा-वरून धृतराष्ट्रानें त्यांना ओळखिलें व प्रत्येकाला हाक मारून त्यांचें समाधान केलें. मग अश्रु गाळीत त्यांनीं गांधारी, धृतराष्ट्र व कुंती यांच्या जवळ बसून त्यांची

सर्व चवकशी केली व त्या सर्वांच्या पाण्याच्या कळशा आणून दिल्या. मग जरा शांत झाल्यावर कुंतीनें गोड शब्दांनीं आपल्या पुत्रांचें सान्त्वन केलें. द्रौपदीसुभद्रादि स्त्रिया व अन्तःपुरांतील इतर मंडळी तसेच प्रजाजन व नागरिक अशी सर्व मंडळी धृतराष्ट्राला भेटली व युधिष्ठिरानें त्या सर्वांचीं पृथक् नांवें घेऊन त्यांची त्याला ओळख पटवून दिली. धृतराष्ट्रानेंहि सर्वांचा उलट बहुमान केला. त्या सर्व मंडळीच्या घोळक्यांत बसल्यावर धृतराष्ट्राला आनंदाचें भरतें आलें व त्याचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून गेले. आपण हस्तिनापुरीं आपल्या वाड्यांतच जणूं बसलों आहों असें त्याला वाटलें. द्रौपदी आदि करून सुनांनीं त्याला नमस्कार केला, तेव्हां त्या सर्वांना मोठा आनंद झाला. मग भेटावयास आलेल्या मंडळीच्या घोळक्यामुळें तारागणांनीं भरलेल्या आकाशाप्रमाणें दिसणाऱ्या त्या सिद्ध व चारण यांनीं युक्त अशा आश्रमाकडे तो त्या सर्वांना घेऊन गेला. १५. १. २४.

---

## अध्याय २५ वा.

[ १. संजय ऋषींना पांडवादिकांची ओळख करून देतो. ]

( १ ) **वैशंपायन**:—राजा, मग युधिष्ठिर त्या आश्रमांत आपल्या बंधूंसह आणि त्यांना पहाण्यासाठीं नाना देशांहून आलेल्या भाग्यशाली तापसांसह कांहीं दिवस राहिला. त्या प्रसंगीं एकदां ऋषि बोलूं लागले, ‘ यांतील युधिष्ठिर कोणता, भीम व अर्जुन कोणते, तसेंच नकुळ कोण व सहदेव कोण? या सर्वांची पत्नी द्रौपदी ती कोणती?’ त्यांचा प्रश्न ऐकून संजयानें सर्व पांडवांचीं व त्यांच्या स्त्रियांचीं नांवें वेगळीं वेगळीं घेऊन त्यांची ऋषींना ओळख करून दिली.

**संजय**:—ऋषीहो, हा सोन्यासारख्या शुद्ध गौरवर्णाचा सिंहासारखा पराक्रमी व कणखर शब्द असलेला कुरुराज युधिष्ठिर होय. त्याचे नेत्र विस्तीर्ण व लांब असून त्याचा वर्ण तांबूस आहे. हा इकडे भीम पहा. हा मदोन्मत्त हत्तीच्या गतीनें चालणारा असून त्याचा वर्ण तापलेल्या सुवर्णाप्रमाणें शुद्ध गौर आहे. त्याचे खांदे भरींव व रुंद असून बाहु भक्कम व लांब आहेत. त्याच्या शेजारीं जो मोठें धनुष्य घेऊन बसला आहे तो वीर अर्जुन. त्याचा वर्ण हत्तींच्या कळपांतील म्होरक्यासारखा असून त्याचे खांदे सिंहासारखे उंच आहेत. हत्तीच्या

खेळकर चालीप्रमाणें याचीहि चाल असून त्याचे डोळे कमलपत्रासारखे लांबट आहेत. ते पहा कुंतीच्या शेजारीं नकुल व सहदेव हे जुळे बंधु बसले असून विष्णु व इंद्र यांच्या समान दिसत आहेत. ते किती सुंदर आहेत पहा. त्यांच्या तोडीला या मनुष्यलोकीं रूप, बल व शील या बाबतींत कोणीच बसूं शकणार नाहीं. ती पहा द्रौपदी, प्रत्यक्ष लक्ष्मीसारखी शोभून दिसत आहे. कमलपत्राप्रमाणें तिचेहि नेत्र लांबट असून जणूं तिनें तारुण्यांत नवीन प्रवेश केल्यासारखा दिसत आहे. तिचा वर्ण नीलकमलासारखा श्याम असून ती जणूं देवांगनाच वाटते. तिच्या बाजूला निर्मळ सोन्याच्या गौर वर्णाची व जणूं मूर्तिमंत चंद्रप्रकाशच अशी जी स्त्री बसली आहे ती चक्रपाणि श्रीकृष्णाची बहीण सुभद्रा होय. ही इकडे शुद्ध सोनेरी वर्णाची पाताळराजाची कन्या व अर्जुनाची पत्नी उलूपी, तशीच ही मणिपूरराजाची कन्या मोहाचीं ताजीं फुलें वेणींत घालून बसलेली चित्रांगदा. ही राजसेनापति शल्याची बहीण व भीमाची वडील पत्नी. हिचा वर्ण कसा जून झालेल्या कृष्ण कमळाच्या माळेसारखा आहे. तुम्हांला ठाऊकच आहे कीं शल्याची कृष्णाशीं नित्य स्पर्धा चालत असे. ही चांफ्याच्या माळेच्या वर्णाची मगधराज जरासंधाची कन्या व सहदेवाची पत्नी. तिच्या सन्निध पलीकडे बसलेली कृष्णकमलाच्या वर्णाची ती नकुळाची पत्नी. नकुळ हा माद्री राणीचा ज्येष्ठ पुत्र हें प्रसिद्धच आहे. ही तप्त सुवर्णाच्या वर्णाची उत्तरा, विराटराजाची कन्या व अभिमन्यूची भार्या. द्रोणादि वीरांनीं स्वतः रथांत बसून अभिमन्यूला विरथ करून मारिलें हें तुम्हांला ठाऊकच असेल. ह्या इकडे धृतराष्ट्राच्या शंभर विधवा सुना, त्यांच्या मस्तकांवर केसांच्या भांगाशिवाय कांहींच अलंकार नसून पति व पुत्र यांनीं विरहित झाल्यामुळें त्यांनीं शुभ्र उत्तरीय वस्त्रें परिधान केलीं आहेत. ऋषीहो, याप्रमाणें तुम्हीं विचारिल्याप्रमाणें मुख्य मुख्य राजस्त्रियांची ओळख तुम्हांला करून दिली आहे. त्या शुद्ध भावाच्या, सरळ बुद्धीच्या व ब्राह्मणांविषयीं अत्यंत आदरशील आहेत.

**वैशंपायन**—राजा, याप्रमाणें संजयानें पांडवादिकांची ओळख करून दिल्यावर ते ऋषि निघून गेले. नंतर धृतराष्ट्रानें सर्वांची खुशाली विचारून घेतली. आपलीं वाहनें सोडून जे वीर त्या आश्रमांत दूर बसले होते त्यांची, तशीच स्त्रिया व इतर सर्व लहानथोर माणसें यांचीहि त्यानें त्यांना नीट खालीं बसवून योग्य रीतीनें चवकशी केली. १५. १. २५.

---

## अध्याय २६ वा.

[ १. धृतराष्ट्राचे पांडवांना कुशल प्रश्न. २ विदुर युधिष्ठिराच्या शरीरांत प्रवेश करतो. ३ विदुराचें निर्याण. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—युधिष्ठिरा, तूं खुशाल आहेसना? तुझे बंधु आणि सर्व प्रजाजन ठीक आहेत ना? तुझ्यावर अवलंबून रहाणारे जे तुझे सचिव, सेवक, व गुरु ते सर्व खुशाल आहेत ना? तूं स्वतः पूर्व राजश्रेष्ठांनीं अवलंबिलेल्या मार्गानें चालत आहेस ना? न्याय्य मार्गानेंच तुझा कोश भरत आहे ना? शत्रु, मित्र व तटस्थ ह्या लोकांचे स्वभाव ओळखून तूं त्यांच्याशीं योग्य रीतीनें वागत आहेस ना? अग्रहारादि देऊन ब्राह्मणांचा तूं समाचार घेत असशीलच. त्यांना तुझ्या शीलानें संतोष होतो आहे ना? शत्रु, नागरिक, सेवक व सोयरे यांनाहि तुझें वर्तन संतुष्ट करतें ना? पितरें व देवता यांची तूं श्रद्धेनें पूजा करतोस ना? अन्न-पाणी देऊन अतिथींचा बहुमान तूं करतोस ना? तुझ्या राज्यांतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र, तशींच तुझ्या कुटुंबांतील माणसें आपआपल्या कर्तव्यांत गढून राहून न्यायानें वागतात ना? तुझ्या घरांतील स्त्रिया व लहान थोर माणसें यांना दुःख होत नाहीं ना? त्यांना याचना करण्याचा प्रसंग येत नसेलच. स्त्रियांचा बहुमान तुजकडे होत असेलच. आपल्या राजवंशामध्यें तुला राज्य प्राप्त झाल्यापासून त्या वंशाची कीर्ति वाढत आहे ना?

**वैशंपायन**—या प्रमाणें धृतराष्ट्रानें विचारलें असतां नीतिविशारद युधि-ष्ठिरानें त्याला यथोचित उत्तरें दिलीं आणि उलट त्याच्या खुशालीविषयीं त्याला मार्मिक प्रश्न विचारिले.

**युधिष्ठिर**—महाराज! आपलें तप ठीक चाललें असेलच. माझ्या मातेकडून आपली सेवा होत आहेना? तिला त्यापासून फारसा त्रास होत नसेलच. तिचा वनवास सफळ झाला असेलच. ह्या माझ्या थोरल्या गांधारी मातेला या घोर तपामुळें दुःख होत नाहींना? तिला थंडी, वारा व वाटेचे श्रम यांनीं बराच त्रास होत असेल. वध पावलेल्या तिच्या पुत्रांची आठवण होऊन तिला शोक होतो कीं काय? आम्हा पाप्यांचाहि विचार तिच्या मनांत येतो काय? महाराज विदुर कोठें आहे? तो आम्हांला येथें दिसत नाहीं कसा? संजय खुशाल आहेना? आणि त्याचें तपहि ठीक चाललें आहेना?

( २ ) वैशंपायन—राजा, युधिष्ठिराचे हे प्रश्न ऐकून धृतराष्ट्र त्याला म्हणाला, "विदुर खुशाल असून त्याची तपश्चर्या नीट चालली आहे. तो केवळ वायु भक्षण करून रहात असून कृश झाला आहे; तो केवळ अस्थिपंजर दिसतो. ह्या निर्जन अरण्यांत तो रहात असून ब्राह्मणांच्या कधीं कधीं दृष्टीस पडतो." धृतराष्ट्र असें बोलत आहे तोंच, जटा वाढविलेला व अंगावर धुळीचे कण उडाल्यामुळें मळकट झालेला तो विदुर दुरून येत असलेला युधिष्ठिराच्या दृष्टीस पडला. त्याच्या अंगावर मुळींच वस्त्र नसून त्यानें तोडांत एक दगडाचा तुकडा धरिला होता; त्याला पहातांच युधिष्ठिर त्याच्याकडे धांवत गेला; तेव्हां तो दाट अरण्यांत शिरूं लागला असतां, युधिष्ठिर त्याला मोठ्यानें हांक मारून "विदुर काका, विदुर काका, हा पहा मी तुमचा लाडका युधिष्ठिर," असें म्हणत त्याच्यामागून धावूं लागला. मग अगदीं एकांत स्थान पाहून त्या वनांतील एका वृक्षाजवळ तो उभा राहिला. त्याच्या आकृतीवरूनच युधिष्ठिरानें त्याला ओळखिलें व त्याला ऐकूं जाईल अशा रीतीनें म्हटलें "हा मी युधिष्ठिर आलों आहें." असें म्हणून युधिष्ठिरानें त्याला नमस्कार केला असतां विदुरानें त्याच्याकडे निश्चल दृष्टीनें पाहिलें, व त्याच्या डोळ्याशीं डोळा भिडवून समाधान दर्शविलें. याप्रमाणें समाधीच्या योगानें योगबलाचा अवलंब करून अवयवांशीं अवयव, प्राणांशीं प्राण व इंद्रियांशीं इंद्रियें अशी जोड करून विदुरानें तेजानें तळपत असतां धर्मराजाच्या शरीरांत प्रवेश केला. याप्रमाणें त्यानें केलें असतां त्याचे नेत्र अगदीं स्तब्ध झाले व तो वृक्षाला टेकून उभा असतांच गतप्राण झालेला युधिष्ठिराला दिसला. तसेंच आपण बलिष्ठ व अनेक गुणांनीं युक्त असे झालों आहों असें त्याला आढळून आलें. विदुर व आपण एकाच यमधर्मापासून झाल्याचें जें वृत्त व्यासानें पूर्वी सांगितलें होतें, त्याची त्याला आठवणहि झाली. मग विदुराच्या देहाला अग्निसंस्कार करावा असें युधिष्ठिराला वाटलें व त्या प्रमाणें तो सिद्धता करणार, इतक्यांत अशी आकाशवाणी झाली कीं, "युधिष्ठिरा, विदुराच्या देहाचें दहन करूं नको. तें येथेंच राहूं दे. पूर्व वहिवाटच अशी आहे. विदुराला यतिधर्मच प्राप्त झाला असून त्यामुळें त्याला स्वर्गलोक मिळणार आहे. तरी त्याच्या संबंधानें शोक करूं नको."

अशी आकाशवाणी झाली असतां विदुराचें शरीर तेथेंच ठेवून युधिष्ठिर धृतराष्ट्राकडे परत आला, आणि त्यानें त्याला तें सर्व वृत्त सांगितलें. तें ऐकून धृतराष्ट्र व इतर भीमसेनादि मंडळी अगदीं आश्चर्यचकित होऊन गेली. मग

धृतराष्ट्र आनंदित होऊन युधिष्ठिराला म्हणाला, "राजा हें पाणी, हीं मुळें, व हीं फळें मी तुला देत आहें, त्यांचा स्वीकार कर. मनुष्याजवळ जे पदार्थ असतील तेच त्यानें अतिथीला द्यावे असें शास्त्र सांगतें." धृतराष्ट्राचें हें बोलणें ऐकून युधिष्ठिर 'ठीक आहे' असें म्हणाला, व त्यानें दिलेलीं फळें व मुळें त्यानें आपल्या बंधूंसह भक्षण केलीं. मग ते सर्वजण ती रात्र फळेंमुळें खाऊन व पाणी पिऊन त्या झाडांच्या खालींच राहिले. १५. १. २६.

## अध्याय २७ वा.

[ १. व्यासाचें धृतराष्ट्राकडे आगमन. ]

**वैशंपायन**—राजा, मग धृतराष्ट्राच्या आश्रमांत त्या पुण्यवान् माणसांनीं ती पवित्र व नक्षत्रें स्वच्छ प्रकाशत असलेली रात्र घालविली. तेथें त्यांनीं अनेक श्रुतिवाक्यांची चर्चा करीत धर्मपर गोष्टी केल्या. पांडव मातेच्या बाजूस भूमीवरच पडून झोपीं गेले. त्यांनीं आपलीं मूल्यवान् शयनें बाजूला सारलीं होतीं. धृतराष्ट्र जे पदार्थ खाई तेच पदार्थ खाऊन पांडवहि तेथें होते. रात्र संपून उजाडलें, तेव्हां सर्व प्रातर्विधि उरकून युधिष्ठिरानें बंधूंना स्त्रीवर्गाला, पुरोहितांना व सेवकांना बरोबर घेऊन तें सारें आश्रमस्थान स्वस्थपणें पाहिलें. त्यांत अनेक वेद्या असून त्यांतील प्रदीप्त अग्नींत मुनिजन स्नान करून येऊन आहुति देत होते व वन्य पुष्पांनीं अग्निपूजा करीत होते. अग्नींतून धुराचे लोट निघत होते. त्या मुनींचीं शरीरें ब्राह्मी शोभेनें युक्त होतीं. त्यांत हरणांचे कळप निर्धास्तपणें फिरत होते व विविध पक्ष्यांचे थवे निःशंकपणें गात होते. मोरांच्या केका, दात्यूहांचें गुंजन, कोकिळांचें कर्णमनोहर गायन, अध्ययन करणाऱ्या ब्राह्मणांचा वेदघोष, असे ध्वनि तेथें ठिकठिकाणीं ऐकूं येत होते. अनेक ठिकाणीं फळमूळांच्या राशि पडल्या होत्या. तेथील तपस्व्यांसाठीं युधिष्ठिरानें तांब्यासोन्याचे कलश, हरिणाजिनें, तरटें, चटया, स्रुक् स्रुवा इत्यादि पात्रें, कमंडलु, थाल्या, मातीचे घडे, लोखंडाचीं विविध भांडीं इत्यादि पदार्थ आणिले होते. ते त्यांच्या इच्छेनुसार त्यानें सर्वत्र फिरून त्या तापसांना दिले व द्रव्यहि देऊन तो धृतराष्ट्राकडे परत आला. त्यावेळीं धृतराष्ट्राचें आह्निक संपलें होतें व तो गांधारीसह स्वस्थ विचार करीत बसला होता. शेजारीं जवळच कुंती शिष्याप्रमाणें त्यांची सेवा करण्यास तत्पर होऊन नम्रपणें बसली होती. तिला पाहून युधिष्ठिरानें धृतराष्ट्राकडे जाऊन

त्याला आपलें नांव सांगून नमस्कार केला व त्यानें सांगितलें तेव्हां तो एका आसनावर बसला. भीमादि इतरहि त्याप्रमाणेंच धृतराष्ट्राला अभिवादन करून त्याच्या आज्ञेनें जवळ बसून त्याचे पाय चेपूं लागले. ते वाटोळे बसले असतां देवांत जसा बृहस्पति तसा धृतराष्ट्र ब्राह्मी लक्ष्मीनें सुशोभित असा फारच खुलून दिसत होता.

ती मंडळी अशा रीतीनें एकत्र बसली असतां कुरुक्षेत्रनिवासी शतयूपादि अनेक महर्षि तेथें आले. नारदादि देवर्षींसह व्यासहि त्यांत असून त्यांची शिष्य-मंडळीहि त्यांच्या बरोबर होती. त्यांची व युधिष्ठिराची दृष्टादृष्ट होतांच युधिष्ठिर, भीमादि त्याचे बंधु व धृतराष्ट्र हे त्यांचें स्वागत करण्यासाठीं उठून उभे राहिले. शतयूपादिकांसह व्यासमुनि जवळ आला असतां त्यानें धृतराष्ट्राला बसावयास सांगितलें व त्याच्यासाठीं ठेवलेलें दर्भयुक्त हरिणाजिनावर बसविलेलें लोकरीचें आसन त्याच्यापुढें केलें. नंतर ती समर्थ ऋषिमंडळी व्यासाच्या सांगण्यावरून घेर धरून आपआपल्या आसनावर बसली. १५. १. २७.

---

## अध्याय २८ वा.

[ १. व्यास धृतराष्ट्राची खुशाली विचारितो व विदुराचा मोठेपणा त्याला सांगतो. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, सर्व पांडव मंडळी स्वस्थ बसली असतां व्यास धृतराष्ट्राला उद्देशून बोलूं लागला. तो म्हणाला, ‘ धृतराष्ट्रा, तुझें तप नीट चाललें असून वनांतील रहाणी तुझ्या मनाला मानवते आहे ना ? पुत्र-वधाचें दुःख आतां तुझ्या हृदयांत राहिलें नाहींना व तुझें ज्ञान सर्वतोपरी सुप्रसन्न झालें आहे ना ? तूं बुद्धि दृढ करून हें आरण्यक व्रत चालविलें आहेस ना ? गांधारी आतां शोकानें व्याप्त होऊन जात नाहींना ? ती सुज्ञ व बुद्धिवान् असून धर्ममार्गाचेंहि ज्ञान तिला आहे. सृष्टीच्या घडामोडीचीं तत्त्वेंहि तिला कळत असल्यामुळें तिला शोक होत नसेलच. कुंती तुझी सेवा नीटपणें करीत आहे ना ? ती आपल्या पुत्रांचा त्याग करून तुझ्या सेवेसाठींच येथें आली आहे. युधिष्ठिर येथें आल्यावर तूं त्याचें अभिनंदन केलेंस ना ? भीम, अर्जुन, नकुल व सहदेव यांच्याशीं बोलून तूं त्यांचें सान्त्वन केलें असशीलच. त्यांना पाहून तुला आनंद होतो ना ? तुझें मन त्यांच्याविषयीं निर्मळ आहे ना ? तुला आतां सर्व

प्रकारचें ज्ञान झालेलें असल्यामुळें तुझें मन शुद्ध झालें असेलच. निर्वैरपणा, सत्य आणि शांति या तीन गोष्टी सर्वच प्राण्यांना अत्यंत महत्त्वाच्या आहेत. वनवासांत न रहाण्याचा तुला मोह पडत नाहींना ? या ठिकाणीं अन्न आपल्या अधीन कधीं असतें व कधीं नसतें; त्यामुळें केव्हां उपासहि घडतो. राजा, महात्म्या विदुराचा वृत्तान्त मला नुकताच कळला. तो प्रत्यक्ष धर्मच असून या रीतीनें निजधामीं गेला हें ठीकच आहे. मांडव्यमुनीच्या शापामुळें धर्माला विदुर व्हावें लागलें होतें. म्हणूनच त्याच्यासारखा महाबुद्धिमान्, महायोगी व थोर मनाचा पुरुष कोणीच नव्हता. देवांतील बृहस्पति व असुरांकडील शुक्र यांनाहि त्याची सर येत नव्हती. मांडव्य ऋषीनें मोठ्या तपोबलाचा व्यय करून धर्माला शासन केलें व त्यालाच मीं ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून स्वतःच्या बलानें विचित्रवीर्याच्या स्त्रीच्या ठिकाणीं उत्पन्न केलें. अशा रीतीनें तो तुझा भाऊ सनातन देव जो यमधर्म तोच प्रत्यक्ष होता. त्याच्या धारणेवरून व ध्यानावरूनच त्याला सुज्ञांनीं धर्म हें सार्थ नांव दिलें होतें. सत्य, शम, दम, अहिंसा व दान यांच्या योगानें त्याचें तप वाढलें होतें. त्या धर्मापासूनच हा कुरुराज युधिष्ठिर झाला असल्यामुळें तोहि साक्षात् धर्मच आहे. ज्याप्रमाणें अग्न्यादि पंचमहाभूतें इहपरलोकीं अवश्य आहेत, तसाच प्रकार धर्माचाहि आहे. तो सर्वचराचर व्यापणारा आहे व देव आणि पापमुक्त झालेले सिद्ध यांना तो नित्य दिसत असतो. राजा, यमधर्म तोच विदुर व तोच हा युधिष्ठिर होय. तोच हा तुझ्यापुढें सेवकाप्रमाणें उभा राहिलेला दिसत आहे. त्या तुझ्या बुद्धिमान् भ्रात्यानें युधिष्ठिरांत योगबलानें दृष्टिद्वारा प्रवेश केला. धृतराष्ट्रा, तुझा उरलासुरला संशय दूर करण्यासाठीं व तुझें कल्याण करण्यासाठींच मी आज येथें आलों आहें. आजवर कोणी केलें नाहीं असें अद्भुत कर्म करून तुम्हांला तपाचें बळ मी आतां दाखविणार आहें. तर तुझ्या मनांतून जें कांहीं पहावें असें वाटत असेल अथवा ज्याला स्पर्श करावा जसें वाटत असेल किंवा जें कांहीं ऐकावें असें वाटत असेल, तें मला सांग; ती तुझी इच्छा मी पूर्ण करणार आहें. १५. १. २८.

## आश्रमवासपर्व समाप्त.

---

# १६. पुत्रदर्शनपर्व.

## अध्याय २९ वा.

[ धृतराष्ट्र आणि गांधारी व्यासापाशीं मृत पुत्रादिकांच्या दर्शनाची इच्छा व्यक्त करतात. ]

( १ ) **जनमेजय**—वैशंपायन मुने, धृतराष्ट्रादि वनवासी व पांडवादि त्यांना भेटावयास आलेली मंडळी यांसमक्ष परम तेजस्वी अशा महर्षि व्यासानें जें अद्भुत कर्म करून दाखवितों असें सांगितलें तें कोणतें ? युधिष्ठिर आपल्या मंडळीसह धृतराष्ट्राच्या आश्रमांत पुढें किती दिवस राहिला ? तेथें तो आपल्या स्त्रियांसह काय भक्षण करून राही ? या सर्व गोष्टी मला कृपा करून सांगा.

**वैशंपायन**—राजा, धृतराष्ट्राच्या सांगण्याप्रमाणें युधिष्ठिरादि सर्व मंडळी खाणेंपिणें करीत व विश्रांति घेत त्या आश्रमाजवळच्या अरण्यांत सैन्यासह एक महिना फिरत होती. मग एक दिवस मीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें व्यास तेथें येऊन त्याचें धृतराष्ट्राशीं बसून संभाषण चाललें असतां नारद, पर्वत, देवल, विश्वावसु, तुंबरु, चित्रसेन, इत्यादि मुनि व गंधर्व हेहि तेथें उपस्थित झाले. तेव्हां धृतराष्ट्राच्या आज्ञेवरून युधिष्ठिरानें त्या सर्वांचा सत्कार केला असतां, ते आपआपल्या आसनांवर बसल्यावर धृतराष्ट्रहि सर्वांसह खालीं बसला. त्याच्याभोंवतीं गांधारी, कुंती, द्रौपदी, सुभद्रा, आणि इतर स्त्रियाहि बसल्या. मग त्यांच्यांत अनेक धार्मिक विषयांवर दिव्य कथा चालू झाल्या. प्राचीन ऋषि, देव, असुर यांच्याहि कथा एकमेकांनीं एकमेकांना सांगितल्या. नंतर व्यास मोठे आनंदित होऊन त्या अंध धृतराष्ट्राला पुनः म्हणाले, 'राजा, तुझ्या मनांतून काय बोलावयाचें आहे तें मला समजलें. तुझें अंतःकरण पुत्रांविषयींच्या शोकानें जळून जात आहे. गांधारीच्याहि मनांत जें दुःख नित्य उभें आहे, तेंहि मला समजलें. कुंती, द्रौपदी, सुभद्रा यांचेंहि दुःख मी जाणतों. त्या सर्वांचें तीव्र दुःख पुत्रवधामुळें उत्पन्न झालेलें आहे. तेव्हां तुम्ही सर्वच येथें एकत्र जमलां हें ऐकून तुम्हा सर्वांचा संशय दूर करावा म्हणून, हे धृतराष्ट्रा, मी आज येथें आलों. हे सर्व देव, गंधर्व, महर्षि, यांनाहि माझ्या दीर्घकालीन तपाचें बल पहावयास मिळेल. तर, राजा, बोल तुला काय देऊं तें; सर्व देण्यास मी सिद्ध आहें. माझ्या तपाचें सामर्थ्य पहा.'

अलोट बुद्धीच्या व्यासमुनीचें हें भाषण ऐकून धृतराष्ट्रानें थोडा वेळ मनांत विचार केला व उत्तर दिलें, ' महाराज, मी आज धन्य झालों. माझ्यावर आपण मोठी कृपा केलीत. माझ्या जीवितांचें आज साफल्य झालें. आज आपणा सर्व साधुजनांची संगति मला लाभली हें माझें मोठें भाग्य होय. आपल्यासारखा ब्रह्मनिष्ठ तपोधनांचा संपर्क मला घडल्यामुळें मला उत्तम गति मिळेल यांत शंका नाहीं. आपल्या दर्शनानेंच मी पवित्र झालों आहें. आतां मला परलोकींचें भयच उरलें नाहीं. पण माझ्या त्या मन्दबुद्धि व लोभी पुत्र दुर्योधनाच्या अन्यायी कृत्यांचें स्मरण झालें म्हणजे माझें मन खिन्न होतें. त्यानें निष्पाप अशा पांडवांचा पापबुद्धीनें छळ केला, व मोठ्या सैन्याचा, राजेलोकांचा, व राज्याचा नाश केला. अनेक देशींचे राजे एकत्र जमून वध पावले ते त्याच्याचसाठीं. आईबाप, स्त्रिया, पुत्र आणि अत्यंत प्रिय असे प्राणी यांचीहि क्षिति न बाळगतां ते सर्व त्यांना सोडून यमलोकीं गेले. मुने, मित्रकार्यासाठीं रणांत वध पावलेल्या त्यांना परलोकीं कोणती गति मिळणार आहे ? तसेच जे माझे पुत्र व नातू मोठ्या सैन्याचा नाश करून शेवटीं स्वतःहि पडले, त्यांच्यासाठींहि माझें मन मोठें कष्टी होतें. शांतनुपुत्र भीष्म, वृद्ध आचार्य द्रोण, यांसह सर्व कुळाचा माझ्या अपक्व बुद्धीच्या मूर्ख व पापी पुत्रानें राज्याच्या लोभानें नाश केला. हें सर्व मला आठवलें, म्हणजे रात्रंदिवस माझें मन जळूं लागतें व शोकानें व्याप्त होऊन मला शांति कशी ती मुळींच मिळत नाहीं ! '

राजा, धृतराष्ट्राचे हे दुःखोद्गार ऐकल्यावर गांधारीच्याहि दुःखाला पुनः भरती आली. तोच प्रकार कुंती, द्रौपदी, सुभद्रा व इतर कौरव स्त्रियांचाहि झाला. पुत्रशोकांत बुडून गेलेली गांधारी तर हात जोडून व्यासाला म्हणाली, ' महाराज, आज सोळा वर्षें झालीं, हा राजा मृत पुत्रांविषयीं सारखा शोक करीत आहे. त्याला शांति कशी ती या काळांत मिळालेली नाहीं. पुत्रशोकांत डुंबून गेल्यामुळें तो सारखा दीर्घ निःश्वास सोडीत असतो. एकाहि रात्रीं त्याला झोंप कशी ती लागलेली नाहीं. महाराज, आपण दुसरे स्वर्गादि लोकहि निर्माण करण्यास समर्थ आहां. मग परलोकीं गेलेल्या पुत्रांचें दर्शन करून देणें हें तर आपल्याला अगदींच सुलभ आहे. ही पहा द्रौपदी, हिचे पुत्र व बांधव सर्व वध पावल्यामुळें किती दुःख करीत आहे ती ! आमच्या सर्व सुनांत ही आमची लाडकी सून. तशीच ही कृष्णाची बहीण सुभद्रा पहा. हिचें भाषण किती गोड ! पण अभिमन्यूच्या वधाच्या दुःखानें ती होरपळून चालली आहे. ही

भूरिश्रव्याची अत्यंत प्रिय पत्नी. पतिमरणाच्या दुःखानें ती अगदीं गांगरून गेली आहे. तिचा सासरा सोमदत्तहि आपल्या पित्यासह युद्धांत मारला गेला. महाराज, या आपल्या पुत्राचे तर शंभर पुत्र रणांतून मागें न परतण्याच्या प्रतिज्ञेमुळें रणांगणांत मरून पडले व त्या शंभरांच्या शंभर भार्या दुःखसागरांत बुडून गेल्या. आमचें दुःख त्या सगळ्या आठवणीनें पुनःपुनः जागृत होऊन वाढूं लागतें. ते जे माझे सोमदत्त-प्रभृति महारथी श्वशुर त्यांना तरी कोणती गति मिळाली आहे? तर, महाराज, जेणेंकरून आपल्या कृपेनें हे धृतराष्ट्र महाराज तशीच ही आपली सूनबाई कुंती व मी स्वतः दुःखमुक्त होऊं, असें कांहीं करा.' गांधारीनें असें सांगितलें असतां कडक व्रतामुळें तोंड सुकून गेलेल्या कुंतीलाहि त्या आपल्या सूर्यासारख्या तेजस्वी पुत्राचें स्मरण झालें. व्यासमुनीला तें दुरूनहि समजलें. त्या अर्जुनमातेलाहि फार दुःख झाल्याचें त्यांच्या लक्षांत आलें. तेव्हां त्यानें तिलाहि म्हटलें, 'तुझ्याहि मनांतून काय सांगावयाचें आहे, तें मला सांग.' तें ऐकून कुंतीनें व्यासांना मान वांकवून नमस्कार केला आणि पूर्वीचें वृत्त स्पष्ट करून लाजेनें सर्व प्रकार त्याला कळविला. १५.२.२९.

---

## अध्याय ३० वा.

[ १. कुंतीची व्यासाला विनंति. ]

( १ ) **कुंती**—महाराज, आपण माझे श्वशुरच नव्हे, तर दैवताचेंहि दैवत आहां; त्या माझ्या देवाचाहि श्रेष्ठ देव अशा तुम्हांला मी सर्व खरें वृत्त सांगतें तें ऐकून घ्या. एकदां दुर्वास नांवाचा अत्यंत कोपिष्ठ असा तपस्वी ब्राह्मण माझ्या पित्याकडे भिक्षा मागण्यासाठीं आला असतां मीं त्याला संतुष्ट केलें. माझी शुद्धवृत्ति, निरपराधपणा, निर्मळ अंतःकरण, यांच्यामुळें माझ्या वर्तनांत राग येण्यासारख्या इतर पुष्कळ गोष्टी असतांहि तो मुळींच रागावला नाहीं व माझ्यावर संतुष्ट होऊन कृतकृत्य होत्साता तो मला म्हणाला, 'माझ्यापासून एक वर अवश्य मागून घे.' मला कांहीं वर नको असतांहि तसें मी म्हटल्यास मला तो शाप देईल या भीतीनें 'ठीक आहे' असें मीं बोललें. तेव्हां तो म्हणाला, 'मुली, तूं धर्माची माता होशील. ज्या देवांना तुला बोलवावें असें वाटेल, ते तुझ्या अधीन

रहातील.' असें म्हणून तो गुप्त झाला. मला मोठें आश्चर्य वाटलें. पण त्यावेळची ती आठवण मी पुढें कधींहि विसरलें नाहीं. पुढें एक दिवस भूमीवर उभी राहून मी उगवत्या सूर्याकडे पहात होतें. त्या वेळीं ऋषीच्या वचनाची मला आठवण होऊन मला सूर्याचा अभिलाष उत्पन्न झाला. पोरपणामुळें माझ्या लक्षांत पुढील गोष्ट आली नाहीं. पण तो सहस्ररश्मि भगवान् माझ्यापुढें येऊन उभा राहिला. एका देहानें तो आकाशांत तळपत असतांहि त्याच वेळीं दुसऱ्या देहानें मजपाशीं आला व मी भीतीनें कांपत असतां मला म्हणाला, 'माझ्या-पासून कांहीं वर मागून घे.' मीं त्याच्यापुढें मस्तक वांकवून त्याला जावयास सांगितलें, तेव्हां तो म्हणाला, 'मला विनाकारण बोलावणें योग्य नाहीं. तूं कांहीं मागितलें नाहींस तर तुला आणि हा वर देणाऱ्या ऋषीला दोघांनाहि मी जाळून टाकीन.' तेव्हां त्या निरपराधी ब्राह्मणाचें शापापासून रक्षण करावें म्हणून मी त्याला म्हटलें, 'देवा, तुझ्यासारखा पुत्र मला होवो.' मी असें म्हण-तांच सूर्यानें आपल्या तेजानें मला मोहून टाकिलें आणि 'तुला पुत्र होईल' असें म्हणून तो आकाशीं निघून गेला.

नंतर हा सारा प्रकार पित्यापासून लपविण्यासाठीं मी गुप्तपणें झालेल्या त्या अर्भक पुत्राला कर्ण नांव ठेवून जलांत सोडून दिलें. अशा रीतीनें मी माता झालें असतांहि सूर्यदेवाच्या प्रसादानें ऋषीनें सांगून ठेविल्याप्रमाणें पुनः कन्यावस्थेंत गेलें. म्यां मूर्खेनें जाणूनबुजून पुत्राची उपेक्षा केली, ही गोष्ट मला सारखी जाळीत आहे हें तुम्हांला ठाऊक आहेच. मुनिश्रेष्ठा, ही जी गोष्ट मीं सांगितली, ती पापी असो वा निष्पाप असो, मला त्याला पुनः पहावेंसें वाटतें व ही माझी चिंता आपण कृपा करून दूर करावी. या राजाच्या मनांत जें आहे तें आपण जाणतच आहां, तें त्यालाहि प्राप्त होतो. वैशंपायन म्हणतो, राजा, कुंतीनें असें सांगितलें असतां, वेदवेत्त्या व्यास मुनींनीं म्हटलें, 'ठीक आहे, तूं म्हणालीस तसें होईल. तुझा कांहींच अपराध झालेला नाहीं; कारण पुनः तुला कन्यावस्था प्राप्त झाली. ऐश्वर्यवान् असे देव मनुष्यशरीरांत खरोखर प्रवेश करूं शकतात. देवांचे विविध वर्ग असून त्यांतील कांहीं जण केवळ संकल्पानें संतति निर्माण करतात, कित्येक जण वाचेनें करतात, कोणी दृष्टिपातानें करतात, दुसरे स्पर्शमात्रें करून करतात व इतर प्रत्यक्ष संभोगानें करतात. असे ते पांच प्रकार आहेत. मनुष्य दैवी धर्माच्या आश्रयानें दूषित होत नाहीं. म्हणून हे कुंति, हें लक्षांत घेऊन तूं आपल्या मनांतील पीडा काढून टाक. कारण बलवंतांना साऱ्याच गोष्टी

हितावह असतात, सारेंच त्यांना शुद्ध असतें, ते करतील तो सर्व धर्मच असतो व सगळेंच त्यांचें स्वतःच्या स्वामित्वाचें असतें. १५. २. ३०.

---

## अध्याय ३२ वा.

[ १. कौरव पांडव हे पूर्वीच्या जन्मीं कोण होते तें धृतराष्ट्रादिकांना व्यास सांगतो. २ व्यासाच्या सांगण्यावरून ती सर्व मंडळी गंगातीरावर जाते. ]

( १ ) **व्यास**—हे गांधारि, तुझे पुत्र, भाऊ, मित्र, तशाच तुझ्या सर्व सुना आपल्या पतींसह रात्रौ झोंप घेऊन सकाळीं उठल्यासारख्या तुला पहावयास मिळतील. कुंतीला कर्ण दिसेल व सुभद्रेला अभिमन्युहि दिसेल. द्रौपदीचे पांची पुत्र, भाऊ, पितर हे तिच्याहि दृष्टीस पडतील. माझ्या मनांत ही गोष्ट पूर्वीच आली होती; पण तीच आतां धृतराष्ट्र, कुंती व तूं यांनीं मला निकडीनें सांगितली. जे वीर युद्धांत क्षत्रियधर्माला अनुसरून मरून गेले, त्या महात्म्यांविषयीं शोक करण्याचें कारण नाहीं. हे निष्पाप गांधारि, ती गोष्ट देवांचें कार्य म्हणून व्हावयाचीच होती. ते सर्व देवच भूमितलावर अंशरूपानें अवतरले होते. त्यांतील कांहीं गंधर्व होते, कांहीं अप्सरा होत्या, तर कांहीं पिशाच, यक्ष व राक्षस होते. कित्येक जण पुण्यजनांचे, कित्येक सिद्धांचे व कित्येक देवर्षींचे अंश असून ते सर्व कुरुक्षेत्रीं रणांगणांत वध पावून परत आपल्या ठिकाणीं गेले. गधर्वांचा राजा जो ज्ञानी धृतराष्ट्र तोच या लोकींहि तुझा पति धृतराष्ट्र होय. पांडु हा मरुद्गणांचा अंश होता. कृष्ण हा देवश्रेष्ठ विष्णूच होय. विदुर हा यमधर्माचा अंश होता, तसाच युधिष्ठिरहि आहे. कली दुर्योधन झाला होता. द्वापरानें शकुनिरूप घेतलें. दुःशासन आदिकरून इतर पुत्र हे राक्षस होते. भीम मरुताचा अंश असून अर्जुन हा प्रत्यक्ष नरऋषीच होय. कृष्ण हा नारायणऋषि असून अश्विनीकुमार हेच नकुल व सहदेव झाले आहेत. पार्थाचा पुत्र तुम्हांला सर्वांना आनंदविणारा पांडवांचा अंकुर, ज्याला सहा महारथ्यांनीं धेरून मारिलें, तो सौभद्र अभिमन्यु हा सोमाचा अंशावतार होता. त्याचप्रमाणें सूर्यहि आपले दोन अंश करून एकानें आकाशांत तळपत राहिला व दुसरा तो कर्ण. द्रौपदीसह अग्नींतून निघालेला धृष्टद्युम्न म्हणजे अग्नीचा अंश असून शिखंडी हा राक्षस होता. द्रोण हा बृहस्पतीचा अंश व अश्वत्थामा हा रुद्राचा होय. गंगापुत्र भीष्म हा तर मनुष्यलोकीं आलेला वसूच होता. हे सुज्ञ गांधारि, असे ते देवादिक

मनुष्यलोकीं येऊन आपलें कार्य केल्यावर पुनः स्वर्गी गेले. तरीपण त्यांच्या-संबंधानें तुमच्या सर्वांच्या अंतःकरणांत जें दुःख फार दिवस राहिलें आहे, तें परलोकीं त्यांचें काय झालें असेल या चिंतेनें असल्यामुळें ती तुमची चिंता मी आतां दूर करतों. तुम्ही सर्वजण आतां भागीरथी नदीवर चला म्हणजे जे वीर रणांगणावर वध पावले त्या सर्वांचें दर्शन तेथें तुम्हांला घडेल.

( २ ) वैशंपायन म्हणतो, राजा, व्यासानें असें सांगितलें असतां तें ऐकून मोठा सिंहनाद करीत ती मंडळी गंगानदीकडे चालूं लागली. अमात्यांसह धृतराष्ट्र, पांडव, ऋषिगण, गंधर्व इत्यादि तेथें जमलेल्या सर्व मंडळीला घेऊन गंगेच्या तीरावर येऊन पोंचला. सर्वांनीं आपआपल्या आवडीप्रमाणें व सोई-प्रमाणें जागा पाहून बैठकी मारिल्या. मृतवीरांच्या दर्शनाची उत्कंठा त्यांना इतकी लागली होती कीं दिवस संपून रात्र केव्हां येते याची वाट पहातां पहातां त्यांना तो दिवस शंभर वर्षांसारखा वाटला. मग शेवटीं सूर्य जेव्हां अस्तगिरीवर गेला तेव्हां त्यांनीं स्नानें केलीं व रात्रौ करावयाचे विधि उरकून घेतले. १५.२.३१.

---

## अध्याय ३२ वा.

[ १. धृतराष्ट्रादिकांना भीष्माचें व पुत्रादिकांचें दर्शन ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, रात्र पडून सर्वांचीं संध्यावंदनादि कृत्यें आटोप-ल्यावर तेथें जमलेली सर्व मंडळी व्यासापाशीं आली. तेथें धृतराष्ट्र शुद्ध व एकचित्त होऊन पांडवांना घेऊन ऋषींच्या जवळ बसला. गांधारीसह इतर स्त्रिया बसल्या व दुसरे सर्वजण आपआपल्या योग्यतेप्रमाणें आसनें घालून बसले. मग व्यासानें भागीरथीच्या पवित्र जलांत प्रवेश करून सर्व मृत लोकांना म्हणजे पांडव कौरवांचे जे नातेवाईक व इष्टमित्र निरनिराळ्या देशांत रहाणारे असून युद्धासाठीं येऊन मरण पावले होते त्यांना बोलाविलें. त्यावेळीं पाण्यांतून जो प्रचंड शब्द निघाला तो पूर्वीं भारतीय युद्धाला आरंभ होतांना कौरव-पांडवांच्या सैन्यांतून जसा उठला होता तसाच होता. थोड्या वेळानें भीष्म-द्रोण प्रमुख सर्व वीर व राजे आपआपल्या सैन्यांसह त्या गंगाजलांतून वर येऊं लागले. त्यांत विराट व द्रुपद हे आपल्या पुत्रांसह दिसत असून द्रौपदीचे पांची पुत्र, अभि-मन्यु, घटोत्कच राक्षस, कर्ण, दुर्योधन, महारथी शकुनि, दुःशासनादि इतर धृतराष्ट्र पुत्र हे जसे होते, तसेच जरासन्धाचा पुत्र भगदत्त, वीर्यशाली जलसंध, भूरि-

श्रवा, शल, शल्य, बंधूंसह वृषसेन, दुर्योधनाचा पुत्र लक्ष्मण, धृष्टद्युम्नाचे पुत्र, शिखंडीचे पुत्र, बंधूंसह धृष्टकेतु, अचल, वृषक, अलायुध राक्षस, बाल्हीक, सोमदत्त, चेकितान राजा, हे व दुसरे किती तरी होते. ते फारच असल्यामुळें त्यांचीं नांवें कोठवर सांगावीं? ते सर्व आपल्या कांतियुक्त शरीरांनीं जलांतून बाहेर आले. प्रत्येक वीराचा वेष, ध्वज, वाहन हीं पूर्वी जशीं होतीं तशींच या वेळींहि असलेलीं दिसलीं. सर्वांच्या अंगावर दिव्य वस्त्रें व कानांत चमकणारीं कुंडलें होतीं. त्यांचें परस्परवैर, अहंकार, क्रोध, मत्सर, इत्यादि विकार सर्व नष्ट झाले असून गंधर्व व बंदिजन त्यांचें स्तुतिगायन करीत होते. त्यांनीं दिव्य वस्त्रें व पुष्पमाला धारण केल्या होत्या व अप्सरांचा तांडा त्यांच्या भोंवतीं नृत्य करीत होता. त्यांना पहातां यावें म्हणून व्यासानें धृतराष्ट्राला त्यावेळीं संतोषानें आपल्या तपोबलानें दिव्य दृष्टि दिली. गांधारीला दिव्य ज्ञानबल होतेंच. तिला सर्व मृत मंडळी तेथें दिसून आली. तो विचारापलीकडील अद्भुत व रोमांचकारी देखावा पांडवादि सर्व मंडळी चकित होऊन डोळ्याचें पातेंहि न लववितां टकमक पहात राहिली. तो आनंदाचा मोठा सोहळा झाला व सर्व स्त्रीपुरुषांना फार हर्ष झाला. चित्रपटावर जसें चित्र दिसावें तसा तो आश्चर्यकारक देखावा दिसला. व्यासमुनीच्या कृपेनें दिव्य दृष्टि मिळून त्या सर्व इष्टमित्रपुत्रबांधवांचें दर्शन धृतराष्ट्राला घडल्यामुळें तो आनंदानें भरून गेला. १४.२.३२.

---

## अध्याय ३३ वा.

[ १. सर्वजणांची प्रेमाची परस्पर भेट व स्त्रियांचें आपआपल्या पतींच्या लोकीं गमन. ]

**वैशंपायनः**—राजा, मग त्या मंडळीच्या परस्पर भेटी झाल्या. ते सर्व क्रोध व मत्सर विसरून निष्पाप झाले होते. ब्रह्मर्षि व्यासानें अनुष्ठिलेल्या विधीनें ते स्वर्गांतील देवांप्रमाणें आनंदित झाले. त्यावेळीं पुत्रांची आईबापांशीं भेट झाली, पत्न्यांची पतींशीं झाली, भावांची भावांशीं झाली व मित्र मित्रांना भेटले; पांडव पराक्रमी कर्णाला व अभिमन्यूला भेटले. द्रौपदीच्या पुत्रांचीहि त्यांना आनंदाची भेट झाली. मग कर्णासह पांडव हर्षभरित होऊन एकत्र झाले व प्रेमळपणें वागले. याप्रमाणें एकमेकांविषयींचा

त्यांचा राग नाहींसा झाल्यामुळें ते सारे क्षत्रिय वीर व्यासमुनीच्या कृपेनें वैर-मुक्त होऊन मित्रत्वानें भेटले. गुरु, बांधव, पुत्र, इत्यादि एकमेक एकमेकांना प्रेमानें भेटून त्यांनीं ती सारी रात्र आनंदाचा विहार करून घालविली. सर्वांना संतोष वाटला. शोक, भय, दुःख, उद्वेग, अकीर्ति, यांपैकीं कांहींच शेष राहिलें नाहीं. स्त्रियांनाहि पिते, भाऊ, पति, पुत्र यांच्या भेटीमुळें मोठा आनंद होऊन त्यांनीं सारें दुःख टाकून दिलें. याप्रमाणें त्या वीरांनीं व त्यांच्या स्त्रियांनीं एक रात्र परस्परांच्या सहवासांत एकमेकांशीं बोलून एकमेकांना कवटाळून विहार केला व नंतर तीं आपआपल्या ठिकाणीं जावयास सिद्ध झालीं. व्यासमुनीनें मग त्यांना पुनः त्यांच्या स्थानीं पाठवून दिलें व ते सर्व एक क्षणांत पांडवमंडळी पहात असतां असतां दिसत नाहींसे झाले. भागीरथी नदींत बुड्या मारून ते आपल्या रथांसह, ध्वजांसह आपल्या देवलोकींच्या स्थानीं निघून गेले; कोणी इन्द्रलोकीं गेले, कोणी ब्रह्मलोकीं गेले, कोणी वरुणलोकीं गेले, तर कित्येक कुबेरलोकीं गेले. तेथून कांहींजण यमलोकीं गेले व कांहीं राक्षसलोक, पिशाच-लोक, उत्तरकुरु, असे जे लोक त्यांनीं मिळविले होते, तिकडे गेले.

ते सर्व वीर निघून गेल्यावर कौरवकुलाचा हितकर्ता धर्मशील तेजस्वी महा-मुनि व्यास पाण्यांतच उभा राहून ज्या क्षत्रियस्त्रियांचे पति वध पावले होते त्यांना उद्देशून म्हणाला, 'ज्या साध्वी स्त्रियांना पतिलोकीं जाण्याची इच्छा असेल, त्या सर्वांनीं तत्काल आळस टाकून या भागीरथीच्या जलांत प्रवेश करावा.' त्याप्रमाणें आपल्या श्वशुराच्या वचनावर विश्वास ठेवून त्या साध्वी स्त्रिया त्याची अनुज्ञा घेऊन गंगेच्या पाण्यांत शिरल्या व मनुष्यदेहांतून सुटून आपल्या पतींशीं जाऊन मिळाल्या. याप्रमाणें एकामागून एक त्या सर्व क्षत्रियस्त्रिया जलप्रवेश करून पतिलोकास गेल्या व त्यांच्या पतींप्रमाणेंच त्याहि दिव्यरूपयुक्त, दिव्य-भूषणांनीं अलंकृत, व दिव्यपुष्पांच्या माळा व वस्त्रें धारण करणाऱ्या झाल्या. शील व गुण यांनीं संपन्न अशा त्या श्रममुक्त होत्सात्या विमानांत बसून आपल्या स्थानीं गेल्या. त्यावेळीं ज्यांना ज्यांना जी जी इच्छा झाली ती ती धर्मवत्सल व्यासानें पुरी करून त्यांना संतुष्ट केलें. तें वीरांचें पुनरागमन पाहून नानादेशांहून आलेल्या सर्वजणांना मोठा अचंबा वाटला. राजा, त्या प्रसंगींचा प्रियजनांच्या भेटीचा हा वृत्तांत जो कोणी श्रवण करील, त्यांच्या सर्व आवडी इहलोकीं व परलोकींहि नित्य पुरतील. त्याचप्रमाणें इष्टमित्रांच्या भेटीचें हें वृत्त जो मनापा-सून दुसऱ्यांना सविस्तर सांगेल, त्याला या लोकीं कीर्ति लाभून परलोकीं उत्तम

गति लाभेल. हें अद्भुत असें पुत्रदर्शनपर्व ऐकणाऱ्या वेदाभ्यासी, तपस्वी, सदाचरणी, शमदमसंपन्न, दानशील, निष्पाप, सरळ व शुद्ध अंतःकरणाच्या, हिंसा व असत्य यांचा त्याग केलेल्या, श्रद्धाळू, धैर्यशील माणसांना उत्तम गति मिळेल. १५. २. ३३.

---

## अध्याय ३४ वा.

[ १. जनमेजयाला वैशंपायनाचा उपदेश ]

( १ ) **सौति** :—ऋषिहो, आपल्या पितामहांच्या पुनः येण्याजाण्याचा हा सारा वृत्तांत ऐकून त्या ज्ञानी जनमेजय राजाला मोठा आनंद झाला. पण त्यानें त्या संबंधानें वैशंपायनाला विचारिलें, ' मुने, एकदां देहत्याग केल्यावर त्याच रूपानें मनुष्यांचें दर्शन पुनः कसें होतें बरें ? ' राजाचा हा प्रश्न ऐकून व्यास-शिष्य प्रतापी वैशंपायन मुनि त्याला उत्तरला, ' राजा, कोणत्याहि कर्माचा कधीं नाश होत नाहीं हें निश्चित होय. हीं शरीरें व त्यांची रूपें हीं सर्व कर्मांचींच फळें होत. महाभूतांचा स्वामी जो ईश्वर त्याच्या संबंधामुळें तीं महाभूतें नित्य असून त्यांचे अनित्य संयोग लुप्त झाले तरी तीं स्वतः नष्ट होत नाहींत. अनायासानें होणारें जें निवृत्त्यात्मक कर्म त्याचें फळ श्रेष्ठ असतें. पण प्रवृत्तिरूप कर्मांच्या फळांनीं युक्त होऊनच आत्मा सुखदुःखांचा उपभोग घेतो. पण त्या फळांनीं युक्त झाला तरी त्यांच्या नाशाबरोबर क्षेत्रज्ञ आत्मा कांहीं नष्ट होत नाहीं. त्याचा भूतांविषयींचा आपलेपणा जोंवर नाहींसा होत नाहीं, म्हणजे जोंपर्यंत कर्म क्षीण होत नाहीं, तोपर्यंत त्याला देहरूपता असते. पण कर्मच संपून गेलें म्हणजे प्राण्याला तो देह जाऊन दुसरा मिळतो, तेथें महाभूतें व इंद्रियें हीं त्या शरीरांत एकत्र होतात. आत्म्यापासून त्यांचा वेगळेपणा जे जाणतात, त्या योग्यांना तीं भूतेंच नित्य वाटून त्यांचे संयोग मात्र तसे वाटत नाहींत. अश्वमेधप्रकरणांत अश्वाचा वध करतांना याविषयीं श्रुतिवचन आलें आहे, तें असें:–' प्राण्यांचे प्राण ते परलोकीं गेल्यावरहि तसेच असतात. ' राजा, मी ही गोष्ट तुझ्या हिताची व आवडीची म्हणून सांगत आहें. यज्ञप्रकरणांत देवयान-मार्ग तूं ऐकले आहेस व तेच तुला अनुसरावयास योग्य आहेत. ज्या वेळीं तूं यज्ञ केला, त्या वेळींच देव तुझे हितकर्ते झाले. जीवांना गति देणारेहि तेच समर्थ होत. म्हणून त्यांच्यासाठीं यज्ञ केल्यानेंच जीव उत्तम गतीला जातात;

तसें न करणारे जात नाहींत. पंचमहाभूतें नित्य असून आत्माहि नित्य असल्या-मुळें जो पुरुष अल्पबुद्धित्वामुळें त्याचा नाना देहांशीं घडलेला संबंधच तेवढा पहातो, त्याला त्यांचा वियोग झाल्यामुळें सहजच दुःख वाढतें. तो अगदींच अज्ञानी होय असें माझें मत आहे. असें पहा कीं, जर त्याला स्त्रियांदिकांच्या वियोगाचें दुख होतें, तर प्रथम त्यानें त्यांचा संबंधच आणूं नये. खरें पाहिलें तर असंग अशा आत्म्याचा कशाशीं संगमच जर होत नाहीं, तर मग वियोगाचें दुःख तरी त्याला कसलें होणार ? पण ज्याच्या ज्ञानाची मर्यादा इतकी गेली नाहीं, ज्याला नित्य व अनित्य वस्तूंचें केवळ शब्दज्ञान झालें आहे, तो देहाभिमानांतून बाहेर आलेला नसतो. पण तो सगुण ब्रह्माचें ज्ञान होऊन हळुहळु केवल आत्म्याच्या ज्ञानालाहि अधिकारी होतो व शेवटीं मूलभूत अशा अज्ञानापासून मुक्त होतो. अदृश्यांतून येऊन प्राणी पुनः अदृश्यांत जातो, तेव्हां त्याला मी जाणणार कसा ? व तो तरी मला जाणणार कसा ? तें जाणण्यास जें वैराग्य अवश्य आहे तें माझ्यांत नाहीं ! असो दुर्बळ असा जीव ज्या ज्या शरीरानें जें जें कर्म करतो, त्या त्या शरीरानेंच तो त्याच्या फलाचा तो निःसंशय उपभोग घेतो. म्हणजे मानसिक कर्मांचा उपभोग मनानें मिळतो व शारीरिक कर्माचा शरीरानेंच मिळतो. १५. २. ३४.

## अध्याय ३५ वा

[ १. जनमेजयाला आपल्या पित्याचें दर्शन ]

( १ ) **वैशंपायनः**—राजा, आपल्या पुत्रांना धृतराष्ट्रानें पूर्वीं कधीं पाहिलें नव्हतें; अर्थात् त्यांचें प्रत्यक्ष दर्शन व्यासकृपेनें झाल्यामुळें तो आनंदित झाला. त्याला राजधर्म, ब्रह्मोपनिषद् व निश्चित बुद्धि हीं प्राप्त होऊन व्यासाच्या सान्नि-ध्यामुळें सिद्धि मिळाली. तशीच विदुरालाहि स्वतःच्या तपोबलावर ती मिळाली.

**जनमेजयः**—मुने, आपण म्हणतां तें सर्व ठीक आहे. पण ते वरद व्यासमुनि जर मलाहि माझ्या पित्याचें दर्शन त्याच्या मूळच्या वेशांत व रूपांत करून देतील, तर माझा त्या सर्वांवर खरोखरीचा विश्वास बसेल. तसें झाल्यास माझ्या मनाजोगें होईल, मीं कृतकृत्य होऊन जाईन व माझी बुद्धि स्थिर होईल. ही माझी इच्छा त्या ऋषिवर्यांच्या कृपेनें पूर्ण होईल काय ?

**सौति**—ऋषि हो, जनमेजय राजा हा प्रश्न वैशंपायनाला करीत आहे इतक्यांत प्रतापशाली व्यासमुनींनीं त्याच्यावर कृपा करून परीक्षित् राजालाहि त्या ठिकाणीं आणिलें. स्वर्गांतून मूळच्याच वेळांत व मूळच्याच स्वरूपांत आपला पिता भूमीवर आलेला राजाला दिसला. त्याच्या बरोबर महात्मा शमीक ऋषि व त्याचा पुत्र शृंगी, तसेच परीक्षिताचे अमात्यहि त्याला दिसून आले. मग राजा जनमेजयानें अवभृथ स्नान करून आनंदित मुद्रेनें पित्याला पाहिलें व त्यालाहि तें स्नान घातलें. अवभृथस्नानानंतर तो त्या यायावरकुलोत्पन्न जरत्कारुपुत्र आस्तिकमुनीला म्हणाला, 'मुने, हा आपला यज्ञ नाना आश्चर्यांनीं युक्त होऊन गेला असें मला वाटतें; कारण माझा पिता या ठिकाणीं मला प्रत्यक्ष पहावयास मिळून माझें दुःख नष्ट झालें.'

**आस्तिक**—राजा, ज्या यज्ञांत तपस्वी द्वैपायन व्यास मुनि उपस्थित आहेत, त्याच्या कर्त्याला उभयलोक जिंकतां आले तर नवल काय? राजा, तुला हें अद्भुत आख्यान ऐकावयास मिळालें व सर्पहि भस्म होऊन तूं पितृलोकाचा धनी झालास. राजा, तुझ्या सत्यवचनामुळें तक्षक कसा बसा सुटून गेला; सर्व ऋषींचा सन्मान झाला व पित्याची गतिहि तुला समजली. तुला पापविनाशक कथा ऐकावयास मिळून मोठ्या धर्माची जोड झाली व ज्ञानीपुरुषांच्या दर्शनानें तुझ्या हृदयांतील अज्ञान ग्रंथीहि उलगडून गेल्या. जे धर्माचे पक्षपाती व सद्वर्तनाची आवड बाळगणारे आहेत, त्यांच्या दर्शनानें पाप नष्ट होतें; म्हणून त्यांना नमस्कार करावा.

**सौति**—ऋषिहो, आस्तिकाचा उपदेश ऐकून जनमेजय राजानें पुनःपुनः त्याचा बहुमान केला, आणि वैशंपायनाला धृतराष्ट्राच्या वनवासाचें उरलेलें वृत्त सांगण्याची विनंति केली. १५. २. ३५.

---

## अध्याय ३६ वा.

[ १. धृतराष्ट्राच्या आश्रमांतून युधिष्ठिरादिकांचें हस्तिनापुरीं पुनरागमन. ]

( १ ) **जनमेजय :**—मुने, पुत्र पौत्र व इतर संबंधी यांचें दर्शन घेतल्यावर धृतराष्ट्र व युधिष्ठिर राजा यांनीं पुढें काय केलें बरें ?

**वैशंपायन :**—राजा, अद्भुत असें तें आपल्या पुत्रादिकांचें दर्शन घडल्यावर धृतराष्ट्राचा शोक दूर झाला व तो आश्रमास परत आला. इतर ऋषि व लोक धृतराष्ट्राची संमति घेऊन आपआपल्या वाटेनें निघून गेले, पांडव मात्र आपल्या सैन्यासह स्त्रियांना घेऊन धृतराष्ट्राकडे गेले. मग व्यासमुनि धृतराष्ट्राला म्हणाले, ' हे वीर्यशाली धृतराष्ट्रा, ऐक. ज्ञानवृद्ध व पवित्र कर्मे केलेल्या कुलीन वेदवेत्त्या ब्राह्मणांकडून धर्मविषयक अनेक कथा तूं आजवर ऐकिल्या आहेस. तरी आतां शोकांतून मन काढ. मनुष्याला दैवयोगानेंच पीडा होत असते. देवलोकाहून आलेल्या नारदाकडून तुला देवांचें रहस्यहि कळलें आहेच. तुझे पुत्रादि वीर क्षात्रधर्मानें वागून शस्त्रानें मिळणाऱ्या उत्तम गतीला गेले आहेत. तूं जसे त्यांना पाहिलेंस तसेच खरोखर ते स्वर्गीं स्वैर विहार करीत आहेत. स्वतः बुद्धिमान् युधिष्ठिर आपल्या बंधूंसह, स्त्रीसह व मित्रांसह तुझी आज्ञा पाळीत आहे. तरी आतां त्याला निरोप दे. त्याला राज्यकारभार पहावयास जाऊं दे. येथें वनांत आल्याला त्याला महिन्याच्यावर काळ होऊन गेला. राज्य हें फार प्रयासानें रक्षण करावें लागतें. त्याच्या रक्षणांत फार विघ्नें असतात. '

अतुल तेजाच्या व्यासानें धृतराष्ट्राला असें सांगितलें, तेव्हां तो युधिष्ठिराला हाक मारून त्याला म्हणाला, ' बा अजातशत्रो, तुझें कल्याण असो. तूं आतां माझें म्हणणें ऐक. तुझ्या कृपेनें माझा शोक आतां अगदीं नाहींसा झाला आहे. बाळा, मीं आतां तुझ्या संगतींत हस्तिनापुरांत असल्यासारखाच आनंदांत आहें. माझें प्रिय करण्यासाठीं उत्सुक असलेला तूं राजा माझ्या सेवेला असल्यामुळें पुत्राचें फळ मला तुझ्यापासून मिळालें आहे. तुझ्यावर माझें फारच प्रेम आहे. माझा तुम्हांवर मुळींच राग नाहीं. तरी तूं आतां हस्तिनापुरास जा. व्यर्थ काळ दवडूं नको. तुम्हाला येथें पाहून माझ्या तपाचाहि खोळंबा होत आहे. माझें शरीर तपानें क्षीण झालें असतांहि तुला पहातांच त्याला पुनः टवटवी आली. माझ्या प्रमाणेंच तुझ्या मातांचेंहि वाळलेलीं पानें खाऊन रहाण्याचें व्रत बराच काळ लुप्त झालें आहे. परलोकीं गेलेले दुर्योधनादिक व्यासाच्या तपोबलानें व

तुमच्या भेटीमुळें मला पहावयास मिळाले. आतां जगून ज्या गोष्टी मला करा-व्याशा वाटत होत्या, त्या सर्व होऊन गेल्या असून अधिक जगण्याचें प्रयोजन राहिलेलें नाहीं. तरी मी आतां उग्र तप करूं इच्छितों, त्याला तूं कृपा करून अनुज्ञा दे. आतां या कुरुकुलाला पिंड देण्याचा अधिकार, त्याची कीर्ति, त्याचा सर्व भार तुझ्यावरच आहे. तरी आतां येथें फार वेळ न राहतां तूं आज नाहीं तर उद्यां तरी हस्तिनापुरास जा. युधिष्ठिरा, राजनीतिशास्त्र तूं पुष्कळांकडून ऐकिलें आहेसच. आतां तुला आणखी सांगावयाचें कांहीं राहिलें आहे असें मला दिसत नाहीं. तुझ्या योगानें मीं कृतकृत्य झालों आहें.'

राजा, धृतराष्ट्राच्या या बोलण्यावर युधिष्ठिर म्हणाला, 'हे धर्मज्ञा, मला निरपराध्याला असें सोडूं नका. माझे बंधु व इतर सर्व मंडळी यांना जाऊं द्या. मीं येथें राहून तुमची व मातांची व्रतपूर्वक सेवा करीन.' त्यावर गांधारी त्याला म्हणाली, 'बाळा, असें म्हणूं नको. माझें ऐक. हें कुरुकुल तुझ्यावर अवलंबून असून माझ्या श्वशुरांचे पिंडहि तुझ्याच हातीं आहेत. तरी तूं आतां जा. आमची तूं सेवा केलीस, ती खरोखर पुरेशी आहे. महाराजांनीं तुला जें सांगितलें तसें करणेंच तुला योग्य आहे.' गांधारी असें म्हणाली असतां युधिष्ठिर रडत असलेल्या कुंतीला म्हणाला, माते, धृतराष्ट्रमहाराज व गांधारी मला जा म्हणून म्हणत आहेत. पण तुझ्याकडे माझें मन लागलें असल्यामुळें त्या दुःखानें माझें पाऊल येथून उठावें कसें? तुमच्या तपांत विघ्न करावें असेंहि मला वाटत नाहीं. तपाहून अधिक काय आहे? तपानेंच मोठें फळ मिळतें. मलाहि पूर्वीं प्रमाणें राज्य करण्याची आवड आतां राहिलेली नाहीं. तप करावें असेंच माझें मन मला सांगत आहे. शून्य झालेलें हें सर्व राज्य मला सुख देऊं शकत नाहीं. आपले बांधव बहुतांशीं नष्ट झालेले असून सैन्यहि पूर्वींसारखें राहिलेलें नाहीं. पाञ्चाल फारच थोडे राहिले असून इतरांच्याहि कथाच तेवढ्या मागें राहिल्या आहेत. त्यांच्या कुलाचा उद्धार करील असा मला तर कोणी दिसत नाहीं. त्या सर्वांची द्रोणाचा-र्यांनीं रणांत राख करून टाकिली व उरल्या सुरल्यांची अश्वत्थाम्यानें रात्रीं छापा घालून वाट लाविली. चेदि व मत्स्य ह्यांनाहि पूर्वीं पाहिलें तेवढेंच. यादव मंडळी मात्र श्रीकृष्णकृपेनें राहिली आहे. त्यांच्याकडे पाहूनच धर्मासाठीं जगावेंसें वाटतें. द्रव्यलोभ हा आतां जगण्याचा हेतु राहिलेला नाहीं. आतां आमच्याकडे कृपादृष्टीनें पहा. तुझेंहि दर्शन आम्हाला दुर्लभ होणार आहे. आतां धृतराष्ट्र महाराज तर दुर्घट तप आरंभणार आहेत!'

युधिष्ठिराचें बोलणें संपतें तों वीर सहदेव डोळ्यांत आसवें आणून युधिष्ठिराला म्हणाला 'युधिष्ठिरा, आईला सोडून माझ्यानें कांहीं येववत नाहीं. तरी तुम्हीं सर्वजण हस्तिनापुरीं जा. मीं येथें तप करीत रहातों. येथेंच मीं तप करून हें शरीर सुकवून टाकीन. धृतराष्ट्रमहाराज व या दोन माता यांची मी सेवा करीत राहीन.' सहदेवाच्या या बोलण्यावर कुंती त्याला मिठी मारून म्हणाली, 'बाळा, असें बोलूं नको. तूं जा आणि माझ्या सांगण्याप्रमाणें कर. बाळानों, तुमच्या विद्या शुभदायक होवोत व तुम्हाला स्वस्थता मिळो. तुम्हीं येथें राहिल्यानें आमच्या तपाला अडथळा होईल. तुमच्या स्नेहपाशांत गुंतल्यास मीं आपल्या कडक तपापासून चळेन. तरी तुम्हीं आतां घरीं जा. आतां आमचें काय? हत्ती जाऊन शेपूटच राहिलें आहे.' याप्रमाणें नानाप्रकारें बोलून कुंतीनें सहदेवाचें व विशेषतः युधिष्ठिराचें मन कुंठित केलें. मग निरुत्तर झाल्यावर ते धृतराष्ट्राची व गांधारी आणि कुंती यांची अनुज्ञा घेऊन त्यांचा निरोप घेऊं लागले.

त्यावेळीं युधिष्ठिर म्हणाला, 'महाराज, तुमच्या आज्ञेप्रमाणें तुमचा आशीर्वाद घेऊन आम्हीं राज्यांत परत जातों. आतां आमच्या मनांत कांहीं किन्तु राहिला नाहीं. हें ऐकून धृतराष्ट्रानें युधिष्ठिराची स्तुति करून त्याला जावयास संमति दिली. भीमाचें त्यानें सान्त्वन केलें व उलट भीमानें त्याच्या म्हणण्याला रुकार दिला. मग अर्जुन व नकुळ सहदेव यांना आलिंगन देऊन धृतराष्ट्रानें सर्वांना निरोप दिला. नंतर ते सर्व बंधु गांधारीला विचारून व तिच्या पायां पडून आईनें मस्तक हुंगल्यावर तिला एकदां मिठी मारून निघाले. त्या सर्व थोरांना त्यांनीं प्रदक्षिणा घातली व दूध पिऊन झाल्यावर वासरें जशीं परततात तसे ते परतून पुनः पुनः मागें वळून पहात चालूं लागले. द्रौपदी आदिकरून स्त्रियांनींहि सासूसासऱ्यांना योग्य अशा रीतीनें बहुमान देऊन व त्यांचा निरोप घेऊन तेथून प्रयाण केलें. धृतराष्ट्र व गांधारी आणि कुंती यांनीं त्यांच्या कर्तव्याचा त्यांना बोध केला व नंतर त्या पतींबरोबर जावयास निघाल्या. तेव्हां 'घोडे जोडा, रथ जोडा' असा शब्द चोहोंकडून ऐकूं आला. उंट व घोडे खिंकाळूं लागले. सर्व सिद्धता झाल्यावर युधिष्ठिर राजा स्त्रिया, बांधव व सैन्य यांसह पुनः हस्तिनापुरास आला. १५. २. ३६

## पुत्रदर्शनपर्व समाप्त. २

# ३ नारदागमनपर्व.

## अध्याय ३७ वा.

[ १. धृतराष्ट्रादि मंडळी अरण्यांतील वणव्यांत जळून जातात. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, धृतराष्ट्राच्या आश्रमांतून युधिष्ठिर हस्तिनापुरीं आल्यावर दोन वर्षें झालीं, तेव्हां एक दिवस देवर्षिनारद त्याच्याकडे आला. युधिष्ठिरानें त्याची पूजा करून त्याला आसनावर बसविल्यावर तो त्याला म्हणाला, 'मुने, आपली भेट फार दिवसांत झाली नाहीं. आपण खुशाल आहां ना ? व आपलें सर्व ठीक चाललें आहेना ? आपण आतां कोणकोणते देश हिंडून आलां ? यावेळीं मीं आपल्यासाठीं काय करूं ? देवर्षे, आपणच आमचा मुख्य आधार आहां. तरी काय करूं तें सांगावें.'

**नारद**—युधिष्ठिरा, फार दिवसांत तुझी भेट झाली नाहीं, म्हणून तर मीं तपोवनांतून येथें आलों. वाटेंत अनेक तीर्थें व गंगानदी यांचें मला दर्शन झालें.

**युधिष्ठिर**—महाराज, गंगातीरीं रहाणाऱ्या माझ्या माणसांकडून मला कळतें कीं महात्मे धृतराष्ट्र महाराज अत्यंत खडतर तप करीत आहेत. आपल्याला ते दिसले काय ? ते खुशाल आहेतना ? गांधारी, कुंती माता व सुतपुत्र संजय हींहि ठीक आहेत ना ? धृतराष्ट्राचें कसें काय चाललें आहे ? तुम्हीं त्यांना भेटले असल्यास त्यांचें वृत्त कळावें अशी इच्छा आहे.

**नारद**—युधिष्ठिरा, जरा चित्त शांत कर, आणि सर्व वृत्त तुला यथार्थपणें सांगतों तें ऐक. मला जें स्वतःला दिसलें व जें मी ऐकिलें तें सर्व सांगतों. तुम्हीं सर्वजण त्या वनांतून इकडे परत आल्यावर तुमचा पिता धृतराष्ट्र कुरुक्षेत्राहून गंगाद्वारीं गेला. त्याच्याबरोबर गांधारी व कुंती तसाच संजयहि होता व अग्निहोत्र बरोबर घेतल्यामुळें यज्ञ चालविणारे ब्राह्मणहि होते. तेथें तोंडांत दगडाचा तुकडा धरून वायुभक्षण करीत तुझा पिता तीव्र तप करूं लागला. सर्व मुनि त्याचा बहुमान करीत असतां त्या तपानें तो सहाच महिन्यांत वाळून आंतून हाडें व बाहेरून कातडी अशा स्वरूपाला आला. गांधारी पाण्यावरच राही. कुंती महिन्यांतून एकवेळ जेवी व संजय तीन दिवसांतून एकदां अन्न खाई. युधिष्ठिरा, यज्ञ चालविणारे ब्राह्मण विधिपुरःसर अग्नि प्रदीप्त करून त्यांना आहुति देत. धृतराष्ट्राला त्या कधीं समजत, कधीं न समजत. कारण तो राजा एका ठिकाणीं न रहातां वनांत फिरे व गांधारी कुंती व संजय हीं त्याच्या

मागून जात. संजय त्याचा हात धरून खांच खळग्यांतून त्याला हिंडवी व कुंतीचा हात धरून गांधारी फिरे.

असें चाललें असतां एकदां तो गंगाकाठानें फिरल्यावर प्रवाहांत स्नान करून आश्रमास यावयास निघाला. इतक्यांत मोठा वारा सुटला व वणवा भडकला व त्यानें सारें रान वेढून जाळून टाकिलें. त्या वेळीं मृगांचे कळप, सर्प, इत्यादि जळून जाऊं लागले असतां व वराहांचे समुदाय पाण्याच्या शोधार्थ धांवत सुटले असतां सगळें वन अग्नीनें व्यापून गेलें व भयंकर संकट उत्पन्न झालें. युधिष्ठिरा, अशा स्थितींत फार दिवसांच्या उपासानें प्राणांची गति अगदीं मंदावून गेल्या-मुळें तुझ्या मातांना पळून जाण्याची शक्ति राहिली नाहीं. इतक्यांत धृतराष्ट्राच्या अगदीं जवळ येऊन आग धडकली. तें जाणून तो सूतपुत्र संजयाला म्हणाला, 'सञ्जया, तुला अग्नीपासून जळण्याची जेथें भीति नसेल तेथें तूं पळून जा कसा. आम्हीं येथेंच आतां अग्निसात् होऊन उत्तम गतीस जातों.' धृतराष्ट्राचे हे निर्वाणीचे शब्द ऐकून संजय उद्विग्न झाला आणि त्याला उलट म्हणाला, 'राजा, अग्नीनें जळून मरण येणें हें अनिष्टच होय. पण या आगींतून सुटण्याचाहि कांहीं मार्ग मला दिसत नाहीं. तर अशा या प्रसंगीं काय करावें तें तूंच सांग.' संज-यानें असें सांगितल्यावर धृतराष्ट्र पुनः म्हणाला, 'संजया, अरे घरांतून बाहेर पडलेल्यांना असा मृत्यु अनिष्ट नाहीं बरें. जल, अग्नि, वायु यानीं मरणें अथवा प्रायोपवेशन म्हणजे मृत्यु येईपर्यंत उपाशीं रहाणें या गोष्टी तपस्व्यांना उक्तच आहेत. तरी तूं येथून निघून जा, उशीर लावूं नको.' संजयाला असें सांगून धृतराष्ट्रानें मन शांत केलें आणि पूर्वेस तोंड करून तो गांधारी व कुंती यांसह जेठा मारून बसला. त्याला पाहून संजयानें त्याला प्रदक्षिणा केली व योगधारणा करावयास सांगितलें व व्यासपुत्र ज्ञानी धृतराष्ट्रानें तसें केलें. इंद्रियें आवरून तो काष्ठवत् झाला व तशा स्थितींत गांधारी व कुंती यांसह तो वणव्यांत सांपडून भस्मसात् झाला. संजय मात्र त्यांतून निसटला व तो मला तापसांच्या घोळक्यांत गंगातीरीं दृष्टीस पडला. तेथें त्यानें त्या तपस्व्यांना हाक मारून सारा वृत्तान्त सांगितला व तेथून तो हिमालयाकडे निघून गेला. राजा, या प्रमाणें ह्या कुरुराज धृतराष्ट्राचा तसाच गांधारी व कुंती यांचा अंत झाला. वाटेनें जातांना त्या तिघांचीं शरीरें मला आढळलीं. अग्नि विझून गेल्यावर तेथील तपस्वी पुनः त्या तपोवनांत आले. धृतराष्ट्राच्या मृत्यूचें वृत्त ऐकून त्यांना मुळींच वाईट वाटलें नाहीं. कारण त्यांना उत्तम गति मिळाली, असें

त्यांना समजलें. युधिष्ठिरा, त्यांनींच मला तें सारें वृत्त सांगितलें. अशा रीतीनें धृतराष्ट्र व तुझ्या माता यांनीं स्वतःच अग्निसंस्कार करून घेतल्यामुळें त्यांच्याविषयीं शोक करणें युक्त नाहीं.'

वैशंपायन म्हणतो, राजा, नारदानें सांगितलेला वृत्तान्त ऐकून पांडवांचा शोक अनावर झाला. त्यांच्या अन्तःपुरांत तर हलकल्लोळ उडून गेला. नगरांतील लोकांनाहि धृतराष्ट्राच्या मृत्यूचें वर्तमान कळल्यावर फार वाईट वाटलें. युधिष्ठिर तर हात उभारून आईची आठवण काढून आक्रोश करूं लागला. भीम व इतर बंधूंनीं तोच प्रकार केला. कुंतीच्या वृत्तान्तानें स्त्रियांतहि आकांत उडविला. सर्वच जण धृतराष्ट्र व गांधारी जळून गेल्याचें ऐकून हळहळूं लागले. कांहीं वेळानें दुःखाचा वेग मंदावून आक्रोश बंद झाला, तेव्हां युधिष्ठिरानें जरा धैर्य आणून अश्रु आवरिले आणि तो बोलूं लागला. १५. ३. ३७

## अध्याय ३८ वा.

[ १ युधिष्ठिराचा विलाप ]

( १ ) **युधिष्ठिर**—नारदमुने, माणसांचें केव्हां काय होईल हें समजणें फार कठीण आहे. अहो, तो महात्मा अनाथाप्रमाणें वनांत राहून उग्र तप करीत असतां जेव्हां आम्हीं त्याच्या आज्ञेप्रमाणें करीत होतों तेव्हां, ज्याला शंभर पराक्रमी पुत्र होते अशा प्रचंडबाहुशाली व सहस्र हत्तींचें बल असलेल्या त्या राजाला वणव्यांत जळून मरण येईल, असें कोणाच्या मनांत तरी आलें असतें काय? ज्याला सुंदर स्त्रियांनीं चौऱ्या वारून वारा घालावा, त्यावर वणव्यांत सांपडला असतां गृध्रांनीं वारा घालण्याचा प्रसंग यावा ना? झोंपी गेलेला असतां जो सूतमागधांच्या गाण्यानें जागा व्हावयाचा, त्याला मज पाप्याच्या कर्मामुळें भूमीवर पडण्याची वेळ आली! गांधारीविषयीं मी शोक करीत नाहीं. भर्त्याचें व्रत चालवीत असतां मरण येऊन तिला पतिलोकाची प्राप्ति झाली आहे. पुत्रांचें भरभराटीचें ऐश्वर्य लाथाडून जिनें वनवास आवडीनें पत्करला, त्या कुंतीचेंहि मला वाईट वाटत नाहीं. पण हें आमचें राज्य, आमचें बल, आमचा पराक्रम व ज्यामुळें आम्हाला मेल्याप्रमाणें राहून जगावें लागत आहे, तो क्षात्रधर्म यांना मात्र धिक्कार असो. नारदा, कालाची गति खरोखर गहन आहे. नाहीं तर कुंती हें राज्य टाकून वनांत कां रे

जाती ? युधिष्ठिर. भीम, अर्जुन यांची माता आणि ती अनाथाप्रमाणें वनांत जळून मरते ! या गोष्टीचा विचार मनांत आला कीं मी मोहूनच जातों. खरोखर खाण्डववनांत अर्जुनानें अग्नीला तृप्त केलें तें व्यर्थ गेलें. कारण त्या कृतघ्नानें उपकारांची ओळख ठेविली नाहीं. ब्राह्मणाचा वेष घेऊन तो भिक्षा मागावयास आला व त्याला अर्जुनानें ती दिली; पण त्याच अर्जुनाच्या मातेला तो अग्नि जाळून टाकितो ! धिक्कार असो त्याला व अर्जुनाच्या सत्यप्रतिज्ञत्वाला ! नारद-मुने, धृतराष्ट्राला मंत्रहीन अग्नीचा संस्कार झाला ही गोष्ट तर मला अत्यंत दुःखदायक वाटते. तो कौरवाधिपति राजर्षि तपस्वी असतां त्याला अशा प्रकारचा मृत्यु यावा आणि तोहि त्याचे मंत्रपूत अग्नि वनांत पेटत असतांना ? माझ्या पित्याला भडाग्नीचा संस्कार मिळावा काय ? मला वाटतें, कृश होऊन अस्थिपंजर बनलेली कुंती अग्निभयानें 'हे युधिष्ठिरा, अरे भीमा,' अशा हाका मारून 'या संकटांतून सोडवा रे,' असें ओरडली असेल ! आणि अशावेळीं अग्नीनें तिला घेरलें असेल. स्वतःच्या पुत्रांपेक्षांहि सहदेव तिला प्रिय होता व तोहि तिची पाठ कधीं सोडीत नसे !'

राजा, युधिष्ठिराचा हा आक्रोश ऐकून पांडव एकमेकांना मिठ्या मारून रडूं लागले. युगान्तींच्या प्रलयप्रसंगीं प्राण्यांची जी अवस्था व्हावी ती त्यांची झाली. त्यांच्या रडण्याचा स्वर राजवाड्यांतून वर जाऊन आकाशापर्यंत भिडला व त्यानें सारें अंतरिक्ष भरून टाकिलें. १५. ३. ३८.

---

## अध्याय ३९ वा.

[ १. युधिष्ठिर धृतराष्ट्रादिकांचीं श्राद्धें करतो. ]

( १ ) **नारद**—युधिष्ठिरा, धृतराष्ट्रराजाला भडाग्नीचा संस्कार झाला असें नाहीं. त्या संबंधानें तेथें जें मीं ऐकलें तेंच तुला सांगतों. वायुभक्षण करून रहात असतां तो जेव्हां वनांत निघाला, तेव्हां इष्टि करून त्यानें ते अग्नि तेथेंच ठेवून दिले हें आपण ऐकलेंच आहे. त्याचे याज्ञिक ब्राह्मण जेव्हां तेथून गेले, तेव्हां त्यांनीं त्या निर्जन वनांत ते अग्नि तसेच ठेविले व आपण वाटेल तिकडे निघून गेले. तोच अग्नि पेटत पेटत त्या वनांत पसरला आणि त्यानें तें सारें वन जाळिलें असें त्या तापसांनीं मला सांगितलें. तात्पर्य धृतराष्ट्राला त्याच्या स्वतः-च्याच मंत्राग्नीचा संस्कार शेवटीं झाला व तेथेंच मीं त्याचें शरीर पाहिल्याचें मीं पूर्वींच सांगितलें. भागीरथीच्या तीरावर मला जे तापस आढळले, त्यांनींच मला

असें सांगितलें. तेव्हां स्वत:च्याच अग्नीशीं धृतराष्ट्राचा योग झाल्यामुळें त्याविषयीं शोक करणें युक्त नाहीं. तो उत्तम गतीला गेला आहे. तुझ्या मातेलाहि गुरुशुश्रूषेच्या बलावर मोठी सिद्धि मिळाली आहे यांत शंका नाहीं. राजा, आतां त्यांची उदकक्रिया कर. हेंच आतां करणें योग्य.

**वैशंपायन**—राजा, नारदाच्या सांगण्याप्रमाणें नंतर राजा युधिष्ठिर बंधूंसह व स्त्रियांसह बाहेर पडला. त्याच्याबरोबर राजभक्त असे प्रजाजन व नागरिकहि निघाले. एका वस्त्रानिशीं ती सारी मंडळी गंगेवर गेली व खालीं उतरून सर्वांनीं स्नानें केलीं. मग सर्वांनीं युयुत्सूला पुढें करून महात्म्या धृतराष्ट्राला तसाच गांधारी व कुंती यांनाहि नाम व गोत्र यांचा उच्चार करून तिलांजलि दिला. अशौच संपेपर्यंत ती सर्व मंडळी नगराबाहेरच राहिली. धृतराष्ट्र जेथें दग्ध झाला होता तेथून युधिष्ठिरानें विधि जाणणारीं माणसें त्या गंगाद्वाराजवळच्या स्थानीं पाठविलीं व त्यांना तेथें त्या मृतांचीं उत्तर कार्यें करावयास सांगितलें. त्यांच्या बरोबर त्यांच्यासाठीं द्यावयाचीं दानेंहि त्यानें पाठविलीं. नंतर बाराव्या दिवशीं युधिष्ठिरानें शुद्ध होऊन त्यांचीं विधियुक्त श्राद्धें केलीं व त्याप्रीत्यर्थ दक्षिणा दिल्या. धृतराष्ट्राला उद्देशून त्यानें सोने, रुपें, गाई व मूल्यवान् शय्या दिल्या. गांधारी व कुंती यांच्या प्रीत्यर्थहि तशींच पृथक् पृथक् उत्तम दानें त्यानें त्यांचीं नांवें घेऊन दिलीं. ज्या मनुष्याला ज्याची इच्छा झाली, त्याला तें त्यावेळीं मिळालें, मग तें शयन असो, भोजन असो, वाहन असो, कीं मणि, रत्नें अथवा दुसरें कांहीं द्रव्य असो. वाहनें, वस्त्रें, भोग, अलंकृत दासी, अशीं दानें युधिष्ठिरानें आपल्या मातांसाठीं दिलीं. अशा रीतीनें विविध श्राद्धें केल्यावर युधिष्ठिर हस्तिनापुरांत परत आला. त्याच्या सांगण्यावरून जीं माणसें गंगाद्वारीं गेलीं होतीं, तीं धृतराष्ट्रादिकांच्या अस्थि गोळा करून गंगेवर परत आलीं, तेव्हां माळा, गंध, इत्यादि साहित्यानें त्या अस्थींची विधिपुर:सर पूजा करण्यांत आल्यावर त्या गंगेंत सोडण्यांत आल्या. मग युधिष्ठिराचें सान्त्वन करून नारद आपल्या इष्ट स्थानीं निघून गेला.

राजा, याप्रमाणें धृतराष्ट्रानें युद्धानंतर हस्तिनापुरांत पंधरा व पुढें वनवासांत तीन अशीं अठरा वर्षें पुत्रविरहांत नित्य दानें देत काढिलीं. पण त्यानंतर ज्ञातिबांधव नष्ट झाले असल्यामुळें युधिष्ठिरानें मात्र अगदीं अस्वस्थमनानेंच राज्य चालविलें. १५. ३. ३९.

## नारदागमनपर्व समाप्त. ३

## आश्रमवासिक पर्व समाप्त.

---

# मौसल पर्व १६

## अध्याय १ ला.

[ १. मुसलोत्पत्तीची कथा ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, युधिष्ठिरराजा राज्य करूं लागून छत्तिसावें वर्ष चालू झालें, तेव्हां एक दिवस त्याला चमत्कारिक दुश्चिन्हें दिसून आलीं. सोसाट्याचे शुष्क वारे वेगानें वाहून रेतीचा वर्षाव करूं लागले; पक्षी डावीकडून फिरत घिरट्या घालूं लागले; मोठमोठ्या नद्या गुप्त झाल्या; साऱ्या दिशा धुक्यानें भरून गेल्या; निखाऱ्यांचा वर्षाव करणाऱ्या उल्का आकाशांतून भूमीवर पडूं लागल्या; सूर्यबिंब धुळीनें आच्छादून गेलें; उदयकालीं सूर्य किरणरहित होऊन शिरोविहीन धडें नाचूं लागलीं; चंद्रसूर्यांना भयंकर खळीं पडूं लागलीं; भयसूचक अनेक उत्पात घडूं लागून मनाला उद्विग्न करूं लागले. त्या वेळीं यादवमंडळीचा मुसलाच्या निमित्तानें नाश झाल्याचें वृत्त युधिष्ठिराच्या कानीं आलें. श्रीकृष्ण आणि बळराम हेहि मुक्त होऊन गेले असें ऐकतांच त्यानें बंधूंना एकत्र बोलाविलें आणि पुढें काय करावयाचें याचा विचार चालविला. ब्रह्मदंडाच्या योगानें यादवांनीं एकमेकांचा संहार केला हें ऐकून पांडवाचें मन व्यथित झालें. समुद्र सुकून गेला, असें कोणी म्हटल्यास जसा त्यावर विश्वास बसणार नाहीं, तसा कृष्णाचा नाश झाला ही वार्ताहि कोणाला खरी वाटेना. मुसळानें केलेला यादवांचा नाश मनांत येऊन पांडवांना मोठा खेद झाला आणि आपले सर्व संकल्पच नष्ट झाले असें त्यांना वाटलें.

**जनमेजय**—मुने, श्रीकृष्ण जवळ असतांना अन्धक वृष्णि व भोज हे सारे वीर नष्ट झाले तरी कसे बरें ?

**वैशंपायन**—राजा, युधिष्ठिराच्या राज्यारोहणाच्या छत्तिसाव्या वर्षीं यादवांनीं मोठा अन्याय केला व काळाच्याच जणूं प्रेरणेनें त्यांनीं एकमेकांना मुसळांनीं ठार केलें.

**जनमेजय**—मुने, कोणाच्या शापामुळें ते वृष्णि, अंधक व भोज नाश पावले तें मला सविस्तर सांगावें.

**वैशंपायन**—राजा, एकदां असें झालें कीं, सारणप्रमुख यादवपुत्र नगराबाहेर खेळत असतां विश्वामित्र, कण्व, नारद हे तपोनिधि मुनि द्वारकेंत शिरत असलेले त्यांना दिसले. तेव्हां ते तरुण यादव सांबनामक कृष्णपुत्राला स्त्रीवेषानें

अलंकृत करून त्यांच्या जवळ गेले आणि दैवानें पीडिल्यासारखे त्या मुनींना म्हणाले, 'मुनिहो, ही बभ्रूची स्त्री पुत्राची इच्छा करीत आहे. तुम्ही ज्ञाते आहां, तरी हिला काय अपत्य होईल तें कृपा करून सांगा.'

ऋषींना फसविण्यासाठीं हा प्रश्न विचारिलेला असल्यामुळें त्यांनीं काय उत्तर दिलें पहा. ते म्हणाले, "वृष्णि व अंधक यांचा समूळ नाश होण्यासाठीं हा श्रीकृष्णाचा पुत्र सांब लोखंडाच्या भयंकर मुसळाला जन्म देईल व त्याच्या योगानें तुम्हीं उन्मत्त झालेले असतां दुष्टपणें एकमेकांचा मत्सर करून राम व कृष्ण यांवांचून सर्व कुळाचा उच्छेद कराल. बळराम देहत्याग करून समुद्रांत जाईल आणि कृष्ण भूमीवर पडला असतां जरा त्याचें शरीर फोडून टाकील.' त्या द्वाड मुलांवर रागावून विश्वामित्रादि मुनींनीं आपसांत ठरवून त्यांना असें उत्तर दिलें व तेथून ते श्रीकृष्णाकडे गेले. त्यांनीं सांगितलेलें वृत्त ऐकून कृष्णाला वृष्णींचा नाश होणार, हें समजून आलें व 'तसें ठरलेलेंच आहे' असें तो यादवांना म्हणाला. कृतान्ताच्या कामांत ढवळाढवळ करण्याचें त्या जगत्प्रभूच्या मनांत आलें नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सांबाला मुसळ झालें. वृष्णि व अंधक यांच्या विनाशासाठीं जणूं तो यमदूतच अवतरला व त्यानें तीं दोन्हीं कुळें नष्ट करून टाकिलीं. उग्रसेन राजाला त्या मुलांनीं शापाचें वृत्त सांगून मुसळ दाखविलें असतां त्यानें खिन्न अंतःकरणानें त्याचें घांसून पीठ करावयास सांगितलें व तें समुद्रांत नेऊन टाकविलें. मग आहुकाच्या, रामाच्या, कृष्णाच्या व बभ्रूच्या आज्ञेवरून असा घोष नगरांत करविण्यांत आला कीं, 'वृष्णि व अंधक या कुलांत कोणीहि आजपासून सुरापान करूं नये. तसेंच कोणी नागरिकानेंहि तें करूं नये. ज्या कोणी तें केल्याचें समजेल, त्याला त्याच्या कुटुंबासह सुळावर चढविण्यांत येईल.' राजाच्या या आज्ञेवरून सर्वांना भय उत्पन्न झालें व सुरापान न करण्याचा नियम बळरामाच्या उपदेशानुसार तेथील सर्व लोकांनीं केला. १६. १-१.

---

## अध्याय २ रा.

( १. द्वारकेंतील उत्पात ).

(१) **वैशंपायन**—राजा, याप्रमाणें अन्धकांसह वृष्णि येणारा अनर्थ टाळण्याचा प्रयत्न करीत असतां काळ सर्वांच्या घरांवरून फेऱ्या घालूं लागला. डोक्यावर केस नसलेला काळा पिंगट भयंकर स्वरूपाचा तो काळपुरुष वृष्णींच्या घरांत

शिरून दिसेनासा होई. त्याला मारण्यासाठीं वृष्णिवीरांनीं सहस्रावधि बाण सोडावे, पण सर्व भूतांचा नाश करण्यास प्रवृत्त झालेल्या त्याला त्यांतील एकहि लागूं नये! प्रत्येक दिवशीं भयंकर झंझावात सुटूं लागले. ते वाहूं लागले कीं अंगावर शहारे येत व वृष्णि आणि अंधक या कुलांचा नाश येऊन ठेपला असें वाटे. रस्त्यांतून उंदरांची वृद्धि भयंकर झाली. ते मडकीं फोडीत व भर दिवसा निजलेल्या माणसांचे केस व नखें खात. वृष्णीच्या घरांवर सारिका बसून चीची कुची असे शब्द रात्रंदिवस करीत व त्याला खळच पडत नसे. सारसपक्षी घुबडांसारखे ओरडत; मेंढ्या भालूसारखा शब्द काढीत. पांढऱ्या अंगाचीं व तांबड्या पायांचीं कबूतरें वृष्णि व अंधक यांच्या घरांतून वावरत. गाईंना गाढवांसारखीं वासरें होऊं लागलीं व खेचरांना उंटाचीं पिलें झालीं. कुत्र्यांना मांजरें व मुंगुसांना उंदीर झाले. वृष्णिजनांना पापकर्में करतांना लाज वाटेनाशी झाली. राम व कृष्ण यांवाचून सारे यादव ब्राह्मणांचा पितरांचा व देवांचा द्वेष करून गुरुंचा अवमान करूं लागले. स्त्रिया पतींना व पती स्त्रियांना अशीं एकमेकींना फसवूं लागलीं. अग्नि पेटविला असतां उलटा फिरे व त्याच्या काळयातांबड्या व किरमिजी ज्वाळा उठत. नगरांत सूर्य उगवण्याच्या व मावळण्याच्या वेळीं त्याच्या बिंबाभोंवतीं धडें नाचतांना दिसूं लागलीं. स्वयंपाकघरांत पदार्थ शिजून सिद्ध झाला कीं वाढतांना त्यांत सहस्रावधि किडे पडलेले दिसत. कोणी महात्मे पुण्याहवाचन किंवा शांतिपाठ करूं लागल्यास कोणी तरी धांवतें आहे असा भास होई, पण तेथें कोणी दिसेना. नक्षत्रें एकमेकांशीं आदळत व ग्रहांवर जाऊन धडकलेलीं सर्वांना दिसत, पण ज्याचें नक्षत्र त्याला मात्र दिसत नसे. वृष्णि व अंधक यांच्या घरात शंख वाजूं लागले कीं बाहेर भयंकर ध्वनि करणारे गर्दभ ओरडूं लागत.

असा तो काळाचा फेरा आलेला पाहून कृष्णाला समजून चुकलें कीं पुत्रशोकानें संतापून जाऊन गांधारीनें आपल्याला दिलेला शाप फळास येत आहे. कारण त्या पक्षांत तेराव्या दिवशींच अमावास्या आली व दुसऱ्या पक्षांतहि पौर्णिमा पुनः चवदाव्या दिवशीं पडली * व त्या दिवशीं चंद्रग्रहणहि आलें. भारतीय युद्धाच्या आरंभीं असाच प्रकार घडला होता. तेव्हां काळचक्राचा विचार करतां

---

* महाभारतांत महिन्याचा आरंभ कृष्णपक्षाच्या प्रतिपदेपासून व त्याचा अंत शुक्लपक्षाच्या पौर्णिमेला असा प्रकार आढळतो. आजहि उत्तर हिंदुस्थानांत पौर्णिमान्त महिने आहेत.

गांधारीनें सांगितलेलें छत्तिसावें वर्ष आलें असें कृष्ण समजला. दोन्ही सैन्यें पूर्वी युद्धास सज्ज होऊन उभीं राहिलीं असतां झालेले भयंकर उत्पात पाहून युधिष्ठिरानें जें म्हटलें होतें तसेंच घडून आलें. कृष्णानें या साऱ्या गोष्टी यादवांना सांगून त्या खऱ्या करण्यासाठीं सर्वांनीं तीर्थयात्रेला निघावें अशी आज्ञा पोडिली. त्याच्या आज्ञेचा सेवकांनीं घोष करून सर्वांना कळविलें कीं, 'सर्वांनीं समुद्रतीरीं तीर्थयात्रेला निघावें.' १६. १. २.

## अध्याय ३ रा.

[ १. कृतवर्मा आदिकरून यादववीर परस्परांना मारतात. ]

( १ ) **वैशंपायन** :—राजा, कृष्णवर्णाची व पांढऱ्या दांतांची स्त्री रात्रौ हंसत द्वारकेंत शिरून स्त्रियांना स्वप्नांत लुबाडून धांवत असे. अग्निहोत्रगृहांत किंवा भर घरांत अथवा मोठ्या वाड्यांतहि भयंकर गिधाडें आपल्याला खाऊन टाकीत आहेत असें वृष्णि व अंधक यांना स्वप्नांत दिसे. भयंकर राक्षस घरांत शिरून त्यांचे अलंकार, छत्रें, ध्वज, कवचें, इत्यादि चोरून नेतांना दिसत. कृष्णाला दिलेलें पोलादी वज्रणाभचक्र यादव मंडळी पहात असतां आकाशांत निघून गेलें. दिव्य व सूर्यासारखा तेजस्वी रथ जोडला असतां दारुकाच्या देखत मनोवेगानें धांवणारे चार घोडे आपणच होऊन त्याला समुद्राकडे घेऊन गेले. राम व कृष्ण यांचे जे ताल व सुपर्ण नांवाचे मोठे आवडते ध्वज होते ते वरच्यावर अप्सरांनीं काढून नेले व नेतांना ओरडून सांगितलें कीं 'तुम्हीं जा आतां तीर्थयात्रेला!' त्या प्रमाणें सर्व यादव स्त्रियांसह तीर्थयात्रेस जाण्याच्या इच्छेनें सिद्धता करूं लागले. नाना प्रकारचीं मांसें, मद्यें व इतर खाद्यपेयें घेऊन ते सारे सैन्यासह नगराबाहेर गेले. रथ, हत्ती, घोडे इत्यादि वाहनांवर बसून ते तेजस्वी वीर ठरल्याप्रमाणें प्रभास क्षेत्रीं जाऊन घरासारखे राहिले. त्यांच्या बरोबर स्त्रिया व खाद्यपेयें भरपूर होतीं. तेथें समुद्रकांठीं ते तळ देऊन राहिले हें पाहून त्यांचा निरोप घेऊन मोक्षज्ञानी उद्धव निघून गेला. कृष्णाला हात जोडून नमस्कार करून तो निघाला, तेव्हां यादवांचा होणारा क्षय लक्षांत घेऊन त्यानें त्याला थांबविण्याचा प्रयत्न केला नाहीं. तो निघाला व आपल्या तेजानें अंतरिक्ष भरून टाकीत चालला हें त्या कालचक्राच्या फेऱ्यांत सांपडलेल्या यादवांनीं पाहिलें. मग त्या महात्म्यांनीं ब्राह्मणासाठीं म्हणून जें अन्न

सिद्ध केलें होतें, तें मद्याच्या वासानें भरून गेल्यामुळें वानरांना देण्यांत आलें. यादवांनीं नंतर तुताऱ्यांच्या गर्जनेंत व नटनर्तकांच्या नाचण्यागाण्याच्या नादांत मद्यपानाला आरंभ केला. कृष्ण जवळ असतां कृतवर्म्याला घेऊन बळरामानें व युयुधान, गद, बभ्रु, इत्यादिकांनींहि मद्यपान केलें! मग सर्व मंडळी बसली असतां मदोन्मत्त झालेला युयुधान कृतवर्म्याला हंसून व त्याचा अवमान करून म्हणाला, 'हार्दिक्या, मेलेल्या माणसांप्रमाणेंच निजलेल्यांनाहि कोणता खरा क्षत्रिय ठार मारील बरें? पण तूं तसें केलें व तें तुझें कृत्य यादव सहन करणार नाहींत!' त्यावर हार्दिक्याची चेष्टा करून वीरश्रेष्ठ प्रद्युम्नानें युयुधानाच्या भाषणाला अनुमोदन दिलें. कृतवर्म्याला अर्थात् त्यामुळें मोठा राग आला व डाव्या हातानें युयुधानाकडे तिरस्कारानें बोटें दाखवीत तो त्याला म्हणाला, 'अरे, ठाऊक आहे. भूरिश्रवा युद्धांत हात तुटून प्रायोपवेशन करीत असतां त्याचा क्रूरपणें वध करून त्याला तूंच वीरानें पाडिलेंस ना?' हें ऐकून कृष्णाला राग आला व त्यानें त्याच्याकडे जर तिरक्या क्रुद्ध दृष्टीनें पाहिलें. तेव्हां सात्यकीनें स्यमंतक मण्याची व सत्राजिताची कथा सांगून कृष्णाला त्या प्रकरणाची आठवण करून दिली. ती ऐकून सत्यभामेला राग आला व ती कृष्णाच्या मांडीवर बसून रडत रडत त्याला चेव आणूं लागली. मग सात्यकि रागारागानें उठला व म्हणाला, सत्यभामे, 'पांची द्रौपदी पुत्र, धृष्टद्युम्न व शिखंडी यांची जी गति झाली त्याच गतीला मीहि खरोखर जातों. ज्या दुरात्म्या कृतवर्म्यानें धृष्टद्युम्नादि मंडळी झोंपीं गेली असतां अश्वत्थाम्याला साह्य करून त्यांचा वध केला, त्याचें आयुष्य व कीर्ति आज लयाला गेली?' असें बोलून तो खड्ग उपसून कृतवर्म्यावर धांवून गेला व त्याचें शिर रागानें त्यानें तोडून टाकिलें. कृष्ण हें पहात राहिला. पण सात्यकि आणखी दुसऱ्यांनाहि जेव्हां मारूं लागला, तेव्हां मात्र त्याला अडवावयास तो धावत पुढें गेला. मग सगळे कालचक्राच्या फेऱ्यांत अडकलेले ते यादव, भोज व अन्धक एकत्र झाले व सात्यकीला आवरूं लागले. पण काळाचा ओघ जाणून कृष्णानें त्यांचा राग मुळींच धरला नाहीं. पण मद्याच्या मदानें धुंद होऊन कालानें प्रेरणा केल्यावरून त्यांनीं उष्ट्या मद्याच्या भांड्याचे सात्यकीवर प्रहार केले. त्यावर मारा होत आहे असें पाहून रुक्मिणीपुत्र प्रद्युम्नाला त्वेष चढला. तो त्याला सोडविण्यासाठीं पुढें धांवून गेला व भोजांवर तुटून पडला. इतक्यांत सात्यकि अंधकांवर चालून गेला. ते पराक्रमी वीर लढत असतां प्रतिस्पर्धी वीरांच्या बहुसंख्येमुळें कृष्णाच्या देखत मारिले गेले.

आपला पुत्र प्रद्युम्न व शिनिपुत्र सात्यकि मरण पावले, हें पाहून मात्र कृष्णानें रागानें मूठभर लवे उपटले व जो समोर दिसेल त्यावर त्यांचा प्रहार केला. त्या लव्यांचें वज्रासारखें दणगट मुसल बनल्यामुळें त्याच्या प्रहारानें यादव पटापट मरूं लागले. मग सर्वांचा मोठा कल्होळ झाला व काळाच्या प्रेरणेनें त्या अंधक, भोज, शैनेय, वृष्णि, इत्यादि वीरांनीं मुसळांच्या प्रहारानें एकमेकांना ठार केलें. जो कोणी रागानें त्या लव्यांपैकीं एकादा उपटी, त्याच्या हातीं तो वज्रासारखा होई. गवताचें मुसळ झालेलें त्या ठिकाणीं आढळून आलें, हा सर्व ब्रह्मदंडाचा प्रताप होय. राजा, याप्रमाणें ते यादव जें गवत उपटून दुसऱ्यांवर फेंकीत तें वज्रासारखें कडक मुसळ बने. मग त्या दंगलींत पुत्रानें पित्याला मारिलें, पित्यानें पुत्राला मारिलें, व एकमेकांनीं मदानें एकमेकांना मारून सर्वच यादव पतंग अग्नींत पडावे तसे मृत्युमुखीं पडले ! ते मारले जात असतां कोणालाहि तेथून पळून जाण्याची बुद्धि झाली नाहीं, यांतच काळाचा फेरा कृष्णाला दिसून आला. तो मुसळ घेऊन उभा होता. पण जेव्हां सांब, चारुदेष्ण, प्रद्युम्न, अनिरुद्ध, गद, हे पुत्र मरून पडलेले त्याला दिसले, तेव्हां त्यालाहि मनस्वी क्रोध आला व त्यानें उरल्या सुरल्या सर्वांना मारून टाकिलें. तें पाहून महातेजस्वी बभ्रु व दारुक हे त्याजवळ येऊन म्हणाले, 'कृष्णा, तूंच या बहुतेकांना ठार केलेंस. आतां राम कोठें आहे तें पाहूं या. तो जिकडे असेल तिकडेच आपणहि जाऊं.' १६. १. ३

## अध्याय ४ था.

[ १. बलराम व कृष्ण निजधामास जातात. ]

( १ ) **वैशंपायन**:—राजा, मग दारुक, कृष्ण आणि बभ्रु हे तेथून निघाले ते मोठ्या त्वरेनें बलराम जेथें होता तेथें आले. तो एका झाडाखालीं एकान्तांत चिंतन करीत बसला होता. त्याला शोधून काढल्यावर कृष्ण दारुकाला म्हणाला, 'तूं आतां हस्तिनापुरास जा आणि यादवांचा सर्वस्वी नाश झाल्याचें हें वृत्त अर्जुनाला सांग. यादव ब्रह्मशापानें नष्ट झाले हें ऐकून तो इकडे ताबडतोब येईल.' कृष्णाची आज्ञा होतांच हतबुद्ध झालेला दारुक रथांत बसून हस्तिनापुराकडे निघाला. तो गेल्यावर जवळ असलेल्या बभ्रूला 'लवकर द्वारकेस जा व तेथें स्त्रियांचें रक्षण कर, नाहीं तर द्रव्यलोभानें चोर त्यांना मारतील,' असें

सांगून कृष्णानें तिकडे पाठविलें. कृष्णाच्या आज्ञेवरून मदमस्त होऊन ज्ञाति-बधानें गांगरून गेलेला बभ्रु जो निघाला, तोंच त्याला एका पारध्यानें लोखंडी मुद्गराचा तडाखा देऊन ठार केलें. याप्रमाणें बभ्रूचा वध झालेला पाहून कृष्ण बलरामाला म्हणाला, 'रामा, तूं येथेंच कांहीं वेळ रहा. मी द्वारकेस जाऊन स्त्रियांना ज्ञातिबांधवांच्या स्वाधीन करून येतों.' असें त्याला सांगून कृष्ण द्वारकेस गेला, व वसुदेवपित्याला म्हणाला, 'बाबा, अर्जुन इकडे येईतोंपर्यंत तुम्ही आपल्या स्त्रियांचें रक्षण करा. राम माझी वाट पहात वनांत बसला आहे, तिकडे मी जातों. यदूंचा नाश मीं आज डोळ्यांनीं पाहिला, तसा पूर्वी कुरु-वीरांचा पाहिला. यादव जीवंत नाहींत त्या यादवनगरींत मला आतां रहाणें शक्य नाहीं. मी वनांत जाऊन रामाबरोबर तप करणार.' असें म्हणून व पित्याच्या पायां पडून कृष्ण त्वरेनें निघाला, त्यावेळीं स्त्रिया व मुलें यांनीं मोठमोठ्यानें रडून आकांत मांडिला. तेव्हां कृष्ण त्या आक्रोश करणाऱ्या स्त्रियांचा आरडाओरडा ऐकून मागें वळला व त्यांना म्हणाला, 'अर्जुन येथें येऊन तुम्हांला दुःखांतून सोडवील.' असें त्यांना सांगून तो निघाला व वनांत आला. बल-राम तेथें एकान्तीं बसलेला त्याला दिसला. तो योगधारणा धरून बसला असतां त्याच्या मुखांतून एक प्रचंड श्वेतवर्णाचा नाग बाहेर आला व कृष्ण पहात असतां समुद्रांत गेला. त्याला सहस्र फणा असून त्याच्यामुळेंच सागर प्रतापशाली झाला होता. त्याचें शरीर पर्वताकार असून तोंड लाल होतें. तो आपलें मर्त्य शरीर टाकून निघाला तेव्हां समुद्रानें तसेंच दिव्य नागांनीं व पवित्र नद्यांनीं त्याचें स्वागत केलें. कर्कोटक, वासुकि, तक्षक, पृथुश्रवा, अरुण, कुञ्जर, मिश्री, शंख, कुमुद, पुंडरीक, धृतराष्ट्र, ऱ्हाद, क्राथ, शितिकंठ, चक्रमन्द, अनिषण्ड, दुर्मुख, अंबरीष, इत्यादि नाग व प्रत्यक्ष राजा वरुण असे त्याला सामोरे आले. त्यांनीं त्याचें अभि-नंदन करीत स्वागत केलें व अर्घ्यपाद्य इत्यादिकांनीं त्याची पूजा केली. याप्रमाणें बंधु निजधामीं गेल्यावर दिव्यदृष्टीचा कृष्ण पुढें होणारें सर्व वृत्त जाणून त्या शून्य वनांत चिंतन करीत फिरतां फिरतां भूमीवर बसला. त्यावेळीं गांधारीनें पूर्वी त्याला सांगितलेल्या गोष्टी सर्व आठवल्या. दुर्वासानें उष्ट्या खिरीचा त्याच्या अंगाला लेप केला होता, तोहि त्याला आठवला व त्यावेळीं दुर्वास जें बोलला होता तेंहि त्याच्या लक्षांत आलें. कुरूंचा पूर्वी झालेला व वृष्णि आणि अंधक यांचा आतां झालेला नाश मनांत येऊन त्याला आपलाहि निर्याणकाळ आतां आला असें वाटलें व इंद्रियें आवरून तो त्रैलोक्याच्या रक्षणासाठीं

अत्रिमुनीच्या वचनानुसार ध्यान करीत बसला. तो परमेश्वर असतांहि देहापासून मुक्त होण्याचा त्यानें निश्चय केला व इंद्रियें, वाणी, मन यांचा निरोध करून व योगधारणा धरून तो स्वस्थ पडला. इतक्यांत हरिणांची पारध करण्याच्या हेतूनें जरा नांवाचा पारधी तेथें आला व त्याला योगसमाधींत पाहून तो हरिण आहे असें वाटल्यावरून त्यानें त्याच्यावर बाण सोडिला. तो बाण जो त्वरेनें आला तो कृष्णाच्या तळपायाला लागला. बाणाच्या पाठोपाठ तो पुनः घेण्यासाठीं जरा तेथें आला, तों त्याला योगसमाधींत असलेला पीताम्बरधारी अनेकबाहु पुरुष तेथें दिसून आला. तेव्हां आपल्या हातून त्या पुरुषाचा अपराध घडला असें समजून जरानें भीति वाटून त्याचे पाय धरिले. पण महात्म्या कृष्णानें त्याला धीर दिला आणि आपल्या तेजानें सारें अंतरिक्ष भरून टाकीत तो वर वर जाऊं लागला. तो स्वर्गास जाऊन पोंचला, तेव्हां इन्द्र, अश्विन, रुद्र, आदित्य, वसु, विश्वेदेव, सिद्ध, मुनि, गंधर्वांचे नायक, व अप्सरांचे तांडे, त्याचें स्वागत करण्यासाठीं पुढें आले. राजा, सर्वांचें आदिकरण असा तो अव्यय व उग्र तेजाचा योगाचार्य नारायण आपल्या तेजानें विश्व भरून टाकून आपल्या अतुल अशा स्थानीं विराजमान झाला. नंतर देव, ऋषि, चारण, गंधर्वनायक, सुंदर अप्सरा, सिद्ध, साध्य, इत्यादिकांनीं नम्र भावानें त्याची पूजा केली. देवांनीं त्याचें अभिनंदन केलें, ऋषींनीं ऋग्मंत्रांनीं त्याची पूजा केली, गंधर्वांनीं त्याची स्तुति गाईली व इन्द्रानेंहि प्रेमानें त्याचें अभिनंदन केलें. १६. १. ४.

---

## अध्याय ५ वा.

[ १. अर्जुनाचें द्वारकेस आगमन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, कृष्णाच्या आज्ञेवरून दारुक कुरुदेशीं जाऊन पांडवांना भेटला व मुसळाचें प्रकरण उपस्थित होऊन यादवांनीं एकमेकांचा संहार केल्याचें वृत्त त्यांना त्यानें निवेदन केलें. भोज, अंधक, कौकुर, इत्यादिकांसह यादव नष्ट झाले हें ऐकून पांडव शोकानें व्याप्त झाले व त्यांचें मन भीतीनें गांगरून गेलें. मग कृष्णाचा प्रिय मित्र अर्जुन त्यांचा निरोप घेऊन मामाला पहाण्यासाठीं तसाच निघाला. 'हें कांहीं खरें नसावें,' असेहि उद्गार त्याच्या तोंडून बाहेर आले. पण राजा, दारुकासह तो यादवपुरींत जेव्हां गेला, तेव्हां

पति मृत झालेल्या स्त्रीसारखीच द्वारकेची अवस्था त्याला आढळून आली. ज्या कृष्णाच्या सान्निध्यामुळें पूर्वी आपण सनाथ आहों असा त्या स्त्रियांना विश्वास वाटे, त्यांना आपल्या रक्षणासाठीं अर्जुनाला येथें यावें लागलें, हें पाहून अत्यंत दुःख झालें व त्याला पाहून त्या मोठा आक्रोश करूं लागल्या. अर्जुनाला आलेला पाहून कृष्णाच्या सोळा सहस्र स्त्रियांनीं मोठा टाहो फोडला. त्यांना पहातांच अर्जुनाच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. कृष्ण व पुत्र यांनीं विरहित झालेल्या त्यांच्याकडे त्याला पहावेना. पूर्वीची द्वारका म्हणजे मोठी सुंदर महानदी होती. वृष्णि, अंधक, इत्यादिरूप जलप्रवाह तींत वहात होते. अश्वरूपी मासे व रथरूपी होड्या तींत वावरत होत्या. वाद्यांचे घोष व रथांचे खडखडाट यांच्या रूपानें तिच्या लाटांची गर्जना चालू असे. महाद्वाराजवळील पायऱ्याचें ठिकाण तिच्या डोहासारखें दिसत असे. रत्नें म्हणजे तिच्या पाण्यावर धरलेली शेवाळ होती. वज्रपाषाणाच्या तटबंधीनें तिला शोभा आणिली असून रस्त्याच्या बाजूनें वहाणारें पाणी हे तिच्यांतील भोंवरे होते. तिच्यांतील ठिकठिकाणचे चौक म्हणजे शांत डोहच असून रामकृष्ण हे तींतील मोठे सुसर तिचें रक्षण करीत होते. पण त्याच द्वारकारूपी नदीला कालपाशांत सांपडल्यामुळें आतां भयंकर अशा यमलोकांतील वैतरिणीचें रूप आलेलें अर्जुनाला दिसलें. तिचें वैभव नष्ट झालें, तींतील आनंद निमाला. जणूं शिशिरकाळांतील गारठून कोमेजलेली कमलिनीच ती झाली. अशा त्या द्वारकानगरीला व त्या कृष्णस्त्रियांना पाहून अर्जुन हुंदके देत व अश्रु ढाळीत भूमीवर पडला. त्याला सांवरण्यासाठीं सत्यभामा व रुक्मिणी रडत रडत धांवून आल्या. त्यांनीं त्याला उठवून सुवर्णाच्या आसनावर बसविलें आणि त्या त्याच्या भोंवतीं त्याला वारा घालीत उभ्या राहिल्या. मग सावध झाल्यावर अर्जुनानें कृष्णाची स्तुति करून व त्याच्या आठवणी सांगून त्या स्त्रियांचें सांत्वन केलें व त्यांना धीर दिला आणि तेथून तो वसुदेवमामाला भेटण्यासाठीं त्याच्याकडे गेला. १६. १. ५.

## अध्याय ६ वा.

[ १. अर्जुन व वसुदेव यांचा शोक-संवाद ]

( १ ) **वैशंपायन**:—राजा, महात्मा वसुदेव पुत्रशोकानें अत्यंत दुःखित होऊन पडलेला अर्जुनाला आढळला. तेव्हां त्याचे डोळे पुनः पाण्यानें भरले व त्याच्या दुःखांत भर पडून त्यानें वसुदेवाचे पाय धरले. अर्जुनाचें मस्तक हुंगावें म्हणून वसुदेवानें उठण्याचा प्रयत्न केला, पण त्याला उठवलें नाहीं. म्हणून हातांनींच त्याला त्यानें मिठी मारली व पुत्रांची आणि भाऊ, नातू इत्यादिकांची आठवण काढून तो रडूं लागला. तो म्हणाला, 'अर्जुना, ज्यांनीं शेंकडों राजे व दैत्य यांना जिंकलें ते माझे पुत्र माझ्या आतां दृष्टीस पडत नाहींत, आणि तरीहि मी जणूं अमर झाल्यासारखा जीवंत आहें. अर्जुना, जे तुझे दोघे शिष्य तुला अत्यंत प्रिय होते, त्यांच्याच द्वाडपणामुळें वृष्णिकुलाचा घात झाला! यादव वीरांपैकीं तेच दोघे अतिरथी होते. त्या प्रद्युम्न आणि युयुधानांची तूं किती प्रशंसा करीत असस. कृष्णाचे तर ते अत्यंत लाडके होते कीं रे! पण यादवकुलाच्या नाशाला तेच कारण झाले. मी त्या सात्यकीला, हार्दिक्याला, प्रद्युम्नाला कांहीं दोष देत नाहीं. ब्राह्मणाचा शापच या नाशाला एकंदरींत कारण झाला. केशी, कंस यांचा पाडाव करून ज्यानें त्यांना यमसदनीं पाठविलें, व चेदिराज शिशुपालाचा गर्व हरण केला, त्याचप्रमाणें निषादराज एकलव्य, कलिंग-राजा, मगधराजा, गांधारराजा, काशिराजा, मरुदेशचे राजे, तसेच पूर्व व दक्षिण भागांतील राजे व पर्वतीय गण यांचा दर्प ज्यानें नाहींसा केला, त्या कृष्णानें या सर्व प्रकाराची उपेक्षा केली. अर्जुना, नारद, इतर मुनि, इत्यादि तुम्हां सर्वांना, कृष्णाचा स्वभाव ठाऊकच आहे. त्यानें हा ज्ञातिवध सरळ उघड्या डोळ्यांनीं पाहिला. गांधारीचा व ऋषींचा शाप ठाऊक असतां त्यांच्या प्रतिकाराची त्यानें कांहींच व्यवस्था केली नाहीं, नित्य त्यांची तो उपेक्षाच करीत गेला. त्याला त्या शापांचा प्रतिकार करावयाची इच्छाच झाली नाहीं. अर्जुना, तुझा प्रत्यक्ष नातू अश्वत्थाम्याच्या अस्त्रानें मृत झाला असतां कृष्णाच्या सामर्थ्या-मुळें पुनः सजीव झाला. पण त्या तुझ्या मित्राला यादवांचें रक्षण करावेंसें वाटलेंच नाहीं. त्यामुळें पुत्र, नातू, भाऊ, मित्र, हे सगळे मरून पडले व त्यांना मृत झालेले पाहून मात्र तो मला म्हणाला कीं, 'आपल्या कुळाचा अंतकाळ आला, तेव्हां आतां अर्जुन येथें द्वारकेस येईल, त्याला तुम्हीं यादवांच्या नाशाचें वृत्त सांगा. तो लवकरच येथें येईल यांत शंका नाहीं. जो मी तोच अर्जुन व जो

अर्जुन तोच मीं, असें समजा व तो जसें सांगेल तसें करा. तोच स्त्रिया, बालकें व तुम्हीं स्वतः यांचीं प्रसंगानुसार और्ध्वदेहिकें करील. तो येथून परत गेला म्हणजे तटबंदीसह साऱ्या द्वारका नगरीला समुद्र बुडवून टाकील. मी कोणत्या तरी पवित्र ठिकाणीं जाऊन नियमानें वागून रामासह कालहरण करीन. अर्जुना, असें मला सांगून तो अचिंत्यपराक्रमी हृषीकेश मुलांसह माझा त्याग करून कोणत्याशा दिशेला निघून गेला आणि मी हा त्या तुझ्या दोघां बंधूंचें चिंतन करीत व ज्ञातिवधाचा विचार करीत कांहीं न खातां येथें पडलों आहें. माझी धड सुटकाहि होत नाहीं व धड नीटपणें माझ्यानें जगवतहि नाहीं. पण आतां तूं आलास हें बरें झालें. कृष्णानें सांगून ठेवल्याप्रमाणें सर्व व्यवस्था कर. अर्जुना, हें राज्य, या स्त्रिया, हीं रत्नें आतां तुझ्या स्वाधीन करून मीं आवडत्या अशा प्राणांचा त्याग करणार आहें. १६. १. ६

## अध्याय ७ वा.

[ १. अर्जुन कृष्णाच्या व इतर यादवांच्या स्त्रियांना घेऊन निघण्याची सिद्धता करतो. २. वसुदेवाचा अंत. ३. त्याचें व मृत यादवांचीं और्ध्वदेहिकें करून अर्जुन चालूं लागतो. ४. द्वारका समुद्रांत बुडते. ५ अर्जुनावर वाटेंत चोरांची धाड व त्याचें कुरुक्षेत्रीं आगमन. ६. रुक्मिण्यादि स्त्रिया सती जातात.

( १ ) **वैशंपायन**—राजा, वसुदेवमामानें असें सांगितलें असतां अर्जुन खिन्न झाला आणि दीनवदन करून त्याला म्हणाला, ‘ मामा, या नगरींतून यादववीर आणि माझे बंधु नाहींसे झाले असतांना मी येथें रहाणें शक्य नाहीं. राजा युधिष्ठिर, भीमसेन, सहदेव, नकुल आणि द्रौपदी हीं सहाहि आम्ही एकमताचीं आहोंत. युधिष्ठिराचाहि निर्याणकाल आतां जवळ आला आहे. तेव्हां त्या काळाला अनुसरून मी या सर्व यादवस्त्रियांना बालवृद्धांसह इंद्रप्रस्थाला नेतों. ’ नंतर त्यानें दारुकाला पाठवून यादवांच्या अमात्यांना बोलावून घेतलें व त्यांच्याशीं बोलण्यासाठीं तो यादवांच्या सुधर्मानामक राजसभेंत गेला. तेथें कृष्ण, बलराम इत्यादि यादववीर नसल्यामुळें त्याला मोठें दुःख झालें. तेथें जाऊन तो आसनावर बसल्यावर सारे अमात्य आणि वेदवेत्ते ब्राह्मण त्याच्या भोंवतीं उभे राहिले. ते दीनवदन व विमनस्क होऊन गेले होते. पण त्यांच्या-

ऊनहि अर्जुनाची अवस्था दीन झाली असतां तो त्यांना म्हणाला, ‘ अमात्य हो, आतां मी वृष्णि व अंधक यांच्या माणसांना इन्द्रप्रस्थाला नेतों. कारण हें सर्व नगर समुद्रांत बुडणार आहे. तरी आपलीं काय असतील तीं वाहनें सज्ज करा व रत्नादि वस्तु काय घ्यावयाच्या असतील त्याहि घ्या. आतां इंद्रप्रस्थीं वज्र हा तुमचा राजा होईल. आजपासून सातव्या दिवशीं सूर्य उगवला असतां आपण सर्वांनीं बाहेर पडावयाचें आहे. त्या मानानें सर्व सिद्धता करा; वेळ लावूं नका.’ अर्जुनाची ही आज्ञा ऐकून आपल्या स्वास्थ्याची काळजी करणाऱ्या त्या सर्वांनीं त्याप्रमाणें केलें. अर्जुनानें ती रात्र कृष्णाच्या मंदिरांत मोठ्या शोकांत व मोहांत सांपडून कशी तरी कष्टांत काढिली.

( २ ) दुसऱ्या दिवशीं शूरपुत्र प्रतापी वसुदेव योगसमाधि लावून उत्तम गतीला गेला. त्यावेळीं त्याच्या घरांत स्त्रियांनीं भयंकर रडून मोठा आक्रोश केला. त्यांनीं आपले केस विसकटून दागदागिने फेंकून दिले आणि हातांनीं ऊर बडवीत दीनवाणेपणें मोठा विलाप केला. देवकी, रोहिणी, भद्रा व मदिरा या वसुदेवाच्या वरिष्ठ स्त्रियांनीं पतीबरोबर चितारोहण केलें. अर्जुनानें त्याचें शरीर मोठ्या मूल्यवान् रथांत घालून माणसांकडून नगराबाहेर आणविलें. त्याच्याबरोबर द्वारकावासी सर्व प्रजाजन व नागरिकहि बाहेर आले. रथाच्या पुढें वसुदेवाचें आश्वमेधिक छत्र व देदीप्यमान अग्नि चालविले होते व त्यांच्या मागून पुरोहित चालत होते. देवकी आदिकरून त्याच्या चार राण्या दुसऱ्या अनेक अलंकृत स्त्रियांच्या घोळक्यामधून आपल्या सुनांसह चालत होत्या. महात्म्या वसुदेवाला जीवंतपणीं जें स्थान फार आवडत असे, तेथेंच त्याचें शरीर नेऊन त्याला अग्निसंस्कार करण्यांत आला. त्याच चितेवर त्याच्या पत्न्यांनीं पतिलोकीं जाण्याच्या इच्छेनें आरोहण केलें व त्यांच्यासह अर्जुनानें त्या शरीराला चंदनकाष्ठें व विविध उंची सुगंधी पदार्थ घालून अग्निसंस्कार दिला. त्यावेळीं अग्नि प्रदीप्त झाला असतां सामगायकांच्या सामांचा तसाच रडणाऱ्या बांधवांच्या रुदनाचा फारच मोठा ध्वनि झाला. मग त्या यादवकुमारांनीं वज्राला पुढें करून स्त्रियांसह सर्वांनीं वसुदेवाला तिलोदक दिलें. नंतर तत्संबंधीं धर्मकृत्यें करवून अर्जुन यादव जेथें मरून पडले होते, त्या स्थळीं आला. एकमेकांशीं कदन करून मरून पडलेल्या त्यांना पाहून तो अगदीं विव्हळ झाला; पण प्रसंगोचित असें सर्व कांहीं करून त्यानें त्यांच्या उत्तर क्रिया करविल्या. ब्रह्मशापानें लव्हांचीं मुसळें होऊन जे वध पावले होते, त्यांचीं और्ध्वदेहिकें

केल्यावर त्यानें रामकृष्णांचीं शरीरें शोधून काढविलीं आणि आप्तांच्या साह्यानें त्यांचेंहि दहन करविलें.

( ३ ) याप्रमाणें सर्व मृतांचीं प्रेतकार्यें केल्यावर अर्जुन सातव्या दिवशीं घरीं जाण्यासाठीं रथारूढ झाला. घोडे, रथ, बैल, गाढवें, उंटें इत्यादि वाहनांवर बसून यादवांच्या स्त्रियाहि दुःखानें रडत रडत त्याच्या मागून निघाल्या. यादवांचे सेवकहि उंटांवर आणि रथांत बसून त्या अनाथ बालवृद्धांना स्त्रियांना आणि प्रजांना राखण्यासाठीं त्यांच्या बरोबर चालले. कोणी हत्तींवर बसणारे होते ते हत्तींवरून निघाले. शस्त्रधारी शरीररक्षकांसह सर्व यादवकुमार अर्जुनासमागमें निघाले. ब्राह्मण, क्षत्रिय, श्रीमंत वैश्य व शूद्र, तशाच कृष्णाच्या सोळा सहस्र स्त्रिया व इतरहि सहस्रावधि विधवा, हीं सर्व जणें कृष्णपौत्र वज्राला पुढें करून चालूं लागलीं. असें तें समुद्रासारखें अफाट पसरलेलें यादवमंडळ समागमें घेऊन महापराक्रमी अर्जुन हस्तिनापुराकडे जावयास निघाला.

( ४ ) राजा, याप्रमाणें अर्जुनामागून द्वारकेंतील सर्व माणसें बाहेर पडून वाट चालूं लागलीं असतां मागें समुद्रानें आपल्या पाण्यांत रत्नसंपन्न अशी सर्व द्वारका नगरी बुडवून टाकिली. अर्जुन जसा जसा त्या नगरीपासून पुढें पुढें जाई, तसा तसा तो तो नगरीचा भाग समुद्र बुडवून टाकी ! तो अद्भुत प्रकार पाहून द्वारकावासी मंडळी ‘ काय हो हें दैव !’ असें म्हणत अधिकाधिक वेगानें पुढें जाऊं लागली.

( ५ ) वाटेंत अरण्यांत, पर्वताच्या पायथ्याशीं किंवा नदीकांठीं सोइस्कर ठिकाण पाहून विश्रांतीसाठीं तळ देत अर्जुन त्या यादवस्त्रियांसह पंचनद प्रांतीं आला, व तेथें पश्वादिकांना पुरेसें अन्न मिळेल अशा स्थळीं त्यानें निवास केला. अर्जुन एकटाच आहे व त्याच्या बरोबर अनाथ स्त्रियांचा घोळका आहे, असें पाहून चोरांच्या मनांत लोभ उत्पन्न झाला व त्यांनीं आपसांत खल करून बेत केला. ‘ हा अर्जुन अनाथ झालेला लहान मोठ्या माणसांना घेऊन आम्हांला न विचारतां चालला आहे व त्याच्या बरोबरचे वीर थकून गेलेले आहेत, ’ असें म्हणून हातांत काठ्या घेतलेले ते आभीर आदिकरून लुटारू यादवमंडळीला लुटण्यासाठीं त्यांच्यावर धांवून आले. त्यांच्या भयंकर आरोळ्यांनीं सामान्य माणसें गर्भगळित होऊन गेलीं. त्या मंडळीला मारण्यास काळानेंच जणूं त्यांना पाठविलेंसें वाटतें. त्यांची चाल पाहून अर्जुन आपल्या अनुयायांसह मागें वळला व हंसत हंसत त्यांना म्हणाला, ‘ हे दुष्ट लोक हो, तुम्हांला जर जिवाची आशा

असेल तर माघारे फिरा, नाहीं तर माझ्या बाणांच्या माऱ्यानें छिन्न भिन्न होऊन शोक करण्याची पाळी तुमच्यावर येईल.' पण अर्जुनाच्या या बोलण्याकडे दुर्लक्ष करून ते यादवमंडळीवर तुटून पडले. तेव्हां अर्जुन आपलें प्रचंड गांडीव घेऊन मोठ्या यत्नानें त्याला दोरी चढवूं लागला. कसेंबसें तें त्यानें सज्ज केलें व शस्त्रास्त्रांचें तो स्मरण करूं लागला. पण त्यांतलें त्याला कांहींच आठवेना. अशी विकृति आपल्यांत झाली व आपल्या बाहूंचें वीर्य नष्ट झालें आणि दिव्य महास्त्रेंहि विनाश पावलीं, हें पाहून त्यानें लाजेनें मान खालीं घातली. त्या वेळीं स्त्रियांना पळवून नेणाऱ्या त्या चोरांना पिटून त्यांना परत आणण्याचें काम हत्तींवर, घोड्यांवर, रथांवर बसून लढावयास शिकलेल्या यादववीरांना मुळींच करतां आलें नाहीं. अर्जुनानें पराकाष्ठेचा प्रयत्न केला, पण स्त्रियांची संख्या मोठी पडली, त्यामुळें चोरांनीं चाल करून यादव योद्धयांच्या समक्ष त्या कित्येक सुंदर स्त्रियांना ओढून नेलें; पण दुसऱ्या कांहीं स्त्रिया कामबाधेमुळें आपणच त्यांच्याबरोबर निघून गेल्या ! मग अर्जुनानें आपल्या गांडीवावरून बाण फेंकून यादवसेवकांच्या साह्यानें सहस्रावधि चोरांना ठार केलें. पण कांहीं काळानें ते बाण संपून गेले. पूर्वी ते जसे अक्षय होते तसे आतां राहिले नाहींत. बाण संपले हें पाहून अर्जुन कष्टी झाला व धनुष्याच्या काठीनेंच तो चोरांना ठार करूं लागला. पण, राजा, त्याच्या देखत अनेक यादवस्त्रियांना घेऊन ते आभीर चोहोंकडे पळून गेले. 'काय हा दैवाचा खेळ !' असें म्हणून अर्जुन दुःखमग्न होऊन निःश्वास टाकूं लागला. अस्त्रांचा नाश झाला. बाहूचा पराक्रम नाहींसा झाला. धनुष्य निरुपयोगी ठरलें व बाण संपून गेले. तो अगदीं विषण्ण झाला व दैवाला बोल लावीत मागें वळला. 'हें कांहीं ठीक नव्हे,' असे उद्गार त्याच्या तोंडून निघाले. मग उरल्या सुरल्या यादवस्त्रिया व त्यांचें राहिलें साहिलेलें रत्नादि धन घेऊन तो कुरुक्षेत्रांत उतरला.

(६) राहिलेल्या यादवस्त्रियांना घेऊन अर्जुन कुरुक्षेत्रीं आला व तेथें योग्य ठिकाण पाहून त्यांची त्यानें व्यवस्था केली. हार्दिक्याचा पुत्र व उरलेल्या भोजस्त्रिया यांना त्यानें मार्तिकावत नगरांत ठेविलें आणि इतरांना बालवृद्धांसह इन्द्रप्रस्थास आणिलें. सरस्वतीच्या कांठीं सात्यकीच्या पुत्राची स्थापना करून त्यानें त्याच्याबरोबर कांहीं लहान मोठीं माणसें दिलीं आणि इन्द्रप्रस्थाचें राज्य वज्राला दिलें. अक्रूराच्या स्त्रिया तपस्विनी झाल्या. वज्रानें त्यांचें मन वळविण्याचा प्रयत्न केला पण तो व्यर्थ गेला. रुक्मिणी, गांधारी, शैब्या, हैमवती व जांबवती

या कृष्णस्त्रियांनीं अग्निप्रवेश केला. सत्यभामा आणि दुसऱ्या कित्येक कृष्णाच्या आवडत्या स्त्रियाहि तप करण्याचा निश्चय करून वनांत गेल्या. द्वारकेंतील जे सेवक अर्जुनाबरोबर आले, त्यांची अर्जुनानें वांटणी करून कांहींना वज्राच्या स्वाधीन केलें. प्रसंग पडल्यामुळें ज्या गोष्टी कर्तव्य म्हणून अंगावर पडल्या त्या अर्जुनानें अश्रुपूर्ण नयनांनीं केल्यावर व्यासमुनि आपल्या आश्रमांत बसले होते त्यांना भेटावयास तो गेला. १६. १. ७.

## अध्याय ८ वा.

[ १. अर्जुन व व्यास यांचा संवाद. २ अर्जुनाचें हस्तिनापुरीं पुनरागमन. ]

( १ ) वैशंपायन :—अर्जुन व्यासाच्या आश्रमांत गेल्यावर ते एकान्तीं बसलेले त्याच्या दृष्टीस पडले. त्यांच्याजवळ जाऊन तो उभा राहिला आणि मी अर्जुन आहें असें म्हणून त्यानें त्यांना नमस्कार केला. व्यासांनीं त्याचें स्वागत करून प्रसन्न मनानें त्याला खालीं बसावयास सांगितलें. पण तो अस्वस्थ चित्त असून वारंवार निःश्वास टाकीत आहे असें पाहून ते त्याला म्हणाले, ‘ अर्जुना, असा उद्विग्न कां दिसतोस ? नखाचें, केशांचें, आंचळ्याचें किंवा मडक्याच्या तोंडाचें पाणी तुझ्यावर पडलें, कीं रजस्वलागमन तुझ्या हातून घडलें, कीं ब्राह्मणवध झाला, कीं तुझा युद्धांत पराभव झाला ? आजपावेतों तुझा पराजय झाल्याचें मला समजलेलें नाहीं. मग आजच तूं असा खिन्न कां दिसतोस ? मला ऐकण्यासारखें तुझ्या उद्वेगाचें कारण असेल तर मला तें लवकर सांग.’

अर्जुन—महाराज, मेघासारख्या सुंदर कान्तीचा तो कमलनयन श्रीकृष्ण रामासह देहत्याग करून स्वर्गी गेला. प्रभास क्षेत्रावर अंगावर शहारे आणणारा प्रकार घडून आला. ब्राह्मणांच्या शापामुळें मुसळाचें प्रकरण उद्भवून साऱ्या यादववीरांचा आपसांत कलह होऊन नाश झाला. त्या सिंहासारख्या अभिमानी शूरांनीं एकमेकांशीं युद्ध करून एकमेकांना ठार केलें ! गदा, मुद्गर, शक्ति, इत्यादिकांचे प्रहार ज्यांनीं सहज करावे असे ते वज्रबाहु यादववीर लव्यांच्या मारानें वध पावले. काय काळाचा फेरा पहा ! पन्नास सहस्र पराक्रमी यादव अशा रीतीनें एकमेकांकडून मारले गेले. त्यांच्या वधाचा विचार माझ्या मनांत वारंवार येऊन मन अगदीं अस्वस्थ होतें. तो विचार माझ्या मनाला सहन होत नाहीं. यादववीर व यशस्वी कृष्ण यांचें अशा रीतीचें मरणें म्हणजे समुद्र शुष्क होणें

किंवा पर्वत चळचळ कांपणेंच होय; तें कोणाला खरें वाटण्यासारखें असेल? आकाश खालीं पडलें, अग्नि थंड झाला, हें म्हणणें व कृष्ण मरण पावला असें म्हणणें, दोन्ही सारखींच अश्रद्धेय होत. तर, महाराज, कृष्णविरहित झालेल्या या जगांत रहाण्याची माझी आतां इच्छा नाहीं. पण याहूनहि दुःखाची गोष्ट अजून सांगावयाचीच आहे. ती आतां ऐका. तिचा विचार मनांत येतांच तें अगदीं विदीर्ण होऊन जातें. मुने, काय सांगूं! माझ्या देखत पंचनद प्रांतांतील आभीरांनीं आम्हांवर चाल करून यादवस्त्रिया हरण करून नेल्या! मी धनुष्य घेऊन दोरी चढवूं लागलों, तों ती माझ्यानें चढवेना. माझ्या बाहूंचें तें पूर्वीचें बल कोठें गेलें? माझीं निरनिराळीं अस्त्रेंहि मला आठवेनात; माझे बाण क्षणांत संपून गेले! तो अतुलबलशाली शंखचक्रगदाधारी कृष्ण माझ्या रथावर माझ्यापुढें बसून शत्रुसैन्याला जाळून टाकीत असतां मीं पाहिला, पण तो आतां कोठें आहे? युद्धप्रसंगीं ज्यानें प्रथम आपल्या केवळ तेजानें शत्रुसैन्याला जाळून टाकावें व मागाहून मीं बाण सोडून त्याचा नाश केला असें म्हणावें, असा प्रकार चाले. तो माझ्या पुढें आतां नसल्यामुळें मी मूर्च्छा पावतों. माझें मन अत्यंत दुःखित होऊन त्याला कशानेंच शांति मिळत नाहीं. त्या वीर श्रीकृष्णावांचून जगण्यांत मला कांहीं उत्साह वाटत नाहीं. कृष्ण येथून निघून गेला हें ऐकून सर्व दिशा मला शून्य झाल्या आहेत. माझे बांधव नष्ट झाले, माझें वीर्य नष्ट झालें. शून्य अंतःकरणानें मी इकडे तिकडे वावरत आहें. तरी आतां माझें हित कशानें होईल तें कृपा करून मला सांगा.

व्यास—कुरुश्रेष्ठ अर्जुना, ब्रह्मशापानें दग्ध होऊन वृष्णिवीर, अंधकवीर हे नाश पावले, तर आतां त्यांविषयीं शोक करणें तुला उचित नाहीं. तें तसें व्हावयाचेंच होतें व महात्म्या ऋषींनीं तेंच सांगितलें. कृष्णाला तें ठाऊक होतें; म्हणूनच सामर्थ्य असतांहि त्यानें त्यांच्या शापाची उपेक्षा केली. साऱ्या त्रैलोक्याची उलटापालट करण्यास समर्थ असलेल्या कृष्णाला ऋषींचा शाप फिरविणें कांहीं अशक्य नव्हतें! पृथ्वीचा भार हलका करण्यासाठीं जो तुझ्यावरील प्रेमामुळें तुझ्या रथावर सारथी म्हणून बसत असे, तो कृष्ण आपलें नेमलेलें कार्य केल्यावर शरीरत्याग करून आपल्या स्थानीं गेला. अर्जुना, तूंहि भीमाच्या व नकुळसहदेवांच्या साह्यानें देवांचें मोठें कार्य केलेंस. तुम्ही कृतकृत्य होऊन सिद्ध झालां. आतां तुमच्याहि निर्याणाची वेळ झाली आहे. बुद्धि, तेज, ज्ञान हीं सारीं उत्कर्षकालीं उत्पन्न होतात व अपकर्षकालीं लयास जातात. सगळ्या विश्वाच्या

बीजापोटीं मूळ काळ आहे व तोच त्याचा शेवटीं संहार करतो. तोच एकदां बलवान् असतो, तर पुन: दुर्बळ होतो. तो एकदां आज्ञा देणारा धनी होतो, तर पुन: दुसऱ्यांची आज्ञा पाळणारा सेवकहि होतो. तशींच तुझीं अस्त्रें तीं कृतकृत्य झाल्यावर आल्या वाटेनें निघून गेलीं. पुन: काळ येईल तेव्हां तींहि पुन: तुझ्या हातीं येतील. आतां तुम्हीं मिळविलेल्या उत्तम गतीला जाण्याची तुमची ही वेळ झाली आहे; आणि हेंच तुम्हांला आतां श्रेयस्कर आहे असें मला वाटतें.

( २ ) **वैशंपायन**—राजा, अमितपराक्रमी व्यासमुनींचें भाषण ऐकून अर्जुनानें त्यांचा निरोप घेतला व तो हस्तिनापुरीं परत आला. नगरींत प्रवेश केल्यावर तो युधिष्ठिराला भेटला आणि वृष्णि, अंधक, यादव यांच्या कुळाची जी अवस्था झाली ती सर्व त्यानें त्याला निवेदिली. १६. १. ८.

## मौसलपर्व समाप्त.

# महाप्रस्थानिकपर्व १७

## अध्याय १ ला.

[ १. युधिष्ठिराचा महाप्रस्थानाचा निश्चय. २ तो परीक्षिताला कृपाचार्यांच्या स्वाधीन करतो. ३ प्रजांची संमति घेऊन तो समुद्राकडे जावयास निघतो. ४ पांडवांची व अग्नीची भेट. ]

( १ ) **जनमेजय**—मुने, तुम्हीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें यादवांच्या कुळांत मुसळावरून परस्परयुद्ध होऊन त्यांचा नाश झाला व कृष्णहि स्वर्गास गेला, हें वृत्त पांडवांच्या कानीं आल्यावर त्यांनीं पुढें काय केलें बरें ?

**वैशंपायन**—राजा, यादवांच्या नाशाचा वृत्तान्त ऐकून युधिष्ठिरानें महाप्रस्थानास निघण्याचा म्हणजे स्वर्गास जाण्यासाठीं गृहत्याग करून बाहेर पडण्याचा निश्चय केला व अर्जुनाला म्हटलें, ‘अर्जुना, काळ सर्वांना जाळून टाकीत असतो. तरी तूंहि या काळपाशाचा विचार करणें योग्य आहे.’ त्याचें म्हणणें ऐकून ‘काळच खरा नित्य आहे, इतर सारें क्षणिक होय,’ असा उद्गार अर्जुनानें काढिला आणि वडील बंधूच्या म्हणण्याला संमति दिली. अर्जुनाची अनुमति पाहून भीम, नकुळ व सहदेव यांनींहि तसेंच म्हटलें. याप्रमाणें त्या सर्वांचें एकमत झालें असतां, धर्मसाधनासाठीं गृहत्याग करून बाहेर जाण्याच्या

इच्छेनें त्यांनीं धृतराष्ट्रपुत्र युयुत्सूला बोलावून आणिलें आणि त्याच्या स्वाधीन सर्व राज्य केलें. परीक्षिताला राजा म्हणून त्यानें अभिषेक करविला आणि दुःखित अंतःकरणानें सुभद्रेला तो म्हणाला, 'सुभद्रे, हा तुझा नातू परीक्षित् आतां कुरुराज्याचा स्वामी झाला आहे. यदुकुलांतील उरलेल्या वज्रालाहि राज्याभिषेक केलेला असून परीक्षित् हस्तिनापुरांत व वज्र इन्द्रप्रस्थांत असे राज्य करतील. वज्राचेंहि परीक्षिताप्रमाणेंच तूं पालन कर, त्यांत अधर्माचा विचार मनांत आणूं नको.'

( २ ) सुभद्रेला असें सांगितल्यावर धर्मराजानें बंधूंना बरोबर घेऊन कृष्ण, वसुदेव, बलराम, इत्यादिकांचें निरलसपणें श्राद्ध केलें. त्यासाठीं त्यानें व्यास, मार्कंडेय, भारद्वाज, याज्ञवल्क्य, यांना प्रयत्नानें बोलावून मधुर भोजन घातलें आणि कृष्णाचें गुणकीर्तन करून रत्नें, वस्त्रें, गांव, रथ, अशीं विविध दानें त्याच्यासाठीं केलीं. त्या महाब्राह्मणांना शेंकडों स्त्रियाहि त्यानें दिल्या. नंतर कृपाचार्याला नागरिकांसह बहुमानानें हाक मारून त्याची युधिष्ठिरानें पूजा केली आणि परीक्षिताला शिष्य म्हणून त्याच्या स्वाधीन केलें.

( ३ ) त्यानंतर युधिष्ठिरानें सर्व अमात्यवर्गाला एकत्र बोलाविलें व आपल्या मनांतील सर्व विचार त्यांना सविस्तर सांगितले. ते ऐकून अर्थातच त्या नागरिकांना व इतरांनाहि युधिष्ठिराचें म्हणणें रुचलें नाहीं व त्यांचें मन उद्विग्न होऊन गेलें. ते म्हणाले, 'महाराज, असें करूं नका.' पण काळाचा ओघ व धर्म जाणून त्यानें त्यांचें न ऐकतां त्यांची अनुमति मिळविली आणि बंधूंसह जाण्याचा निश्चय स्थिर केला. त्याप्रमाणें त्यानें आपल्या अंगावरील अलंकार काढून टाकून वल्कलें घेतलीं व भीम, अर्जुन, नकुळ, सहदेव आणि द्रौपदी यांनींहि तसेंच केलें. त्यांनींहि वल्कलें धारण केलीं. मग नैष्ठिक किंवा गृहत्यागेष्टि नीटपणें करून व आपले सर्व अग्नि पाण्यांत टाकून ते पुरुषश्रेष्ठ बाहेर पडले. त्यांना पाहून नगरांतील सर्व स्त्रियांना रडूं आलें. पूर्वीं द्यूतांत जिंकले गेल्यामुळें जसे ते वनांत निघाले, तसेच आजहि द्रौपदीसह ते निघाले, असें त्यांना वाटलें. पण पांडवांना स्वतःला मात्र जाण्याचा मोठा उत्साहच वाटला. ते पांच भाऊ, द्रौपदी व सातवा त्यांचा कुत्रा, अशी ती सात मंडळी सर्व विचार करून एकमतानें हस्तिनापुरांतून बाहेर पडली. अंतःपुरांतील सर्व स्त्रिया व नागरिक लोक त्यांच्यामागून बराच काल चालले व एकालाहि 'मागें फिरा' असें त्यांना सांगण्याचें सामर्थ्य नव्हतें. शेवटीं इतर सारी नगरवासी मंडळी परतली व युयुत्सूला घेऊन

कृपाचार्यांसह ते घरीं आले. राजा, मग नागकन्या उलूपीनें गंगाप्रवेश केला, चित्रांगदा मणिपुरास निघून गेली आणि इतर पांडवस्त्रिया परीक्षिताभोंवतीं राहिल्या.

पांडव व यशस्विनी द्रौपदी उपवास करून पूर्वेस तोंड करून चालूं लागलीं. गृहत्यागरूपधर्माचा अवलंब करून तीं निघालीं तीं अनेक देश, नद्या, सागर पहात गेलीं. युधिष्ठिर पुढें, त्याच्यामागून भीम, नंतर अर्जुन, नकुळ व सहदेव आणि सर्वांच्या मागून कमलचरणा द्रौपदी, अशा क्रमानें त्यांची मार्गक्रमणा चाले. त्यांच्यामागून त्यांच्याबरोबर एक तो कुत्रा मात्र निघाला. वाट चालतां चालतां तो क्रमानें लौहित्य समुद्राजवळ म्हणजे उदयाचलाकडील समुद्राजवळ आले.

( ४ ) राजा, अर्जुनानें आपलें गांडीव धनुष्य बरोबर घेतलें होतें; कारण त्याला जडविलेल्या रत्नांचा लोभ त्याला सुटला नव्हता. तसेंच त्याचे अक्षय्य भातेहि त्याला टाकवले नव्हते. लौहित्य-पर्वताशीं आल्यावर तेथें त्यांच्यापुढें प्रत्यक्ष अग्नि मनुष्याचें प्रचंड रूप घेऊन वाट अडवून बसलेला त्यांना दिसला. त्यांना पाहून अग्नि म्हणाला, 'हे पांडु पुत्रांनों, मीं सर्वांना पावन करणारा अग्नि आहें. युधिष्ठिरा, भीमा, अर्जुना, तसेंच नकुळा व सहदेवा, माझें म्हणणें नीट समजावून घ्या. कुरुकुलश्रेष्ठहो, मीं अग्नि असून कृष्णाच्या व अर्जुनाच्या कृपेनें खांडववन पूर्वी जाळिलें. आतां हा तुमचा बंधु जो अर्जुन त्यानें आपलें तें गांडीव धनुष्य टाकूनच वनांत प्रवेश करणें बरें. त्याचा त्याला आतां कांहींच उपयोग नाहीं. महात्म्या कृष्णाच्या हातीं जें उत्तम चक्र होतें, तेंहि स्वर्गी निघून गेलें. तें कालान्तरानेंच त्याच्या हातीं पुनः येईल. हें धनुष्य वरुणापासून केवळ अर्जुनाच्या उपयोगासाठीं आणिलें होतें, तें आतां वरुणाचें वरुणाकडे जाणेंच अवश्य आहे.'

अग्नीच्या सांगण्यावरून सर्व बंधूंनींहि अर्जुनाला तसेंच सांगितलें व तदनुसार अर्जुनानें गांडीव धनुष्य व अक्षय्य भाते पाण्यांत फेकून दिले. मग अग्नि लगेच गुप्त झाला आणि पांडव तेथून दक्षिणेस तोंड करून पुढें चालूं लागले. समुद्राच्या उत्तर तीरानें जात जात ते नैर्ऋत्य दिशेकडे गेले आणि मग पुनः वळून त्यांनीं पश्चिम दिशा धरली. त्यांना वाटेंत समुद्रांत बुडून गेलेली द्वारका दिसली व तेथून ते उत्तरेकडे वळले; कारण योगमार्गानें जाण्यासाठीं त्यांना पृथ्वीला प्रदक्षिणा घालावयाची होती. १७. १. १.

## अध्याय २ रा.

[ १. द्रौपदीपासून आरंभ होऊन युधिष्ठिरावांचून सर्व पांडव एकामागून एक मरून पडतात. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, मनाचें नियंत्रण करून व योगयुक्त होऊन ती मंडळी उत्तर दिशेकडे चालली असतां त्यांना हिमालय महापर्वत दिसला. तो ओलांडून ते गेल्यावर त्यांना मोठें वाळवंट लागलें व त्या पलीकडे पर्वत-श्रेष्ठ मेरु उभा असलेला दिसला. योगधर्म स्वीकारून तीं सर्व त्वरेनें चाललीं होतीं. तों इतक्यांत द्रौपदी योगभ्रष्ट होऊन भूमीवर पडली ! तिला पडलेली पाहून भीमसेनानें युधिष्ठिराला विचारिलें, ही कां बरें पडली ? या राजपुत्रीनें कोणताहि अधर्म केलेला नाहीं. मग हिच्या पडण्याचें कारण काय बरें असावें ? '

**युधिष्ठिर**—भीमा, आपल्यापैकीं अर्जुनाची ही अतिशय पक्षपाती असे. त्याचें फळ आतां ही भोगीत आहे.

**वैशंपायन**—राजा, भीमाला असें सांगून व द्रौपदीकडे न पहातां मन स्थिर करून ज्ञानी युधिष्ठिर पुढें चालला. मग थोडेंसें अंतर चालून गेल्यावर सहदेव भूमीवर पडला. त्याला पडलेला पाहून पुनः भीम युधिष्ठिराला म्हणाला, 'जो आपली सर्वांची निरहंकारपणें शुश्रूषा करण्यास तत्पर असे, तो हा माद्रीपुत्र सहदेव काय म्हणून भूमीवर पडला ?'

**युधिष्ठिर**—भीमा, आपल्यासारखा सुज्ञ दुसरा कोणीच नाहीं असें हा मानी, त्या दोषामुळें हा असा पडला.

**वैशंपायन**—राजा, भीमाला असें उत्तर देऊन व सहदेवाला सोडून युधि-ष्ठिर आपले उरलेले भाऊ व कुत्रा यांसह पुढें चालूं लागला असतां द्रौपदी व सहदेव यांना पडलेलीं पाहून दुःखानें विव्हळत नकुलहि खालीं पडला. त्या सुंदर स्वरूपाच्या भावाला पडलेला पाहून पुनः भीमानें युधिष्ठिराला विचारिलें 'जो धर्माचें बिनचूक आचरण करणारा असून नित्य आपल्या वचनांत असे, तो हा अप्रतिम स्वरूपाचा नकुलहि पडला पहा !' भीमाचें बोलणें ऐकून युधिष्ठिरानें उत्तर केलें, 'भीमा, नकुळाविषयीं विचारशील तर त्याला आपल्या-पेक्षां रूपानें अधिक कोणीच नाहीं असें वाटत असे. आपणच काय तो सर्वांहून अधिक सौंदर्यवान् असें तो मानी. या कारणास्तव तो पडला. तर आतां पुढें चालूं लाग. ज्यानें जें कर्म केलें असेल, तो त्याचें फळ अवश्य भोगणारच.'

द्रौपदी, सहदेव व नकुळ हीं पडलीं असें पाहून पराक्रमी अर्जुनहि शोकानें व्याकुळ होऊन मरून पडला. तो इंद्रासारखा तेजस्वी वीर अर्जुन पडला असतां त्याच्या पडण्याचें कारण भीमानें युधिष्ठिराला विचारिलें व तो म्हणाला 'या महात्म्यानें कोणती असत्य गोष्ट थट्टेंत देखील उच्चारलेली मला आठवत नाहीं. मग हा जो पडला तो कसला परिणाम असावा?'

**युधिष्ठिर**—भीमा, एका दिवसांत मी शत्रूंना जाळून टाकीन असें अर्जुन एकदां म्हणाला, पण स्वतःला एवढा शूर मानीत असतां त्याला तसें करतां मात्र आलें नाहीं, त्या दोषामुळें हा पतन पावला. तो सर्व धनुर्धरांचा अपमान करीत असे. म्हणून कल्याणाची इच्छा करणारानें असें कधीं वागूं नये.

**वैशंपायन**—राजा, असें म्हणून युधिष्ठिर पुढें चालला, तोंच भीमहि खालीं पडला. त्यावेळीं त्यानें पडल्या पडल्या युधिष्ठिराला सांगितलें, 'दादा, दादा, हा मीहि तुझा प्रियबंधु पडलों पहा! माझें पतन काय कारणानें घडलें तें ठाऊक असेल तर मला सांगून टाक.'

**युधिष्ठिर**—भीमा, तूं अतिशय खात असस, व आपल्या शक्तीची फार घमेंड करीत असस. दुसऱ्यांचा त्यामुळें अपमान होई व त्यामुळें तूं हा भुईवर पडलास.

राजा, भीम याप्रमाणें पडला असतां त्याचाहि अधिक विचार न करतां युधिष्ठिर तसाच पुढें चालला. एकटा कुत्रा मात्र तुला पूर्वीं अनेक वेळां सांगितल्याप्रमाणें त्याच्याबरोबर राहून त्याच्या पाठीमागून चालत होता. १७. १. २.

---

## अध्याय ३ रा.

[ १. युधिष्ठिराचें स्वर्गारोहण. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, इतक्यांत पृथ्वी व स्वर्ग आपल्या नादानें भरून टाकीत इन्द्र रथांत बसून युधिष्ठिराजवळ आला आणि त्याला रथांत बसावयास सांगूं लागला. पण आपले सारे बंधु मरून पडले असें पाहून दुःखाकुल झालेल्या युधिष्ठिरानें त्याला उत्तर दिलें, 'हे माझे भाऊ जे मरून पडले आहेत, ते जर माझ्यासह येत असतील तर मी रथांत बसेन. त्यांच्यावांचून स्वर्गास यावयाची माझी इच्छा नाहीं. तशीच ही जी सुकुमार व सुखाची संवय असलेली राजपुत्री द्रौपदी तिलासुद्धां आमच्याबरोबर येण्यास संमति दे.'




**युधिष्ठिर :** मला या दुर्योधनाचें तोंड पाहण्याची इच्छा नाहीं. जिकडे माझे भाऊ आहेत तिकडेच मी जातों. (पृ. ६६०)

इन्द्र—युधिष्ठिरा, तुझे भाऊ अगोदरच स्वर्गीं गेले आहेत. तेथेंच तुला ते दिसतील. द्रौपदीहि त्यांच्यासमवेत आहे. त्यांच्याविषयीं तुला शोक करावयास नको. मनुष्यदेहाचा त्याग करून ते तिकडे गेले. पण तुला याच शरीरानें जातां येण्यासारखें आहे, यांत संशय नाहीं.

युधिष्ठिर—ठीक आहे. पण इन्द्रा, हा माझा कुत्रा माझा नित्य अगदीं निकटचा भक्त म्हणून मजजवळ राहिला आहे. तोहि माझ्यासमागमें आला पाहिजे. माझी बुद्धि दयाळु आहे, तिला निष्ठुरपणा सहन होत नाहीं.

इन्द्र—युधिष्ठिरा, माझ्यासारखी योग्यता व देवपणा तशीच ही स्वर्गलक्ष्मी व ही सिद्धि मिळवून तूं स्वर्गसुखें भोगण्यासाठीं येथें आला आहेस. तर आतां या कुत्र्याला सोडून दे. त्यांत निष्ठुर असें कांहीं नाहीं.

युधिष्ठिर—आर्या देवेन्द्रा, मी आर्य असल्यामुळें असलें अनार्य दुष्टकृत्य माझ्या हातून घडणें शक्य नाहीं. या स्वर्गलक्ष्मीच्या संगतीसाठीं जर मला भक्तांचा त्याग करावा लागणार असेल तर मला ती नकोच मुळीं.

इन्द्र—युधिष्ठिरा, स्वर्गलोकांत कुत्रे घेऊन येणाराला जागा नाहीं. तेथें जे क्रोधवश नांवाचे देव आहेत, ते कुत्रा बरोबर नेणाऱ्या अपवित्र माणसांचें दानधर्माचें पुण्य नष्ट करतात. तरी तूं कुत्र्याला सोडून दे आणि चल. तसें करण्यांत निष्ठुरपणा कसला ?

युधिष्ठिर—देवेन्द्रा, भक्तांचा त्याग करणें हें फार मोठें पाप असून ब्रह्म-हत्येच्या तुलनेचें आहे. यास्तव कांहीं झालें, तरी मला माझ्या स्वतःच्या सुखा-साठीं या कुत्र्याचा त्याग करावयाचा नाहीं. भीतिग्रस्त भक्ताला आपलें कोणी रक्षण करणारें नाहीं, असें वाटून प्राणरक्षणासाठीं तो जवळ आला असतां त्याचा त्याग करणें, हें माझ्यानें प्राणान्तींहि होणार नाहीं. माझें तसें नित्य व्रतच आहे.

इन्द्र—युधिष्ठिरा, जें दान दिलें असेल किंवा अग्नीला आहुति म्हणून अर्पिलें असेल तें जर कुत्र्यानें पाहिलें तर क्रोधवश त्याचें फळ नष्ट करतात. यास्तव तूं या कुत्र्याला सोडून दे. तसें केल्यानेंच तुला देवलोक मिळणार आहे. तूं भावांना टाकलेंस व प्रिय द्रौपलादीहि सोडून आलास. हा लोक तूं आपल्या कर्मानें मिळविला आहेस. एवढा मोठा त्याग केला असतां आज तुला या कुत्र्याचा त्याग करण्याचें धैर्य होत नाहीं. काय हा मोह तुला पडला !

म. भा. १२–४२

**युधिष्ठिर**—इन्द्रा, मृत माणसांशीं जीवंत माणसाला प्रेम काय किंवा भांडण काय कांहींच करतां येत नाहीं, हें सर्वांना ठाऊकच आहे. माझे भाऊ मरण पावले, त्यांना जीवंत करण्याचें मला सामर्थ्य नाहीं. म्हणून मीं त्यांना सोडिलें. ते जीवंत होते तों नाहीं सोडिलें. शरणागताला भय दाखविणें, स्त्रीचा वध करणें, ब्राह्मणाचें द्रव्य चोरणें व मित्राशीं द्वेष धरणें, हीं चार जीं मोठीं पापें आहेत, त्यांच्याच योग्यतेचें हें भक्तत्यागाचें पातक आहे, यांत मला कांहीं शंका वाटत नाहीं.

**वैशंपायन**—राजा, धर्मराज युधिष्ठिराचें हें भाषण ऐकून धर्मस्वरूपी इन्द्राला मोठा संतोष वाटला व तो त्याची स्तुति करून गोड शब्दांनीं त्याशीं बोलूं लागला. तो म्हणाला, ' युधिष्ठिरा, तूं खरोखर थोर कुलीन आहेस. पित्यासारखी वागणूक, बुद्धि व ही तुझी सर्व प्राण्यांविषयीं दयार्द्रबुद्धि यांनीं तुझा थोरपणा व्यक्त केला आहे. बाळा, पूर्वीं द्वैतवनांत मीं तुझी परीक्षा एकदां घेतली. त्याठिकाणीं पाण्यासाठीं तुझे सारेच बंधु तडफडत मरून गेले असतां तूं भीमार्जुनांना सोडून नकुळ जीवंत व्हावा म्हणून म्हटलेंस. त्यावेळीं दोन्ही मातांविषयींची तुझी साम्यबुद्धि दिसून आली. हा कुत्रा आपला भक्त आहे हें जाणून त्याच्या अभावीं इन्द्राच्या रथाचाहि त्याग केलास. यास्तव साऱ्या स्वर्ग लोकांत तुझ्यासमान दयार्द्र बुद्धीचा दुसरा कोणीहि नाहीं. म्हणून तुला याच शरीरानें अक्षय्य लोक मिळाले आहेत. तुला दिव्य व श्रेष्ठ गति मिळाली आहे.' यमधर्मानें असें सांगितल्यावर इन्द्र, मरुत्, अश्विन, इत्यादि देवांनीं व देवर्षींनीं युधिष्ठिराला रथावर बसविलें आणि ते सिद्ध वाटेल तिकडे जाण्यास समर्थ असल्यामुळें आपल्या विमानांतून आपआपल्या ठिकाणीं गेले. धर्मराज त्या रथांत बसून त्वरेनें वर गेला. त्याच्या कांतीनें सारें अंतरिक्ष भरून गेलें. तेव्हां देवलोकीं रहाणारा व सर्व लोकांची माहिती असणारा तपस्वी व बोलका असा नारदमुनि मोठ्यानें म्हणाला, 'जे राजर्षि आजवर येथें आले, त्या सर्वांची कीर्ति झांकून टाकून युधिष्ठिर सर्वश्रेष्ठ झाला आहे. आपल्या कीर्तीनें, प्रतापानें व सुंदर आचरणानें शरीरासह येथें आलेला दुसरा कोणी याच्यावांचून आम्हीं ऐकिला नाहीं. युधिष्ठिरा, भूमीवर असतांना जीं तेजें तूं स्वर्गांतील म्हणून पाहिलींस, तीं ही देवांचीं सहस्रावधि मंदिरें पहा.' नारदाचें बोलणें ऐकून युधिष्ठिर देवांना व राजर्षींना हाक मारून म्हणाला, ' माझ्या बंधूंचें जें कांहीं बरें वाईट किंवा पवित्र अथवा पापयुक्त

स्थान असेल, तेथेंच जावयाची माझी इच्छा आहे, दुसरें ठिकाण मला नको आहे.'

हें युधिष्ठिराचें दयार्द्र भाषण ऐकून इन्द्रानें उत्तर केलें, 'धर्मराजा, तूं याच ठिकाणीं रहा. आपल्या शुभ कर्मांनीं तूं हें मिळविलें आहेस. मनुष्यलोकांतील स्नेहसंबंध तूं येथेंहि कशाला ओढून आणतोस? दुसऱ्या कोणत्याहि मनुष्याला मिळाली नाहीं अशी मोठी सिद्धि तुला मिळाली आहे. तुझ्या भावांना हें स्थान मिळालेलें नाहीं. तुला अजून मनुष्यलोकांतील विकार सोडीत नाहींत. अरे, हा स्वर्ग आहे. हे पहा देवर्षि, सिद्ध व देव.' इन्द्र असें सांगत असतां युधिष्ठिर त्याला पुनः म्हणाला, 'देवेन्द्रा, त्या माझ्या बंधूंवांचून येथें रहाण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. जेथें माझे भाऊ असतील तिकडेच मलाहि जावयाचें आहे. ती कृष्णवर्णाची व बुद्धि आणि सत्वगुण यांनीं संपन्न अशी स्त्रीश्रेष्ठ द्रौपदी जेथें गेली असेल तेथेंच मलाहि जावयाचें!' १७.१.३.

## महाप्रस्थानिकपर्व समाप्त.

# स्वर्गारोहणपर्व १८.

## अध्याय १ ला.

[ १. स्वर्गांत गेल्यावर युधिष्ठिर आपल्या भावांना व कर्ण, धृष्टद्युम्न, इत्यादिकांना मिळालेल्या स्थानांची चवकशी करतो. ]

( १ ) **जनमेजय**—मुने, माझ्या थोरल्या आजोबांना म्हणजे पांडवांना, तसेंच धृतराष्ट्रपुत्रांना स्वर्गीं गेल्यावर कोणतीं स्थानें मिळालीं हें मला कळावयास पाहिजे आहे. आपण माझ्या मतें सर्व जाणणारे आहां. व्यासमहर्षींनीं आपल्याला तसें सामर्थ्य दिलें आहे.

**वैशंपायन**—राजा, युधिष्ठिर आदिकरून तुझे थोरले आजोबा स्वर्गांत गेल्यावर त्यांनीं तेथें काय केलें तें ऐक. तेथें गेल्यावर युधिष्ठिरानें पाहिलें कीं, दुर्योधन कान्तियुक्त होऊन आसनावर बसला आहे. तो सूर्याप्रमाणें तळपत असून वीराच्या शोभेनें संपन्न होऊन तेजस्वी देव आणि पुण्यकर्मे साध्य यांच्या

समुदायांत बसला होता. त्याला तसा पाहून युधिष्ठिराला राग आला आणि तो एकाएकीं तेथून मागें वळला. तो मोठ्यानें म्हणाला, 'अदूरदर्शी व लोभी अशा दुर्योधनासह मी येथें राहूं इच्छित नाहीं. त्याच्यामुळेंच आम्हांला पूर्वी वनवासाचे क्लेश पडले व पुढें मित्र, बांधव, इत्यादिकांची युद्धांत हत्या करावी लागून राज्याचा नाश करावा लागला. आमची पत्नी द्रौपदी वडिलांसमक्ष भरसभेंत ओढून आणण्यांत आली ती याच्यामुळेंच. देवहो, मला दुर्योधनाचें तोंड पहाण्याची इच्छा नाहीं. जिकडे माझे भाऊ आहेत तिकडेच मींहि जातों.'

युधिष्ठिराच्या भाषणावर नारद हंसून म्हणाला, 'युधिष्ठिरा, छे, छे; असें बोलूं नको. स्वर्गांत रहावयास आल्यावर कसलाहि पूर्वीचा विरोध नष्ट होतो. तर तूं दुर्योधनाविषयीं असें मुळींच बोलूं नकोस. मी काय म्हणतों तें ऐक. हा दुर्योधन राजा देवांना पूज्य झाला आहे. तसाच तो स्वर्गांत रहावयास आलेल्या राजश्रेष्ठांना मान्य झाला आहे. ज्यांनीं ज्यांनीं म्हणून युद्धामध्यें आपल्या शरीराचा होम करून वीरलोकांची प्राप्ति करून घेतली ते सर्व देवांसमान झाले आहेत. महाभयंकर प्रसंगींहि निर्भयपणें वागल्यामुळें या दुर्योधनाला क्षात्रधर्मानुसार हें स्थान मिळालें आहे. यास्तव, युधिष्ठिरा, द्यूतप्रसंगीं जो प्रकार घडला, अथवा द्रौपदीला जे क्लेश झाले, त्यांचा विचार आतां मनांत आणूं नकोस. तसेंच, तुमच्या बांधवांकडून जे दुसरेहि क्लेश तुम्हांला झाले, ते मग युद्धप्रसंगींचे असोत वा इतर प्रसंगींचे असोत, त्यांची आठवण आतां बुजवून टाक आणि दुर्योधनाशीं सलोख्यानें व न्यायानें वागूं लाग. हा स्वर्ग आहे. येथें वैराचें काम नाहीं ?

नारदानें असें सांगितलें तेव्हां युधिष्ठिर उलट त्याला म्हणाला, 'मग माझे भाऊ कोठें आहेत ? जर अधर्मी, पापी व मित्रद्रोही दुर्योधनाला हे सनातन वीरलोक प्राप्त झाले, तर जे माझे भाऊ सत्यवचनी, सत्यप्रतिज्ञ, शूर, व्रतशाली, थोर मनाचे होते, त्यांना कोणते लोक मिळाले, हें पहाण्याची माझी इच्छा आहे. दुर्योधनामुळेंच घोडे, हत्ती, माणसें, इत्यादिकांसह राज्याचा नाश झाला व आम्हीं वैराचा प्रतिकार करतांना क्रोधानें जळून गेलों. सत्यप्रतिज्ञ महात्मा कुंतीपुत्र कर्ण कोठें आहे ? धृष्टद्युम्न, सात्यकि, तसेंच धृष्टद्युम्नाचे पुत्र हे कोठें आहेत ? तेहि क्षात्रधर्मानुसार शस्त्रांनींच युद्धांत वध पावले होते. माझे मित्र विराट, द्रुपद, धृष्टकेतु, चेकितान, इत्यादि राजे तरी मला कोठें दिसतील ? शिखंडी,

द्रौपदीचे पुत्र, पराक्रमी अभिमन्यु, यांनाहि मीं कोठें पाहूं शकेन ? नारदा, त्यांना पहाण्याची मला इच्छा आहे.' १८. १. १.

---

## अध्याय २ रा.

[ १. युधिष्ठिराला नरकाचें दर्शन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—देव हो, या ठिकाणीं अतुल पराक्रमी कर्ण तसेच युधामन्यु व उत्तमौजा हे माझे थोर मनाचे बंधु कोठें दिसत नाहींत ते ? ज्यांनीं माझ्यासाठीं रणाग्नींत आपल्या देहांचें हवन केलें, माझ्यासाठीं जे युद्धांत वध पावले, ते वाघासारखे शूर महारथी राजे व राजपुत्र कोठें आहेत ? त्यांनांहि हाच लोक मिळाला असला पाहिजे. मग ते जर येथें आले असतील तर मलाहि त्यांच्याच संगतींत रहावयाचें आहे. आणि जर त्यांना हा अक्षय व शुभ लोक मिळाला नसेल, तर मला त्या बंधुबांधवांवांचून येथें करमणार नाहीं. मृतांना उदकदान करीत असतां कुंती मातेनें जेव्हां ' कर्णाला पाणी दे रे, ' असें मला सांगितलें, तेव्हांपासून ते शब्द माझ्या हृदयाला लागून राहिले आहेत. मातेच्या समान योग्यतेचे त्या थोर कर्णाचे पाय मी तत्क्षणींच कां धरले नाहींत, अशी मला नित्य रुखरुख लागून राहिली आहे. कर्णासह आम्हीं एकत्र असतों, तर इन्द्रालाहि युद्धांत आमचा पराभव करणें शक्य नव्हतें. देव हो, जेथें कोठें कर्ण असेल तेथें जाऊन मी त्याला भेटणार आहें. तो कोण हें मला माहीत नव्हतें, म्हणूनच अर्जुनाच्या हातून त्याचा वध झाला. प्राणाहूनहि प्रिय असा भीम, चंद्रासारखा तेजस्वी अर्जुन व अश्विनांसारखे नकुळ, सहदेव, तशीच माझी सहधर्मचारिणी पाञ्चाली यांचें दर्शन मला पाहिजे आहे. मला येथें कांहीं रहावयाचें नाहीं, हें निश्चित समजा. बंधुविरहिताला मला स्वर्गाची काय कथा ? जेथें ते असतील, तोच माझा स्वर्ग.

**देव**—युधिष्ठिरा, तुझी जर तशीच श्रद्धा असेल तर चल तिकडे; वेळ कशाला ? तुझ्या मनाप्रमाणें करावयाची आम्हांला देवराजाची आज्ञाच आहे.

**वैशंपायन**—राजा, असें सांगून देवांनीं दूताला सांगितलें कीं, युधिष्ठिराला त्याचे इष्टमित्र दाखीव, जा. त्याप्रमाणें राजा युधिष्ठिर व देवदूत तेथून निघाले ते जेथें कर्ण, भीम, अर्जुन, इत्यादि होते तेथें आले. पुढें देवदूत व मागून युधिष्ठिर असे ते चालत असतां त्यांना घाणेरडा व बिकट मार्ग लागला. त्यांत पापी

लोक दिसत होते. तो काळोखानें व्याप्त असून केश, शेवाळ, गवत अशीं त्यांत पसरलीं होतीं. पापी लोकांची घाण, मांस व रक्त यांचा चिखल, इत्यादिकांनीं तो माखलेला असून भालू, माश्या, डांस यांनीं गजबजलेला होता. चोहोंकडून त्यांत प्रेतें, हाडें, केश, हीं पडलीं असून किडे, कीटक यांनीं तो व्यापिलेला होता. त्यांत जिकडे तिकडे अग्नि पेटत होते. लोखंडी चोंचीचे कावळे, गृध्र, इत्यादिकांच्या झडपा त्यावर सारख्या पडत होत्या. पर्वताकार प्रेतांच्या निमूळत्या राशी तेथें दिसत होत्या. मेद, रक्त यांचा सडा सर्वत्र पडला असून तुटलेले हातापायांचे, मांड्यांचे, बाहूंचे तुकडे व कापलेल्या पोटांचे सांगाडे जिकडे तिकडे पसरले होते. त्या प्रेतांची अमंगल घाण येतांच अंगावर शहारे उभे रहात. तेथें राजा युधिष्ठिर गेला. तेथें तो विचार करीत उभा असतां, त्याला कढत पाण्यानें भरलेली व उतरून जाण्यास कठीण अशी नदी दिसली. वस्तऱ्याच्या धारेसारखीं तीक्ष्ण पानें असलेलीं झाडें तेथें दोन्ही बाजूंना असून तापलेलें वाळवंट व लोखंडाच्या शिळा ठिकठिकाणीं पसरल्या होत्या. लोखंडाच्या कढयांतून तेल सळसळत होतें. तीक्ष्ण कांट्यांचीं व स्पर्श करण्यास कठीण अशीं कांटेरी सांवरीचीं झाडें व पापी लोकांना होणाऱ्या यातना याहि गोष्टी युधिष्ठिराला तेथें दिसल्या.

तो भयंकर दुर्गन्ध पाहून युधिष्ठिर देवदूताला म्हणाला, 'अरे, असा हा मार्ग आपल्याला अजून किती जावयाचा आहे? माझे ते भाऊ आहेत तरी कोठें? तें तरी कृपाकरून मला सांग. देवांच्या या प्रदेशाला नांव तरी काय आहे?' धर्मराजाचें भाषण ऐकून देवदूत तेथून मागें परतला व म्हणाला, 'तुला येथपर्यंतच जावयाचें होतें. आतां मागें वळावयाचें, असें मला देवांनीं सांगून ठेविलें आहे. तर चल मागें.' त्या दुर्गन्धीनें खिन्न होऊन युधिष्ठिर बहुतेक मूर्च्छित झाला, पण मागें वळण्याचा निश्चयच त्यानें केल्यामुळें तो कसाबसा परतला. परत फिरतेवेळीं त्या धर्मात्म्याच्या कानीं कांहीं दीनवाणे शब्द पडले. 'हे धर्मपुत्रा, हे पुण्यवान् राजर्षे, आमच्यावर कृपा करून क्षणभर तेथेंच उभा रहा. तूं आल्यामुळें पवित्र वारा येथें वाहूं लागला. तो तुझा सुवास घेऊन आल्यामुळें आम्हांला मोठें सुख झालें. आज कितीतरी काळानें तुला पाहिल्यानें आम्हांला सुख लाभलें. तरी घटकाभर तसाच तेथें उभा रहा. तूं येथें उभा राहिल्यानें आम्हांला यातना होत नाहींशा झाल्या.' विव्हळणाऱ्या माणसांचे असे अनेक प्रकारचे दीन शब्द त्याच्या कानीं आले. तेव्हां ते ऐकून दयार्द्रबुद्धीचा युधिष्ठिर 'काय हो हें संकट!' असें म्हणून तेथें उभा राहिला.

ते शब्द पुनः पुनः ऐकून त्याला पूर्वीं केव्हां तसेच शब्द ऐकल्यासारखे वाटे, पण ते कोणाचे ते त्यांच्या ग्लानीमुळें व दुःखामुळें त्याला ओळखतां येत ना. ते शब्द कोणाचे हें न समजल्यामुळें त्यानें त्या विव्हळणाऱ्यांना विचारलें, 'तुम्हीं येथें कां उभे आहां?' त्याचा प्रश्न ऐकून 'मीं कर्ण, मी भीमसेन, मी अर्जुन, मी नकुळ, मी सहदेव, मी धृष्टद्युम्न, मी द्रौपदी, आम्ही द्रौपदीचे पुत्र,' असा तीं आक्रोश करूं लागलीं. त्या ठिकाणाला अनुरूप असे ते दीन शब्द ऐकून 'काय हा दैवाचा खेळ!' असें युधिष्ठिर उद्गारला. तो आणखी म्हणाला, 'या महात्म्यांनीं असें काय पापकर्म केलें कीं त्यांना या घाणेरड्या भयंकर ठिकाणीं यावें लागावें? या पुण्यकर्म्यांनीं कांहीं पाप केलें असेल, असें मला वाटत नाहीं. आणि त्या धृतराष्ट्रपुत्र दुर्योधनानें असें काय पुण्य केलें होतें कीं तो आपल्या पापी अनुयायांसह वैभवसंपन्न व्हावा? तो तर आज इन्द्रासमान वैभवशाली होऊन देवांना पूज्य झाला आहे! आणि हीं पवित्र माणसें नरकास आलीं, हा तरी परिणाम कशाचा? ही सारी मंडळी धर्मवेत्ते, शूर, सत्यभाषणी, क्षत्रियधर्मरत, यज्ञ करून पुष्कळ दक्षणा देणारी अशीच आहे. मी काय झोपेंत आहें कीं जागा आहें, कांहीं कळत नाहीं. माझ्या मनाला कांहीं भ्रम झाला कीं काय?'

धर्मराजा या प्रकारें विचार करून बोलत असतां फार दुःखित होऊन त्याचीं इंद्रियें चिंतेनें अगदीं व्याकुळ झालीं. त्याला मोठा राग आला आणि तो देवांची निंदा करूं लागला. त्या तीव्र दुर्गंधीनें सतावून गेल्यामुळें तो देवदूताला म्हणाला, 'अरे, तूं ज्यांचा दूत आहेस, त्यांच्याजवळ निघून जा कसा. मी तिकडे येत नाहीं. मी येथेंच रहाणार असें त्यांना सांग. माझ्या सान्निध्यामुळें, दुःखित झालेल्या या माझ्या भावांना सुख वाटत आहे.' युधिष्ठिराचा हा निरोप घेऊन देवदूत देवेन्द्राकडे गेला व त्यानें धर्मराजाची सर्व इच्छा त्याला कळविली. १८. १. २.

## अध्याय ३ रा.

[ १. युधिष्ठिर स्वर्गंगेंत स्नान करून मनुष्यदेहत्याग करतो व निर्वैर होऊन दुर्योधनादिकांजवळ जाऊन बसतो.]

(१) **वैशंपायन**—राजा, युधिष्ठिर तेथें थोडा वेळ उभा राहिल्यावर इन्द्रप्रभृति देव तेथें आले. प्रत्यक्ष धर्महि शरीर धारण करून युधिष्ठिराला भेटण्यासाठीं त्यांच्याबरोबर आला. ते तेजस्वी देहांचे व पवित्र कर्म करणारे देव जवळ येतांच तेथील सर्व अंधकार नाहींसा झाला. पूर्वी तेथें दिसत असलेल्या पापकर्म्यांच्या यातनाहि अदृश्य झाल्या. वैतरणी नदी व तिच्याजवळील लोखंडी कांट्यांचा सावरीचा वृक्ष हींहि दिसेनाशीं झालीं. त्या लोखंडाच्या कढया, भयंकर शिळा, वेडीं वांकडीं शरीरें, इत्यादि जीं युधिष्ठिराला पूर्वी दिसलीं तीं नाहींशीं झालीं. शीतल, पवित्र व सुगंधि वायु वाहूं लागला. इन्द्राच्या बरोबर मरुदेव, वसु, अश्विनीकुमार, साध्य, रुद्र, सिद्ध, ऋषि, आदित्य आणि दुसरे स्वर्गांतील देवहि युधिष्ठिर होता तेथें आले. मग अत्यंत वैभवसंपन्न असा तो इन्द्र युधिष्ठिराचें सान्त्वन करून त्याला म्हणाला, 'युधिष्ठिरा, हे अक्षय्य लोक आतां तुला मिळाले आहेत. तूं पाहिलेंस तेवढें पुरे. आतां तुला सिद्धि मिळाली असून राग धरण्याचें कारण राहिलेलें नाहीं. आतां मी सांगतों तें ऐक. सर्वच राजांना एकदां नरक पाहून घ्यावा लागतो. शुभ आणि अशुभ अशा कर्मांच्या दोन राशि असतात. जो प्रथम शुभकर्मांचें फळ भोगतो, त्याला मागून नरक अवश्य आहे. पण प्रथम नरक भोगणाराला मागून स्वर्गसुख मिळतें. ज्याचीं फारच कर्मे पापी असतात तो प्रथम थोड्याशा कर्मांचें फळ म्हणून स्वर्ग भोगतो. म्हणून, युधिष्ठिरा, मीं प्रथम तुला तुझ्या हितासाठींच नरकाकडे पाठविलें. पुत्रा-संबंधानें द्रोणानें तुला प्रश्न केला तेव्हां तूं त्याला शब्दच्छल करून फसविलेंस, त्या कारणानें तुला कांहीं मिषानें मी नरक दाखविला. जसा तूं तसाच भीम, तशींच अर्जुन, नकुळ, सहदेव व द्रौपदी हींहि केवळ भासमान नरकांतच गेलीं होतीं. राजश्रेष्ठा, चल आतां मजबरोबर, तुम्ही सर्वजण पापांतून मुक्त होऊन स्वर्गांत आलां आहां. तुझ्या पक्षांतील जे राजे रणांत मृत्यु पावले, तेहि सर्व येथें आले आहेत पहा. शस्त्रधाऱ्यांत श्रेष्ठ असा कर्णहि येथें आहे. ज्याच्यासाठीं तुला एवढें वाईट वाटलें तो कर्ण परमसिद्धि पावला असून तो पहा तेथें आपल्या स्थानीं बसला आहे. त्याविषयींचा शोक आतां सोडून दे.

तूं आतांपर्यंत फार कष्ट सोसलेस. आतां यापुढें माझ्यासह तूं शोकरहित होत्साता निश्चिंतपणें विहार कर. तूं जीं पुण्यकर्मे केलींस, दानें दिलींस, तप केलेंस, त्यांचें फल आतां तुला मिळालें आहे. देव, गंधर्व आणि अप्सरा स्वच्छ वस्त्रें व अलंकार धारण करून तुझ्या सेवेला तत्पर रहातील. राजसूय यज्ञ करून मिळविलेले व शस्त्रबलावर उत्कर्षास नेलेले लोक तुला मिळाले असून तें तुझ्या तपाचें फल होय. सर्व राजांच्या वर तुझें स्थान आहे. हरिश्चंद्रासारख्या राजांमध्यें आतां तुला विहार करावयास मिळेल. जेथें मांधाता, भगीरथ, दुष्यन्तपुत्र भरत, इत्यादि राजर्षि आहेत, तेथेंच तूंहि विहार करीत रहाशील. युधिष्ठिरा, ही पहा देवनदी पवित्र गंगा. ही त्रैलोक्याला पावन करणारी असून तींत स्नान करून ये. हींत तूं स्नान केलेंस म्हणजे तुझा मनुष्यस्वभाव निघून जाईल व तूं शोकरहित, निश्चिंत व निर्वैर होशील.'

राजा, देवेन्द्रानें युधिष्ठिराला याप्रमाणें सांगितलें असतां प्रत्यक्ष धर्म शरीर धारण करून आपल्या त्या पुत्राला म्हणाला, 'बाळा, मी तुझी भक्ति, सत्य भाषण, क्षमा आणि दमन, यांनीं तुझ्यावर अगदीं संतुष्ट झालों आहें. ही मीं तुझी तिसऱ्या वेळीं परीक्षा घेतली. तुझा स्वभाव अढळ आहे. पूर्वी द्वैतवनांत अरणींच्या प्रकरणांत तुला प्रश्न करून मीं तुझी एकदां परीक्षा घेतली. त्यानंतर द्रौपदी व बंधु मरून पडले असतां श्वानाचें रूप घेऊन पुनः मीं तुझी परीक्षा पाहिली. आतां हा तिसरा प्रसंग. भाऊ जेथें असतील तेथेंच तूं राहूं म्हणतोस. यास्तव तूं सर्वस्वी शुद्ध आहेस. तूं निष्पाप झालेला असून आतां सुखी होशील. तुझे भाऊ नरकास जाण्यास पात्र नाहींत. तो केवळ मायेचा देखावा इन्द्रानें उभा केला होता. सर्वच राजांनीं एकदां नरक अवश्य पाहिला पाहिजे, म्हणून क्षणभर तुला तें दुःख देण्यांत आलें. तुमच्यापैकीं कोणीहि नरकाचे वाटेकरी नाहींत. अर्जुन, भीम, नकुळ, सहदेव, सत्यवचनी शूर कर्ण, राजपुत्री द्रौपदी, यांतून कोणीहि नरकाला योग्य नाहीं. युधिष्ठिरा, चल चल, ही तिन्ही लोकांत संचार करणारी गंगा पहा.'

राजा, याप्रमाणें धर्मानें युधिष्ठिराला सांगितलें असतां, त्या तुझ्या ज्येष्ठ पितामहानें सर्व देवांसह व धर्मासह गंगेंत स्नान केलें. त्याबरोबर त्याचें मानव शरीर नष्ट होऊन त्याला दिव्य स्वरूप प्राप्त झालें व तो निर्वैर आणि स्वस्थचित्त झाला. मग सर्व देवांसह तो तेथून निघाला आणि ज्या ठिकाणीं इतर

पांडव व धृतराष्ट्रपुत्र आपआपल्या स्थानीं मत्सररहित होऊन बसले होते, तेथें गेला. १८. १. ३.

---

## अध्याय ४ था.

[ १. स्वर्गांत द्रौपदी, पांडव इत्यादि आपआपल्या मूळस्थानीं जातात. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, याप्रमाणें देव, मरुत् इत्यादिकांसह देव स्तुति करीत असतां युधिष्ठिर कौरवमंडळी होती तिकडे गेल्यावर तेथें ब्राह्मशरीरानें युक्त असा कृष्ण त्याच्या दृष्टीस पडला. त्या शरीराचें त्याच्या पूर्वशरीराशीं साम्य असल्यामुळें त्याला तो सहज ओळखतां आला. त्याचें शरीर तेजःपुंज असून दिव्यअस्त्रें त्याच्या सेवेला सिद्ध होतीं. चक्रआदिकरून त्याचीं अस्त्रें मनुष्यरूप धारण करून त्यापाशीं उभीं होतीं. तेजःपुंज स्वरूपाचा अर्जुनहि त्याजवळ उभा होता. युधिष्ठिरानें कृष्णाला पाहिल्यावर अर्जुन व कृष्ण यांनींहि युधिष्ठिराकडे पाहिलें व त्याला उत्थापन दिलें. त्याच्या पलीकडे दुसऱ्या बाजूला शस्त्रधाऱ्यांत श्रेष्ठ असा कर्ण बारा आदित्यांसह बसला होता, तोहि युधिष्ठिराच्या दृष्टीस पडला. आणखी एका ठिकाणीं मरुद्गणांसह मूळच्याच स्वरूपांत बसलेला भीम त्याला दिसला. तो दिव्यरूप घेऊन प्रत्यक्ष वायूच्या सन्निध बसला होता. त्याचें वैभव श्रेष्ठ दिसत असून त्याला मोठी सिद्धि मिळाली होती. दुसरीकडे अश्विनीकुमारांच्या स्थानीं नकुळ व सहदेव हे दोघे आपल्या दिव्य तेजानें तळपत असलेले युधिष्ठिरानें पाहिले. तशीच कमलाप्रमाणें कान्तियुक्त शरीराची द्रौपदी आपल्या सूर्यासारख्या तेजानें साऱ्या स्वर्गावर प्रकाश पाडीत असलेली त्याला दिसून आली. त्यांच्याविषयींचें सर्व वृत्त युधिष्ठिराच्या मनांतून विचारून घ्यावयाचें होतें, तोंच देवराजा इन्द्र त्याला म्हणाला, "युधिष्ठिरा, ही प्रत्यक्ष स्वर्गलक्ष्मी केवळ तुझ्यासाठीं द्रौपदीरूप धरून मनुष्यलोकीं गेली होती. म्हणूनच ती पवित्र गंधयुक्त, इतर लोकांहून तेजस्वी व अयोनिज होती. प्रत्यक्ष शंकरानें तुमच्या प्रेमासाठीं तिला निर्माण केलें. द्रुपदाच्या कुलांत ती अवतरली व तुम्हीं तिचें पुढें पालन केलें. द्रौपदीचे पांच पुत्र म्हणजे अग्नीआरखे तेजस्वी असलेले हे थोर गंधर्व होत. धृतराष्ट्र म्हणजे गंधर्वांचा राजा जो ज्ञानी धृतराष्ट्र तोच होय. तोच तुझ्या पित्याचा वडील बंधु झाला. हा पहा इकडे तुमचा वडील बंधु कर्ण. तो सूतपुत्र राधेय म्हणून प्रसिद्ध होता. तो आतां आदित्यगणांमध्यें बसला आहे.

ते पहा यादवांमधील महावीर. साध्य, विश्वेदेव, मरुद्गण यांमध्यें ते बसले आहेत. सात्यकिप्रभृति वीरहि तिकडेच आहेत. तो अभिमन्यु पहा सोमाशेजारीं बसला असून त्याचेंहि तेज चंद्रासमानच आहे. हा पांडुराजा पहा. कुंती व माद्री त्याच्यापाशींच असून तो नित्य विमानांत बसून मजकडे येत असतो. वसूंमध्यें बसलेला तो भीष्म पहा. द्रोणगुरु बृहस्पतीजवळ बसलेला तुला दिसेल. जे दुसरे वीर व राजे तुम्हांला साहाय्य करावयास आले होते ते, गंधर्व, यक्ष, पुण्यजन, इत्यादिकांच्या स्थानीं गेलेले दिसत आहेत, तर कोणी गुह्यकांच्या ठिकाणीं आहेत. पवित्र कर्मे व बुद्धि यांच्या योगानें त्यांनीं मनुष्यदेहाचा त्याग केल्यावर स्वर्गप्राप्ति करून घेतली.'' १८. १. ४.

---

## अध्याय ५ वा.

[ १. मनुष्यलोकींच्या कर्मांचीं फळें भोगल्यावर भीष्मादिक पुढें कोठें गेले तें वैशंपायन जनमेजयास सांगतो. २. जनमेजय सत्र संपवून हस्तिनापुरीं परत येतो. ३. महाभारताचें महत्त्व व त्याच्या श्रवणाचें फळ. ४. भारतसावित्री व तिचें माहात्म्य. ]

( १ ) **जनमजेय**—मुने, महात्मे भीष्म व द्रोण, राजा धृतराष्ट्र, विराटराजा, द्रुपदराजा, शंख, राजपुत्र उत्तर, धृष्टकेतु, जयत्सेन, सत्यजित् राजा, दुर्योधनाचे पुत्र, शकुनि, कर्णपुत्र, जयद्रथ राजा, घटोत्कचादि मंडळी, तसेच दुसरे देदीप्यमान राजे, ज्यांचीं नांवें पूर्वीं आपण सांगितलीं ते सर्व, स्वर्गांत किती काळपर्यंत राहिले तें मला सांगावें. मुनिश्रेष्ठा, तेथें त्यांना शाश्वत स्थान मिळालें, कीं कर्मफल भोगल्यानंतर ते दुसऱ्या कोणत्या गतीला गेले, हें मला समजावयास पाहिजे आहे; आपल्याला तपोबलानें या सर्व गोष्टी दिसत असतात; त्या आपण मला सांगाव्या.

**सौति**—ऋषिहो, जनमेजयानें अशी विनंति केली असतां महात्म्या व्यासाच्या अनुमतीनें वैशंपायन मुनि त्याच्या प्रश्नांना उत्तर देऊं लागला.

**वैशंपायन**—राजा, सर्वांनाच कांहीं आपापलीं कर्मफलें भोगल्यावर आपल्या मूळस्वरूपांत विरून जातां येत नाहीं. यास्तव, तूं जो प्रश्न केलास तो अगदीं योग्य आहे. याविषयीं देवाचें रहस्य मी सांगतों तें ऐक. तें दिव्यज्ञानी प्रतापी पुराण मुनि व्यासानें पूर्वीं सांगितलें होतें. त्याला सर्व कर्मांचे परिणाम ज्ञात असून तो सर्वज्ञ होता. त्याप्रमाणें जे कर्मफलें भोगून आपल्या मूळ स्वरूपांत शिरले

त्यांचीं नांवें त्यानें सांगितलीं. महातेजस्वी भीष्म वसुमंडळांत गेला; म्हणून आठच वसु आढळतात, अधिक नाहींत; द्रोण हा आंगिरसश्रेष्ठ असा जो बृहस्पति त्यांत शिरला; हार्दिक्य कृतवर्मा मरुद्गणांत प्रविष्ट झाला; प्रद्युम्न सनत्कुमारांत विरून गेला; धृतराष्ट्र कुबेराच्या दुष्प्राप्य लोकांत गेला; त्याच्या समागमें गांधारी देखील गेली. कुंती व माद्री या दोन पत्न्यांसह पांडु राजा इन्द्राच्या भुवनांत राहिला. विराट व द्रुपद हे दोघे, तसाच धृष्टकेतु राजा, निशठ, अक्रूर, सांब, भानु, कंप, विदूरथ, भूरिश्रवा, शल, भूरिराजा, कंस, उग्रसेन, वसुदेव, उत्तर व त्याचा भाऊ शंख, ही सर्व मंडळी विश्वेदेवांत शिरली. वर्चा नांवाचा सोमाचा तेजस्वी व प्रतापी पुत्र अर्जुनाचा पुत्र अभिमन्यु झाला होता; आजवर कोणी लढला नसेल असा तो लढून मरण पावला व तो स्वर्गीं कर्मफल भोगल्यावर पुनः सोमांत प्रविष्ट झाला. कर्णानें रवींत प्रवेश केला, शकुनि द्वापरांत पोंचला व धृष्टद्युम्न अग्नींत समाविष्ट झाला. धृतराष्ट्राचे सारे पुत्र म्हणजे मूळचे बलिष्ठ राक्षस होते. ते महात्मे वैभवशाली होऊन शस्त्रानें पवित्र होत्साते स्वर्गीं गेले. विदुर धर्मांत अंतर्भूत झाला, तसाच युधिष्ठिरहि त्यांतच विरला. बलराम हा भगवान् शेष असल्यामुळें तो पाताळांत शिरला. त्यानें पितामहाच्या आज्ञेनें योगधारणा केली. जो आदिपुरुष नारायण देव तोच अंशरूपानें वासुदेव झाला होता व अवश्य तें कर्म करून झाल्यावर तो आपल्या मूळस्वरूपांत समाविष्ट झाला. त्याच्या सोळा सहस्र स्त्रिया सरस्वती नदींत कालान्तरानें बुडून गेल्यामुळें मनुष्यशरीरें टाकून त्या पुनः स्वर्गारूढ झाल्या व पूर्वींप्रमाणें अप्सरा होऊन वासुदेवांत अन्तर्धान पावल्या. त्या महायुद्धांत जे घटोत्कचादि महारथी वीर मारले गेले, ते कोणी देवांत तर कोणी यक्षांत असे मिळून गेले. दुर्योधनाचें साहाय्य करणारे वीर मूळचे राक्षस होते, त्यांनाहि सर्वांना क्रमानें उत्तम लोकांची प्राप्ति झाली. त्यांतील कोणी इन्द्रलोकीं तर कोणी कुबेरलोकीं, तर आणखी कित्येक वरुणलोकीं प्रविष्ट झाले. राजा, याप्रमाणें सर्व कौरवांचें व पांडवांचें चरित्र तुला विस्तारानें सांगितलें.

(२) **सौति**—ऋषिहो, यज्ञकर्म चाललें असतां मधील वेळांत हें सर्व चरित्र ऐकून राजा जनमेजयाला आश्चर्य वाटलें. मग त्याच्या याज्ञिकांनीं यथाविधि यज्ञकर्म समाप्त केलें. सर्पांची मुक्तता केल्यामुळें आस्तिक मुनीला मोठें समाधान झालें. जनमेजानें सर्व ब्राह्मणांना दक्षिणा देऊन संतुष्ट केलें व मग ते आपआपल्या

मार्गानें घरोघर निघून गेले. ब्राह्मणांची यथाविधि पाठवणी केल्यावर राजा जनमेजय तक्षशिलेहून आपल्या हस्तिनापुरास परत आला.

( ३ ) सौति म्हणतो, ऋषिहो, अशी ही भारतकथा जनमेजयाच्या सर्पसत्रप्रसंगीं व्यासाच्या अनुमतीनें वैशंपायनानें जशी सांगितली तशी मीं तुम्हांला सविस्तर सांगितली. या कथेला इतिहास असें नांव असून तो इतिहास पुण्यदायक आहे. हें उत्तम व पवित्र आख्यान सत्यवादी अशा कृष्णद्वैपायन व्यासानें रचिलें. व्यासमुनि हा सर्वज्ञ, विधिवेत्ता, धर्मज्ञानी, अतींद्रिय ज्ञानाचा अधिकारी, शुद्ध अंतःकरणाचा, तपस्वी व पवित्र हृदयाचा होता. तो महायोगैश्वर्याचा धनी असून सांख्य व योग या विद्यांत निष्णात होता. तो केवळ एकतंत्री विद्वान् नसून त्यानें दिव्य दृष्टीनें पाहून ही भारत-कथा लिहिली. त्या महात्म्याला पांडवांची तशीच दुसऱ्याहि उदार क्षत्रियांची कीर्ति लोकांत पसरावयाची होती.

ऋषिहो, हें भारत आख्यान जो कोणी स्वतः समजून घेऊन प्रत्येक पर्वाच्या प्रसंगीं दुसऱ्याला ऐकवील, त्याचें सर्व पाप धुवून निघून तो स्वर्ग जिंकील व श्रेष्ठ ब्रह्मरूप होण्याची त्याला पात्रता येईल. कृष्णद्वैपायनप्रणीत हा वेद जो शांत मनानें दुसऱ्यांना सांगेल त्याच्या ब्रह्महत्यादि पापांच्या कोटी असल्या तरी त्या नष्ट होतील. श्राद्धप्रसंगीं जो हें ब्राह्मणांना ऐकवील, त्यानें दिलेलें अन्नपान अक्षय्य होऊन त्याच्या पितरांना पोंचेल. मनुष्य दिवसा जें पाप करतो, मग तें इंद्रियांनीं असो वा मनानें असो, तें महाभारताच्या सांगण्यानें सायंकाळीं नष्ट होतें. जें पाप रात्रीं घडलें असेल, तें महाभारताच्या पठनानें सकाळीं नाहींसें होतें. महाभारताला महाभारत हें नांव पडण्याचें कारण असें कीं, त्यांत महत्त्व म्हणजे मोठेपण आणि भारवत्त्व म्हणजे गांभीर्य किंवा पोक्तपणा हीं एकत्र झालीं आहेत. त्या शब्दाची ही व्युत्पत्ति ज्याला कळली तो सर्व पापांपासून मुक्त होतो. सगळीं अठरा पुराणें व धर्मशास्त्रें तसेंच सहाहि अंगांसहित वेद एका बाजूला उभे केल्यास दुसऱ्या बाजूला त्यांची तोड करण्याला एकटें महा-भारत पुरें आहे. महात्म्या व्यासानें सिंहासारख्या गंभीर वाणीनें या ग्रंथाविषयीं काय म्हटलें आहे तें ऐका. तो म्हणतो, ‘ अठरा पुराणांचा कर्ता व वेदस्वरूपी महासागराची व्यवस्था लावणारा असा जो भगवान् समर्थ कृष्णद्वैपायन व्यास-मुनि त्यानें तीन वर्षें सतत श्रम करून हा सविस्तर भारत ग्रंथ रचिला. ’

या जयनामक भारतकथात्मक ग्रंथाचें जो श्रवण करील त्याला संपत्ति, कीर्ति व विद्या हीं सर्व प्राप्त होऊन त्याजवळ नित्य रहातील. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या विषयांसंबंधानें जें कांहीं या ग्रंथांत सांगितलें आहे, तें दुसरीकडे मिळूं शकेल, पण जें यांत नाहीं तें मात्र अन्य कोठेंहि मिळणार नाहीं, ज्याला मोक्षाची इच्छा असेल, त्यानें, मग तो ब्राह्मण असो, क्षत्रिय असो कीं ती गर्भिणी स्त्री असो, हा जय नांवाचा इतिहास अवश्य ऐकावा. याच्या श्रवणानें स्वर्गेच्छूला स्वर्ग मिळेल, जयेच्छूला जय मिळेल, गर्भिणी स्त्रीला तिच्या इच्छेप्रमाणें पुत्र किंवा भाग्यशाली कन्या होईल. कृष्णद्वैपायन मुनीनें हा भारत ग्रंथ धर्मबुद्धीनें रचून सर्वांना मोक्षाचा मार्ग सुलभ करून ठेविला आहे. याची मूळ ग्रंथसंख्या साठ लक्ष होती. त्यांतील तीस लक्ष देवलोकीं राहिली, पंधरा लक्ष पितृलोकीं ठेविलेली आहे, चवदा लक्ष यक्षलोकीं आहे व उरलेली एक लक्ष मनुष्यलोकीं सांगण्यांत येते. हें भारत नारदानें देवांना सांगितलें, असित व देवल या मुनींनीं पितरांना सांगितलें, रक्षानें यक्षांना सांगितलें आणि शुक आणि वैशंपायन यांनीं तें मनुष्यलोकांत प्रसिद्ध केलें.

हा व्यासप्रणीत इतिहास पुण्यकारक, अर्थसंपन्न व वेदमान्य असून जो कोणी ब्राह्मणाला पुढें बसवून त्याचें श्रवण करील, त्याच्या या लोकींच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन त्याला कीर्ति मिळेल आणि परलोकीं उत्तम सिद्धीहि मिळेल, यांत मला मुळींच संशय वाटत नाहीं. या सबंध भारताचा चवथा भाग जरी श्रद्धेनें वाचला किंवा कोणाला सांगितला व तसें करतांना ज्या व्यासानें तो आपल्या शुकनामक पुत्राला पटविला त्याचें स्मरण केलें, तर तेवढ्यानेंहि मोठी सिद्धि मिळेल.

( ४ ) या संसारचक्रामध्यें सहस्रावधि मातापितरें तशींच शेंकडों स्त्रीपुत्रादि माणसें यांचा संबंध आला असेल, आज येतो आहे व पुढें येईल. त्यांत जशीं सहस्रावधि स्थानें आनंदाचीं आहेत, तशीं शेंकडों स्थानें भयावहहि आहेत. पण त्यांचा परिणाम प्रतिदिवशीं मूढांवरच होतो, ज्ञानी पुरुषांवर होत नाहीं. म्हणून मी बाहु उभारून कंठरवानें सांगत आहें कीं, धर्मापासूनच अर्थ व काम यांची जर प्राप्ति होते, तर त्याची पाठ लोक कां धरीत नाहींत? पण हें माझें म्हणणें कोणीच ऐकत नाहीं. भोगच्छेनें, भयामुळें, लोभामुळें, फार काय जीवितरक्षणासाठींसुद्धां धर्माचा त्याग करूं नये. कारण धर्म हाच नित्य असून सुख

आणि दुःख हीं क्षणिक होत. तसाच जीव हाच आत्मरूपानें नित्य असून उपाधिरूप जें त्याचें कारण तें मात्र अनित्य आहे.

प्रातःकाळीं उठून या भारतसावित्रीचें जो पठन करील, त्याला सर्व भारताच्या पठनाचें फळ मिळून ब्रह्माचीहि प्राप्ति होईल. समुद्र आणि हिमालय पर्वत हे जसे दोन्ही आपआपल्या परीनें रत्नांचे निधि आहेत, तसेंच भारत हेंहि रत्ननिधिच आहे. कृष्णद्वैपायनप्रणीत अशा ह्या भारतरूपी वेदाचें पठन स्वतः करून जो दुसऱ्यासहि तो ऐकवील, त्याला ऐश्वर्य भोगावयास मिळेल. द्वैपायन व्यासाच्या ओष्ठपुटांतून स्रवलेलें हें भारतरूप अप्रतिम पवित्र व पापनाशक अमृत जो वाचलेलें श्रवण करील त्याला पुष्करासारख्या तीर्थांतील स्नानापासून तरी अधिक लाभ काय होणार आहे! जो सोन्यानें मढविलेल्या शिंगांच्या शंभर गाई वेदवेत्त्या बहुश्रुत ब्राह्मणांला दान देतो व जो पुण्यकारक अशी भारतकथा सतत श्रवण करतो त्या उभयतांनाहि सारखेंच फळ प्राप्त होतें. १८. १. ५.

## स्वर्गारोहणपर्व समाप्त.



श्रीमन्महाभारतार्थ समाप्त.